# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः–दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.



पुस्तक १ लें.] आगस्ट १९०८. [अंक १ ला.

## विषयानुक्रम.








मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.



वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



मालवणच्या किल्ल्यांतील शिवाजी महाराजांची प्रतिमा.

# इतिहाससंग्रह.

## प्रास्ताविक लेख.

इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ।
पंचभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः ॥ १ ॥
इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना ।
लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत् संप्रकाशितम् ॥ २ ॥

—महाभारत.

इ. स. १८७८ सालीं, 'काव्येतिहाससंग्रहा'चा उदय होऊन महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें जगापुढें येण्यास प्रारंभ झाला. त्या मुदतीपासून आजपर्यंत सुमारें तीस वर्षांमध्यें निरनिराळे ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशित झाले, आणि महाराष्ट्रवाङ्मयांत त्यांची उत्कृष्ट भर पडली, ह्यांत शंका नाहीं. ह्या तीस वर्षांमध्यें मासिकपुस्तकद्वारें व स्वतंत्र रीतीनें, जे इतिहास व चरित्रग्रंथ मुद्रणयंत्रांतून बाहेर आले, त्यांचें सिंहावलोकन केलें, तर कोणाही सरस्वतीभक्ताचें अंतःकरण आनंदानें उल्लसित झाल्यावांचून राहणार नाहीं. तीस चाळीस वर्षांपूर्वीं, ग्रांटडफ साहेबांनीं लिहिलेला मराठ्यांचा इतिहास व दुसरे ग्रंथ हेच आमच्या इतिहासाचीं मुख्य साधनें मानिलीं जात असत. तो काल सांप्रत अगदीं बदलून जाऊन, मराठ्यांच्या इतिहासाचे अस्सल कागदपत्र व त्यांवरून लिहिलेले साधार व सविस्तर ग्रंथ, आतां इतिहासभक्तांची जिज्ञासा तृप्त करण्यास, महाराष्ट्रसारस्वतभांडारांत अनेक निर्माण झाले आहेत. प्रथमतः मराठ्यांच्या पराक्रमकथा मनोरंजक रीतीनें निवेदन करून, लोकहृदयामध्यें इतिहासाभिरुची उत्पन्न करण्यास कारणीभूत झालेल्या बखरी व पोवाडे ह्यांच्या प्रकाशनास सुरुवात झाली; नंतर क्रमशः लोकाभिरुचीचा ओघ सत्यशोधनाकडे किंवा तत्त्वशोधनाकडे वळून, अस्सल जुने लेख शोधून काढण्याकडे व त्यांची प्रसिद्धि करण्याकडे लोकप्रवृत्ति झाली, हें मनुष्यस्वभावास अनुरूपच आहे. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या बखरी व तदनंतर प्रसिद्ध झालेले अस्सल कागदपत्र ह्यांचें तात्त्विक दृष्टीनें निरीक्षण केलें, तर कल्पित, अद्भुत आणि सत्य अशीं लोकाभिरुचीचीं स्वरूपें क्रमशः दिसून येतात. ह्याप्रमाणें पाहिलें म्हणजे तीस वर्षांपूर्वीं जी लोकाभिरुचि होती, ती

आतां पुष्कळ बदलून जाऊन, अस्सल कागदपत्र आणि अस्सल लेख ह्यांचें महत्त्व लोकांस अधिक समजूं लागलें आहे; व तन्निरीक्षणार्थ त्यांची अधिक आतुरता दिसत आहे, ह्यांत शंका नाहीं. अर्थात् इतिहाससंशोधनार्थ अव्याहत परिश्रम करणाऱ्या शोधक लोकांस व त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या लेखांस ह्याचें सर्व श्रेय दिलें पाहिजे, आणि ह्यापुढील इतिहासप्रकाशनाचें काम त्या धोरणावर सुरू केलें पाहिजे, असा समय प्राप्त झाला आहे.

२. 'काव्येतिहाससंग्रह,' 'कायस्थप्रभूंच्या इतिहासाचीं साधनें,' 'ऐतिहासिक लेखसंग्रह,' 'भारतवर्ष', 'महाराष्ट्र-इतिहास' इत्यादि मासिक पुस्तकांनीं अस्सल कागदपत्र प्रसिद्ध करण्याचा सद्धेतुपूर्वक चांगला प्रयत्न केला होता. परंतु अनेक कारणांमुळें तीं मासिक पुस्तकें अल्पायुषी झालीं. ह्या मासिक पुस्तकांच्या हातून जरी अल्पकाळ देशसेवा झाली आहे, तरी त्यांनीं केलेलें काम फार प्रशंसनीय असून, त्यांचा महाराष्ट्रवाचकांवर इष्ट परिणाम झाला आहे ह्यांत शंका नाहीं. वर निर्दिष्ट केलेलीं ऐतिहासिक मासिक पुस्तकें व हल्लीं विद्यमान असलेलीं 'विविधज्ञानविस्तार,' 'सरस्वतीमंदिर,' 'प्रभात,' 'ग्रंथमाला,' वगैरे वाङ्मयात्मक मासिकपुस्तकें ह्यांचे इतिहासप्रकाशनार्थ झालेले व होत असलेले प्रयत्न अत्यंत अभिनंदनीय आहेत, हें जरी खरें आहे, तरी मराठ्यांच्या इतिहासाची जी विपुल सामग्री सांप्रत उपलब्ध होत आहे, तिच्या मानानें ते अपुरे आहेत, हें कबूल केलें पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासाचे नवीन नवीन उपलब्ध होणारे बहुमोल व विपुल कागदपत्र, जिज्ञासु वाचकवृंदाची स्वदेशाच्या इतिहासाविषयीं उत्पन्न झालेली उत्कृष्ट लालसा, आणि इतिहाससंशोधकांची वाढत असलेली विचिकित्स बुद्धी, ह्यांच्या मानानें विद्यमान असलेलीं साधनें अतिशय मर्यादित व संकोचित आहेत व त्यांच्या द्वारें इतिहासभक्तांची आकांक्षा तृप्त होत नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. इंग्लंडमध्यें ज्याप्रमाणें 'रॉयल हिस्टारिकल सोसायटी'सारख्या इतिहासप्रकाशनार्थ अवतीर्ण झालेल्या स्वतंत्र संस्था व तद्द्वारें प्रसिद्ध होणारीं 'हिस्टारिकल रिव्ह्यू' सारखीं स्वतंत्र मासिकपुस्तकें अस्तित्वांत आहेत व त्यांचें काम जोरानें चालू आहे, त्याप्रमाणें ह्या विषयाप्रीत्यर्थ अंतःकरणपूर्वक प्रयत्न करण्याचा समय सांप्रत प्राप्त झाला आहे, हें कोणीही सुज्ञ मनुष्य मान्य करील.

३. इतिहासाचीं अस्सल साधनें शोधून, तीं प्रकाशित करण्याविषयीं जशी एतद्देशीय विद्वानांस विशेष अभिरुचि उत्पन्न झाली आहे, त्याप्रमाणें—किंबहुना त्यापेक्षांही प्रबल—जिज्ञासा युरोपियन विद्वन्मंडलास झाली आहे, ही एक विशेष संतोषाची गोष्ट होय. ह्या जिज्ञासेमुळें आमच्या राजकर्त्यांसही ह्या विषयाची

महती विशेष वाटून, त्याकडे त्यांचें चांगलें लक्ष वेधलें आहे. हिंदुस्थानसरकार व इतर प्रांतिकसरकार ह्यांचा ऐतिहासिक जुनीं स्थळें संरक्षण करण्याचा प्रयत्न ज्याप्रमाणें चालू आहे, त्याप्रमाणें जुने ऐतिहासिक कागदपत्र व ऐतिहासिक लेख प्रसिद्ध करण्याचाही त्यांचा स्तुत्य प्रयत्न चालू आहे. कलकत्तासरकारच्या आश्रयानें प्रसिद्ध होणारा तेथील सरकारी दप्तरांतील अस्सल पत्रव्यवहार, मुंबईसरकारच्या कृपेनें प्रसिद्ध होणाऱ्या पुणें येथील पेशव्यांच्या दप्तरांतील रोजनिशा व इतर ऐतिहासिक कागदपत्र, किंवा मद्रासरकारच्या साहाय्यानें प्रसिद्ध होणारीं, पांडिचरीचे फ्रेंच गव्हर्नर डुप्ले ह्यांचा दुभाष्या आनंदरंग पिले ह्याच्या तामिल भाषेंतील जुन्या रोजनिशांचीं भाषांतरें, हीं सर्व सरकारच्या इतिहासविषयक सहानुभूतीचीं व ज्ञानप्रसारक सद्धेतूचीं दर्शक चिन्हें आहेत असें कोण ह्मणणार नाहीं? लंडन येथील 'रायल एशियाटिक सोसायटी'चे विद्वान् सेक्रेटरी व हिंदुस्थानसरकार ह्यांनीं त्या विद्वत्संस्थेच्या मार्फत एक महत्कृत्य करण्याचें योजिलें आहे. हिंदुस्थानसरकारानें 'इंडियन टेक्स्ट सेरीज' (Indian Text Series) आणि 'इंडियन रेकार्ड सेरीज' (Indian Record Series) अशा दोन ग्रंथमाला नामांकित विद्वानांकडून प्रसिद्ध करून, भारतवर्षीय जुना इतिहास व तत्संबंधाचे कागदपत्र ह्यांचें पुनरुज्जीवन करण्याचें सत्कृत्य आरंभिलें आहे; व त्याप्रमाणें पहिल्या पुस्तकमालेपैकीं मनुशीनामक एका इटालियन प्रवाशाचा 'हिंदुस्थानांतील मोंगल राजांचा वृत्तांत' (Storia Do Mogor 1653-1708) नामक एक सर्वोत्कृष्ट प्रचंड ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे, व दुसरा ग्रंथ 'मद्रास येथील फोर्ट सेंट जार्ज ह्या किल्ल्याचा प्रारंभींचा इतिहास' (The Early History of Fort St. George, Madras) हा तयार होत आहे. दुसऱ्या पुस्तकमालेपैकीं 'इ. स. १७५६—५७ सालचा बंगाल' (Bengal in 1756-57) ह्या शिरोलेखाखालीं नबाब सुराजउद्दौल्याच्या कारकीर्दींतील राजकारणांच्या इतिहासाचे तीन भाग, आणि 'बंगाल्यांतील प्राचीन फोर्ट विलियम्' (Old Fort William in Bengal) ह्मणजे कलकत्त्याच्या इतिहासाचे दोन भाग, असे दोन ऐतिहासिक महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. अशा रीतीनें हिंदुस्थानच्या इतिहासाचें प्रसिद्धीकरण करण्याचें स्तुत्य व लोकमान्य कार्य हिंदुस्थानसरकारच्या आश्रयाखालीं विद्वान् आंग्लपंडितांनीं चालविलें आहे. ह्या ग्रंथमालेच्या योगानें एतद्देशीय विद्वानांस व विद्याभिलाषी जनांस इतिहाससंशोधनाची गोडी लागावी व हे ग्रंथ त्यांना त्या कामीं मार्गदर्शक व्हावेत असा त्यांचा मुख्य उद्देश आहे. ह्या ग्रंथमालेच्या आदर्शानें त्यांना स्वदेशाच्या इतिहासाचें सुंदर चित्र

बरोबर दृग्गोचर झालें व सत्यान्वेषण करण्याची त्यांना प्रेरणा झाली, तर हिंदुस्थानावर सरकारचे व आंग्लविद्वन्मणींचे चिरस्मरणीय उपकार होतील ह्यांत शंका नाहीं.* अर्थात् सद्धेतुप्रेरित होऊन सरकारानें ह्या विषयाकडे ज्या अर्थीं इतकें लक्ष पुरविलें आहे, त्या अर्थीं त्यांची सहानुभूति व कृपादृष्टि महाराष्ट्र-इतिहासप्रकाशनाचे कामींही पुष्कळ साह्य करील, अशी आह्मांस फार फार आशा आहे. ह्या वेळीं निष्ठेनें व सद्धेतूनें मात्र आपलें कर्तव्य करण्यास आह्मीं तयार झालें पाहिजे.

४. लोक व सरकार ह्यांना इतिहासप्रकाशनाचें सारखेंच अगत्य वाटण्याचा सुप्रसंग एकसमयावच्छेदेंकरून सांप्रत प्राप्त झाला आहे. अशा वेळीं 'काव्येतिहाससंग्रह' यासारखें एक स्वतंत्र मासिक पुस्तक सुरू करून, मराठ्यांच्या इतिहासाची राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे सर्व दिशेनें माहिती देणारे अस्सल व मूल्यवान् कागदपत्र प्रसिद्ध करण्याची कोणास स्फूर्ति होणार नाहीं? आजपर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं उपलब्ध झालेले ऐतिहासिक अस्सल कागदपत्र व दुर्मिळ माहिती इतकी विपुल प्राप्त झाली आहे कीं, ती लोकांपुढें आणण्यास इतिहासविषयास वाहिलेल्या एका स्वतंत्र मासिक पुस्तकाचीच जरूर आहे. काव्यप्रकाशनाचें काम स्वतंत्र रीतीनें जसें 'काव्यसंग्रहा'नें बजाविलें, तसेंच इतिहासप्रकाशनाचें कार्य 'इतिहाससंग्रहा'नेंच सिद्धीस नेणें फार इष्ट आहे, आणि त्यास प्रस्तुतसारखी उत्तम संधि प्राप्त होणें हें एक शुभ चिन्ह आहे. अशा वेळीं

---

*लंडन येथील रायल एशियाटिक सोसायटीचे सेक्रेटरी प्रो. ऱ्हिस डेव्हिड्स् ह्यांनीं ह्याबद्दल काढलेले पुढील उद्गार वाचण्यासारखे आहेत:—

"It has long been a matter for regret that the natives of India offered us so small a degree of help in the study of the history of their own country or countries. For one Englishman who can read the ancient literatures with facility there must be scores of natives. Yet how very little of permanent value have they, as yet, accomplished in history. This cannot be for want of intellectual power. As lawyers they show great ability in weighing the value of evidence, and in drawing guarded and reasonable conclusions from complicated documents. And one or two of the native scholars who have devoted their attention to this branch of inquiry have rendered excellent service. Perhaps the methods of the University examinations in India, in which literary fluency counts for so much, and historical criticism for so little, are in some measure answerable for this neglect. But is it too much to hope that, when this series of scholarly hand-books shall have placed in their hands sufficient examples of the right methods in historical research, some of them may be moved by emulation to take up these studies for themselves, and themselves to join, in much larger numbers, in the work?"

'इतिहाससंग्रह' या नांवाचें स्वतंत्र मासिक पुस्तक आम्हीं प्रतिमासीं प्रसिद्ध करण्याचें योजिलें, तर त्यास रसिक व इतिहासप्रिय वाचकांची सहानुभूति व त्यांचा उदार आश्रय यांची उणीव पडेल, अशी भीति बाळगण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. या वेळीं दुधांत साखर या न्यायानें घडून आलेली अतिशय आनंददायक अशी एक गोष्ट कळविणें अवश्य आहे. ती ही कीं, ज्या 'निर्णयसागर' छापखान्याच्या मालकांनीं महाराष्ट्रकवींच्या रसाळ काव्यांचा जीर्णोद्धार करण्याचा संकल्प करून, 'काव्येतिहाससंग्रहां' तील 'काव्यसंग्रह' प्रसिद्ध करण्याचें पवित्र कर्तव्य स्वीकारिलें व तें उत्कृष्ट रीतीनें तडीस नेलें, त्यांनींच 'इतिहाससंग्रहा' चेंही प्रकाशकत्व मोठ्या आनंदानें स्वीकारिलें आहे. अर्थात् या एकाच गोष्टीवरून 'इतिहाससंग्रहा' ची योजना चांगल्या भरभक्कम पायावर झाली आहे हें वाचकांच्या निदर्शनास येईल.

५. 'इतिहाससंग्रहा' चें अंतःस्वरूप व त्यांतील विषययोजना ह्या संबंधानें थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. 'इतिहाससंग्रहा' चा मुख्य उद्देश अस्सल कागदपत्र व अप्रसिद्ध माहिती प्रकाशित करणें हा आहे. तथापि तो अमलांत आणण्याचा प्रयत्न अव्यवस्थित रीतीनें व कंटाळवाण्या पद्धतीनें केला जाणार नाहीं. मराठ्यांच्या इतिहासाचें स्वरूप अतिशय व्यापक असून त्याचा सर्वदृष्टींनीं व सांगोपांग विचार अद्यापि झालेला नाहीं. सातारचे छत्रपति किंवा पुण्याचे पेशवे ह्यांच्या कारकीर्दी अथवा त्यांनीं जिंकलेल्या लढाया, एवढाच महाराष्ट्राचा इतिहास नव्हे. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं महाराष्ट्राच्या इतिहासाची व्याप्ति किती आहे, त्याचें थोडक्यांत मोठें चटकदार वर्णन केलें आहे. तें पुनरुच्चारणाची भीति न बाळगतां येथें देण्यासारखें आहे. ते लिहितातः—

"प्रथमारंभीं मराठे लोकांची स्थिति शिवाजी महाराजांच्या पूर्वीं कशी होती, त्यांस पुढें जें एवढें वैभव प्राप्त झालें, त्यास कारणीभूत असे त्यांच्या अंगीं मुळचे गुण कोणते व कितपत होते, व वरील राज्यस्थापकानें त्यांचा विकास कोणते प्रकारानें केला, हिंदुधर्माची स्थिति त्या वेळेस कशी होती व तिनें यवनांच्या अपकर्षास कितपत साहाय्य केलें, इत्यादि गोष्टी मूळ उपोद्घातांत आल्या पाहिजेत. नंतर मावळे लोकांचें वर्णन, शिवाजीचे संवगडे तानाजी, बाजी, येसाजी यांचे वृत्तांत, शिवाजीचें शिक्षण, सैन्यव्यवस्थेचा व राज्यव्यवस्थेचा प्रकार, आरमारी फौजेची तयारी, अवरंगजेबाचा दरबार, मोंगलांचें लष्कर, भगवा झेंडा, रामदासाचा राजनीतिपर व धर्मपर उपदेश, तुकारामबुवांचें कीर्तन, वामनाचें पांडित्य व कवित्व, परभूलोकांचें शौर्य, इत्यादि गोष्टी शिवराजाच्या वृत्तांतांत दाखल झाल्या पाहिजेत. नंतर संभाजीपासून शाहूपर्यंतच्या इतिहासांत, सैन्यव्य-

वस्थेत व राज्यव्यवस्थेत झालेले फेर, कलुषाचें वर्चस्व, फिरंग्यांची सत्ता, बेगम साहेबांची हकीकत व शाहूचें आपल्या शत्रूच्या घरीं वाढणें, चित्पावनांची पूर्वस्थिति व उत्कर्ष, ब्राह्मणांच्या व मराठ्यांच्या झटापटी, बाळाजीचें चातुर्य व वक्तृत्व, त्याचे दोघे बच्चे याज्ञिकीच्या किंवा कारकुनीच्या कामांत फार तर वाकबगार व्हावयाचे, ते हानिबाल व हासड्रुबल यांसारखे महावीर बनून शत्रूंचे काळ कसे होऊन राहिले तो प्रकार, दोघां भावांची परस्परप्रीति, मस्तानी व समशेरबहादूर, शूद्र अधिपतींचा अभ्युदय, महाराष्ट्रांतील जातिभेदजन्य वैमनस्य मोडून सर्वांचा कट करण्याविषयीं पेशव्यांचा कटाक्ष, शाहूच्या गळ्यांतील केवळ ताईत बनून गेल्यामुळें त्यानें अंतकाळीं सर्व राज्याधिकाराचें त्यांस केलेलें समर्पण, इत्यादि गोष्टींचा या दुसऱ्या भागांत अंतर्भाव झाला पाहिजे. ह्यापुढें तर मराठ्यांचा इतिहास म्हणजे साऱ्या हिंदुस्थानचाच इतिहास; कां कीं चारी मुलखांत यांचे सत्ताधारी कायम होऊन राहिले. तेव्हां नदीचें पात्र रुंदावत जातां जातां, समुद्रसंगमाच्या स्थानीं जसें अफाट होऊन सागराशीं एकात्मक होऊन जातें, त्याप्रमाणें वरील काळच्या इतिहासांत अवघ्या भारतवर्षाच्या इतिहासाचा अंतर्भाव होतो. यापुढें छत्रपतींचें किंवा पेशव्यांचें घराणें हें मागील सूत्र सुटून, शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले, पवार, बुंदेले, पटवर्धन, इत्यादि शाखांच्या पृथक् विस्तारांत शिरावें लागतें. तेव्हां या सर्वांचें यथातथ्य वर्णन म्हटलें म्हणजे पुनः वरच्यासारखा प्रत्येकाचा अवांतर परिवार झाला." ह्या उताऱ्याचा स्थूलमानानें विचार केला म्हणजे एवढेंच दिसून येईल कीं, मराठ्यांच्या इतिहासाची व्याप्ति विशेष असून, त्यांचें खरें ज्ञान होण्यास, त्याचीं राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक, कार्षिक वगैरे सर्व अंगें बरोबर समजलीं पाहिजेत. कोणत्याही राष्ट्राचा इतिहास परिपूर्ण रीतीनें समजण्यास त्या राष्ट्राची घटना, संस्कृति, अभ्युदय आणि विलय ह्या गोष्टींचें यथार्थ व तात्त्विक ज्ञान प्राप्त झालें पाहिजे. इंग्लंडांतील प्रख्यात विद्वान् पंडित एच्. टी. कोलब्रूक ह्यांनीं एके ठिकाणीं इतिहासाची बरोबर व्याख्या दिली आहे. ते म्हणतातः—"इतिहास म्हटला तर राजकीय कलह, राष्ट्रीय युद्धें, किंवा शौर्यपराक्रम ह्यांच्याच मालिकेचें नुसतें वर्णन नव्हे; तर दिसण्यांत किरकोळ परंतु अतिशय महत्त्वाच्या कीं, ज्यांचा समाजरचनेशीं प्रत्यक्ष संबंध पोहोंचतो, अशा गोष्टी; राष्ट्रांच्या पौरसंस्था; त्यांचे बाह्य व अंतर्गत-विशेषतः अंतर्गत-संबंध, आणि ज्यांचा सर्वत्र समाजावर बरा वाईट परिणाम घडून येतो व ज्यांच्या योगानें सुधारलेल्या राष्ट्रांच्या दृष्टीनें राष्ट्रप्रगति वाढते, अशा सामान्य परंतु महत्वाच्या घडामोडी ह्यांचाही

त्यांत समावेश केला पाहिजे. सतत संशोधन करण्यायोग्य असा इतिहास जर कोणता असेल, तर तो मानवी बुद्धीचाच होय. बुद्धिवानांचे शोध, कल्पकांच्या कल्पना, आणि कुशलांच्या युक्त्या ह्यांचा विचार केला ह्मणजे त्यांत मानवी बुद्धीचा इतिहास दिसून येतो."* ह्याप्रमाणें पाहिलें ह्मणजे महाराष्ट्राच्या सशास्त्र व सोपपत्तिक इतिहास लिहिण्याचा प्रसंग केव्हां येईल तें सांगणें कठीण आहे. परंतु क्षणभर लोकचित्ताकर्षण करणाऱ्या मनोरंजक बखरी किंवा गोष्टी वाचण्याचा काळ आतां मागें राहिला असून, सशास्त्र व साधार इतिहासास लागणारीं समग्र साधनें गोळा करण्याचा सांप्रत काळ आला आहे. हीं साधनें वरकांतीं रसहीन व शुष्क वाटलीं, तरी त्यांचा ज्या वेळीं एकजीव होईल, त्या वेळीं त्यांतून फारच शुद्ध व स्वादु अशा रसधारा निर्माण होतील हें विसरतां कामा नये.

६. आह्मांस प्राप्त झालेला ऐतिहासिक कागदपत्रांचा संचय फार मोठा व विपुल आहे, व तो प्रकाशित करणें आमचें आदि कर्तव्य आहे. तथापि कांहीं विवक्षित इतिहासभक्तांवांचून सर्वसामान्य वाचकांस, वाटेल तो कागद व वाटेल तें पत्र समजण्याची शक्ति अद्यापि प्राप्त झाली नसल्यामुळें, आह्मीं संगतवार रीतीनें ऐतिहासिक प्रकरणें सादर करण्याचें योजिलें आहे. जातिभेद, पक्षपातबुद्धि, किंवा कोणताही अन्य हेतु सत्येतिहासप्रकाशनास आड न येईल अशी खबरदारी बाळगणें हें आमचें पहिलें कर्तव्य होय. कित्येक वेळां थोर पुरुषांच्या दोषवृत्ति मुद्दाम झांकून ठेवण्याचा परिपाठ दिसतो व सात्विक दृष्टीच्या सज्जनांस तो युक्तच आहे. तथापि, इतिहासप्रकाशनाचे कामीं तसा सत्यापलाप करणें एक प्रकारचें पाप आहे; व त्या पापास उद्युक्त होण्याचें प्रयोजन सर्वथा असतेंच असतें असें नाहीं. कारण, थोर पुरुषांचा एखादा दोष किंवा अल्पसा प्रमाद लोकनिदर्शनास आला, तर तेणेंकरून त्यांच्या सद्गुणांचें महत्त्व अथवा सत्कृतींची थोरवी सुज्ञमतें कधींही कमी होणार नाहीं. एका संस्कृत कवीनें ह्मटलें आहे:—

दोषमपि गुणवति जने दृष्ट्वा गुणरागिणो न खिद्यंते ।
प्रीत्यैव शशिनि पतितं पश्यति लोकः कलंकमपि ॥ १ ॥

* "In speaking of history, I do not refer merely to the succession of political struggles, national conflicts, and warlike achievement, but rather to less conspicuous yet more important occurrences, which directly concern the structure of society; the civil institutions of nations; their internal, more than their external, relations; and the yet less prominent but more momentous events, which affect society universally, and advance it in the scale of civilized life. It is the history of the human mind, which is most diligently to be investigated; the discoveries of the wise; the inventions of the ingenious, and the contrivances of the skilful.' —*H. T. Colebrooke.*

"गुणवंताच्या ठिकाणीं एखादा दोष असला तर तो पाहून गुणांचे चाहते कधीं खेद पावणार नाहींत. पहा कीं, चंद्रावरचा कलंकही लोक प्रीतीनें अवलोकितात!" अर्थात् सद्धेतुपूर्वक व सत्यान्वेषणाच्या बुद्धीनें, जर एखाद्या थोर ऐतिहासिक व्यक्तीचे दोष व्यक्त करण्याचा प्रसंग आला, तर त्या योगानें त्या थोर पुरुषाच्या सद्गुणांची व सत्कृतींची केवळ तेजोहानि होईल, असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं.

७. 'इतिहाससंग्रहा'मध्यें मराठी भाषेंतील अस्सल व महत्त्वाचे कागद प्रसिद्ध होतील हें वर सांगितलेंच आहे, तथापि त्याबद्दल थोडासा अधिक खुलासा करणें इष्ट आहे. जीं ऐतिहासिक प्रकरणें चांगलीं संगतवार लागलीं आहेत, तीं सुबोध रीतीनें, स्वतंत्र पृष्ठांक घालून, प्रसिद्ध करण्यांत येतील; व त्यांचा विस्तृत उपोद्घात ग्रंथाचा भाग समाप्त झाला ह्मणजे देण्यांत येईल. ह्याशिवाय इतिहासप्रसिद्ध पुरुषांचीं, अप्रसिद्ध व नवीन माहितीच्या द्वारें उपलब्ध झालेलीं चरित्रें, ऐतिहासिक निबंध, ऐतिहासिक चर्चा वगैरे भिन्नभिन्न विषय देण्यांत येतील. आणि विविधविषयदर्शक परंतु त्रोटक अशी जी माहिती असेल, ती 'ऐतिहासिक टिपणें' ह्या सदराखालीं देण्यांत येईल. अशा टिपणांचें महत्त्व फार असून तीं सागरांतील जलबिंदूप्रमाणें इतिहासाचा एकएक घटकावयवच आहेत. ह्याप्रमाणें अस्सल कागदपत्र व उपयुक्त माहिती ह्यांचा मुख्यतः संग्रह करण्यांत येईल. त्यांच्या खालोखाल दुसऱ्या दोन विषयांकडे लक्ष देण्यांत येईल. ते विषय ह्मणजे परभाषेंतील ऐतिहासिक माहिती आणि आख्यायिका व दंतकथा वगैरे.

मराठ्यांचा इतिहास जुन्या सरदार, जहागिरदार, इनामदार वगैरे पिढीजाद लोकांच्या दप्तरांत अंतर्भूत झालेला आहे, त्याप्रमाणें तो अनेक इंग्रजी, फारशी, फ्रेंच आणि पोर्तुगीज वगैरे भाषेंतील कित्येक जुन्या दुर्मिळ ग्रंथांतही लपून बसलेला आहे. तो संग्रह कमी मूल्यवान् नसून त्याकडे विद्वान् शोधकांचें लक्ष सांप्रत लागलें आहे. बंगाल्यांतील पाटणा कॉलेजांतील इतिहासविषयाचे प्रोफेसर जादुनाथ सरकार एम्. ए. ह्यांनीं, पर्शियन भाषेंतील शिवाजीच्या चरित्राविषयींची उपयुक्त माहिती अलाहाबाद येथील 'मॉडर्न रिव्ह्यू' ह्या उत्कृष्ट मासिकपुस्तकाच्या द्वारें नुकतीच प्रसिद्ध केली आहे. अशीच अपूर्व व मनोरंजक माहिती, इंग्रजी, फ्रेंच व पोर्तुगीज ह्या भाषेंतील ग्रंथांत आढळून येण्यासारखी आहे. हिंदुस्थानामध्यें युरोपियन प्रवासी फार प्राचीन काळापासून आले आहेत, व त्यांनीं आपल्या शोधक बुद्धीचा उपयोग करून, तत्कालीन एतद्देशीय राज्यें व राजकर्ते ह्यांच्या संबंधानें वेळोवेळीं फार महत्त्वाची माहिती दिलेली आहे. त्याचप्रमाणें, राजकारणसंबंधानें लष्करी अ-

धिकाऱ्यांनीं तत्कालीन मुत्सद्यांविषयीं व योद्ध्यांविषयीं नमूद केलेले अभिप्राय व तसेच अन्य उल्लेख फार संग्राह्य आहेत. इ. स. १७९० सालीं, इंग्रज, मराठे व निजाम ह्या तीन राष्ट्रांनीं एकत्र होऊन टिपूवर स्वारी केली, त्या वेळीं मराठ्यांच्या फौजेचे सेनापति परशुरामभाऊ पटवर्धन व हरिपंततात्या फडके ह्यांचीं इंग्रज सेनानी मेजर डायरम व क्याप्टन लिटल ह्यांनीं लिहिलेलीं वर्णनें, किंवा इ. स. १८१८ मध्यें अष्टीच्या लढाईत रणांगणावर पतन पावलेला, रणपटु मराठा वीर बापू गोखले ह्याच्या शौर्याविषयीं, जनरल वेलस्ली, आणि दुसरे लष्करी अंमलदार ह्यांनीं काढलेले स्तुतिपर उद्गार हे वाचून कोणाचें हृदय हर्षभरित होणार नाहीं, व कोणास ह्या वीररत्नाविषयीं सकौतुक अभिमान वाटणार नाहीं? तात्पर्य, इंग्रजी ग्रंथांत मराठ्यांच्या इतिहासाची अपरंपार माहिती भरलेली आहे. हें ज्ञानभांडार फार दुर्मिळ व दुष्प्राप्यही आहे. तें जसजसें साध्य होईल, तसतसें तें वाचकांस सादर करण्याचा आमचा मानस आहे.

ह्याशिवाय आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा ह्या मासिक पुस्तकांत अंतर्भाव करण्यांत येईल. ती गोष्ट ह्मणजे थोरांच्या आख्यायिका व दंतकथा ही होय. महदाख्यायिका व दंतकथा ह्यांचें महत्त्व फारच आहे. प्लुटार्कनामक एका ग्रंथकारानें लिहिलें आहे:—"कमी महत्त्वाची एखादी अल्पशी कृति, अल्प भाषण किंवा विनोद, ह्यांच्या योगानें मनुष्याचा खरा स्वभाव जसा व्यक्त होतो, तसा मोठमोठ्या लढायांच्या व वेढ्यांच्या वर्णनानेंही होणार नाहीं."*. हें जसें मनुष्याविषयीं आहे, तसें मोठमोठ्या राजकारणांसही लागू आहे, ह्मणून तीं संग्रह करण्याचा युरोपियन राष्ट्रांत फार प्रघात आहे. सर जॉन मालकम ह्यांनीं ह्मैसुरचा प्रख्यात मुत्सद्दी पूर्णया ह्याच्याविषयीं एके ठिकाणीं एक मौजेची आख्यायिका दिली आहे. इ. स. १७९९ मध्यें श्रीरंगपट्टणावर इंग्रजांचा हल्ला होऊन टिपू धारातीर्थीं पतन पावला, आणि त्याचें सर्व राज्य इंग्रजांनीं पादाक्रांत केलें. त्या वेळीं त्यांनीं, टिपूचे जुने मुत्सद्दी व सरदार ह्यांस अनुकूल करून घेऊन, पूर्वीच्या हिंदुराजास गादीवर बसविण्याचा संकेत केला. त्या प्रसंगीं त्यांनीं, टिपूचा दिवाण पूर्णया ह्यास एक अभयपत्र पाठवून, त्यानें इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं यावें असें कळविलें. त्या पत्रास उत्तर देतांना पूर्णया ह्यानें असे उद्गार काढिले कीं, "काशीपासून रामेश्वरापर्यंत, माझ्या हिंदुजातीचें रक्षण करण्यास जें राष्ट्र अवतीर्ण झालें, त्या राष्ट्रास सामील होण्यास, क्षणाचा तरी विलंब मी लावीन काय?"

---

* "Often an action of a small note, a short saying or a jest shall distinguish a person's real character more than the greatest seiges."—*Plutarch.*

ह्या पूर्णय्याच्या पत्रांतील एका वाक्यानें टिपूच्या राज्यांतील हिंदुलोकांची मनोवृत्ति व टिपूनें केलेला धर्मच्छळ ह्यांचें जें चित्र नेत्रांसमोर उभें राहतें, तसें एक मोठा इतिहास लिहूनहीं उभें राहणार नाहीं. अर्थात् अशा प्रकारच्या आख्यायिकांचाही संग्रह करून, इतिहासाच्या एका अंगाची पूर्तता करणें अवश्य आहे. ह्याच संदरामध्यें ऐतिहासिक पुरुषांचे निरनिराळे विचारतरंग आणि जुन्या स्मरणांतल्या गोष्टी ह्यांचाही प्रसंगविशेषीं समावेश करण्यांत येईल.

८. ऐतिहासिक जुने कागदपत्र प्रसिद्ध करण्याचें काम जितकें महत्त्वाचें आहे तितकेंच ऐतिहासिक थोर पुरुषांचीं जुनीं चित्रें प्रसिद्ध करणें हेंही फार अगत्याचें कर्तव्य आहे; व तें 'इतिहाससंग्रह'द्वारा अल्पांशानें तरी सिद्धीस नेण्याचा आमचा मानस आहे. महापराक्रमशाली व राजकारणकुशल अशा ज्या लोकोत्तर विभूति हिंदुस्थानांत अवतीर्ण झाल्या, त्यांची कीर्ति व थोरवी इतिहासप्रकाशनानें अधिक प्रसृत होते व त्यांच्या दर्शनाची उत्कंठा सहृदय वाचकांस उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. परंतु आपल्या देशामध्यें इतिहासप्रसिद्ध पुरुषांच्या चित्रांचा व ऐतिहासिक वस्तूंचा संग्रह करण्याची चाल फारशी नसल्यामुळें अशीं चित्रें अगदीं दुर्मिळ व दुष्प्राप्य झालीं आहेत. तीं महत्प्रयासानें मिळवून प्रकाशित करण्याचा उपक्रम, पुणें येथील चित्रशाळेच्या उत्पादकांनीं एके वेळीं केला होता. तो तसाच एकसारखा चालू राहिला असता, तर ऐतिहासिक चित्रांचा संग्रह फारच नांवाजण्यासारखा झाला असता. प्रस्तुत जुनीं चित्रें व लेख महत्प्रयासानें मिळविण्याचें काम मुंबईचे सन्मान्य गृहस्थ रा. रा. शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी जे. पी. यांनीं चालविलें असून, तत्प्रीत्यर्थ त्यांनीं एक ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय संस्थापित केलें आहे. त्यांनीं त्यांतील अनेक दुर्मिळ ऐतिहासिक चित्रें व लेख 'इतिहाससंग्रहा'चे उपयोगासाठीं देण्याचें मोठ्या आनंदानें मान्य केलें आहे. त्याचप्रमाणें, महाराष्ट्रांतील अनेक जुन्या घराण्यांतील पुरुषांनीं आपल्या संग्रहांतील ऐतिहासिक चित्रें व जुन्या तसबिरी देण्याचें कबूल केलें आहे. या सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून, आह्मीं प्रत्येक अंकामध्यें एक दोन सुंदर चित्रें देण्याचें योजिलें आहे. या योगानें जुन्या चित्रांचें प्रसिद्धीकरण होऊन हें एक महत्त्वाचें कार्य सिद्धीस गेल्यासारखें होईल. या कामीं शक्य असेल त्यांनीं आह्मांस चित्रद्वारा अवश्य साहाय्य करावें हें निराळें सांगावयास नकोच.

९. ऐतिहासिक लेख व ऐतिहासिक चित्रें ह्यांच्या प्रकाशनाप्रमाणें ऐतिहासिक भूगोल व ऐतिहासिक नकाशे ह्यांच्याकडेही थोडेंबहुत लक्ष देणें

अवश्य आहे. 'भारतवर्षा'मध्यें 'दक्खनचे प्राचीन देशविभाग अथवा दक्षिण देशचा भूगोल' असा एक उपयुक्त लेख मागें प्रसिद्ध झाला होता; परंतु त्यासारखे अनेक लेख अद्यापि प्रसिद्ध व्हावयाचे आहेत. आह्मांस महाराष्ट्राचा एक हस्तलिखित ऐतिहासिक भूगोल उपलब्ध झाला आहे. त्याचप्रमाणें मराठी सैन्यांचे मुक्काम आणि त्यांच्या मोहिमांचे मार्ग ह्यांच्या यादीही बऱ्याच उपलब्ध झाल्या आहेत. इंग्रज सेनापति गॉडर्ड किंवा लेक ह्यांच्या सैन्यांच्या हालचालींचे तक्ते व मुक्कामांच्या यादी वगैरे इंग्रजीमध्यें प्रसिद्ध आहेत; त्याप्रमाणें शिवाजी, बाजीराव (पहिले), रघोबा दादा, महादजी शिंदे, हरिपंत फडके, परशुरामभाऊ पटवर्धन इत्यादि महाराष्ट्रवीरांच्या स्वाऱ्यांचे क्रमवार तक्ते प्रसिद्ध होणें इष्ट आहे. फ्रीमननामक ग्रंथकारानें 'युरोपचा ऐतिहासिक भूगोल' ह्मणून जसे दोन खंड प्रसिद्ध केले आहेत, तसे महाराष्ट्राचा ऐतिहासिक भूगोल ह्मणून दोन खंड प्रसिद्ध करणें अवश्य आहे. समुद्राचे व खुषकीचे सर्व प्रवासमार्ग व त्यांतील गुप्त जागा मराठ्यांस पूर्ण रीतीनें माहित होत्या. त्याचप्रमाणें सर्व डोंगरी किल्ले, भुइकोट, दुर्ग व गड ह्यांचेंही त्यांस चांगलें ज्ञान होतें. ह्या संबंधानें नाना फडणविसांच्या दसरांत सांपडलेले नकाशे पराकाष्ठेचे उपयोगी आहेत. मराठ्यांच्या रणभूमीचीं रेखाचित्रें, विजयदुर्ग येथील मराठ्यांचें मुख्य आरमारी ठिकाण, आणि तेथील सर्व जातींचीं आरमारी जहाजें ह्यांचे नकाशे व चित्रें, इत्यादिकांचा अमूल्य संग्रह प्रसिद्ध झाला असतां एक अत्यंत महत्त्वाचें कार्य होणार आहे. तें अंशतः सिद्धीस नेण्याचा आमचा मानस आहे. रेनेल किंवा अंक्वेटिल ड पेरान ह्यांच्या सारख्या युरोपियन प्रवाशांनींही ह्या विषयासंबंधानें लिहिलेले इंग्रजी व फ्रेंच ग्रंथ पाहिले ह्मणजे ह्या विषयाचें महत्व पूर्णपणें लक्षांत येतें. नाना फडणविसांसारख्या चतुर मुत्सद्यासही ह्या विषयाचें पूर्ण ज्ञान होतें. परंतु दुर्दैवानें ह्या विषयाची माहिती अप्रसिद्ध राहिल्यामुळें आमची भूगोलविषयक प्रगति बिलकूल झाली नव्हती असा कित्येकांचा विनाकारण गैरसमज झालेला आहे. तो नाहींसा होण्यास ह्या विषयाची माहिती व नकाशे हेच जगापुढें आले पाहिजेत. नानांच्या संग्रहांतील जुने नकाशे पाहिले ह्मणजे मराठे मुत्सद्यांस हिंदुस्थानचा भूगोल किती अवगत होता त्याची चांगली साक्ष पटते. असो. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक भूगोलामध्यें महाराष्ट्रांतील इतिहासप्रसिद्ध, लढाऊ व प्रचंड अशा किल्ल्यांच्या माहितीचा संग्रह अंतर्भूत होतो; तेव्हां त्यांची माहिती देण्याचाही अवश्य तो प्रयत्न करण्यांत येईल, हें निराळें सांगावयास नकोच. इंग्रजी भाषेमध्यें मेजर हेग

यांनीं या विषयावरील माहिती प्रसिद्ध करण्याचा उपक्रम चालविला आहे; व त्यांनीं दौलताबाद, गोवळकोंडा, गुलबर्गा, बेदर, माहूर, गाविलगड, नरनाळा वगैरे किल्ल्यांची माहिती 'पायोनियर'वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केली आहे. अशा प्रकारचीं महाराष्ट्रांतील सर्व किल्ल्यांचीं वर्णनें मराठी भाषेंत प्रसिद्ध होणें इष्ट आहे.

१०. 'इतिहाससंग्रहा'चा उद्देश, त्याचा कार्यक्रम, त्याची कर्तव्यमर्यादा या संबंधानें दोन शब्द स्पष्टीकरणार्थ वर सादर केले आहेत. तथापि, आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीबद्दल येथेंच थोडा उल्लेख करणें अवश्य आहे. कोणतेंही सत्कार्य ह्मटलें ह्मणजे त्यास सज्जनांची व तज्ज्ञ रसिकांची सहानुभूति व मार्गदर्शकत्व हीं अवश्य लागतात, त्याप्रमाणें 'इतिहाससंग्रहा'सही त्यांची अपेक्षा आहे. आह्मांस कळविण्यास विशेष आनंद वाटतो कीं, स्वदेशाच्या इतिहासाचा निस्सीम अभिमान बाळगणारे व तत्संशोधनार्थ रात्रंदिवस अश्रांत परिश्रम करणारे असे कित्येक व सन्मान्य मित्र आह्मांस साहाय्य करण्यास तत्पर झाले आहेत. या मित्रमंडळीमध्यें रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे अग्रेसर आहेत ही एक संतोषाचीं गोष्ट होय. त्यांचीं कित्येक मतें यद्यपि आमच्यांहून भिन्न आहेत, तरी त्यांची इतिहासप्रकाशनार्थ दिसून येणारी उत्कट इच्छा व सहकार्य करण्याविषयींची प्रवृत्ति प्रशंसनीय होत, असें ह्मटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. अर्थात् सद्धेतुप्रेरित सज्जनांची खरी सहानुभूति व निस्सीस इतिहासभक्तांचें नाना प्रकारचें प्रोत्साहन यांची जोड मिळाली, ह्मणजे तेथें यशःसिद्धि होण्यास फारसा विलंब लागणार नाहीं. रा. राजवाड्यांप्रमाणेंच स्वदेशाच्या इतिहासाची अभिवृद्धि करूं इच्छिणारे इतर सद्गृहस्थ आह्मांस पूर्ण साहाय्य करितील अशी उमेद आहे.

येणेंप्रमाणें ह्या मासिकपुस्तकाचें सामान्य धोरण आहे. तें सिद्धीस नेऊन, त्याच्या हातून मराठ्यांच्या ऐतिहासिक साधनांत चांगली भर पाडणें, सर्वस्वीं उदार, रसिक व इतिहासप्रिय आश्रयदात्यांवर अवलंबून आहे. तें परमेश्वराच्या कृपाकटाक्षेंकरून सिद्धीस जावो, एवढी त्या जगत्साक्षी विश्वंभरास अनन्यभावें प्रार्थना करून हा प्रास्ताविक लेख येथें संपवितों.

# महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें.

## ( कारकीर्द—अहल्याबाई होळकर. )

### भाग १ ला.

#### उपोद्घात.




दूर येथील होळकरांच्या घराण्यांतील इतिहासप्रसिद्ध सद्गुणी व राज्यकर्त्री स्त्री राणी अहल्याबाई हिचें नांव अखिल भरतखंडामध्यें दुमदुमत आहे. ह्या लोकोत्तर स्त्रीचें साधार व सविस्तर असें चरित्र आजपर्यंत प्रसिद्ध झालेलें नाहीं. परंतु सांप्रत महाराष्ट्राच्या इतिहासाचीं जीं नवीन साधनें सुदैवानें उपलब्ध होत आहेत, त्यांवरून ह्या स्त्रीचें सुरस व मनोरम चरित्र जगापुढें लवकरच येईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं. अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप किती अपूर्व, हृदयंगम व उज्वल आहे, व त्यांत किती इतिहासरस भरलेला आहे, ह्याचें निराळें वर्णन करण्याचें हें स्थल नाहीं. ह्या संबंधानें 'विविधज्ञानविस्तार' मासिक पुस्तकाच्या ३८ व्या वर्षाच्या ५ व्या अंकामध्यें **"अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप व त्यांतील कांहीं मनोरंजक मासले"** ह्या निबंधामध्यें बरीच चर्चा केलेली आहे. त्यावरून जिज्ञासु वाचकांस त्याची अल्पशी तरी कल्पना करितां येईल. तथापि ह्या चरित्रास साधनीभूत होणारा जो पत्रव्यवहार आम्हांस राजकार्यधुरंधर सुप्रसिद्ध महाराष्ट्रमुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांच्या मेणवली येथील दप्तरामध्यें उपलब्ध झाला आहे, त्यावरून अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप व त्याचें खरें अंतरंग स्पष्ट रीतीनें नेत्रांसमोर आल्यावांचून राहणार नाहीं. हा पत्रव्यवहार पत्रशः संपूर्ण मिळालेला नाहीं; तथापि तो जितका उपलब्ध झाला आहे, तितकाही चरित्राच्या मर्यादित अवकाशामध्यें समाविष्ट होण्यासारखा नसून, फार विस्तृत व तत्कालीन बहुविध राजकारणांनीं युक्त असा आहे. त्याचे स्वतंत्र दोन भाग करून ते मराठ्यांच्या इतिहाससाधनांत अंतर्भूत करावेत ह्या हेतूनें, तो क्रमशः 'इतिहाससंग्रह'द्वारा प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे.

२. अहल्याबाईच्या महेश्वर येथील दरबारीं, पेशव्यांच्या तर्फेनें, नाना फडणविसांनीं दोन वकील ठेविले होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें विठ्ठल शामराज व

केसो भिकाजी अशीं होतीं. त्यांनीं महेश्वर येथून बाईच्या दिनचर्येचीं व राजकारणांचीं इत्थंभूत बातमीपत्रें पुण्यास पाठविण्याचा क्रम ठेविला होता. हे वकील अनुक्रमें इ. स. १७७९ पासून इ. स. १७८३, व इ. स. १७८४ पासून इ. स. १७९४ पर्यंत महेश्वर दरबारीं होते. ह्या दोन वकिलांच्या बातमीपत्रांमध्यें अहल्याबाईची दिनचर्या, तिचा दरबार, तिचे मुत्सद्दी, तिचीं पेशव्यांशीं व इतर मराठे सरदारांशीं झालेलीं राजकारणें, वगैरे गोष्टी, उत्तम प्रकारें नमूद आहेतच; परंतु त्या वेळच्या मराठ्यांच्या एकंदर राजकारणांचाही त्यांत चांगल्या रीतीनें निर्देश असून, मराठ्यांच्या इतिहासावर त्यांचा सर्व बाजूंनीं उत्तम प्रकाश पडण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें तत्कालीन भाषा, चालीरीति, वगैरे गोष्टींचेंही त्यावरून चांगलें दिग्दर्शन होण्यासारखें आहे. ह्याकरितां हीं पत्रें इ स. १७८० पासून इ. स. १७८३ पर्यंत एक खंड, व इ. स. १७८४ पासून इ. स. १७९४ पर्यंत एक खंड, अशीं खंडशः प्रसिद्ध करण्यांत येतील.

३. पहिल्या खंडांत विठ्ठल शामराज ह्यांचीं बातमीपत्रें येतील. हा विठ्ठल शामराज मराठ्यांच्या इतिहासांत फारसा कोठें प्रसिद्ध नाहीं. त्याचें उपनांव व राहण्याचें ठिकाण समजत नाहीं, तथापि हा मनुष्य फार जिज्ञासु, चिकित्सक, बहुश्रुत व मार्मिक दिसतो. हा हरिपंत फडके ह्यांच्या वशिल्यानें उदयास येऊन मराठ्यांच्या लष्करांत प्रथमतः बातम्या पाठविण्याचे कामावर लहानशा कारकुनी पेशानें नौकर असावा असें दिसतें. त्याची बुद्धिमत्ता व शोधकता पाहून, नाना फडणविसांनीं त्याची योजना महेश्वर दरबारामध्यें इ. स. १७७९ मध्यें केली. ता. २७ मे इ. स. १७७९ रोजीं, त्यानें पिंपरखेड नजीक नसरतपूर खोजाचें ह्या गांवाहून जें पत्र लिहिलें आहे, त्यावरून तो नुकताच नाना फडणविसांस सासवड मुक्कामीं भेटून, त्यांच्या आज्ञेनें श्रीमंत राघोबादादा पेशवे ह्यांच्या लष्करांत हरी बावाजी ह्यांच्या गोटांत आला होता असें दिसतें. हें पत्र येणेंप्रमाणेः—

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २१ रबिलावलपर्यंत पिंपरखेड नजीक नसरतपूर खोजाचें येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. सासवडचे मुक्कामींहून स्वामींची आज्ञा घेऊन स्वार झालों, ते छ १८ मिनहूस नातेगांव वाकळ्यांचे मुक्कामीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे सैन्यांत राजश्री हरी बावाजी यांच्या गोटांत दाखल झालों. हरिपंतांची भेट घेतली. सरकारचें व राजश्री पाटिलबावांचें पत्रें दिलीं व मशारनिल्हेकडेस गांव आहे त्याविषयीं स्वामींनीं यांस पत्रें दिलीं होतीं तींही दिलीं. पाहून बहुत संतोष झाले. 'मीं विनंती केली होती, त्याप्रमाणेंच श्रीमंतांनीं कृपा करून गांव आम्हांकडे बहाल ठेवला' असें म्हणाले. इरकड कित्येक

वचनोक्ती हैदरनाईक वगैरे यांजकडील वर्तमान आज्ञापिलें, तें सविस्तर मशार-निल्हेस सेवकानें विदित केलें. सांप्रत येथें यांची चौकशी फार आहे. नेहमीं एक कारकून रात्रंदिवस श्रीमंतांच्या डेऱ्यांत यांनीं बसविला आहे. कोण येणार कोण जाणार तितका इतल्ला यांस आहे. श्रीमंतांची मर्जी रक्षून, त्यांचे खर्चवेचाची सरबराई करून, अंतरगत फार बारकाव्यानें चौकशी यथास्थित करितात. प्रस्तुत श्रीमंतांस आज तीन चार दिवस सावकाश नाहीं. पडसें वगैरे व ज्वराचा उपद्रव झाला आहे. दोन चार दिवस स्नान करीत नाहींत. यास्तव तीन मुक्काम नातेगांव वांकळ्यावर आंबराईत झाले. त्या मुक्कामावर पाण्याचा तोटा फारच झाला. परंतु श्रीमंतांस बेआराम ह्मणून मुक्काम झाले. पाण्याकरितांच काल चंद्र २० मिनहूस प्रातःकालीं कूच करून कासारबारीचा घांट उतरून दीड प्रहर दिवसां या मुक्कामीं दाखल झाले. या मुक्कामीं झाडें सावलीस कांहीं नाहींत. परंतु पाणी ओढा वाहत आहे. येथें कांहीं मुक्काम होतील असें बोलतात. सबब कीं, श्रीमंतांस कांहीं आरामही झाला पाहिजे, व मागाहून दादासाहेबांचा कांहीं पैठणींहून खजानाही येणार, त्याचीही मार्गप्रतीक्षा आहे. आरोग्य झालें ह्मणजे दरमजल चलावें, ऐवजासाठीं बारीचे तोंडीं कांहीं शेंपन्नास स्वार ठेवावे, अशीही बोलवा आहे. मुलकी वर्तमान, जे वाटेनें जातात ते आसपास चिठ्या पाठवून जमीदारांस बोलावून आणून, घांस लकडी व शाकभाजी वगैरे सरंजाम मागवून श्रीमंतांकडे पावितात. कमाविसदारांनीं आपलाले तालुक्यांचा सरंजाम मार्गावर आणून पोंहचवावा हा पथ सरकारचा आहे. त्याप्रमाणेंच तालुकदारांजवळून आणवितात. ताकीदार जागांजागां पाठवून रखवाल्लाही करितात. ताकीद फार निक्षून आहे. जें दृष्टीस पडलें व कानीं ऐकिलें तें रुबरू आणून, त्याची यथास्थित चौकशी करून शिक्षा करितात. सांप्रत येथें फौजेचा भरणा दादासाहेबांची खासगत कमकसर दोनशें स्वार, पागा व एकांडे मिळून व पायदळ गाडदी वगैरे हजार बाराशें, व तोफा, याशिवाय शिंद्याची चार पांच हजार फौज व होळकराकडील दोनशें स्वार ऐसे आहेत. पांचा हजारांचे भरतीस शिंद्याकडील आणीकही फौज येणार. सांप्रत या प्रकारचें वर्तमान आहे. श्रीमंतांस जो पदार्थ पाहिजे तो हरिपंतांकडेस त्यांनीं सांगून पाठवावें. यांनीं त्यांचे मर्जीप्रमाणें सरबराई करून द्यावी असें आहे. या लष्करबाजारांत धारणः—ज्वारी बाजरी नऊ साडे नऊ पायली, गहूं नऊ दहा पायली, हरभरे आठ नऊ पायली, डाळ तुरीची अकरा शेर, तांदूळ कंपेश आठ नऊ दहा शेर, गूळ आठ शेर, मीठ चार पायली, तूप अडीच शेर, खुर्दा शिबराई चार टके, आलमगिरी तीन टके, पक्का दोन टके, याप्रमाणें आज आहे. मीं श्रीमंतांचे दरबारास जावें कीं तिकडे आसपास

फिरावें ह्मटलें, त्यास हरिपंत ह्मणाले जे, तुह्मीं गेल्यानें सारे तिन्ही दरबारचे तुमचे ओळखी. श्रीमंतांच्या चित्तांत कीं जवळले लोक विपर्यास घालतील, त्यांची बेमर्जी होईल, ठीक पडणार नाहीं. तुह्मी आह्मांजवळीच असून आह्मांस पुसत जावें. देखाल ऐकाल तें श्रीमंतांस लिहीत जा. याप्रमाणें यांनीं सांगितलें. असा येथें आहें. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. उष्णकाळ फार आहे. सावलीस कांहीं नाहीं. बेसरंजामी, धन्यास सर्व विदित आहे. स्वामी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति."

ह्या पत्रावरून विठ्ठल शामराज हा, पुणें दरबाराच्या माहितीचा असून, दादासाहेबांच्या लष्करांत बातमी आणण्यासाठींच, नाना फडणविसांकडून रवाना झाला होता असें दिसतें. ह्या वेळीं त्याची कायमची नेमणूक झाल्याचें दिसत नाहीं. परंतु राजकारणप्रसंगानें त्यास लवकरच नाना फडणविसांनीं महेश्वर येथें अहल्याबाईच्या दरबारीं वकिलीस पाठविलें असावें असें उघड होतें. तेथें तो पावसाळा लागण्यापूर्वींच पोहोंचला. त्यानें महेश्वर येथून पाठविलेलें ता. १० जून इ. स. १७७९ चें पत्र उपलब्ध झालें आहे, त्यावरून तो नर्मदातटाकीं महेश्वर क्षेत्रीं ह्याच सुमारास पोहोंचला असावा हें सिद्ध होतें.

विठ्ठल शामराज ह्याचीं इ. स. १७७९ सालचीं महेश्वर येथून पाठविलेलीं अवघीं दोनच पत्रें उपलब्ध झालीं आहेत. ह्या सालचीं बाकीचीं पत्रें गहाळ झालीं कीं काय तें समजत नाहीं! इ. स. १७८० पासून इ. स. १७८४ पर्यंतचीं पत्रें बहुतेक शाबूत आहेत. बहुतेक ह्मणण्याचें कारण त्यांतील पत्रेंही मधून मधून गहाळ झालेलीं आहेत!! तीं बहुधा कसरीच्या भक्षस्थानीं पडलीं असावींत, असें सांपडलेल्या कागदांच्या शोचनीय स्थितीवरून मानण्यास हरकत नाहीं! सद्भाग्य एवढेंच कीं, इतका तरी हा मूल्यवान् पत्रव्यवहार आज महाराष्ट्राच्या इतिहासाच्या पुनरुज्जीवनार्थ उपलब्ध झाला!! हा पत्रव्यवहार किती महत्त्वाचा आहे व त्यांतील प्रत्येक पत्र देखील किती वाचनीय व मनोरंजक आहे हें जाणण्याचें काम वाचकांकडे आहे.

विठ्ठल शामराज ह्याची माहिती व ह्या पहिल्या भागाची प्रस्तावना हा सर्व छापल्यानंतर प्रसिद्ध करण्यांत येईल. तोंपर्यंत कोणी इतिहासप्रिय व रसिक गृहस्थांनीं ह्या विषयासंबंधानें अधिक माहिती अथवा कागदपत्र मिळवून देण्याचें श्रेय घेतलें, तर त्यांची आमच्यावर फार मेहेरबानी होईल. ह्या पत्रव्यवहाराच्या प्रसिद्धीनें आणखी ऐतिहासिक कागदपत्रांचा अधिक सुगावा लागेल व ते जगापुढें येतील, तर आमच्या श्रमांचें पुष्कळ अंशीं सार्थक झालें असें मानण्यांत येईल.

---

# महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें.

## भाग १ ला.

### इ. स. १७७९.

[ इ. स. १७७९ सालचीं बातमीपत्रें अवघीं दोनच उपलब्ध झालीं आहेत. त्यांमध्यें मुख्यत्वेंकरून मराठे व इंग्रज ह्यांच्या मधील पहिल्या लढाईच्या सुमाराचें रघुनाथराव दादा पेशवे ह्यांच्या हालचालीचें वर्तमान आहे. ]

पै ॥ चंद्र ५ | **लेखांक १.** | ता. १० जून इ. स. १७७९.

जमादिलाखर समानीन. | **श्रीगजानन.** | मि. ज्येष्ठ व॥ ११ शके १७०१.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २४ जा॥वल परियंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनें-करून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमानें पेशजीं विनंतिपत्रीं लिहून छ २२ मिनहूस रवाना केलीं, तें सेवेसी पावलीं असतील. सांप्रत श्रीमंत दादा-साहेबांचें वर्तमानः—मुंबईस जाऊन मोर्चे दिले आहेत ह्मणून बाजारी वर्तमान ऐकिलें, व इंग्रजांकडे नारो तुकदेव गेले होते, तेही इंग्रजांनीं धिक्कारून माघारी पाठविले जे, 'आह्मांस तुमचा भरंवसा येत नाहीं. तळेगांवावर आमची खराबी करून तुह्मी शिंदे होळकरांसीं मिळून त्याजकडेस निघून गेलां. असे बेइमान. तुमच्या वचनेंत दृढ-तरता नाहीं. इतके दिवसही तुमचे शब्दीं लागून कर्जदार जालों. पेशजीं तुह्मांस रुपया दिला आहे, तो अद्याप वसूल झाला नाहीं. पुढें तुह्मांस खांद्यावर घेऊन आपले पदरानशीं खराब व्हावें, आपल्याशीं वैर करावें, [तर] आमचेही चार जागे लहान थोर त्याच्या इजनांत आहेत. त्यांनींही फराशीसांचें साधन केलें आहे. लढाई भिडाईत खराबी झाली तंर आमची होईल. तुह्मांजवळ तर ना फौज ना खर्चास! तुह्मांस पदरचे खर्चास देऊन, शेवटीं समयास, त्यांसी सास्त बांधून निघून जावें. आह्मीं खराब व्हावें हें आह्मांस अनकूळ पडत नाहीं. तुह्मी कोणतेही गोष्टीस साबूत नाहींत. तळेगांवावर जख बसतां आह्मांवर बसली. तुह्मी साबूत निघून गेलेत, तें ईर्शा आह्मांस येऊन प्रास झाली आहे. असो. आमचे काबूस येईल तें समयीं आह्मी पाहून घेऊं. परंतु तुमची सोबत आह्मांस नको!' असें जाबसाल होऊन

नारो तुकदेव माघारी आले. आतां राजाराम गोविंद, सौभाग्यवती मातुश्री बाईचीं पत्रें इमानपुरस्कर घेऊन, अमृतरायांस घेऊन इंग्रजांकडे जाणार. तोंवर श्रीमंत मुंबईस आहेत. हें इतकें वर्तमान इंदुरच्या साहुकाराचा गुमास्ता नानकजीनामें बुराणपुरास गेला, तेथून औरंगाबादेस जाणार, त्यानें हें वर्तमान सांगितलें. सत्य मिथ्या देव जाणे. इकडील फौजांचें वर्तमान पाटीलबावाकडील देवजी गौळी आपले लोकांनशीं जमून बुरानपुराचे रोखें जाऊन, तापीचे पाण्यानें सुलतानपूर नंदुरबारेवरून सोनगडचे रोखें जावें असा निश्चय केला. मातुश्री अहिल्याबाईवर खर्चाची वरात पाटीलबावांनीं पंचवीस हजारांची पाठविली. तो ऐवज बाईनीं उज्जनीस हुंड्या दिल्या आहेत. ऐवज आला म्हणजे फौजेस वांटून जावें, तों थैसोबा बक्षी शिंद्याकडील हरी बावाजी सांगाते होते, ते धुलकोटावरून उज्जनीस गेलों होतों—तेथें त्याचें कुटुंब आहे म्हणून गेले होते. मागें हरी बावाजींचें असें जालें. ते आतां महेश्वरास आले. त्यांनीं देवजी गौळी यांजकडे जाऊन उभयतांनीं मसलत केली जे, सोनगडाकडेस गेले तर नीट फिरंग्याच्या तोंडावरच जाणें लागतें. झुंज फौजेनें सुद्धां परिणाम लागणार नाहीं. यास्तव इकडून झाबव्याच्या घाटें, भिलाड्यांतून नीट पायगडच्या रोखें जावें; तालुकाही शिंद्याचाच आहे; तेथें जावून पायगडाजवळ छावणी करावी. म्हणजे दादासाहेब आपल्या तालुक्यांत धामधूमही करणार नाहींत. त्याजवर दबावही पडेल. अशी मसलत उभयतांनीं करून, देवजी गौळी फौजसुद्धां बुराणपुरचा रोख सोडून अलीकडे आले. त्यास होळकर आपल्या तालुक्यांत कही कावाड करूं देत नाहींत; यास्तव सरकार तालुक्याचे पांच सात गांव येथें कोठें आहेत तेथें कही कावाड करून आहेत. उज्जनीचा ऐवज आला म्हणजे तयारी करून जावें असें आहे. होळकराकडीलही लोकांची तयारी बाई करितात. राजश्री रंगराव महादेवराव व खंडेराव त्रिंबक यांचेंही काल दर्शन झालें. येथें बाईनीं बोलाविलें. सरकारचीं पत्रेंही त्यांस दाखविलीं. कितीक प्रकारें त्यांनीं सरकारकार्याचीं भाषणें केलीं. पाहतां त्यांचा कांहीं सरकारकामाविशीं अनमाब दिसून आला नाहीं. स्वामिकार्यास सादरच आहेत. परंतु कांहीं तरी एक मुत्सद्दी सर असावा; त्याजदेखत कामकाज कोणांचें कसें होतें, हें त्याच्या निदर्शनास यावें; असें त्यांचें मानस. परंतु शिंदे होळकरांच्या फौजा तयार होऊन चालल्या म्हणजे हेही तयार होऊन चालतील. सांप्रत वोढेकराचे खराबीचा प्रकार व सांप्रत सरंजाम जसा झाला आहे, व गुदस्तां वैवस्तां यांनीं सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईची चाकरी कोणत्या रीतीनें केली, हें परभारा मातुश्री

अहिल्याबाईनींच सविस्तर सांगितलें. खंडेराव त्रिंबक इतकेंच बोलले जे,, "श्रीमंत धनी आहेत, जे आबरू त्यांनीं दिली आहे, ते जतन करायाचें त्यांचेच हातीं आहे. सर्वजण समर्थ आहेत. इतकें मात्र बोलले. येथील प्रकार असा झाला आहे. दोन्हीं तिन्हीं पथकें श्रीमंतांच्या पिच्छयास होतीं. त्यांत चाकऱ्या सर्वत्रांच्याच झाल्या. परंतु दादासाहेब निघून गेले आणि हें पथकें माघारीं आलीं हें सर्वांस कळलें. परंतु आपला आपला उत्कर्ष असा शब्द आला नाहीं. जें होणें तें धन्याचे पुण्येंकडून होईल असें बोलतात; परभारें सेवकांच्या ऐकिण्यांतही बोढेकराची चाकरी सर्वांपेक्षां अधिक झाली; परंतु सर्वांची एकदिलता असावी, ह्मणजे कामें होतात. सांप्रत हे लोक बाहेर निघून तिकडे दादासाहेबांच्या पिच्छयास जायास कांहीं दिवस लागतील असें दिसतें. दुसरी बोलवा आहे कीं, श्रीमंत दादासाहेबांस प्रस्तुत खायास नाहीं. इंग्रजाची दादासाहेबांची चित्तशुद्धता होई, तोंवर माळवे प्रांतीं व गुजराथ प्रांतीं धामधूम करून, चार पैसे मेळवावे असें करतीलसें दिसतें. बोलवाही अशीच आहे. बाजारी वर्तमान कीं, दादासाहेबांनीं हैदरनाईकास लिहून पाठविलें जे, आपण असा उत्कर्ष करून निघून गेलों. तुह्मीं जमीयत पोख्त करून, कृष्णातीरपर्यंत ठाणीं बसवीत तिकडून येणें. तुह्मीं बरोबरीनें त्यांस पायबंद देणें, व भोंसल्याकडेस हीं पत्रें गेलीं जे, मुधोजी भोंसल्याचा मधला पुत्र चिमणाराजा त्यास पांच सात हजार फौजेनशीं पाठवून देणें ह्मणून पत्रें दादासाहेबांचीं गेलीं. हें बाजारी वर्तमान ऐकिलें. आपल्याकडील वर्तमान ऐकिलें जे, उभयतां सरदार कूच करून गंगेपरियंत आले. इकडे दरमजल येणार. बोढेकराविशीं धन्याची कृपादृष्टि असावी. धन्याची मर्जी, ह्या फौजा बाहेर निघाल्यावर यांजबरोबर मीं जावें. परंतु वर्तमानबातमीचीं पत्रें कोणाबरोबर पाठवूं? होळकर तेथून निघाले असले तर त्यांची डांकही उठत येईल. मजजवळ तर माणूस एक नाहीं. इकडेच जासूद अगर काशीद नवे ठेवायाची आज्ञा झाली तर तसें करीन. तोंवर तों स्वामींनीं डांकेची अगर जासूद व काशीद इकडे पाठवावयाची तरतूद केलीच असेल. लवकर व्हावी. जासूद सेवकाजवळ येत, तोंवर महेश्वरीं राहूं कीं फौजेबरोबर जाऊं? यांसही निघायास आणीख आठ चार दिवस लागतील. तोंवर काय ते आज्ञाही येईल. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

## लेखांक २.

पै ॥ चंद्र ७ रमजान , **श्रीगजानन.** ता. ७ सपटेंबर इ. स. १७७९.
समानीन भाद्रपद मास. मि० श्रावण व॥ १२ शके १७०१.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥० चंद्र २५ साबानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमान व श्रीमंत दादासाहेबांकडील वर्तमान कळलें, तें चंद्र १७ मिनहूस आपले कासीदजोडीबरोबर लिहून, सरकारची कासीदजोडीबरोबर रवाना सेवेसी केलीं आहेत; व त्यावर कळलें वर्तमान तें चंद्र २१ मिनहूस डाकेबरोबर रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमानः— राजश्री बापूजी होळकर इंदुरीं दाखल झाले. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून केसोपंत नामें सरदार त्याजबरोबर हजार फौज देऊन इकडे रवाना केले. त्यास मशारनिल्हे फौज घेऊन नवापुरधायव्यास आले. नवापुरा लुटला. तेथें ठाणें ठेऊन पुढें दहिवलीस आले. तीही लुटली. तेथेंही ठाणें ठेवून पुढें भांबर परगण्याची दोंतर दिसेवाली म्हणून गांव आहे, तेथें दोन तीन घरें कोंकणस्थांचीं होतीं. त्यास त्या गांवीं केसोपंत जाऊन, ते गृहस्थ धरून, त्यांचीं घरें लुटून, त्या गृहस्थांस कैद करून, कांहीं दंड मागतात. तेथून केसोपंतांनीं पांचशें स्वार गुलजारखानाकडेस पाठविले. कोंडाईबारीस दोन पलटणें ठेऊन घांट बंद केला. मागाहून आणीक दोन हजार फौज व चार पलटणें घेऊन राजाराम गोविंद ये प्रांतीं येणार. इकडून गुलजारखानही त्यास सामील होणार. या प्रकारचें वर्तमान ऐकिलें. तें काल चंद्र २४ मिनहूस पत्रें लिहून, कासीदजोडी राजश्री विसाजी बापूजी, सरकारची फौज घेऊन आले आहेत, त्यांजकडेही रवाना केलें. परंतु ते कोठें आहेत हें वर्तमान कांहीं कळत नाहीं. त्यांनीं एक वेळ मजकडे पत्र पाठविलें होतें. त्यावर वर्तमान कांहीं कळत नाहीं. कासिदास कोठें भेटतील ते भेटोत. त्या कासीदजोडीबरोबर सरकारचींही पत्रें आहेत. मग कासीद सेवेसी येवोत अगर विसाजीपंत आपले जोडीबरोबर पाठवोत. इकडे गडबड होयास करिती., आपलें कोणीं इकडे नाहीं. गुलजारखानही दादासाहेबांकडेस जाईलसें दिसतें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाकडेस तीन कासीदजोड्या पाठविल्या आहेत, त्यांपैकीं एक सत्रावीस पाठविली, एक काल पाठविली. कासिदास रोजमुरा लवकर पाहिजे तरी इकडे बिदा होय तर बरें आहे. धन्याची मर्जी. हे विज्ञप्ति."

---

# इ. स. १७८०.

[ इ. स. १७८० ह्या सालचीं सुमारें तीस पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांमध्यें पेशवे व इंग्रज ह्यांच्या मधील युद्धसंबंधीं राजकारणें, राघोबादादा पेशव्यांच्या हालचाली, महादजी शिंद्याचीं राजकारणें, व अहल्याबाई व तुकोजी होळकर ह्यांच्या दरबारचीं कारस्थानें ह्या संबंधाच्या बातम्या आहेत. हीं सर्व पत्रें फार महत्त्वाचीं आहेत. ]

**लेखांक ३.** ता. २५ फेब्रुवारी इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. माघ व॥ ६ शके १७०१.

श्रीमंत राजश्री नानासाहेबः—

"नवीन वर्तमानः—राजश्री तुकोजी होळकर यांनीं अहल्याबाईस चंद्र ९ सफरचें पत्र लिहिलें होतें, तें कोंडाईबारी उतरून तें मुक्कामचें होतें. त्यांत मजकूर जेः—सरंजामी लोक व पेंढारी ऐसे रवाना करून इकडे पाठवावें. त्यावरून बाईनीं पेंढारी सात आठ हजार जागां जागां सरंजामी लोक आहेत ते ऐसे तयार केले आहेत. आठ दहा हजारांचा भरणा एक दों दिवसांनीं तिकडे रवाना करणार. राजश्री पाटीलबावाही बारी उतरून पार जाहले. उभयतां सरदार एकत्र होऊन सोनगडाजवळ गेले. दरमजल पुढें जाणार. सोनगडाअलीकडे सहा कोसांवर मुक्कामीं होते, ते मुक्कामाचीं पत्रें पाटीलबावांचीं बाईस आलीं होतीं. बहुत समाधानपूर्वक पत्रें होतीं. लिहिलें होतें जे, आम्ही आतांच वडिलांचें दर्शन घेऊन मग पुढें स्वारीस जावें. परंतु फत्तेसिंग गायकवाड व अमृतराव एकत्र होऊन दरमजल अहमदाबादेकडे गेले; यास्तव श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर तिकडे जायाचे निकडीचीं आलीं; यास्तव इकडे येणें प्राप्त. महिना दों महिन्यांत इकडील मसलतीचा फड अगर जाबसाल काय ठरेल तें पाहून लवकरीच दर्शनास येतों. ह्याप्रमाणें पाटीलबावांचीं पत्रें बाईस आलीं होतीं. बाई बोलत होती जे, फत्तेसिंग गायकवाड श्रीमंत दादासाहेबांकडे सामील जाहला; फिरून उलटेल. यास्तव दादासाहेबांनीं गायकवाडाचे कबिले आणून सुरतेंत ठेविले; ह्मणून वर्तमान ऐकितों, असें बाई बोलत होती. बाजारी वर्तमान आहे कीं, अहमदाबादेचे जमीदार व शिबंदी—जे लोक तमाम आधीं दादासाहेबांकडे मिळाले होते, चार लक्ष रुपये शिबंदी चढली होती—ते इंग्रजांनीं आपल्याकडे आले केले, आणि अहमदाबाद सर केली, असें वर्तमान बाजारी आहे. गुजराथ प्रांताचीं ठाणीं सरकारचीं तमाम अपरातफर झालीं ह्मणून बाजारी वर्तमान आहे. सरकारचे रविसंक्रमणाचे तिळगुळ इकडे आले नाहींत; यास्तव बाईनीं दोन तीन वेळां स्मरण केलें जे, यंदां सरकारचे तिळगुळ आह्मांस कां आले नाहींत ?

तस्मात्‌ 'आमचें विस्मरण पडलें ! मीं उत्तर केलें जे, या फौजेच्या रवानगीमुळें दोन दिवस अधिक लागले आहेत, परंतु स्मरणपूर्वक येतील. त्यास चंद्र १५ रोजीं कासीदजोडीबरोबर सरकारचे व आपले व तात्याकडील तीलशर्करा पत्रेंसहित आली, ती बाईस दिली. बहुत संतोष पावली. फार स्तव केला. हरकूबाईच्या पांचा गांवांची जप्ती उठवावी येविषयीं दोन तीन वेळां बाईनीं सांगितलें. आतांही बोलली जे हरकूबाईकडे अपराध कांहीं नाहीं, आणि कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांनीं खातारपणास बक्षीस दिले आहेत ते सोडावे. असें श्रीमंतांस फार फार लिहा ह्मणून सेवेसीं लिहिलें आहे. वोढेकरांचें वर्तमान ऐकिल्यांत आलें जे, ते अद्याप धारेसच आहेत. परंतु श्रीमंत दादासाहेबांकडीलही कारकून त्यांजकडे येत जात असतात ह्मणून ऐकिलें. वर्तमान असें आहे. दुसरें भोंसले येतां येतां परतून गेले. तें वर्तमान ऐकिलें कीं, पाटीलबावांचीं पत्रें त्यांजकडे राहोरीचे मुक्कामींहून गेलीं. त्यांचींही पत्रें उत्तरें पाटीलबावांस आलीं, आणि ते माघारे गेले, असेंही वर्तमान ऐकिलें. सत्य मिथ्या देव जाणे. दादासाहेबांकडील केसोपंत दातार सरदाराकडे येऊन गेला ह्मणून दरबारीं येथें वर्तमान ऐकिलें. देखलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. गुलजारखानाचा मजकूर हरकूबाईच्या नांवाचा बोभाट मात्र केला, परंतु तुकोजी होळकराचे भाऊ संताजी होळकर शेंदव्यांत आहेत, ते लासुरांत जाऊन गुलजारखानास भेटून आले. त्यास, एक घोडा व चौकडा व शालजोडी ऐसीं संताजी होळकरास बहुमान दिला; व मल्हारगड [?] होळकराकडे आहे, तेथें राहण्याची परवानगी घेतली; व तेथें रस्त पोहोंचवणें व तेथून डोंगरांत काढून देणें हें कृत्य त्याचें होय. तुकोजीबावाचींही त्यास अंतस्थ पत्रें आलीं जे, गुलजारखानास तसदी आपलेकडून न देणें. राखून असूं देणें. त्या पत्रांच्याही शोधांत आहेत. हस्तगत जाहलीं तर सेवेसी येतील असें आहे. बाईकडे अपराध कांहीं नाहीं. हे विज्ञापि."

---

**लेखांक ४.** ता. २८ मार्च इ. स. १७८०.

**पुरवणी.** मि. फाल्गुन वा॥ ८ शके १७०१.

"विज्ञापना मातुश्री अहल्याबाई यांजकडील कारकून लाखेरी वगैरे दिलीचे आसपास यांचे खासगी एक दोन महाल आहेत, त्या चौकशीस कारकून गेला होता; तो ग्वालेरीकडून त्या मार्गें येथें छ २१ रविलावलीं आला. तिकडील वर्तमान बाईजवळ सांगत होता. मीही जवळीच होतों. त्यास ग्वालेरप्रांतीं सरकाराच्या फौजा सरंजामी आहेत, त्यांचें वर्तमान राजश्री खंडेराव हरी व आंबोजी इंगळे शिंदेकडील पथकें दोघांमिळून जमीयत, खंडेराव हरीजवळ

तद्देशी रांगडी फौज दोनतीनशें व पेंढारी बाजारबुणगे सारे मिळून हजारांचा भरणा. आंबोजी इंगळ्याजवळ दोन अडीचशें लोक देशचे, शिवाय पेंढारी बाजार बुणगे हजारबाराशें, व पवार चार पांचशें, देशची फौज व शेंदोनशें तद्देशी याप्रमाणें ते; व बळवंतराव धोंडदेव याजवळ चार पांचशें फौज देशची चांगली, शेंदोनशें तद्देशी याप्रमाणें; व राजश्री शिवाजी विठ्ठल यांचे पुत्राजवळ सरंजाम हजार बाराशें फौज देशची चांगली व शेंदोनशें तद्देशी; याप्रमाणें सरंजामी सरदारांजवळ जमीयत आहे. जोंपर्यंत गोहजवाल्या राण्यानें निकड केली नव्हती तोंवर या फौजांनीं जागांजागां गोहजवाल्याचे प्रांतांत धामधूम केली. प्रस्तुत राणाजीजवळ चार हजार फौज व चार पलटणें व तीस तोफा व पांच सहा हजार पायदळ या सरंजामानशीं बाहेर निघून ग्वालेरीच्या रोखें दरमजल चालले. ते समयीं सरकारचे सरंजामी सरदारांनीं कांहीं त्याजवर घाळमेल करावी अशी मसलत सारे मिळून रात्रीं करावी. प्रातःकाळीं खंडेराव हरी व आंबोजी इंगळे यांनीं मोडून पुढें निघायाची मसलत करावी. खंडेराव हरींनीं शें दोनशें नांगे गोसावी ठेविले होते. ते राजश्री पाटीलबावांचें पत्र आलें जे, अधिक शिबंदी वाढवूं नका. त्यावरून खंडेराव हरींनीं गोसावी दूर केले. प्रस्तुत खंडेराव हरी व आंबोजी इंगळे या उभयतांत चित्त शुद्ध नाहीं. शिवाजी विठ्ठल यांचे पुत्र व पवार व बळवंतराव धोंडदेव यांनीं हरएक मसलत शत्रुपराभवाची फिरून करावी; त्यांत विपर्यास उभयतांनीं घालून पुढें निघायाची सल्ला ठरवावी. पांच कोसांचें कूच ठरविलें तर यांनीं दहा कोसांचें करवावें. सारांश, ग्वालेरचा किल्ला आपले हस्तगत लवकर करून पाटीलबावांस लिहून पाठवावें, 'हाही अन्वय त्यांच्या चित्तांत. असें वर्तमान त्या ब्राह्मणानें सांगितलें. सांप्रत गोहजवाल्यानें फार जोर धरला आहे. गोहज प्रांतींचीं यांनीं जें जें स्थळें घेतलीं होतीं, तितकीं प्रस्तुत त्याच्या जोरेंकरून सुटत चाललीं आहेत. गोहजवाल्यानें कलकत्त्याहून एक कंपू बोलाविला होता, तोही करेरीजवळ येऊन पोंहचला. त्यांतीलच हे चारी पलटणें राणाजवळ पुढें येऊन पोहोंचलीं. राहिले तेही मागून येतात. याप्रमाणें त्या कारकुनानें वर्तमान सांगितलें. आठ दहा दिवस त्या लष्करांत होता. वाटेची सुबत्ता पाहून निघून आला. राजश्री शिवाजी विठ्ठल ये प्रांतीं देवदर्शनानिमित्य आले होते. येथें आले. दाखल झाल्याचें वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें आहे. सांप्रत त्यांच्या कुटुंबास येथें येतांच ज्वर उत्पन्न झाला, यास्तव औषधी उपाय बाईनीं करविला. ज्वरांत मधुरा निघाला. औषधी उपाय करितात. प्रस्तुत कांहीं उतार आहे. सात आठ रोजांनीं मशारनिल्हे माघारा जातील."

**लेखांक ५.** ता. ७ एप्रिल इ. स. १७८०.
मि. चैत्र शु॥ ३ शके १७०२.

"छ २७ रविलावलचें वर्तमानः–राजश्री शिवाजी विठ्ठल तृतीय प्रहरीं अहिल्याबाईच्या दर्शनास गेले होते. पुराणसमयीं चाळीस पन्नास लोकही बसले होते. मीही होतों. शिंद्याकडील शिवाजी नारायण दरबारास आले. पुराण झालीयावर विप्रभिक्षुक मंडळी उठून गेले. दहावीस गृहस्थमंडळी मात्र बसले होते. ते समयीं शिवाजी नारायण शिंद्यांकडील यांणीं वर्तमान सांगितलें जे, काल छ २६ रोजीं, श्रीमंत राजश्री नानांनीं दोनक्कासीदजोड्या पुण्याहून पत्रें देऊन राजश्री पाटीलबावांकडे रवाना केले, ते काल कासीदजोड्या येथें आले. सरकारचे पत्राचे अन्वयें वर्तमान सांगत होते जे, श्रीमंतांनीं फार प्रकारें पाटीलबावांस लिहिलें आहे जे, इंग्रजाची मसलत भिजली आहे; दारमदाराचीं बोलणीं लागलीं आहेत; ह्मणून ऐकतों. त्यास कलकत्त्याहून कंपू इंग्रजांनीं आणविला आहे. तो येतो तोंपर्यंत मात्र तुह्मांसीं बोलणें बोलतील. ते सामील झालीयावर तीव्रता करतील. तर त्यांसीं बोलणें युक्त नाहीं. जोंवर तो कंपू येऊन पोंहचला नाहीं, तोंवर जलदी करून इंग्रजांचें पारपत्य होय तर बरें आहे. सरंजाम जो पाहिजे तो, व खर्चास जें पाहिजे तें, येथून वरचेवर रवाना करितों. परंतु इंग्रजांचें पारपत्यच होय असें करावें, अशीं बहुत ममतापुरस्कर पत्रें लिहिलीं होतीं. तीं पत्रें आज प्रातःकाळींच पाटीलबावांकडे रवाना केलीं. श्रीमंत पाटीलबावांसीं निर्मत्सर आहेत, आणि तेही तसेच आहेत, असें बहुत प्रकारें वर्तमान सांगितलें. बाईनीं ऐकून स्वस्थमानस झाली. राजश्री शिवाजी विठ्ठल समजले. बाई प्रदोषकालीं स्नानास गेली. तदोत्तर शिवाजीपंत शिंद्यांकडील कारकुनाशीं दोन तीन घटका बोलले. गोविंद कृष्ण अजमेरवाले व आणीकही दहा पांच गृहस्थ होते. मीही होतों. त्यास शिवाजीपंतांनीं भाषणें केलीं जे, "श्रीमंत थोर समर्थ. ते लिहिल्याप्रमाणें साहित्य पोंहचावतील, परंतु लोक ते नाहींत व लोकांस देहनगी मनोधारणें तशीं नाहींत. कैलासवासी श्रीमंत आपासाहेब वसईस लागले, ते समयीं श्रीमंत त्या लोकांसीं काय बोलले? 'जे किल्ला सर करतां, ज्याचें घोडें पडेल तें देऊं, व शिपाई पडला त्याची बाळपवेंसी चालवूं. वांचून येईल त्यास सर्फराज करूं'; असें त्यांनीं लोकांचीं मनोधारणें केलीं. तेव्हां लोकांनीं झडा घातल्या, किल्ला सर केला. बोलल्याप्रमाणें तसेंच लोकांचें चालविलें. त्याप्रमाणेंच कैलासवासी श्रीमंत नानासाहेब भाऊसाहेबांनीं चालवलें; ह्मणूनच त्यांणीं पृथ्वी सर केली व महामहा मुलुख पराभवातें पाविले. व खासा स्वारी बाहेर निघतां कधीं

राहिले होते कीं काय ? तशा सरदारांपुढेंच लोकही कामेंकाजें करीत होते, आणि ते सरदारही लोकांस सर्फराज करीत होते. कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांनींही लोकांची चहा बरीच केली, त्यामुळें सरकारही ताजें राहिलें. लोकही आबाद होते. सांप्रत सात आठ रुपयांचे महिनदार लोक; त्यांस रोजमुरा धड पावेना. त्या लोकांच्या व ते फौजेच्या भरंवशावर उभयतां सरदार इंग्रज सर करणार!! त्यांतही पडलें घोडें कोणाचें देऊं नये ! अधिक खर्च करूं नये ! अशा मसलतीवर लोक काय ह्मणून झडा घालतील ? कसा इंग्रज सर होईल ? गोष्ट दुरापास्त आहे. परंतु ये मसलतीस सहाय एक श्रीमंत राजश्री रावसाहेबांचा पुण्यप्रताप. अवतारी पुरुष. त्यांच्या कृपाविक्षणें मात्र सिद्धीस पावेल. वरकड व्याघ्रादिक श्वापदें बळ व युक्ती-प्रयुक्तीनें मारतील. परंतु आस्वलाचें मारणें फार कठीण आहे ! सुरत धरून मारलें तरच मरेल. नाहीं तर आस्वलाचे चपेटींत कोणी सांपडला तर गुदगुल्या करूनच आस्वल त्यास मारील. तद्वत् हे इंग्रजांची लढाई आहे. पाहातां यांचें मारणें कठीण ! हरिपंततात्यांनीं एक दोन पलटणें बसवूनच दिल्हीं. फौज कसे कसे लोक त्यासमागमें होते आणि ते मसलतीचें स्वतां धनीपण त्यांचे अंगीं होतें ह्मणून थोडींबहुत कामेंकाजें झालीं. प्रस्तुतचे मसलतीसही उभयतां सरदार मातबर, हमेश कामें केलेले, हे इंग्रजांची मसलत त्यास काय अगाध आहे ?" याप्रमाणें भाषणें झालीं. संवत्सरप्रतिपदा झालीयावर शिवाजीपंत बाईचा निरोप घेऊन लवकरीच माघारे जाणार. त्यांच्या कुटुंबासही अमळसें स्वस्थ वाटत आहे. त्यांचे पुत्र गणपतराव त्यांनींही यांस पत्रें पाठविलीं आहेत. पत्रें तों मीं पाहिलीं नाहींत परंतु गोहदवाला जाट दरमजल चालून आला अशी कांहीं फार गडबड तिकडे आहे. यास्तव हे लवकरीच तिकडे जाणार. इंग्रजांचा उत्कर्ष पलीकडे हिंदुस्थानांतही फार झाला आहे ह्मणून साहुकारी खबर आहे. सुजायदौलाचा दों करोडीचा मुलूख व रोहिल्यांचा दो करोडीचा मुलूख एकून चौ करोडीचा मुलूख त्यांनीं हस्तगत केला. अंतरवेद आदिकरून इंग्रजांची प्रबळता हिंदुस्थानांत फार झाली आहे. हिंदुस्थानचे राजेरजवाडे सरकारचे फोजेची मार्गप्रतीक्षा फार करितात. असें तिकडून कितीक येतात ते बोलतात. आज्ञेप्रमाणें खेंचीवाल्यास पत्र येथून लिहिलें आहे. 'त्याजकडून कोणी मातबर मनुष्य येईल तो सरकारांत पाठवून देईन. गुलजारखानाचा मजकूरः—भिल्लांनीं आपल्या जीवभयास्तव त्यास हटीवरून काढून दिलें. त्याच्याही प्रयत्नास मनुष्यें लावलीं आहेत. हरकूबाईनींही जागांजागां चोरबातम्या त्यास हस्तगत करायास बसविल्या आहेत. आज छ २८ रविलावलीं खेतसी साहुकाराचे येथें अंतरवेदींतून लिहिलें

आलें जे, कलकत्त्याहून इंग्रजांनीं चार कंपू आणिक तयार करून इकडे रवाना केले. दरमजल तेथून चालले. त्यास इंग्रजांची तेथून आज्ञा आहे जे, तुह्मीं यासी न मिळतां परभारें दक्षणेस जाणें ह्मणून साहुकारी वर्तमान. लखनौच्या जवळजवळ ते कंपू आले आहेत ह्मणून वर्तमान आहे. शिवाजी विठ्ठल छ ३० रोजीं गुरुवारीं मागील सहा घटका रात्रीं कूच करून कोसावर रामकुंडावर मुक्काम केला. अहिल्याबाईही दोंप्रहरां तेथेंच गेली. तेथेंच भोजनेंही झालीं. शिवाजी विठ्ठल यांस बाईनीं वस्त्रें देऊन बिदा केलें. चार घटका दिवस राहतां बाई फिरून महेश्वरास आली. त्यांनीं तेथेंच मुक्काम करून छ १ रविलाखरीं दरकूच अष्टयास गेले. चवदा दिवस येथें होते. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. चिंतो विठ्ठल व सदाशिव रामचंद्र यांच्या हातें कांहीं दादासाहेबांकडे बोलणें लागलें आहे ह्मणून वर्तमान आहे. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ६.

ता. ८ एप्रिल इ. स. १७८०.

पै॥ छ १६ रविलाखर. **श्रीगजानन.** मि. चैत्र शु॥ ४ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २ रविलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व श्रीमंत राजेश्री दादासाहेबांकडील वर्तमानें पेशजीं विनंतीपत्रीं लिहून सेवेसी काशीदजोडीबरोबर पाठविलीं आहेत. प्रस्तुतचें वृत्त:— श्रीमंत दादासाहेब सुरतेसच आहेत. सरकारचे उभयतां सरदार फौजांसुद्धां पायगडाजवळ चौकोसांच्या अंत्यानें आहेत व इंग्रज यांजपासून चौ पांचा कोसांच्या अंत्यानें आहेत. राजश्री विसाजी आपाजी व पाराजीपंत व भगीरथराव शिंदे हे इंग्रजाभंवताले नित्य एका दिवसाआड फिरतात. गोळागोळी यांची त्यांची होतच आहे. परंतु तेही गोल फोडून यांजवर येत नाहींत. हेही तुटून त्यांजवर पडत नाहींत. राजश्री फत्तेसिंग गाईकवाड पांच हजार फौजेनशीं इंग्रजांचे अघाडीस आहेत. त्याजमागें इंग्रज, मध्यें अमृतराव, त्यामागें इंग्रज, याप्रमाणें गट करून आहेत. इंग्रजांच्या लष्करांत पांच पायल्यांची धारण आहे. उभयतां सरदारांच्या फौजेंत माळवेप्रांतांतून रसद चालू झाली. आठा शेरांची धारण झाली आहे. पहिले फार महर्गता होती. उज्जनीहूनही दाणा वगैरे सरंजाम पाटीलबावांकडे चालला आहे. कांहीं नक्त ऐवजही गेला ह्मणून साहुकाऱ्यांत बोली आहे.. राजश्री तुकोजी होळकर यांचीं पत्रें अहल्याबाईस आलीं होतीं जे, खर्चाची निकड

फौजेंत फार आहे; तर कांहीं खर्चास पाठवून द्यावें....( फाटलें आहे ) जे सारा मुलकी ऐवज त्यांणीं ओढून नेला........( फाटलें आहे ) जागां त्यांणीं आपल्या बंदोबस्त्या करून गेले आहेत. आतां माझे हातीं काय आहे? कोठून खर्चास पाठवावें, असें बाई बोलतात. होळकराकडील बापोजी होळकरांबरोबर फौज जे होती, त्यांस कांहीं तुकोजी होळकरांनीं खर्चास दिल्हें नाहीं. लोक फार श्रमी झाले. यास्तव आपले लोकांसुद्धां बापोजी होळकर तयार होऊन इंग्रजांवर चालला. हें वर्तमान तुकोजीबावांस कळलें. मग हे *आपण खांसा धांवून जाऊन, बापोजी होळकरास फौजसुद्धां समजावून आणिलें. कांहीं खाया-खर्चास देऊन आपल्याजवळ ठेवलें. राजश्री गोविंदराव गाइकवाड लोनवाड्या-हून निघून उभयतां सरदारांस येऊन भेटले. हेही उभयतां कोसभर सामोरे जाऊन यांस घेऊन आले. गोविंदरायाबरोबर जमीयत शेंभर स्वार व दोनशें कामटेवाले व शेंदोंनशें पायदळ इतक्या सरंजामानशीं उभयतांस येऊन भेटले. राजश्री शिवाजी विठ्ठल येथें आले आहेत. त्यांच्या कुटुंबास सावकाश नाहीं. मधुरा निघाला आहे. औषधउपाय करितात. आठ चार दिवस लागतील. म्हणून यासमागमें चारशें लोक चांगले होते त्यांपैकीं शंभर स्वार येथें ठेवून बाकी तीनशें लोक माघारी यांणीं आपल्या चिरंजीवाकडेस रवाना केले, देशचे लोक घोडे माणूस फार चांगले होते. तिकडे गोहजवाल्याची दाटी ऐकून टाकोटाक फौज रवाना केली. आठां चौ दिवसांनीं हेही येथून लवकरीच माघारा जाणार. यांच्याही पुत्रांचीं यांस पत्रें आलीं होतीं जे, गोहजवाल्याजवळ जमीयत भारी झाली आहे; तो निघून दरमजल इकडे येतो. आह्मीं कांहीं उलटून त्यासीं झटपट करावी, तर मंडळी एकदील नाहींत. दरमजल पुढें निघून जावें हाच यांचा ओढा. आपणच आपले फौजेनसीं. ( अपूर्ण. )".

---

**लेखांक ७.** ता. २० मे इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. वैशाख व॥ २ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणांवर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १५ जमादिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील व उभयतां सरदारांकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें आहे. सांप्रत जें वर्तमानः— श्रीमंत दादासाहेब सुरतेस आहेत, व अमृतराव व इंग्रज व फत्तेसिंग गाईकवाड हे जमावसुद्धां पायागडाजवळून पश्चिमेस चार कोस

आहेत. व उभयतां सरदार पायागडाजवळून दोन तीन कोसांवर पूर्वेस आहेत. पूर्वी एक दोन वेळां लढाई झाली ती झाली. प्रस्तुत उभयतांचीं सैन्यें आपलाले जागांच आहेत. उभयतां सरदारांच्या सैन्यांत चारा व पाणी यांची तसदी फार आहे. यास्तव अलीकडे पलीकडे सोय पाहून आहेत. पाटीलबावांनीं उज्जनीहून कांहीं तोफा सरंजाम सुद्धां घेऊन गेले आहेत. बाणांकरितां ब-हाणपुरास जासूद पाठविलें आहेत. येथून अहल्याबाईनींही कांहीं बाण व दारुगोळी व शुतरनाला तुकोजीबावाकडे पाठविले आहेत. चंद्र २३ रविलाखरीं लष्करांतून येथें पत्रे आलीं. त्यांत मजकूर कीं, महादाजीपंत गोकटे व त्रिंबक भालेराव व चिंतो विठ्ठल ऐसे कांहीं फितुरांत होते. फितुराचीं पत्रे पाटील-बावांनीं धरलीं. त्यावरून महादाजी गोकटे व भालेराव उभयतांस उज्जनीस पाठविलें. तेथून नवलाईच्या किल्ल्यावर पाठविलें व चिंतो विठ्ठल तेथें लष्करांत [ फाटलें आहे. ] आहेत. उज्जनीस चिंतोपंताच्या घरावर जप्ती पाठविली आहे, व सदाशिव रामचंद्र आपल्या मुलाचें लग्न करावयास उज्जनीस आले आहेत. इंग्र-जांच्या लष्कराभवतें यांजकडील पेंढारी व उभयतांची फौज कोसीं दों कोसीं फिर-तात. एक दोन वेळां त्यांची रसद यांनीं मारून आणिली. त्यांच्या लष्करांत पांच सहा शेरांची धारण आहे. येथें कोणी जती व ज्योतिषी यांनीं प्रश्न सांगितले आहेत कीं, ज्येष्ठमासपर्यंत इंग्रजांचा जय आहे. तदोत्तर सरकारचे फौजेचा जय आहे. असें कोणीं कोणीं जोशांनीं सांगितलें आहे. श्रीमंत दादासाहेब सुरतेहून इंग्रजांच्या लष्करांत येणार होते परंतु सुरतवाले येऊं देईनात, अशी वदंता ऐकिली. गुलजारखानाचा मजकूरः—पहिलें त्यानें लमाण चार हजार मारून गेला आहेच. पांचजण लमाणांचे सरदार कैदेंत घातले आहेत. त्याजकडे पंचवीस हजार रुपये मागत आहे. पांच हजार रुपये देवितों ह्मणून संताजी होळकरांनीं सेंदव्याहून जाबसाल लाविला होताः—परंतु गुलजारखान ऐकत नाहीं. प्रस्तुत गुलजारखाना-जवळ दोनशें स्वार व पांचशें पायदळ जमा करून, भिल्लांची हटी सोडून, बिज-यागडच्या डोंगरांत आला आहे. पुढें कोणीकडे स्वारी करणार ? येथून बाईनींहीं जागां जागां आपले मामलेदारांस लिहिलें आहे कीं, गुलजारखानाची बातमी राखून आह्मांस लिहून पाठवा. पागा दोन चार यांनीं बोलाविल्या आहेत. पुढें पहावें कसें होईल. इंग्रजांची मसलत ऐकिल्यांत आली कीं, सांप्रत जेथें आहेत तेथून फिरून बडोद्याकडेस जाणार. अमदाबाद व सुरत या दोही स्थळांचीही वदंता आहे कीं, फिरून जावें. उष्णकाळ भारी, यास्तव दोन महिने ज्येष्ठ आ-षाढ हरकोठें तिही-स्थळांकडून एके जागां असावें. तदोत्तर श्रावणमासीं स्वारीस

# ऐतिहासिक स्फुट लेख.



## १. शिवाजीची मालवण येथील प्रतिमा.

थोर लोक मरोनी जाती ।
त्यांच्या सुरता करोनी पहाती ॥ —रामदास.

१. मालवणच्या बंदरावर सिंधुदुर्गनामें बंदरी किल्ला पद्मदुर्गाच्या जवळ व राजकोटाच्या समोर आहे. त्यांत शिवाजीचें मंदिर आहे. हें मंदिर मूळ राजाराम महाराजांनीं बांधलें व त्याला सभामंडप अलीकडे कोल्हापुरकरांनीं जोडला. ह्या मंदिरांत दोघां इतिहासप्रसिद्ध पुरुषांच्या मूर्ती आहेत:—१ शिवाजीची आणि २ मौनीस्वामी पाटगांवकर यांची. पैकीं शिवाजीची मूर्ति गाभाऱ्यांत आहे आणि मौनीस्वामींची मूर्ति गाभाऱ्याच्या बाहेर दाराच्या उजवीस आहे. दोन्ही मूर्ति काळ्या शिळेच्या कोरल्या आहेत. मौनीस्वामी पद्मासन घालून बसलेले व शिवाजी वीरासन घालून बसलेले कोरले आहेत. ही शिवाजीची हुबेहूब प्रतिमा होय. हिच्या पायांत तोडे व तुमान आहे. तुमानीचा अगदीं शेवटचा भाग थोडासा फिरवून टाकला आहे. कमरेस कटिभूषण आहे, तें कमरपट्ट्यासारखें दिसतें. प्रसंगीं शस्त्रास्त्रें अडकविण्याचा तो पट्टा असावा. हातांत कडींतोडे आहेत. दंडावर भुजबंद असून, कटीच्यावरील अंग उघडें आहे. डोकीला नावाड्यासारखी कोंकणी कोळ्याची टोपी आहे. सामान्य कोळ्यांची जी टोपी असते, तिच्याहून ह्या असामान्य नावाड्याच्या बंदरी टोपीचा ऊर्फ बंदरी मुगुटाचा आकार किंचित् निराळा आहे. एकंदरींत पहातां शिवाजीची ही बंदरी प्रतिमा आहे. आरमाराची देखरेख करण्याकरतां, पश्चिम समुद्रावरील सिंधुदुर्गनामक राजधानीस जेव्हां शिवाजी येई, तेव्हां तो हा आरमारी पोषाख करीत असे. स्वराज्यांतील निरनिराळे प्रांत हिंडतांना व निरनिराळे अधिकार बजावतांना, मुलकी, लष्करी, देशी, बंदरी, वगैरे नानाप्रकारचे पोषाख राजाधिराजांना ठेवावे लागतात, हें प्रसिद्ध आहे.

२. ह्या मूर्तीचा चेहरा सन्मुख दाखविलेला आहे. डाव्या किंवा उजव्या अशा एकाच बाजूचा दाखविलेला नाहीं. मूर्तीचा चेहरा प्रमाणबद्ध आहे; परंतु खालील हस्तपादादि अवयव जितके प्रमाणांत असावेत तितके नाहींत. त्याचें कारण

महाराष्ट्रांत सशास्त्र धंदा करणारे मूर्तिकार नव्हते असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. असें असून ही मूर्ति त्यांतल्यात्यांत पुष्कळ प्रकारांनीं बरी खुलली आहे. मूर्ति मध्यम वयाच्या माणसाची असून ठेंगणी व धष्टपुष्ट आहे. शिवाजी अति उंच नव्हता हें प्रसिद्धच आहे. शरिरानें काटक, तालमीनें कसलेला आणि मेहनतीनें पोसलेला असा शिवाजी असे. आणि तसाच तो येथें कोरलेला आहे. बंदरी कोळी व नावाडी लोक, उंचापेक्षां ठेंगणे व रुंद विशेष असतात. तेव्हां अपरिमित ढंगांत पारंगत असलेल्या शिवाजीनें, कोळ्यांच्या ठेंगूपणाची व रुंदपणाची ढब, तेथल्या तेथें चित्रकाराच्या समोर उचलली नसेल कशावरून? मूर्तीच्या पायाकडे पाहिलें असतां, बंदरी कोळ्यांच्या पायाप्रमाणें शिवाजीच्या पायांला बांक आलेला दिसत आहे; आणि शिडें व अवजार यांशीं खेळणाऱ्या नावाड्यांच्या छातीप्रमाणें व मनगटाप्रमाणें मूर्तीची छाती भरलेली व मनगट रुंदावलेलें दिसत आहे. सारांश, कोळ्यांचा व नावाड्यांचा राजा या नात्यानें मालवण येथील शिवाजीच्या मूर्तीकडे पहावयाचें आहे.

३. राजाराम महाराजांनीं, जुनें देऊळ, शिवाजीची दगडी मूर्ति व पाटगांवकर मौनीस्वामींची दगडी मूर्ति ह्या तयार करविल्या, अशी लोककथेची परंपरा आहे. अर्थात् राजाराम महाराजांनीं, ही मूर्ति शिवाजीच्या रूपाप्रमाणें बव्हंशानें तरी असल्याशिवाय, पसंत केली नसेल हें सांगावयाला नकोच.

४. शिवाजीच्या सांप्रत दोन प्रकारच्या तसबिरी प्रसिद्ध आहेत. एकः— मुसलमानी वेषांत काढलेली व ऑर्मनामक इतिहासकारानें आपल्या "Fragments of the Mogul Empire" नामक पुस्तकांत प्रसिद्ध केलेली. चित्रशाळेंत कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या परिश्रमानें जी पहिली ऐतिहासिक तसबीर छापली गेली, तिचें ऑर्मच्या तसबिरीशीं अगदीं हुबेहूब सादृश्य जुळतें. अर्थात् ऑर्मच्या तसबिरीची ती नक्कल आहे. ऑर्मनें मुळांत दिलेली तसबीर त्याच्या अगदीं जुन्या ग्रंथावरून ह्यासोबत दिली आहे. (पृ० ३ पहा.) ऑर्मनें शिवाजीचें हें पहिलें चित्र प्रसिद्ध केलें, तें बराच शोध करून केलें एवढें म्हणतां येईल. पेशव्यांच्या दरबारांत आलेला पहिला रेसिडेंट सर चार्लस मालेट हा ऑर्म ह्याचा दोस्त होता. त्यास ऑर्मनें शिवाजीचें चित्र मिळविण्याबद्दल लिहिलें होतें. परंतु त्यास तें मिळाल्याचें दिसत नाहीं.* अर्थात् ऑर्मनें तें दुसऱ्या

* सर चार्लस मालेट लिहितोः—"My endeavours have been hitherto unsuccessful to procure any picture of Shiwajee."

ठिकाणाहून मिळविलें आहे. परंतु त्याचा उल्लेख त्यानें केला नाहीं., दुसरें चित्र ह्मणजे शिवाजीची घोड्यावरील तसबीर. ही "De Gancigny and X. Raymond's Inde" नामक फ्रेंच ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या चित्राची प्रतिकृति आहे. ती खुद्द शिवाजीची तसबीर आहे, असें एका फ्रेंच मनुष्याला वाटलें, व ती त्यानें दिल्लीच्या किंवा सुरतेच्या बाजारांत इ. स. १७२० च्या सुमारास पैदा केली. तो घोड्यावरचा शिवाजी, लष्करी घोडेस्वार शिवाजी होय. औरंग-



**श्री. छत्रपति शिवाजी महाराज.**

(ऑर्म इतिहासकाराने इ. स. १७८२ साली प्रसिद्ध केलेले चित्र.)

जेबाला भेटूं इच्छिणारा पंचहजारी सरदार शिवाजी दरबारांत कसा दिसला असेल, त्याची कल्पना, तत्कालीन मुसलमानी व मोंगली रीतरिवाज व पोषाख यांची माहिती ज्यांना आहे, त्यांना यथास्थित होईल. राज्याभिषेकाच्या वेळच्या शिवाजीचें रूपहि बरेंच निराळें भासेल. लहानपण, तरुणपण, प्रौढपण व ह्मातारपण ह्या चारी अवस्थांत मनुष्याच्या शरिरांत व चेहऱ्यांत बराच फरक होतो.

क्षीणता व पीनता ह्या दोन अवस्था, दुखणींबाणीं व कष्टमेहनत यांच्यावर अवलंबून असतात. करतां त्या त्या अवस्थेंतील रूप भिन्न दिसेल हें उघड आहे.

५. मालवण येथील शिवाजीची प्रतिमा येथील प्रसिद्ध गृहस्थ रा० दिनकर गोविंद बझे यांनीं आपले मित्र रा० नारायण शिवराम सावंत व रा० बळवंतराव रामचंद्र परुळेकर यांच्याकडून तयार करविली, ती त्यांचे जवळ बरेच दिवस पडून राहिलेली होती. प्रतिमा मोठ्या परिश्रमानें जशीची तशी उतरलेली आहे. ती ह्या अंकांत प्रारभीं दिली आहे. तथापि, रा० ह्यात्रे वगैरे मूर्तिकारांनीं स्वतः जाऊन मूर्तीचा अधिक तपास घेतल्यास इतिहासजिज्ञासूंवर विशेष उपकार होतील.

६. मौनीस्वामींच्या एकंदर तीन मूर्ती आहेत. एक, शिवाजीच्या देवळांत गाभाऱ्याच्या उंबरठ्याच्या बाहेर उजव्या बाजूस असलेली. हिचा उल्लेख वर झालाच आहे. दुसरी मूर्ति, मालवण शहरांत मौनीस्वामींचें देऊळ आहे, त्यांत आहे. आणि तिसरी मूर्ति, पाटगांवच्या मठांत आहे. पाटगांव कोल्हापुरापासून दक्षिणेस ४० मैल व वेंगुर्ल्यापासून पश्चिमेस घांटमाथ्यावर २५ मैल आहे.

७. मौनीस्वामींची मूर्ति शिवाजीच्या देवळाच्या गाभाऱ्याच्या बाहेर जयविजयांच्या स्थलीं सुटी बसविलेली आहे. त्याचें कारण असें कीं, कोंकणांत शिवाजीचा अंमल बसविण्यास मौनीस्वामी पाटगांवकर व बाबा याकुब रत्नागिरीकर असे दोन पुरुष कारण झाले. या दोघांचेंहि अत्यंत प्रेम शिवाजी राजावर असे. ह्यांच्या सांगण्यावरून कोंकणांतील लोक शिवाजी राजाच्या अमलाला राजी व रुजू झाले. मौनीस्वामींचें वजन गोव्यापासून राजापूरपर्यंत असे व बाबा याकुब यांचें वजन राजापूरपासून दाभोळपर्यंत असे. ह्या दोघांचाहि उल्लेख बखरींतून झालेला आहे व दोघांच्या वंशजांकडे अद्याप इनामें चालू आहेत.

८. सिंधुदुर्गाच्या कोटाच्या पश्चिम बाजूस भिंतीमध्यें दगडावर शिवाजीचा पंजा कोरलेला आहे व तेथूनच पुढें कांहीं यार्डांच्या अंतरावर शिवाजीच्या पादुका कोरलेल्या आहेत. त्यांवर एक अत्यंत चिमुकलें असें देऊळ बांधलेलें आहे. त्याची तेथील लोक अद्यापि भक्तिपुरस्सर पूजाअर्चा करीत असतात.

वि० का० राजवाडे.



## परराष्ट्रांच्या दरबारांतले

# मराठ्यांचे वकील.

### उपोद्घात.



मराठी राजसत्तेच्या अभ्युदयाचा, विस्ताराचा व विलयाचा विचार करावयाचा झटलें ह्मणजे मराठ्यांचीं राजकारणें व तीं घडविणारे मुत्सद्दी ह्यांची संपूर्ण माहिती प्रथमतः नेत्रांसमोर असली पाहिजे. परंतु मराठ्यांच्या इतिहासाचीं खरीं साधनें अद्यापि समग्र रीतीनें उपलब्ध न झाल्यामुळें, ह्या दृष्टीची माहिती अंधारामध्यें लुप्त झालेली आहे. शिवाजीची कारकीर्द किंवा शाहूची कारकीर्द सोडूनैच द्या; परंतु पेशव्यांच्या कारकीर्दीतील परराष्ट्रीय दरबारांतल्या मुत्सद्यांची संपूर्ण यादी देखील अद्यापि प्रसिद्ध झालेली नाहीं. मग त्या मुत्सद्यांचीं अंतस्थ कारस्थानें, परराष्ट्रीय सत्तांच्या स्वार्थसाधक राजकारणांचे डावपेंच व त्यांच्या प्रतिकारार्थ योजलेल्या युक्ती ह्यांचें यथार्थज्ञान होण्याचीं साधनें कोठून उपलब्ध होणार? शिवाजीनें स्थापित केलेल्या महाराष्ट्रराजसत्तेचा प्रसार जसजसा जोरानें होऊं लागला व सर्व हिंदुस्थान तिनें जेव्हां आक्रमून टाकिलें, तेव्हां हिंदुस्थानांत असलेलीं विभिन्न, व विविध एतद्देशीय व परदेशीय, राज्यें व संस्थानें स्वाधीन व काबीज करून घेण्यासाठीं, मराठ्यांचे मुत्सद्दी, उत्तरेकडील हिमाचलाच्या पायथ्याजवळ असणाऱ्या गडवाल संस्थानापासून ते दक्षिणेस रामेश्वराजवळील रामनाथ-सेतुपतीच्या राज्यापर्यंत, सर्वत्र नांदूं लागले होते. दिल्लीच्या दरबारांतील हिंगणे, निजामच्या दरबारांतील काळे, टिपूच्या दरबारांतील नरसिंगराव वगैरे कांहीं प्रमुख वकिलांचीं नांवें इतिहासवाचकांच्या परिचयाचीं आहेत, परंतु त्यांच्या संपूर्ण राजकारणांचें यथार्थज्ञान करून देणारे कागदपत्र अद्यापि प्रसिद्ध झालेले नाहींत. ते पराकाष्ठेचे महत्त्वाचे असून त्यांचें स्वरूप आतां थोडें थोडें उपलब्ध होऊं लागलें आहे. ते सर्व प्रसिद्ध झाले ह्मणजे मराठ्यांच्या राजकारणांचा खरा इतिहास व्यक्त होईल. ज्याप्रमाणें दिल्ली, भागानगर, श्रीरंगपट्टण, लखनौ, मुर्शिदाबाद, नागपूर, जोधपूर, जबपूर, उदेपूर,

अर्काट, त्रिचनापल्ली वगैरे ठिकाणच्या राजकारणांची समग्र माहिती प्रसिद्ध होणें इष्ट आहे, त्याप्रमाणें–किंबहुना त्यापेक्षांही अधिक महत्त्वाची–माहिती हिंदुस्थानांतील चिनापट्टण ( मद्रास ), फुलचरी ( पांडेचरी ), मुंबई, सुरत, कलकत्ता, गोवें इत्यादि ठिकाणीं स्थापित झालेल्या इंग्रज, फरासीस ( फ्रेंच ), फिरंगी ( पोर्तुगीज ), व वलंदेज ( डच ) इत्यादि परराष्ट्रीय सत्तांबरोबर झालेल्या मराठ्यांच्या राजकारणांत अंतर्भूत झालेली आहे. इंग्रज, फ्रेंच किंवा पोर्तुगीज इत्यादि परराष्ट्रीय सत्तांबरोबर झालेलीं मराठ्यांचीं राजकारणें, सत्य स्वरूपानें व विस्तृत रीतीनें समजण्यास, तत्कालीन कागदपत्रांवांचून बिलकूल मार्ग नाहीं. इंग्रजी इतिहासांतून त्यांचें स्वरूप अंशतः व्यक्त होतें, परंतु तें एकपक्षीय असल्यामुळें त्यावरून एका दृष्टीचाच इतिहास व्यक्त होतो. वास्तव, त्या वेळच्या परराष्ट्रांच्या दरबारांत असलेल्या मराठे मुत्सद्यांची माहिती व त्यांचे अस्सल पत्रव्यवहार उपलब्ध झाले पाहिजेत. अशी माहिती प्रायः दुर्लभ आहे. तथापि जुन्या कागदपत्रांच्या संशोधनानें जी मिळेल, ती येथें सादर करण्याचा आमचा मानस आहे.'

सतराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें हिंदुस्थानांत प्रबल होऊन बसलेल्या मुख्य परराष्ट्रीय सत्ता तीन होत्या. पहिली इंग्रज; दुसरी फ्रेंच; व तिसरी पोर्तुगीज. ह्यांपैकीं इंग्रजांच्या शाखा पश्चिम समुद्रकिनाऱ्यास, सुरत, मुंबई, राजापूर, कारवार वगैरे ठिकाणीं होत्या. त्यांपैकीं मुंबई इलाख्यांत मुंबई, बंगाल्यांत कलकत्ता, व मद्रास इलाख्यांत चिनापट्टण म्हणजे मद्रास, ह्या तीन ठिकाणीं इंग्रजांचीं ठाणीं कायम होऊन, तीं त्या त्या इलाख्याचीं केंद्रस्थानें बनलीं होतीं. ह्या सर्व ठिकाणीं मराठ्यांचे वकील होते. आम्हांस उपलब्ध झालेली माहिती सवाई माधवराव व नाना फडणवीस ह्यांच्या कारकीर्दींतील आहे. अर्थात् मराठी राजसत्तेच्या पूर्ण विस्ताराचाच तो काल समजला पाहिजे. ह्या समयास कलकत्त्यास मराठ्यांचा वकील लाला सेवकराम म्हणून होता. त्याचे मार्फत कलकत्तेकर इंग्रजांकडील राजकारणें चालत असत. मुंबई येथें रणसोड कृष्ण व त्यांचे चिरंजीव रघुनाथ रणसोड हे पेशव्यांच्या तर्फे इंग्रजी दरबारांतील वकील होते. मद्रास येथील इंग्रजी दरबारांत व फुलचरी म्हणजे पांडेचरी येथील फ्रेंच दरबारांत जनार्दन शिवराम हे मराठ्यांच्या बाजूचे वकील होते. गोवें येथें पोर्तुगीज दरबारामध्यें नारायण विठ्ठल धुमे ह्या नांवाचे वकील होते. ह्याशिवाय प्रत्येक लहान मोठ्या दरबारामध्यें मराठ्यांचे निरनिराळे वकील होते. ह्या सर्वांची विस्तृत माहिती प्रसिद्ध होणें अत्यंत अवश्य आहे. तथापि, तिच्या अभावीं, तत्संबं-

धानें जी अल्प माहिती किंवा किरकोळ कागदपत्र मिळतील, ते देखील प्रसिद्ध करणें इष्ट आहे. कारण, एक तर त्यांवरून, त्या त्या जुन्या घराण्यांतील लोकांचा संदर्भ लागून, त्यांच्या वंशजांजवळ किंवा नातेवाइकांजवळ कांहीं जुने कागदपत्र सांपडण्याचा संभव आहे. दुसरें, अशी माहिती कितीही क्षुल्लक किंवा त्रोटक असली, तरी ती अनुपलब्ध असल्यामुळें, तत्प्रकाशनानें त्या काळाचें राजकीय अथवा सामाजिक स्वरूप अस्पष्ट व अत्यल्प तरी व्यक्त झाल्यावांचून राहणार नाहीं. तिसरें, खऱ्या इतिहासाच्या रचनेस अशा त्रोटक माहितीचाच विशेष उपयोग आहे. सुवर्णाचे रजःकण एकत्र केल्यावांचून त्यांचा सुंदर अलंकार कसा निर्माण होईल? अर्थात् ह्या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेतल्या ह्मणजे ह्या स्फुट व त्रोटक माहितीचा इतिहासप्रिय वाचक अनादर करणार नाहींत अशी आशा आहे.

---

## प्रकरण १ लें.

## मुंबईच्या इंग्रजांजवळील वकील रघुनाथ रणसोड.

### ( अल्प माहिती व त्रोटक पत्रें. )

मुंबईच्या इंग्रजांशीं मराठ्यांचीं राजकारणें शिवाजी महाराजांच्या वेळेपासून चालत होतीं, व तेव्हांपासून मराठे मुत्सद्दी इंग्रजलोकांशीं दळणवळण ठेवीत असत. हे मुत्सद्दी बहुधा शेणवी व प्रभू ज्ञातीचे असत. इंग्रजांचा प्रवेश समुद्रकिनाऱ्यानें हिंदुस्थानांत झाल्यामुळें, समुद्रकिनाऱ्यावरील प्रांतांमध्यें राहणाऱ्या ह्या दोन्ही ज्ञातींतील बुद्धिमान् लोकांचा त्यांच्याशीं प्रथम संसर्ग घडावा हें साहजिक आहे. शेणवी व प्रभू ह्या दोन्ही ज्ञातींतील लोक बुद्धिमत्तेंत व मुत्सद्दीपणांत ब्राह्मणांप्रमाणेंच सुप्रसिद्ध असून, त्यांचा मराठ्यांच्या राजकारणांशीं शिवाजीच्या कारकीर्दीपासून संबंध आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. किंबहुना, मराठी राजसत्तेच्या अभिवृद्ध्यर्थ त्यांचें साह्य उच्च प्रतीचें आहे असें ह्मटलें तरी चालेल. शिवाजीच्या वेळेस इंग्रजांबरोबर जीं राजकीय बोलणीं चालत असत, तीं ह्याच लोकांच्या मार्फत चालत असत. ह्यावरून त्यांची कुशाग्र बुद्धि त्या वेळींही सुप्रसिद्ध होती असें दिसतें. इ. स. १६७४ सालीं रायगड किल्ल्यावर शिवाजीस राज्याभिषेक झाला, त्या प्रसंगीं शिवाजीशीं स्नेह संपादून तह करण्याकरितां हेन्री आक्सींडन व डा० फ्रायर ह्मणून दोन युरोपि-

यन गेले होते. त्यांच्या वतीनें शिवाजीबरोबर जें बोलणें झालें, तें एका शेणवी मुत्सद्याचे मार्फतच झालें. त्याचें नांव नारायण शेणवी ऊर्फ *नारायण पंडित असें होतें, असें डा० फ्रायर ह्यानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. इंग्रजांबरोबर संभाजीचे कारकीर्दींत जो तह झाला, तो बाळाजी आवजी चिटणीस ह्या प्रभू मुत्सद्याचे मार्फतीनें झाला. तात्पर्य, शेणवी व प्रभू हे प्रथमपासून मराठ्यांच्या इंग्रजांकडील राजकारणांत अंतर्भूत होते, असें ह्मणणें चुकीचें होणार नाहीं. हीच परंपरा पेशवाईअखेरपर्यंत चालली होती; आणि अव्वल इंग्रजीमध्येंही तिचा मागमूस दिसून येत होता. मुंबईस अव्वल इंग्रजीमध्यें, जितके शेणवी व प्रभू आंग्लभाषेंत निष्णात होऊन इंग्रजी दरबारांत नांवारूपास चढले, तितके इतर जातींतील लोक क्वचित् चढले असतील. ह्याचें मुख्य कारण इंग्रजांकडील राजकारणांत त्यांचा फार पुरातनचा संबंध हेंच होय, व सूक्ष्म रीतीनें शोध केला असतां इतिहासांतही तेंच दिसून येतें. असो.

पेशवाईत नाना फडणविसांच्या कारकीर्दींमध्यें मुंबईस जीं इंग्रजांकडील राजकारणें चालत असत, तीं रणसोड कृष्ण व त्यानंतर त्यांचे चिरंजीव रघुनाथ रणसोड नामक शेणवी वकिलांच्या मार्फत चालत असत. ह्या रणसोड कृष्णाची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. परंतु तो जातीचा शेणवी ह्मणजे सारस्वत ब्राह्मण असून त्याचें उपनांव 'संजगिरी' असें होतें. 'संजगिरी' ह्या नांवाचीं घराणीं मुंबईमध्यें अद्यापि प्रसिद्ध आहेत. परंतु रणसोड कृष्णाच्या घराण्याशीं त्यांचा कांहीं संबंध आहे किंवा नाहीं, हें समजत नाहीं. रणसोड कृष्ण ह्याचीं पत्रें पेशव्यांस व नाना फडणविसांस जात असत, व त्याचा मानमरातब इंग्रजी

* नारायण पंडित ऊर्फ नारायण शेणवी ह्यानें डा० फ्रायर व हेन्री आक्झेंडन ह्यांची व शिवाजीची रायगड येथें गांठ घालून दिली. ह्या मनुष्यासंबंधानें डा० फ्रायर ह्यानें "A man of prudence and esteem with his master" ह्मणजे "हा मनुष्य फार धूर्त असून त्याची आपल्या धन्याजवळ चांगली चहा होती." असें वर्णन केलें आहे. एवढेंच नव्हे, तर इंग्रजांचा तह ठरवून देऊन, तो राजाच्या व अष्टप्रधानांच्या सहीशिक्क्यानिशीं नारायण पंडितानेंच इंग्रज वकिलांच्या स्वाधीन केला, आणि शिवाजीच्या दरबारीं इंग्रज लोकांस सर्व काळ उपयोगीं पडण्याबद्दल अभिवचन दिलें, असाही उल्लेख डा० फ्रायर ह्यांनीं केला आहे:—

"Some days after, *Naranji Pandit* sent word the Rajah had signed their articles, all but that about money. Then the rest of the ministers of state signed them, and they went to receive them of *Naranji Pandit,* who delivered them to the Ambassador with expressions of great kindness for our nation, and offered on all occassions to be serviceable to the English at the Court of the Rajah."—*Fryer's Travels in India*, Page 81.

दरबारांतही चांगला होता असें दिसतें. सवाई माधवरावांच्या कारकीर्दीमध्यें मुंबई येथें इंग्रजांचे पुढें लिहिल्याप्रमाणें गव्हरनर झालेः—

१ धि ऑनरेबल उइल्यम हॉर्नबीः—

ता. २६ फेब्रुवारी इ. स. १७७१ पासून ता. १ जानेवारी इ. स. १७८४ पर्यंत.

२ धि ऑनरेबल रासन हार्ट बॉडमः—

ता. १ जानेवारी इ. स. १७८४ पासून ता. ९ जानेवारी इ. स. १७८८ पर्यंत.

३ धि ऑनरेबल अंड्र्यू रामसेः—

ता. ९ जानेवारी इ. स. १७८८ पासून ता. ६ सप्टेंबर इ १७८८ पर्यंत.

४ धि आनरेबल मेजर जनरल सर उइल्यम मेडोजः—

ता. ६ सप्टेंबर इ. स. १७८८ पासून ता. २१ जानेवारी इ. स. १७९० पर्यंत.

५ धि ऑनरेबल मेजर जनरल सर राबर्ट आबरक्रांबेः—

ता. २१ जानेवारी इ. स. १७९० पासून ता. २८ आक्टोबर इ. स. १७९३ पर्यंत.

६ धि ऑनरेबल जॉर्ज डिकः—

ता. १ नोव्हेंबर इ. स. १७९३ पासून ता. ३ सप्टेंबर इ. स. १७९५ पर्यंत.

ह्यांपैकीं हॉर्नबी व बॉडम ह्यांच्या कारकीर्दीमध्यें रणसोड कृष्ण मुंबईकर इंग्रजांशीं मराठ्यांचीं राजकारणें चालवीत असे, हें अस्सल पत्रांवरून सिद्ध होतें. रणसोड कृष्ण इ. स. १७८७ च्या अखेरीस मृत्यु पावला, व त्याचा वकिलीचा हुद्दा त्याचा मुलगा रघुनाथ रणसोड ह्यास मिळाला असें दिसतें. रघुनाथ रणसोड ह्यानें इ. स १७८८ सालीं लिहिलेलीं कांहीं अस्सल पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांवरून त्या वेळची मुंबईची पुष्कळ मनोरंजक माहिती उपलब्ध होते. ह्या पत्रांमध्यें इंग्रजांचीं राजकारणें व त्यांच्या हालचाली ह्यांचा उल्लेख असून तदनुषंगानें इतर कित्येक मौजेच्या गोष्टींचाही उल्लेख आलेला आहे. हीं पत्रें संगतवार मिळालीं नाहींत; तथापि तीं फार वाचनीय व मनोरंजक अशीं असून तीं मराठ्यांच्या मुंबईकर वकिलाची चांगली ओळख करून देतात. तीं मासल्यासाठीं येथें देतोंः—

## लेखांक १.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. ह्या पत्रामध्यें मराठ्यांच्या दरबारामध्यें जो असंख्य पत्रव्यवहार चालत असे, त्यांत इंग्रज लोकांसंबंधानें जे सांकेतिक शब्द लिहीत असत, त्यांचीही यादी आहे. ही येणेंप्रमाणेंः—

श्री.

"यादी नांवें मुंबईच्या पत्रांतीलः—

१ **प्रीति**–शाहू शेणवी
१ **शनि**–टामस गाडर
१ **शुक्र**–डेव्हिड इस्काट
१ **केतु**–हार्नबी जनरल
१ **श्रोणितापुर**–मुंबई
१ **तूळ**–सुरत
१ **सिंह**–पुणें
१ **मृत्युयोग**–स्वार
१ **सप्तमी**–फत्तेसिंग
१ **कुंभ**–विलायत
१ **कन्या**–मद्रास
१ **राहु**–द्रेपर"

ह्या पत्रांतील नांवांवरून ही यादी गव्हरनर हॉर्नबी यांचे कारकीर्दीतील आहे असें दिसून येतें. ह्या यादींतील शाहू शेणवी हें नांव, दुसऱ्या कोणी इंग्रजांकडील मनुष्याचें असावें असें दिसतें. हॉर्नबी हें मुंबईच्या गव्हरनराचें नांव असून, डेव्हिड इस्काट व द्रेपर हीं मुंबईच्या कौन्सिलरांचीं नांवें आहेत. मराठ्यांची राजधानी जें पुणें त्यास 'सिंह' ही संज्ञा देण्यांत मराठ्यांचा स्वाभिमान व्यक्त होतो.

## लेखांक २.

हें पत्र रघुनाथ रणसोडाचें वडील रणसोड कृष्ण ह्यांचें असावें. ह्या पत्रांतील सांकेतिक नांवें लेखांक १ मध्यें दिलेल्या नांवांपेक्षां अधिक आहेत. ह्यावरून लेखांक १ मधील सांकेतिक शब्ददर्शक यादी अपूर्ण आहे असें मानावें लागतें. मराठ्यंच्या पत्रव्यवहारांतील सांकेतिक शब्दांचा एक स्वतंत्र संग्रह करणें किती अवश्य आहे हें ह्या पत्रावरून दिसून येईल.

श्री.

"शेवेसी साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः—आज्ञा घेऊन कोकणांत आलों. मुंबईस माणूस पाठवून बातमी वर्तमानाचा खुलासा आणवून तपशीलवार विदित केला आहे. येणेंप्रमाणें:—

इंग्रेजास एकंदर धन्याची आज्ञा कीं, पेशव्यांचा जो मुलूख घेतला तो झाडून त्यांचा त्यांस माघारें देऊन अविलंबें सलूख करावा व एकरंग दोस्ती चालवावी. दरम्यान हे अधिक उण्याची घालमेल करितात. त्यांत **प्रतिपदेचें** लक्ष कीं आपला अर्थ साधून सरकारची नुकसानी जाहाली तरी चिंता नाहीं. याप्रमाणें चाललें आहे. कलम. १.

वज्रयोग व इंग्रज सामान्य पक्ष आहेत. मेला ह्मणून बातमी उठविली होती. परंतु मिथ्य जाहली. हल्लीं मनवराची तयारी जलदीनें करितात व पुढें रवानगी होणार.
कलम. १.

इंग्रेज फार चाहतो कीं, श्रीमंतांचे लग्नास जाऊन आहेर मान करावा. त्यास मिस्तर सिबल व मिस्तर चर्च व मिस्तर टारलिस यांची नेमणूक केली असे. पत्राची वाट पहातात. स्वामींची आज्ञा कीं यांत न पडावें. याजकरितां कृपाळू होऊन जशी मर्जी असेल ती आज्ञा केली पाहिजे. कलम. १.

मंडपशोभेलायक कांहीं चीज दृष्टीस पडेल ती लिहून पाठवावी ह्मणोन आज्ञा. त्यास गुलाबदाण्या कळेच्या व पानदाणें व अत्तरदाण्या व चित्रें झाडें तऱ्हेतऱ्हेचीं सोन्या-रुप्याचीं व बिलोरी फाणसें टांगावयाचीं व सभेचीं मेणबत्त्या लावावयाचीं ऐशीं मिळतील. कलम. १.

सोमास व इंग्रेजास समुद्रांत मातबर लढाई जाहाली. उभयपक्षीं नाश जाहाला. त्यांतील चार पांच मनवर इंग्रजी मुंबईस आले व एक दोन गोंव्यास गेले. सोमास नजिक कोठें आधार नाहीं ह्मणोन तजावजा जाहाले. पैकीं दोन तरांडीं सावकारी इंग्रजानें पाडाव करून आणिले व मालासुद्धां फरोक्त केलें. अलीकडे व पलीकडे सोमाचें नांव नाहीं. एडमिरल ह्यूसही आला. कलम. १.

मुंबईकर राहु चलित होणार. तरांड्यामध्यें दुसरा येणार. ऐसें वर्तमान आहे. हल्लीं शरिरीं समाधान नाहीं. कलम. १.

आह्मी कुलाब्यास पोहोंचल्यानंतर दुसरे दिवशीं मुंबईस तोफांची सरबत्ती ऐकिली. तेव्हां शोध घेतां, गोंवेकर फिरंगी याचें सालाबाद आरमार व सुरती काफला आला ह्मणोन सरबत्ती जाहाली. कलम. १.

कुलाब्यास नेहमीं राहावयाचें ठीक नाहीं. निमित्य कीं दाणा गल्ला पान फाटें वैरण अगदीं मिळत नाहीं. त्यांत महागेच्या जे वेळेस पाहिजेत, त्या वेळेस हातीं येत नाहींत. कामकाज पलीकडे जावयाचें व यावयाचें तटून राहतें. कलम. १.

मागां मुंबईचें आरमार हेट गेलें होतें, त्यानें हुनावर व दुसरें एक ठिकाण वज्रयोगाचें घेतलें; व तेथून बिदनुरास जाणार ह्मणोन मुंबईमध्यें ऐसें वर्तमान बोलतात.
कलम. १.

एकूण नव कलमें शेवेसी निवेदन केलीं आहेत. मिती पौष वद्य ८ रविवार दोन प्रहर. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ३.

हें पत्र फार मौजेचें आहे. ह्या पत्रामध्यें रघुनाथ रणसोड ह्यानें नाना फड्णविसांस, मुंबईचा अक्टिंग गव्हरनर रामसे ह्याच्या उद्धत वर्तनपद्धतीबद्दल तक्रार लिहिली आहे. ह्या पत्रामध्यें पूर्वीचा गव्हरनर बॉडम हा आपल्या वडिलांशीं आदरपूर्वक वागत असे, असाही उल्लेख केला आहे. रामसे हा ता. ९ जानेवारी

इ. स. १७८८ पासून ता. ६ सप्टेंबर इ. स. १७८८ पर्यंत कामचलाऊ गव्हरनर होता. अर्थात् ह्या मुदतीपूर्वी रघुनाथ रणसोडाचा बाप, रणसोड कृष्ण, हा वारला होता, हें स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें गव्हरनर बॉडम ह्याचे कारकीर्दींत रणसोड कृष्ण हा इंग्रजांकडे बोलणीं चालणीं करीत असे, हेंही सिद्ध होतें. रामसे ह्याच्या विरुद्ध केलेल्या तक्रारीवरून, एतद्देशीय लोकांना खुर्ची बसावयास देण्याच्या कामीं दिसून येणारा अनुदारपणा व त्यामुळें उत्पन्न होणारा असंतोष फार जुना–इतिहासप्रसिद्ध–आहे असें ह्मणावें लागतें!

श्री.

"शेवेसी विज्ञापना विशेषः—आमचे वडील होते ते समयीं जनरल बॉडम याचे भेटीस जात होते. कित्येक वेळां आह्मी त्याजबरोबर जात होतों. ते वेळां जनरल बॉडमजवळ वडिलांहीं बसावें व आह्मीं उभयतांची मर्यादा राखोन त्याजवळ उभें असावें, ऐसें चाललें. नंतर वडील कैलासवासी झाले. श्रीमंतांचे आज्ञेवरून आह्मी कारभार करूं लागलों. जनरल बॉडम याचे भेटीस जातां तशीच चाल चालली. परंतु मशारनिल्हे जनरल यांची ममता व कृपादृष्टि तशीच नजरेस पडली. त्याजमुळें आह्मीं खुर्चीवर बसावयाचा आग्रह धरिलाच नव्हता. ते वेळां आमचें मानस बसावयाचें असतें तर गुंता नव्हता. सबब तसेंच गुदरलें. हल्लीं जनरल रामसी जाहालेत. यांचे भेटीस यावें जावें पडलें. यांहीं विचार करावा कीं, आपली रयत नाहीं; त्यांत कोणते कारभारावर व कोणाकडून येथें आहेत, हें ध्यान राखोन वर्तणूक करावी. तें कांहींच चित्तांत न आणून आपण बसोन आह्मांकडून बोलणें व जाबसाल उभ्याच ऐकोन घेतात. खुर्ची बसावयास देवावी ते देत नाहीं. त्याजवरून आह्मीं विचार पाहिला कीं, ही चाल चांगली दिसत नाहीं. थोराचे चाकर ह्मणवितों. ऐशी चाल रूढीस पडती! व नवा जनरल पुढें येणार. याजकरितां कृपा करून अजम मिस्तर मालीट यांचे कानावर आपण स्वतां घालावें व बंदोबस्ती करून मालीटचें पत्र जनरल रामसी यासी येविषयीं येऊन, चाल घातली आहे ती मोडून, हरएक सरकारचाकर यासी खुर्ची बसावयासी देतील ऐसें पत्र जरूर मशारनिल्हेचें घेऊन आह्मांकडेस पाठवावें. नवा जनरल यावयाचे अगोदर बंदोबस्ती करून घेतली पाहिजे ह्मणून विनंती केली आहे. तर चित्तावर धरून हें काम करावें कां जर आह्मी तंव चाकर; परंतु धनी समर्थ; जाणून ऐशी चाल ठीक नाहीं. आपण सर्व जाणतच आहां, फार काय ल्याहावें? शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ४.

हें पत्र श्रीमंत नाना फडणवीस हे बदामीच्या स्वारीवरून परत आल्यावर लिहिलेलें आहे. बदामीचा किल्ला ता. २० मे इ. स. १७८६ रोजीं फत्ते होऊन नाना लौकरच पुण्यास आले. ह्यावरून ह्या पत्राची ता. ६ जुलै इ. १७८६ ही

# ऐतिहासिक टिपणें..



## १. सवाई माधवरावांची वर्तणूक.

सवाई माधवराव हे पुढें पुढें स्वच्छंदी होऊन नाना फडणविसांचें अगदीं ऐकेनासे झाले होते. नानांनीं त्यांना चांगलें शिक्षण देण्यासाठीं शक्य तेवढा प्रयत्न केला. परंतु षोडश वर्षें पुरीं होऊन ते जसजसे मोठे होऊं लागले, तसतसें त्यांच्या लीला उच्छृंखल व स्वेच्छाचारी होऊं लागल्या. नानांनीं त्यांच्यावर चांगला दाब ठेवण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याचा विशेष उपयोग झालेला दिसत नाहीं. ग्रांटडफप्रभृति इतिहासकारांनीं सवाई माधवरावांस फाजील धाकामध्यें ठेवल्याचा दोष नानांवर लादला आहे, परंतु सवाई माधवरावांच्या उपलब्ध झालेल्या दिनचर्या पाहिल्या ह्मणजे तो दोष रास्त दिसत नाहीं. सवाई माधवरावांच्या वर्तनाबद्दलची पुढील एकच यादी मासल्याकरितां येथें दिली आहे:—

श्री.

"१ भोजनसमयीं मुसलमानी शब्द बोलतात. शिव्या मनस्वी देतात, व उपाध्ये, जोशी व जवळची मंडळी यांस आईवरून व बहिणीवरून शिव्या द्याव्या, तोंडावर मारावें, असें होत असतें.

१ शिंदे पोरें यांच्या वज्रमुष्टीच्या लढाया लावितात. एखादा थकोन पडला तत्रापि ढालाइताकरून सोटे मारवावे आणि बळेंच उभा करून पुन्हां लढवावें. नाकांतून तोंडांतून रक्तें आलीं तत्रापि सोडूं देत नाहींत. दोन चार मुलें दुखण्यास पडलीं आहेत. याप्रमाणें होतें.

१ चौकीचे लोक नेहमीं वाड्यांत राहणारे त्यांजला शिव्या द्याव्या. तोंडावर मारवाव्या. माणसें दिलगीर आहेत. कांहीं रुसूनही गेले.

१ बाहेरून शिष्ट ब्राह्मण दर्शनास आला अगर त्याचकडे जावयाचें जाहल्यास शिव्या द्याव्या. चिंचवडच्या देवास शिव्या दिल्या ह्मणोन ऐकिलें.

१ स्नानसंध्येसमयीं आशीर्वादास व नमस्कारास येतात त्यांचें दर्शन होत नाहीं.

१ चांगलें कोणीं सांगितलें तरी ऐकों नये. सांगेल त्याचा राग करावा. लहान गोष्टी सांगेल त्याजवर ममता करावी. चांगलें सांगेल त्यास पेंचांत आणावयाकरितां पहात असावें.

१ दोनप्रहरीं मुलें घेऊन बसावें. मनस्वी खेळ करावे. ओरडत असावें. वज्रमुष्टीच्या मजा कराव्या असें होत असतें.

१ दरबारास बसावयाचा कंटाळा. मुत्सद्दी मंडळीच्या थट्टा कराव्या. झगा पोषाख करून दरबार होत नाहीं.

१ लिहिणें पढणें सोडून दिलें. तिरंदाजी टाकिली.

१ दौलतीचे उपयोगी अशा तऱ्हेच्या नीती किंवा प्राचीन चांगल्या गोष्टी ऐकोंच नयेत. बाहेर चांगलें ह्मणतात किंवा वाईट ह्मणतात याचा तरी शोध करावा, तें कांहींच होत नाहीं. जवळचे राहणारे झाडून दिलगीर. जें चित्तास येईल तेंच करावें. चांगलें निखालसपणीं बोलेल तो लबाड."

सवाई माधवरावांच्या वर्तनाचा हा मासला पाहिला ह्मणजे कित्येक श्रीमंत लोकांच्या मुलांच्या लीला ज्या नेहमीं दृष्टीस पडतात, त्यांत व श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांच्या वर्तनांत फारसें अंतर आढळणार नाहीं. सवाई माधवराव पेशव्यांच्या दिनचर्येचे संपूर्ण कागद प्रसिद्ध झाले, ह्मणजे ग्रांटडफप्रभृति इतिहासकारांनीं नानांवर लादलेल्या दोषाचें ओझें पुष्कळ हलकें करावें लागेल असें वाटतें.

❧ ❧ ❧

## २. कारागिरांची प्रतिज्ञा—शर्तीचे बाण.

पहिल्या इंग्रजी युद्धामध्यें मराठ्यांनीं लढाईची कडेकोट तयारी केली होती. त्या वेळीं दारूचे बाण फारच उत्कृष्ट केले होते. त्या संबंधानें कारागीर लोकांनीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, जर बाण युद्धामध्यें चांगले निघाले नाहींत तर आमचे हात पाय तोडून टाकावेत. अर्थात् अशा प्रतिज्ञेनें तयार केलेले बाण रणसंग्रामावर अद्वितीय विजय मिळवितील ह्यांत आश्चर्य तें काय ? ह्या संबंधाचें हरिपंत फडके नानांस एका पत्रांत लिहितातः —

श्री.

"सेवेसी विज्ञापना. 'बाण नवे शर्तीचे चारशें निराळे करून पाठविले आहेत. लढाईत सोडिल्यावर परीक्षा दृष्टीस पडेल. वाईट बाण निघाल्यास हातपाय तोडावे याप्रमाणें कारीगारांनीं प्रतिज्ञा केली आहे व दुसराही कारखाना करावयाचें पाहतों ह्मणून आज्ञा केली ती कळली. बाण येथें पावल्यावर परिक्षेस येतील तसें लिहून पाठऊं.' इतके प्रतिज्ञेचे पाठविले, कारीगारांनीं शर्त केली, तेव्हां चांगलेच असतील. रवाना छ २२ जिल्हेज हे विज्ञापना."

❧ ❧ ❧

## ३. भेद करून राज्य करणें.

इंग्रजीमध्यें "Divide and rule" ह्मणजे भेद करून राज्य करणें अशी एक ह्मण आहे. आजपर्यंत ह्या ह्मणीचा उपयोग सर्व राष्ट्रांतील राज्यकर्त्यांनीं

कमीजास्त प्रमाणानें केला आहे असें प्राचीन व अर्वाचीन इतिहास सांगत आहे. मुसलमानी राज्यकर्त्यांनींही तीच राजनीति अवलंबिली होती व मराठ्यांनाही तिचें अवलंबन करण्याचे प्रसंग पुष्कळ वेळां आले होते. मराठ्यांचे प्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांनीं इ. स. १७८८।८९ सुमाराच्या एका पत्रामध्यें होळकरास, रजपूत संस्थानिकांची परस्परांत एकी होऊं न देतां भेदभाव राहील तरच मराठ्यांचें कार्य साधेल, असा उपदेश केला आहे. हें पत्र वाचलें ह्मणजे मराठ्यांनाही 'Divide and rule' ही राजनीति ज्ञात होती असें दिसतें.

श्री.

"जयपुराकडे खंडणीचा ऐवज राजश्री पाटीलबावांनीं ठरविला होता त्याचा भरणा कांहीं केला, कांहीं राहिला. तो न करीत. दिवसगत लाऊं लागले. तेव्हां त्याजवर मोहीम केली. जयपुरकरास जोधपुरकर सामील होऊन पाटीलबावांचे मोकाबिल्यास गेले. फौजेंत फितूर, वगैरे नानाप्रकारचे खेळ केले. लढाया झाल्या. फितुरामुळें पाटीलबावा माघारे फिरले. नंतर त्यांनीं इस्मायलबेग व गुलामकादराकडून खूळ करवून अगदीं पातशाहातीचा बंदोबस्त केला. सरकारचा बंदोबस्त राहूं दिला नाहीं. श्रीमंतांचे प्रतापेंकडून फिरोन पूर्ववत् पाटीलबावांनीं दिल्लीचा वगैरे बंदोबस्त केला, परंतु हे संस्थानिक सरकारलक्षांतील पहिल्यापासून, असें असतां त्यांनीं इतकी मसलत पेंचांत आणिली. हल्लीं परस्परें ऐकण्यांत आलें आहे कीं, आपणाकडे त्यांचे वकील आले आहेत. आपणास मिळवून घेऊन पाटीलबावांस उधळून द्यावें असें बोलतात, व उदेपुरकर व कोटेकर हे पहिल्यापासून सरकारलक्षांत. त्यांचे व जयपुरकर जोधपुरकर यांचे विरुद्ध होते. ते सरकारउपयोगी होते. **परस्परें राजेरजवाडे यांत फूट असल्यानें यांत सरकारउपयोग असें आहे.** हल्लीं उदेपुरकरांचें व उभयतांचें ऐक्य करून दिलें; व कोटेकरांचे मुलखांत उभयतांकडील फौज व कांहीं आपलेकडील जाऊन उपद्रव होत आहे व त्यांची उभयतांची एकी करून द्यावी असें होणार ह्मणून ऐकिलें. त्यांत सारे राजे एक [हें] ठीक नाहीं. दिल्लीचा बंदोबस्त जो करील त्यास हे सारे एक असल्यानें ठीक पडणार नाहीं. कोणे समयीं काय करितील हा भरंवसा नाहीं. यांत फूट असल्यानें चांगलें असें आहे. आपण पहिल्यापासून यांचे रीतीस व चालीस माहीतज्ञ आहेत. त्याहावें असें नाहीं, व आपण असें करणारही नाहींत. परंतु गोष्ट ऐकिली, याजकरितां लिहिलें आहे. तर कोटेकर यांस उपद्रव लागूं नये व उदेपुरकर व कोटेकर यांची व जोधपुर जयपुरकर यांची एकी असूं नये असें करावें. कोणास दुखावूं नये. राजश्री अलीबहादर पाटीलबावाकडे गेले, भेट झाली. नंतर पुढें श्रीयमुनेपार गुलामकादराचे पारिपत्यास गेले ह्मणून पत्रें आलीं. आपलें जाणें अद्याप होत नाहीं. पूर्वीं आपलीं पत्रें आलीं होतीं कीं, मुलें माणसें माघारे लावून इकडे न गुंततां लौकर जातों. त्यास किती दिवस झाले? अलिकडे तों आपलें पत्रही येत

नाहीं! त्यास तिकडे पाटीलबावांवर मसलत. फौजेचे बळाखेरीज त्यांनीं तरी काय करावें? आपण ते एक झाले असतां, फौजेचा जमाव होऊन सर्वांवर दाब बसोन कामच होईल; बखेडा लौकर मोडेल. सरकारचा नक्ष राहील. याजकरितां लौकर जाण्याचें करावें. याउपर दिवसगत लागल्यानें सरकारकाम बिघडेल. याचा विचार करून करणें तें करावें."



## ४. नानांचा रावबाजीस सुंदर उपदेश.

दुसरे बाजीराव गादीवर बसल्यानंतर नाना फडणवीसांचें व त्यांचें वचनप्रमाण झालें व उभयतांचे करारमदार ठरले. त्यांत नानांनीं बाजीरावापासून जो एक करार लिहून घेतला आहे तो अतिशय महत्त्वाचा आहे. ह्या एका करारामध्यें राजानें कसें वर्तन करावें ह्याचा कित्ता घालून दिला आहे, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. नानांच्या राजनीतीचा तो एक आदर्श आहे असें म्हटलें तरी चालेल. हा लेख अति महत्त्वाचा असून तो प्रत्येक संस्थानिकानें व जहागिरदारानें पठण करण्यासारखा आहे. ह्या लेखाची तारीख ३१ दिसेंबर इ. स. १७९६ ही आहे. रावबाजीच्या मनावर ह्या उपदेशाचा अल्पसा जरी परिणाम झाला असता, तरी पुष्कळ चांगलें झालें असतें.

श्री.

"यादी. दौलतीचे बंदोबस्ताचीं कलमें. सन सबा तिसैन मया व अलफ.

१. दौलतेंतील लहान मोठीं कामें व देणीं घेणीं व खर्च व सरदाऱ्या, मामलती, कोट किल्ले वगैरेंच्या चालींची वहिवाट पूर्वसांप्रदायानुरूप होत असावी, व पहिलीं कामें काजें केलीं व उपयोगीं पडले, सबब जें ज्याकडे आहे त्याप्रमाणें चालावें. दौलतेंतील जमा काय व खर्च किती याचें मनन होऊन, समजोन, समय पाहून, धारा चालावा. देवावें, द्यावें, देणें झाल्याखेरीज कोणताही कारभार होऊं नये. ज्याचें काम त्यांनीं करावें. कैलासवासी नानासाहेब व रावसाहेबपण आंगीं आणून, त्या दृष्टीनें दौलतेंतील लहान-मोठ्यांकडे पाहून, ज्याचे त्यापरी योग्यतेनुरूप लोभाने चालावें, येणेंप्रमाणें करार.

२. सांप्रदायाशिवाय जास्त खर्च व खाजगत खर्च निराळा असें होऊं नये. अगर मर्जी असल्यास हल्लींच खाजगीचे खर्चाचा नेम करून सांगावा. वरकड दौलतप्रकर्णीं पूर्वचालीप्रमाणें घडावें. मागील सावकारी कर्जें व लोकांचीं देणीं वगैरे सोयीनें तोडी होत असाव्या. खाजगत खर्चाची शिवाय याद करून बाकी लिहिल्याप्रमाणें करार.

३. सरदार व शिलेदार व पागे वगैरे यांस बोलवण्याची आज्ञा होत असावी. त्यांनीं दरबारास यावें. बोलवण्याखेरीज जाजती हार्जुमा[१] असों नये; चौकीस लोक वगैरे

१ गर्दी, घोंटाळा.

सर्व पूर्वसांप्रदायाप्रमाणें कदीम विश्वासू असावे. दरबारचे वेळेस सर्वांनीं यावें. इतर येणें ते बलावण्याशिवाय येऊं नये. आमचे विश्वासू चौकीस राहातील. येणेंप्रमाणें करार.

४. हल्लीं कोणी कामकाजावर पडले असतील त्यांस देणें व वाढवणें. त्याची याद हल्लींच समजोन व्हावी. म्हणजे हल्लींचे वहिवाटीची रक्कम उगवली. हल्लीं कामकाजाचे उपयोगीं पडले आहेत त्यांचा उपयोग पाहून सर्फराज केले जातील. येणेंप्रमाणें करार.

५. कोणतेही गोष्टीचा संशय येऊं नये. कोणीं सांगितल्यास ऐकूं नये. कदाचित् मनांत आल्यास वेगळे वाटेनें बोलून निराकरण होत असावें. घरांतील गोष्ट बाहेर जाऊं नये. गेल्यानें दौलतीचे कामांत व दाबांत कमी पडून उपहास होतो. खावंदाचे दाबावर दौलतीचें काम करावें लागतें. यास्तव कोणतेही कामास आंतून फूस व गुढगा नसावा. येणेंकडून कारभारी यांचा दाब राहात नाहीं. सरकारकामास उणं पडतें. हरएक कामाची भवती न भवती माहितगारीसाठीं करावी. परंतु शेवटीं कारभारी समजोन विनंती करितील ती मान्य होत असावी. ओढ पडूं नये, व खास दस्तूर कोणास लिहूं नये. हे रक्कम राखली असतां मोठे कामावर समयास उपयोगीं पडावयाची. त्यास जपणें असावें. शिक्का मोर्तब कारभारी यास कळल्याशिवाय होऊं नये. दौलतीची माहितगारी नाहीं. समक्ष येऊन हरएक कामाची माहितगारी होत असावी. येणेंप्रमाणें करार.

६. हरकोणावर कारणानुरूप रोष व कृपा करणें त्याचा विचार आधीं कारभारी यांशीं होऊन ठरेल तसें होत असावें. राजकारण व कागदपत्र व निरोप परभारें कोणास जाऊं नये. लौकिकांत फूट दिसते. हलक्या माणसाचा सहवास नसावा. येणेंकडून मनांत विपर्यास येणार नाहीं. योग्यता पाहून ज्यासीं जितकें काम तितकेंच बोलावें. कोणतेही कामाची जलदी नसावी. समजोन उमजोन होत असावें. गैरवांका होऊं नये. येणेंप्रमाणें करार.

कलमें सुमार साहा. सदरहूप्रमाणें धन्यांनीं व कारभारी यांनीं वैवाट करावी. येणेंकडून दौलतीचा दाब व बंदोबस्त राहून काम चांगलें चालेल. येणेंप्रमाणें करार.

छ १ रजब पौष मास सुमा सबा तिसैन."

## ५. मराठ्यांचा जंजिरा घेण्याचा प्रयत्न.

मराठ्यांना हबशांचा सुप्रसिद्ध किल्ला जंजिरा हस्तगत करण्याची महत्त्वाकांक्षा शिवाजी महाराजांच्या वेळेपासून होती. त्याकरितां शिवाजी व संभाजी ह्यांनीं केलेले प्रयत्न निष्फल झाले, त्याचप्रमाणें पेशव्यांनाही यश आलें नाहीं. तथापि त्यांनीं आपला प्रयत्न अखेरपर्यंत सोडला नाहीं. इ. स. १७८८–८९ त्यांनीं जंजिऱ्याचें राजकारण चालविलें होतें, परंतु त्या वेळींही त्यांचा हेतु पूर्ण झाला नाहीं. तेव्हां त्यांनीं पुनः इ. स. १७९२–९३ मध्यें पुनः अटोकाट प्रयत्न केला. ह्या वेळीं जंजिरा घेण्याकरितां पेशव्यांनीं कोंकणप्रांतांतील सरदारांशीं जे करार

मदार केले होते त्यांपैकीं एक मासल्यासाठीं खालीं दिला आहे. ह्या कागदावरून किल्ला घेण्याचे अगोदर मराठ्यांचे करारमदार कसे होते व ते सरदारलोकांस स्फुरण आणण्यास किती साहाय्यभूत असत ह्याची अटकळ बांधतां येईल.

श्री.

"यादी जंजिरे दंडाराजपुरी सरकारांत घ्यावयाचें कारस्थान होत आहे, त्यासंबंधें कलमें करार करून द्यावयाचीं: सुमा सलास तिसैन मया व अलफ. मशारनिल्हे नारो गोविंद वर्तक.

नक्त रुपये.

| | |
|---|---|
| १५००० | देवस्थानांस मुखवटे सोन्याचे व रुप्याचे व वस्त्रें मिळोन नवसाबद्दल अजमासें रुपये. |
| १५००० | कडीं सोन्याचीं. |
| १५०० | मोहनमाळा सोन्याच्या. |
| ४५०० | कंठ्या मोत्यांच्या व सोन्याच्या. |
| १५०० | चौकडे. |
| ५००० | कडीं रुप्याचीं. |
| ६०००० | नक्त रुपये. |
| १०२५०० | |

जंजिरा सरकारांत आल्यानंतर देवांस नवस व लोकांस कडीं कंठ्या नक्त वगैरे बक्षीस मिळोन एक लक्ष दोन हजार पांचशें रुपये दिले जातील. येणेंप्रमाणें करार करावें. करार. कलम. १

इनाम गांव व जमिनी जंजिरेमजकूरपैकीं व इकडील कारकून व लोक या कारस्थानांत आहेत त्यांस जहागीर जंजिरेमजकूरपैकीं सुटेल त्यापैकीं, अथवा ज्याचे सोईस जेथें पडेल तेथें, दाहा हजार रुपयांची करार करून द्यावी. कलम. १

गांव व जमिनी मिळोन दाहा हजार रुपयांचें इनाम सरकारकाम जाहल्यावर शिरस्तेप्रमाणें करार करून दिलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मसलतीस कारकून व माणसें गेलीं आहेत व पुढें जातील, त्यांस खर्च लागेल तो सरकारांतून द्यावा. कलम. १

तीन चारशें रुपयेपर्यंत किरकोळ खर्च जाहाल्यास मजुरा दिला जाईल. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मसलतीस कारकून व लोक आहेत त्यांचीं वतनसंबंधें वगैरे कामें आहेत, त्याचा बंदोबस्त करून द्यावा. कलम. १

किल्ला सरकारांत आल्यानंतर लोकांचीं व कारकुनांचीं वाजवी कामें असतील तीं करून दिलीं जातील. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मसलतसंबंधें लोकांस द्यावयास सरकारांतून ऐवज तसलमातीस दिला आहे. त्याच्या

ओळी द्दहापर्यंत घाटाखालीं सरकारचे लोकांचे हवालीं करून दिल्यावर तसलमातीचे ऐवजाचा जमाखर्च करावा. मजकडे कज्या नसावा. कलम. १

तुमचे तसलमातीस ऐवज दिला आहे. त्यास खातरजमेच्यां चांगल्या दहा ओळी सरकारांत आणून द्याव्या. खातरजमेच्या ओळी नसल्यास तुमचे तसलमातीस ऐवज दिला आहे तो तुह्मीं सरकारांत द्यावा. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

लोकांस पालख्या व अब्दागिरे व चवऱ्या व दिवट्या करार करून द्याव्या.

| | |
|---|---|
| १० | पालख्या. |
| १५ | अब्दागिरे. |
| १५ | दिवट्या. |
| १० | चवऱ्या. |
| ५० | |

सरकारकाम जाहल्यावर लोक हुजूर येतील, त्यांस बहुमान दहा पालख्या व पंधरा अब्दागिरे व पंधरा दिवटे व दहा चवऱ्या शिरस्तेप्रमाणें करार करून दिल्या जातील. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

जंजिरेमजकुरीं लोक आहेत त्यांस हुजूर माणूस पाहून तैनाता करून चाकरी हुजूर घ्यावी. असामी अजमासें १००० एक हजार. कलम. १

सरकारकाम जाहल्यावर लोकांनीं हुजूर यावें. माणूस पाहून तैनात करार करून दिली जाईल. आज्ञा होईल तेथें चाकरी करावी. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मसलतसंबंधें ऐवज जाजती लागल्यास त्याचें कारण सरकारांत समजावून त्याप्रमाणें द्यावा. कलम. १

मसलत सिद्ध जाहल्यावर स्थळें घ्यावयासी लोक खातरजमेचे ठेवावे लागतील. असामी ५०० पांचशें जदीद ठेवूं. त्याची आज्ञा असावी. त्यास रोजमरा हुजूरून द्यावा. कलम. १

जदीद माणूस ठेवूं नये. काम लागेल ते समयीं सरकारांत विनंति करावी. पांचशें माणूस हुजूरून दिलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

एकूण आठ कलमें करार करून दिलीं असेत. तीन महिन्यांत किल्ला सरकारांत आल्यानंतर सदरहू कलमें लिहिल्याप्रमाणें सरकारांतून निभावणी केली जाईल. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

किल्ल्यांत सरकारचें निशाण व लोक गेल्यावर शामळ खासा व त्याचे कारभारी या कामांत नसतील त्यास बंदोबस्तानें हुजूर पाठवून द्यावें. किल्ल्यांत कापड व जवाहीर व नक्त, दारूगोळी, तोफा वगैरे जो जिन्नस असेल तो सरकारचा. त्याची तसनस कौडीमात्र होऊं देऊं नये. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

चंद्र ९ रबिलावल सलास तिसैन कार्तिक मास."

❀ ❀ ❀

# ६. काशीविश्वेश्वराची पुनःस्थापना.

भरतखंडांतील अखिल हिंदुलोकांचें पवित्र स्थान जें काशीक्षेत्र, तें हस्तगत करून घेण्याचा प्रयत्न मराठ्यांनीं पुष्कळ वर्षें चालविला होता. बाळाजी बाजीराव व थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं श्रीक्षेत्र काशी हस्तगत करून घेण्यासाठीं अनेक प्रयत्न केले, परंतु ते फ़लद्रूप झाले नाहींत. सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत महादजी शिंदे ह्यांनीं 'उत्तर हिंदुस्थानांत भारतीय पराक्रम करून मराठ्यांचा सत्ताध्वज इंद्रप्रस्थावर नेऊन फडकविला; त्या वेळीं पुणें दरबारचे मुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांनीं हिंदूंचीं पवित्र क्षेत्रें मथुरा व वृंदावन हीं हस्तगत करून घेण्याबद्दल पाटीलबावांस एकसारखा तगादा लाविला. त्याचप्रमाणें श्रीकाशीक्षेत्रांतील श्रीविश्वेश्वराचें देवालय निर्वेधपणें ताब्यांत घेण्याबद्दलही अतिशय आग्रह केला. पाटीलबावांनीं दिल्लीच्या बादशादाचा व यवन सरदारांचा रागरंग पाहून हें कार्य सिद्धीस नेण्याचा संकेत केला. परंतु नानांनीं हें महत्कार्य लवकर सिद्धीस न्यावें असा आग्रह धरिला व पाटीलबावांच्या मुत्सद्यांस वारंवार पत्रें लिहिलीं. ह्या प्रसंगीं भिकाजी नारायण (अलीबहादराचे दिवाण) ह्यांनीं ता. २२ मार्च इ. स. १७८९ रोजीं पाटीलबावांच्या लष्करांतून मथुरेहून जें पत्र लिहिलें आहे, तें फार वाचनीय आहेः—

श्री.

"सेवेसी भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता. छ २४ जमादिलाखर मु॥ श्रीमथुरा वर्तमान यथास्थित असे विशेष. छ २ जमादिलावलचें पत्र पाठविलें तें छ १ जमादिलाखरीं पावलें. 'श्रीकाशींत श्रीविश्वेश्वराचें देवालय हजार वर्षांचें सर्वांस ठाऊक आहे. त्यास अलीकडे पातशाईत कोणी काय समाजावून मसीद केली. त्यास विश्वेश्वराचें स्थळ मोकळें होऊन, पूर्ववत् देवालय व देवस्थापना व्हावी हें हिंदुधर्मास योग्य आहे. ह्या कालीं पातशाहाजवळ उद्योग केलियास होईल असें आहे. त्यास ऐसी गोष्ट जाहली पाहिजे कीं, फिरोन दावा न राहे. पूर्वापर मजकूर पातशाहास समजावून कधीं कोणाकडून उपद्रव न होयसें पत्र करून घ्यावें. या गोष्टीचा उद्योग जरूर करावा. सांप्रत काळीं काशींत इंग्रजांचा अंमल आहे. ते कोणाचे धर्मास अडथळा करीत नाहींत. येविसीं त्यांसीं बोलतां येईल. विश्वेश्वराचे स्थळांत वस्ती असल्यास त्याचे इमल्याचा पैका देविला जाईल. परंतु पातशाहाची परवानगी निर्वेधपणें जाहली पाहिजे. मथुरा वृंदावन हीं स्थळें सरकार खालशांत असावीं. त्यांच्या सनदा सरकारचे नांवें घेऊन पाठविणें ह्मणून राजश्री पाटीलबावांस पत्र सरकारचें लिहून पाठविलें आहे. त्यास तुह्मीं व राजश्री आपाजीराव सदरहू अन्वयें मजकूर बोलून सनदा करून घेऊन पाठविणें ह्मणोन आज्ञा आली!' त्यास येविसींचे पर्याय तपशीलें

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] सप्तेंबर १९०८. [अंक २ रा.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



श्रीमंत नारायणराव पेशव्यांचा वध.

# ऐतिहासिक चर्चा.

## १. पाणिपतच्या युद्धांतून पळून आल्याचा आरोप.

पाणिपतच्या युद्धामध्यें मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, नारोशंकर राजेबहाद्दर इत्यादि वयोवृद्ध व युद्धकलाविशारद मराठे वीरांत्रा व श्रीमंत सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे ह्यांचा मतभेद होऊन फार बेबनाव झाला. त्यामुळें मल्हाररावादि सरदार युद्धामध्यें एकदिलानें न लढतां, आपलें अंग काढून रणविन्मुख झाले. अर्थात् युद्धकलेमध्यें पूर्ण निष्णात व भारतीय युद्धांतील भीष्माचार्याप्रमाणें वयोवृद्ध असे मल्हारराव होळकर व इतर मराठे सेनानी ह्यांनीं मागें पाऊल घेतल्यामुळें मराठ्यांस अत्यंत लाजिरवाणें अपयश आलें, असा फार दिवसांपासून एक आरोप चालत आला आहे. त्यांत तथ्य किती आहे ह्याचा निर्णय अस्सल कागदपत्रांवांचून होणार नाहीं. ह्या विषयासंबंधानें अस्सल कागदपत्र शोधून काढण्याचा प्रयत्न क्याप्टन ग्रांट डफ ह्यांनीं केला होता, असें आह्मांस खात्रीलायक आधारावरून मानितां येतें. कै. रा. ब. निळकंठ जनार्दन कीर्तने ह्यांनींही "होळकरांची थैली" ह्मणून एक जुनी बखर शोधून काढिली होती व तींत मल्हारराव होळकरावरील ह्या आरोपाचें खंडण केलें होतें. परंतु ही बखर दुर्दैवानें अद्यापि प्रसिद्ध झाली नाहीं.* ही बखर उपलब्ध होऊन प्रकाशांत आली व ती जर ऐतिहासिक सत्याच्या कसो-

*आमचे मित्र रा. राजवाडे ह्यांनीं, 'मराठ्यांच्या इतिहासांचीं साधनें खंड ३ रा', ह्या पुस्तकांत लेखांक १७२ मध्यें "होळकरांची थैली" ह्मणून एक अपूर्ण बखर प्रसिद्ध केली आहे. ह्या बखरीबद्दल ते लिहितातः—"मल्हाररावाच्या सांगण्यावरून जर ही बखर सजविलेली असेल तर एका मोठ्या जबरदस्त व नाजूक शंकेचें निरसन झालें असेंच ह्मणावें लागेल. मल्हाररावानें दुष्ट बुद्धीनें व मत्सरानें पाणिपतचें रण ऐन प्रसंगीं सोडिलें असा त्यावर दोषारोप आहे. तो ह्या बखरीनें समूळ उडून जाण्यासारखा आहे. भाऊसाहेब अबदालीवर शेवटची चाल करून गेले, त्या वेळीं त्यांनीं मल्हाररावांना गोब्राह्मणांची शपथ घालून सांगून पाठविलें कीं, कोणाची पर्वा न करितां किंवा कोणाची दिक्कत मनांत न आणितां, तुह्मीं रणांतून कबिल्यांना घेऊन जावें. मुख्य सेनापतीची व खुद्द मालकाची आज्ञा शिरसा व अक्षरशः मानणें हें हाताखालील सेवकाचें कर्तव्य होय हें सर्वत्र कबूल होण्यासारखें आहे. ही गोष्ट मान्य झाली ह्मणजे मल्हारराव वरपांगीं तरी, निदान ह्या एका प्रसंगीं तरी सर्वथा दोषमुक्त होतो हें उघड आहे."—पृ० १८२.

टीस उतरली, तर ह्या वादग्रस्त प्रश्नाचा निर्णय होण्यास एक चांगलें साधन होईल. परंतु तसें साधन अद्याप कांहीं उपलब्ध झालें नाहीं. तथापि आम्हांस ह्या प्रश्नाचा निर्णय करण्यास उपयुक्त होणारीं दोन तीन अस्सल पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं दोन पत्रें मल्हारराव होळकरांच्या पदरच्या मुत्सद्यांचीं आहेत व एक पत्र खुद्द विठ्ठल शिवदेव विंचूरकर ह्यांचें आहे. ह्या तीन पत्रांवरून ह्या वादग्रस्त ऐतिहासिक चर्चेसंबंधानें बराच चांगला खुलासा होतो. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांस पाणिपतच्या युद्धाचें अपयशाचें वर्तमान समजून बहुत खेद उत्पन्न झाला होता व प्रिय पुत्र व अनेक मातबर सरदार व आप्तसंबंधी धारातीर्थीं पतन पावल्यामुळें त्यांचें अंतःकरण दुःखानें भेदून गेलें होतें. तशांत मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव वगैरे जुने कसलेले वीर जिवंत परत आल्याचें समजून त्यांना अचंबा वाटला असावा; व गैरसमजानें किंवा कोणाच्या विरुद्ध चाहड्या ऐकून त्यांना त्यांच्याबद्दल पराकाष्ठेचा संताप झाला असावा, असें उघड दिसून येतें. श्रीमंत नानासाहेब पेशवे ह्यांनीं इंदुरास जाऊन होळकरांचे महालही जप्त केले, ह्यावरून श्रीमंतांची स्वारी किती क्रुद्ध झाली होती ह्याची कल्पना करितां येईल. हीं पत्रें येणेंप्रमाणें:—

### श्रीमोरया.

छ ३ जिल्काद इसन्ने ता. २८ मे इ. स. १७६२.

"श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे सेवेसीः—

विनंती सेवक विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना येथील क्षेम छ १३ सवाल स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. छ ११ रमजानचें आज्ञापत्र तीर्थरूप राजश्री तात्यांस आलें, तें छ ९ सवालीं गांगुर्णीचे मुक्कामीं पावोन प्रमोदावाप्ति झाली. हिंदुस्थानच्या मनसबियाचे किल्येक प्रकारें पत्रीं आज्ञा. ऐशीयास तीर्थरूप तों राजश्री सुभेदारसाहेबीं हिंदुस्थानच्या बंदोबस्तास्तव वजीर गाजुद्दीखान व ठाकूर सुरजमल यांजकडे रवाना केलेत. स्वामींचीं पत्रें बजिन्नस त्यांजकडे पाठविलीं. इकडील वर्तमानाचीं पत्रें पै दरपै सेवेसी पाठवीत गेलों, त्यांवरून सर्व श्रुत झालें असेल. सांप्रतही राजश्री सुभेदारांनीं विनंतीपत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून निवेदन होईल. हिंदुस्थानचा मदार सर्व राजश्री सुभेदारावर आहे हे आज्ञा. पूर्वींपासून सर्व कारभार राव कैलासवासी यांनींही राजश्री सुभेदारांचे हातीं घेतला. अलिकडेही येणेंप्रमाणेंच चालत आले. परंतु आवंदां श्रीमंत शिरोंजेहून माघारे फिरल्यावर खावंदांनीं पूर्व लोभास अंतर केलें. चाकरांनीं सेवा करावयास अंतर केलें नाहीं. जे लढाईत होते ते सर्व भेटलेच असतील. त्यांनीं वर्तमान निवेदन केलें असेल. मोडल्या झुंजांची शिफारस कशास ल्याहावी? शिंदे पवार पूर्वींपासून चाकर साहेबकामावर. त्यांच्या

या गती! अशा समयांत त्यांची जप्ती नसावी!! राजश्री सुभेदार यांजकडील महाल देशचे जप्त केले ह्मणोन श्रीमंतांनीं येथें लिहिलें होतें, तेणेंकरून यांचे चित्तास उदासीनता झाली. आजपावेतों सेवा केली त्याचें फळ हें? पुढें केलिया कळतच आहे! ऐसें वारंवार बोलतात. आज्ञेप्रमाणें आह्मी यांचें शांतवन करीत असतों. आतां साहेब आले, सर्व बंदोबस्त करतील. खावंदांसही या समयांत सेवक लोकांचेंच समाधान करून, मागती सर्व बंदोबस्त करवावा. या रीती सर्व खावंद जाणतच आहेत. या समयांत पांच चार हजार फौज येती तर थोडाबहुत बंदोबस्त होता. श्रीमंतांनीं इकडे कांहीं फौज ठेविली नाहीं! राजश्री बाबूजी नाईक, सदाशिव रामचंद्र व गोपाळ गोविंद सर्व देशास गेले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति."

हें पत्र ता. २८ मे इ. स. १७६२ रोजीं विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर ह्या दोघां होळकराकडील मुत्सद्यांनीं श्री० दादासाहेब ह्मणजे रघुनाथराव पेशवे ह्यांस लिहिलेलें आहे. श्री० दादासाहेबांनीं, 'तीर्थरूप राजश्री तात्यांस' ह्मणजे गंगाधर यशवंत चंद्रचूड–मल्हारराव होळकरांचे दिवाण–ह्यांस पत्र लिहिलें होतें. त्याचें हें उत्तर आहे. श्रीमंत दादासाहेब हे मल्हारराव होळकरांचे पूर्ण ऋणानुबंधी होते, तेव्हां श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या गैरमर्जीबद्दलची तक्रार त्यांनीं त्यांच्याकडेच करावी हें साहाजिक आहे.

दुसरें पत्र वरील पत्रांच्या लेखकांचेंच आहे. परंतु तें कुकाजीपंत ह्यांच्या नांवचें आहे. हे कुकाजीपंत कोण हें समजत नाहीं. हे कदाचित् होळकरांच्या बाजूचे पुणेंदरबारांतील वकील असतील. हें पत्र फार महत्त्वाचें आहे. तें येणेंप्रमाणें:—

श्री.

छ. ३ जिल्काद इसन्ने

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री कुकाजीपंत स्वामींचे सेवेसीः–

पोष्य विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असलें पाहिजे. विशेषः–तुह्मीं पत्र तीर्थरूप राजश्री तात्यांस छ १२ रमजानचें पाठविलें, तें छ ११ माहे सवालीं पावोन लेखनार्थ अवगत झाला. हिंदुस्थानची मसलत बिघडली. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा तो प्रकार! श्रीमंतांचे शरीरीं समाधान नाहीं यामुळें प्रकृत विलक्षण झाली. श्रीमंत विश्वासराव कैलासवासी हा श्रम मोठा. त्या खेदाकरितां राजश्री सुभेदारास त्यांनीं लिहिलें असेल. त्याचें विषम सुभेदारास वाटेल; उदासीनता मानितील; आपण प्रसंगीं आहेत; सूचना असावी, ह्मणून विस्तारें लिहिलें. ऐशियासी श्रीमंतांनीं यजमानास लेहावें; आह्मीं कळूं न द्यावें, अशा गोष्टी न लिहितां अमलांतच आणिल्या. सुरंजेहून श्रीमंत मागें फिरतां पवारांचे महाल जप्त केले. उज्जनीस जाऊन शिंद्याकडील ऐवज नक्त व कापड

टीस उतरली, तर ह्या वादग्रस्त प्रश्नाचा निर्णय होण्यास एक चांगलें साधन होईल. परंतु तसें साधन अद्याप कांहीं उपलब्ध झालें नाहीं. तथापि आम्हांस ह्या प्रश्नाचा निर्णय करण्यास उपयुक्त होणारीं दोन तीन अस्सल पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं दोन पत्रें मल्हारराव होळकरांच्या पदरच्या मुत्सद्यांचीं आहेत व एक पत्र खुद्द विठ्ठल शिवदेव विंचूरकर ह्यांचें आहे. ह्या तीन पत्रांवरून ह्या वादग्रस्त ऐतिहासिक चर्चेसंबंधानें बराच चांगला खुलासा होतो. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांस पाणिपतच्या युद्धाचें अपयशाचें वर्तमान समजून बहुत खेद उत्पन्न झाला होता व प्रिय पुत्र व अनेक मातबर सरदार व आप्तसंबंधी धारातीर्थीं पतन पावल्यामुळें त्यांचें अंतःकरण दुःखानें भेदून गेलें होतें. तशांत मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव वगैरे जुने कसलेले वीर जिवंत परत आल्याचें समजून त्यांना अचंबा वाटला असावा; व गैरसमजानें किंवा कोणाच्या विरुद्ध चाहड्या ऐकून त्यांना त्यांच्याबद्दल पराकाष्ठेचा संताप झाला असावा, असें उघड दिसून येतें. श्रीमंत नानासाहेब पेशवे ह्यांनीं इंदुरास जाऊन होळकरांचे महालही जप्त केले, ह्यावरून श्रीमंतांची स्वारी किती क्रुद्ध झाली होती ह्याची कल्पना करितां येईल. हीं पत्रें येणेंप्रमाणें:—

श्रीमोरया.

छ ३ जिल्काद इसन्ने' ता. २८ मे इ. स. १७६२.

"श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे सेवेसीः—

विनंती सेवक विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना येथील क्षेम छ १३ सवाल स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. छ ११ रमजानचें आज्ञापत्र तीर्थरूप राजश्री तात्यांस आलें, ते छ ९ सवालीं गांगुर्णीचे मुक्कामीं पावोन प्रमोदावाप्ति झाली. हिंदुस्थानच्या मनसबियाचे कित्येक प्रकारें पत्रीं आज्ञा. ऐशीयास तीर्थरूप तों राजश्री सुभेदारसाहेबीं हिंदुस्थानच्या बंदोबस्तास्तव वजीर गाजुद्दीखान व ठाकूर सुरजमल यांजकडे रवाना केलेत. स्वामींचीं पत्रें बजिन्नस त्यांजकडे पाठविलीं. इकडील वर्तमानाचीं पत्रें पै दरपै सेवेसी पाठवीत गेलों, त्यांवरून सर्व श्रुत झालें असेल. सांप्रतही राजश्री सुभेदारांनीं विनंतीपत्रें लिहिली आहेत, त्यांवरून निवेदन होईल. हिंदुस्थानचा मदार सर्व राजश्री सुभेदारावर आहे हे आज्ञा. पूर्वीपासून सर्व कारभार राव कैलासवासी यांनींही राजश्री सुभेदारांचे हातीं घेतला. अलिकडेही येणेंप्रमाणेंच चालत आले. परंतु आवंदां श्रीमंत शिरोंजेहून माघारे फिरल्यावर खावंदांनीं पूर्व लोभास अंतर केलें. चाकरांनीं सेवा करावयास अंतर केलें नाहीं. जे लढाईंत होते ते सर्व भेटलेच असतील. त्यांनीं वर्तमान निवेदन केलें असेल. मोडल्या कुंजांची शिफारस कशास ल्याहावी? शिंदे पवार पूर्वीपासून चाकर साहेबकामावर, त्यांच्या

या गती ! अशा समयांत त्यांची जप्ती नसावी ! ! राजश्री सुभेदार यांजकडील महाल देशचे जप्त केले ह्मणोन श्रीमंतांनीं येथें लिहिलें होतें, तेणेंकरून यांचे चित्तास उदासीनता झाली. आजपावेतों सेवा केली त्याचें फळ हें ? पुढें केलिया कळतच आहे ! ऐसें वारंवार बोलतात. आह्मेप्रमाणें आह्मी यांचें शांतवन करीत असतों. आतां साहेब आले, सर्व बंदोबस्त करतील. खावंदांसही या समयांत सेवक लोकांचेंच समाधान करून, मागती सर्व बंदोबस्त करवावा. या रीती सर्व खावंद जाणतच आहेत. या समयांत पांच चार हजार फौज येती तर थोडाबहुत बंदोबस्त होता. श्रीमंतांनीं इकडे कांहीं फौज ठेविली नाहीं ! राजश्री बाबूजी नाईक, सदाशिव रामचंद्र व गोपाळ गोविंद सर्व देशास गेले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापि."

हें पत्र ता. २८ मे इ. स. १७६२ रोजीं विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर ह्या दोघां होळकराकडील मुत्सद्यांनीं श्री० दादासाहेब ह्मणजे रघुनाथराव पेशवे ह्यांस लिहिलेलें आहे. श्री० दादासाहेबांनीं, 'तीर्थरूप राजश्री तात्यांस' ह्मणजे गंगाधर यशवंत चंद्रचूड–मल्हारराव होळकरांचे दिवाण–ह्यांस पत्र लिहिलें होतें. त्याचें हें उत्तर आहे. श्रीमंत दादासाहेब हे मल्हारराव होळकरांचे पूर्ण ऋणानुबंधी होते, तेव्हां श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या गैरमर्जीबद्दलची तक्रार त्यांनीं त्यांच्याकडेच करावी हें साहाजिक आहे.

दुसरें पत्र वरील पत्रांच्या लेखकांचेंच आहे. परंतु तें कुकाजीपंत ह्यांच्या नांवचें आहे. हे कुकाजीपंत कोण हें समजत नाहीं. हे कदाचित् होळकरांच्या बाजूचे पुर्णेदरबारांतील वकील असतील. हें पत्र फार महत्त्वाचें आहे. तें येणेंप्रमाणें:—

श्री.

छ. ३ जिल्काद इसन्ने

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री कुकाजीपंत स्वामींचे सेवेसीः–

पोष्य विनायक बाजीराव व कृष्णराव गंगाधर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असलें पाहिजे. विशेषः—तुह्मीं पत्र तीर्थरूप राजश्री तात्यांस छ १२ रमजानचें पाठविलें, तें छ ११ माहे सवालीं पावोन लेखनार्थ अवगत झाला. हिंदुस्थानची मसलत बिघडली. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा तो प्रकार ! श्रीमंतांचे शरीरीं समाधान नाहीं यामुळें प्रकृत विलक्षण झाली. श्रीमंत विश्वासराव कैलासवासी हा श्रम मोठा. त्या खेदाकरितां राजश्री सुभेदारास त्यांनीं लिहिलें असेल. त्याचें विषम सुभेदारास वाटेल; उदासीनता मानितील; आपण प्रसंगीं आहेत; सूचना असावी, ह्मणून विस्तारें लिहिलें. ऐशियासी श्रीमंतांनीं यजमानास लेहावें; आह्मीं करूं न द्यावें, अशा गोष्टी न लिहितां अमलांतच आणिल्या. सुरंजेहून श्रीमंत मागें फिरतां पवारांचे महाल जप्त केले, उज्जनीस जाऊन शिंद्याकडील ऐवज नक्त व कापड

जवाहीर येणेंप्रमाणें घेऊन, कारकुनासही पुसावयाचें तें पुसलें. राजश्री गोविंद शिवराम यांसी इंदुरीं पाठवून ऐवज कांहीं व तोफा मागत होते, तेथें द्रव्यसाधना न झाली. उपरांतिक संवत्सरप्रतिपदेचे दिवशीं खासा स्वारी इंदुरास आली. एक दिवस राहून प्रयत्न करावयाचा तितका करून पाहिला. दुसरे रोजीं कूच करून बऱ्हाणपुरास दरमजल गेले. तेथून पत्रें पाठविलीं कीं, देशाचे महाल आह्मी जप्त करितों. येणेंकडून यजमानांची मर्जी फारच कडू झाली; त्याचा विस्तार कोठपर्यंत ल्याहावा. रायापासून आजपावेतों एकनिष्ठेनें सेवा केली, कोणे गोष्टीचा शब्द यजमानांनीं लावून घेतला नाहीं. हल्लींही कमी केली न केली, हें या प्रसंगीं होते त्यांस प्रसिद्ध आहे. यजमान वर्तमान असतां जप्ती करावी हें खावंदापासून दूर असे. आह्मी कित्येक प्रकारें राजश्री सुभेदाराची मर्जी न कळावी अशी विनंति करून यथापूर्व चालावें याच विचारें बोलत असतों. परंतु दिवसें दिवस * * * हे विनंति."

ह्या दोन पत्रांवरून मल्हारराय होळकरांवर श्रीमंत नानासाहेब पेशव्यांची गैरमर्जी कशी व कां झाली, व वस्तुस्थिति काय होती ह्याचा चांगला खुलासा होतो. दुसऱ्या पत्रांमध्यें श्रीमंतांनीं शोकाकुल अंतःकरणानें सुभेदारास कांहीं विषम मजकूर लिहिला असेल, तर त्याचा त्यांनीं खेद मानूं नये अशी स्पष्ट सूचना केली आहे. ह्यावरून मल्हारराव होळकरावरील आरोपाचें पुष्कळ स्पष्टीकरण होतें.

तिसरें पत्र विठ्ठल शिवदेव विंचूरकर ह्यांच्या स्वदस्तुरचें आहे. विठ्ठल शिवदेव व मल्हारराव होळकर पाणिपतांतून बरोबरच परत आले; व ते माळव्यांत गांगरोणी मुक्कामावर एके जागां होते. विठ्ठल शिवदेव ह्यांनीं मोठ्या जोरदार भाषेनें व अंतःकरणपूर्वक श्रीमंत दादासाहेबांस असें लिहिलें आहे कीं, आह्मी पाणिपतांतून जीवंत आलों ह्मणून श्रीमंतांचा आमच्यावर एवढा राग झाला आहे! परंतु मरणाच्या खस्तीस आह्मी भ्यालों नाहीं. परंतु आयुष्यापुढें आमचा उपाय नाहीं!! लढाईंत आह्मीं पुष्कळ मेहेनत केली किंवा नाहीं हें आतां सांगण्यांत अर्थ नाहीं. युद्धांत यश आलें असतें ह्मणजे आमच्या पराक्रमाचे पोवाडे गाणें रास्त होतें! परंतु अपयश आल्यामुळें आमची सर्व मेहेनत व्यर्थ गेली!! हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक विठ्ठल शिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना:— येथील कुशल तां० छ ९ सवाल मु० गांगरोणी प्रांत माळवा जाणून यथास्थित असो विशेष. स्वामींचीं पत्रें रा० मल्हारजी होळकर सुभेदार यांस येतात. आह्मी ते एका जागांच आहों: स्वामींस परस्परें कळलें असेल. पत्र न पाठवावयाचें कारण इत-

केंच दिसोन आलें कीं, हे वांचून कशास आले? त्यास हें प्रमाणच आहे. मरणाच्या खस्तीस कोण्हीं चुकलें नाहीं. परंतु आयुष्यापुढें इलाज नाहीं! जखम लागली तेथें खैर होऊन वांचून ग्यावें, हे ईश्वरी सत्ता!!

आयू रक्षति कर्माणि आयुरन्नं प्रयच्छति।

ऐसें आहे. परंतु आह्मी आपल्या जीवास खातच आहों. आह्मांसही सर्व गोष्टी कळतच आहेत. परंतु मेहनत गैरमेहनत सर्व एक ईश्वरी क्षोभानें वायां गेल्या!! सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

ह्या वरील तिन्ही पत्रांवरून, पाणिपतच्या लढाईतून परत आलेल्या मराठे योद्ध्यांवर, श्रीमंत पेशव्यांची गैरमर्जी कशी व किती झाली होती, त्याचा स्पष्ट खुलासा होतो. त्याचप्रमाणें, जिवंत पळून येण्यांत त्यांची कांहीं कसूर, किंवा कर्तव्यपराङ्मुखता, किंवा द्वेष, मत्सरबुद्धी होती कीं काय, त्याचेंही स्पष्टीकरण होतें. अर्थात् हा पुरावा अल्प आहे; तरी तो पहिल्या प्रतीचा अस्सल व तत्कालीन आहे. त्यावरून मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे दोन सरदार, पाणिपतच्या युद्धांत आपल्या मेहनतीची पराकाष्ठा करून, युद्धाची सर्व बाजू बिघडून जाऊन विपरीत स्थिति प्राप्त झाल्यामुळें, केवळ परिस्थितीस पाठ देऊन व हताश होऊन, परत आले असावेत, असें दिसतें. त्यांत मत्सरबुद्धीनें घडलेला कसूर किंवा द्वेषभाव दिसत नाहीं. अर्थात् हे अनुभवी सेनानी जिवंत परत आले, व आपले प्रियपुत्र व इष्टबांधव रणभूमीस समर्पण होऊन मराठ्यांच्या शौर्यकीर्तीस अपयशाचा थोर कलंक लागला, ह्यामुळें पेशव्यांचें अंतःकरण क्षुब्ध होऊन, त्यांनीं त्या उभयतांस दोष द्यावा, व त्यांचे महालही कांहीं दिवस जप्त करावेत, हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. ह्या विषयासंबंधाचे अस्सल कागदपत्र जसजसे उपलब्ध होतील, तसतसा ह्या वादग्रस्त मुद्याचा अधिक खुलासा होईल. मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव हे परत येण्यापूर्वीं घडलेल्या हकीकतीचीं अस्सल पत्रें मिळणें अवश्य आहे.

---

## २ नारायणराव पेशव्यांचा वध.

नारायणराव पेशव्यांचा वध कसा झाला, हा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. मध्यंतरीं एका प्रभू लेखकानें असें प्रसिद्ध केलें होतें कीं, नारायणराव पेशव्यांचा वध करणारा सुमेरसिंग हा खरा गारदी नसून, तो कोणी प्रभू ज्ञातीय गृहस्थ होता व त्यानें स्वज्ञातीस झालेल्या धर्मछलाचा सूड घेण्याकरितां हा वध केला. परंतु वास्तविक प्रकार तसा दिसत नाहीं. नारायणराव पेशव्यांच्या वधाचा सविस्तर

वृत्तांत आजपर्यंत मराठी बखरी व ग्रांटडफचा इतिहास ह्यांमध्यें आलेला आहे, सबब त्याचें पुनः चर्वितचर्वण करण्याचें कारण नाहीं. परंतु ह्या संबंधानें कांहीं नवीन प्रकाश पाडणारीं जीं अप्रसिद्ध पत्रें उपलब्ध झालीं आहेत, तीं येथें देण्यास हरकत नाहीं.

## लेखांक १.

हें पत्र इतिहासदृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. ह्या पत्राची तारीख १३ जुलई इ. स. १७८३ ही आहे. ह्या पत्रामध्यें रघुनाथराव दादांनीं समुखें आपल्या कृतकर्माचा उच्चार केला आहे. दादासाहेबांची प्रकृति ह्या वेळीं पुष्कळ बिघडून ते श्रीमंत मातुश्री बाईसाहेब (गोपिकाबाई—नारायणरावांची आई) ह्यांच्या भेटीस उत्सुक झाले, व त्यांनीं नानाफडणवीस व हरिपंत फडके ह्यांच्याशीं तत्संबंधाचीं भाषणें सुरू केलीं. त्यावेळीं बाईसाहेबांनीं अशी अट धरली कीं, नारायणरावांच्या वधाचा सर्व अपराध कबूल करून, प्रायश्चित्त घ्याल तर भेट घेऊं. त्या वेळीं विसाजीपंत ह्मणून एक मध्यस्थ गृहस्थ श्रीमंतांकडे पाठविले होते, ते हरिपंत तात्यांस भेटले. त्यांनीं दादासाहेबांच्या भाषणाचा जो मजकूर सांगितला, तो हरिपंतांनीं नानांस पुढें लिहिल्याप्रमाणें लिहिला आहेः—

"श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांचें दर्शन घेणें याजकरितां कारकून तिकडे पाठविला होता, तो आतांच आला. त्यांतील सारांश, दारणा सांगवीवर प्रायश्चित्त करावें. त्यास "आह्मांस ती वडील मातुश्रीच आणि खावंद. त्यांची आज्ञा दुर्लंघ्य. त्यापक्षीं प्रायश्चित्तही करितों, व प्रायश्चित्ताजोगा थोडकासा प्रमादही घडला आहे," ह्मणाले. तो कसा ह्मणून विसाजीपंतांनीं समजोन प्रश्न केला. त्याचें उत्तर केलें कीं, "मी निखालस झालों त्यापक्षीं लपवीत नाहीं. नारायणरावसाहेब यांस धरावें असा तर निश्चय, त्या प्रकर्णांतील राजकारण करणारांसीं केला. ते समयीं त्यांनीं विचारिलें कीं, न जाणों, धरूं जातां कलागत पडली आणि त्यांत कदाचित् मारले गेले, तर दोष ठेऊं नये, असें त्यांनीं सोडवून घेतलें; आणि कर्मास प्रवर्तले. ते समयीं त्यांनीं येऊन कमरेस मिठी घातली. तेव्हां गलबल झाली. फुरसत पडूं पावली नाहीं. दोहींकडे हात लावून निवारण करितों, इतक्यांत घात करणारांनीं आपले जीवाचे बचावास्तव हात टाकिला. तो प्रथमच पुरा बसला. त्याचा पुढील ग्रंथ तुह्मां सर्वांस समजलाच आहे. तेव्हां धरण्याचे संकल्पांत कलागती पडून मारला गेला तर दोष नाहीं, हें बोलणें करणें. तें सांप्रत प्रायश्चित्तास कारण वाजबी आहे. त्यापक्षीं घेऊं." गुरुआज्ञाअन्वयें इतिहास सांगितला. त्यांत यांस सुचलें तें बोलले. त्यांनीं उत्तरें करावयाचीं तीं केलीं. त्यांत आपले दोष झांकून गुण दाखवावे असे भाव नाहींत. हा एक प्रकार बोलण्यांत विस्तारें आला. त्यांत त्यांच्या यांच्या भवति न भवतिही यथारीतीनें झाल्या. आखेरीज स्वामींचें एक-

निष्ठेचे व कर्तृत्वाचे व सखारामपंत आदिकरून गुणदोष परस्पर बोलण्यांत बहुत आले. त्याचा विस्तार काय लिहिणें ? सारांश, बाईसाहेबांचा प्रायश्चित्तसंकल्प व यांचा दर्शनाविषयीं संकल्प याचें परम संकट प्राप्त होतें. तें निवारण होऊन दुतर्फाचेही मतानुसार घडेल असें वाटतें. राजश्री गंगाधररावही पाठविले आहेतच. श्रीमंतांकडूनही पुन्हां कारकून जातच आहे. सिद्धांत झाला ह्मणजे कुंभारीहून गंगातीरानें नाशिकचे रोखें जाऊं. बाईची यांची भेट झाल्यावर, यांचें स्थातव्य आनंदवल्ली अथवा कोठें होईल. जवळचा बंदोबस्त कराराप्रमाणें झाला ह्मणजे आह्मांस यावयास मोकळीक होईल. तोंपावेतों भ्रमणांत आहों. यास इलाजच नाहीं. एका दो दिवशीं निराळे वाटेनें आह्मांसी बोलणार. तें बोलणें झाल्यावर लिहून पाठवूं. कच्चें बोलणें पुष्कळ झालें, तर तितकें ल्याहावें अशी धारणा राहाणें कळतच आहे. व उग्याच गोष्टी किती ल्याहाव्या ? तात्पर्य, सुचलें व मनांत येतें तें सेवेसी लिहितों. शिष्य कोणी कोणी अटकेस आहेत, व किरकोळ जप्त्या असतील, त्यांस मोकळें करावें असें ह्मणणें आहे. सारांश, गुरमी दाखवून बोलते, तर उत्तरेंही पाहातों तशीं करतों. सरळपणें स्वच्छ चित्त दाखवून विश्वासावर बोलतात. त्यांत दरद दिसत नाहीं. तेव्हां मर्जीस विक्षेप वाटे असें उत्तर करितां येत नाहीं. सांप्रत बोलण्यांत कांहीं गुंजाविश ठेवीत नाहीं व मोहराही क्रूरतेचा नाहीं. मुखावर ग्लान असते. केवळ गरीबीनें भाषण होत असतें. परिणाम ईश्वराधीन; परंतु प्रकृत पाहावी तशी ल्याहावी. यांतील तात्पर्य पाहतां, पश्चात्ताप पुरता झालासा वाटतो. गुह्य दोष होता, तो आपले मुखें उच्चारण करून, मातुश्री सांगतील त्याप्रमाणें प्रायश्चित्त करूं असें ह्मणतात. ही गोष्ट पश्चात्तापाची असें दिसतें. सौभाग्यवती आनंदीबाई यांचे बोलण्यांतही असेंच आहे कीं, मातुश्रीजवळ जाऊन ती सांगतील तशी खातरजमा करणें. परंतु श्रीमंतांची बोलण्याची जात निराळी; यांची निराळी. बोलणें ठास पडतें."*

---

* ह्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें श्रीमंत दादासाहेबांनी ता. ६ आगष्ट इ. स. १७८६ रोजी प्रायश्चित्त घेतलें, असें पुढील पत्रावरून दिसून येतें:—

"सेवेसी अप्पाजीराम सहस्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री दादासाहेब यांनीं प्रायश्चित्त घ्यावयाची मसलत ठराविली; तेव्हां तिकडील शिष्ट ब्राह्मण, इकडील ब्राह्मणांचे संमतांत घेऊन, दहा पांच असामी मिळून, उच्चार करावयाचा मसुदा राजश्री बापूंनीं ठरावून केला, त्याप्रमाणें श्रीमंतांस सांगितलें. त्यावर त्यांनीं दिकत घेतली कीं, दोषाहून उच्चार फार! मग राजश्री विसाजीपंत बापूंनीं दहा पांच ब्राह्मणांकडून अनुमोदनें देववून, असाच उच्चार असावा, असें केलें. तेव्हां श्रीमंतही शुद्ध, त्यांनीं मान्य केलें. आणि सर्वांचा संशय दूर करून शुद्ध व्हावें, हें मनांत आणून श्रावण शुद्ध सोमवारीं प्रायश्चित्त घेण्याचा निश्चय केला. तेव्हां इकडील पांच सात आप्त, ब्राह्मण, शिष्ट, व मला व राजश्री कृष्णाजीपंत लिमये यांस, ब्राह्मणांहस्तें राजश्री बापूंनीं पाठविले जे, संकल्प करतील ते वेळेस जवळ उभें राहून पाहावें. त्याप्रमाणें जाऊन पाहिलें. श्रीमंतांनीं प्रसन्नचित्तें गंगातीरीं जाऊन, दहा पांच ब्राह्मणांचा समुदाय समीप मिळवून संकल्प केला. जवळ ब्राह्मण कटोरें, कचेश्वर, कोपरगांव करून मिळाले होते. उच्चार एक वेळ खाशांनीं स्वमुखें स्पष्ट केला, व तीन वेळ अनुवादका-

## लेखांक २.

हें पत्र हरिपंत फडके ह्यांनीं नाना फडणविसांस लिहिलेलें आहे. ह्यामध्यें सुमेरसिंगाचा साथीदार महमद इसूफ ह्यास पकडल्याची व त्याचा कबुली जबाब घेऊन त्यास देहान्त शिक्षा दिल्याची बातमी आहे. पत्रावर कसलीच मिती नाहीं, त्यामुळें पत्राची नक्की तारीख सांगण्यास मार्ग नाहीं ! हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"विज्ञापना:—'महमद इसूफ धरून आणिला आहे. त्यास मायेंत घेऊन एकांतीं पुसावें कीं, श्रीमंत नारायणराव यांचे प्रकर्णांत कोण होते. तें पुसोन गुप्तरूपें लेहून पाठविणें' ह्मणोन आज्ञा. त्यास केसोपंतास आणावयास पाठविलें. ते समयीं त्यास सांगितलें होतें कीं चौकशी करणें. मायेंत घेऊन पुसणें. त्यावरून त्याची गांठ पडतांच मायेंत घेऊन विचारिलें. त्यानेंही मजला मारणार नाहींत या अन्वयें सांगितलें कीं, प्रथम मनसुबा दादासाहेबांस काढून न्यावें अगर नारायणरावसाहेबांस कैद करावें. यास प्रथम शिरोपस्थ शिवाजी कान्हो. वरकडांचीं नांवें मात्र सांगत असत. एक नाना फडणीस, मामा, हरिपंत यांस मात्र ठाऊक नाहीं. वरकडांस ठाऊक होतें. मोरोबादादांचे घरच्या सत्राशें पुतळ्या शिवाजी कान्होनें मजला आणून दिल्या, व सदाशिव रामचंद्र याजकडील दीड हजार मोहोरा (आणून दिल्या.) मालोजी घोरपडे आपले घरीं एकवेळ आले होते. त्यांचें बोलणें दादांस काढून न्यावें इतकेंच. वरकड शिष्ये आपले घरीं येत असत. कुणबिणी येत असत. उभयतांकडील ऐवज आह्मांकडे आला. याप्रमाणें वरकड गारद्यांस पावला आहे. परंतु प्रत्यक्ष भेट झाली नाहीं. बजाबाचें —नांव केसोपंतांनीं बळेंच घेऊन पुसलें. परंतु त्यानें सांगितलें माझी भेट नाहीं. नांवें शिवाजी कान्हो सर्वांचीं घेत होता कीं, सर्व संमतांत आहेत. आबाजी महादेव पुण्यास येऊन मोरोबादादांस भेटून रात्रीचा गेला. हें शिवाजीपंत मजजवळ सांगत होता. याप्रमाणें वर्तमान सांगितलें. श्रीमंतांस मारावें हें मत कोणाचें नवतें. ऐतेवेळेस सुमेरसिंगानें केलें. याप्रमाणें वर्तमान सांगत होता. याहून अधिक खुलासा कांहीं निघाला नाहीं. जाबीतजंग दादांचे सूत्रांत आहेत हें बोलत होता. स्वामींस कळावें ह्मणोन लिहिलें असे. इसुफाचे मतें मजला मारणार नाहींत; मजपासून चाकरी घेतील. परंतु अशा चांडालास ठेवून फल काय ? कुठार कामाचा नाहीं, याजकरितां मारून टाकिलें. घोर वारला. हे विज्ञापना."

---

कढून करविला. पोथी वाचावयास, वे० राजश्री बाळजोशी टोकेकर व राजश्री पांडुरंगशास्त्री वांईकर, व पुणतांबेकर वगैरे शिष्ट ब्राह्मण होते. मसुदा राजश्री बापूंनीं तिकडील शिष्टांस संमतांत घेऊन ठरविला; त्याप्रमाणें उच्चार करावयाचा तो केला. त्याची नक्कल पाठविली आहे. क्षौरही गंगातीरीं करून होम करावयास राहुटींत आले. याप्रमाणें मजकूर पाहिला. व या पूर्वीं दोन दिवस ब्राह्मणभोजन, कांहीं आमान्न व दोन तीन ब्राह्मणांस श्रावणमासची दक्षणा रुपये दोन व शिष्टांस पंचवीस याप्रमाणें दिल्ही. सेवेसी श्रुत होय. छ. ८ रमजान गुरुवार हे विज्ञापना."

निघून खानदेशांत उतरावें. तोंवर गुजराथ प्रांताचा बंदोबस्त करून, जागां जागां गड किल्ले आदि करून, दोन तीन महिन्यांत बंदोबस्त करावा. पुढें स्वारीस निघावें. अशी सावकाऱ्यांत वदंता आहे. राजश्री पाटीलबावांनीं येथें कोणी गृहस्थास चंद्र २२ रविलाखरचें पत्र लिहिलें होतें, तें चंद्र छ १ जमादिलावलीं येथें पावलें. तें मींही पाहिलें त्यांत मजकूर पाटीलबावांनीं लिहिला होता जे, इंग्रजांनीं दोन चार वेळां चढून आह्मांवर आले होते, त्यांस बरे वजेनें हटघून माघारें घातलें. त्यावर एक वेळ छापा घेरून आले. तोही हुशारीनें पिटून माघारें घातलें. व दोन चार वेळां कही मारून आणली, व पेंढारी यांनीं, दोन चार वेळां रस्त त्यांची येत होती, तेही मारून आणिली. भंवताले फौजा पाठवून आटापाणी बंद केला. त्यांचे लष्करांत महागाई फार झाली, यास्तव आले वाटेनें एक मजल माघारे गेले. बडोद्यास जाणार. मग तेथें ठरतात किंवा पुढें भडोच अगर सुरतेजवळ जाऊन छावणी करणार, अशी त्यांच्या लष्करची बोलवा आहे. परंतु इंग्रजांच्या पिच्छास आपली फौज आहे. डांव धांव बनल्यास लुटून घेऊं. याप्रमाणें गृहस्थास लिहिलें होतें, व या गृहस्थांची तेथें गुप्तरूपें बातमी आहे. त्यांनीं यास एकांतीं पत्र लिहिलें होतें, तेंही एकीकडे पाहिल्यांत आलें. त्यांत मज़कूर कीं, सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईनीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांशीं भाषण केलें जे, 'या उभयतां सरदारांशीं डोईफोड केल्यानें येथें काय साध्य? इंग्रजांचा खर्च वाढतो. हे गोष्ट कार्याची नाहीं. यास्तव गुजराथ प्रांत जो आपले हातीं आला आहे, यास अमदाबाद व डभई व नडियाद, व पेटलाद वगैरे मातबर स्थळें आहेत त्यांचा बंदोबस्त करून, गुजराथ प्रांत उजाड करावा, आणि या पोक्त सरंजामानिशीं पुण्याकडेस चाल करावी. तिकडील भय तरी आपणास काय आहे? तेथें मातबर फौज म्हटले तर हे दोघे सरदार होते. तिकडून बेजार होऊन पांच सहा वर्षां इकडे आले आहेत. त्यास हे उभयतां एकाएकीं तिकडे जात नाहींत.' याखेरीज तिकडे मातबर भरणेदार फौजेचा सरदार कोण? वरकड कर्ते पुरुष दोघे खांसा. त्यांनीं बळ बांधून उभे राहिले हें कळतच आहे. आपणांस तरी श्रम उगाच काय आहे? उगेच दिवस गमावूं नयेत. खानदेशांतून नीट आपण चालून घ्यावें, आणि मुंबईवाल्यास लिहून पाठवून, कोंकणप्रांत हस्तगत करून, बोरघांटीं दोन चार पलटणें पाठवून, घांट बंद करावा. तिकडे मानाजी फांकडे यांस व येसाजी शिंद्यांस पत्रें लिहावीं. ते तिकडून दाटी करितील. कोण कोणीकडेस जीव घालतील? तेथें ऐवज काय आहे?' दादासाहेब बोलले जे, 'गडकिल्ले धरतील.' त्यास बाई बोलली जे, 'तोतयानें गडकिल्ले घेतले. आपण तों धनी

आहेत. असेंही करितां एखादा गडकिल्ला धरून बसतील. सारा प्रांत व कोंकण हस्तगत झालीयावर तों गडकिल्ला हस्तगत करणें अशक्य काय आहे?' याप्रमाणें उभयतांचीं भाषणें झालीं. सुरतवाले इंग्रजांस दादासाहेबांनीं बोलावून आणून ही मसलत त्यांस सांगितली. त्यांनींही मान्य करून, तेच समयीं मुंबईवाल्यास कोंकणच्या व बोरघांटच्या बंदोबस्ताविषयीं पत्रें लिहिलीं, व अमृतरायाच्या सैन्यांतही पत्रें लिहिलीं. त्यावरून इंग्रज माघारी फिरले ह्मणून कोणी गृहस्थांचें कुपिया लिहिलें असें आलें. परंतु यांत सत्य कोणतें असेल तें असो. दुसरें वर्तमान कीं, चंद्रराव पवारांचे गांव कांहीं खानदेशांत आहेत. त्यास सौभाग्यवती रखमाबाई होळकर सुलतानपुरीं आहेत. त्यांनीं फत्तेपूर चंद्रराव पवारांचें, त्यासी मोर्चे लावून कांहीं तोफा गिफा आणिल्या होत्या. तें वर्तमान ऐकून चंद्रराव पवार, श्रीमंत दादासाहेबांची आज्ञा घेऊन, खानदेश प्रांताच्या बंदोबस्तास येणार. हें वर्तमान ऐकून अहल्याबाईनीं रखमाबाईस सांगून पाठवून तोफा माघारी फत्तेपुरास पाठविल्या. आणिक वर्तमानः—राजश्री चिंतो विठ्ठल व त्रिंबक भालेराव व आणिक एक गृहस्थ ऐसे फितुरांत होते. उभयतां सरदारांवर छापा यांनींच आणविला. हें वर्तमान त्यांचे अंगीं लावून चौघांसही पाटीलबावांनीं कैद करून, तिघेजण नवलाईच्या किल्यावर छ २९ रविलाखरीं दोनशें स्वार समागमें देऊन पाठविले. उज्जनीस त्यांच्या घरीं चौकी बसविली आहे. सदाशिव रामचंद्र आपल्या चिरंजिवाचें लग्न करायास उज्जनीस आले आहेत. गुलजारखानाचा मजकूरः—अद्याप भिल्लाचे लुटीवरच आहे. प्रस्तुत त्यानें मजला व अहल्याबाईस पत्रें लिहिलीं होतीं जे, श्रीमंतांस विनंती करून आमची बापरोटी यथाविभागें श्रीमंतांनीं कृपा करून विभाग करून द्यावें, आणि मजला चाकरी सांगावी. त्यास मी अहल्याबाईस बोललों कीं, आपण श्रीमंतांस लिहून गुलजारखानाचा हरएक बंदोबस्त करून, त्यास चाकरीस लावावें. खूळ तोडावें. त्यास बाई बोलली जे, तुह्मी आधीं लिहून पाठवा. तेथील मर्जी कशी ती आणवा. मग इकडे गुलजारखानासही लिहूं व श्रीमंतांसही लिहूं. मीं उत्तर केलें जे, मी चाकर, तुह्मी सरदार. आमची भीड किती? परंतु आज्ञा आली तर गुलजारखानास जसी आज्ञा येईल तसें लिहीन. धनी कृपा करितील तर गुलजारखानाचें खूळ तुटेल. शोध करितां, लोक तों लमाण गुलजारखानानें लुटला नाहीं. भिल्लांनीं लुटला असें आहे. स्वामींची मर्जी. परंतु हें खूळ तुटलें तर बरें आहे. अहल्याबाईच्या नातवाचें लग्न अक्षततृतियेचे दिवशीं झालें. शरीरसंबंध बाईचे भाऊ शिंदे, त्यांच्या लेकाच्या लेकीची लेक केली आहे. बाईस चोळीपातळ व

फणशाकडे चार सनगें व शिंद्याकडे चार सनगें असें सर्वत्रां मिळालें. त्याप्रमाणें मींही अहेर केला. येथून अहल्याबाई वरचेवर तुकोजी होळकरांस पत्रें येथून लिहितात जे, लढाईंत काम पडलें आहे; त्यास कामाकाजास कमी करूं नका. वरचेवर ताकीद लिहीत असतात. प्रस्तुत ऐकिल्यांत आलें आहे कीं, पाटीलबावांकडील कारकून इंग्रजांकडे बोलावयास गेले होते व दादासाहेबांकडेही कांहीं बोलीचालीचें सूत्र लागलें होतें, तें तुकोजीबावांस कळलें. त्यावरून तुकोजी होळकर व नारो गणेश उभयतांनीं पाटीलबावांकडील ऐकिलें वर्तमान तें, अहल्याबाईस व पुण्यास श्रीमंतांस पत्रें लिहिलीं होतीं. तें जासूद घेऊन येतांना पाटीलबावांचे चौकीवर पत्रें धरलीं गेलीं. पाटीलबावांनीं वाचून पाहून, नारो गणेश यांस बोलावून आणून रागें भरले. त्यामुळें उभयतांत चित्तशुद्धता नाहीं. असें वर्तमान ऐकिलें. प्रस्तुत चैत्र वद्य १४ ची इंग्रजांची यांची लढाई झाली. त्या लढाईत पाटीलबावांचा सरंजाम मागेंच होता. गांठ होळकराचेच फौजेशीं पडली. खांसा तुकोजी होळकर फौजेंत होते. लढाई चांगली झाली. चार पलटणें त्यांचीं आलीं होतीं. लढाई बरीच झाली. दहा बारा मनुष्यें होळकराकडील चांगलीं जाया झालीं. शरीफखान पाग्या पंचवीस लोकांनिशीं सरमिसळ झाला. कांहीं लोक पडले. कांहीं निघाले. शरीफखान एकलाच चारी पलटणें पार होऊन गेला. याप्रमाणें लढाई झाली. सहा घटकांनीं पाटीलबावांकडील तोफा व सरंजाम आला. ही लढाई झालीयाचीं पत्रें चंद्र १० जमादिलावलीं येथें आलीं. इंग्रजांच्या पिच्छावर राजश्री विसाजीपंत सरकारचे व पाराजीपंत व भागीरथ शिंदे हे पांच हजार फौजसुद्धां आहेत. उभयतां सरदार पायागडाजवळच आहेत. परंतु इंग्रज बडोद्याहून पुढें चालले ह्मणजे उभयतां सरदार फौजसुद्धां त्यांचे मागें जातील. एक लढाई उत्तम प्रकारें इंग्रजांशीं करावी, मग मागें छावणीस फिरावें असें सरदारांचें मानस आहे. •शिंद्याकडील वकिलांची जबानी, अहल्याबाईनीं चंद्र ११ रोजीं रात्रीं वर्तमान सांगितलें जे, 'लढाई एक झाली. त्यांत पाटीलबावांकडील फौज मागेंच होती. तुकोजी होळकरच पुढें फौजसुद्धां होते. लढाई चांगली झाली. दहा पंधरा माणसें चांगलींच होळकराकडील पडलीं. लढाई अखेर झाल्यावर पाटीलबावांकडील सरंजाम येऊन पोंहचला. आह्मांकडील लोकांचीं कामें यथास्थित होतात.' परंतु उजेडास आणणार कोणी नाहीं. न हो त्याचें उजेडास येतें. असो. दिवसच असे आहेत.' बाईनीं कांहीं खर्चाची तजवीज करून तुकोजीबावांकडेस पाठविली. गुलजारखानाचा मजकूरही बाई बोलली जे, गुलजारखान कोणास यश देयाचा माणूस नाहीं. तत्रापि त्यानें

तुह्मांस व आह्मांस पत्र लिहिलें आहे तर तुह्मी त्यास लिहा कीं, तूं येथें ये. मग येथून श्रीमंतांस लिहून तुझा बंदोबस्त होणें तो होईल; असें लिहा ह्मणून मजला सांगितलें. मीं उत्तर केलें जे, तुह्मी सरदार, मातबरी तुमची असे. तुमचें पत्र गेल्यानें हरएकविषयीं त्यास इतबार पडून तो येईल. श्रीमंत त्याजमागें आहेत. त्यापक्षीं माझें पत्र त्यास पथ्य कसें पडेल? तुह्मीं असें पत्र लिहाल तर तुमच्या पत्रावर दाखला घालून मी उत्तर लिहीन. त्यास बाईनीं मान्य केलें आहे.

चंद्र १२ रोजचें वर्तमान सावकाऱ्यांतील कीं, इंग्रज बडोद्याहून पांच कोस पुढें गेले. सुरतेचा रोंख असें बोलले. बाईही रात्रीं सांगत होती जे, इंग्रज छावणीस सुरत अगर भडोजेस जाणार. फत्तेसिंग गायकवाडाचा मजकूर बाई सांगत होती जे, पाटीलबावांनीं गायकवाडाकडे सूत्र लाविलें होतें जे, तुह्मीं निघून येणें. त्यास त्यांनीं एकांतीं कोणी भल्या माणसा हातीं सांगून पाठविलें जे, पहिलें श्रीमंतांस व तुह्मांस जितकें लिहिणें तितकें लिहून चुकलों. परंतु कोणाकडूनही कांहीं न झालें. आतां मी यांचे अटकेंत आहें. यांस कांहीं सुवारा कळला, तर तूर्तच मुलांमाणसांसुद्धां एखादे जागां अटकावून टाकतील. यास्तव तुह्मी आह्मांशीं कांहीं बोलूं नका. जसें होतां होईल तसें पाहतच आहों. तुह्मीं आमचें नांव न घेणें. असें यांस सांगून पाठविलें. शिंद्यांकडील वकील आले. ते बोलत होते जें, पाटीलबावांनीं मसलत केली आहे कीं, बडोद्याहून इंग्रज पुढें गेले ह्मणजे एक लढाई मातबर करावी; आणि डाव सांपडला तर फत्तेसिंग गायकवाडासही घेऊन यावें. तदोत्तर पाटीलबावा छावणीस बऱ्हाण-पुरच्या मैदानांत यावें ह्मणजे पुणेंजवळ, जाबसालास येण्याजाण्यास जवळ पडेल, यास्तव कोंडाईबारीजवळ उभयतां मिळून कांहीं फौज ठेऊन आपण इकडे छावणीस यावें असें आहे ह्मणून बोलत होते. पहावें काय ठरेल तें.

राजश्री खंडेराव त्रिंबक चंद्र ८ मिनहूस मंडळेश्वरास आले. चंद्र १० रोजीं येथें बाईस भेटायास आले होते. चार घटकांपर्यंत बाईचें त्यांचें एकांतीं बोलणें झालें. संध्याकाळीं मंडळेश्वरास गेले. मजलाही दरबारांतच भेटले होते. ते बोलले जे पुण्यास जातों. पौर्णिमेपर्यंत येथें आहों. मागाहून दादो शंकर येणार आहेत. ते आले ह्मणजे जाऊं. चंद्र १३ रोजीं खंडेराव निरोपास येथें आले होते. त्यास बाईनीं ब्राह्मण बोलावून मुहूर्त छ १९ जमादिलावलचा करार केला आहे. त्या मुहूर्तें निघून पुण्यास येणार. यासमागमें पांच साडेपांचशें लोक, घोडें मनुष्य चांगलें आहे. लवकरच येऊन पोंहचतील.

हिंदुस्थानाकडील वर्तमानः—जयनगरवाल्याच्या मुलखांत पादशाहीची फौज नजीबखान घेऊन आला आहे. तीस हजार फौज आहे. दहा परगणे व पांच गड किल्ले जयनगरवाल्याचे घेतले मुलूख पुढें सर करीतच आहे. जयपूरवाल्या राजास देवी निघाल्या होत्या. शेवटलीच खबर उडाली होती. परंतु आतां आराम झाला आहे. राजाही अठरा वीस वर्षांचा आहे. हिंदुस्थानांतही गडबड फार आहे. शीकही उठले आहेत. खंडेराव त्रिंबक तिकडे येतच आहेत. राजश्री शिवाजी विठ्ठल यांजवळही सरंजाम चांगला आहे. मर्जीस आलें तर त्यांसही बोलावूं पाठवावें. अहिल्याबाई दोन चार वेळां बोलली जे, श्रीमंत फौजेची उपेक्षा करितात; परंतु गोष्ट कार्याची नाहीं. फौज चांगली पंचवीस तीस हजार जवळ असावी. हे चहूं-कडून गडबड उडाली आहे. अशा समयीं आपण आपले फौजेविशीं बळकट असावें व कोकणांत कांहीं इंग्रजांनीं गडबड केली आहे ह्मणून मजला पुसत होती. मीं उत्तर केलें जे, आह्मांकडे हें वर्तमान नाहीं. यांची कासीदजोडी पत्रें घेऊन सरकारांत आली आहे ती उत्तर देऊन इकडे यावी. याप्रमाणें वर्तमान सेवेसी श्रुत होय, हे विज्ञप्ती.

---

**लेखांक ८.** ता. ५ जून इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शु॥ ३ शके १७०२.

सेवसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १ जमादिलाखरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनें-करून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व श्रीमंत राजश्री दादासाहेबां-कडील व उभयतां सरदारांकडील व इंग्रजांकडील वर्तमान, येथें ऐकिल्याप्रमाणें पेशजीं विनंतीपत्रीं लिहून, सेवेसी कासीदजोडीबरोबर पाठविलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान श्रीमंत दादासाहेब सुरतेसच आहेत व इंग्रज प्रस्तुत रेवातीरीं भडोच-जवळ रेवा दक्षिणतीरीं आहेत, व उभयतां सरदार वाघोडें ह्मणून डभईजवळ गांव आहे तेथें पाण्याचा ओढा आहे, त्या पाण्यावर आहेत. सरदारांच्या सैन्यांत धान्य तों स्वस्त आहे; परंतु चारापाण्याची विपत्य फार आहे. फत्तेसिंग गाय-कवाड इंग्रजांबरोबरच आहेत. चंद्र १७ जमादिलावलीं गोहदप्रांताकडून एक ब्राह्मण आला. त्यानें वर्तमान सांगितलें जे, खंडेराव हरी शिंद्याकडील आपले पथकानिशीं पुढें गोहजवाल्यापासून बारा कोसांवर जाऊन उतरले. गोहजवा-ल्यास बातमी कळली. त्यांनीं रातोरात जाऊन खंडेराव हरीवर ताव केला. त्यास विसा रावतांनिशीं खंडेराव हरी निघून गेले. वरकड गोहजवाला घेऊन गेला. ह्मणून त्या ब्राह्मणानें सांगितलें. बळवंतराव गोहजवाल्याकडे पाडाव गेले ह्मणून

वर्तमान, परंतु कोणते बळवंतराव हें न कळे. हे वर्तमान ओढेकराचे फौजेंत ऐकिलें होतें. सत्य, मिथ्या देव जाणे. राजश्री गणपतराव शिवाजी हे पंधरा सोळाशें स्वारांनिशीं पलीकडेच आहेत. त्यांजवर गोहजवीला जाऊं शकत नाहीं. तें सामीन चांगलें आहे. आंबोजी इंगळेही मागेंच आहेत. याप्रमाणें हें ऐकिलें वर्तमान. राजश्री खंडेराव त्रिंबक सेवेसी आलेच आहेत. येथील वर्तमान होळकरांकडील सरंजामी सरदार बुळे व वाघ वगैरे पागा. त्यास बुळे व वाघ आपले पथकासुद्धां येथें मातुश्रीबाईजवळीच होते. त्यास गोविंदराव बुळे देवलोक झाले. स्त्रियांसहवर्तमान गेले. त्यांचे पोटीं पुत्र नाहीं. यास्तव त्या बुळ्यांच्या सरंजामावर राजश्री तुकोजी होळकर यांनीं जप्ती पाठविली आहे. त्या महालची रसद येथें बाईनीं घेऊन शिंद्यांच्या विसा लक्षांच्या भरण्यांत ऐवज दिला आहे. त्यांनीं तिकडून पाटीलबावांच्या संमतें जप्ती पाठविली आहे. यांनींही इकडून लोक तयार केले आहेत. पाटीलबावांच्या कारकुनाकडून पाटीलबावांसही पत्रें लिहविलीं आहेत. पहावें कसें होईल. चंद्र १७ जमादिलावलचे पाटीलबावांकडून व तुकोजीबावांकडून पत्रें बाईस आलीं. वाघोड्याहून कूच होऊन अलिकडे पाण्याचे सोईनें पायागडच्या रोखें ते मुक्कामींहून पत्रें रवाना केलीं. तीं चंद्र २७ मिनहूस दोंप्रहरां येथें दाखल झालीं, त्यांत तुकोजीबावांच्या पत्रांत तों खायाखर्चाची गिराणी, ह्राच मजकूर होता. पाटीलबावांनीं लिहिलें होतें जे, इंग्रज रेवातीरीं बावापिराच्या घांटावर जमून आहेत. त्यांचें सैन्य, खाडतुर पार उतरलें. सुरतेस जाणार. ते सडे अलीकडे आहेत. ते फार उतरून सुरतेकडे गेले म्हणजे आम्हीही छावणीची तजवीज कोठें करावी हा विचार ठरवून सेवेसी लिहून पाठवूं, व फत्तेसिंग गायकवाडांचा मजकूर लिहिला होता जे, कागदपत्रीं त्यांचा शिलशिला होता जे, सह्यामामलयाचा विचार यासीं करून भेटीस येतों. ते अद्याप आले नाहींत. त्यांचा विचार केला पाहिजे. याप्रमाणें पत्रीं मजकूर होता. लष्करांत महागाई चौ सहा शेरांची धारण आहे. चारा नाहीं. झाडपाल्यावर घोडीं आहेत. चंद्र ३० जमादिलावलीं सुरतेचें दहा दिवसांचें व उभय सैन्यांचें आठी दिवसांचें वर्तमान आलें. त्यास सुरतेंत श्रीमंत दादासाहेब शरीरेंकडून फार श्रमांत आहेत. शिष्यं शिष्यांनीं धरून उभें करावें, तेव्हां सूर्यअर्घ्यें देऊन एक घटका उभे राहतात. तदोत्तर बसणें अथवा शयन. बारा घटका रात्रीं, तीन पैसेभार राळ्याचे तांदूळ व पैसाभार मूग ऐसे एकत्र खिचडी करून भक्षितात. आठी दहा दिवसां सौभाग्यवती आनंदीबाईचें दर्शन. एक अर्ध घटका येऊन जवळ बसली तर

त्यांसीं भाषण करीत नाहींत. बाजीरायास बाईकडे फारसें जाऊं देत नाहींत. वारंवार आपले मंडळीचें पुण्याचें स्मरण करितात. खर्चाचीही गिराणी फार आहे. अडीचा महिन्यांनीं पंचवीस हजार रुपये खर्चास दिले. सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई ही शरीरेंकडून कृश झाली आहेत. दादासाहेबांची कनिष्ठ स्त्री देवी निघून गत झाली. सुरतेभोंवताले राजश्री गणेशपंत बेहरे यांनीं फार धूम केली आहे. सुरत व आमदाबाद व भडोच व डभई व बडोदें आणीक दोन मातबर गांव व सोनगड इतके स्थळीं मात्र दिवा लागतो. वरकड मुलूख बेचिराख झाला आहे. सुरतेंत धारण ज्वारी चवदा शेर, गहूं आठ शेर, तांदूळ सहा शेर, तूप दोन शेर, चणे तों मिळत नाहींत, याप्रमाणें सुरतेचें वर्तमान. सैन्याचें वर्तमानः—इंग्रज बावापिराच्या घांटावर जमावसुद्धां आहेत. दोन पलटणें पार उतरून खाडतुर उतरीत होते. इतक्यांत गणेशपंत बेहरे स्वारीसुद्धां येऊन पलटणावर पडले. खाडतुर उतरलें होतें तें लुटलें. पलटणें संभाळून रेवा उतरून या जमावांत मिळालीं. उभयतां सरदार सडे फौजसुद्धां बावापिराच्या घांटावर इंग्रजांस घेरून आहेत. कोणी बाहेर निघालें कीं यांनीं ढचललें, याप्रमाणें घेरून आहेत. एक मातबर लढाई करावी असें उभयतां सरदारांच्या चित्तांत आहे. इंग्रजांच्या सैन्यांत तीन चार शेरांची धारण आहे. कोणीकडे हालूं पावत नाहीं. यांसी कांहीं जाबसालही लाविला होता जे, आह्मी सुरतेस छावणीस जातों. तुह्मी छावणीस जा. बादबरसात जाबसाल अगर लढाई जें होणें तें होईल. असे जाबसाल यांनींही ऐकून घेऊन, आपला डाव गांठून घेऊन उभे राहिले. आतां कांहीं जाबसाल नाहीं. उभयतां सरदारांच्या लष्करांत धान्य आठ शेर आहे. परंतु चारापाण्याचें फार संकट आहे. उभयतांचें बहीरबुणगें डभईच्या व बडोद्याच्या मध्यें वाघोड्यावर आहे. याप्रमाणें गुर्जर ब्राह्मण, येथील बाईचे येथील चाकर, तो सुरतेहून व लष्करांतून आला; त्यानें वर्तमान सांगितलें याप्रमाणें हें ऐकिलें वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. पहिले जमादिलाखरपर्यंत वर्तमान मागील ऐकिलें, तें सेवेसी श्रुत होय, हे विज्ञप्ति.

---

पै॥ छ १९ जाखर. **लेखांक ९.** ता. ११ जून इ. स. १७८०.

इहिदे समानीन मुक्काम किकवी. **श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शु॥ ९ शके १७०२.

सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ७ जमादिलाखर परीयंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. उभयतां सरदारांच्या लष्करांतून पायागडाअलीकडे विसा कोसांवर

बोरीनजीक दाहा कोस दाहोद, ते मुक्कामींहून वानवळे साहुकाराचें पत्र, त्याच्या गुमास्त्यास येथें साडे ती दिवसां छ २ मिनहूस आलें. त्या पत्रांत वर्तमान कीं, इंग्रज सरंजामसुद्धां सुरतेस गेले. छावणी तेथें करणार. मग उभयतां सरदारांनीं विचार करून, राजश्री गोविंदराव गाइकवाड यांस सेनाखासखेलीचीं वस्त्रें व हत्ती देऊन, उभयतां मिळून दहा हजार फौज गोविंदरायाचे तैनातीस देऊन, पायागडाजवळ गोविंदराव गाइकवाडास ठेऊन, उभयतां सरदार फिरले. ते दाहोदास आले. पुढें उज्जनीस शिंदे लवकरीच दाखल होणार व होळकर इंदुरीं दाखल होणार. याप्रमाणें त्या पत्रीं वृर्तमान होतें. त्याजवर दुसरे तिसरे दिवशीं वर्तमान साहुकाऱ्यांतही आलें जे, उभयतां सरदार दाहोदेस आले. उज्जन इंदुरास येणार. छ ५ मिनहूस शिंद्याकडील कारकुनांचें येथं वर्तमान आलें जे, उभयतां सरदार दाहोदाहून कूच करून झाब्यास आले. झाबे परगणा येथून चाळीस कोस आहे. तेथें मवास आहेत. त्यांजवळून कांहीं खंडणी घेऊन, दरमजल छावणीस येणार. गोविंदराव गाइकवाडास दोन लक्ष रुपये चिठ्या चपाट्या करून दिल्या. चार हजार फौज त्याजवळ ठेऊन उभयतां छावणीस आले. गुजराथेंत जसें काम पडेल तसें उभयतां गोविंदराव गाइकवाडाकडे फौजेचा भरणा करणार. याप्रमाणें वर्तमान आलें. हिंदुस्थानाकडील वर्तमानः—जैपूर प्रांतीं नजीबखान तीस हजार फौजसुद्धां आला आहे. दोन हिस्से जैपूर प्रांतचा मुलूख यांनीं सर केला. होळकराकडील महाल रामपुरा व टोंक तोडा व फूट जहागिरेचे गांव अहिल्याबाईचे आहेत. त्यांचीं लिहिलीं येथें बाईकडे आलीं कीं, कांहीं कुमकेस फौज पाठवितां तरं परगणे वांचतात. नाहींतर नजीबखान येथें आह्मांस राहूं देत नाहीं. जैपुरवालाही कांहीं चळवळ करीत नाहीं. याप्रमाणें तिकडील वर्तमान. गोहदप्रांतचें वर्तमान आलें जे, पहिलें खंडेराव हरीवर गोहदवाल्यानें वरतावा केला. ते खंडेराव हरी विसा रावतांनशीं निघून गेले, ते गणपतराव शिवाजी व आंबोजी इंगळे वीस कोस मागें होते, त्यांस जाऊन मिळाले. गोहदवाला शिमथरास जाऊन, शिमथरवाला गुजर व गोहदवाला मिळून जमून होते. त्याजवर गणपतराव शिवाजी व खंडेराव हरी व आंबोजी इंगळे ऐसे यांजवर येत होते. सिमथराहून बारा कोसांवर आले. हे बातमी गोहदवाल्यास आली. गोहदवाल्यानें व गुजरानें रातोरात धांवणी करून त्या त्रिवर्गांवर पहाटे पहाटे जाऊन पडले. ते तिघेही कांहीं सांभाळून कांहीं तसे निघून गेले. पलीकडे विसां कोसांवर जमले आहेत ह्मणून ऐकिलें. नजीबखान जैपूरवाल्याजवळ रणथंबूरचा

किल्ला मागतात. रणथंबुराजवळ पांच हजार फौज ठेऊन नजीबखान अलीकडे आला आहे. याप्रमाणें बाईकडील कमाविसदार ते प्रांतचे, त्यांनीं वर्तमान लिहिलें होतें. छ ५ मिनहूस येथें वर्तमान आलें जे, उभयतां सरदार थांदले परगणे झाबें येथें आले. दो ती दिवसांत उज्जन इंदुरीं उभयतां दाखल होतील. याप्रमाणें वर्तमान आलें तें सेवेसी श्रुत होय. दाखल झाल्याचें वर्तमान आलीयावर मागाहून लिहीन. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १०.** ता. २१ जून इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ व॥ ४ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंती. सेवकाचें वर्तमान तागाईत छ १७ जमादिलाखरपरियंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व उभयतां सरदारांकडील, इंग्रजांकडील व सुरतेचें येथें कळल्याप्रमाणें वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून श्रीमंतांकडेस विनंतीपत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः—इंग्रज सुरतेस छांवणीस गेले. तदोत्तर उभयतां सरदारही दरमजल ये प्रांतीं इंदूर उज्जनीस छावण्यास येतात. प्रस्तुत बदनावरावर मुक्काम आहेत. सबब कीं राजश्री गोविंदराव गाइकवाड यांस पायागडाजवळ इंग्रजांच्या शहावर पांच सात हजार फौजसुद्धां ठेवायाचा निश्चय. त्यास गोविंदरायास दाहोदचे मुक्कामींहून त्यांचे सरंजामानिशीं माघारा त्यांस रवाना केला आहे. उभयतां सरदार मिळून पांच सात हजार फौज; यांसी खर्चास दोघांनीं दोन लक्ष रुपये तजवीज करून गाइकवाडाकडेस पाठवावी. या ऐवजाच्या व फौजेचे योजनेकरितां तेथें मुक्काम झाले आहेत. फिरून माघारा लोक जायासाठीं तलबतनख्याचे राडे पडले आहेत. बापोजी होळकर रुसून शिंद्याकडे गेला होता, तो तुकोजीबावांनीं समजाऊन आणिला. पेशजीं त्या लोकांनीं तलब व उभयतां सरदारांच्या समागमीं फौजेचे देण्याचे जाबसाल पडले आहेत, व पाटीलबावांनीं पांचसात पागा व हजार पांचशें फौज ऐसें हिंदुस्थानांत जैनगर प्रांतीं कांहीं पाठवावें हेही योजना करितात. छावणीस आलियावर जागांजागां लोक तारवतार होतील; यास्तव तेथें राहून, योजना चहूंकडील करून, जिकडील तिकडे रवानग्या करून, निश्चितीनें छावणीस यावें, असें वर्तमान ऐकिल्यांत आलें. येथील वर्तमान पाहतां तुकोजी होळकर बाईस पत्र लिहीत नाहींत. बाईनीं कदाचित् मामलतसंबंधीं अगर कितीक बोभाट लोकांचे येतात, येविशीं पत्र लिहिलें, तर त्याचीं उत्तरें खसखसीत लिहिलीं आहेत, त्यावरून यास

वैषम्य जातें. यांणीं एकादें काम न करावें असें लिहिलें, तर अवश्यमेव त्यांनीं करावें, असा प्रकार, येथील झाला आहे. राजश्री नारो गणेश यांसी बाईसी केवळच चित्तशुद्ध नाहीं. यास्तव नारो गणेशांनीं खंडो बाबुराव यांस कांहीं भानगडी सांगितली आहे. बाईची व आपली चित्तशुद्धता व्हावी असे जाबसाल खंडो बाबुराव कांहींसे करितात. बाई चित्तावर घेत नाहींत. असें वायुस्वरूपी वर्तमान ऐकिल्यांत आलें आहे. सत्य मिथ्या देव जाणे. हिंदुस्थानाकडील वर्तमानः—जैनगरवाल्यानें नजीबखान पातशाहाकडील फौजसुद्धां ये प्रांतीं आले आहेत. त्यांसीं मुलाजमत करून, जैनगरवाल्यांनीं त्यासीं एखलास करून, त्यांसी बोलले आहेत कीं, मराठ्यांनीं कांहीं आमचा मुलूख दाबला आहे, तो आमचा आम्ही घेतों. त्यांनीं घ्या ह्मणून सांगितलें. त्यावरून जैनगरवाल्यांनीं आपली फौज पाठवून टोंक व रामपुरा व खासगी फुटगांव कांहीं आहेत, तेथें गडबड केली आहे. फुटकर खेडीं तों त्यांनीं घेतलीं. टोंक व रामपुरा भांडत आहेत. परंतु प्रस्तुत हिंदुस्थानांत फौज आपली नाहीं. सांप्रत जलदीनें जाऊन पोंहचतही नाहीं. त्यापक्षीं तेही ठाणीं घेतीलसें दिसतें. येथून बाईनीं जैनगरवाल्यास पत्रें लिहिलीं आहेत. छ १२ मिनहूस रवाना केलीं. या पत्रांवर कांहीं स्थिरता झाली तर झाली, नाहींतर घेतील. राजश्री गोविंद कृष्ण यांस पाटीलबावांनीं उज्जनीस बोलाविलें आहे. यास्तव गोविंद कृष्ण, बाईचा निरोप घेऊन, छ. १४ रोज रविवारीं, स्वार होऊन उज्जनीस जाणार. यास्तव गोविंद कृष्ण यांसीं बाईनीं चार घटका एकांत फार केला. येथें आवाया अंतर्बाह्य आहेत कीं, पाटीलबावांच्या सल्ल्यानें तुकोजी होळकर इंदुरास आल्यावर लोकांचे समजाविसीस कांहीं मागणार. आधीं तों सुलतानजी लांबहाते मातबर मनुष्य. उभयपक्षीं आप्त. त्यास बाईकडे पाठवून, विचाराच्या वाटेनें बाईस चार गोष्टी सामोपचारें सांगून, अर्थ साध्य होय तो अर्थ करावा. ज्यापक्षीं बाई ऐकेनातच, त्यापक्षीं जेणेंकरून बाईजवळील जडपेड आपले हातीं लागे, ते समयोचित प्रसंग करावे, अशा आवाया येथें कितीक प्रकारें ऐकिल्यांत येतात. ते अर्थ बाई गोविंद कृष्ण यांसीं एकांतीं बोलली जे, "मजजवळ तों पैसा नाहीं. सारे दौलतीची आकमशक्त यांची यांणीं आपली करून घेतली आहे. मागें माझे विद्यमानें दौलतीचा महाल-मुलकी कारभार मीं केला आहे. त्याचे हिशेबकितेब सर्व कारकुनाजवळ आहेत. दिवाणगिरीस मजजवळ नारो गणेश यांचे भाचे मुकुंदराव आहेत. आपला हिशेब पहावा. यांचे दौलतीच्या जमेंतील एक कवडी मजकडे हिशेबीं लागली, तर एक कवडीच्या पांच कवड्या देईन. मीं आपले पोटें अन्न भक्षितें

तें देखील यांचें नाहीं. असें असतां, यांणीं आह्मांभवतें विपर्यासकर्मच आरंभिलें, तर दारुगोळा मजजवळही सिद्धच आहे. जिवाचाच संकल्प आहे कीं, रेवातीरीं आपले स्नानसंध्या देवदेव करून, आयुष्याचे दिवस सत्कालक्षेपेंकरून पूर्ण करावे, अशा अर्थी आह्मी आपले दिवस घालवितों. त्यास विपर्यास झाल्यास प्राणसंकल्पच आहे. याप्रमाणें आमचा निश्चय ! आपण ज्यास सर्फराज केलें, ते आपणासच प्रतिबद्ध झाल्यास उपाय हाच ! केवळ हात जोडून माझें घ्या नी मजला रक्षा, असें ह्मणणार नाहीं. वडिलांचे पुण्यें आणि ईश्वर यांतच जें घडवील तें घडो. याप्रमाणेंच पाटीलबावांसही सांगा." अशीं एकांतीं उभयतांचीं भाषणें झालीं. गोविंद कृष्णही बोलले जे, असें कशास ते करतील ? पायरीस पाय लावणार नाहींत. तत्रापि पाटीलबावांसही मी युक्तीच्या वाटेनें सांगतों. बाई बोलली जे, पाटीलबावांकडील वकील शिवाजी नारायण येथें आहेत. मीं येथें ऐकिलें कीं, पाटीलबावांच्याच आश्रयानें हे कितीक विपरीत गोष्टी आह्मांसीं करणार. तीं भाषणें शिवाजी नारायणाचीं आमचीं झालीं. त्यांणीं आपले वकिली रीतीनें त्यांस लिहिलें असेल. त्यावरून महादजी शिंद्यांनीं आह्मांस पांच सात पत्रें फार निखालसतेचीं पाठविलीं आहेत; व त्यासही लिहिलें आहे कीं, माझा किमपिही बाईशीं दुसरा अर्थ नाहीं. त्यांच्या घरांतच काय असेल.तें त्यांणीं आपलें पाहून घ्यावें. आह्मांकडे दोष कांहीं नाहीं. असें लिहीत गेले आहेत. परंतु समयास त्यांचा मिजाज कायम राहील न राहिल असा भरंवसा नाहीं, असें बाई बोलली. गोविंद कृष्ण यांणींही फार खातरजमा केली." * * * * * * * * * * [ फाटलें आहे ]. याप्रमाणें एकांतीं भाषणें झालीं. गोविंद कृष्ण यांचें मानस फार आहे कीं, शिंद्यांकडील हकनाहक पेंच. मी चाकर श्रीमंतांचा. या उभयतां सरदारांच्या तैनातीस मात्र कैलासवासी श्रीमंतांनीं मजला दिलें. त्यावर श्रीमंतांची चाकरी करून यांचींही घरें भरलीं. परंतु हकनाहक महादजीबावांनीं रुष्टता धरली आहे. कसाही पाटीलबावांकडील पेंच वारून एकदां श्रीमंतांपाशीं जावें असें मानस आहे. परंतु तेथेंही कोणी आलीकडे ये ह्मणायास नाहीं; यास्तव हकनाहक मध्यें मी मारला जातों. असें बहुत प्रकारें त्यांनींही आपलें दुःख सांगितलें. उभयतां सरदार अद्याप बदनावराअलीकडे चमेलनदीवर आहेत. गोविंदराव गाइकवाडास बिदा केलें. त्याजबरोबर पहिले दोन हजार स्वार तैनातीस होते, ते व आतां होळकराकडील व ( फाटलें आहे. ) पथक व शिंद्याकडील हजार स्वार एकूण चार हजार व गाईकवाडास हजार स्वार सांगितलें आहेत. एकूण पांच हजार स्वार व हजार पायदळ ऐसें देऊन,

एक हत्ती देऊन पायागडाजवळ राहायाचें सांगितलें. ते गेले. व राजश्री विसाजी आपाजी यांसही धारेजवळून बिदा केलें. परंतु कोणत्या घाटें उतरायास गेले हें न कळे. प्रस्तुत उभयतां सरदारांचा चमेल नदीवर आठ दहा दिवस पुढें मुक्कामच आहे. सबब कीं तमाम फौजेच्या देण्याचा आकार करून फौजा व पागा जागांजागां चारणीस बिदा करून छावणीस सडे उज्जन इंदुरास जाणार. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें, व शिंद्याकडील वकिलांनींही सांगितलें व हरकुब्राईचे येथेंही हेंच वर्तमान आलें. गोविंद कृष्ण यांणीं आपलें वर्तमान सांगितलें जे, श्रीमंतांनीं आह्मांस उदेपूर हा महाल वतनी चाकरी सांगितली होती. त्यास मीही एकनिष्ठेनें चाकरी करून, सरकारचा ऐवज पोहचावीत गेलों. महाल आबाद राखला. अलीकडे शिंद्यांनीं तो महालही आह्मांकडून घेऊन आपले लगामीं लावला. त्या महालाची तसनस घरें लुटून घेऊन ते संस्थानिक खराब केले. आह्मांवर नाहकचे पेंच ठेवून लुटून घेतलें. अद्यापवरही आह्मांस कोण्या प्रकारें खराब करावें असेंच त्यांचें मानस आहे. असो. आह्मांस पुसता कोणी धणीही नाहीं. मीं उत्तर केलें जे, धन्याकडून काय होऊन यावें तें सांगा, श्रीमंतांस लिहून पाठवूं. तेथून काय उत्तर येईल तें तुह्मांस पावतें करूं. ते बोलले जे श्रीमंतांनीं पाटीलबावांस ल्याहावें कीं, गोविंद कृष्णाकडे कैलासवासी श्रीमंतांनीं उदेपूर हा महाल वतनी चाकरी सांगितली आहे. त्यास अलीकडे बहुत दिवस हिंशेब समजला नाहीं. सरकारचा ऐवज कोणीकडे गेला आहे तें, व संस्थान खराब कां झालें, पुढें तेथील बंदोबस्त केला पाहिजे, यास्तव त्यास इकडे हुजूर पाठवून देणें, याप्रमाणें पाटीलबावांस ल्याहावें. आह्मांसही याच अन्वयें ल्याहावें व राणाजीसही ल्याहावें कीं, तुमच्या महालाची बंदोबस्ती सरकारांतून गोविंद कृष्ण यांस सांगितली होती, त्यास अलीकडे बहुत दिवस सरकारची पेशकस पावत नाहीं. गोविंद कृष्णाशीं तुह्मी रुजू आहां किंवा आणीक काय उपद्रव तुह्मांस लागले आहेत; सरकारचा ऐवज कोणीकडे गेला; तें सविस्तर लिहून पाठवावें. ह्मणून अशीं तिनीं पत्रें यावीं व गोविंद कृष्णास एकांतीं सरकाराचें पत्र समाधानीचें यावें ह्मणजे पाटीलबावाही पाठवितील. संस्थानसंबंधीं सरकारचा ऐवज कोणीकडे गेला आहे, हें मीं सविस्तर समजावीन. याप्रमाणें त्यांनीं सांगितलें आहे. स्वामींचे मर्जीस येईल तें करावें. तत्रापि गोविंद कृष्ण यांस ममतापुरस्सर एकांतीं पत्र यावें ह्मणजे एकांतींच पावतें करूं. त्यामुळें इतकें होईल कीं, तेथील बारीक मोठें वर्तमान सविस्तर वरचेवर कळत जाईल. इतक्यावर मर्जी धन्यांची. गोविंदराव गाइकवाड यांचे रवानगी (विषयीं) तट

पडला आहे. कां कीं, लोक कोणी माघारा जात नाहींत. यास्तव लोकांचे समजाविशीचाही गुंता पडला आहे. आणीक पांच सात दिवस त्या मुक्कामावरच लागतील. याप्रमाणें इकडील वर्तमान. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

लेखांक ११. ता. १ जुलई इ. स. १७८०.
श्रीगजानन. मि. ज्येष्ठ वा॥ १४ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २७ जमादिलाखरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व उभयतां सरदारांकडील व श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें आहे. सांप्रत उभयतां सरदार छ २१ रोजीं उज्जनीस शिंदे व इंदुरीं होळकर दाखल झाल्याचें वर्तमान छ २३ रोजीं येथें आलें. होळकराकडील कारभारी उज्जनीस पाटीलबावाबरोबर गेले आहेत. एका दो दिवसां येतील. इंदुरीं दाखल झाल्याचें अगर मध्यंतरीं राजश्री तुकोजी होळकर यांणीं येथें बाईस पत्र लिहिलें नाहीं. इतके उपरांतिक पत्र घेऊन सुलतानजी लांबहाते ते त्यांच्या शिष्टाईस येणार असें वर्तमान येथें ऐकतों. उभयतां सरदारांजवळ सरकारचे हुजरे आहेत. ते पुण्याकडे लवकर चला ह्मणून ह्मणतच आहेत. हुजऱ्यास तों ह्मणतात जे, चालतों परंतु दो महिन्यांनंतर भाद्रपदमासीं देशांत जावें असा उभयतांचा निश्चय झाला आहे ह्मणून ऐकल्यांत आलें. श्रीमंत दादासाहेब सुरतेसच आहेत. इंग्रज छावणी कांहीं सुरतेस व कांहीं भडोचेस गेले आहेत. दुसरें वर्तमान ऐकिलें जे, खडक्याबाऱ्याजवळ इंग्रजांचीं दोन पलटणें आलीं आहेत. ते कुकडमुंड्यास जाणार. तें स्थळ हस्तगत करावें ह्मणजे खानदेशांत बसायास जागा झाली; ह्मणजे पुढें आणिक जागांजागां फैलाव करावा या अर्थी घेतात. त्या दो पलटण्याबरोबर कांहीं फत्तेसिंग गाइकवाड यांची चार पांचशें फौज आहे असें ह्मणतात. इंग्रजांनीं फत्तेसिंगास दोन लक्ष रुपये खर्चास दिले व गुजराथचा अंमल सारा सरकारचा व गाइकवाडांचा. सारेच अंमल फत्तेसिंगाचे हवाला केला. फत्तेसिंगबावाचें आगतस्वागत इंग्रजांजवळ फार आहे. बादबरसाद इंग्रज दक्षणप्रांतीं जाणार व फत्तेसिंगबावांनीं गुजराथचा बंदोबस्त करावा याप्रमाणें साहुकाऱ्यांत बोलवा आहे. राजश्री गोविंदराव गाइकवाड माघारी गेले. दोन हजार फौज त्यासमागमें गेली. मागाहूनही कांहीं जाणार. गोविंदराव गाइकवाडांनीं पुढील मसलतीचा डौल केला आहे. तें वर्तमान बाबी पठाण व काठेवाडचे काठे सरदार व आणिकही

कोणी कोणी पाळेगार इतक्यांचीं हीं सूत्रें पहिलेच गोविंदरायाकडेस आहेतच. पावागडाजवळ दाखल झालीयावर आषाढ अखेरीस त्या सरदारांस फौजासुद्धां बोलावून घेऊन गुजराथचा बंदोबस्त करावा. उभयतां गाइकवाडांचे गुजराथप्रांतीं खटके होतील. हेंही वर्तमान साहुकाऱ्यांतीलच होय. गोविंदरायाची बहीण आमल्याकडील तळेगांवींहून निघून गोविंदराव गाइकवाडाकडे गेली. ते बाई येथें आली होती. ते हरकुबाईच्या वाड्यांत राहिली होती. अहल्याबाईनींही भोजनास वाड्यांत आणिली होती. तीही बोलत होती जे, गोविंदरायावर आतां श्रीमंतांची कृपा झाली. अतःपर फत्तेसिंग गाइकवाड गुजराथेंत अंमल करतील असें होणार नाहीं. गोविंदरायास ते प्रांतचे भुमे व काठे व बाबी सर्व गोविंदरायाच्या सूत्रांत आहेत असें बोलत होती. खानदेशांत लासूरचा बंदोबस्त चांगला असावा. गुलजारखांनाचीं माणसें आसपास फिरतात. छ २० रोजीं पाटीलबावा उज्जनीस गेले. छ २१ रोजीं होळकर इंदुरास दाखल झाले. श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १२.** ता. ४ जुलई इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. आषाढ शु॥ २ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ १ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून, छ २४ जमादिलाखरीं विनंतिपत्रें सेवेसी रवाना डाकेबरोबर केलीं आहेत. हे पावलींच असतील. अलिकडे बहुत दिवस आज्ञापत्रेंही कांहीं येत नाहींत. असो. स्वामी धनी आहेत. सांप्रत दादासाहेब सुरतेस आहेत. गुजराथप्रांतीं व सुरत अठ्ठाविशींत वगैरे ते प्रांतचा बंदोबस्त करितात. बहुतकरून इंग्रजांचीं ठाणीं जागांजागां बसवितात. गुदस्तांचे मसलतीचा पैका वसूल करणें इंग्रजांस फार अगत्य आहे. या अर्थी इंग्रजांच्या मनोदयानुरूप मातबर स्थळीं त्यांचींच ठाणीं बसतात. बडोद्यावरही स्वारी करीत होते. परंतु गोविंदराव गाइकवाड काठेवाड प्रांतीं फत्तेसिंगाचे फौजेस आडवे गेले आहेत. त्यांनीं दादासाहेबांस पत्रें पाठविलीं कीं, बडोद्यावर जाणें दोन दिवस तहकूब करावें. ते आपले जेबांत आहे. मी आलियावर तेथील लोकांशीं सामदंड भेद करून, फत्तेसिंगही हस्तगत करूं. आणि फौज बडोद्यांतील लढाईमुळें विखळ होईल. पुढेंही आपणास फौज चांगली पाहिजे. यास्तव दोन्हीही कामें

करू ह्मणून पत्रें आलीं. यास्तव तह मूळ झाले आहेत. फत्तेसिंग गाइकवाड याजकडीलही सूत्रें जाबसाल दादासाहेबांकडेस गेले आहेत. असें वर्तमान साहुकारी ऐकिलें, व भोंसल्याकडेही श्रीमंत दादासाहेबांनीं कारकून पाठविला, तो महेश्वरीं एक दिवस राहिला होता. तिकडेही कारकून गेला. आपण ह्मणतील कीं, राजश्री दिवाकर पुरुषोत्तम पुण्यास आले आहेत; तिकडे कांहीं सूत्र दादासाहेबांचें लागणार नाहीं. परंतु राजश्री मुधोजी भोंसले यांचें पूर्वीपासून सूत्र तिकडील आहेच. आतां तों इष्टं धर्मेण योजयेत् असें आहे. गुलजारखानाच्या पारपत्यास अहल्याबाईकडीलही फौज रेवा उतरत आहे. पांच सातशें फौज जमावून जाईल असें दिसतें. बापोजी होळकरही एका दो दिवसां येथें येणार. त्यांचेंही लोकांचा देण्याचा घोळ पडला आहे. फुटकर फुटकर लोक आसपासचे दादासाहेबांकडेस चाकर राहायास जातात. तिकडे लोक ठेवण्याची चढचढ फार आहे. इकडील मातबरांचीं लक्षें दुरोख झालीं आहेत. एकनिष्ठ लक्ष कोणाचेंही राहतां दिसत नाहीं. सांप्रत लोकांच्या मर्ज्या एक प्रकारच्या दिसतात. प्रस्तुत दादासाहेबांकडील वर्तमान स्तिमितसें झालें आहे. कोणी कोणी येथें बोलतात जे, पुण्याकडून कांहीं सूत्र दादासाहेबांकडे लागलें असेल. आतां तहही झाला तर, रेवा दक्षिणतीरीं श्रीमंत व रेवा उत्तरतीरीं श्रीमंत दादासाहेब, जाला तर असा तह होईल असें जनवदंता. काशीदजोड्या तीन पाठविल्या. त्या येथें छ० २९ जमादिलाखरीं पावल्या. हिंदुस्थानाकडील वर्तमानः–तर पातशाहा दिल्लींतच आहेत. सुजायतदौलाकडील नजीबखान तीस चाळीस हजार फौजेनिशीं जयनगर प्रांतीं येऊन, एक दोन किल्ले जयनगरवाल्याचे घेतले. प्रस्तुत अलवरच्या किल्ल्यास वेढा घालून बसला आहे. दिल्लीवर शीख चाळीस हजार फौज सुद्धां चालून आले होते. त्यास पातशाहाची फौज बाहेर निघून शिखांचा पराभव केला. जयनगरवाल्याचा प्राचीन दिवाण खुशालीराम बोहोरा होता, तो या नूतन राजानें कैद केला. नवा कारभारी केला आहे. यामुळें राज्याची हलकाई दिसून आली. यवनांचा जोर आहे. जागांजागां राज्यांत फितूर तिकडेही झाला आहे. जाटाच्या राज्याचा विध्वंस झाला आहे; तो आपणास विदितच आहे. वरकड इकडील वर्तमान देखलें ऐकलें सेवेशी विनंतिपत्रीं पेशजीं व हल्लीं लिहिलेंच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. छ० १४ व छ० २२ व छ० २४ जमादिलाखरचीं पत्रें सेवेसी येथून पाठविलीं तीं पावलीं किंवा नाहीं हे आज्ञा."

---

**लेखांक १३.** ता. १२ जुलई इ. स. १७८०.

पै॥ चंद्र २५ रजब इहिदे समानीन. **श्रीगजानन.** मि. आषाढ शु॥ ११ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र ९ रजबपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच आहेत. परंतु त्यांजकडील रामाजी बापू ह्मणून कारकून व आणीक एक कारकून ऐसे दोघेजण दोनशें स्वारांनिशीं सुरतेहून निघून, किल्ले मांडवगडानजीक बरख्या ह्मणून गांव लहानसें आहे, तेथील....मवास जोरावरसिंग तेथें दोनशां स्वारांनिशीं उभयतां कारकून आले. पांच सात दिवस तेथें राहून, जोरावरसिंगाच्या अनुमतें पहाडांतील मवासांसीं भेटून, काय त्यांचीं बोलणीं झालीं असतील हें न कळे. तदोत्तर रामाजी बापूजी शंभर स्वारांनिशीं जोरावरसिंगाजवळ राहून, दुसरा कारकून शंभर स्वारांनिशीं माघारा कांहीं पलटणें व फौज आणावयास गेला आहे. मांडवच्या पहाडांतील मवास फितुरांत मिळाले हें वर्तमान बाईस येथें बातमी आली. त्यावरून मातुश्री बाईनीं येथून चोरबातमीस माणसें पाठविलीं. बातमी आली कीं हें वर्तमान खरेंच. यास्तव राजश्री रंगराव ओढेकर यांस बाईनीं पत्र लिहिलें जे, दादासाहेबांकडील कारकून फौज घेऊन मांडवगडच्या मवाशांत येऊन फितूर करितात, हें बरें नाहीं. तुह्मी त्यांचें पारिपत्य करा. नाहींतर आह्मी येथून फौज पाठवूं. तुमच्या महालाची तसनस होईल. मग पवार व तुह्मी श्रमी व्हाल. त्यांचें पारिपत्य करून धरून देणें कीं त्यास उधळून देणें. याप्रमाणें चार पांच रोज झाले पत्र पाठविलें आहे, व चंद्र ३ मिनहून दुसरी बातमी आली जे, ते शंभर स्वार व कारकून अद्याप मवाशांतच आहेत. वर्तमान येतांच बाईनीं मज हातीं रंगराव यांस पत्र स्पष्ट लिहिविलें कीं, त्याचें पारिपत्य करा; नाहींतर श्रीमंतांस लिहिलें जाईल. श्रीमंत तुह्मांवर रागें भरतील. असें मजकडूनही लिहविलें; व बाईनींही पत्र रंगरावास रागें भरून लिहून, दोन्हीं पत्रें धारेस रवाना केलीं. या वर्तमानाचीं पत्रें बाईनीं उभयतां सरदारांसही लिहिलीं आहेत. उभयतां सरदार व रंगराव त्यांचें पारिपत्य करितील. तिकडे कांहीं ढीलच झाली, तर बाईनींही पागा बोलाविल्या आहेत. येथून फौज पाठवावी असाही विचार बाईचा आहे. परंतु उभयतां सरदार व रंगराव यांच्या उत्तराची मार्गप्रतीक्षा करितात. सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई पैवस्ता या प्रांतीं होती. ते वेळेस आदिकरून जितके मवास व भिल्ल इकडे आहेत, तितक्यांशींही त्यांनीं सलुख करून आपलेसे करून ठेविले आहेत. ते आतां त्यांस अनकूळ होतात.

असावी असें दिसतें. ह्या पत्रामध्यें नानांनीं विलायती आरसे मुंबईहून पाठविण्याबद्दल वकिलास लिहिलें होतें. परंतु विलायतेहून तरांडीं (व्यापारी जहाजें) आलीं नसल्यामुळें भरपूर माल शिलक नव्हता. ह्मणून तरांडीं आल्यानंतर माल देण्याचें एका पारशी व्यापाऱ्यानें कबूल केल्याबद्दल ह्यांत लिहिलें आहे. अर्थात् विलायती माल त्या वेळीं घेण्याकडे नानांचें लक्ष होतें हें उघड आहे. मुंबईचा ईंग्रज गव्हरनर ह्या वेळीं परळ येथें राहत असे, असाही उल्लेख ह्या पत्रांत आहे.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड संजगिरी मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र ९ रमजानपावेतों स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष. चंद्र २७ साबानीं, होनाजी जासूद जोडीबराबर पत्रें देखील राजश्री हणमंतराव बच्याजी यांचें कर्ज वसूल यावयाबद्दल अजम जनरल यांचें पत्र सुरतेचे सरदारास व मशारनिल्हेचे दस्ताऐवज ऐशीं गेलीं आहेत. त्यांजवरून सविस्तर कळलेंच असेल. यानंतर कृष्णाजी जासूदजोडीबरोबर आपलें पत्र चंद्र २५ साबानचें पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळला. श्रीमंत राजश्री नानांची थैली अजम जनरल यांसी, पुण्यास दाखल जाहाल्याची होती. ती परळास आह्मीं जाऊन, जनरल यांसी सलाम देऊन सादर केली, व सांगितलें कीं, दोस्ती एकरंग जाणून व बरें चाहतां हें समजोन, श्रीमंत बदामी सर करून पुण्यास दाखल जाहले, हें वर्तमान तुह्मांस जाहीर व्हावें ह्मणून लिहिलें आहे. खुश जाहाले, व वरचेवर थैली वाचून, जाबसाल त्याहावयाची परवानगी दिली; व थैली करून मिस्तर सँडफर्ड जनरलचा कारभारी, हरनचें काम चालवीत असतो त्यांनीं आह्मांस बोलावून स्वाधीन केली; व त्यांनीं त्या थैलीची नक्कल मिस्तर मालेट यांसी आपले माणसाबरोबर पाठविली आहे. थैली या पत्रामध्यें बिद्धन जात आहे. कळावें. आरशांच्या दाहा जोड्या लांबी दर सव्वागज–निदानी गज–निर्मळ पाहून निरख लेहून पाठवावा, ह्मणून आज्ञा. त्यावरून आह्मीं पारशाच्या दुकानीं व त्यांचे घरीं जाऊन पाहिल्यात. परंतु चांगल्या आढळल्या नाहींत निर्मळ नाहींत. खेर (केर?) राहिल्या आहेत. त्या कार्याच्या नाहीं. ऐशास आरशांच्या जोड्या पंचरात्रीनंतर जशा पाहिजेत तैशा मिळतील. कां जर विलायती तरांडीं येथें यावयासी निघालीं आहेत. जो दिवस जातो तो तरांडीं यावयाचा. आलीं ह्मणजे आरशांच्या जोड्या नजरेखाल घालून, निरख घेऊन वरचेवर आपणास लिहून पाठवूं. तोफा व बंदुकांविषयीं तूर्त कोणी कबूल करीत नाहीं हंगामशीर तरांडीं आलीं ह्मणजे मिळवून देऊं, ऐसें दोघे मातबर पारशी यांनीं कबूल केलें आहे. मिस्तर रेव्हरन्ड इंग्रेज मुंबईहून टिपूकडेस वकीलीस राहाता जाहाला, ह्मणून वर्तमान परस्परें ऐकिव्यांत आहे. ह्मणून त्यास येविषयीं बारकाईनें शोध घेतला. ऐशास पेशजीं मिस्तर कॉरनेक कलकत्तेहून गोंव्यास जावयासी येथें आला होता. त्याजबरोबर त्याचा भाचा मिस्तर रेव्हिटह्री होता. कलकत्तेहून मशारनिल्हेस शीक होती कीं, टिपूशीं व आह्मांशीं सल्ला आहे, त्या

अर्थी आपला माणूस त्याचे मुलखांत जाऊन राहिल्यास उत्तम आहे. जेणेंकरून हमेशा बारीक मोठें वर्तमान आह्मांस कळत जाईल. याजकरितां मिस्तर कॉरनेक यासी सांगितलें कीं, तुह्मीं गोंव्यास राहून टिपूकडून चौकस भाव व त्याचें आचरण कसें आहे हें ध्यानीं पुरतें आणून, मिस्तर रेव्हिट याची रवानगी पुढें करावी. ऐशी आज्ञा जनरल कॉरनेक यासी कलकत्तेहून जाहाली होती. त्यावरून मशारनिल्हे कॉरनेक व रेव्हिट गोंव्यास येथून गेले होते. तेथें फार दिवस राहिलेत. बारकाईनें सर्व ध्यानीं आणितां टिपूची वर्तणूक चांगली न पाहून, रेव्हिट याची रवानगी टिपूकडे करावयाची मकूब केली व उभयतां गोंव्याहून मुंबईस फिरून आलेत. त्यास रेव्हिट हल्लीं मुंबईत आहे. हा सर्व आंतील भाव, परस्परें बारकाईनें शोध घेतां, याप्रमाणें लागला. कळावें. सुरतेचा अमलाचा बंदोबस्त जाहल्याचें वर्तमान आपणांस दोहों पत्रीं निवेदन केलेंच आहे. जाबसाल अद्यापि आला नाहीं. राजश्री शिवरामपंत यांसीं पांच महिने होत आले व हल्लीं शरीरींही समाधान त्यांचें नाहीं; जाणून त्यांस आह्मीं परळास नेऊन थैलीचा जाबसाल अमलाविषयीं मागून घेतला. शुद्ध त्रयोदशीस मशारनिल्हे शिवरामपंत यांची रवानगी आपणाकडे करितों. बाबा हे गृहस्थ फार शाहाणे आहेत. सरकारकामकाजांत उपयोगीचे. आपणांस कळावें, हे विज्ञापना."

## लेखांक ५.

ह्या पत्राची तारिख २४ एप्रिल इ. स. १७८८ ही आहे. ह्या पत्रामध्यें मुंबईकर इंग्रजांच्या जामदारखान्याची स्थिति वर्णन केली आहे. त्याचप्रमाणें जनरल मेडोज ह्याची मुंबईच्या गव्हरनरच्या जागीं योजना होऊन अक्टिंग गव्हरनर मि. रामसे ह्यास सुरतेस नेमल्याचा उल्लेख आहे. जनरल मेडोज ह्याचे कौन्सिलर्सचे जागीं ग्रीन, कार्नगी व स्पार्क ह्यांची नेमणूक केल्याची व जनरल मेडोज मुंबईस येण्यास निघाल्याची बातमी ह्या पत्रामध्यें आहे.

### श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई कृतानेक सांष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १७ रजब जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असों विशेष. हल्लीं बातमी वर्तमान जी आहे त्याचा तपशील:—

मद्रासेहून तीन जाहाजें आज दिवस आलींत. त्यांत पांढरे लोक सुमार एक हजारपर्यंत आले आहेत. टोपीकर निवडक लांब्बीस सारखे आहेत. याशिवाय दुसरे पांढरे लोक चार हजारपर्यंत विलायतेहून येऊन पावतील. परंतु हे लोक पातशाहाकडून आहेत. कळावें. कलम. १

इंग्रेज लोक यांसी हमेशा थोरल्या तोफा गोळेसुद्धां टिपें मारावयाच्या कवायती शिकवीत आहेत. कलम. १

येथील जामदारखान्यांत ऐवजाची फारच ताण जाहाली आहे. लोकांच्या तलबी

चढल्या आहेत. जेथून तेथून चालवून घेतात. परंतु ऐकिण्यांत आहे कीं पातशाहाकडून ऐवज येणार; व बंगालेहून जें येईल त्यावर भिस्त आहे. कळावें. कलम. १

मिस्तर मालेट याचें व सरकारचे मसलतीचें बोलणें लागलें आहे, ऐसे परस्परें बारकाईनें ऐकिलें आहे. परंतु आपण कांहींच भाव आह्मांस समजाविला नाहीं. तर ऐसें नसावें. आह्मांस ही माहीतगिरी असल्यास उत्तम. वरकड सरकारकामांत आमचें ध्यान कसें आहे ही आपली निशा असेलच. कलम. १

घराविषयीं पेशजीं फार वेळ विनंती केलीच होती; परंतु आज दिवस जाबसाल आला नाहीं. तर घर न बांधितां उपाय नाहीं. त्यांत थोरली हवेली बांधावयाची नाहीं. साधारणच बांधावयाचें. ऐशास सोट व दुतोंडी वांसे व खुंटे व कड्या व चिरे पथरीचे यांचा आपण अजमास करून, वसईचे सरकारांतून येऊन येथें पावतील ऐशी श्रीमंतांस विनंती करून, सरसुभा आज्ञा घेतली पाहिजे.

कर्नेल हटलीबरोबर आज्ञा इंग्रेजांस आली आहे कीं, मिस्तर ग्रीन व कारनगी या उभयतांस कौन्सिलांत घ्यावें, व पेशजींपैकीं मिस्तर स्पार्क मिळोन तिघे कौन्सिलदार जनरल मेडीहौस याचे बैठकीमध्यें बसावयाचे नेमिले आहेत; व मिस्तर रामसी मशारनिल्हे जनरल येथें पावतांच सुरतेस सरदारीवर जावें, ऐशी विलायतेहून आज्ञा आली आहे. आपणास कळावें. कलम. १

नवीन पलटणें बांधावयाकरितां कोंकणाहून वगैरे ठिकाणांहून लोक पैदा करून आणून चाकरास ठेवितात. कवाईत शिकवीत असतात. मुंबईत पंधरा पलटणें तयार करावीं ऐशी आज्ञा. याशिवाय कलकत्तेसही जमाबंदी लोकांची होत आहे. कळावें. कलम. १

कर्नेल हटली विलायतेहून पायमार्गें निघाला होता. तो बसऱ्यास येऊन गलबतामध्यें येथें येऊन पावला. हटलीची नेमणूक पातशाहाकडून आहे. जनरल मेडीहौस तरांड्यामध्यें येथें यावयासी निघाला आहे. आठापंधरा रोजीं यावा. मार्ग लक्षितात. तो आलियावर मसलत जी होईल ती कर्नाटकसंबंधीची होणार. परंतु श्रीमंतांस मिळोन होणें ऐशी आज्ञा आहे. बारकाईनें बातमी काढून जाहीर केलें आहे. कलम. १

कलकत्तेहून आज्ञा आहे कीं तूर्त पांचशे घोडे चांगले खरीद केले पाहिजेत. तेथें सोईस येऊन मिळाल्यास खरीद करणें ऐशी ताकीद इंग्रेजास आहे. सबब इलाजांत आहेत. कलम. १

आह्मी सरकार कामावर येथें नेहमीं आहों, तेव्हां हरएक लहान अथवा थोर कामें मुंबईसंबंधीचीं जीं होणें तीं आमचेच गुजारतीनें व्हावीं. ही चाल असतां, परस्परें हरएक बाबें पत्रें अजम जनरल यांसी मामलेदाराकडून व हुजरून येतात, हें ठीक दिसत नाहीं. व चाकरीस बोज राहत नाहीं. ऐशियासी आह्मी सरकारचाकरीवर एकनिष्ठपणें असतां ऐसें नसावें. तर येविषयीं आपण श्रीमंतांस विनंती करून परभारें आह्मांशिवाय पत्रें न यावीं येविषयींचा बंदोबस्त प्रथम केला पाहिजे. कलम. १

मागील वेतनाविषयीं पेशजीं आपण लिहिलें कीं, श्रीमंतांस विनंती करून लिहितों. त्यास आपले शरीरीं सावकाश नव्हतें, ह्मणोन स्मरण न होतां तसेंच राहिलें. ऐशास बंधूचें लग्न हर करीं उरकोन ध्यावें लागतें. मुलगी येथें न मिळे, सबब गोंव्याकडे ठीक केलें आहे. रुपये ५०० मुलीचे आईस पाठवून आणावी इतुकें राहिलें आहे. परंतु ऐवजाची सोय करावी लागती. याजकरितां मागील वेतनाविषयीं कृपा करून विनंती करून लौकर येऊन पावतील व साल मजकूरचे बेलापुरचे नेमणुकेचे तीनशें अठ्याऐशीं रुपये ह्माहून लौकर देविले पाहिजेत. कलम. १

सदरहू कलमें सादर केलीं आहेत. जाबसाल लौकर पाठविला पाहिजे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

रघुनाथ रणसोड ह्याचा खाजगी मजकूरही ह्यांत आहे. त्याचें राहण्याचें घर जुनें झालें होतें. सबब, नवीन घर बांधण्यासाठीं वसईहून कांहीं सामान देण्याबद्दल त्यानें नानांस विनंति केली आहे. त्याचप्रमाणें त्यानें मुंबईचे सरकारी कामकाज सर्व आपल्या मार्फत व्हावें, परभारें पत्रद्वारें होऊं नये, ह्मणूनही सूचना केली आहे. रघुनाथ रणसोड ह्यास एक बंधू असल्याचा उल्लेखही ह्या पत्राचे शेवटच्या कलमामध्यें आहे. त्याचप्रमाणें त्यास बेलापुराहून ३८८ रुपयांची वार्षिक नेमणूक मिळत असे असाही उल्लेख आहे.

## लेखांक ६.

ह्या पत्रामध्यें रघुनाथ रणसोडानें मुंबईकर इंग्रजांच्या सैन्याची व टिपूच्या विरुद्ध चालू असलेल्या राजकारणांची बातमी लिहिली आहे. त्यावरून ह्या वेळीं इंग्रजी सैन्य किती होतें तें समजतें. ह्या पत्रासोबत दुसरी एक सात कलमांची यादी पाठविल्याचें लिहिलें आहे. परंतु ती गहाळ झाल्याचें दिसतें. ह्या पत्राची तारीख २९ मे. इ. स. १७८८ ही आहे.

पैवस्ती चंद्र २४ साबान. श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २२ साबान जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असों विशेष. जासुदाबरोबर चंद्र ८ मजकुरींचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. त्याचीं उत्तरें:—

आजपर्यंत गाडद तयार किती आहे, पैकीं तेथील बेगमीचे लोक वजा होऊन बाकी लोक तयार किती आहेत, तें ल्याहावें ह्मणोन. त्यास आजपर्यंत जुने लोकसुद्धां गोरे लोक सुमार दोन हजार, व काळे लोक सुमार दाहा अकरा हजार, पैकीं एक पलटण अरमारी गलबतावर व एक पलटण सुरतेस व एक पलटण साष्टीस व हल्लीं हंगाम तालचेरीकडे जाणून तीन पलटणें ठेविलीं आहेत. बाकी दोन हजार गोरे व चार पांच हजार काळे ऐसे मुंबईस आहेत. याशिवाय हमेशा ठेवितात. मुंबईचे बचांस ह्मणाल तर दोन हजार माणूस पाहिजे. कलम. १

मुंबईस गाडद तयार होत आहेत; गोरे लोक मद्रासेहून आलेत; मनसबा पुढें काय आहे तो बारकाईनें त्याहावा ह्मणून लिहिलेंत. त्यास हा भाव पेशजीचे पत्रीं कळविला आहे. पक्केपणें नवा जनरल आलियावर समजोन लिहून पाठवूं. कलम. १

'एडमिरल' ह्मणून थोरलें जहाज मद्रासेहून मुंबईस यावयासीं तालचेरीचे मार्गेहून येतां, तालचेरीस इंग्रेजानें ठेऊन घेतलें आहे. निमित्य कीं टिपूमीया याच्या फौजा कालिकोटाकडेस उतरल्या आहेत. न कळे हंगामा तालचेरीकडेस जाहाला तर, इंग्रेज लोकांचे कबिले त्या जहाजावर चढवून मुंबईस पाठवावे. हा विचार करून जहाज खोटी केलें आहे. कलम. १

टिपूमीया यासी कांहीं इंग्रेजाकडून मसलतीचा भाव समजण्यांत आल्यामुळें टिपू खुद्द फौजेसुद्धां बंदरचीं ठिकाणीं आहेत, तेथील बंदोबस्ती मुस्तकीन करावी व कालिकोटास किल्ला बांधावयाचा बेत केला आहे. सबब कालिकोटाकडेस टिपू आला आहे. कळावें. कलम. १

आलाहिदा याद पाठविली आहे. कलमें साहा लिहिल्याअन्वय श्रीमंतांस विनंती करून परवानगी घेतली पाहिजे. मागें टाकूं नये. कलम. १

सदरहू कलमें ध्यानीं आणून रामजी जासूदाची जोडी याजबरोबर जाबसाल देऊन लौकर पाठविलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

### पुरवणी.

"विज्ञापना विशेष. इंग्रेजाचें व सरकारचें बोलणें टिपूचे मसलतीसंबंधीं हा कालपर्यंत कांहींच नाहीं ह्मणोन लिहिलें, त्यावरून आश्चर्य दिसोन आलें. तर हा भाव इंग्रेज अद्यापि न दाखवीत, तर मतलबीवर नजर असेल; अथवा नवा जनरल येणार त्यापेक्षां तूर्त कांहींच कळूं न देत असतील. असो. पत्रोत्तरनंतर जें असेल तें अमलांत येईल. हे विज्ञापना."

## लेखांक ७.

ह्या पत्रामध्यें रघुनाथ रणसोड ह्यानें इंग्रज व फ्रेंच ह्यांच्या कारस्थानांची बातमी दिली आहे. ती फार महत्त्वाची आहे. मंचर कामा पारशी नांवाचा एक पारशी गृहस्थ पेशव्यांनीं पुण्यास बोलाविला होता असें दिसतें. इंग्रजांच्या राजकारणांत मराठ्यांच्या वतीनें पारशी गृहस्थही ह्या वेळीं प्रविष्ट झाले होते हें उघड आहे. ह्या पत्राची तारीख २६ जून इ. स. १७८८ ही आहे.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड संजगिरी मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ माहे रमजानपावेतों स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष चंद्र१० मजकुरीं कृष्णाजी. जासूदजोडीबरोबर पत्रें व जनरलाचे थैलीचा जाबसाल पाठविले आहेत, त्याजवरून सविस्तर कळलेंच असेल. यानंतर काळोजी जासूदजोडीबरोबर

आपलें पत्र चंद्र १० वे रमजानचें होतें, तें चंद्र १८ मजकुरीं पावलें. लिहिला मजकूर कळला. त्याचीं उत्तरें याचा तपशीलः—

सुरतेचे कामाकाजाविषयीं शिवरामपंत मुंबईस आहेत. त्यांस तेथील कामाकाजाचा बंदोबस्त जाहला. हल्लीं त्यांनीं पुण्यास निघून यावें ह्मणून त्यांस सरकारच्या थैलीचा जाबसाल, जनरल याजवळून घेऊन व पत्रें देऊन, राजश्री शिवरामपंत यांची रवानगी केली. आपणाजवळ येऊन पावतील. कलम. १

मिस्तर स्काट याजकडून जाबसाल आल्यास वरचेवर कळवावें ह्मणून लिहिलेंत. उत्तम आहे. कलम. १

घर राहावयाचें केवळ जीर्ण जाहालें आहे. टिकाव निघत नाहीं. त्या अर्थी गरीबीप्रमाणें घर बांधलेंच पाहिजे. ह्मणून बंधूचे वेतनापैकीं ऐवज कांहीं आल्यास घराची उभारणी होईल. सबब आपणास विनंती केली होती कीं, श्रीमंतांस अर्ज करून इतकें काम जरूर करून घ्यावें. येविषयींचा आपला जाबसाल आला कीं तूर्त घडत नाहीं, तुह्मी आल्यावर सोई करूं ह्मणून लिहिलेंत. त्या सबब हें काम लांबणीवर घालितां नये. जलदीनें उभारणी जाहल्यानें उत्तम. कां जर जुनें काम खालीं आल्यावर सामानसुमानाचा नाश होऊन खर्चाखाल येऊं. ऐशियासी श्रीमंतांजवळ बजीद होऊन केलेंच पाहिजे. आपण चित्तावर मात्र धरल्यास वरचेवर घडेल ही निशा आहे. कलम. १

पनवेलपैंकीं बारा असाम्यांचा बंदोबस्त करितां, त्यांजकडेस दोष नाहीं ह्मणून लिहिलेंत, त्यास आश्चर्य दिसोन आलें. असो. शिवरामपंत यांसी ही गोष्ट दखल आहे. आपणासीं बोलतील. कलम. १

मॉरिस येथें फ्रान्सेज यांचीं कांहींक जाहाजें आलीं आहेत, ऐशी बातमी आहे. कलम. १

विलायती जहाजें याच महिन्यांत यावींशीं आहेत. आरशांच्या जोड्या लिहिल्यामाफक मिळतील. गुंता नाहीं. दृष्टीखाले घालून वरचेवर निरख लिहून पाठवूं. कलम. १

मंचर कामा पारशी याजविषयीं लिहिलें, तें कळलें. ठीक करून लिहून पाठवावें, त्याप्रमाणें मशारनिल्हे हे आपणाजवळ निघून जातील. कलम. १

रोज दाहा अकरा होतील. बसऱ्याचे मार्गावरून विलायतेहून पत्रें येथें आलीं होतीं, दाखल होतांच दररोज कौन्सिल सात आठ रोजपर्यंत होत होती. बाहेर अफवा होती कीं सावकारी कामाकाजाविषयीं पत्रें आलीं आहेत ह्मणून कौन्सिलें होतात. परंतु आह्मीं तर्कीत गोष्ट ध्यानीं आणितां, सावकारी काम नसावें, ऐसें चित्तांत बिंबलें. त्यावरून आह्मी परस्परें हे बातमीचे शोधांत लागलों. तेव्हां एकीकडून गुप्तपणें बातमी लागली कीं विलायतेहून पत्रें आलीं आहेत. त्यांत मजकूर कीं, पेशजी फ्रान्सेज व इंग्रेजांचा तह जाहाला, त्यांत कलम होतें कीं, फ्रान्सेज यांनीं हैदरखानास हरएक गोष्टीविषयीं साहित्य करूं नये. ऐसें असतां हल्लीं बातमी लागली कीं, मोरीस फ्रान्सेजाचें ठिकाण आहे. तेथून

गुप्तपणें जंगी जिन्नस तरांड्यामध्यें टिपूचे मुलखांत पोंहचवीत आहे. हें कलम एक व दुसरें वलंदेजांचें ठिकाण मातबर, त्याचें नांव त्रिकबार, या ठिकाणी उंचा जिन्नस पिकत असतो. तें ठिकाण वलंदेज यांनीं फ्रान्सेज यांचे स्वाधीन केलें. 'मशारनिल्हेंनीं हवाले घेतांच, तेथें मातबर किल्ला बांधावयासी मांडला आहे ऐशास हें ठिकाण त्याचे हातीं लागल्यामुळें सर्व सोय जाहाली. कां तर ठिकाण मध्यभागीं आसऱ्यास नव्हतें तें प्राप्त जाहालें. बंगाल, मद्रास व मुंबई नजीक पडली. ऐशी हरदू बातमी विलायतेस जाहेर होतांच संशय प्राप्त जाहला कीं, मागांपुढां फ्रान्सेज दगा देईल. त्याजवरून विलायतेहून तरांडीं व टोपीकर लोक व ऐवजसुद्धां बंगाल, मुंबईस रवाना होणार; व आज्ञा हरदू ठिकाणास येणार आहे कीं, बंगाल व मुंबई मिळोन चाळीस पलटणें नूतन तयार करवून ठेवणार; व फ्रान्सेज यांचा भाव पुरता ध्यानीं आणणार कीं, हैदरखानास मदत त्याजकडून जाहाली ह्मणजे वरचेवर श्रीमतांस मिळोन टिपूवर चढाव करावा व त्रिकबार याजवरही जावें. ऐशी बातमी विस्तारें ऐकिण्यांत आली ह्मणून जाहेर केलें आहे. परंतु ही बातमी प्रसिद्धीस अद्यापि नाहीं. गुप्त आहे. कळावें. कलम. १

एकूण कलमें सात सादर केलीं आहेत. कळावें शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ८.

हें पत्र ता. ४ आगस्ट इ. स. १७८८ चें आहे. ह्या पत्रामध्यें इंग्रजांच्या चळवळींची बातमी आहे व इतर राजकीय बातम्या आहेत. नवीन गव्हरनर येणार ह्मणून रामसे हा सरकारवाड्यांतून—ह्मणजे 'गव्हर्मेंट हौस' मधून—स्वतःच्या घरीं राहावयास गेल्याचीही बातमी त्यांत आहे! रामसे व रघुनाथ रणसोड ह्यांचें चांगलें सौरस्य दिसत नाहीं. रामसे 'अधिक उणे' शब्द रघुनाथ रणसोडास बोलला, सबब त्यानें पेशव्यांकडे तक्रार केली होती असें दिसतें.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १ जिल्काद जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असो विशेष. हल्लीं बारीक मोठें वर्तमान आहे त्याचा तपशीलः— कलमें

विलायती तरांडीं दोन कालचे रोजीं दुसरीं आलींत. त्यांमध्यें गोरे लोक सुमार ६०० आलेत. एकूण आज दिवस गोरे लोकांचा जमाव विलायतेहून व गांवचे मिळोन २८०० जाहाले आहेत. दुसरी चार गलबतें विलायतेहून येणार. त्यांत हजार आठशेंपर्यंत दुसरे येतील असें आहे. कलम. १

अजम टिपू सुलतान यांहीं दोघे टोपीवाले आपलेकडून शहाणे पाहून, त्यांजबरोबर, अंतस्थ दोन पत्रें लेहून दिलीं. एक पत्र इंग्रजांचे पादशाहास व दुसरें एक पत्र फराशीस यांचे मुख्यास देऊन, त्याची रवानगी बसऱ्याचे मार्गें केली, कीं एकानें इंग्रजांचे मुलखास जावें व दुसऱ्यानें फराशीस यांचे ठिकाणीं जाऊन जाबसाल घेऊन यावें. ऐसा कांहीं

बेत टिपूंनीं केला आहे. आंतील अन्वय पुढें येईलच. बारकाईनें ध्यानीं आल्यावर वरचेवर कळविलें जाईल. ही बातमी पक्की आहे सबब जाहीर केली आहे. कलम. १

राजश्री महादजी शिंदे यांची उस्तवारी होऊन हल्लीं त्यांची फताईचें वर्तमान इंग्रेज लोकांनीं आयकोन आश्चर्य मानितात. कळावें. कलम. १

अजम रामशी जनरल सरकारवाड्यांत राहत होता. नवा जनरल यावयाचा हंगाम जाणून, सरकारवाडा सोडून, आपले खुद्द घरीं कालपासून येऊन राहातो. कळावें. कलम. १

पेशजी अजम रामशी आह्मांजवळ अधिक उणें बोलिलेत. येविषयीं मिस्तर मालीट याचें पत्र त्यास जाईल. त्याजवरून तुमचे प्रत्ययास येईल. त्यास त्याचा दाखला कांहींच आला नाहीं. तेव्हां दिसतें कीं मालीटचें पत्र न आलें. असो. आह्मी तंव धन्याचे चाकर. त्या अर्थीं हरएक गुदरली गोष्ट धन्याचे कानावर घालावी, हेंच आह्मांस वाजवी. सबब घातली. कलम. १

पेशजी सुरी व कातरी राजश्री तात्यांकरितां रवाना झाली होती. पावली न पावली त्याचा जाबसाल नाहीं. हल्लीं आपले लिहिल्यावरून बागेकरितां कातरी झाडें कापावयाची, थोरली कातर अडीच रुपयांस खरीद करून जासुदाबरोबर पाठविली आहे. जाबसाल पाठवावा. कलम. १

हयातखान नगरचा किल्लेदार पेशजी इंग्रेजांस मिळोन कर्नाटकेहून मुंबईस आला. त्याचा इंग्रेजांजवळ करार होता कीं दरमाहा त्याचे खर्चास रुपये साडेचार हजार द्यावे. त्यास करारप्रमाणें त्यास इंग्रेजांकडून पावत नाहीं. याजकरितां मशारनिल्हे हयातखान यांहीं विलायतेस पत्रें हे बाबें लिहिलीं होतीं. त्याजवरून तेथें पुढील मसलतीवर नजर देऊन, तेथून आज्ञा आली आहे कीं, त्याची उस्तवारी करावी व करारबरहुकूम त्याचा खर्च चालवावा. येविषयींचीं पत्रें विलायतेहून आलींत, सबब हयातखान याची समजाविशी करून, त्यास अबरू देऊन, सरकारहवेलीमध्यें कौन्सिलांत बोलावून नेला. खलबत त्याजशीं जाहालें. करार होता त्या माफक हयातखान यास खर्च द्यावा ऐसें ठरावांत आणून, जामदारखान्यांत आज्ञा जाहली. त्याजवरून बारकाईनें बातमी काढितां हयातखान यास आज्ञा कीं, बरसाद जाहालियावर कांहीं लोकांची जमाबंदी करून आपले निसबतीस ठेवीत असावें, ऐशी मशारनिल्हेस सीक जाहाली आहे. कलम. १

बेलापूरचे मामलेदारास दोन आज्ञापत्रें व आपलें पत्र आमचे नेमणुकेचा ऐवज व भाताविषयीं व नेहमीं छबीना यावा जावा येविषयीं पाठविलींत, तींच बजिन्नस सुद्धां जासुदबरोबर मशारनिल्हे मामलेदारास पाठविलीं. त्यास आज दिवस पंचवीस होत आले. त्याजकडून कांहींच जाबसाल नाहीं व जासूदही आलेत नाहीं. कळावें. कलम. १

पेशजी खाजगत कामें व वेतनाची याद पाठविली होती. आपला जाबसाल आला कीं, यजमान स्वामींची स्वारी पुण्यास दाखल झाली ह्मणजे कानावर घालोन तुह्मांस लिहून पाठवूं, ह्मणोन लिहिलेंत. त्यास दिवस फार जाहालेत. जाबसाल आला नाहीं. दिसोन येतें कीं विस्मृति जाहाली, व आमची हाल हकीकत काय आहे, हें पण स्वामींचे ध्यानीं आलें नसावें; सबब आमचीं कामें मागस पडतात. तर बाब आमची उस्तवारी आपले हातानें ये वेळेस घडून यावी. न आल्यास आश्चर्य आहे. कीं जर ईश्वरी कृपेंकरून आपली यजमान स्वामीकडे चाल चांगलीच बनली आहे, त्यापेक्षां गरीबावर नजर बुलंद झाल्यानें आपलेंच नांव आहे. लेकरानें वारंवार ल्याहावेंसें नाहीं.

कलम. १.

सदरहू कलमें श्रीमंतांचे कानावर घालोन जाबसाल पाठविला पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ९.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. जनरल मेडोज ह्मणून जो नवीन गव्हरनर मुंबईस ता. ६ सपटंबर इ. स. १७८८ रोजीं येऊन दाखल झाला, त्याच्या आगमनाचें बातमीपत्र रघुनाथ रणसोड ह्यानें पुण्यास लिहिलें असलें पाहिजे व तें फार महत्त्वाचें असलें पाहिजे. परंतु तें पत्र सांपडत.नाहीं. परंतु मुंबईहून रघुनाथ रणसोडाचा कारकून गणेश कृष्ण ह्यानें वसईस लिहिलेलें ता. १७ सप्टंबर इ. स. १७८८ चें बातमीपत्र उपलब्ध झालें आहे. त्यांत मेडोज गव्हरनरची चांगली माहिती दिली आहे. ह्या पत्राचे शेवटीं नवीन गव्हनर रयतेस फार चांगला आहे, व त्यानें धान्याचे भाव सावकारांस सांगून स्वस्त केले आहेत, असा उल्लेख आहे. जनरल मेडोज ह्याच्या चांगुलपणाची कीर्ति इंग्रजी ग्रंथांतरींही प्रसिद्ध आहे.*

---

* मेडोज ह्यास मुंबईस गव्हरनर नेमिलें त्यापूर्वी, सुप्रसिद्ध वक्ता उइल्यम पिट ह्यानें, ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांस पुढील पत्र लिहून मेडोज ह्याविषयीं शिफारस केली होती, ती वाचण्यासारखी आहे:—

DOWNING STREET, AUG. 17-1787.

"Gentlemen,—In our conversation a few days ago, I thought it my duty to suggest to you the great importance (as it appears to me on a variety of accounts) of sending some person of eminence and particularly a military man as Governor and Commander-in-Chief to Bombay, and I was induced particularly to call your attention to General Medows, whose character and services seem peculiarly to qualify him for that most important post &c. &c." —*W. Pitt.*

मुंबईचें पत्र पैवस्ती मुक्काम वसई. श्री. पैवस्ती चंद्र २६ जिल्हेज.
चंद्र १९ जिल्हेज मंदवार. भाद्रपद सन तिसा समानीन.

"सेवेसी गणेश कृष्ण शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत चंद्र १६ जिल्हेजपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. मेजर जनरल उइल्यम मेडोस या मरातबेचे नांवाचे आहेत. चाळीस वर्षांचें वय आहे. समागमें अजम कर्नल आबांडक्रमी नांवें दिवाण आणि याखेरीज लिहिणार तिघेजण आहेत. पादशाही तर्फेचा आहे. खंडखोतीचा नाहीं. सर्व अधिकार त्याकडे आहेत आणि स्वसंतोषें कारभार करावा. कंपनीचा व कौन्सिलदारांचा दरकार पडत नाहीं. परंतु कौन्सिलदार तिघेजण जुन्यांपैकीं. करार केले:—अजम रॉबर्ट स्पार्क, व अजम जॉन ग्रीन, व अजम कारनकी पेशजी साष्टीस चीफ होते ते, हे कौन्सिलदार ठरले. जनरलाचे समागमें विलायती तरांडीं दोन आलीं, त्यांत लढाईचे उपयोगी लोक पांचशेंपर्यंत आले; व अगोदर अजम करनेल हटली मद्रासेहून आले, त्यांजसमागमें वगैरे मद्रासी व विलायती मिळोन उजळ कातडीचे तीन हजार व एक हजार अगोदरचे येथें आहेत. एकूण चार हजार टोपीवाले व गारदी, कवायती शिपाई, अजमासें साहा हजारपर्यंत सिद्ध आहेत. नूतनही ठेवितात. अजम जनरल भाद्रपद शुद्ध ७ मंदवारीं दोन प्रहर दिवसास मुंबईस दाखल झाले. लढाईचें सामान तयार आहे, परंतु मासपक्षांत जाणें होईल असें दिसत नाहीं. मोहीम हैदरावर (?) आहे. निमित्य कीं तालचरीस त्याचा वेढा आहे. त्याची व यांची लढाई सुरू झाली, असें बारीक ऐकण्यांत येतें. यास्तव येथून कुमक उजळे एक हजार आजच दोहों तरांडेयांत चढले. उदईक हकारतील. येथें अंवई घातली आहे कीं, लोक उगेच बसून खर्च खातात; यास्तव मद्रासेचे बेगमीस रवाना होतात. परंतु तालचरीस जातील. हल्लीं नवा जनरल आला, तो रयतीस फार चांगला आहे. तांदूळ दर फरा सव्वादोन रुपयेप्रमाणें धारण होती, ती हल्लीं ताकीद सावकारांस करून, दर फरा रुपये १॥= दीड रुपया दोन आणेप्रमाणें केली. वरकड विशेष ल्याहावें सारिखें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

## लेखांक १०.

ह्या पत्राची ता. १९ सप्टंबर इ. स. १७८८ ही आहे. हें बातमीपत्र आहे.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १८ जिल्हेज जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असों विशेष. धर्मोजी जासुदाबरोबर पत्रें पाठविलीं आहेत. त्यांजवरून बारीक मोठें सविस्तर कळलेंच असेल. जाबसाल कलमवार पाठविले पाहिजेत. यानंतर अलीकडील वर्तमान त्याचा तपशील:—

विलायती चवथें जाहाज आलें. त्याजमध्यें गोरे लोक सुमार तीनशें आलेत. मिस्तर

स्प्राक यासी हुकूम आली आहे कीं, सुरतेची सरदारगिरी करावी ऐशी आज्ञा. परंतु मशारनिल्हे स्प्राक यासी आज सहा सात महिने जाहालेत, विलायतेस गेला. कळावें.
कलम. १

येथें बातमी आहे कीं फत्तेसिंग गायकवाड व्यसनभूत फार झाला आहे व मनस्वी कारभार चालला आहे व सरदारलोकही नाखूष आहेत. कां जर एक सरदार चांगला मारून टाकिला ऐसें वर्तमान इंग्रेज लोक बोलत आहेत. कळावें. कलम. १

मिस्तर डेव्हिड स्काट विलायतेस आहेत. हल्लीं तेथील मुत्सद्दी जाहाला आहे. अब्रू विशेष झाली आहे. पेशजी पत्राचे जाबसाल मशारनिल्हेस जाऊन पोहोंचले असते तर ये वेळेस येथें सरकारकामांत उपयोगी येता. परंतु मर्जीस गोष्ट आली नाहीं. असो.
कलम. १

बेलापुरचे सुभेदार याजवळ सालगुदस्तची बाकी नक्त रुपये ४१ व साडेसात मण भात बाकी राहिली आहे, तेविषयीं आज्ञा त्यास दिलीच असावी. परंतु बाकी व दोन प्यादे अद्यापि आले नाहींत. कळावें. कलम. १

बंगालेहून पत्रें आलींत त्यांजवरून येथें खलबतें होऊं लागलीं. बारकाईनें बातमी ध्यानीं आणितां, येथून बंगालेस लिहून गेलें होतें कीं, मालवणसंबंधीं हरकत फार होत आहे व मनस्वी निर्भयपणें वर्तणूक करून कराराप्रमाणें ऐवजही हातास लागत नाहीं. पत्राचे जाबसालही वळत नाहीं. त्याजवरून उत्तर आलें कीं तुमचे ठरावांत येत असल्यास मालवण कबज करावें. सबब मालवणावर जावयाची मसलत ठरावांत आणीत आहेत. त्याजवर पुढें जें होईल तें कळेल. कलम. १

तालुकदार यांसी सरकारांतोन आज्ञा, आमचे विद्यमानें हरएक मुंबईतील कामकाज घेत जावें ये विषयींची, ताकीद जाहाली न जाहाली हें कळलें नाहीं. कलम. १

घर बांधावयाकरितां सोट सुमार ८० व मागील वेतनाची सोय कृपा करोन विनंती केल्याअन्वयें लौकर करून घेतली पाहिजे. ठिकाण अजिबाद राहावयापुरतें नाहीं. त्यांत घर फारच जीर्ण, याजकरितां कृपा केली पाहिजे. तिजाई माफीची सोई ठीक दिसत नाहीं. आपले तंव ध्यानीं आलेंच असेल. जुनी सनद वसईहून आली म्हणजे पाठवून देतों. सारांश, हर कशी आपण सोई करून दिली पाहिजे. वारंवार आपणांस श्रम कोठवर द्यावे. कळावें. कलम. १

सदरहू सात कलमें लिहिलीं आहेत. ध्यानीं आणून यजमान स्वामींचे कानावर घालोन उत्तरें लौकर पाठवीत गेलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ११.

हें पत्र ता. २७ सप्टंबर इ. स. १७८८ रोजीं लिहिलेलें आहे. हें महत्वाचें असून ह्या पत्रामध्यें नवीन गव्हरनर मेडोज ह्याच्या कारकीर्दींतील नवीन व्यवस्थेविषयीं अनुकूल उल्लेख केला आहे. हें पुरवणीपत्र असून रघुनाथ रणसोड

यानें पुण्यास आपल्या बाळकृष्ण लक्ष्मण नामक कारकुनास लिहिलें आहे असें दिसतें. नाना फडणविसांच्या कारकीर्दींत प्रत्येक अधिकाऱ्याचा व हुद्देदाराचा एखादा खात्रीचा इसम पुणें येथें राहत असे. त्यास महत्त्वाची गोष्ट लिहून त्याचे मार्फत नानांस व श्रीमंतांस कळविण्याचाही परिपाठ असे.

श्री.

"पुरवणी राजश्री बाळकृष्ण लक्ष्मण मुक्काम पुणें गोसावी यांसः—

उपरी मुंबईकडील बातमी पेशजीं लेहून गेली आहे. त्या अलीकडील वर्तमानः—तरी राजश्री जगन्नाथ दादाजी येऊन सांगितलें कीं, जनरल मुंबईस दाखल जाहाल्यापासून तमाम बंदर मजकूरचे कारखानेहायची खबरदारी करून, जेथील चौकशीमुळें सरंजाम कमी त्या कारखानदारास सांगोन, तरतूद करवीत आहे. सावकारी सुरळीत चालावी, प्रजेस उपद्रव किमपि कोणाचा जाजती होऊं न पावे याप्रमाणें आहे, व रात्रदिवस खुद्द आपण व जागले दोन विलायती एकूण तीन असामी, किल्ला व शहर देखील फिरून (बंदोबस्त) करितात व नवीन शिबंदीचा शेरा पेशजी दर रुपये ६ हल्लीं जास्ती रुपये २ एकूण आठ प्रमाणें केला आहे, ऐशी बातमी आहे. पुन्हांही मशारनिल्हेस बंदर मजकुरीं रवाना केलें आहे. बारकाईनें बातमी निघेल ते काढोन, मागाहून लेहून रवाना होईल. जाणिजे. चंद्र २६ माहे जिल्हेज सुमा तिसा समानीन मया व अलफ बहुत काय लिहिणें. (मोर्तबसुद.)"

## लेखांक १२.

हें ता. १२ आक्टोबर इ. स. १७८८ चें पत्र आहे. ह्या पत्रामध्यें नवीन गव्हरनर मेडोज ह्याच्या चालीरीतींविषयीं उल्लेख आहे, व इतर खाजगी व राजकीय बातम्या आहेत.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ मोहरम जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असो विशेष. रामजी व यादवजी व कुसू ऐसे तिघां जासुदांबराबर पत्रें पाठविलीं आहेत. पावोन सविस्तर कळलेंच असेल. परंतु आज पंधरा दिवस जाहालेत, जाबसाल अद्यापि आले नाहींत. हल्लीं बारीक मोठें वर्तमान ह्याचा तपशीलः—

नवा जनरल याची चाल ध्यानीं आणितां, विचार अथवा खलबत करणें तें कर्नल आबरक्रांबी व कर्नल हरिसन व कर्नल हटली विलायतेहून हल्लीं आले आहेत, त्यांजशीं होत असतें. वरकड टोपीकर जुने मुत्सद्दी व कारकून मंडळी फारच आहेत, त्यांजशीं फारसें बोलणें नाहीं व सहसा कोणाची भेटही होत नाहीं. हरएक गोष्टीचा मथितार्थ मशारनिल्हे कर्नल यांचे अनुमतानें करून, मग कौन्सिलचे दिवसीं कौन्सिल भरोन ठरावांत आणितात. कौन्सिलदार ह्मणाल तर मिस्तर स्पार्क व मिस्तर कारनकी व

मिस्तर ग्रीन, जनरलसुद्धां चारजण बसतात. जनरल याची कृपादृष्टि सरदारी लोकांवर मात्र दिसती. याप्रमाणें चाल धरली आहे. यापुढें कशी होईल ती पाहावी. कलम. १

आह्मीं कर्नेल हाटली याजवळ व मिस्तर ग्रीन ऐसे उभयतांसीं नूतन स्नेह लाविला आहे. पुरती खलास ध्यानास आली ह्मणजे आपणांस लिहून पाठवूं. कळावें. कलम. १

मिस्तर मालीट येथें आलेत. आज दाहा रोज जाहालेत. जनरल याच्या तीन चार भेटी जाहाल्यात. कारभार आंतील ध्यानीं आणितां, मिस्तर मालीट यांजवळ जनरल यांचें खलबत फारसें अद्यापपर्यंत झालें नाहीं. पेशजी मिस्तर बाडम यांजवळ हमेशा होत होतें, तसें हल्लीं दृष्टीस पडत नाहीं. आह्मी मिस्तर मालीट याची भेट घेतली. पृच्छा घेतां बोलिलेत कीं, पांचा साहा रोजीं फिरोन पुण्यास जाऊं. त्यास आज दाहा रोज जाहालेत. सारांश, जनरल यांची रजा झाली ह्मणजे निघोन जातील. दिसोन येतें कीं चहूं पांचे रोजीं जातील. कळावें. कलम. १

कारलेकर मामलेदार बेलापूर याजकडेस सालगुदस्त पैकीं बाकी रुपये १५८ एकशें अठावन्न व भात मण सोळा याची निक्षून ताकीद देवावी व साल मजकूरचे नक्त रुपये व भात येविषयींही सरकारचें पत्र हल्लींच पाठवावें. कां जर पुरचे मामलेदार यासी लबाडी मांडली आहे, महिने फार गुदरावून पुरती झाडून बाकी देत नाहीं. तर पत्र पाठवावें. कळावें. कलम. १

आह्मांविषयीं सरकारची थैली अजम जनरल वुइल्यम मेडीहौस यासी पाठवाल, त्याची नक्कल आह्मांस पाठविली पाहिजे. कलम. १

मसलतीचा भाव बारकाईनें शोध घेतां, लक्ष तों कर्नाटकेवर खरें आहे; परंतु त्यांत ही कल्पना प्राप्त जहाली आहे जे, भिलामलाय (?) हें ठिकाण फ्रान्सेजाचें होय. मागां तेथें फार करून वस्ती नव्हती. हल्लीं फ्रान्सेज यांनीं बंदिस्त चांगली करून, बंदोबस्ती यथास्थित करून, लोकांची जमाबंदी फारच ते ठिकाणीं केली आहे. हमेशा ते बंदरीं फ्रान्सेजांचीं तरांडीं येत असतात. इंग्रजांस व त्यांस सलूख तों चालतो. ऐसें असतां इंग्रज त्यांचा विश्वास काडीमात्र धरीत नाहीं. त्यांत बारकाईनें इंग्रजांस बातमी आहे कीं फराशीस यांचा अंतस्थ विचार आहे जे, विलायत येथें आपला सलूख दाखवून परभारें मुंबईवर घाला घालावा हें लक्ष. परंतु कोणते समयीं हा भाव ध्यानीं आला नाहीं, त्या अर्थी न कळे. टिपूचा व इंग्रेजांचा बेबनाव जाहाल्यावर टिपूस साहित्य करील अथवा परभारें हरएक ठिकाणावर घालील, ऐसा पुढील विचाराची छालणूक होत आहे. त्यांत द्रव्याची जमाबंदी अद्यापि जाहाली नाहीं, याजकरितां त्वरित मसलतीचा उठाव दिसत नाहीं. पातशाहाचा हुकूम आहे कीं, आपलीं ठिकाणें आहेत तेथील बंदोबस्ती यथास्थित जाहालीयानंतर, कर्नाटक येथील मसलत उभी जाहालीयावर ठीक पडेल. ऐसी आज्ञा जाहाली आहे. याजमुळें विचार पोक्त जाहल्याशिवाय पाय पुढें चालवितील ऐसें बारकाईनें समजोन जाहीर केलें आहे. कळावें. कलम. १

सरकारचें पत्र आमचेविषयीं विनंती केल्याअन्वयें जरूर पाठवावें. कळावें. कलम. १

सरकारचीं पत्रें हरएकविषयीं आह्मांजवळ यावीं, जाबसाल आम्हीं द्यावा, येविषयीं वारंवार विनंती केलीच आहे. परंतु तसें अद्यापि होत नाहीं. तर हें ठीक दिसतें कीं काय ? हल्लीं जनरल याचे पत्राचे जाबसाल परभारें आलेत ! तर येविषयीं बंदोबस्त केला पाहिजे. कळावें. कलम. १

सोट्याची सनद लिहिल्याअन्वयें लौकर श्रीमंतांस विनंती करून व वेतन हे हरदू जाबसाल धर्मोजी जासुदाबरोबर जलदीनें पाठविले पाहिजे. कां जर वसईहून सोटे येतील कधीं व घरास कार्यास उपयोगी केव्हां पडतील ? हें ध्यानीं आणून जलदी केली पाहिजे. कळावें. कलम. १

सदरहू कलमें नव जाहीर केलीं आहेत. श्रीमंतांस दाखवून उत्तरें पाठवावीं. बाब इंग्रेजाचे दरबारची बातमी दुसऱ्यास मिळणें कठीण. त्यांत नवा जनरल याची बारकाई बाहेर फुटत नाहीं. आह्मी युक्तीनें प्रयत्न व श्रम करून इंग्रेज लोकांचे पोटांतून बातमी काढितों. एकनिष्ठेनें चालतों. यापुढेंही चाकरी बजावून दाखवावी हा आमचा हेत. ऐसें असतां, अद्यापपर्यंत आमची चाकरी रुजू पडत नाहीं. श्रीमंतांचीं कृपापत्रें यावीत ते आज दिवस एकही आलें नाहीं. तेव्हां पुढें आमचा निभाव कसा होतो ? खर्च वेंच तो बाळगिल्याशिवाय स्वरूप नाहीं. ऐशास, हा सर्व भाव आपण ध्यानीं आणून जाबसाल सविस्तर ल्याहावा. जेणेंकरून जीवास जमयेत होईल व हुशारी प्राप्त होईल ऐसे बाब केले पाहिजे. मिस्तर मालीट यांनीं आपणास सलाम लिहूं सांगितला आहे. कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १३.

हें पत्र ता. १२ डिसेंबर १७८९ चें आहे. ह्यांत तालचरीकडील मोहिमीच्या बातम्या आहेत.

श्री.

"सेवेसी रघुनाथ रणसोड मुक्काम मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १३ रबिलावल जाणून आपले कृपेंकरून सुखरूप असों विशेष. पेशजी धरमू व यमाजी जासुदाबरोबर सेवेसी पत्रें पाठविलीं आहेत. बारीक मोठें सविस्तर समजलेंच असेल. उत्तरें आलीं नाहीं. तर लौकर जाबसाल देऊन जासुदाची रवानगी केली पाहिजे. यानंतर हल्लींचे बातमीचा तपशील:—

येथून दीडलक्ष रुपये बाणकोटास जातात ह्मणून रवाना जाहालेत; परंतु सदरहू रुपये तालचेरीचे खर्चास गेले आहेत. गवगवा न व्हावा याबद्दल बाणकोटचें नांव घातलें, कळावें. कलम. १

तालचेरीचे लोकांस भातें, डाळ, तांदूळ वगैरे येथून बतेले भरून मुबलक रवाना होत असे. कलम. १

मनवर ( man of war ) व गुराब तालचेरीस जातील येतील, इतक्यांत संयोग पाहून मालवणाकडेस अकस्मात् भिडतील, असा बेत दिसतो. कलम. १.

बाबा; आह्मी घरासंबंधीं फार अजीज आहों. सोव्याविषयीं व मागील वेतनाविषयीं सोई लौकर केली पाहिजे. पुढें अखेरी आली. स्मरणार्थ वारंवार लिहितों. कलम. १.

आमचेविषयीं सरकारची थैली इग्रजांस पेशजीं लिहिल्याअन्वये पाठवावी व माम-लेदारास श्रीमंत नानांची ताकीद कीं, सरकारचें काम मुंबईसंबंधीं आमचे हातानें घेत जावें. कलम. १.

अजम टिपू मीया याचे फौजेचा चांद कालिकोटचे दरम्यान व मंगळौर येथें फारच फौजा उतरल्या आहेत. तालचेरीवरून कैनानोरास फौजा जावयासी मार्ग मागतो, इंग्रेज देत नाहीं. याजवर पुढें काय कर्तव्य होईल तें कळेल. कलम. १.

विलायतेहून दोन मनवर पांचांपैकीं येथें दाखल जाहाले. जलदीनें करामत होत आहे. बाकीचे मनवर मागाहून येतील. कळावें. कलम १.

हल्लीं पलटणें झाडून तयार जाहालीं आहेत. एक पलटण गोरे लोकांचें व कांहींक नवीन लोक येथें राहणार. आठां पांचा रोजीं पलटणें गलबतावर चढवावयाचा बेत आहे. रवानगी तंव तालचेरीस आहे. किती पलटणें जातील याचा सुमार मागाहून लिहून पाठवू. पलटणें येथून जातात हा बोभाट घालीत नाहीं गुप्त कारभार चालला आहे. टिपूस व इग्रजास अद्यापपर्यंत लढाई नाहीं. याउपरी काय होईल तें कळवूं. कळावें. कलम. १.

सदरहू लिहिलेअन्वयें कळावें. राजश्री सदाशिवपंतीं श्रीमंतांचा कौल पाठविला पोंचला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक १४.

ह्या पत्राची ता. २८ डिसेंबर इ. स. १७८८ ही आहे. हें पत्र रघुनाथ रणसो-डाचा कारकून बाळकृष्ण सदाशिव खेर ह्यानें पुण्यास लिहिलें आहे. ज्याचे नांवें लिहिलें आहे, त्यास 'श्रीमंत राजश्री बाबा' असें ह्मटलें आहे. हें पत्र फार मनोरंजक असून त्यावरून नवीन गव्हर्नर मेडोज ह्याच्या शिस्तीची व कडकपणाची साक्ष पटते. माहीम येथें दरवडा पडला होता. त्यांत कांहीं पनवेलकर सोनारही होते. त्यांस कल्याण येथील सुभेदाराच्या हुकुमानें मुंबईचा इंग्रज कोतवाल हालीडे ह्यानें कैद केलें होतें. ज्या सोनारांचा संबंध नव्हता, ते सोनार सोडून दिले. परंतु माहिमच्या दरवड्यांत सांपडलेले लोक विनाकारण प्रतिबंधांत ठेविले. त्यांची सेशनामध्यें चौकशी करून खटल्याचा निकाल व्हावा ह्मणून जनरलानें हुकूम दिला. पेशव्यांच्या वकिलास हे गुन्हेगार आपल्या ताब्यांत पाहिजे होते. परंतु माहिमवर इंग्रजी अंमल असल्यामुळें नवीन जनरलानें ते पेशव्यांच्या ताब्यांत न देतां, तुह्मी इंग्रजी सेशनापुढें फिर्याद करून न्याय घ्या, असा त्यानें आग्रह

धरिला. पैका मराठ्यांचा असल्यामुळें न्याय चुकला व चोर निरपराधी ठरले तर तो बुडेल, ह्या भीतीनें रघुनाथ रणसोडाच्या कारकुनानें, पुण्याहून पेशव्यांचें पत्र येईपर्यंत, खटला तहकूब व्हावा ह्मणून प्रयत्न चालविला. परंतु नवीन गव्हरनरापुढें उपाय नाहीं ह्मणून त्यानें चिंताग्रस्त होऊन हें पत्र लिहिलें आहे. ह्या पत्रावरून 'शासन' (Sessions) हा इंग्रजी शब्द मराठींत ह्या वेळीं कसा प्रचलित झाला होता, हें चांगलें दिसून येतें. ह्या पत्रांतील दरवड्याच्या खटल्याचें पुढें काय झालें तें समजण्यास मार्ग नाहीं.

श्री.

श्रीमंत राजश्री बाबा स्वामींचे शेवेसीः—

"पोष्य बाळकृष्ण सदाशिव खेर मुक्काम मुंबई चरणावर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत मार्गशीर्ष वद्य १४ पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. आज शनवारीं आह्मांस जनरलसाहेब यानें हुकूम केला कीं, आपले माहिमचे दरवड्याशिवाय दुसरे पनवेलकर सोनार लोक, खुने ह्मणोन कल्याणचे पत्रावरून कैद केले होते. ते घेऊन जावें. माहिमचे दरवड्यांतील चोर देत नाहीं. याप्रमाणें आज सांगितलें. येविषयींचें उत्तर अजम नानासाहेब यांस अजम पालनारसाहेब याजकडे लिहितों. परवां सोमवारीं शासन आहे. तेथें तुम्ही फिर्याद करून, या चोरांवर अन्याय ठरेल त्याप्रमाणें पारिपत्य होईल म्हणोन सांगितलें. हे चोर तिकडे यावयाचे नाहींत. याप्रमाणें उत्तर होऊन, हालड्डीसाहेब कोतवाल यासी सांगितलें कीं, शासनांत याचा न्याय करून पारिपत्य शास्त्राबमोजीब करावें असें रुबरु झालें, आणि आह्मी हालडीकडे आलों. आह्मी जनरल याजवळ व हालडीजवळ बोललों कीं, पैका यजमानांचा, त्यांस लेहून उत्तर आल्याशिवाय मजला न्यायास उभें राहावत नाहीं. त्यास तुह्मी चोहों पांचां रोजांत लिहून आणवावें. त्यावरून लिहिलें आहे. त्यानें आह्मांस नादीं लावून ठेऊन शेवटीं अशी गोष्ट केली! पुढें याचें कसें करावें? आमच्यानें तोड निघोन न्याय तूर्त न ठरे तैसें करितों. परंतु येथें निरुपाय गोष्ट! कोणाचें बोलणें चालत नाहीं. त्यास याचें कसें करावें तें लिहून पाठवावें. जर न्याय चुकला ह्मणजे पैका बुडाला, असें आहे. येविषयीं दोन चार वेळां लिहिलें, परंतु त्याचें कांहींच उत्तर आलें नाहीं. हल्लीं एकाएकीं असें सांगितलें. त्यास पुण्याचीं पत्रें आलीं असल्यास पाठवावीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

ह्या चौदा पत्रांवरून मराठ्यांचा मुंबईचा वकील रघुनाथ रणसोड ह्याची व त्या वेळच्या इंग्रजी राजकारणांची वाचकांस अस्पष्ट तरी कल्पना येईल अशी आशा आहे. रघुनाथ रणसोडाचा संपूर्ण पत्रव्यवहार उपलब्ध झाला, तर कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी जगापुढें येतील व मुंबईच्या इतिहासांत त्याची कितीतरी भर पडेल. परंतु तूर्त तरी तशी आशा करण्यास जागा नाहीं.

पाटीलबावासीं दोन चार वेळां बोलिलों. आपाजीरावही होते. त्यास काशीचे मजकुराचा जाबसाल स्पष्ट कांहींच सांगितला नाहीं. लांबणीचे जाबसाल बोलतात कीं, ही गोष्ट केल्यानें सर्वां यवनांस वांकडें वाटेल. अस्फतदौले व इंग्रेज एक आहेत. त्यापक्षीं त्यांचीही इंग्रजांस भीड पडेल. अशीं पर्यायाचीं बोलणीं बोलतात. परंतु आह्मी हेंच उत्तर करीत आहों कीं, हें काम करावेंच लागेल. येणेंकरून आपला सर्व हिंदूंत नक्ष होईल व सरकारसेवाही थोरलीच घडेल, कीर्तिस्पद होईल. अशीं उत्तरें करीत आहों. पक्केपणें त्यांचें उत्तर होईल, त्याप्रमाणें मागाहून लिहून पाठवूं. मथुरावृंदावन येथील मजकूर, पातशाई फरमानें करून आणावयाचे मसुदे केले आहेत. दोहों चहूं रोजांत दिल्लीस पाठवून सनदा करून आणवितों. याप्रमाणें बोलले आहेत. होऊन आलियावर सेवेसी रवाना करूं. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना."

ॐ ॐ ॐ

## ७. दादासाहेबांचा तळेगांवचा करार.

### श्रीसांबः सपुत्रो विजयते.

ता. ३ फेब्रुवारी इ. स. १७७९.

"करार जाबता शफथपूर्वक राजश्री दादासाहेब यांचा, राजश्री माधवराव नारायणपंत प्रधान यांसी, विद्यमान राजश्री तुकोजी होळकर व महादजी शिंदे. सु॥ तिसा सबैन मया व आलफ. तुह्मां आह्मांसी नाना प्रकारें विग्रह राज्यलोभास्तव वाढून, आह्मीं दौलत साधावी यास्तव प्रयत्न बहुत केला. इंग्रजांकडे जाऊन, त्यांस सहाय करून, बरोबर घेऊन इंदुरीं तळेगांवपर्यंत आलों. परस्परें लढाईचा प्रसंग घडला. आंदेशा पाहतां आपण राज्यलोभाविष्ट जाहल्यानें इंग्रजांकडे दौलत जाते असें जाणून, उभयतां सरदारांवर अकत्यार ठेऊन, सरदारांकडे आलों. सरदारांनीं, खर्चाची बेगमी करून देतों आणि स्नानसंध्या करून स्वस्थ रहावें, असें सांगितलें. त्याप्रमाणें मान्य करून, खर्चाची बेगमी आलाहिदा नेमणुकीप्रमाणें नक्की बारा लक्षांची जागा लावून दिली; ती आपण घेऊन स्नानसंध्या करून झांशीस राहूं. राज्याचा लोभ धरून दौलतीचा वारसा करणार नाहीं, व दौलतीस वांकडें पडे असें आचरण आह्मांपासून होणार नाहीं. नेमणूक करून दिली त्यांत सत्कालक्षेप करून स्वस्थ राहूं. तुह्मी पंतप्रधान राज्याचे धनी, व चिरंजीव राजश्री बाजीराव रघुनाथ, तुमचे कारभारी करून द्यावे, असें उभयतां सरदारांचे व आमचे विचारें ठरून आह्मी मान्य जाहलों. तुह्मी व चिरंजीव बाजीराव यांनीं, तीर्थरूप कैलासवासी नानासाहेब, व भाऊसाहेब धनी व कारभारी याअन्वयें वर्तत होते, त्याप्रमाणें प्रवुद्धपण आल्यावर परस्परें वर्तावें. स्वामीसेवकधर्म उभयतांनीं अन्योन्य निष्कपटपणें चालवावा. धनीपणाची व कारभाराची पुस्तपन्हा तुह्मां उभयतांची उभयतां सरदार करितील. आह्मी या दौलतसंमंधीं कारभाराच्या प्रकर्णांत एकंदर मन घालणार नाहीं. वर्तणुकीच्या कलमबंदीची याद आलाहिदा लिहून दिली आहे त्याप्रमाणें आचरण करूं. उभयतां सरदारांचे विद्यमानें परस्परें करार ठरले आहेत, त्याप्रमाणें तुह्मांकडून

अमलांत यावें. आह्मांकडूनही येईल. यांत अंतर करूं, तरी श्रीसांबाची व गंगाभागिरथीची शफथ असें जाणून. चंद्र १५ मोहरम सु॥ तिसा सबैन मया व आलफ मुक्काम इंदुरीं तळेगांव."

॰ ॰ ॰

## ८. दादासाहेबांचें दुर्वर्तन.

रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब पेशवे ह्यांचें आचरण चांगलें नसून परस्त्रीविषयीं अभिलाषबुद्धि त्यांच्या मनांत वसत असे. त्यांनीं कित्येक स्त्रियांवर बलात्कारही केल्याचे उल्लेख आहेत. अर्थात् अशा पापी पुरुषास साहाय्य केल्याबद्दल इंग्रज लोकांसही वाईट वाटत असे. दादासाहेबांस सुरतकर इंग्रजांच्या बंदोबस्ताखालीं ठेविलें होतें. तेथें त्यांनीं पापाचरणें आरंभिलीं. ही गोष्ट जनरल गॉडर्ड ह्यांचे कानावर गेली. तेव्हां त्यांस दादासाहेबांचा फार तिटकारा येऊन, त्यानें सुरतकर इंग्रजांस ठपका दिला. ता. ६ आक्टोबर इ. स. १७८१ च्या एका पत्रामध्यें पुढील मजकूर आढळतोः—

"श्रीमंत राजश्री दादा यांणीं नागर ब्राह्मणाची मूल जबरदस्तीनें धरून आणिली. तेव्हां त्या मुलीच्या आईबापानें प्राण दिला. हें वर्तमान गाडरास कळलें. तेव्हां सुरतवाल्या इंग्रजांवर गाडर रागें भरोन बोलला जे, तुमच्या स्वाधीन राघो केला असतां बदफैलीच्या गोष्टी होतात; तुह्मांस काय ह्मणावें ? त्याजवरून सुरतवाला रागें भरोन ह्मणों लागला जे, ब्राह्मण होऊन याच्या बुद्धीस भ्रंश जाहला. मग बंदोबस्ती करून वाड्याबाहेर निघों देत नाहीं. वाड्यांत राहावें ऐसें जाहलें आहे."

॰ ॰ ॰

## ९. पुण्याचा वकिलमुतालकीचा दरबार.

महादजी शिंदे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत अद्वितीय पराक्रम गाजवून दिल्लीपती शहाअलम बादशाहा ह्यांस गुलामकादराच्या कांचांतून सोडविलें व बादशाहाची पूर्ण कृपा संपादन केली. त्या वेळीं बादशाहानें प्रसन्न होऊन, त्यांच्या बहादुरीबद्दल, श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांच्या नांवें, वकिलमुतालकीची सनद व नालकी पालकी वगैरे बहुमान दिले, व खुद्द पाटीलबावांसही कित्येक सन्मान अर्पण केले. ते बहुमान घेऊन पाटीलबावा मोठ्या विजयानंदानें दक्षिणेंत आले. ते ता. १२ जून इ. स. १७९२ रोजीं पुण्यांत येऊन दाखल झाले. त्या वेळीं श्रीमंत पेशवे व त्यांचे दिवाण नाना फडणवीस ह्यांनीं त्यांच्या स्वागतपूर्वक भेटी घेतल्या. शिंद्यांची व पेशव्यांची मोठ्या थाटानें भेट झाली. ह्या भेटीचें वर्णन नाना फडणविसांनीं गोविंदराव काळ्यांच्या पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे. तें वाचनीय आहे. तें येणेंप्रमाणेः—

"विनंती ऐसीजे. 'राजश्री पाटीलबावा जांबगांवींहून निघोन ज्येष्ठ वद्य अष्टमीस पुण्यानजीक खडकीच्या पुलावर येऊन मुक्काम केला. नवमीसह दशमी सायंकाळचे पांच घटका दिवस राहतां, श्रीमंतांचें दर्शन घ्यावयाचा मुहूर्त निश्चयांत आला. इकडून श्रीमंत गणेशखिंडीपावेतों सामोरे गेले. तिकडून पाटीलबावा आपले बराबरील सरदार घेऊन आले. इकडील मुत्सद्दी मंडळी व सरदार मंडळीच्या व त्यांच्या भेटी झाल्या. नंतर पाटीलबावा येऊन श्रीमंतांचे पायांवर डोई ठेऊन भेटले. श्रीमंतांनीं आपले गळ्यांतील मोत्यांची माळ पाटीलबावांचे गळ्यांत घातली. येणेंप्रमाणें समारंभानें भेट बहुत चांगली झाली. यापूर्वी भेट झाल्याचें सरासरी लिहिलें, तपशील समजावा सबब हल्लीं लिहिलें असे. ह्मणोन आज्ञा.' त्यास श्रीमंतांचे ताळे विचित्र कीं, असे बराबरीचे सरदार दिग्विजयी होऊन, येऊन पायांवर डोई ठेऊन भेटतात. याच्या आखबारा रुमशामपावेतों मिरवतात. या पुण्याईस जोडा नाहीं. वर्णन किती करावें? याचा संतोष मोठा झाला. येथील मंडळींत आह्मांस सांगावयास अति तेज. बंदगान अली व मध्यस्थास सांगितलें. त्यांसही खुषी झाली. जसें व्हावें तसें झालें. उचित तें घडलें. आह्मी येथें पुसावयाचें स्थळ ह्मणोन उमदा लहान थोर वर्तमान पुसतात. सांगितलें पाहिजे. यास्तव पुढें होईल त्याची बरचेबर लिहिण्यास आज्ञा होत जावी. रवाना चंद्र ११ जिल्काद हे विनंती."

ह्याप्रमाणें भेट झाल्यानंतर बादशाहाकडून आणलेल्या किताबती व सन्मान पाटीलबावांनीं मोठ्या समारंभानें श्रीमंतांस अर्पण केले. हा समारंभ मराठ्यांच्या वैभवाचा द्योतक असून तो फारच अपूर्व झाला. तो इतिहासांत 'वकिलमुतालकीचा दरबार' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. नाना फडणविसांनीं ह्या लोकोत्तर समारंभाचें सविस्तर वर्णन निजामाकडील वकील गोविंदराव काळे ह्यांस लिहिलें आहे. त्यांनीं त्याचा अक्षरशः उल्लेख करून नानांस अभिनंदनपत्र पाठविलें आहे. तें फार मनोरंजक आहे. तें येणेंप्रमाणें:—

श्री.

"विनंती ऐसीजेः—'बादशाहाकडून वकील-मुतलकी व अमीर-उलउमराव ह्मणजे मीरबक्षीगिरी यांचा बहुमान आणिला आहे. तो घेण्याविषयीं राजश्री पाटीलबावांनीं विनंती केली. त्यावरून घ्यावयाचा निश्चय झाला. डेरा देऊन फर्मानबाडी करून, आषाढ शुद्ध तृतीया शुक्रवारीं तिसरे प्रहरीं, श्रीमंतांची स्वारी डेरादाखल झाली. प्रथम पातशाही फर्मान मस्तकीं वंदून मुनशीजवळ दिला. त्यांनीं भर दरबारांत वाचला. सर्वांनीं श्रवण केला. त्यांत, गुलामकादर यानें बेअदबी केली; त्याचें पारपत्य बादशाही नोकर बहुत होते परंतु कोणीं केलें नाहीं. श्रीमंतांचे सरदार माहादजीराव शिंदे यांनीं करून बंदोबस्त केला. याजकरितां हें पद पुस्तदरपुस्त दिलें असे. येविषयीं फार विस्तारें लिहिलें. तें सर्वांनीं ऐकिल्यावर वकील-मुतलकी व अमीरुलउमराची खिलत, चारकुबा व जिगा, शिरपेंच व परिंदा, कलगीमय लटकण व माळा मरवारीद

व कलमदान, ढालतरवार व मोरचेल, नालखी, पालखी झालरदार, शिक्के कटार, व माहीमरातब, तमनतोग हत्ती, घोडा समेत, बहुत आदरेंकरून घेतली. श्रीमंतांनीं एकशें एक मोहोर पातशाहास नजर ठेविली. पाटीलबावांनीं श्रीमंतांस एकावन्न मोहोरा नजर डेऱ्यांतच केली. तोफा व गाड्याच्या सिलका ( सलाम्या ) झाल्या. त्याजवर सरकार वाड्यांत येऊन सर्वांनीं नजरा केल्या. राजश्री कल्याणराव कवडे व बाबाराव व कृष्णजी देवाजी व आनंदराव रघोतमराव यांजकडील यांनीं नजरा केल्या, व सर्वांनीं आदाब बजाविली. समारंभ चांगला झाला. तुह्मांस कळावयाकरितां लिहिलें ह्मणोन आज्ञा.' ऐशियास पत्रे पाहून अति संतोष झाला. आनंद कोठें माईना. पत्रीं विस्तार किती ल्याहावा ? श्रीमंत वैभवशाली. विचित्र पुण्याई. कधीं झाल्या नाहींत त्या रकमा चालून आल्या. श्री मुबारक करो, व याहून पदव्या अधिक प्राप्त होतील. फर्मानां येतील. गुलामकादराचें पारपत्य कोणाच्यानें झालें नाहीं, तें राजश्री माधवराव शिंदे यांनीं केलें. हे रकम आह्मीं येथें बोलण्यांत आणिली नाहीं. वाईट वाटावयाचीं कारणें ! पाटीलबावांनीं एकावन्न मोहोरा नजर करून आदाब बजाविली. येणेंकडून एकनिष्ठपणाचें त्यांचें महात्म दिगंतरास गेलें. खानदानास उचित तें त्यांनीं केलें. आपण व पाटीलबावांनीं आदाब बजाविली, मग राजश्री कल्याणराव व बाबाराव कृष्णजी देवाजी यांचा गुंता काय ? मार्ग पदाच्या स्वरूपाप्रमाणें घातला. इतकें न होतें तर तितकेंच उणें दिसतें. पृथ्वीपति व इतर यवन व मराठे राजे यांस आदाब कराव्या, त्यापरीस हे ब्राह्मण प्रभू, सहस्र वांटे प्रशस्त. पदास आदाब बजवावी लागती, ठीक झालें. हाच मार्ग शेवटपर्यंत चालावा. आपले व पाटीलबावांचे कारकीर्दीत ह्या गोष्टी भारी झाल्या. कीर्तीचे ध्वज झाले. हें आपल्यास व पाटीलबावांस मुबारक असो. रवाना चंद्र २२ जिल्काद हे विनंती.''

ॐ ॐ ॐ

## १०. नाना फडणविसांस फळझाडांचा शोक.

नाना फडणविसांस फळझाडांचा फार शोक असून त्यांनीं पुण्यामध्यें फार सुंदर बगीचे केले होते. नाना फडणविसांची मेणवली येथील बाग अद्यापि प्रसिद्ध आहे व तेथील नामांकित आंबे अद्यापि अस्तित्वांत आहेत. त्यांनीं नानाप्रकारचीं विलायती फळझाडें आणवून, त्यांची लागवड करण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. निरनिराळ्या फळझाडांचीं रोपें व त्यांच्या संबंधाच्या माहितीचीं टिपणें त्यांनीं परदेशस्थ लोकांकडून मुद्दाम आणविलीं होतीं. लेचीच्या झाडाचें पुढील टिपण मासल्याकरितां येथें देतों:—

श्री.

''याद. अजम मेस्त मिंगेल साहुकार मुंबईकर यांजकडून लेचीचीं कलमें बाळकृष्ण

सदाशिव खेर मु॥ पनवेल यांचे विद्यमानें पुण्यास आलीं. छ. १६ जमादिलावल. सुमा-मयातैन व अलफ. त्या झाडांची क्रिया. झाडें सुमारें २.

१ तांबडी, जमीन असेल तेथें लावावीं.

१ दक्षणचें ऊन तीन चार वर्षें लागूं नये.

१ लहान झाडें आहेत तों एक दिवसाआड पाणी द्यावें.

सदर्हूप्रमाणें मुंबईहून लिहून आलें आहे."

ह्यावरून निरनिराळ्या फळझाडांची लागवड करून बागबगीचे सुधारण्याकडे मराठ्यांच्या मुत्सद्यांचें चांगलें लक्ष होतें असें दिसतें.

❀ ❀ ❀

## ११. नाना फडणविसांचा चित्रसंग्रह व दिल्लीची कारागिरी.

नाना फडणवीस ह्यांची बुद्धिमत्ता व शहाणपण ह्यांची इतिहासांत जशी तारीफ केलेली आहे, त्याप्रमाणें त्यांच्या रसिकतेची व सद्वस्तुसंग्रहप्रियतेची तारीफ करणें अगदीं रास्त आहे. त्यांनीं एतद्देशीय व परदेशीय चित्रकलाकुश-लांकडून नाना प्रकारच्या सुंदर तसबिरी व कलाकुसरीचे जिन्नस मिळविण्याचा फारच दीर्घ प्रयत्न केला होता. त्यांच्या संग्रहाचें वर्णन त्यांच्या चरित्रांत योग्य प्रसंगीं आह्मी देणार आहों. परंतु त्यांच्या रसिकतेचा मासला दाखविण्यासाठीं फक्त दोन तीन पत्रें येथें सादर करितों.

पहिलें पत्र, दिल्लीचे वकील हिंगणे ह्यांचा कारभारी शंकराजी सखदेव ह्याचें आहे. ह्या पत्रावरून दिल्लीच्या चित्रकारांकडून नानांनीं तसबिरी आणविण्याचा प्रयत्न केल्याचें दिसून येतें. ह्याच पत्रामध्यें पाणिपतच्या लढाईमुळें दिल्लीच्या नामांकित कारागिरांची काय स्थिति झाली होती, त्याचेंही खरें वर्णन दिलेलें आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंती सेवक शंकराजी सखदेव कृतानेक सा० नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता. छ १९ माहे सफर मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे वि-शेष. कृपा करून छ १० सवालचें पत्र पाठविलें, तें छ १९ जिल्हेजीं पाऊन शिरसा वंदून सनाथ झालों. पत्रीं आज्ञा कीं, 'आह्मांस श्रीच्या चित्रांचे मुरक्क्यांची[1]' गरज आहे. याकरितां दिल्लींत निधामल वगैरे जुने कारीगरांच्या हातच्या तसबिरा श्रीकृ-ष्णाच्या बहुत चांगल्या मेळवून. विकत घेऊन, त्यांस सोनेरी हासिया[2] करून, त्याची वही बांधवून, बहुत मावजतीनें[3] पाठवावे. पैका पडेल तो पाठवून देऊं. परंतु तारीफलायक

१ मुरक्का=बांधीव पुस्तक (album). २ हासिया=किनारी. ३ मावजत=काळजी, सुरक्षितपणा.

चित्रें मेळवून पाठवावीं ह्मणून पत्रीं आज्ञा.' त्यास निधामल ह्मणून [1]मुसवर हिंदु, अहमदशाहा पातशाहाचे अंमलांत येथें होता, त्याची निष्ठा ईश्वरचरणीं बहुत होती. ह्मणून श्रीकृष्णाची वगैरे देवांच्या तसबिरा हमेशा करीत होता, व त्या समयीं [2]काईत, क्षत्री, मुतसद्दी, खालसेवाले वगैरे वकील लोक मातबर होते. तेही श्रीच्या तसबिरा करवीत होते. त्या अलिकडे अबदालीची गर्दी झाली. त्यामुळें निधामल दिल्लीहून उठोन लखनऊस गेला. तेथें मृत्यु पावला. त्याचे पुत्र लखनऊस दोघे आहेत. त्यांपैकीं एक तो केवळ [3]नाकारच आहे. एक कांहींसी मुसवरी करितो. परंतु त्याप्रमाणें नाहीं. ह्मणून श्रवणांत आलें आहे. त्यास येथें सेवकानें तलास केला. परंतु आपले पाशीं राजश्री देवराव तात्यांनीं श्रीकृष्णाची तसबीर दिधली आहे, त्याप्रमाणें आतां तशा तसबिरा मिळत नाहींत, व कोणी हिंदु कारीगरही नाहीं. मुसलमान कारीगर आहेत. ते या काळाप्रमाणें तसबिरा करितात. श्रीकृष्णाचे ध्यानाची तसबीर आपल्या पसंतीयोग्य करितां येत नाहीं. ऐसे कारीगर आहेत. याहीवर आज्ञेप्रमाणें आजपावेतों तलाश केला; ऐशी जुनी तसबीर हातीं लागली नाहीं. पुढेंही तलाशांत आहें. श्रीकृष्णाच्या तसबिरा हातीं लागल्यास सेवेसी आज्ञेप्रमाणें तयारी करून पाठवीन. या दिवसांत येथें कोणी जुने लोक हिंदु मातबर राहिले नाहींत. कुल उपासामुळें व बेरोजगारीमुळें लखनऊकडे चांगला कारीगर वगैरे कसबी लोक उठोन गेले. बहुत मृत्यु पावले. कांहीं त्यांचे वंशींचे आहेत. ते नाकारे! याप्रमाणें दिल्लीची अवस्था जाली आहे. पहिली दिल्ली लोकांनीं पाहिली होती, ते आतां राहिली नाहीं. नांव मात्र राहिलें आहे. रविसंक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं लोभ करावा. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

दुसरें पत्र, पुरंदरे ह्यांच्या घरच्या चित्रांबद्दल कुसाजी गोविंद साठे ह्यांस लिहिलेलें आहे. ह्या पत्रावरून नानांनीं, सरदार लोकांच्या घराण्यांतील चित्रें युक्तीनें आणविण्याचा कसा प्रयत्न केला होता, आणि सरदार लोकांतही बज्याबा नाना पुरंधऱ्यासारखे रसिक सरदार होते, हेंही व्यक्त होतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"सेवेसी कुसाजी गोविंद साठे सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ वैशाख व॥ १३ गुरुवार पावेतों स्वामींचे कृपेंकरून वर्तमान उत्तम असे विशेष. स्वामींचें पत्र आलें. तेथें आज्ञा कीं, बज्याबा पुरंधरे यांचे घरीं पूर्वी नानापासून चित्रांचा संग्रह आहे. आह्मांस ठाऊक आहे. त्याचा शोध त्यांजकडील कारभारी बोलावून, आमचें अंग न समजतां, जीं चित्रें असतील तीं ह्माडून घेऊन, लिहून पाठविणें ह्मणोन.आज्ञापत्र आलें. त्या वेळेस

१ मुसवर=चित्रकार. २ काईत=कायस्थ. ३ नाकार=नकर्ता, निरुपयोगी.

सासवडीं कारकुनापासून तों कारभारी यांचे घरीं लग्नें. ते झाइून तासगावांस गेले आहेत. दुसरा माहितगार कारकून सध्यां त्या मुलाजवळ नाहीं. त्यावरून मुजरद पत्र लेहून, दोन गडी कारभारी यांस आणावयास पाठविले आहेत. आले ह्मणजे शोध करून जीं (चित्रें) असतील तीं झाइून घेऊन, सेवेसी लेहून पाठवीन. नानांचे वेळेचा खिजमतगार जुना, नेहमीं, बज्याबाची कन्या आंबीकराचे घरीं दिल्ही आहे, तिजबरोबर असतो. बहुतां दिवसांचा आहे. त्यास मीं पुसलें. त्याणें सांगितलें कीं, नाना होते तोंपर्यंत त्यांस हौस येविसीं फार होती. संग्रह होता. अलीकडे बज्याबापासून कांहीं (चित्रें) लोकांनीं नेलीं व कांहीं आहेत. ऐसें त्याणें सांगितलें. असल्यास, गुंता तिळप्राय न पडतां, त्यांचे घरची मातुश्री उमाबाई–आबाची स्त्री–यांजकडे स्वामींचें अंग न दिसतां, असतील तीं जमा करून सेवेसी लिहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

तिसरें पत्र, पाराशर दादाजी ह्यांचें आहे. ह्या पत्रावरून नानांनीं तसबिरा मिळविण्याचा प्रयत्न, खुद्द जयपूरच्या राजाजवळही केला होता असें दिसतें. हें पत्र येणेंप्रमाणेंः—

श्री.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक पाराशर दादाजी सा० नमस्कार विज्ञापना. येथील कुशल छ. २५ रबिलाखर यथास्थित असे विशेषः—आपण कृपापत्र पाठविलें तें पावलें. 'राजश्री आनंदराव गंगाधर यांस उत्तम तसबिरा पाठविण्याबद्दल तुह्मांस सूचना करण्याकरितां लिहिलें होतें. त्यांनीं तुह्मांस सांगितलें. तुह्मीं दिल्लीस तसबिरा आणावयाकरितां पाठविलें. त्यास तेथें खाजगी कोणाचे घरीं असल्या, तर माहितगारीनें हस्तगत जाल्या तर होतील. जयपूरकरांचे घरीं तसबिरा फार चांगल्या (आहेत.) ही पक्की बातमी बहुत दिवस आहे. येविसींचें सविस्तर आनंदराव यांसी लिहिलें आहे. त्याअन्वयें युक्तीनें केल्यास येतील.' म्हणोन आज्ञा. त्यास आनंदराव यांनीं आपले आज्ञेप्रमाणें सांगितलें. त्याजवरून जयपुरींही कारभारी यांसी लेहून कारकून पाठविले आहेत. राजाचे भेटीचेंही बोलणें आहे. त्या संधींतही शोध करूं. दिल्लीस शोधाकरितां मुजरद परीक्षक पाठविले आहेत. यत्नास आळस होणार नाहीं. दिल्लीस हुंडीही रवाना केली आहे. आनंदराव सविस्तर लिहितील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## १२. सुजाउद्दौल्याचा मृत्यु.

अयोध्येचा इतिहासप्रसिद्ध नबाब सुजाउद्दौला हा, ता. २६ जानेवारी इ. स. १७७५ रोजीं मृत्यु पावला, असें इंग्रजी इतिहासांत लिहिलें आहे. ह्यानें अयोध्येचें राज्य इ. स. १७५४ पासून इ. स. १७७४ अखेर ह्मणजे सुमारें २० वर्षें केलें. ह्याच्या मृत्यूबद्दल निरनिराळ्या गोष्टी प्रचलित आहेत. 'अयोध्येचे नबाब' ह्या पुस्तकामध्यें तत्संबंधानें पुढील उल्लेख केलेला आहेः—

"सुजाउद्दौला ह्याच्या मृत्यूबद्दल दोन निरनिराळ्या दंतकथा प्रचलित आहेत. 'सियारुल मुताखरीन' ग्रंथामध्यें असें लिहिलें आहे कीं, हाफिज रहिमतखान ह्याचा वध करून रोहिलखंड काबीज केल्यानंतर सुजाउद्दौल्यानें, हाफिज रहिमत ह्याच्या लावण्यवती कन्येवर वाईट दृष्टि ठेविली, आणि तिच्या पातिव्रत्याचा भंग करण्याचा प्रयत्न केला; ह्मणून तिनें गुप्त रीतीनें आपल्या जवळ विषदिग्ध कट्यार घेऊन, ती सुजाउद्दौल्यावर चालविली. तिचें सविष टोंक त्याच्या शरीरांत जाऊन त्यास जखम झाली व त्यामुळें तो बरेच दिवस आजारी पडून मृत्यु पावला. मि० कार्नेजी ह्यांनीं सुजाउद्दौल्याच्या मृत्यूचें कारण, त्याच्या विरुद्ध पक्षाची कलकत्ता कौन्सिलमधील सरशी हेंही दिलें आहे. पण तें संभवनीय दिसत नाहीं."—**अयोध्येचे नबाव, पृ. ५६.**

ह्या संबंधानें आह्मांस एक अस्सल पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून सुजाउद्दौल्याच्या मृत्यूचें खरें कारण व त्याची खरी तारीख व्यक्त होते. हें पत्र बुंदेलखंडचे सुभेदार इतिहासप्रसिद्ध गोविंदपंत बुंदेले ह्यांचे पुतण्ये व गुलसराई संस्थानचे मूळपुरुष दिनकर बाबूराव खेर ह्यांचें आहे. हे नानांस लिहितातः—

**श्री.**

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक दिनकर बाबूराव सां॥ नमस्कार विनंती येथील कुशल ता॥ पौष वद्य ११ पर्यंत मुक्काम काल्पी स्वामींचे कृपेंकरून क्षेमरूप असो विशेष. बहुत दिवस कृपापत्र येऊन परामर्ष होत नाहीं. तरी सदैव कृपा करून पत्रद्वारें परामर्ष करीत असलें पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरः—नबाब सुजाउद्दौला ह्यांनीं हफीजखान रोहिले यांची लेक जबरदस्तीनें आणिली. तिणें पेशकबज चालविलें. तें मांडीवर लागू जाहालें. तेणेंकडून दोन तीन मास आजार झाला. उपाय बहुत केला, परंतु कुपथ्यामुळें सिद्ध न झाला. बहुत आजारी झाले. तेव्हां रोहिलखंडचा बंदोबस्त करून, अंतरवेद अनुपगीर गोसावी यांस इजारा देऊन, खांसा लखनऊस गेले. तेथें देवाज्ञा झाली. महिना दीड महिना होत आला. लेक वडील मिरजा आमानी याणें बंदोबस्त केला; बाहेर वर्तमान जाऊं न दिल्हें. आजपर्यंत संशयांत होतें. हल्लीं पक्की बातमी आली. त्यावर रोहिले यांणीं आपलीं ठाणीं रोहिलखंडांत बसविलीं. गोसावी याणें अंतरवेदीचे माहाल जमीदारांचे स्वाधीन करून, आपण लखनऊकडे जाणार. अंतरवेदींत फौज नाहीं. दुंडी जमीदारांनीं केली आहे. अशांत देशची फौज पांच हजार असती, तर प्रांताचा बंदोबस्त होऊन सरकारचा अंमल होता. सविस्तर विदित व्हावें ह्मणून लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

ह्या पत्राची मिती पौष वद्य ११ ह्मणजे ता. २७ जानेवारी इ. स. १७७५ ही येते. अर्थात् ह्या तारखेच्या अगोदर महिना दीड महिना सुजाउद्दौला मृत्यु पावला असें दिनकर बाबूराव लिहितात. त्या अर्थीं इंग्रज इतिहासकारांनीं दिलेली ता. २६ जानेवारी इ. स. १७७५ ही तारीख चुकीची ठरते.



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] आक्टोबर १९०८. [अंक ३ रा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# ऐतिहासिक चरित्रें.



## १. चांदबिबी.



गुणाः पूजास्थानं गुणिषु न लिंगं न च वयः ।

*　*　*　*　*

" Few in England know that the contemporary of our Queen Elizabeth in the Deccan kingdoms was a woman of equal ability, of equal political talent, of equal, though in a different sense, education and accomplishments; who ruled over a realm as large, a population as large, as intelligent, and as rich as England; a woman who, surrounded by jealous enemies preserved by her own personal valour and endurance her kingdom from destruction and partition ; who, through all temptations and exercise of absolute power, was at once simple, generous, frank, and merciful as she was chaste, virtuous, religious, and charitable–one who, among all the women of India, stands out as a jewel without flaw and beyond price."

—*Meadows Taylor.*

*　*　*　*　*

हिंदुस्थानच्या इतिहासांत शौर्यपराक्रम, बुद्धिचातुर्य, राजकारणकौशल्य, सदाचारसंपन्नत्व, स्वदेशप्रीति, स्वामिनिष्ठा, भगवद्भक्ति इत्यादि अनेक सद्गुणांच्या योगानें प्रसिद्धीस आलेलीं मानवरत्नें पुष्कळ आहेत; परंतु त्यांचीं चरित्रें प्रसिद्ध नसल्यामुळें त्यांचा उज्वल कीर्तिप्रकाश असावा तितका दृग्गोचर नाहीं. तथापि स्वदेशाच्या इतिहासाचीं अस्सल साधनें जसजशीं उपलब्ध होतील, तसतसा ह्या लोकोत्तर मानवरत्नांचा प्रकाश अधिकाधिक खुलल्यावांचून राहणार नाहीं. ह्या रत्नावलीमध्यें भाग्यशाली राजे लोक, विक्रमशाली योद्धे, कर्तृत्ववान् मुत्सद्दी, कलाकौशल्यपटु शिल्पकार, भगवद्भक्तिपरायण साधुसंत, प्रतिभासंपन्न कवी, संगीतशास्त्रप्रवीण गायनाचार्य, औदार्यशाली धर्मात्मे किंवा विविधशास्त्रवेत्ते पंडितवर एवढेच नुसते नाहींत, परंतु त्यांच्या योग्यतेच्या व त्यांची बरोबरी करणाऱ्या अनेक स्त्रियाही तींत समाविष्ट होण्यासारख्या झाल्या आहेत. त्यांचीं चरित्रें, कमजास्त प्रमाणानें, फार मनोरंजक व बोधपर आहेत. तीं अस्सल कागदपत्रांच्या किंवा परभाषेंतील इतिहासग्रंथांच्या साहाय्यानें जेव्हां प्रकाशांत यतील, तेव्हां रसिक वाचकांस फार आल्हाद झाल्यावांचून राहणार नाहीं. अशा मानव-

रत्नांमध्यें अहमदनगरची प्रख्यात व रणशूर राणी चांदबिबी हिची गणना करण्यास हरकत नाहीं. हिची अल्प माहिती येथें सादर करितों.

चांदबिबी ही लोकोत्तर स्त्री, विजापुरचा सुप्रसिद्ध बादशाहा अली आदिलशाहा ह्याची पत्नी व अहमदनगरचा बादशाहा हुसेन निजामशाहा ह्याची कन्या होय. हिचा जन्म अदमासें इ. स. १५४७ मध्यें होऊन तिचें बालपण अहमदनगर येथेंच गेलें. हिचा अहमदनगर व विजापूर ह्या दोन्ही राजघराण्यांशीं अशा प्रकारचा सन्निकट संबंध असल्यामुळें, तिला ह्या दोन्ही ठिकाणीं, आपलें राजकारणचातुर्य व पराक्रमपटुत्व व्यक्त करण्याचे अनेक प्रसंग आले, व दोन्ही ठिकाणच्या इतिहासांत तिनें आपलें नांव अजरामर केलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. विजापुरचा बादशाहा अली आदिलशाहा ह्याची कारकीर्द इ. स. १५५७ पासून इ. स. १५८० पर्यंत झाली. अली आदिलशाहा गादीवर बसल्यानंतर, इ. स. १५६४ मध्यें, विजापूर व अहमदनगर ह्या दोन्ही राज्यांमध्यें तह होऊन, दोन्ही बादशाहांचें सख्य झालें. त्या वेळीं अहमदनगरच्या बादशाहानें ही लावण्यवती शहाजादी, अली आदिलशाहास अर्पण करून, सोलापुरचा किल्ला ह्या मंगलप्रसंगीं त्यास अंदण दिला. हा शरीरसंबंध इतिहासदृष्टीनें फार महत्त्वाचा झाला. त्याच्या योगानें विजापूर व अहमदनगर ह्या दोन्ही बादशाहींमधील मत्सरभाव नाहींसे होऊन दोन्हीं राज्यें एकमेकांशीं स्नेहभावानें वागूं लागलीं.

चांदबिबी व अली आदिलशाहा ह्यांचा विवाह झाल्यापासून विजापुरच्या पातशाहातीचा चांगला उत्कर्ष झाला. अली आदिलशाहा बादशाहास राज्यकारभाराचे कामीं चांदबिबीचें फार चांगलें साह्य झालें. ही राणी निसर्गतःच कुशाग्रबुद्धि असून ती सद्गुणी व राज्यव्यवहारदक्ष होती. तिनें बिकट राजकारणांत आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें आपल्या पतीस जसें साह्य केलें, त्याप्रमाणें तिनें, तुमुल रणसंग्रामामध्येंही आपल्या पतिसन्निध हजर राहून, आपल्या अपूर्व युद्धकौशल्याचें प्रदर्शन करण्यास कमी केलें नाहीं. ती युद्धकलेमध्यें चांगली निष्णात असून, प्रत्येक स्वारीमध्यें घोड्यावर बसून आपल्या पतीबरोबर जात असे. त्यामुळें अली आदिलशाहाप्रमाणें तिच्या अंगच्या शौर्यसाहसादि गुणांचाहि लौकिक सर्व राज्यामध्यें मशहूर झाला होता. तिच्या अंगीं विद्याविनयादि गुणही चांगले होते. तिला फारसी, आरबी इत्यादि भाषांचें चांगलें ज्ञान असून, कानडी, मराठी इत्यादि भाषाही समजत असत; आणि चित्रकला व संगीतशास्त्र ह्यांचीही तिला चांगली माहिती होती. अर्थात् तिच्या अंगीं स्त्रीजातीस आवश्यक असे सर्व गुण वसत असल्यामुळें ती आपल्या पतीस फार प्रिय झाली होती, व त्याचें अंतःकरण तिनें आकर्षून घेतलें होतें.

अली आदिलशाहा इ. स. १५८० मध्यें निपुत्रिक मरण पावला. मृत्यूपूर्वी त्यानें आपल्या बंधूचा मुलगा इब्राहिम ह्यास गादीवर बसवून, आपल्या पत्नीनें सर्व राज्यकारभार चालवावा अशी योजना केली होती. त्याप्रमाणें त्याच्या पश्चात् घडून आलें. सुलतान इब्राहिम हा विजापुरच्या गादीवर येऊन, चांदबिबी ही त्याच्या वतीनें सर्व राज्यकारभार पाहूं लागली. इब्राहिम आदिलशाहा ह्या नांवानें जो बादशाहा पुढें प्रसिद्धीस आला, तोच हा अल्पवयी सुलतान इब्राहिम होय. ह्याचें वय ह्या वेळीं अवघें नऊ वर्षांचें असल्यामुळें चांदबिबीनें सर्व राज्यकारभार दिवाण कामीलखान ह्याच्या साह्यानें उत्कृष्ट रीतीनें चालविला. ह्या वेळीं दक्षिणेंतील सर्व राज्यांमध्यें विजापुरचें राज्य विस्तीर्ण व मोठें होतें, व त्याची सत्ताही सर्वत्र गाजत होती. राणी चांदबिबी हिनें आपल्या नवऱ्याच्या पश्चात् विजापुरच्या बादशाहीचा लौकिक व दरारा तसाच कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. अली आदिलशाहाच्या कारकीर्दींत जशी शांतता होती व प्रजेस जसें सुख लागलें, त्याप्रमाणें आपल्या हातूनही घडावें अशी तिची प्रबल इच्छा होती. तिनें राजपुत्राच्या शिक्षणाकडे चांगलें लक्ष पुरविलें, व सर्व राजदरबारी कामें मोठ्या तत्परतेनें चालविलीं. ती न्यायाच्या कामांत अधिक दक्ष असे. बुधवार व शुक्रवार खेरीज करून, सर्व दिवशीं, ती राजवाड्यांत आपला दरबार भरवून व राजपुत्रास तख्तावर बसवून, न्यायनिवाडे स्वतः करीत असे. त्यामुळें ती प्रजेस फार प्रिय व पूज्य झाली होती. परंतु दुर्दैवानें, तिचा दिवाण कामीलखान हा, सर्व सत्ता आपल्या हातीं घेण्यासाठीं हांवभरी होऊन, राणीस जुमानीनासा झाला; व त्यानें तिचें महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न चालविला. हें कृतघ्नपणाचें वर्तन राणीच्या नजरेस येतांच, तिनें त्यास कामावरून दूर केलें, व किशवरखाननामक दुसऱ्या एका जुन्या वजीरास दिवाणगिरी सांगितली. परंतु राजसत्तेचा मोह कांहीं विलक्षण असल्यामुळें तोही लवकरच फार उन्मत्त होऊन, राणी चांदबिबी व तिचे अनुयायी सरदार ह्यांच्या विरुद्ध, बंड करण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यास दिवाणगिरीवरून काढून टाकून, बंकापुरचा सुभेदार मुस्तफाखान ह्यास त्या जागेवर नेमावें, अशी राणी चांदबिबी व तिचे आज्ञाधारक सरदार ह्यांनीं मसलत केली. परंतु ती सिद्धीस जाण्यापूर्वींच, कोणीं विश्वासघात करून, ती बातमी किशवरखानास कळविली. त्यानें, एकदम, अल्पवयी बादशाहाच्या नांवानें द्वाही फिरवून, राणी चांदबिबी हिला कैद केलें, व तिची फार अप्रतिष्ठा व मानहानि करून, तिला इ. स. १५८२ चे सुमारास सातारच्या किल्ल्यावर बंदिवासांत टाकिलें. तेव्हांपासून सातारचा किल्ला दुर्दैवी राजपुरुषांच्या बंदिवासाचें मुख्य स्थळ होऊन राहिला, अशी प्रसिद्धी आहे.

राणी चांदबिबी विजापुरांतून गेल्यानंतर सर्वत्र झोटिंगपादशाही माजली. दिवाण किशवरखान ह्याची सत्ता कोणी जुमानीनासें झालें. शेवटीं अमीर उमराव व

लष्करी लोक ह्यांनीं एकत्र होऊन दिवाण किशवरखान ह्यास विजापुराहून पिटाळून लाविलें; व पुनः चांदबिबीस साताऱ्याहून परत आणविलें. किशवरखान पुढें मारला गेला व विजापुरची दिवाणगिरी एखलासखाननामक एका हबशी गृहस्थाच्या हातांत आली. परंतु एकदा राज्याची घडी जी विसकटली, ती त्यास पुनः बसवितां आली नाहीं. 'हबशी' व 'दक्षिणी' असे राज्यामध्यें दोन पक्ष झाले, व ते परस्परांशीं मत्सरबुद्धीनें वागूं लागले. त्याचा परिणाम विजापुरच्या बादशाहीस भोगावा लागला. वऱ्हाड, बेदर व गोवळकोंडा येथील बादशाहांनीं विजापुरची पादशाही कमजोर झाली आहे असें पाहून, तिकडे स्वाऱ्या करण्यास सुरवात केली, अशा एका प्रसंगीं खुद्द विजापूर शहरास परशत्रूंनीं वेढा घातला, व विजापूर राजधानी काबीज करण्यांचा प्रयत्न केला. ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं चांदबिबी हिनें स्वतः हिंमत धरून किल्ल्याचें रक्षण केलें, व सैनिकांस प्रोत्साहन देऊन परशत्रूंची चढाई होऊं दिली नाहीं. चांदबिबीचें शौर्य व हिंमत सर्व लोकांस कळून चुकल्यामुळें, सतत एक वर्षपर्यंत वेढा पडला असतांही, सर्व सैन्यानें मोठ्या उत्साहानें व निकरानें परशत्रूशीं टक्कर दिली, व अखेर त्यासच वेढा उठवून परत जाण्यास भाग पाडिलें. ही हकीकत इ. स. १५८४ मध्यें घडून आली.

इ. स. १५८५ मध्यें पुनः अहमदनगर व विजापूर येथील बादशाहांचा शरीरसंबंध जडण्याचा योग आला. राणी चांदबिबी हिचा भाऊ मूर्तिजा निजामशाहा ह्यानें इब्राहिम आदिलशाहाची बहिण खुदिजा बेगम हिला मागणी घातली. उभयतांचा लग्ननिश्चय झाला व राणी चांदबिबी ही विजापुरच्या बादशाही वऱ्हाडाबरोबर अहमदनगरास आली. अर्थात् हें लग्न उरकून घेऊन, राहिलेलें आयुष्य स्वस्थचित्तानें ईश्वरभक्तींत घालवावें, असा तिचा संकेत होता. परंतु ह्या वेळीं अहमदनगर येथील दरबारामध्यें विजापुरापेक्षांही अधिक पक्ष व अधिक कलह माजले होते. त्यामुळें हा विवाहसमारंभ एकीकडेस राहून मूर्तिजा निजामशाहा व त्याचा मुलगा मिरान ह्यांच्या मधील कलहसमारंभ मात्र सुरू झाला; आणि पितापुत्रांची चांगली झटापट होऊन, तींत मूर्तिजा निजामशाहा ह्याचा वध झाला. ह्या प्रसंगीं प्रसिद्ध इतिहासकार फेरिस्ता हा राजवाड्यामध्यें हजर होता. त्यानें स्वतः आपल्या नेत्रांनीं पाहिलेला शोकपर्यवसायी वृत्तांत आपल्या ग्रंथांत लिहिला आहे. ह्या वेळीं चांदबिबी नगरच्या किल्ल्यांत हजर होती. तिला हा प्रसंग पाहून किती दुःख झालें असावें ह्याची कल्पना करवत नाहीं. मिरान ह्यानें आपल्या बापाचा वध करून गादी बळकाविली, परंतु लवकरच त्याचाही शिरच्छेद होऊन अहमदनगर येथें झोटिंगबादशाही सुरू झाली. अखेर तेथें मूर्तिजा निजामशाहाच्या भावाचा मुलगा गादीवर येऊन जुमालखान हा मुख्य दिवाण

झाला. परंतु ह्या बादशाहाच्या विरुद्ध विजापूर व वऱ्हाड येथील सैन्यानें प्रतिकार करून जुमालखानाचा पराभव केला, व शेवटीं विजापुराशीं तह होऊन विजापुरचें सैन्य परत गेलें. राणी चांदबिबी ही ह्या परिस्थितीस कंटाळून पुनः विजापुरास परत गेली; व तेथें तिनें शांततेंत दिवस घालवावे असा पूर्ण निश्चय केला. विजापूर येथें गेल्यावर तिचा तेथील प्रजेकडून चांगला सत्कार झाला, व बादशहानेंही तिची मानमान्यता कायम ठेविली. ह्यापुढें इब्राहिम आदिलशाहा हा वयांत येऊन राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालवूं लागला, व त्यानें, चांदबिबीनें दिलेल्या सुशिक्षणाचें चीज करून लोकास दाखविलें. इब्राहिम आदिलशाहाची कारकीर्द प्रजेस फार सुखावह झाली. विजापूर येथें 'इब्राहिम-रोजा' ह्या नांवानें ह्या बादशाहाचें स्मारक अद्यापि अस्तित्वांत आहे. असो.

इ. स. १५८७ मध्यें राणी चांदबिबी विजापुरास गेल्यानंतर, अहमदनगर येथें राज्यक्रांति होऊन, रक्तपात व मारामाऱ्या चालू झाल्या. बुऱ्हाण निजामशाहा हा अहमदनगरची गादी मिळविण्यासाठीं दिल्लीपति अकबर ह्याचें साह्य मागण्याकरितां मोंगल सैन्याकडे गेला. तो इ. स. १५८९ मध्यें परत आला, व त्यानें आपला मुलगा इस्मायल ह्याजबरोबर लढाई करून निजामशाहीची गादी परत मिळविली. त्यानें इ. स. १५९४ पर्यंत राज्य केलें. परंतु त्याच्या कारकीर्दीमध्यें सर्वत्र अंदाधुंदी, मत्सर, द्वेष व कलह ह्यांचें, साम्राज्य झालें. तो मृत्यु पावल्यानंतर दरबारांतील निरनिराळ्या पक्षांनीं बहादुरशाहा, अहमदशाहा वगैरे अज्ञ बालकें गादीवर बसवून जो तो आपल्या हातीं सत्ता घेण्याचा प्रयत्न करूं लागला. ह्या वेळीं मिया मंजू नामक एक वजनदार मुत्सद्दी पुढें आला, व त्यानें अहमदशाहाची बाजू उचलली. परंतु दरबारांतील प्रतिपक्षी त्यास हार येण्यासारखे नसल्यामुळें, त्यानें अकबर बादशाहाचा मुलगा शाहाजादा मुराद, जो गुजराथप्रांतामध्यें तीस हजार सैन्यानिशीं होता, त्यास आपल्या मदतीस बोलाविलें. दिल्लीच्या सैन्यास दक्षिणेंत प्रवेश करण्याची उत्कट इच्छा होतीच. त्यास ही संधि मिळतांच, त्यानें मोठ्या आनंदानें तिचा फायदा घेण्याचा निश्चय केला. मिया मंजू ह्यास, प्रथमदर्शनीं, आपल्या कृतीचें भावी फळ लक्षांत आलें नाहीं. परंतु बादशाही फौजा जेव्हां अहमदनगरवर चालून आल्या, त्या वेळीं त्याचे डोळे उघडले, व. त्यानें अहमदनगरच्या इतर अमीर उमरावांची सल्ला विचारिली. सर्वांनीं ह्या त्याच्या अविचारी कृत्याचा निषेध करून त्यास असा उपदेश केला कीं, ह्या संकटांतून मुक्त करण्यास कोणी जर समर्थ असेल, तर ती फक्त एक राणी चांदबिबी हीच होय. तिला ह्या वेळीं नगरास बोलवावें व तिच्या विचारानें आलेलें संकट दूर करावें. तेव्हां मिया मंजू व इतर अमीर उमराव सर्व एक होऊन, त्यांनीं विजापुरास राणी चांदबिबीस बोलावणें

पाठविलें. तिनें अहमदनगरच्या बादशाहीची संकटावस्था व शोचनीय स्थिति अवलोकन करून, उदार अंतःकरणानें साह्य करण्याचें मान्य केलें व ती विजापुराहून जातिनिशीं नगरास येऊन दाखल झाली. तिचें वय ह्या वेळीं अदमासें ५० वर्षांचें होतें; तथापि तिचा अभिमान, तिची तेजस्विता, तिचें शौर्य आणि तिचें धैर्य यत्किंचित्‌ही कमी झालें नव्हतें. तिनें नगरास येऊन सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं, आणि प्रथम सर्व सैनिक लोकांस प्रोत्साहन देऊन किल्याची तटबंदी वगैरेंचा पक्का बंदोबस्त केला; आणि मिया मंजू ह्यास गोवळकोंडें व विजापूर येथें पाठवून तिकडून कुमकेसाठीं अधिक सैन्य बोलाविलें. परंतु तिकडून कुमक येऊन पोहोंचते, न पोहोंचते तोंच अहमदनगरास इ. स. १५९५ च्या अखेरीस दिल्लीच्या फौजा येऊन दाखल झाल्या, व त्यांनीं शहराभोंवतीं वेढा घातला.

अहमदनगरचा हा इतिहासप्रसिद्ध वेढा ह्मणजे चांदबिबीच्या शौर्याचा व धैर्याच्या परिक्षेचा बिकटतर प्रसंग होय. अशा प्रकारचे संकटप्रसंग हेच लोकोत्तर माणसांच्या अलौकिक गुणांचें खरें स्वरूप कसास लावणारे निकषच होत. राणी चांदबिबी हिनें सर्व सैनिकांना उत्तेजन देऊन त्यांच्याकडून किल्याच्या प्रत्येक दरवाजाचें व बुरुजांचें निकरानें संरक्षण करण्याचा प्रयत्न चालविला. शहाजादा मुराद व त्याचे सेनापति, किल्याचा खबीर तट फोडून आंत प्रवेश करण्याकरितां सुरुंग उडविण्याची युक्ती योजूं लागले. राणी चांदबिबी हिला ख्वाजा महंमदखान शिराजी ह्याजकडून ही बातमी समजतांच, तिनेंही आंतून उलट सुरुंग तयार करवून शत्रूचा नाश करण्याचा प्रयत्न केला. शहाजाहा मुराद ह्यानें हें राणीचें अचाट कृत्य पाहून, निकरानें हल्ला करून आंतील सुरुंग तयार करणाऱ्या लोकांना चीत करण्याचा संकल्प केला, व किल्याचा खंबीर तट फोडून पुष्कळ सैन्य यमसदनीं पाठविलें. तथापि ही अचलधैर्य राणी, बिलकुल न घाबरतां, अंगामध्यें चिलखत घालून व हातामध्यें नंगी समशेर घेऊन, जेथें शत्रूंनीं तटबंदी फोडून रस्ता केला होता, त्या ठिकाणीं येऊन दाखल झाली; व तिनें आपल्या सैन्यास, आपल्या वीरश्रीनें अद्वितीय स्फुरण उत्पन्न करून, त्यांच्याकडून शत्रूच्या फौजेवर बंदुका, जेजालें व तोफा ह्यांचा एकसारखा भडिमार केला. सूर्योदयापासून सायंकाळपर्यंत ही रणशूर राणी त्या ठिकाणीं एकसारखी उभी राहिली, व तिनें शत्रूंच्या सैन्यास टक्कर देऊन त्यांचा हल्ला मोठ्या शौर्यानें परत फिरविला. त्याच्या योगानें शत्रूंच्या सैन्याची वाताहत होऊन ते वेढे उठविण्यास व तह करण्यास तयार झाले. शहाजादा मुराद हा, राणीचें अलौकिक शौर्य व विलक्षण धैर्य अवलोकन करून आश्चर्यानें थक्क झाला; व त्यानें तिचें अभिनंदन करण्यासाठीं आपले प्रतिष्ठित सरदार

तेजकडे पाठवून, तिच्या मर्दुमकीबद्दल तिला 'चांद सुलतान' असा किताब समर्पण केला. मोरोपंतांनीं ह्मटलेंच आहेः—

**अरिच्याहि सद्गुणातें प्रेमें वाखाणितात सुज्ञानी।**

हें अगदीं खरें आहे. असो. चांदबिबीनें शहाजादा मुराद ह्याच्या तहाच्या अटी प्रथम कबूल केल्या नाहींत; परंतु पुढें दूरवर विचार करून, तिनें वऱ्हाड प्रांताचें स्वामित्व दिल्लीपतीस देण्याचें मान्य करून तह केला, आणि मोंगली सैन्याच्या मगरमिठींतून कांहीं कालपर्यंत अहमहनगरची बादशाही मुक्त केली. ही गोष्ट इ. स. १५९६ मध्यें घडून आली. या वेळेपासून अहमदनगरच्या इतिहासांत चांदबिबीचें नांव सुप्रसिद्ध होऊन तिच्या शौर्यपराक्रमांची कीर्ति अखंड दुमदुमूं लागली.

ह्याप्रमाणें आलेलें परचक्र परत गेलें व अहमदनगर येथें पुन्हां स्वराज्यसत्ता चालू झाली. परंतु गृहकलहानें ती अत्यंत जर्जर झाली असल्यामुळे तिच्यामध्यें पुन्हां चांगला जोम आला नाहीं. मिया मंजू यानें पुन्हां अहमदशाहाचा पक्ष स्वीकारिला. परंतु राणी चांदबिबी हिनें बहादुरशाहा हाच खरा वारसदार आहे असें ठरवून त्याची बाजू धरिली. हा तंटा लवकर मिटेना. तेव्हां राणी चांदबिबी हिनें विजापुराहून आपला पुतण्या इब्राहिम आदिलशाहा ह्यास लढाऊ सैन्यानिशीं नगरास बोलाविलें. त्यानें निजामशाहीच्या खऱ्या वारसाची चौकशी करून बहादुरशाहा हाच गादीचा खरा मालक असें ठरविलें व त्याच्या नांवानें द्वाही फिरविली. पुढें कांहीं दिवस राज्यामध्यें शांतता झाली, आणि राणी चांदबिबी ही मध्यंतरीं झालेली अव्यवस्था नाहींशी करून, राज्यसुधारणा करण्याकडे लक्ष घालूं लागली. परंतु अहमदनगरावर दुर्दैवाची वक्रदृष्टि लवकरच होऊन, पुन्हां मोंगल सैन्यानें स्वारी केली व तेथें आपली सत्ता पूर्णपणें स्थापन केली.

शहाजादा मुराद हा इ. स. १५९७ मध्यें मृत्यु पावला, व त्याच्या मागून शहाजादा दानियल ह्याची दक्षिणच्या सुभेदारीवर योजना झाली. दिल्लीपति अकबर बादशाहा ह्याचा अहमदनगरचें राज्य काबीज करून घेण्याचा फार हेतु होता. सबब, ही त्यास उत्कृष्ट संधि मिळतांच, त्यानें त्यावर स्वारी करण्याचा हुकूम केला. राणी चांदबिबी हिनें हें प्रचंड सैन्य येण्यापूर्वीं पुन्हा एकदां विजापुरच्या बादशाहास विनंति करून व त्याजकडून सोहीलखाननामक एक अनुभवी मुत्सद्दी आणवून, अहमदनगरच्या राज्यांतील अंतर्गत कलह नाहींसे करण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याचा तादृश उपयोग झाला नाहीं. कारण, राजपुत्र दानियल हा खानखाना, राजा अल्लीखान, राजा जगन्नाथ वगैरे मोठमोठ्या योद्ध्यांसहवर्तमान प्रचंड सैन्यानिशीं, गोदावरी नदी उतरून व जागोजागीं दिल्लीपतीचा अंमल बसवून, इ. स. १५९७ च्या जानेवारीमध्यें अहमदनगरच्या राज्यावर चढाई

करून आला. दक्षिणेंतील सरदारांनीं हें महदरिष्ट आलें असें पाहून, मोठ्या निकरानें बादशाही सैन्याशीं टक्कर दिली. उभयपक्षांकडील सैन्यांच्या अनेक लढाया झाल्या, परंतु त्यांमध्यें अखेर बादशाही सैन्याची सरशी झाली. अकबर बादशाहाचा इतिहासकार अबुलफजल ह्यानें ह्या घनघोर रणसंग्रामाचें विस्तृत वर्णन दिलें आहे. त्यावरून दक्षिणेंतील सैन्याची स्थिति व पराक्रमशक्ति कशी होती ह्याचें चांगलें ज्ञान होतें.

अहमदनगरचा दिवाण निहंगखान यानें इ. स. १७९९ मध्यें बीड येथील मोंगल सुभेदारावर हल्ला करून त्या शहरास वेढा घातला व बादशाही फौजेस त्यानें अहमदनगरावर पुन्हां स्वारी करण्यास जणूं पाचारण केलें. इ. स. १७९९ मध्यें राजपुत्र दानियल व खानखाना हे अहमदनगरावर चालून आले. आणि त्यांनी हरतऱ्हेनें ती राजधानी काबीज करण्याचा पण केला. राणी चांदबिबी हिला हें निहंगखानाचें अविचाराचें वर्तन पाहून फार वाईट वाटलें; व तिनें, कोणाही दरबारी इसमावर विश्वास ठेवण्याची सोय नाहीं असें पाहून, आपल्या स्वतःच्या विचारानें, या आलेल्या संकटाचा परिहार करण्याचा संकल्प केला. बादशाही सैन्य प्रचंड व रणझुंजार असल्यामुळें त्याशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य निजामशाही सैन्यांत बिलकूल राहिलें नव्हतें. तेव्हां राणी चांदबिबी हिनें, युक्तीनें तह करून, बालराजासह जुन्नरास जाण्याचा विचार मनांत आणिला. परंतु निजामशाही सरदारांमध्यें दुफळी होऊन त्यांनीं राणी चांदबिबी हिजवर हल्ला केला, व मोंगल सैन्याचा हल्ला चालू असतांच हमीदखाननामक एका पठाण सरदारानें तिचा राजवाड्यांत खून केला. अर्थात् राणी चांदबिबी ही परलोकवासी होतांच, बादशाही सैन्यास अहमदनगर जिंकून घेण्यास फारसा वेळ लागला नाहीं. त्यांनीं तेथें दिल्लीपतीचा सत्ताध्वज संस्थापित केला, आणि सर्व निजामशाही दौलत व तेथील बालराजा बहादूर निजामशहा यांस हस्तगत करून घेतलें. दिल्लीपति अकबर बादशहा ह्यांस ह्या विजयप्राप्तीनें फार संतोष झाला व त्यानें अहमदनगर येथें आपला सुभेदार नेमून आपल्या पराक्रमी पुत्रास समक्ष भेटीस बोलाविलें. अहमदनगरचें राज्य जिंकून घेण्याची मनीषा पूर्ण केल्याबद्दल, त्यानें आपल्या विजयी पुत्राचा फार गौरव केला, आणि राजकैदी बहादुर निजामशहा ह्यास ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत आजन्म बंदिवासास पाठविलें. तेथेंच ह्या दुर्दैवी बादशहाचा अंत झाला. येणप्रमाणें राणी चांदबिबी हिच्या पश्चात् अहमदनगरच्या स्वातंत्र्याची इतिश्री झाली.

वरील वृत्तांत फेरिस्ता आदिकरून मुसलमानी इतिहासकारांच्या ग्रंथाधारानें दिला आहे. राणी चांदबिबी हिच्या शौर्याचें वर्णन व तिच्या दुःखपर्यवसायी शेवटाची हकीकत त्यांच्या वर्णनाप्रमाणें ह्यांत दाखल केली आहे. परंतु या वेढ्याची माहिती

देणारा एक अत्यंत महत्त्वाचा मराठी कागद आह्मांस नागपुरकर भोंसल्यांच्या कागदपत्रांमध्यें उपलब्ध झाला आहे. त्यामध्यें जो वृत्तांत दिला आहे, तो मनोरंजक व वाचनीय आहे. हा कागद ह्मणजे ज्या वेळीं शाहाजादा दानियल यानें अहमदनगर काबीज करून तेथें आपले प्रतिनिधी नेमिले, त्या वेळीं प्रांतांची व्यवस्था करण्याकरितां लिहिलेला फत्तेनामा आहे. तो येणेंप्रमाणेः—

"फत्तेनामा शके १५०२ विक्रमनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १ या मुहूर्तावर दिल्लीच्या फौजा दिल्लीहून येऊन किल्ले 'बाग[1]-निजाम' व शहर अहमदनगर यांसी वेढा घातला. यासी शहाजादे व अमीर व उमराव कोण कोण रवाना केले, यांची नांवनिशी बितपशीलः—

१ दानीयल शहाजादे
१ खानखाना अमीर-उल्-उमराव
१ राजे हरबंस हस-हजारी, हस हजार स्वार, साहेब नौबत.

सदरहू शाहाजादे व अमीर उमराव येऊन तख्त किल्ले 'बाग-निजाम' व शहर अहमदनगर यांसी वेढा घातला. त्यास बारा वर्षे लढाई होत होती. आंमा किल्ला व शहर फत्ते होईना. ह्मणोन पीर अवलिया बाग-निजाम साहेब दरगाह किल्ले मजकुरीं यांसी कुरनिषे[2] करून, बहुत आजिजी[3] केली जेः—आपण दिल्लीच्या बादशाहाशीं खानोजाद[4] आहों; आमां गुलाम[5] तुमचे दरगाहाचे ह्मणवितों. तर ये बाबें आपणावर मेहरबानगी करून, हुकूम सादर केला पाहिजे कीं, किल्ला फत्ते होऊन आपण तुमचा दरगाह नजरेस पाहून, तेथें खैरात[6] फकीरफुकरा[7] व नजरजान[8] करूं ह्मणोन बहुत आजिजी केली. याजबद्दल पांच सात (रोज,) रोजा[9] धरून आपणास रोटीपानी[10] मना केलें. शहाजादे, अमीर, उमराव फांकेशीर[11] राहिले. ह्मणोन अल्ली अवलियासाहेब यांस दया येऊन मेहेरबानी जाहली. सातवे रोजीं दोन पाहार रात्र गुजरली. ते वक्तीं यांस हुकूम सादर जाला कीं, (किल्ले) मजकूरचे बुरूज सुमारें २४ आहेत. त्याजमध्यें 'शीरामीर' बुरूज जो भिंगारच्या रोखें आहे, तेथें तुह्मीं खूफ येलगार[12] करणें. खुदायतौला[13] तेथें तुमचे फत्ते करील. ह्मणून हुकूम जाहला. त्यासी त्या हुकुमावरून फौजेनें येलगार खूफ केला, तों रोजा आठांमध्यें किल्ला फत्ते जाहला. फत्ते जाहलियावर किल्ले मजकुरीं दाखल होऊन, दरगाह मजकुरीं पीर अवलियासाहेब यांचे पांवें[14] पडून, तेच वख्तीं फकीरफुकरा व नजरजान करून, ते वख्तीची हकीकत लिहून दिल्लीस हुजूर पाठविली. दिगर शहाजादे मजकूर यांच्या दुष्मनास फत्ते भिस्त[15] जाहली. आणि किल्ले मजकुरीं खानखाना अमीर उमराव यांणीं

१ बाग-निजाम=हें अहमदनगरच्या किल्ल्याचें मूळ नांव. २ कुरनिष=वंदन—प्रणाम, नमस्कार. ३ आजिजी=विनंती, प्रार्थना. ४ खानाजाद=वंशज, वंशांतील गुलाम. ५ गुलाम=दास, सेवक. ६ खैरात=दानधर्म. ७ फकीरफुकरा=फकीर लोक, गरीबगुरीब. ८ नजरजान = नजरेजान = आत्मार्पण (offering of life). ९ रोजा = उपवास. १० रोटीपानी=अन्नपाणी. ११ फांकेशीर=उपासी. १२ येलगार=निकराचा हल्ला. १३ खुदायताला=परमेश्वर. १४ पांव पडून=पायां पडून. १५ भिस्त=जाहीर, माहीत. (?)

महाराज हरबंस यांस किल्ले मजकुरीं ठेऊन आपण रुखसत जाहाले. रुखसत होऊन पादशाही मुजरियास दिल्लीस गेले. दिगर चांदबिबी नामें शहाजादी अवलाद निजामशाहा पातशाहा याची बेटी, हे तमाम पातशाहीचा कारभार करीत असे. हे खबर दिल्लीस पोहोंचून दिल्लीच्या फौजा दक्षिणेस नमोद जाहल्या. याकरितां चांदबिबी नामें शहाजादी हिनें कमरबंदी करून, दिल्लीचे फौजेसीं लढाई बारा वर्षे केली. आखेर किल्ले मजकुरीं सामान दारूगोळा याचा झाडा जाहला, ह्मणोन खजीना फोडून तोफांस सोन्या रुप्याचे गोळे घडवून, तोफांचे तोंडीं देऊन, भांडण भांडली.* आणि पुढेंही भांडावें, तों पीर अवलियाची बेदुंवा जाहली. हुकूम आला कीं, तुवां जिताजोहार करून घेणें. याजवरून चांदबिबी आपल्या सहलियाँ बरोबर घेऊन किल्ले मजकुरांतून गुपितें महालास गेली. फिरोन मागतेन किल्ले मजकुरांत दाखल जाहली नाहीं. महाल मजकुरीं गुपचुप जाहली. दिगर अहमदशाहा तख्त किल्ले बेदर यांणीं जे वख्तीं भिंगारचे जमिनीवर किल्ला बांधून नमूद केला, ते वख्तीं गुपित महाल करून, महालापासून सुरुंग करून, ताहात किल्ले मजकुरांत राहा होती. ह्मणोन चांदबिबी नामें हिणें तें राहा मनास आणून, मशाला लावून, किल्ल्यांतून निघून गेली. कोणाचे नजरेस पडली नाहीं. किल्ला फत्ते होऊन दिल्लीच्या तख्तास पायजाम जाहला. महाराजे राजे हरबंस किल्ले मजकुरीं राहोन, किल्लेदारी करून, तमाम मुलुकास कौलें देऊन बंदोबस्त केला. देसाई व देशकुलकर्णी व रयत हुजूर आणून, त्यांजपासून नजरमुबारखी घेऊन, पुढें मुलुकास कौल सादर केला. आजी सबब शरीफजी भोंसले देसाई प्रांत कडेवळित यांहीं मुलाजमत करून, नजर मुबारखी होन ५०० पांचशें देऊन शिरपांव घेतला; आणि उभे राहून अर्ज केला कीं, बावन चावडींवर कांहीं मजला देशमुखीचा हक्क दस्तुर करून दिधला पाहिजे. अर्ज खातरेस आणून, बावन चावडींवर दस्तुर रोज मुकरार दोन मुरादी करून दिधले असेत. शिवाय मौजे नेपती महाल कडेवळित

१ रुखसत जाहले=परत गेले, निरोप घेतला. २ अवलाद=वंशज. ३ झाडा होणें=संपणें. ४ बेदुवा=अवकृपा. ५ जिताजोहार=जिवंत मारून घेणें. ६ सहलिया=सहली=दासी, अनेकवचन सहलिया. चांदबिबीजवळ अनेक दासी शिपाईगिरी करणाऱ्या होत्या हें प्रसिद्ध आहे. ७ गुपित महाल=हा अद्यापि नगर येथें प्रसिद्ध आहे. ८ राहा=वाट, रस्ता. ९ पायजाम=पायाचा अलंकार असा मूळ अर्थ. १० कौल=अभयपत्र. ११ नजरमुबारखी=नजर, मंगलकारक भेटीचा नजरनजराणा. १२ मुलाजमत=चाकरी किंवा भेट. १३ मुरादी=मोहोर.

* चांदबिबीनें सोन्यारुप्याचे गोळे घडवून लढाई केली, ह्या हकीकतीस प्रत्यंतरपुरावा आहे. 'अहमदनगर ग्याझिटियर' मध्यें पुढील उल्लेख आढळतोः—

"Chand Bibi is the favourite heroine of the Deccan and is the subject of many legends. Even Khafikhan mentions her having fired silver balls into the Moghal camp. The common tradition at Ahamednagar is that when her shot was expended, she loaded her guns with copper, with silver and with gold coin, and that it was not till she had begun jewels that she agreed to make peace."—*Elphinstone's History, 456.*

याजवर जमीन चावर ४ चार करार करून दिधली असे. सबब दरखास्त केली असेः—महाल मजकुरीं येऊन सरकारचें कामकाज रयेतीचें करीत जाणें, आणि इनाम इसाफती खातरजमा राखोन खाणें. दिगर महाराजे राजे हरबंस यांणीं दरखास्त झाडें निंब यांची लावणी किल्ले मजकूर दर बुरजीं एक एक केली असे. दिगर शरीफजी देशमुख अवलाद सुर्योजी बिन शाहाजी भोंसले याची असे. हा फत्तेनामा[१] किल्ल्याचा जाहला असे. सुहुर अशरीन अलफ. दस्तुर केसोराय बिन रामराय चिटनवीस अवलाद यशवंतराव विठ्ठल. ता० १ माहे जिल्काद."*

ह्या मराठी पत्रावरून दोन महत्त्वाच्या गोष्टी सिद्ध होतात, पहिली गोष्ट, चांदबिबीचा वध न होतां, ती चोरवाटेनें गुपित महालांत निघून गेली व गुप्त झाली; ती पुन्हां बाहेर आली नाहीं. आणि दुसरी गोष्ट, मोंगल अधिकाऱ्यांनीं ज्या वेळीं अहमदनगर काबीज करून घेतलें, त्या वेळीं अनेक मराठी सरदार पुढें आले. महाराष्ट्रकुलभूषण भोंसलेमंडळ ह्याच समयास पुढें सरसावलें.

---

१ फत्तेनामा=जाहीरनामा (proclamation).

* ह्या फत्तेनाम्यांतील कांहीं गोष्टींचें बरोबर स्पष्टीकरण होत नाहीं व त्यांचा फेरिस्ता आदिकरून मुसलमानी इतिहासकारांनीं दिलेल्या माहितीशीं मेळ जमत नाहीं. ह्याचीं कांहीं उदाहरणें येणेंप्रमाणेंः— (१) १५०२ विक्रमनाम संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदा म्हणून जी मिती दिली आहे, त्या मितीस दिल्लीच्या फौजा दक्षिणेंत येण्यास निघाल्या असें लिहिलें आहे, व पुढें फौजेच्या सरदारांची नांवें दिलीं आहेत. अर्थात् हें विसंगत दिसतें. शके १५०२ म्हणजे इ० स० १५८० मध्यें अहमदनगरावर दिल्लीच्या फौजा आल्याचा उल्लेख कोठें सांपडत नाहीं. अहमदनगरचा पहिला वेढा शहाजादा मुराद ह्यानें इ० स० १५९६ मध्ये घातला. त्याचे अगोदर इ० स० १५८० मध्यें हें सैन्य नगरावर चालून येण्यास निघालें हें मानणें असंभाव्य दिसतें. (२) शहाजादा मुराद इ० स० १५९७ मध्यें मरण पावला, नंतर शहाजादा दानियल दक्षिणचा सुभेदार झाला. अर्थात् इ० स० १५८० मध्यें शहाजादा दानियल हा नगरावर चालून आला नाहीं. (३) अहमदनगरची लढाई चांदबिबी १२ वर्षें लढत होती असें म्हटलें आहे, परंतु तें बरोबर दिसत नाहीं. पहिला वेढा इ० स० १५९६ मध्यें पडला व दुसरा वेढा इ० स० १७९९ मध्यें पडला. तेव्हां चांदबिबी फार तर ४ वर्षें लढत होती, असें मानितां येईल. परंतु १२ वर्षें लढत होती असें मानणें चुकीचें आहे. (५) ह्या फत्तेनाम्याच्या शेवटीं सुहुर सन अशरीन अलफ म्हणजे इ० स० १६२० दिला आहे. त्या वेळीं हा कागद झाला असल्यास तो सन बरोबर दिसतो. अहमदनगर मोंगलांच्या ताब्यांत गेल्यावर प्रांतामध्यें स्वस्थता होण्यास इतका काळ सहज लागेल. ह्या शंकांसंबंधानें कोणी अस्सल पुराव्यानिशीं अधिक खुलासा केल्यास चांगलें होईल. एकंदरींत सनाचा घोंटाळा बाजूस ठेविला, तर ह्या कागद स्थूलमानानें फार महत्वाचा दिसतो.

वीरदेव हा गादीवर होता, असें आढळून येतें. 'इंडियन अंटिक्वेरि'मध्यें चालुक्य कुळांतला सुप्रसिद्ध राजा सत्याश्रय ऊर्फ दुसरा पुलिकेशी ह्याचे जे कोरींव शिलालेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून सातव्या शतकाच्या प्रारंभीं त्या राजानें कांची येथील पल्लव राजांचा नाश करून, चोल राजास पादाक्रांत करावें असा विचार केला होता, असें दिसतें. परंतु त्याचा हा हेतु सिद्धीस गेला नाहीं. इ. स. ६४० ह्या वर्षी ह्युएनत्संग ह्मणून जो चिनी प्रवासी हिंदुस्थानामध्यें आला होता, त्यानें चोल राजांचा कीर्तिमहिमा श्रवण केल्याचें लिहिलें आहे. त्यावरून पुलिकेशी राजाच्या हातून चोल राजाचा पराभव झाला नाहीं असें ह्मणण्यास पुष्टि येते. परंतु, ह्यापुढें मात्र, चालुक्य घराण्यांतील राजांनीं चोलमंडलावर अनेक वेळां स्वाऱ्या करून, त्यांचा नाश करण्याकरितां जीवापाड परिश्रम केले. परंतु चोलमंडलाच्या सुदैवानें, त्या घराण्यामध्यें, राजराज चोल-नामक एक महापराक्रमी राजा अवतीर्ण होऊन, त्यानें आपल्या बाहुबलानें परशत्रूंची वाताहत करून, चोल राज्य पूर्ण भरभराटीस आणून पोहोंचविलें. हा राजा गादीवर येण्यापूर्वी चालुक्य राजांनीं, चोल राजांची सत्ता अगदीं क्षीण करून टाकिली होती, व त्याचें परंपरागत श्रेष्ठत्व अगदीं लयास पोहोंचविलें होतें, असें अलबेरुनि ह्या इतिहासकारानें लिहिलें आहे. तें पुष्कळ अंशीं खरें असावें. वस्तुतः चालुक्य राजांनीं इतकी दीन स्थिति केल्यामुळें, चोल राष्ट्रास पुन्हां उदलकाल प्राप्त होईल, अशी त्या वेळीं मुळींच आशा नव्हती. परंतु 'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण' ह्या न्यायानें तें राष्ट्र पुन्हां उत्कर्ष पावलें व त्यानें आपल्या शक्तीच्या जोरावर चालुक्य राजांचा पूर्ण सूड घेतला. राजराज चोलाची कारकीर्द ह्मणजे चोलवैभवाच्या उन्नतीच्या केवळ कळसच होय. ह्यानें इ. स. ९८५ पासून इ. स. १०१३ पर्यंत सुमारें २८ वर्षें राज्य केलें. तितक्या अवधींत, त्यानें आपल्या बाहुबलानें सर्व दक्षिण हिंदुस्थान पादाक्रांत करून, लंकाद्वीपावरही चढाई केली होती. ह्याच्याच कारकीर्दींत तंजावर हें चोलराजधानीचें मुख्य ठिकाण झालें. हा राजा केव्हां मृत्यु पावला, तें निश्चित समजत नाहीं; परंतु तो हयात असतांनाच त्याचा मुलगा कुलोत्तुंग ऊर्फ राजेंद्र चोल हा इ. स. १०१३ मध्यें गादीवर बसला.

कुलोत्तुंग ऊर्फ राजेंद्र हा आपल्या बापाप्रमाणेंच महापराक्रमी व बलाढ्य राजा निघाला. ह्यानें आपल्या कारकीर्दींत चोलराजसत्तेचा पूर्ण विस्तार करून चोहींकडे आपला व्याघ्रांकित ध्वज फडकत ठेविला. त्यानें दक्षिणेकडील पांड्यदेश खालसा केला; व कांचीच्या पल्लव राजांना आपले अंकित करून सोडिलें. एवढेंच नव्हे, तर

तंजावर येथील बृहदीश्वराच्या प्रचंड देवालयामध्यें जो शिलालेख आहे, त्यावरून ह्या राजाच्या कारकीर्दींत, चोलराजसत्तेची मर्यादा वंगदेशापर्यंत जाऊन पोहोंचली होती, असें दिसून येतें. तात्पर्य, कुलोत्तुंग चोल ह्यानें आपल्या राजसत्तेचा फारच दूरवर प्रसार केला होता ह्यांत शंका नाहीं. ह्मणूनच, त्याच्या लोकोत्तर गुणांवरून त्यास 'वीर', 'राजेंद्र', 'कोव्यकेसरीवर्मा,' 'कविराजकेसरी,' इत्यादि पराक्रमद्योतक विशेषणें मिळालीं होतीं. ह्याच्या पराक्रमाच्या व तेजस्वीपणाच्या कर्णप्रिय कथा दक्षिण हिंदुस्थानांतील अनेक शिलालेख व विजयस्तंभ अद्यापि मोठ्या कौतुकानें गात आहेत. ह्यानें महाप्रबल चालुक्य वीर सोमेश्वर देव ह्याजबरोबर, तुंगभद्रेच्या कांठीं मोठें तुमुल युद्ध करून त्याचा जो पराभव केला, तो अगदीं अद्वितीय असून, त्याचें वर्णन अनेक शिलालेखांत कोरलेलें आहे. ह्याशिवाय त्यानें मदुरेच्या वीर पांड्य राजाशीं घनघोर संग्राम करून त्यास पादाक्रांत केलें; व तेथें आपल्या गंगैकोदननामक धाकट्या भावाची योजना केली. तो वीररसानें ओतप्रोत भरलेला वृत्तांत, चिदंबरम् येथील शिलालेखामध्यें सविस्तर वर्णिलेला आहे. ह्याच वैभवशाली राजानें कावेरी नदीच्या मुखांतून अनेक कालवे बांधून 'राज्यामध्यें सुधारणा केली होती. कुंभकोनम् शहराच्या पूर्वेस सुमारें दीड कोसावर, कावेरी नदीचा 'वीरकोलनारु' ह्मणून जो प्रचंड कालवा वाहत आहे, तो ह्याच राजाच्या राज्यसुधारणेचें दर्शक होय. हा मोठा रसिक व गुणग्राही नृपति होता. त्यानें आपल्या आश्रयानें कंबन्नामक एका तामिल पंडिताकडून रामायणाचें तामिल भाषेमध्यें भाषांतर करविलें होतें. हा राजा सुमारें ५२ वर्षें राज्य करून इ. स. १०६४ मध्यें मृत्यु पावला.

ह्याच्या मागून तंजावरच्या गादीवर, अनुक्रमें, वीरराजेंद्र देव (इ. स. १०६२–१०६९); कुलोत्तुंग (इ. स. १०७०–१११८); विक्रम चोल (इ. स. १११८–११३५); कुलोत्तुंग दुसरा (इ. स. ११३५–११४६); राजराज दुसरा (इ. स ११४६–११७१); राजाधिराज दुसरा (इ. स. ११७१–११७८); कुलोत्तुंग तिसरा (इ. स. ११७८–१२१५); व राजराज तिसरा (इ. स. १२१६–१२४४) असे आठ राजे होऊन गेले. परंतु त्यांच्या कारकीर्दींची विश्वसनीय व साधार अशी माहिती मिळत नाहीं.*

* चोल राजाच्या वंशावळीसंबंधानें अद्यापि निर्णय झालेला नाहीं. ह्या संबंधानें निरनिराळ्या विद्वानांचीं निरनिराळीं मतें आहेत. डॉ० काल्डवेल ह्यांच्या मतें राजेंद्र चोलाची कारकीर्द इ. स. १०६४ पासून इ. स. १११३ पर्यंत आहे. परंतु आह्मी मि० हेमिंगवे ह्यांनीं नवीन प्रसिद्ध केलेल्या तंजावरच्या ग्याझिटियरप्रमाणें चोल राजांची नामावली व कारकीर्दींचा काळ दिला आहे.

कर्नल म्याकेंझी ह्यांनीं, दक्षिण हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं शोध करून, जो प्रचंड हस्तलिखित जुन्या ग्रंथांचा संग्रह जमविला आहे, त्यांत चोल राजांसंबंधाचे 'चोलमाहात्म्य' 'चोलपर्वपट्टायम्' 'चोलदेशपूर्विकाचरित्र' असे तीन तामिल ग्रंथ निदर्शित केले आहे. परंतु त्यांतही चोल राजांची संगतवार व विश्वसनीय माहिती दिलेली सांपडत नाहीं.* तिसरा राजराज चोल इ. स. १२१६ मध्यें गादीवर बसल्यानंतर चोलराजसत्तेचा अपकर्ष झाला, आणि मदुरेचा सुंदरपांड्य राजा प्रबल होऊन, त्यानें चोल प्रांतावर आपला अंमल बसविला. पुढें पांड्य व चोल हीं दोन्हीं घराणीं शरीरसंबंधानें एक होऊन, पांड्य-चोल असें संयुक्त राष्ट्र निर्माण झालें, व कित्येक वर्षेंपर्यंत मदुरेच्या सुंदरपांड्य व वीरपांड्य ह्या राजांनीं तंजावर प्रांतावर आपलें स्वामित्व चालविलें. त्यामुळें, ह्या राजांच्या नांवापुढें सुंदरपांड्य-चोल व वीरपांड्यचोल असें उपपद जोडलेलें कोठें कोठें दृष्टीस पडतें. चोल घराण्यांतील शेवटचा राजा तिसरा राजेंद्र चोल हा होय. ह्याच्या कारकीर्दीचा काल इ. स. १२६७ पर्यंत मानिला जातो. ह्याजवर होयसाळ घराण्यांतील राजा वीरसोमेश्वर देव ह्यानें स्वारी केली होती. परंतु पांड्यराजांच्या पराक्रमामुळें ह्या राजाचा पराभव होऊन, तो इ. स. १२५४ चे सुमारास, धारातीर्थी मरण पावला. ह्यापुढें पांड्य राजांचें प्राबल्य अधिक वाढत जाऊन त्यांनीं तंजावरावर पूर्णपणें आपलें स्वामित्व स्थापन केलें. पांड्य घराण्यामध्यें इ. स. १२५१ पासून इ. स. १३२१ पर्यंत, सुंदरपांड्य, कुलशेखर पहिला, सुंदरपांड्य दुसरा, आणि कुलशेखर दुसरा, असे पराक्रमशाली राजे होऊन गेले. ह्यांपैकीं शेवटचा राजा दुसरा कुलशेखर पांड्य ह्याचे कारकीर्दींत, दक्षिण हिंदुस्थानामध्यें मोठी राजकीय क्रांति घडून आली.

बाराव्या शतकाच्या शेवटापासून चौदाव्या शतकापर्यंत, चोलमंडलावर कोण कोण राजे अवतीर्ण झाले, ह्यांची साधार माहिती मिळत नाहीं. तो काल दक्षिण हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राजांचे परस्परांतील कलह व लढाया ह्यांमध्यें गेला, असें म्हटलें तरी चालेल. अर्थात् सर्वत्र कलहाचें साम्राज्य झाल्यामुळें, उत्तरेकडून येणाऱ्या मुसलमानी राजसत्तेस विशेष जोर पोहोंचून, तिनें सर्व दक्षिण हिंदुस्थान व्यापून टाकण्याचा प्रयत्न केला. १४ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत दक्षिण हिंदुस्थानामध्यें संघशक्तीचा जोर विशेष होता, त्यामुळें परकीयांचा बिलकुल प्रवेश झाला नाहीं. परंतु ती संघशक्ती विगलित होऊन, तेथें जसजसें कलहाचें बीजारोपण जास्तजास्त होत गेलें, तसतशी परकीय सत्तेस चंचुप्रवेश करण्यास उत्तम संधि सांपडत चालली.

* Wilson's Descriptive Catalogue of the Mackenzie Collection PP. 198-203.

## २. दिल्लीचें मयूरसिंहासन.

दिल्ली येथील मोंगल बादशाहांच्या रत्नजडित मयूरसिंहासनाची कीर्ति इतिहासांतरीं प्रसिद्ध आहे. ह्या सिंहासनाचें फारसी भाषेंतील नांव 'तख्त-इ-तौस' असें आहे. ह्याचें वर्णन ट्याव्हर्नियर व बर्निअर ह्या दोन फ्रेंच प्रवाशांनीं आपल्या प्रवासग्रंथांत दिलें आहे. ट्याव्हर्नियर हा फ्रेंच प्रवासी इ. स. १६६५ मध्यें औरंगजेब बादशाहास भेटण्यासाठीं दिल्लीस गेला होता. हा स्वतः जवाहिराचा व्यापार करीत असे. त्यानें, हें दिल्लीपतीचें रत्नजडित सिंहासन स्वनेत्रांनीं अवलोकन करून, त्याचें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहेः—

"दिल्लीच्या बादशाहाचीं बहुमूल्य अशीं रत्नखचित सिंहासनें सात आहेत. त्यांपैकीं एक तर नुसत्या तेजस्वी हिऱ्यांचेंच आहे. दुसरीं माणकें, पाच व मोत्यें ह्यांनीं जडलेलीं आहेत. ह्यांमध्यें जें मुख्य सिंहासन आहे, तें पहिल्या दरबारमंडपांत ('दिवाणीआम' मध्यें) ठेविलें असून, तें लष्करी पलंगाच्या आकाराचें आहे. ह्मणजे, तें सुमारें ६ फूट लांब आणि ४ फूट रुंद आहे. ह्या सिंहासनास चार भरभक्कम असे सोन्याचे पाय असून त्याची उंची २० पासुन २५ इंचपर्यंत आहे. त्यांच्यावर चार गजांची चौकट जडलेली असून तिच्यावर सिंहासनाची बैठक ठेविलेली आहे; आणि त्यावर बारा खांब बसविलेले असून त्यांनीं, तीन बाजूंनीं सिंहासनाच्या वरील मेघडंबरीस तोलून धरिलें आहे. सिंहासनाचे पाय व त्यावरील गज हे सुवर्णाचे असून, त्यावर नाना प्रकारचे हिरे, माणकें, पाच वगैरे रत्नांचें जडावाचें काम करून, तें विशेष शोभिवंत केलें आहे. प्रत्येक गजाच्या मध्यभागीं, एक मोठें तेजस्वी माणिक बसविलें असून, त्यासभोंवतीं चारचार पाच बसविले आहेत; व त्याचा चतुष्कोणी आकार केला आहे. त्यास ओळीनें चतुष्कोणी रत्नें जोडलेलीं आहेत. त्यामुळें, चार हिरव्या रंगाच्या पाचां-मध्यें एक डाळिंबी रंगाचें माणिक, व चार माणकांमध्यें एक हिरवागार पाच ह्यांचें चारी बाजूंनीं सुंदर तेज चमकत असतें. पाच पैलूदार असून त्यांच्या व माणकांच्या मध्यें हिरे जोडलेले आहेत. हिऱ्यांचें वजन दहा किंवा बारा रतींपेक्षां अधिक नाहीं, परंतु ते चपटे असून दिखाऊ फार आहेत. कांहीं कांहीं जागीं सोन्यामध्यें मोत्यें बसविलेलीं आहेत. सिंहासनाच्या एका बाजूस, वर चढण्यासाठीं चार पायऱ्या आहेत. तख्तावर जी बिछाईत ठेविली आहे, तिच्यापकीं पाठीमागें टेंकण्याचा तक्क्या मोठा असून, बाजूच्या गिर्द्या लहान आहेत. ह्या सिंहासनास एक तरवार, एक राज-दंड, एक ढाल, एक धनुष्य व बाणांचें एक तूणीर अशीं आयुधें लटकावलेलीं आहेत;

व त्यांसही निरनिराळ्या रंगांचीं रत्नें जडून, त्यांच्या व सिंहासनाच्या रंगांत सारखेपणा आणलेला आहे.

" मीं मयूरसिंहासनाचीं मोठीं माणकें मोजून पाहिलीं. तीं १०८ आहेत. त्यांतलें अगदीं लहान जें आहे, तें निदान १०० *रती वजनाचें आहे. ह्यापेक्षांही अधिक ह्मणजे २०० रती किंवा त्याहून अधिक अशा वजनांचीं माणकें त्यांत आहेत. पाचांविषयीं विचार केला, तर त्यांत तेजस्वी रंगाचे सुंदर पाच पुष्कळ आहेत; परंतु त्यांत कांहींना कांहीं तरी दोष आहे. ह्यांपैकीं मोठा पाच ६० रती भरेल व लहान पाच निदान ३० रती भरेल. मीं पाच मोजले, ते ११६ होते. ह्यावरून माणकांपेक्षां पाचच अधिक आहेत असें दिसून येईल.

"सिंहासनावरील मेघडंबरीची आंतील बाजूही हिरे व मोत्यें ह्यांनीं भरलेली आहे व त्यासभोंवतीं मोत्यांची एक सुंदर झालर सोडलेली आहे. मेघडंबरी चतुष्कोणाकृती असून तिच्या शिरोभागीं रत्नजडित मयूर बसविलेला आहे. हा मोर सुवर्णाचा केलेला असून, त्याच्या पिसाऱ्यामध्यें निळ्या रंगाचे नीलमणी बसविले आहेत, व त्यांत इतर रंगांच्या रत्नांची जोड करून, हुबेहूब मयूरपिच्छांच्या नैसर्गिक रंगाची चमक उत्पन्न केली आहे. मोरांचें शरीर सुवर्णाचें केलें असून, त्याच्यावर नानाप्रकारचीं मूल्यवान् रत्नें जडलीं आहेत. त्याच्या वक्षःस्थळीं एक प्रचंड माणिक बसविलें असून, तेथें एक मोठें पिवळ्या रंगाचें वर्तुलाकार मोतीं लोलकाप्रमाणें अडकविलें आहे. ह्या रत्नजडित कृत्रिम मयूर पक्ष्याच्या दोहीं बाजूंस, तितक्याच उंचीचे, दोन सुवर्णखचित पुष्पगुच्छ तयार करून बसविले आहेत. त्यांमध्यें विविध रंगांचीं रत्नपुष्पें निर्माण केलीं असल्यामुळें त्यांची प्रभा नेत्रांस संतुष्ट केल्यावांचून राहत नाहीं. ह्या सिंहासनाच्या दर्शनीय बाजूस, ८०-पासून ९० रती वजनाच्या हिऱ्यांचें व इतर रत्नांचें, जें एक कमळ लाविलें आहे, तें राजाधिराजांची स्वारी सिंहासनावर विराजमान झाली, ह्मणजे तें त्यांच्या अगदीं दृष्टीसमोर येतें, व त्याच्या तेजोलहरी एकसारख्या चमकत असतात. ह्या देदीप्यदान रत्नसिंहासनामध्यें अधिक मूल्यवान् व अधिक शोभायमान

* त्याव्हर्नियर ह्यांनें दिलेल्या मयूरसिंहासनाच्या वर्णनांत रत्नांचें वजन इंग्रजी carat' मध्यें दिलेलें आहे. मराठीमध्यें 'carat' ह्यास 'रती' हा शब्द योजिलेला आहे. कारण, रत्नांच्या वजनास इंग्रजीमध्यें 'carat' शब्द प्रचारांत आहे, त्याप्रमाणें मराठींत 'रती' हा शब्द प्रचारांत आहे. परंतु 'रती' व 'carat' ह्यांच्या वजनामध्यें थोडें अंतर आहे. इंग्रजी 'carat' चें वजन ३$\frac{9}{16}$ (Troy) आहे, व मराठी रतीचें वजन २$\frac{9}{8}$ (Troy) आहे. तर ह्या लेखांतील 'रती' शब्दाचें वजन इंग्रजी 'carat' प्रमाणें समजावें.

जर कांहीं रत्नें असतील, तर तीं छत्रीच्या सभोंवतीं लाविलेल्या सुंदर झालरीचीं मोत्यें होत. ह्या मोत्यांचें पाणी फारच नामी असून, त्यांचा वर्तुलाकार अगदीं प्रेक्षणीय आहे. त्यांचें वजन प्रत्येकीं ६ पासून १० रती असलें पाहिजे. ह्या मयूर-सिंहासनापासून चार फूट अंतरावर, दोन्ही बाजूंस दोन राजछत्रें ठेविलीं आहेत. त्यांचे दंड, सातपासून आठ फूटपर्यंत उंचीचे असून, त्यांनाही हिरे, माणकें व मोतीं जडलेले आहेत. ह्या राजछत्रांचें कापड रक्तवर्णाच्या मखमलीचें असून त्याच्या सभोंवतीं मोत्यांच्या झालरी सोडल्या आहेत.

"हें मयूरसिंहासन मीं जसें पाहिलें, त्याप्रमाणें त्याचें हें वर्णन मीं दिलें आहे. हें लौकिक रत्नसिंहासन तयार करण्यास तैमूरलंग बादशाहानें सुरुवात केली असून, शहाजहान बादशहाच्या कारकीर्दींत तें पुरें झालें, असें ह्मणतात. बादशाहाच्या रत्नशालेचे जे अधिकारी आहेत, त्यांच्यापासून मला अशी माहिती समजली आहे कीं, ह्या सिंहासनाची किंमत १०,७०,००,००,००० रुपये ह्मणजे १२,०३७,५०० पौंड आहे !"

ट्याव्हर्नियर ह्यानें वर जें वर्णन दिलें आहे, त्याप्रमाणेंच बर्नियरनेंही ह्या सिंहासनाचें वर्णन केलें आहे. मात्र त्यानें, ह्या सिंहासनावर दोन रत्नखचित मयूर असल्याचा उल्लेख केला आहे, आणि त्यांचें जडावाचें कर्तृत्व 'ला ग्रेंज'-नामक एक फ्रेंच कारागिरास दिलें आहे. शिवाय, त्यानें ह्या सिंहासनाच्या किंमतीचा जो अदमास दिला आहे, त्यांतही फार अंतर आहे. बर्नियरच्या मताप्रमाणें ह्याची किंमत सुमारें ४,५०,०००० पौंड होते ! ! ट्याव्हर्नियर हा स्वतः जवाहिराचा धंदा करणारा चांगला रत्नपरीक्षक होता. तेव्हां त्याचा अदमास अगदींच चुकीचा असेल असें ह्मणवत नाहीं. असो.

ह्या अद्वितीय मयूरसिंहासनाचें वर्णन वाचून त्याच्या दर्शनाची कोणासही उत्सुकता उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. परंतु कालचक्राच्या विचित्र गतीनें, ज्या वेळीं दिल्लीची राजलक्ष्मी विलय पावली त्या वेळीं तिच्याबरोबरच हें रत्नसिंहासन हिंदुस्थानांतून नाहींसें झालें. इराणचा बादशाहा नादिरशाहा ह्यानें इ. स. १७३९ मध्यें दिल्लीवर स्वारी केली, व तेथील अपार संपत्ती लुटून नेली, त्या वेळीं त्यानें हें मोंगल बादशाहांचें लोकोत्तर राजचिन्हही हरण केलें. ह्या सिंहासनाचें चित्र तरी दृष्टीस पडावें ह्मणून आह्मीं पुष्कळ शोध केला. परंतु तें कोठें उपलब्ध होईना. परंतु शेवटीं, "Indian Antiquities" ह्या ग्रंथाचे कर्ते मि. मारिस ह्यांनीं इ. स. १८०० सालीं प्रसिद्ध केलेलें एक जुनें चित्र उपलब्ध

झालें आहे; त्याची प्रतिकृति सोबत जोडली आहे. ह्या चित्रामध्यें व ट्याव्हर्नियर ह्या प्रवाशानें दिलेल्या वर्णनामध्यें बरीच तफावत पडते. ट्याव्हर्नियरच्या वर्णनांत एक मोर आहे व ह्या चित्रामध्यें दोन आहेत! आणि त्याच्या वर्णनामध्यें १२ खांब आहेत, व ह्या चित्रामध्यें १० आहेत!! हें अंतर फार चमत्कारिक आहे. बर्नियरच्या ह्मणण्याप्रमाणें दोन खांब मात्र बरोबर जुळतात! तथापि, त्याबद्दल फारशी चर्चा न करितां, मि० मारिस ह्यांच्यावर अधिक भरंवसा ठेवून, आह्मीं हें ऐतिहासिक चित्र सादर केलें आहे.* तें पाहून वाचकांस कौतुक वाटेल व ह्या अलौकिक इतिहासप्रसिद्ध वस्तूची अल्पशी तरी कल्पना करितां येईल अशी आशा आहे.

दिल्लीपतीचें हें इतिहासप्रसिद्ध मूल्यवान् सिंहासन इराणच्या बादशाहाजवळ आहे, अशी एक अफवा १९ व्या शतकामध्यें युरोपमध्यें पसरली होती. त्यावरून, जुन्या ऐतिहासिक वस्तूंचे चहाते लॉर्ड कर्झन ह्यांनीं, इराण देशामध्यें तेहरान येथें जाऊन व तेथील बादशाहाचा जामदारखाना पाहून, या गोष्टीचा निर्णय केला आहे. त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, दिल्लीचें मयूरसिंहासन तेथें मुळींच अस्तित्वांत नाहीं.† कदाचित् त्याचे कांहीं भाग सांप्रतच्या इराणच्या बादशाहाच्या सिंहासनाचे कामीं लाविले असल्यास नकळे! सांप्रतच्या तेहरान येथील सिंहासनाची किंमत, बेंजामिननामक एका इंग्रज इतिहासकारानें अदमासें २६००००० पौंड केली आहे!! अस्तु. मयूरसिंहासनासारख्या बहुमूल्य व लोकोत्तर वस्तू ज्या आर्यावर्तांत निर्माण झाल्या, त्याच्या प्राचीन संपत्तीची कल्पना करण्यास त्याच वस्तूंचीं वर्णनें पुरे आहेत.

---

* मि० मारिस ह्यांनीं ह्या चित्राबद्दल पुढील माहिती आपल्या ग्रंथांत दिली आहे:—

"The frontispiece of this volume, exhibiting the famous peacock-throne of the Mogal Emperors of India, the subjoined account of that throne by Baron Tavernier, who saw it about the end of the last century, will probably prove acceptable to the reader. He speaks of one peacock only but two appear in this print, which was drawn, at Delhi, by an European artist in the train of Nadirshah, who on the plunder of that city in 1739, broke it to pieces, and carried the jewels that composed it, into Persia, whence they have been scattered through Asia and Europe."

—*Indian Antiquities Vol.—VII.*

† Persia by Lord Curzon Vol. I. pp. 320–22.

## मराठ्यांच्या इतिहासांतील एक अप्रसिद्ध प्रकरण.

# तंजावरचें राजघराणें.



## भाग १ ला.

### स्थलवर्णन व प्राचीन राजांची संक्षिप्त माहिती.



प्राचीन कालीं विंध्याद्रीपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेल्या हिंदुस्थानच्या त्रिकोणाकृति प्रदेशास 'दक्षिणापथ' अशी संज्ञा होती. ह्या दक्षिणापथामध्यें कर्नाटकाच्या बऱ्याच भागाचा समावेश होत असून, त्यास द्रविडदेश असें स्थूलमानानें कोठें कोठें ह्मटलें आहे. तथापि, ह्या प्रदेशाचे मुख्य तीन भाग असून, ते तेथील प्राचीन हिंदु राजांच्या ताब्यांत होते. चोल, पांड्य आणि चेर ( केरल ) अशीं दक्षिण हिंदुस्थानामध्यें जीं तीन बलाढ्य राष्ट्रें, स्वातंत्र्याच्या व वैभवाच्या शिखरास पोहोंचून, पुढें कालचक्राच्या विचित्र प्रभावानें अगदीं नामशेष झालीं, त्यांचा अंमल ह्या दक्षिण देशावर अनेक शतकें अव्याहत चालत होता. मत्स्यपुराणामध्येंही ह्या तीन राष्ट्रांची गणना दक्षिणापथांतच केली आहे.

तेषां परे जनपदा दक्षिणापथवासिनः ॥
पांड्याश्च केरलाश्चैव चोलाः कुल्यास्तथैव च ॥ १ ॥

चोल, पांड्य आणि केरल ह्या तीन देशांपैकीं, दक्षिण हिंदुस्थानामध्यें, मद्रास इलाख्याच्या पूर्व किनाऱ्यास (तेलंगणाच्या दक्षिणेस) जो भाग आहे, तो प्राचीन चोल प्रांत होय. त्याच्या दक्षिणेस, कन्याकुमारीच्या आखातापर्यंत जो प्रांत आहे, तो पांड्य देश होय. आणि, पश्चिम किनाऱ्यास जो प्रांत आहे, तो चेर अथवा केरल देश होय. ह्यासच पूर्वीं 'मलयवर' असें नांव असून त्याचा अपभ्रंश, सांप्रत 'मलबार' असा झाला आहे. ह्या तीन प्रांतांपैकीं चोलप्रांताचा प्रस्तुत विषयाशीं संबंध आहे. तंजावर प्रांतास अद्यापि तद्देशीय ग्रंथांमध्यें 'चोलमंडलम्' असें ह्मणतात. ह्याच 'चोलमंडलम्' शब्दावरून मद्रासच्या पूर्व किनाऱ्यांस 'कारोमंडल'='कारोमांडल' असें नांव प्राप्त झालें आहे.

वर सांगितलेल्या माहितीवरून प्राचीन 'चोलमंडलम्' हेंच इतिहासप्रसिद्ध

तंजावरचें राज्य होय, असें वाचकांस दिसून येईल. तंजावरचें पूर्वीचें नांव काय होतें, हें निश्चित समजत नाहीं. तथापि, जुन्या कागदपत्रांमध्यें 'जंजाऊर' असा शब्द आढळतो. त्याचा अपभ्रंश 'चंजाऊर'='चंजावर'='चंदावर'=तंजावर असा झाला आहे. तंजावरास मराठ्यांच्या कागदपत्रांमध्यें 'चंदीचंदावर' असें नांव दिलेलें प्रसिद्धच आहे. चंदी हें शिवाजीनें घेतलेल्या सुप्रसिद्ध जिंजी किल्ल्याचें नांव असून, त्याच्या लगतचा जो प्रांत त्यास, 'चंदीचंदावर' असें नांव मिळालें असावें असें दिसतें. हा प्रांत उत्तर अक्षांश ९°५०′ आणि ११°२५′ व पूर्व रेखांश ७८°५५′ आणि ७९°५५′ ह्यांच्या दरम्यान असून, त्याची चतुःसीमाः—उत्तरेस अर्काट व कावेरीचा दुसरा फांटा कोलेरून नदी; दक्षिणेस मदुरा जिल्ह्यांतील शिवगंगा जमीनदारी व तोंडमन राजाचा मुलूख; पश्चिमेस त्रिचनापल्ली आणि पूर्वेस १७० मैल लांबीचा समुद्रकिनारा; ही होय. तंजावर प्रांत अत्यंत सुपीक असून तेथील हवापाणी तर विचारावयासच नको. तंजावरासारखी आरोग्यकारक हवा व कावेरीसारखें मधुर जल सर्व मद्रास इलाख्यामध्यें इतरत्र क्वचित्च सांपडेल. ह्या दोन कारणांमुळें तो प्रांत तिकडे सर्वोत्कृष्ट गणला जातो. महाराष्ट्रामध्यें सातारा व पुणें हीं दोन शहरें, ज्याप्रमाणें उत्कृष्ट हवापाण्यामुळें व नैसर्गिक सौंदर्यामुळें महाराष्ट्राच्या अधिपतींस प्रिय होऊन राज्यकारभाराचीं केंद्रस्थानें होऊन राहिलीं, त्याप्रमाणेंच दक्षिण हिंदुस्थानामध्यें तंजावरची ख्याति आहे. त्यांतून विशेषतः सुप्रसिद्ध कावेरी नदी ह्या प्रांतांतून स्वैर विहार करीत असल्यामुळें, तिच्या विपुल व विमल जलानें, त्यास एक प्रकारें विशेष सृष्टिसौंदर्य आणि विशेष सुपीकता प्राप्त झाली आहे. वंगदेशाच्या एका भागास गंगानदीच्या बहु मुखांनीं अवर्णनीय शोभा प्राप्त होऊन, त्यास जसें 'सुंदरबन' हें नांव मिळालें आहे, त्याप्रमाणें कावेरी व कोलेरून ह्या दोन नद्यांमधील प्रदेशास 'दक्षिणेंतील नंदनवन' (The Eden of the South) असें नांव मिळालें आहे. कावेरीचे निरनिराळे कालवे आणि त्यांच्या विस्तीर्ण किनाऱ्यास गजबजून सोडणाऱ्या नारळीच्या घनदाट वृक्षश्रेणी पाहिल्या, ह्मणजे त्यास 'नंदनवन' हें नांव अगदीं यथार्थ आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. ह्या पवित्र सरितेचें माहात्म्य 'कावेरीपुराणा' मध्यें फार वर्णन केलें आहे. त्याचा विचार केला ह्मणजे तामिल भाषेमध्यें 'कावेरीआम्मा' ह्मणजे 'कावेरीमाता' असें जें, कावेरी नदीचें पावित्र्य व पूज्यभावदर्शक नांव, तद्देशीय जनांच्या मुखांतून ऐकूं येतें, तें तिच्या यशाचें द्योतक होय ह्यांत शंका नाहीं. असो. अशा सुपीक प्रदेशावर ज्या राजघराण्यांनीं पुष्कळ वर्षेंपर्यंत एकछत्री राज्य चालविलें, त्यांची थोरवी इतिहासांतरीं वर्णिलेली असावी, हें साहजिक आहे.

फार प्राचीन कालापासून तंजावर प्रांताच्या स्वामित्वाचा उपभोग चोलनामक राजे घेत असत. त्यांचा खात्रीलायक असा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. तथापि, अशोक राजाच्या वेळच्या शिलालेखामध्यें व रामायण आणि महाभारत ह्या दोन प्राचीन ग्रंथांमध्यें, चोल राजांचा उल्लेख केलेला सांपडतो. त्यावरून इसवी सनापूर्वीं २५० व्या वर्षीं, ह्मणजे अशोक राजाचे वेळीं, चोल घराणें अस्तित्वांत असून, त्याची ह्या प्रांतावर राजसत्ता चालत होती, असें व्यक्त होतें. अशोकाच्या शिलालेखांत 'चोल' ह्या नांवाऐवजीं 'चोल' असा उल्लेख केलेला आहे. त्यास, ग्रीक देशांतील भूगोलशास्त्रवेत्ते पेरिप्लस• व टालेमी ह्यांचीही साक्ष मिळते. इ. स. २१४ पासून इ. स. ९०८ पर्यंत, ह्या प्रांतावर चोलराजांचें स्वतंत्र राज्य होतें अशी माहिती मिळते. परंतु त्यांचा खरा इतिहास, इ. स. ९८५ पर्यंत, ह्मणजे राजराज चोलनामक राजाच्या कारकीर्दीपर्यंत, मुळींच उपलब्ध नाहीं. मदुरा येथील 'स्थलपुराण' वगैरे ग्रंथांमध्यें ज्या दंतकथा लिहिल्या आहेत, त्यांवरून चोल राजांचें राज्य, पांड्य राजांच्या राज्याप्रमाणेंच फार प्राचीन आहे, एवढा तर्क करितां येतो. चोल राजांची पहिली राजधानी इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत, त्रिचनापल्लीजवळ कावेरीनदीच्या कांठीं 'उरईयूर' (Uraiyur) नामक गांवीं होती. टॉलेमी ह्या ग्रीक ग्रंथकारानें 'सोरनाग' (Sornag=Chol Nâyak) राजाची ओरथुरा (Orthoura) नामक राजधानी होती, ह्मणून जिचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे, ती व ही राजधानी एकच असावी, असें डॉ. काल्डवेल ह्या विद्वानाचें मत आहे. डॉ. बर्नेल ह्यांचें असें मत आहे कीं, चोल राजाची राजधानी सातव्या शतकांत मल्लीकुरम् (कुंभकोनम्?) नामक गांवीं होती, आणि दहाव्या व अकराव्या शतकांत तंजावर हें त्यांच्या राजधानीचें मुख्य ठिकाण होतें. तथापि, त्याबद्दल खरी व विश्वसनीय माहिती उपलब्ध न झाल्यामुळें त्याचा खात्रीलायक निर्णय अद्यापि झालेला नाहीं. चोल प्रांताचें पूर्वीचें नांव 'मालकूट' असें होतें, व चोल राजांच्या ध्वजावर जें वाघाचें चित्र फडकत असे, तें त्यांनीं कांचीच्या पल्लव राजांच्या ध्वजावरून घेतलें असावें, अशीही आणखी माहिती मिळते. असो.

राजराज चोलाच्या पूर्वींच्या राजांची नामावली एके ठिकाणीं कोठें उपलब्ध नाहीं. ह्मणून, प्राक्कालीन इतिहाससंशोधक आंग्लपंडित मि. राईस, मि. फोक्स• आणि डॉ. बर्नेल ह्यांनीं, जुनीं ताम्रपत्रें व शिलालेख ह्यांच्या आधारानें, ती महत् प्रयासानें तयार केली आहे. तिच्यावरून, इ. स. ८५७ मध्यें आदित्यवर्मा-नामक राजा चोलमंडलावर राज्य करीत होता, व इ. स. १०२३ मध्यें त्रिभुवन

उत्तरेकडून येणाऱ्या यवनांच्या स्वाऱ्या दक्षिणेकडे वन्याच होऊं लागल्या. अल्ला-उद्दीन खिलजी ह्यानें देवगिरीच्या यादव राजास शह देऊन दक्षिणप्रांत जिंकण्याचा संकल्प केला. परंतु, दक्षिणेंतील प्राचीन हिंदुराज्यांच्या संघशक्तीचा अभेद्य कोट त्याच्या दृष्टीस पडल्यामुळें, कांहीं कालपर्यंत त्यास पिछेहाट करणं भाग पडलें. परंतु इ. स. १३१० मध्यें, तो कोट आपसांतील कलहानें अगदीं जर्जर झाला आहे असें पाहतांच, दिल्लीचा बादशाहा अल्लाउद्दीन खिलजी ह्याचा सरदार मलीक काफर ह्यानें, प्रचंड सैन्यानिशीं कृष्णा व तुंगभद्रा यांच्या मध्यंतरींचा मुलूख जिंकून, चोल प्रांत हस्तगत केला; व रामेश्वरच्या सेतूपर्यंत आपला मोहोरा चालवून, तेथें पवित्र कुराणाचा प्रवेश केला. ह्या स्वारीमध्यें दक्षिणेंतील सर्व हिंदु राज्यें जमीनदोस्त होऊन, सर्वत्र यवनी सत्तेचा प्रसार व्हावयाचा; परंतु त्याच्या तडाख्यांतून जीवंत राहिलेलीं प्राचीन हिंदु राष्ट्रें स्वाभिमानाच्या बाण्यास पेटून एकदम एकत्र झालीं, व त्यांनीं आपल्या विचित्र प्रभावानें मुसलमानी सत्तेच्या जबरदस्त लाटांस पार झुगारून दिलें. ही गोष्ट इ. स. १३४४ सालीं घडून आली. ह्या वेळीं वारंगल येथील रुद्रदेवाचा पुत्र कृष्णाप्पा नायक, विजयनगरचा राय, आणि द्वारसमुद्र येथील बल्लाळदेव ह्या प्रमुख राजांनीं 'संहतिः कार्यसाधिका' हें तत्त्व लक्षांत घेऊन, मुसलमानांसारख्या परचक्रास मागें लोटून दिलें, आणि आपल्या ऐक्यप्रभावानें आपलें स्वातंत्र्य पुन्हां परत मिळविलें. ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. हिच्यावरून आमच्या देशांतील प्राचीन राजांना आपसांत जूट करून स्वत्व कायम ठेवण्याची शक्ति होती, हें चांगलें सिद्ध होतें. असो.

वर सांगितलेल्या हिंदु राजांच्या जुटीनें दक्षिण हिंदुस्थानावर आलेलें भयंकर वादळ शांत झालें. तथापि, त्या योगानें कांहीं ठिकाणीं राज्यक्रांति होऊन देशस्थितींत बरेंच अंतर पडलें. तंजावर व मदुरा येथील अनुक्रमें चोल व पांड्य हीं संयुक्त झालेलीं दोन्ही घराणीं नामशेष होऊन, विजयनगरचें साम्राज्य एकदम उत्कर्ष पावलें. त्याची एकछत्री राजसत्ता मोठ्या शीघ्रगतीनें चोहोंकडे पसरत जाऊन, सोळाव्या शतकाच्या प्रारंभास तिनें सर्व कर्नाटक आक्रमून टाकिलें. सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं, विजयनगरचा कृष्णराय सर्व कर्नाटक प्रांताचा चक्रवर्ति राजाधिराज असें ह्मणवूं लागला होता. ह्याच्या कारकीर्दीमध्यें, इ. स. १५०८ पासून इ. स. १५३० पर्यंत, तंजावर व मदुरा येथील कालचक्राच्या सपाट्यांत सांपडून अगदीं सत्ताहीन झालेले राजे, जणुं आपापल्या कुळांचा सर्वस्वी लोप करण्याकरितांच, परस्परांशीं भांडत होते. मदुरेच्या

गादीवर चंद्रशेखर पांड्यनामक एक राजा होता व तंजावरास वीरशेखरनामक राजा राज्य करीत होता. त्यांनीं परस्परांवर स्वाऱ्या करून परस्परांचा मुलूख घेण्याचा क्रम चालविला होता. चंद्रशेखर राजाचा पराभव करून वीरशेखरानें मदुरा काबीज केली. तेव्हां, चंद्रशेखरानें हट्टास पेटून, वीरशेखराचा सूड घेण्याकरितां, विजयनगर येथील कृष्णराय राजाची मदत मागितली. कृष्णराय ह्यानें, मोठ्या आनंदानें, त्याजपासून पुष्कळ खंडणी घेण्याचा ठराव करून, आपला सेनापति कोट्टीयन् नागम नायक ह्यास त्याच्या मदतीस पाठविलें. त्यानें वीरशेखराचा पराभव करून मदुरेचें राज्य त्याच्या हातून सोडविलें, परंतु आपल्या सामर्थ्याच्या जोरावर तें स्वतःच बळकाविलें. तेव्हां दुर्दैवी चंद्रशेखर पुन्हां विजयनगरदरबारीं जाऊन आपली रडकथा गाऊं लागला. तेव्हां तिकडून पुनः विश्वनाथ नायक व आर्य नायक मुदलियार हे दोन शूर सरदार, नागम नायकाच्या पारिपत्यासाठीं प्रचंड सैन्यासह रवाना करण्यांत आले. त्यांनीं नागम नायकाचा पराभव करून व त्यास कैद करून विजयनगरदरबारीं पाठविलें; आणि चंद्रशेखरास इ. स. १५५८ मध्यें मदुरेच्या गादीवर बसवून, त्याच्या वतीनें राज्यकारभार चालविला. चंद्रशेखर अगदींच दुर्बल असल्यामुळें, दिवसेंदिवस विश्वनाथ नायक ह्याचीच सत्ता वाढत जाऊन, तोच मदुरेचा खरा अधिपति झाला. त्यानें आर्य नायक ऊर्फ आर्यनाथ ह्यास आपला प्रधान करून 'दुलवाई' (सेनापति) असा किताब दिला, व मदुरेचें राज्य मोठ्या शहाणपणानें चालविलें. चंद्रशेखर ह्याचा पुढें काय परिणाम झाला, हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि, इ. स. १५५९ मध्यें, पांड्यवंशाची अगदीं परिसमाप्ति होऊन, मदुरेस नायक राजांचें राज्य चालू झालें, हें निर्विवाद पुराव्यानें सिद्ध आहे.

इकडे तंजावरच्या वीरशेखर राजाची मदुरेच्या चंद्रशेखराप्रमाणेंच स्थिति झाली. त्याचा प्रांत विजयनगरच्या राजानें हस्तगत करून, त्यावर आपला नातेवाईक सरदार शिवाप्पा नायक ह्यास सुभेदार नेमून पाठविलें, व त्यासच पुढें तंजावरचें राज्य राजकीय देणगी ह्मणून बक्षीस दिलें. कित्येक ठिकाणीं ह्या नायक सरदाराचें नांव कृष्णाप्पा ह्मणून दिलेलें आहे. परंतु 'तंजावरुवारिचरित्र' ह्मणून जो तामिल ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्यांतील इतिहास अधिक महत्त्वाचा व विश्वसनीय मानिला जात असल्यामुळें, त्याचाच आधार ग्राह्य मानणें अवश्य आहे. ह्या ग्रंथांत तंजावरच्या नायक राजांची यादीः—१ शिवाप्पा नायक, २ अच्युताप्पा नायक, ३ रघुनाथ नायक, आणि ४ विजय रघुनाथ अथवा विजय

राघव नायक ह्याप्रमाणें दिली आहे.* मि. हिके ह्यांनीं १ कृष्णाप्पा, २ तूणिनप्पा, ३ अच्युत, ४ रघुनाथ, आणि ५ विजय रघुनाथ अशीं नांवें दिलीं आहेत. ह्यांपैकीं खरी वंशावळी कोणती, हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. परंतु साधारणपणें, 'तंजावरुवारिचरित्रा' वर अधिक भरंवसा ठेवावा, हें बरें दिसतें.

हे सर्व नायक राजे पराक्रमपटु, स्वधर्माभिमानी, प्रजापालनदक्ष, विद्याव्यसनी व धार्मिक होते. ह्यांनीं तंजावर प्रांतांत अनेक प्रचंड देवालयें व अत्युच्च गोपुरें बांधिलीं आहेत,† व त्यांच्या दानधर्माची कीर्ति अद्यापि सुप्रसिद्ध आहे. तंजावर येथें, सांप्रत आपल्या पूर्ववैभवाबद्दल शोक करीत असलेला राजवाडा आणि तेथील भव्य किल्ला, ह्याच नायक राजांनीं बांधिला असून, त्यांत पुढें मराठ्यांच्या कारकीर्दींत पुष्कळ सुधारणा झाली. ह्या वाड्यांत जो मुख्य दरबारमंडप आहे, त्यास अद्यापि 'नायकार दरबारहॉल' असें ह्मणतात. रघुनाथ नायक हा स्वरूपानें मदनाप्रमाणें सुंदर असून, त्यावर सरस्वतीचा वरदहस्त होता. त्यानें मदुरेच्या एका राजकन्येबरोबर विवाह केला होता. त्यास रामभद्रन् व विजयराघव असे दोन मुलगे होते. ह्यांपैकीं दुसरा मुलगा विजयराघव ह्याचे कारकीर्दींत, तंजावर येथील नायक राजसत्तेचा विनाश होऊन, येथें मराठ्यांची सत्ता संस्थापित झाली. ह्या राज्यक्रांतीचा वृत्तांत अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें तो स्वतंत्र भागांत देणें जरूर आहे. तंजावर येथें नायक राजांची सत्ता इ. स. १५४९ पासून इ. स. १६७३ पर्यंत, ह्मणजे सरासरी सव्वा शतक होती, असें स्थूलमानानें मानण्यास हरकत नाहीं.

* ह्या राजांच्या कारकीर्दींचा काल पुढें लिहिल्याप्रमाणें मानिला जातोः–१ शिवाप्पा नायक (इ. स. १५४९–१५७२). २ अच्युताप्पा (इ. स. १५७२–१६१४). ३ रघुनाथ नायक (इ. स. १६१४–१६६०?). विजयराघव (इ. स. १६६०–१६७३). ह्यांपैकीं रघुनाथ नायकाचा काल केव्हां झाला व त्याचा मुलगा गादीवर केव्हां बसला, तें बरोबर समजत नाहीं.

† नायक राजांनीं तंजावर येथें बांधिलेल्या इमारतींची यादी 'तंजावरुवारिचरित्रां'त पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहेः—

१ शिवाप्पा नायकः–तंजावर येथील शिवगंगा ऊर्फ छोटा किल्ला.

२ अच्युत नायकः–ह्याची माहिती दिली नाहीं.

३ रघुनाथ नायकः–कुंभकोनम् येथील रामस्वामीचें देवालय.

४ विजयराघव नायकः–तंजावरचा मोठा किल्ला, अरुपतंगी किल्ला, पदुकोट्ट किल्ला, तिरुपत्तूर किल्ला, मानरगुडी येथील राजगोपाळ स्वामीचें देवालय, त्याच्या नजीक हरिद्रनदीनामक तलाव, मायावरम् येथील कावेरी नदीच्या कांठचें पुष्पमंडपम्नामक स्थान, व मध्यार्जुनम् येथील वीरकोलनारु नदीच्या कांठचा प्रसिद्ध मंडप.

# भाग २ रा.

## नायक राजांचा शेवट.

प्रत्येक राष्ट्रास उन्नत काल आणि अवनत काल हें रहाटगाडगें एकसारखें लागलेंच आहे. त्याच्या सपाट्यांतून कोणतेंही राष्ट्र सुटलें नाहीं. स्वातंत्र्योत्कर्षाच्या शिखरास पोहोंचलेलीं एवढीं मोठीं ग्रीक व रोमन राष्ट्रें, कीं ज्यांची राजसत्ता कांहीं कालपर्यंत सर्व युरोपखंडभर गाजत होती, त्यांना देखील ह्या सृष्टिनियामक स्थित्यंतरापासून पराङ्मुख होतां आलें नाहीं. मग तेथें दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन हिंदुराज्यांची ती काय कथा? चौदाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत त्या राज्यांचें अविच्छिन्न स्वातंत्र्य व अपार वैभव हीं साधारणपणें अबाधित होतीं, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण, त्यांस मधून मधून आपसांतील कलहांचे व युद्धप्रसंगांचे आघात वारंवार पोहोंचत असत, तरी त्यांची संघशक्ति व एक-राष्ट्रीयत्व हे गुण नष्ट झालेले नसल्यामुळें त्यांचें साम्राज्यमंडल जिंकण्यास मुसलमानी सत्ता अगदीं असमर्थ होती. त्यामुळें, बरेच दिवसपर्यंत, उत्तरेकडून दक्षिणेकडे येणाऱ्या तिच्या प्रचंड लाटांची स्वैरगति तेथें कुंठित होत असे. इ. स. १३४४ सालीं, दक्षिणेंतील सर्व हिंदुराजांनीं, आपली लोकोत्तर संघशक्ति व्यक्त करून, वारांगल येथें मलिक काफराच्या सैन्याचा पराभव केला व त्यास दक्षिणेंतून पिटाळून दिलें, ह्याचा उल्लेख मागील भागांत केलेलाच आहे. त्यानंतर सर्व दक्षिण हिंदुस्थानांत विजयनगरच्या साम्राज्याचा एकछत्री अंमल चालू झाला; व त्याच्याच सार्वभौमत्वाखालीं तंजावर व मदुरा हे प्रांत जाऊन, येथील नायक राजे विजयनगरचे मांडलिक ह्या नात्यानें वागूं लागले. हे पूर्वींचे विजयनगरचे सरदार असून, स्वतांच्या कर्तृत्वशक्तीनें विजयनगरच्या राज्यदरबारीं फार योग्यतेस चढले, व त्याच्याच कृपेनें तंजावर व मदुरा येथील अधिपति झाले. परंतु पुढें, त्यांच्या सत्तेचा जोर जसजसा वाढत चालला, तसतसे ते विजयनगरचें सार्वभौमत्व सर्वस्वीं झुगारून देऊन, स्वतंत्र होऊं लागले. त्यामुळें विजयनगरचे दोन आधार-स्तंभ नष्ट झाल्यासारखे होऊन, त्याची शक्ति बरीच क्षीण झाली; व त्याजवर घाला घालण्यास परराष्ट्रास उत्तम संधि सांपडली.

तेराव्या शतकापासून दक्षिण हिंदुस्थानामध्यें मुसलमानी सत्तेचा चंचुप्रवेश होऊन दौलताबाद येथें दिल्लीपतीचा प्रतिनिधि संस्थापित झाला होता. तथापि, त्या सत्तेचा अंकुर इ. स. १३४० पर्यंत चांगलासा जोमदार झाला नव्हता.

परंतु या सालीं, दिल्लीपतीच्या हसनगंगू नामक प्रतिनिधीनें स्वतंत्र होऊन, कलबुर्गा येथें आपलें नवीन राज्य संस्थापित केलें. इतिहासामध्यें, ब्राह्मणी ऊर्फ बहामनी या नांवानें जें राज्य प्रसिद्ध आहे, तेंच हें होय. हें राज्य अस्तित्वांत आल्यानंतर मुसलमानी राजसत्तेचा अंकुर चांगला जोमदार झाला, व त्यास हिंदुराजांच्या गृहकलहाचें व परस्परमत्सराचें पुष्टिकारक खाद्य मिळून, तो अधिक अधिक बळावत चालला, व लवकरच आपल्या शाखांच्या विस्तारानें विजयनगरचें साम्राज्य ग्रासून टाकण्याचा यत्न करूं लागला. इ. स. १५२७. मध्यें त्याचा प्रचंड वृक्ष बनून, त्याच्या पांच प्रबळ शाखा निर्माण झाल्या. त्या इतिहासामध्यें इमादशाही, निजामशाही, आदिलशाही, बरीदशाही आणि कुतुबशाही ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. विजयनगरच्या साम्राज्यामध्यें, संघशक्ति व पराक्रमतेज जोंपर्यंत वसत होतें, तोंपर्यंत ह्या शाखांचा प्रसार मर्यादित राहिला; व त्यांना विजयनगरच्या स्वातंत्र्यावर झडप घालितां आली नाहीं. परंतु, त्या गुणांचा लोप होतांच, त्यांनीं विजयनगरच्या राज्यास चौगीर्द मिठी घालून, त्याची साम्राज्यसत्ता पूर्णपणें हरण केली. विजापुरचा बादशाहा अली आदिलशाहा व विजयनगरचा शेवटचा राजा रामराज यांची, तालिकोट येथें इ. स. १५६५ सालीं जी घनघोर लढाई झाली, तींत या प्राचीन हिंदु साम्राज्याचा अगदीं निकाल लागला; व दक्षिण हिंदुस्थानामध्यें मुसलमानी राजसत्तेस संचार करण्यास पूर्ण मोकळीक मिळाली.

विजयनगरच्या प्राचीन व सर्वमान्य हिंदु साम्राज्याचा नाश झाल्यानंतर तंजावर व मदुरा येथील नायक राजांस फार दिवस स्वातंत्र्यसुखाचा उपभोग घेतां आला नाहीं. त्यांनाही मुसलमानी सत्तेस शरण जाऊन, लवकरच कालचक्राच्या तडाख्यांत सांपडण्याचा प्रसंग आला. त्यांच्या इतिहासाकडे वळणें आतां अवश्य आहे.

विजयनगर येथील दरबारांतून मदुरेच्या चंद्रशेखर पांड्यराजास मदत करण्याकरितां, इ. स. १५५८ मध्यें, विश्वनाथ नायक ह्मणून जो सरदार आला होता, तोच स्वतंत्र होऊन मदुरेचा अधिपति झाला, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. हा पराक्रमी नायकराजा इ. स. १५६३ मध्यें मृत्यु पावला. नंतर त्याच्या मागून त्याचा मुलगा कुमार कृष्णाप्पा हा गादीवर बसला. तो इ. स. १५७३ मध्यें मृत्यु पावला. तदनंतर त्याचा मुलगा पेरियावीरप्पा हा मदुरेचा राजा झाला. त्यास विश्वाप्पा व कुमार कृष्णाप्पा असे दोन मुलगे होते. ते कांहीं दिवस राज्योपभोग घेऊन लवकरच मृत्यु पावले. नंतर त्यांच्या मागून कस्तुरी रंगाप्पा व मुत्तु कृष्णाप्पा

असे दोन पुरुष गादीवर आले. मुत्तु कृष्णाप्पा इ. स. १६०२ मध्यें मृत्यु पावल्यानंतर त्याचा वडील मुलगा मुत्तु वीरप्पा हा गादीवर बसला, व त्यानें इ. स. १६२३ पर्यंत राज्य केलें. त्याच्या मागून मदुरेचा सुप्रसिद्ध राजा त्रिमल नायक हा गादीवर बसला. हा गादीवर येईपर्यंत त्रिचनापल्ली हें राजधानीचें शहर होतें. परंतु त्यानें मदुरा येथें आपली राजधानी स्थापन करून, तेथें मोठमोठीं देवालयें व प्रचंड राजवाडे बांधिले. मदुरा येथील मीनाक्षी देवीचा त्यास वरप्रसाद होता, त्यामुळें त्याच्या राज्याचा उत्कर्ष झाला, अशी आख्यायिका अद्यापि प्रसिद्ध आहे. ह्याच्या कारकीर्दीचें वर्णन मि. नेल्सन यांनीं मदुरा जिल्ह्याच्या इतिहासांत सविस्तर दिलेलें आहे. त्यावरून हा राजा, सर्व नायक राजांमध्यें अत्यंत पराक्रमी व कीर्तिशाली होता, असें दिसून येतें. हा इ. स. १६५९ मध्यें मृत्यु पावला, व त्याच्या मागून थोड्या वर्षांच्या अवधींत मुत्तु वीरप्पा व चोकनाथ नायक असे पुरुष गादीवर बसले. यांपैकीं चोकनाथ नायक यानें पुन्हां त्रिचनापल्ली हें गांव आपल्या राजधानीचें मुख्य ठिकाण केलें; आणि तंजावर येथील विजयराघव नायकास पादाक्रांत करून त्याचें राज्य हस्तगत करण्याचा प्रयत्न केला. त्यांतच विजयराघवाच्या आयुष्याचा शेवट होऊन, तंजावरच्या नायक राजसत्तेची इतिश्री झाली.

तंजावर येथील चोलसत्तेचा शेवट होऊन इ. स. १५४९ मध्यें नायक राजसत्तेची स्थापना झाली, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. ह्यानंतर तंजावर प्रांत विजयनगरच्या सार्वभौमत्वखालीं नायक राजांच्या ताब्यांत होता. परंतु पुढें दहावीस वर्षांतच, विजयनगरचें प्राबल्य कमी झाल्यामुळें तंजावरचे नायक राजे स्वतंत्र झाले; व ते आपल्या ताब्यांतील जिंजी, पदुकोटा वगैरे ठिकाणच्या लहान लहान संस्थानिकांकडून व पाळेगार लोकांकडून कारभार घेऊन राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालवूं लागले. इ. स. १५६५ मध्यें तालिकोटची लढाई होऊन विजयनगरचें राज्य बुडाल्यानंतर, विजापुरच्या बादशहांनीं तुंगभद्रेपर्यंतचा मुलूख आक्रमण केला; व त्यांचे सरदार, तंजावर व त्रिचनापल्ली येथील नायक राजांना पादाक्रांत करण्याचा संकल्प करून, त्यांवर स्वाऱ्या करूं लागले. परंतु हे नायक राजे चांगले बलवान् असल्यामुळें इ. स. १६४४ पर्यंत मुसलमान सरदारांची कांहीं गडबड चालली नाहीं. तदनंतर त्यांच्यावर कालाची वक्रदृष्टी झाल्यामुळें त्यांचे आपसांमध्यें कलह सुरू झाले. त्यांतच त्यांच्या स्वातंत्र्याचा ऱ्हास झाला.

तंजावर व मदुरा येथील नायक राजे आपआपसामध्यें कलह करूं लागल्यामुळें व परस्परांशीं मत्सरबुद्धीनें वागूं लागल्यामुळें, विजापुर व गोवळकोंडें येथील बादशहांस अनायासें आपलें पाऊल पुढें ढकलण्यास चांगली संधि मिळाली.

इ. स. १६४४ मध्यें गोवळकोंड्याच्या बादशाहानें जिंजीच्या त्रिमल नायक राजावर स्वारी केली. परंतु त्रिमल नायकानें विजापुरच्या बादशाहाची मदत मागून त्याचें सैन्य परत फिरविलें. परंतु, तेणेंकरून, नायक राजांच्या सामर्थ्याची कल्पना विजापुरच्या बादशाहास चांगली येऊन, त्यानें जिंजीचा बळकट व लढाऊ किल्ला जिंकून घेतला; आणि तंजावर व मदुरा येथील नायक राजांवर आपली खंडणी बसविली. अर्थात् १७ व्या शतकाच्या मध्यंतरीं, ह्मणजे रघुनाथ नायकाच्या कारकीर्दींतच, मुसलमानी सत्तेचा प्रवाह कर्नाटकांत जोरानें पसरत जाऊन, त्याच्या लाटा तंजावरपर्यंत भिडल्या, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्यानंतर थोड्याच वर्षांच्या अवधींत, तंजावरचा विजय रघुनाथ व मदुरेचा चोकनाथ नायक ह्याच्या मध्यें वैमनस्य उत्पन्न होऊन, चोकनाथ नायक तंजावरावर स्वारी करण्यासाठीं त्रिचनापल्लीपर्यंत येऊन दाखल झाला. 'ह्या उभयतांच्या कलहामध्यें, 'दोघांचें भांडण व तिसऱ्याचा लाभ' ह्या ह्मणीप्रमाणें प्रकार घडून येऊन, दोघेही तंजावरच्या राज्यास मुकले व तिसऱ्यास त्याचा लाभ झाला.

मदुरेचा राजा चोकनाथ नायक हा त्रिचनापल्लीस आल्यानंतर त्यानें तंजावरावर स्वारी केली. तंजावरचा राजा विजयराघव हा शूर व तेजस्वी पुरुष होता परंतु तो फार धर्मशील असल्यामुळें त्याच्या सैन्याची व्यवस्था चांगली नव्हती. तो कट्टा वैष्णवमताभिमानी असून, त्यानें त्या मताचा प्रसार करण्याकडे आपलें सर्व लक्ष घातलें होतें. त्यामुळें त्याच्या राज्याचा कारभार त्याचा प्रधान गोविंद दीक्षित चालवीत असे. हा फार विद्वान् होता. परंतु विद्वत्ता आणि शौर्य यांचें विशेष ऐक्य नसल्यामुळें त्याच्या हातून सैन्याची व्यवस्था चांगली राहिली नाहीं. ही संधी साधून चोखनाथ नायक यानें विजयराघवावर स्वारी केली. विजयराघव फार बाणेदार असल्यामुळें त्यानें त्याशीं आपल्या पुत्रासह मोठें निकराचें युद्ध केलें, व धारातीर्थीं आपला देह अर्पण केला. आपल्या पश्चात् आपल्या राण्या शत्रूंच्या हातीं सांपडतील व त्यांची मानहानि होईल, ह्मणून त्यानें, आपल्या राजवाड्यांतील रंगमहालांत दारू भरून, आपला पराभव होतांच, तीस बत्ती द्यावी; व सर्व राण्यांनीं आपले पवित्र देह अग्निनारायणास अर्पण करून तंजावरच्या नायक कुलाची प्रतिष्ठा रक्षावी, अशी तजवीज केली. ह्याप्रमाणें तो समरांगणांत शिरतांच, त्याच्या अंतःपुरास बत्ती मिळाली, व त्याच्या सर्व राण्या क्षणार्धामध्यें सती गेल्या. हें काम विश्वासानें वजाविलें जावें ह्मणून तें त्यानें आपल्या पुत्राकडे सोंपविलें होतें. त्याप्रमाणें त्यानें तें अलौकिक धैर्यानें सिद्धीस नेलें. नंतर तो हातामध्यें नंगी समशेर घेऊन, तिनें शत्रूंच्या सैन्याचा समाचार घेत, आपल्या बापाजवळ आला; व तेथें अद्वितीय युद्ध

करून धारातीर्थी पतन पावला. या राजपुत्राचें नांव 'मन्नारु नायक' असें होतें.* ह्या शोकपर्यवसायी परंतु वीररसप्रचुर प्रसंगाचा वृत्तांत, 'तंजावरुवारिचरित्रा'मध्यें व इतर तामिल ग्रंथांमध्यें फार वर्णिलेला आहे. तो वाचून सहृदय वाचकांचें अंतःकरण अगदीं द्रवून जातें. ज्या रंगमहालांत हा भयानक प्रकार घडून आला, तो अद्यापि तंजावर येथील राजवाड्यांत अस्तित्वांत आहे, व तेथें या सर्व राण्या अद्यापि पिशाच्चरूपानें वसत आहेत, असा लोकप्रवाद ऐकूं येतो.

ह्या भयंकर प्रसंगीं एक आश्चर्यजनक गोष्ट घडून आली. विजयराघव याची पट्टराणी फार चतुर स्त्री होती. तिला, कांहीं तरी भयंकर प्रकार घडून, आपणां सर्वांस या नश्वर जगास शेवटचा रामराम करण्याची लवकरच पाळी येणार, असें समजतांच, तिनें आपल्या आवडत्या लहान अर्भकाचा प्राण रक्षण करावयाची गुप्त रीतीनें एक नामी युक्ती योजिली. तिनें रंगमहालांतील दारूस आग लावण्याच्या गडबडींत, त्या मुलास, न कळत एका दासीजवळ देऊन, व त्याच्या संरक्षणापुरते अलंकार तिच्या स्वाधीन करून, तिला राजवाड्यांतून वेषांतर करवून दूर पळविलें. त्याप्रमाणें ती साहसी दासी, शत्रूच्या सैन्यांतून तें लहान अर्भक आपल्या पाठीशीं घेऊन, मोठ्या धैर्यानें निसटून गेली; व तंजावरापासून ४० मैलांवर निगापट्टण-नामक एक गांव आहे, तेथें जाऊन पोहोंचली. तेथें व्यंकण्णानामक एक नियोगी ब्राह्मण रहात असे. तो पूर्वीं विजयराघवाच्या पदरीं 'रायसम्' ह्मणजे खाजगी कारभारी ह्या हुद्द्यावर होता. त्याची तिनें भेट घेऊन व त्यास झालेला सर्व वृत्तांत कळवून, तें राजबालक त्याच्या पायावर घातलें. व्यंकण्णानें त्यास आश्रय देऊन त्याचा गुप्त रीतीनें प्रतिपाल केला. त्या मुलाचें नांव सेंगमलदास असें असून, तंजावर प्रांतांत मराठ्यांचा प्रवेश करण्यास हेंच मूळ कारण झालें, ही विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. कांहीं तामिल बखरींमध्यें ह्याचें नांव 'चेंगमलदास नायक' असेंही दिलेलें आहे.

---

* या राजपुत्रावर विजयराघवाची कांहीं अवकृपा झाली ह्मणून त्यास त्यानें कांहीं दिवस बंदिवासांत ठेविलें होतें. परंतु हें लढाईचें संकट प्राप्त झालें, त्या वेळीं त्यानें त्याची सुटका केली. त्या वेळीं तो त्याच्या सिंहासनाजवळ आला, व त्यास वंदन करून त्यानें एक श्लोक ह्मटला. त्याचें भाषांतर मि. वालहौसनामक एका युरोपियन शोधक गृहस्थांनीं एके ठिकाणीं दिलें आहे, तें वाचनीय आहे—

"The sea buries jewels and throws up a straw,
Of the treacherous element that is the law;
But, father and ruler, we'll show now to them
That a straw is straw, but a gem is a gem."

—*Indian Antiquary.*"

इकडे विजयराघव व त्याचे पांच प्रमुख दरबारी रणांगणामध्यें पतन पावतांच सर्व सैन्याची दाणादाण झाली व तें सैरावैरा पळूं लागलें. नंतर चोकनाथ नायकानें तंजावर शहर व तेथील राजवाडा हस्तगत केला, आणि तेथें मोठ्या विजयानंदानें आपली द्वाही फिरविली. पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर, त्यानें तंजावर प्रांत आपल्या राज्यांत सामील केला, आणि त्याची व्यवस्था करण्याकरितां 'अलगिरी'नामक एक सरदार तिकडे पाठविला. चोकनाथ नायकानें तंजावरच्या धर्मशील विजयराघवाचें राज्य अन्यायानें बुडविलें, परंतु त्यापासून त्याचा तादृश असा कांहींच फायदा झाला नाहीं. त्यानें नेमलेला सुभेदार अलगिरी हा प्रमत्त होऊन स्वतःच तंजावरचा राजा ह्मणवूं लागला, व आपल्या नांवानें स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार चालवूं लागला.*

तंजावरच्या विजयराघवाचा पुत्र जो निगापट्टण येथें व्यंकण्णा रायसम् याचे घरीं गुप्तपणानें वाढत होता, तो नऊ दहा वर्षांनीं मोठा झाला. तेव्हां व्यंकण्णानें विजापुरच्या बादशहाकडे जाऊन व त्यास हा सर्व वृत्तांत निवेदन करून, या मुलास तंजावरची गादी मिळवून देण्याचा प्रयत्न केला. या वेळीं विजापुरच्या बादशहावांचून त्यास मदत करण्यासारखा दुसरा कोणीही सत्ताधारी समर्थ नव्हता. तेव्हां त्यानें त्याजकडे जाऊन व त्यास सर्व वृत्तांत कळवून, तंजावरचें राज्य परत मिळवून दिल्यास पुष्कळ खंडणी देऊं, असें बोलणें लाविलें. विजापुरच्या बादशहासही हा मनसबा फायदेशीर वाटून, त्यानें त्याचें ह्मणणें मान्य केलें; व आपल्या दरबारांतून कांहीं निवडक सैन्य, एका शूर सरदाराबरोबर पाठविण्याची तजवीज केली. हा सरदार क्षत्रियकुलावतंस छत्रपति शिवाजी महाराज यांचे सापत्न बंधु व्यंकोजी राजे हे होत, असें सर्व तामिल लेखकांचें ह्मणणें आहे.

---

*तंजावरचा विजयराघव व मदुरेचा चोकनाथ नायक ह्यांचें हें निकराचें युद्ध कधीं झालें, हें समजण्यास चांगलासा आधार सांपडत नाहीं. कर्नल म्यांकेंझी ह्यांच्या संग्रहांतील एका बखरीमध्यें त्याचें विस्तृत वर्णन दिलें आहे. परंतु त्यांत सनाचा व नांवांचा फार घोंटाळा आहे. विजयराघवाच्या नांवाच्या ऐवजीं अच्युत–विजयराघव–नायक असें नांव दिलें आहे! दिवाण बहादूर व्यंकास्वामी राव ह्यांनीं ह्या युद्धाचा सन अदमासें इ. स. १६७३ हा दिला आहे. परंतु तोही चुकीचा दिसतो. हें युद्ध इ. स. १६६२ चे पूर्वीं होऊन विजयराघव मारला गेला, व नंतर तंजावर येथें अंदाधुंदी होऊन तो प्रांत हळूहळू विजापुरच्या बादशहाच्या ताब्यांत गेला. तेथें त्याचे वतीनें प्रथम शहाजी राजे व नंतर व्यंकोजी राजे ह्यांची योजना झाली असावी, व त्यांनीं स्वपराक्रमाच्या जोरावर विजापुरच्या बादशहाकडून तंजावरची जहागीर मिळविली असावी, असें संभवनीय दिसतें. हा वृत्तांत इ. स. १६७३ मध्यें घडला असें मानिल, तर त्या वेळीं विजापुरास शिकंदर अल्ली आदिलशाहा हा बादशाहा होता हें उघड आहे.

परंतु मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ व सर्व मराठी बखरकार ह्यांचें मत असें आहे कीं, विजापूर दरबारांतून ह्या वेळीं शहाजी महाराजांची तंजावरच्या मोहिमेवर योजना झाली, व त्यांनीं तेथील पुंड राजाचा पराभव करून तंजावरची जहागीर मिळविली. परंतु, तंजावर जिल्ह्याचे म्यानुअलकर्ते दिवाणबहादूर टी. व्यंकास्वामी राव ह्यांनीं, कर्नल विल्कस्, फुलर्टन आणि रेव्हरंड स्वॉर्ट्झ यांच्या आधारानें असें सिद्ध केलें आहे कीं, तंजावर प्रांतावर विजापुराहून जें सैन्य आलें, त्याचा अधिपति व्यंकोजी हा असून, शहाजी तंजावर प्रांतावर मुळींच आला नाहीं. तथापि, मराठ्यांच्या इतिहासाचे अस्सल कागद पाहिले, म्हणजे विजापुराहून तंजावर प्रांतावर स्वारी करण्यास जें सैन्य पाठविण्यांत आलें, त्याजबरोबर शहाजी राजे भोंसले हेच गेले होते, असें मानणें सयुक्तिक दिसतें.* ह्या मोहिमीचें वर्णन करण्यापूर्वीं मराठ्यांच्या त्या वेळच्या इतिहासाचें थोडें सिंहावलोकन करणें अवश्य आहे. तें पुढील भागांत सादर करूं.



* तंजावर प्रांतावर विजापुरच्या दरबारांतून कोणाची योजना झाली व ती कोणत्या सालीं झाली, ह्या दोन गोष्टी अद्यापि वादग्रस्तच आहेत. त्यांचा कोठेंच चांगला निर्णय झालेला नाहीं. ग्रांटडफ साहेबांनीं मराठ्यांचा इतिहास लिहिला, त्या वेळीं त्यांनाही तंजावरचा मूळ संपादक शहाजी कीं व्यंकोजी, हा संशय होताच. त्यांनीं आपल्या इतिहासांत एके ठिकाणीं पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढिले आहेतः—

"All the Mahratta Manuscripts state the conquest to have been made by Shahjee. No Mahrattas or Brahmins, conversant with their own history, seem to think otherwise; the doubt seems to have arisen in the neighbourhood of Tanjore, and it was natural to have done so, owing to the apprehension which the Tanjore Raja must have entered of being called to account for half his revenue; proofs, however, of what is stated, will ultimately appear.—*Grant Duff's History.—Page 90.*

ह्या टीपेवरून हा प्रश्न जुना आहे असें दिसून येतें. शिवाजी महाराजांनीं तंजावरच्या व्यंकोजी राजास लिहिलेलें तंजावरच्या वांटणीबद्दलचें अस्सल पत्र ग्रांटडफ साहेबांच्या पाहण्यांत आलें होतें, व तें आह्मांसही मिळालें आहे. त्यांच पत्राच्या खात्रीलायक आधारावरून तंजावरची जहागीर शहाजी राजांनीं मिळविली असें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें तंजावर येथील बृहदीश्वर देवालयांतील मराठी शिलालेखावरूनही त्यासच पुष्टि येते. तेव्हां ह्या प्रश्नाचा निर्णय आतां चांगल्या रीतीनें करितां येतो.

खानदेशांत, फत्तेपुरास चंद्रराव पवार दहा वीस स्वारांनिशीं आले होते. त्यांजवळ चौशां स्वारांचा जमाव झाला आहे. आणीखही लोक ठेवीतच आहेत. खडक्याब्याऱ्यावर पलटणें आलीं आहेत. ते व हे मिळून खानदेशांत कुकडमुंड्याचा परामर्ष करणार अशी वदंता आहे. तिकडील बंदोबस्त स्वामी करतीलच. उभयतां सरदार इंदूर उज्जनीस आहेत. लोकांच्या देण्याघेण्याच्या खटपटींत आहेत. राजश्री नारो गणेश उज्जनीस गेले होते, ते इंदुरास आले. मागाहून राजश्री बाळाराव व रायाजी पाटील हे उभयतां पाटीलबावांकडून इंदुरास येणार. तेथून नारो गणेश व हे उभयतां ऐसे मिळून येथें बाईकडेस येणार. येथील बोलणीं झाल्यावर, मग उभयतां सरदार मिळूनच बाईच्या भेटीस येणार, अशी वदंता आहे. राजश्री गोविंदराव गायकवाड बदनावराजवळ राजोळें ह्मणून गांव आहे, सात कोस, तेथें पांचशें स्वारांनिशीं आहेत. उभयतां सरदारांकडील लोक अद्याप कोणी त्यांजकडेस जात नाहींत. खंडो आवजी पाटीलबावांजवळ आहेत. उभयतां सरदारांनीं मिळून पंचवीस हजार रुपये मात्र गोविंदराव गायकवाडास खर्चास दिले आहेत. खंडो आवजी फौजेविषयीं व खर्चाविषयीं पाटीलबावांशीं नित्य बोलतच आहेत. सुरतेंतील वर्तमानः—आसपास प्रांत उजाड आहे. रस्त कोठून येत नाहीं. शहरांत महागाई फार आहे. सुरतेंत इंग्रज फक्त सावकारी करून आहेत. ते व अन्यत्र थोर थोर सावकार, हे बोलतात जे, श्रीमंत दादासाहेब येथें आले आहेत. हे सुरतशहरासच अरिष्टरूप आहेत. अतःपर दक्षिणी फौजा मातबर जमून येतील; ते सुरत शहरचें आधीं पारिपत्य करितील. एक गणेशपंत बेहरे आले, त्यांनीं आसपास प्रांत सारा उजाड केला. आतां तिकडील फौजा येतील, त्या मातबरच येतील. ते शहरासच लागतील; तेव्हां पुढें काय करावें? दक्षिण्यांशीं सलाह केल्यानेंच बरें आहे. असें सावकार लोक चिंताग्रस्त आहेत. सुरतेंत जमियत सात पलटणें व हजार फौज इतके आहेत. इंग्रज शहरची मरामत करितात, व भडोचेस चार पलटणें आहेत. डबईस एक पलटण आहे. आमदाबादेस एक पलटण व हजार पंधराशें आरब, तेही इंग्रजांचेच होऊन आहेत. फत्तेसिंग गायकवाडाची पांचशें फौज व कोणी लेकवळा असे आमदाबादेस आहेत. बडोद्यांत एक पलटण आहे. याप्रमाणें हें इंदुरच्या व येथील सावकाऱ्यांतील हें वर्तमान. या पहाडांत दोन हजार भिल्ल जमले आहेत, व गुलजारखानाजवळ चारशें पायदळ व दोनशें स्वार इतका जमाव जाहला आहे. हिंदुस्थानांतील वर्तमान पेशजीं लिहिलें आहे. त्यांच्या पारिपत्यास उभयतां सरदारांनीं योजना केली आहे.

पाराजीपंत व यशवंतराव बाबळे व शरीफखान, पागा ऐसे होळकराकडील व कांहीं शिंद्याकडील फौज, ऐसे जयपुरवाल्याच्या पारिपत्यास पाठवावें, अशी नेमणूक झाली आहे ह्मणून ऐकण्यांत आलें. उभयतां सरदारांकडील लोक नित्य इकडून शेंदोनशें जातात. ते बाईचे भेटीस येत असतात. तिकडील लढाईची बयान फार करितात. लोकांस देणगीही कमीच आहे. खराबही फार झाले आहेत. सबब उभयतांचें यशकीर्तीचें वर्णन बहुतच करितात. त्यांबरोबर सरदार येतात, तेही फार खराब येतात. राजश्री पांडुरंग शंकर पारनेरकरच होळकरांकडील कारकून मातबर आहेत. ते बाईजवळही असतात. तुकोजीबावांजवळही असतात. सांप्रत ते तेथें बाईजवळच चार महिने होते. त्यास तुकोजीबावा इंदुरास आल्यावर त्यांस बोलावूं पाठविलें. त्यास पांडुरंग शंकर बाईची आज्ञा घेऊन, चंद्र १ रजबीं येथून स्वार होऊन, इंदुरास गेले. तेही गृहस्थ कारस्थानी. तोडजोडीचे जाबसाल उभयपक्षींही निश्चून करणार. राजश्री शिवाजी विठ्ठल यांस पाटीलबावांनीं बोलावूं पाठविलें होतें. त्यावरून ते अष्ट्याहून स्वार होऊन उज्जनीस आले ह्मणून वदंतेचें वर्तमान आहे. देशी इंग्रजांची गडबड बोरघाटाकडे, चांदवडबारीकडे व त्रिंबकाकडे अशी फार जाहली आहे, ह्मणून इकडे वर्तमान फार आहे. बाई बोलत होती जे, इंग्रजांनीं चहूंकडून प्रसार करायाचा मनसबा केला आहे. त्यास, या समयास श्रीमंतांनीं शिलेदारांचा व हुजरातीचा भरणा पुष्कळ करावा; आणि इंग्रज जागां जागां, कोठें दोन पलटणें, कोठें तीन पलटणें, असीं तोंडें काढलीं आहेत, अशांत जागां जागां फौजा पाठवून, ते जेथील तेथेंच........ ह्मणजे मागल्याला दहशत पडेल. पुढें कोणी येऊं पावणार नाहीं. नबाब व भोंसले सारे जमा होऊन इंग्रजांचें पारिपत्य करावें. इकडे वर्तमानें जागां जागां आली आहेत कीं, इंग्रज बोरघाट चढले व नाशिकाकडेही आले, व चांदवडबारीनेंही चढले, देशांत बहुत गडबड झाली. श्रीमंतांस घेऊन नानासाहेब पुरंदरास गेले. राजश्री तात्या मात्र पुण्यांत फौजेंत आहेत. असें वर्तमान इकडे आलें. अद्यापिही इकडील भिल्लांस अभयपत्र आलें व गुलजारखानासही एक अभयपत्र आलें, तर तमाम घाट हे बंद करितील, व हे हरकूबाईचेही तेवढे गांव सोडून दिले, आणि ये बाईसही पत्र आलें जें घाटाचा बंदोबस्त करा; तर हरकूबाई आपल्या पागा, जागां जागां पाठवून, घाट बंद करितील. बंदोबस्त होईल. मर्जीस आलें तर असें केल्यानें बरें आहे. इतक्यावर धन्याची मर्जी. सेवकाची खर्चाची विपत्य फार आहे. कासीदजोड्या वरचेवर येत असाव्यात. सेवकास काय आज्ञा आहे हे विज्ञप्ति."

पै॥ छ १३ रमजान **लेखांक १४.** ता० ५ सप्टेंबर इ. स. १७८०.
इहिदे समानीन बराबर डाक. **श्रीगजानन.** मि० भाद्रपद शु० ७ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ५ रमजानपरियंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील व उभयतां सरदारांकडील व येथील व खानदेशप्रांतचें वर्तमान, येथें ऐकिल्याअन्वयें सेवेसी विनंतीपत्रीं लिहून, छ २ मिनहूस डाकेबरोबर विनंतीपत्रें रवाना केलीं. ते सेवेसी प्रविष्ट झालीं असतील. प्रस्तुतचें वर्तमानः--राजश्री पांडुरंग शंकर इंदुरीहून येथें आले. पेशजी येथून गेले होते ह्मणून पहिले विनंतीपत्रीं लिहिलें होतें. त्यास आठ दहा दिवस झाले, येथें आले आहेत. मातुश्री अहिल्याबाईस तेथील कच्चें वर्तमान विदित केलें. येथून गेले तेव्हां तेथें तुकोजीबावांशीं येथील वर्तमान निक्षूनच सांगितलें. त्यांसही पुर्तेपणें भासलें जे, बाई धनी आहेत. श्रीमंतांसही जों करून बाईची भीड पडेल, बाईचें अगत्य धरतील, तितकी आपली अगत्य नाहीं; असें समजोन तुकोजीबावांनींही आपलें तापत्रय बहुतच मशारनिल्हेजवळ सांगितलें. दुसरें, राजश्री पाटीलबावांच्या हितोपदेशाचें व देशी श्रीमंतांचे इतराजीचें. यंदा गुजराथचे स्वारींत चाकरी आपण कशी केली, आणि सोबत्यांनीं अपवाद कसे आणिले, श्रीमंतांस आपली नालीश काय काय लिहून त्यांच्या चित्तांत विक्षेप घातले, तें सविस्तर वर्तमान, प्रहर दिवस राहतां दोन प्रहर रात्रपर्यंत, सविस्तर, तुकोजीबावांनीं पांडुरंग शंकर यांजवळ सांगितलें. नकार नामक पकार नामकाच्या ममतेंत आहेत. तेही विक्षेपाच्या गोष्टी बहुतच सांगतात असें कितीक बारीक मोठें गृहकृत्य सांगितलें. त्यावर यांणींही बाईविशींचा हितोपदेश बहुत प्रकारें सांगितला. त्यांच्याही चित्तांत गोष्टी ठसल्या. तदोत्तर तुकोजीबावांनीं, आपलें अंतःकर्णपुरस्कर, बाईशीं आपला दुसरा अर्थ नाहीं या अन्वयें मशारनिल्हेजवळ हृद्गत सांगून, पांडुरंग शंकर यांस इकडे रवाना केलें. त्यांनीं येथं येऊन बाईस सविस्तर एकांतीं श्रवण केलें. बाईनीं ऐकून घेतलें. पुढें दोचौं दिवसां बाळाराव शिंद्यांकडील येथें येणार. इंदुरास आज दहा अकरा रोज झाले, आले आहेत. त्यांनींही इंदुरीहून काल कूच केलें. इकडे येणार. त्यासमागमें शिवाजी नारायण, पहिले पाटीलबावांकडून येथें होते ते, बाळारायांबरोबर आहेत. येथें आलीयावर काय जाबसाल उभयपक्षीं होतात तें पहावें.

सांप्रत खानदेशांतील वर्तमान.—केसोपंत दातार व एक पलटण ऐसे नंदुरबारेंत आहेत. एका पलटणापैकीं कांहीं सुलतानपुरीं चंदरराव पवाराजवळ गारदी

होते व कांहीं खानदेशांत पांगले होते. त्यास बाईंनीं येथून चिमाजी बुळे पाठविले होते. त्यांनीं आपल्या गांवास जाऊरास–जाऊन, लोकांची संचणी झाली नाहीं तोंपरीयंत, पलटणवाल्यांशीं खरें लटकें बोलून, गांवांत जाऊन, चारशें लोकांचा भरणा करून आठां दिवसांनीं चारशें राउत चांगले व पांचशें पायदळ घेऊन, कूच करून, रातोरात सुलतानपुरास जाऊन वेढा घातला. सुलतान-पुरावर हल्ला केला. बुरजावर निशाण चढलें. परंतु आंत चंदरराव पवाराजवळ दोन चारशें माणूस आहे; त्यांनींही आंतून दाटी केली. त्यास यांचा निशाणदार पडला. दोन तीन माणसें बुळ्याकडील कामास आलीं. चंदररायाचींही सत्रा माणसें ठार व दहावीस जखमी झालीं. किल्यांतून गोळागोळी होत होती. यांणींही बाहेरून मोरचे लाविले आहेत. मकाजी गितेही दोशां स्वारांनशीं बुळ्यास सामील झाले. सुलतानजी लांबहात्याचेंही पथक, आज तीन रोज झाले, चारशें स्वार येथें महेश्वरास आले. तेही उदईक रेवापार झाले उदईक कूच करून दरमजल सुलतानपुरास जाणार. मागाहून पाराजी दादाजी तेही येणार. सुलतानपुर घेतील. चंदरराव पवारही सुलतानपुरीहून निघायाच्या लागांत आहेत. नंदुरबारचें वर्तमानः– नंदुरबारेजवळ राजश्री गणेशपंत बेहरे दोन हजारा फौजेनशीं पांच चार कोसांवर दाखल झाले आहेत. हजार स्वारांनशीं नित्य येऊन, नंदुरबारेजवळ बाग आहे तेथें उभे राहत असतात. केसोपंत दातार पलटणासुद्धां नंदुरबारेंत आहेत. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.''

**लेखांक १५.** ता. ७ सप्टेंबर इ. सन १७८०.

**श्रीगजानन.** मि० भाद्रपद शु० ९ शके १७०२.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र ७ रमजानपरीयंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें आहेच. सांप्रतचें वर्तमानः– श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच आहेत व इंग्रजही जागांजागां छावणीस जेथें आहेत तेथेंच आहेत. खानदेशांत केसोपंत व भास्करपंत दोन पलटणें घेऊन आले आहेत, तितकींच आहेत. होळकराकडील फौज पांच सहाशें येथून मातुश्री अहिल्याबाईंनीं कांहीं पाठविली, व सुलतानजी लांबहात्याकडील दोनशें स्वार इंदुरीहून आले, तेही रेवा उतरून गेले. सारे पांच शहाशें जमून सुलतानपुरास मोरचे लाविले आहेत. सुलतानपुरांत चंदरराव पवार मात्र आहे. वरकड दोन्ही पलटणें व दोघे कारकून नंदुरबारेस आहेत. नंदुरबारेहून सुलतानपुरची कुमक

आतां होत नाहीं. राजश्री गणेशपंत बेहरे यांणीं बहीरबुणगें रनाळ्यांत टाकून, सडे नंदुरबारेजवळ बागांत येऊन, शह देऊन राहिले होते. , त्याजवर नंदुरबारेंत पलटणें आहेत त्यांनीं रतावा केला. दहा वीस घोडीं नेलीं व दोघे भले माणूस धरून नेले, व दहा पांच माणसें गणेशपंताकडील जाया झालीं. उधळून रनाळ्यास गेले. ह्मणून वर्तमान सेंदव्याहून संताजी होळकरांनीं बाईस पत्रीं वर्तमान लिहिलें होतें. बाईनीं तें पत्रच मजला दाखविलें. परंतु बाई ह्मणाली जे, घाटावरील वर्तमान हें आहे. घाटाखालून वर्तमान येईल तें खरें. परंतु आवाइचेंही वर्तमान येथें जागांजागां आलें आहे. सत्यमिथ्या देव जाणे. गुलजारखानही नंदुरबारेस जाऊन त्यास भेटला आहे ह्मणून वर्तमान आहे. पाटीलबावांकडील बाळाराव इंदुरीहून निघून इकडे येण्यास एक मजल प्रस्तान केलें आहे. परंतु पाऊसपाणी यामुळें अद्याप येथें आले नाहींत. येथें आलीयावर काय वर्तमान तें कळल्याप्रमाणें सेवेसी लिहीन. मातुश्रीबाईचा श्रावणमास झाला. ब्राह्मणांस दक्षणा देऊन बिदा केलें. आतां भाद्रपद शुद्ध ९ गुरुवारपासून भागवताच्या सप्त्यास प्रारंभ झाला आहे. पौर्णिमेपरीयंत समाप्त होणार. वरकड वर्तमान यथास्थित असे. कच्चें पक्कें वर्तमान देखलें ऐकिलें, तें वरचेवर सेवेसी विदित व्हावें, ह्मणून डाकेबरोबर विनंतीपत्र सेवेसी लिहिलें आहे. डाकवाल्यांनीं सरकारांत पावतें केलें ह्मणजे बरें आहे. वर्तमानाकरितां धन्यांनीं येथें ठेवलें आहे. कोणीकडूनही वर्तमान स्वामींस पोंहचावें ह्मणून लिहिलें आहे. बाळाराव येथें आलीयावर कासीदजोडी वर्तमान ऐकून ( रवाना ) करीन. सेवेसी श्रुत होय. सुरतेकडील वर्तमान साहुकाऱ्यांत येथें बोलतात जे, दसरा झालीयावर कोणी मातबर इंग्रज, पोख्त सरंजामानशीं खानदेशांत येणार. अमृतरावही त्याजबरोबर येणार. पाटीलबावाही ग्वालेर वगैरे हिंदुस्थानचा बंदोबस्त करावयास आपणच ग्वालेरीपावतर जावें ह्मणून वदंता आहे. यांत काय अर्थ असतील ते न कळेत. छ मजकूर संध्याकाळीं पत्र दरबारांत आलें कीं, बाळाराव चंद्र १० रोजीं येथें दाखल होणार. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १६.** ता० १४ सप्टेंबर इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि० भाद्रपद शु० ९ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ १४ रमजानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजी विनंतीपत्रीं लिहून, सेवेसी डाकेबरोबर दोन पत्रें

पाठविलीं आहेत. तीं पावलीं न पावलीं हें नकळे. सांप्रत इकडील वर्तमानः- राजश्री बाळाराव व. शिवाजी नारायण पहिले येथें होते ते, छ ११ मिनहूस दोन-प्रहरां येथें दाखल झाले. वाड्यांत श्री भागवताचा सप्ता झाला. पुराणांतच बाई बसली होती, मीही तेथेंच होतों. तेथें आधीं शिवाजी नारायण येऊन बाईस सांगितलें जे, बाळारायांचे भेटीचे मुहूर्त दोन प्रहरांत आहे, आज्ञा होईल तर येतील. बाईनें सांगितलें जे, येऊं द्या. त्यास शिवाजी नारायण जाऊन बाळारायांस घेऊन आले. बाळारायांनीं येऊन मुजरा केला. पांच मोहरा नजर ठेविल्या, व एक शालजोडी व चोळीपातळ पैठणी पुढें ठेविलें. लालाजी बल्लाळ ह्मणून पाटीलबावांकडील व चकोव्याचा मामलेदार शेणवाई आहे, मातबर मनुष्य, तेही बाळारायांबरोबर पाटीलबावांनीं पाठविले आहेत. त्यांनींही अनुक्रमेंच नजर केली. सहा घटका बसले. पुराण झालियावर दोन घटका बसले. आगतस्वागत विचारलें. तदोत्तर विडे दिले. महेश्वरचे पश्चिमेस अंबराईमध्यें उतरले आहेत. तेथें बिराडास गेले. बाईनीं एक थोर डेरा व दोन तीन रैाहुट्या पाठविल्या. मेजवानी दोशां लोकांची पाठविली. दोनशें स्वार त्यांजबरोबर आले आहेत. बाळारायांच्या शरीरास शूळाचा उपद्रव आहे, याज-करितां त्यांचें कुटुंब व सासू समागमेंच आहेत. सात दिवसपर्यंत भागवत-पारायण जालें. पौर्णिमेस समाप्त झालें. दानधर्म यथास्थित बाईनीं केला. पांच भागवताचीं पुस्तकें दान ब्राह्मणांस दिलीं. दोन दोनशें रुपये दक्षणा दरपुस्त-कावर, व पांच ब्राह्मणांस, पांच शालजोड्या पागोटीं, व पारायणें करणारांस दोनशें रुपये दक्षणा, वस्त्रें, याप्रमाणें देऊन, काल पौर्णिमेस समाप्त झालें. आतां बाळा-रायांशीं काय बोलणें ते बोलतील. लहान मोठा शोध करितां, ऐकिण्यांत आलें आहे कीं, हिंदुस्थानांत गडबड फार झाली आहे. यास्तव, उभयतां सरदारांतून एकांनीं हिंदुस्थानांत जावें, तिकडील बंदोबस्त करून उभयतांच्याही मुलकाचा अंमल बसवून, सुबेत्यानें (सुबत्तेनें) चालेसें करावें. एकांनीं हुजूर चाकरीस देशांत असावें. असा विचार पाटीलबावांनींच आपले जागा करून पुण्यास पत्रें लिहिलीं आहेत. तेथून जशी आज्ञा येईल, त्याप्रमाणें कर्तव्य तें करावें. असें वर्तमान ऐकिलें आहे. दोनचार दिवस झाले, बाईही मजशीं बोलत होती जें, शिंद्यानें आपले जागा विचार केला आहे जे, हिंदुस्थानांत रांगड्यांनीं गडबड केली आहे; ठाणीं उठविलीं आहेत; यास्तव आपली फौज हिंदुस्थानांत पाठवावी आणि आपणही हळू हळू तिकडेच जावें; आणि आमची फौजसुद्धां आह्मीं चाकरीस देशीं हुजूर असावें अशी यांनीं मसलत केली आहे. हे गोष्ट आह्मांस

अनुकूल पडणार नाहीं. असें झाल्यास आमची सोय नाहीं. बरें. श्रीमंत काय सलाह त्यांस लिहून पाठवितात, पाहावें. असें बोलत होती. बाळारावही पाटीलबावांशीं कांहीं खंडित बोलणीं बोलले. ते समयीं पाटीलबावांनीं बाळारायांस सांगितलें जे, महेश्वरापासून उज्जनीपर्यंत डाक बसवा. नित्यचें बोलणें जें होत जाईल, तें वरचेवर लिहून पाठवीत जावें. येथून सलाह मसलत जशी लिहून पाठवूं, त्याप्रमाणें तेथें बोलत जावें. याप्रमाणें पाटीलबावांनीं यांस सांगितलें आहे. येथून डाक बसविणार असें ऐकिलें वर्तमान सेवेशी श्रुत होय. राजश्री तुकोजी बावांसही खंडित बोलून कांहीं आले आहेत ह्मणून ऐकिलें. काय...खानदेशांतील वर्तमान काल बाईस पत्रें तिकडे सरकारी गेलें होतें, त्यांनीं लिहिलीं होतीं जे, सुलतानपुराजवळ होळकराची फौज चार पांचशें जमा झाली आहे. सुलतानपुरास वेढा घातला आहे. गोळागोळी नित्य होतच आहे. आतां वाघांचे पथक पांचशें स्वार आले आहेत. सामान चांगलें आहे. तेही रेवा उतरले. उद्यां परवां त्यांचेंही कूच होऊन खानदेशांत जातील. सरंजामीं वाघ व बुळे व दोन तीन पागा असे तेथें गेले आहेत. आतां हे फौज गेल्यावर काय करतील पहावें. चंदरराव पवार सुलतानपुरांत शंभर स्वार व चारशें पायदळ इतक्यानशीं आहेत. नंदुरबारेस दोन पलटणें सुद्धां केसोपंत दातार व भास्करपंत असे आहेत. नंदुरबारेस सात दरवाजे आहेत, त्यांपैकीं एक दरवाजा खुला ठेविला आहे, व वरकड दरवाजे बंद करून आपले मुस्तकिमींत आहेत. रात बिरात चौकी पहाऱ्यांचा बंदोबस्त करून आहेत. राजेश्री गणेशपंत बेहेरे दोन हजार फौजेनिशीं बाहिरबुणगे रनाळ्यांत टाकून, सडे दीड हजार फौजनशीं तलाव्यास नंदुरबारेजवळ आले होते. त्यास दातार मजकुरांनीं त्यांजवर छापा पाठविला. तेही सावधच होते. उभयपक्षीं गोळागोळी होऊन हे नंदुरबारेस आले व गणेशपंत रनाळ्यास गेले. तेथेंच आतां आहेत. आतां तलाव्यास येत नाहींत. ह्मणून येथें लिहिणें आलें होतें. खानदेशांत होळकराची फौजही उतरत चालली व गणेशपंतही आले आहेत. आणखीही फौज येईल. यास्तव केसोपंत दातारानें सुरतेस पत्रें पाठविलीं. तेथून तीन पलटणें कुमकेस रवाना झालीं. ह्मणून वर्तमान आलें आहे. गुलजारखानास व भिल्लांस अभयपत्रें सरकारचीं यावीं ह्मणून विनंती लिहिली होती. त्या गोष्टीस फार दिवस लागले. आतां दोन्हीही अभयपत्रें येथें आलीं. येथें गुलजारखानाचा शोध केला. तो इतके दिवस त्यानें वाट पाहिली. केसोपंत दातारानेंही कांहीं त्याचा बुद्धिभ्रंश केला. त्यामुळें गुलजारखान सुरतेस श्रीमंत दादासाहेबांकडे गेला आहे. भिल्लांचे, बाई ह्मणाली,

जें पाहून पाहून सोईस येईल, तसें करूं. हरकूबाईच्याही पागा बाईनीं सुलतानपुराकडे पाठवितात. येथील लहानमोठा मजकूर दोनीं पत्रीं पेशजीं लिहिला होता. त्याचीं उत्तरें यावीं. तें मनन करून बाळारायांसीं त्या अन्वयें काय बोलणें तें बोलावें, अशी येथील उत्कंठा फार होती. मजलाही दहा पांच वेळां विचारलें होतें जे, त्या पत्रांचीं उत्तरें कांहीं आलीं कीं काय? तें अद्याप कांहीं आलीं नाहींत. सांप्रत उज्जनीकडील बोलण्याचाही प्रसंग पडला आहे. मजलाही पहिलेप्रारखे कांहीं विचारीत नाहींत. राजश्री यशवंतराव गंगाधर यांचे विद्यमानें कांहीं सरकारचीं पत्रें येथें आलीं असलीं तर न कळे.

जाबसालांत आल्यास बरीक मोठें वर्तमान चहूंकडील कळतें. लोकांस कोठवर पुसावें? तें खरें कशावरून? अलीकडे सरकारचीं पत्रेंही येत नाहींत. येथीलही आस्था' आह्मांशीं समयानरूपच आहे. कागदींपत्रीं शिलसिला असल्यास हर कांहीं वर्तमान बोलण्यांत येतें, असें आहे. स्वामीही जें कर्तव्य तें विचारूनच करितात. सेवकाची खर्चाची फारच विपत्य आहे. त्रिंबकराव मोरेश्वर यांजवर चिठ्ठी पाठविल्यास सात आठ महिने झाले. दोनशें रुपये येथें लोकांचें देणें झालें. प्रवासाचा खर्च. स्वामी सर्वज्ञ. बारीक मोठीं पत्रें पेशजीं लिहिलीं आहेत. तें फाडून टाकणें ह्मणून पेशजी आज्ञा आली होती. त्याप्रमाणें एक पत्र होतें तें फाडून टाकिलें. आणी सेवेसींही लिहिलें होतें जे, आज्ञेप्रमाणें एकांतींचें पत्र फाडून टाकिलें. सांप्रत चिरंजीवानें लिहिलें जे, श्रीमंतांची आज्ञा अशी झाली आहे. त्यास पहिलेंच फाडून टाकिलें. श्रुत होय. हे डाकेचीं पत्रें सेवेसी पावतात कीं नाहीं. डाकवाल्यांस ताकीद झाली तर आलेलें वर्तमान वरचेवर लिहून, कितीक काशिदाबरोबर लिहिणें तें मुजरद जोडी रवाना करीत जाईन. तेथूनही वरचेवर जोडी येत असावी हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १७.** ता० १७ सप्टेंबर इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि० भाद्रपद शु० १२ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र ११ रमजानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील व श्रीमंत दादासाहेबाकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून, कासीदजोडीबरोबर व डाकेबरोबर सेवेसी पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वृत्तः-श्रीमंत दादासोहब सुरतेसच आहेत. कलकत्याकडे इंग्रजांचीं पत्रें व श्रीमंतांचीं पत्रें गेलीं आहेत. येथून उत्तरें आल्यावर काय

## १३. मराठ्यांच्या राज्यवैभवाचें गौरवयुक्त वर्णन.

इ. स. १७९२ सालीं महादजी शिंदे दक्षिणेंत आले. त्यांनीं जामगांव मुक्कामीं दौलतराव शिंदे ह्यांच्या लग्नाचा समारंभ केला. त्यास नाना फडणवीस गेले होते. तेथें उभयतांच्या भेटी झाल्या व निखालसपणें स्नेहभावाचीं बोलणीं झालीं. हें वर्तमान नानांनीं आपले प्रिय मित्र गोविंदराव काळे ह्यांस लिहिलें. त्यांना हें आनंदवृत्त समजोन फार समाधान झालें. मराठ्यांच्या राजसत्तेचा प्रसार सर्व उत्तर हिंदुस्थानांत करून विजयानंदानें दक्षिणेंत येणारा, महापराक्रमशाली, मराठा वीर महादजी, व 'खूब शर्थीनें राज्य राखणारा' शहाणा मुत्सद्दी नाना ह्यांच्या निखालसपणाच्या भेटी होऊन, त्यांच्या रहस्याचें संतोषवृत्त जेव्हां गोविंदराव काळे ह्यांस समजलें, त्या वेळीं त्यांचें अंतःकरण फारच प्रसन्न झालें; व ज्याप्रमाणें पौर्णिमेचें प्रफुल्ल चंद्रबिंब पाहून सागर आनंदानें गर्जना करूं लागतो, त्याप्रमाणें त्यांनीं आनंदभरानें मराठ्यांच्या राज्यवैभवाचें गुणानुवादन केलें. तें इतकें सुरस व मनोरम आहे कीं, तें वाचून कोणाचेंही हृदय संतुष्ट झाल्यावांचून राहणार नाहीं. ह्या पत्रावरून महादजी शिंदे ह्यांच्या आगमनाचा प्रसंग महाराष्ट्रास किती आनंददायक व संस्मरणीय झाला, त्याची चांगली कल्पना करितां येते.

श्री.

"विनंती ऐसीजेः—"राजश्री पाटीलबावा जामगांवास आलियावर, तुकोजी शिंदे यांचे नातू दौलतराव शिंदे, वय बारा वर्षांचें, त्यांचे लग्नाचा निश्चय करून, श्रीमंतांस व मंडळीस अक्षद द्यावयाकरितां फडणीसास पाठविलें. त्यांनीं श्रीमंतांस व सर्व मंडळींस अक्षद दिली. सरकारांतून राजश्री गोविंदराव बाजीबराबर अहेर पाठविला. आह्मीं आपला अहेर वेदमूर्ति राजश्री गोविंदभट यांजबरोबर पाठविला. त्यांसीं व पाटील-बावासीं निखालसतेचें बोलणें जालें. त्यांत निखालसता बहुत पाहिली. नंतर मागाहून राजश्री आबा चिटणीस पुढें आले. त्यांसीं बोलणें होऊन, परस्परें निखालसतेचा विधे[१] राजश्री हरिपंत तात्यासुद्धां जाला. नंतर भेटीचा समारंभ जाला. कोणे गोष्टीचा संशय राहिला नाहीं. तुह्मांस कळावयाकरितां लिहिलें ह्मणोन आज्ञा." ऐशियास पत्र पाहतांच रोमांच उभे राहून अति संतोष जाला. याचा विस्तार पत्रीं किती लिहूं? सीमा असे. यावरून ग्रंथांचे ग्रंथ मनांत आले. ते लिहिल्यानें बहुचकपणा दिसतो. दिसो, परंतु जें मनांत आलें त्यांतून किंचित् अमर्याद करून लिहितों. एक एक रकमें[२] मनांत आणून दीर्घ दृष्टीनें तोलून पाहिल्यास खरें आहे असेंच निघेल. तें काय? तपः-शीलः—अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्रपावेतों हिंदूंचें स्थान—तुरकस्थान[३] नव्हे!—हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजित पावेतों. त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें

१ विध=विधी. २ रकम=गोष्ट, कलम. ३ तुरकस्थान=मुसलमानांचा देश, यवनभूमि.

राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचें प्राबल्य जालें. चकत्यांनीं[1] हस्तनापुरचें पद घेतलें. शेवटीं अलमगिराचे कारकीर्दींत यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया[2] बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं घ्यावें, हे नौबत गुजरली[3]. त्या दिवसांत कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व धर्मराखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मसंरक्षण केलें. पुढें कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंडप्रतापसूर्य असे जाले कीं, असें कधीं जालें नाहीं. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम अवतारीं काय असेल तें असो. त्या गोष्टी यांस शिंदे होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकडून व राजश्री पाटीलबावांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमेंकडून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें? प्राप्त जालें तेणेंकडून सुलभता वाटली अगर मुसलमान कोणी असे, तरी मोठे मोठे तवारीखनामे[4] जाले असते. यवनाच्या जातींत तिळाइतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनाबराबर करून शोभवावी; आमचे हिंदूंत गगनाइतकी.झाली असतां उच्चार न करावा, हे चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठीण! दोस्त दुष्मन फार. यवनांचे मनांत कीं काफरशाई[5] जाली हें बोलतात. लेकिन[6] ज्यांनीं ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललीं, त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडिलीं. कोणाच्याही मनांत हे वाहडले, ते शेवटास जाऊं नये. यास्तव, नाना स्वरूपें व युक्तींकडून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे हें पुढेंच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. जाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्य प्राप्त, इतकेंच नाहीं, तरी वेदशास्त्ररक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व, हातीं लागणें, कीर्ति यश यांचे नगारे वाजणें, इतक्या गोष्टी आहेत. हे किमैया[7] सांभाळणें हक्क[8] आपला व पाटीलबावांचा! यांत वेत्यास[9] पडला कीं दोस्त दुष्मन मैबजूद[10]. संशय दूर जाले, हें अति चांगलें! अति चांगलें! याउपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मैदानांत असाव्या, यांचे मनसबे दौडावे. वेत्यास पडावे, तमाशे पाहावे, असे जन जे आहेत ते उशा पायथ्यास लागून आहेत. चैन नव्हतें. आतां आपण लिहिल्यावरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेंच मनन व्हावें. खरें कीं, लटकें हें समजावें. रवाना छ ११ जिल्काद हे विनंती."



१ चकत्यांनीं=तैमुरलंगाच्या ह्मणजे मोंगली वंशास चकते असें आडनांव आहे व त्यांच्या पादशाहीस 'चकत्यांची पातशाही' असें ह्मणतात. २ जेजिया=झेजिया=औरंगजेबानें बसविलेला जुलमी कर. ३ नौबत गुजरली=द्वाही फिरली, डंके वाजले. ४ तवारीखनामे=बखरी, इतिहास. ५ काफरशाई=लबाड किंवा लुच्चे लोकांची बादशाही. मराठ्यांच्या हिंदुपदपादशाहीस मुसलमानांनीं दिलेलें हें निंदाव्यंजक नांव आहे. ६ लेकिन=परंतु. ७ किमया=अद्भुत कृति. ८ हक्क=अधिकार, सामर्थ्य. ९ वेत्यास=व्यत्यास=विरुद्धता, व्यत्यय, अंतर. १०. मबजूद=भांडण्यास तयार, विरुद्ध बाजूस सिद्ध, हजर.

## १४. पाणिपतच्या लढाईचीं दोन पत्रें.

पाणिपतच्या लढाईसंबंधानें अस्सल पत्रें फारशीं उपलब्ध होत नाहींत. आह्मांस मिळालेलीं दोन पत्रें फार महत्त्वाचीं आहेत. हीं दोन्हीं पत्रें बाबुराव फडणवीस ह्यांस लिहिलेलीं आहेत.

### लेखांक १.

हें पत्र बळवंतराव गणपत ह्यांचें आहे. ह्या पत्राची तारीख दिलेली नाहीं. परंतु त्यावर दाखल झाल्याची तारीख दिली आहे. , त्यावरून हें पत्र ता. २३ नोव्हेंबर इ. स. १७६१ चें आहे असें दिसून येतें. ह्यामध्यें मराठे सैन्याची स्थिति व भाऊसाहेबांची हिंमत व त्यांची सैन्यावरील कृपादृष्टि ह्यांचा उल्लेख आहे.

श्री.

"राजश्रिया विराजित रा० रा० बाबूराव बाबा स्वामींचे सेवेसीः—

पो॥ बळवंतराव गणपत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. विशेषः—बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर लिहीत जावें. इकडून पत्रें पांच सात पाठविलीं, परंतु उत्तर येतच नाहीं. तर ऐसें नसावें. आह्मांविसीं नेम केला असेल तर मोडावा. इकडील वर्तमान तर, आश्विन शुद्ध प्रतिपदेस अलीगोहर याचे लेकास वलीहद[1] दिल्लींत करून, बसविलें. गजशिक्का अली गोहराचा करून, दिल्लीचा बंदोबस्त करून, नारोशंकर यांस तेथें ठेविलें; आणि कुंज-पुऱ्यास अबदुल सयधखान वगैरे पांच सात हजार फौज आहे, त्याजवर जाण्यास पाणपतपावेतों येऊन पोहोंचले; व लोकांस तफावत आहे. पुढें होईल तें लिहून पाठवूं. नदीस पाणी, आठचार दिवस उतरावयास पाहिजेत. गिलच्यांची फौज दिल्लीजवळ पलीकडे ये काठींच आहे. कूच करून पलीकडले तीरानें येणार होते. प्रस्तुत लष्करांत खर्चाची निकड फारच आहे. रसदेचा[2] पैसा अद्यापि एक न आला! तीही महिन्यांत फौजेस दोन रोजमरे[3] पावले. आह्मां सारिख्यांनीं वस्तां[4] मोडून खादल्या. सर्वही पेंच ईश्वरइच्छेनें श्रीमंतांचे प्रतापें वारतील. एक भाऊसाहेबांची हिंमत व लोकांवर उत्तम दृष्टि आहे. येणेंकरून फत्तेच आहे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती."

### लेखांक २.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. पाणिपतच्या लढाईमध्यें मराठ्यांचा पराभव झाल्याचें वर्तमान ह्या पत्रांत दिलेलें आहे. पाणिपतची लढाई ता. १४ जानेवारी

---

१. वलीहद=वारस, गादीचा धनी. २ रसद=फौजेच्या बरदास्तीकरितां लागणारें धान्य, दारूगोळा, सामान वगैरे; किंवा त्यासंबंधानें कमाविसदार किंवा महालचे अधिकारी यांनीं पावयाचें द्रव्य तें. ३ रोजमरा=पगार, वेतन. ४ वस्तां=चीजवस्त, दागदागिने.

इ. स. १७६१ रोजीं झाली आणि ह्या पत्राची तारीख २१ फेब्रुवारी इ. स. १७६१ आहे. ह्यावरून पाणिपतच्या लढाईनंतर सुमारें ३८ दिवसांनीं लिहिलेलें हें पत्र आहे. श्रीमंत भाऊसाहेब हत्तीवरून खालीं उतरल्यामुळें मराठे सैन्याचा धीर खचला व तेणेंकरून त्यांस अपयश आलें, ह्मणून जो लोकसमज प्रचलित आहे, त्यास ह्या अस्सल पत्राचाही आधार दिसतो. हें पत्र अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें व वाचनीय आहेः—

### श्रीशंकर.

"श्रीमंत राजश्री बाबूराव फडणीस स्वामींचे सेवेसीः—

सेवक जिवाजीनाईक येवलेकर मुक्काम उज्जनी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत माघ वद्य २ रविवार मुक्काम उज्जनी येथें आपले आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. इकडील वर्तमान तरः— श्रीमंत थोरले भाऊसाहेब व श्रीमंत राजश्री जनकोजी शिंदे हे दोघे मात्र व कांहीं फौज थोडीशी घेऊन जे समयीं लढाई जाहाली, ते समयीं झुंज मातबर जाहालें. गिलच्यांकडील माणूस मारले गेले चाळीस हजार, व गिलच्यांकडील सरदार दोन मातबर पडले. सावकारी खबर तों ऐशी आहे कीं, मुख्य गिलच्याचा लेक उंबरशाहा, मलकाजमानीचा जांवई, तो झुंजांत ठार जाहाला. तोफेचे लढाईत गोळा लागला तो खराखुरा मारला गेला. दुसरें, नजीबखान तोही मारला ह्मणतात; परंतु त्याची खबर ठीक नाहीं. कोणी ह्मणतो मारला गेला; कोणी ह्मणतो नाहीं. परंतु नजीबखान यास जखम भारी आहे. एक भुज उडोन गेली, हेंच तों खरें. वरकड आणखी सरदार मेले, ते कोणी वळखत नाहीं. नांवाचे सरदार दोनच. सुजातदौल्लाही जिवंत आहे. जे समयीं लढाई जाहाली, ते समयीं हेच चालोन गेलेत. यांच्या लष्करांत अन्न खायास मिळेना. मग हेच त्यांजवर गेलेत. जे समयीं लढाई जाली, ते समयीं यांनीं तों त्यांचा मोड केलाच होता. परंतु थोरले भाऊसाहेब हत्तीवरून उतरले, ते समयीं आपल्याकडील सरदार यांनीं मागें पाहिलें. तों सरदार दिसेना! आणखी, यांनीं गिलच्यांकडील फौज कांहीं रुसून आली होती, ते दोन तीन हजार ठेविली. जे समयीं इब्राम गारदी यांजकडील पडला, ते समयीं गिलच्यांकडील जे चाकर ठेविले होते, ते त्यांनीं माघारा पळोन बुणग्यांत[1] आले. बुणग्यांस भास पडला कीं, गिलच्यांचा जय जाहाला. यामुळें बुणगें लुटलें गेलें. आणखी, श्रीमंत, जे समयीं विश्वासराव दिसेनात ह्मणोन हत्तीवरून उतरले, इतकाच फेर पडला; त्यामुळें यांनीं मोड खाल्ली. नाहीं तर फत्ते जाहाली होती. आतां सर्व सरदार तों कायम आहेत. श्रीमंत विश्वासराव कोठें दिसत नाहींत. व भाऊसाहेब थोरले व राजश्री जनकोजी शिंदे हे जेथें लढाई जाली, तेथून विसां कोसांवर एक जमीदार याची गढी, तेथें होते. मग जमीदार मिळोन आला. जाट

१ बुणगें=बाजारबुणगें. लढाऊ फौज खेरीज करून जे लष्करांत लोक असतात ते.

याच्या मुलखांत गेलेत. तिकडून मथुरेस, जेथें मल्हारजी होळकर व राजश्री विठ्ठल शिवदेव व नारोशंकर, व जे मोडले व सर्व एका जागां जाहाले, ते भिंडीवर सर्व एका जागां झाले. परंतु श्रीमंत भाऊ थोरले व श्रीमंत जनकोजी शिंदे ये जागां आहेत, हे कायम आहेत. त्यांचीं कांहीं हातचीं पत्रें तों आलीं नाहींत! परंतु सरदार कायम आहेत. पुढें मथुरेस फौजेंत एका जागां होणार. उपर श्रीमंत राजश्री रामाजी भाऊ तों रेवाडीमध्यें उज्जनेचा मोड आला त्याजला भेटलेत. पायीं चालत आलेत. गळ्यांत कफनी, हातीं स्मरणी, ऐसे सुखरूप आलेत. मथुरेस सुखरूप फौजेंत गेलेत. चिंता नाहीं. त्यास श्रीमंत नानासाहेब सुरंजेस दरमजल गेलेत कळावें. आतां आम्हीं लष्करांत जोड्या दोन पाठविल्यात. आलियावर जें वर्तमान येईल तें लवकरच लेहून पाठवून देऊं. कृपालोभ असों दीजे हे विज्ञापना. मिति माहे वद्य २ शनवार. याजपाशीं पत्रें देणें, लष्करांत रवाना करूं. सेवक पदरचा आहे."



## १५. सखाराम हरीची कैद.

सखाराम हरी हे श्रीमंत दादासाहेबांच्या पक्षाचे निस्सीम सेवक होते. हे जातीचे परभू असून ह्यांचें आडनांव गुप्ते असें होतें. ह्यांनीं, श्रीमंत दादासाहेबांचा पक्ष स्वीकारून, कारभारी मंडळीच्या विरुद्ध कारस्थानें केल्यामुळें, त्यांना नाना फडणविसांनीं घनगड येथे कैदेंत ठेविलें होतें. त्या वेळीं राजकीय कैद्यांना फार सक्तपणाची शिक्षा देण्याची चाल असल्यामुळें, सखाराम हरीस फारच कडक शिक्षा देण्यांत आली होती. त्यांच्या पायांत अतिशय जड लोखंडी बेड्या अडकविल्या होत्या, व त्यांस खावयास पोटभर अन्नही मिळत नसे. तथापि, अशा स्थितींतही हा स्वामिनिष्ठ सरदार ह्मणत असे कीं, "माझी शक्ति गेली, व माझे प्राणही चालले! माझी वाचा बंद झाली व श्वासोच्छ्वासही बंद पडला; तरी माझे अस्थींतूनही 'रघुनाथराव,' 'रघुनाथराव,' हींच अक्षरें निघतील." ही हकीकत मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ ह्यांनीं आपल्या इतिहासांत दिली आहे. ह्या हकीकतीस पुष्टीकरण देण्यासारखें एक महत्त्वाचें पत्र उपलब्ध झालें आहे. हें पत्र महादजी शिंदे ह्यांनीं नाना फडणवीस ह्यांस लिहिलें आहे. ह्या पत्रावरून पेशवाईतील राजकीय कैद्यांस किती कडक शिक्षा मिळत असे, त्याची कल्पना करितां येईल. त्याचप्रमाणें राजकीय कैद्याची नुसती भेट घेण्यासही त्याच्या आप्तेष्टांस किती द्रव्यदंड द्यावा लागे, ह्याचेंही दिग्दर्शन होईल. ह्या द्रव्यदंड भरण्यास सामर्थ्य नसल्यामुळें सखाराम हरीची व त्याच्या प्रिय पत्नीची भेट झाली नाहीं, ही अत्यंत हृदयद्रावक गोष्ट होय! आणि द्रव्यदंड देण्यापूर्वींच,

सखाराम हरी मृत्यु पावले, तरी द्रव्यदंड वसूल करण्याचा तगादा त्यांच्या बायकोमागें चालू रहावा ही अन्यायाची गोष्ट होय!! तथापि, अशा स्थितींत पाटीलबावांस दया येऊन त्यांनीं मध्यस्थी केली, हें त्यांस भूषणास्पद होय यांत शंका नाहीं.

श्री.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसः—

दंडवत विनंती उपरीः–सखाराम हरी कैदेंत घनगडीं होते. त्यास बेडी मातबर व भोजनाचेंही यथास्थित नव्हतें. याजमुळें प्राणांतिक अवस्था झाली होती. त्यावरून यांचे स्त्रीनें सरकारांत रदबदली केली कीं, बेडी हलकी करून, अन्नपाण्याची व औषधें उपाय करावयाची मोकळीक करवून, मजला किल्ल्यावर जावयाची परवानगी द्यावी. त्याजवरून उत्तर जालें कीं, बारा हजार रुपये द्यावे, म्हणजे सदरहूप्रमाणें परवानगी दिली जाईल. तेव्हां त्यानीं मोलभीकें[1] मागोन, घरोघर फिरोन बाराहजार रुपये द्यावयाचा करार करून, किल्ल्यावरी जाऊन पोहोचेन अशी सनद द्यावी; म्हणजे कराराप्रमाणें एका महिन्याचे मुदतीनें ऐवजाचा भरणा करीन. त्याजवरून तीजवळून आपण ऐवजाचा हमीदार[2] घेतला. त्यास सनद तिच्या हातास पोहोंचोन ती किल्ल्यावरी न जातां सखाराम हरी मृत्यु पावला. हल्ली हमीदारास ऐवजाकरितां सरकारचा तगादा लागला आहे. हमीदार तिजला तगादा करितो. ऐशियास जो अन्यायी तो मृत्यु पावला; व बायकोची त्याची भेटीही न जाली. यास्तव बायकोस तगादा ऐवजाचा, हमीदाराचा, नसावा; व हमीदारासी सरकारांतून न व्हावा. ज्यापक्षीं अपराधी मरण पावला, त्यापक्षीं सरकारांतून माफ करून, ऐवज न घ्यावा. यांचे मुलांमाणसाचें चालवून आजात[3] करावें. वरकड बारा हजारांनीं सरकारकिफायत होती ऐसें नाहीं. तशांत त्यांजवळ ऐवज आहे नाहीं, हें कळलेंच आहे. मोल मागोन ऐवज जमा करणार! तोही सखाराम हरी यांचे मरण्यामुळें कोणी ऐवज देईल हेंही नाहीं! सारांश, मुलांमाणसांची मुक्तता होय तें करावें. हमीदारास सरकारांतून तगादा जाल्यास हमीदार बायकामुलांस तगादा करील. घरचें सर्व जप्तींत आलें असतां त्यास ऐवज मिळणें कळतच आहे. याकरितां लिहिलें असे. रवाना चंद्र ७ जिल्काद हे विनंति."

## १६. नाना फडणविसांची शोधक बुद्धि.

नाना फडणविसांच्या शोधक बुद्धीची तारीफ करावी तितकी थोडी आहे. त्यांनीं राज्यव्यवस्थेंत पुष्कळ सुधारणा करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांची मुलकी राज्यव्यवस्था कशी होती ह्याची प्रशंसा इतिहासांतरीं आलेली आहे.

१ मोलभीक=मोलमजुरी व भिक्षा. २ हमीदार=जामीन. ३ आजात=आजाद+करणें=मोकळें करणें, जप्ती खुली करणें.

त्यांनीं राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठीं सर्व मराठी राज्यांतील सुभे व सुभ्यांतील महाल ह्यांची मुसलमानी अमलांतील बेरीजवार माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला होता. त्याबद्दल त्यांनीं महादजी शिंद्यांचे दिवाण आपाजी राम दाभोळकर ह्यांस पत्र लिहिलें होतें. त्यांजकडून नानांस आलेलें पुढील उत्तर वाचण्यासारखें आहेः—

" * * * * स्वामींनीं दुसरे पुरवणींत लिहिलें कीं, 'दक्षण व हिंदुस्थान येथील सुभे व सुभ्यांतील माहाल बेरीजवार पातशहाचे दप्तरांत निवडले असतील, त्यास दप्तर स्वारीबरोबर असल्यास त्यांत अथवा दिल्लींत शोध करून बेरीजवार माहाल लेहून पाठवावे. तमाम प्रांतांच्या बेरजा माहालवार आढळल्यास त्याही लेहून पाठवाव्या. या गोष्टीचा प्रयत्न पातशाई दप्तरांत कोणी माहितगार ममतेंत घेऊन करावा. ह्मणोन आज्ञा.' त्यास आज्ञेप्रमाणें या कागदपत्रांचा शोध थोडाबहुत केला व पुढें आणखी करावयाचा आहे. परंतु तूर्त येथें गडबडीचा प्रसंग आहे. याजकरितां जो कोणी वाकबगार आहे त्यानें सांगितलें कीं, प्रस्तुत गडबड आहे, याजमध्यें कागदपत्राचा छडा यथास्थित लागणार नाहीं. मुबत्ता जाहल्यावरी माझ्या माहितगारीनें जेथवर शोध लागेल तितका करून, आपणास समजावून देऊं, ह्मणोन बोलिला आहे. व आणखीही दिल्लींत या गोष्टीचा शोध करवितों. मग जैसें साधेल तैसें साधी. इकडील दरबारी वर्तमान तरीः–विजयादशमीचे मुहूर्तेकरून राजश्री पाटीलबावांचा मुक्काम आलवारानजीक होता; तेथून कूच करून कोसभर पुढें आले. पुढें होईल मजकूर तो सेवेसीं मागाहून लेहून पाठवूं. सारांश, गोष्ट हीच कीं, विना सरकारची फौज कुमकेस येणार, ती आलियाखेरीज कोणतीही गोष्ट घडत नाहीं. यास्तव ह्या मजकुराचीं पत्रें स्वामींस राजश्री पाटीलबावांनीं दाहा पांच लिहिलीं आहेत, व सेवकानेंही पांच सात रवानग्या या मजकुराच्या केल्या आहेत, व त्या रवानग्यांचीं उत्तरेंही स्वामींचीं आलीं, परंतु अद्याप फौज मार्गस्थ जाहाली नाहीं. यास्तव हल्लीं राजश्री पाटीलबावांनीं पत्रें फौज येण्याविषयीं लिहिलीं आहेत. तर फौज रवाना करण्याविषयीं आज्ञा सत्वर व्हावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## १७. हरिपंत फडके ह्यांचा मृत्यु.

पेशवाईतील प्रख्यात ब्राह्मणवीर हरिपंत फडके हे नाना फडणविसांचे समकालीन व त्यांचे परम मित्र होते. ते ता. २० जून इ. स. १७९४ रोजीं मृत्यु पावले. त्यांच्या मृत्यूनें नानांस फार दुःख झालें. तें इतकें कीं, नानांस प्रत्यक्ष आपला बंधु वारला असें वाटलें! नानांनीं हरिपंतांच्या मुलांस जीं समाधानपत्रें लिहिलीं आहेत, त्यांचीं उत्तरें हरिपंतांच्या मुलांनीं पाठविलीं आहेत. तीं वाचण्यासारखीं आहेत. त्यांवरून नानांचा व हरिपंतांचा ऋणानुबंध कसा होता, तें चांगलें दिसून येतें.

## लेखांक १.

"स्वामींचे सेवेसी" चिंतामण हरी व रामचंद्र हरी व लक्ष्मण हरी कृतानेक विज्ञापना तागाईत चंद्र २३ जिल्काद रविवार, अवशीची चार घटका रात्र, पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेषः- स्वामींनीं चंद्र २२ मिनहूचें आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. वडिलांहीं कैलासवास केला, हें ऐकोन फार वाईट वाटलें. त्यांचा ऋणानुबंध होता तो काय ल्याहावा? ईश्वरी इच्छेस उपाय नाहीं. तुह्मीं श्रमी होऊं नये. ज्या गोष्टी ज्या काळीं ईश्वरें नेमिल्या, त्या चुकत नाहींत. श्रम केले असतां साध्य नाहीं. विवेक करून चित्ताचें शांतवन करावें, ह्मणोन आज्ञा. त्यास ईश्वराचे नियमाप्रमाणें जी गोष्ट व्हावयाची, ती कालपरत्वें होतच आहे. परंतु वियोगजन्य दुःख होतें, तें काय विनंती ल्याहावी? हल्लीं स्वामींचें आज्ञापत्र आले, हें पाहातांच, वडिलांचे पत्राप्रमाणें असेंच मनास वाटून श्रम दूर जाला. आज्ञेप्रमाणें विवेक करितों. वडिलांचा (व) स्वामींचा ऋणानुबंध होता तो स्वामींचे चित्तास ठाऊक. दुसरा काय जाणे? ह्मणोन स्वामींस खेद बहुत होतो. ऋणानुबंध लिहून कळवावा असें नाहीं. आतां वडिलांचे ठायीं स्वामी, तेव्हां स्वामी श्रम करूं लागले, तर विवेकाची विनंती कोणीं करावी? आह्मी लेंकरें, स्वामी वडील. विवेक करून सांभाळ करणें स्वामींकडे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २.

दुसरें पत्र हरिपंतांच्या वडील चिरंजीवांचें ह्मणजे बाबा फडके ह्यांचें आहे. ह्या पत्रामध्यें हरिपंत फडके ह्यांनीं मरणापूर्वीं दोन घटका नानांचें नांव घेऊन प्राणोत्क्रमण केलें असा उल्लेख केला आहे. हें पत्र येणेंप्रमाणेंः—

"स्वामींचे सेवेसी विज्ञापनाः- स्वामींनीं चंद्र २२ जिल्कादचें आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. त्यांत 'वडील कैलासवासी जाले; मरणापूर्वीं दोन घटका माझें नांव घेऊन स्मरण केलें; त्यावरून फार श्रम चित्तास वाटले, ते ईश्वर जाणे! त्यांचा ऋणानुबंध माझे मनास ठाऊक! याचें उत्तर ल्याहावयास लेखणी चालेना! होणार चुकत नाहीं. 'विवेक करावा' ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींनीं आज्ञा केली ते प्रमाण. तसाच ऋणानुबंध स्वामींचा त्यांचा होता. तेव्हां लेखणी कशी चालेल? विवेक करण्याविषयीं आज्ञा. त्यास वडिलांचे ठायीं आतां स्वामी. आज्ञापत्र आलें हें वडिलांचें असेंच मनास वाटलें. सर्वप्रकारें स्वामी आहेत. आह्मांस काळजी काय आहे? आज्ञेप्रमाणें विवेक करितों. सर्व भार स्वामींवर. स्वामींनीं चित्ताचें शांतवन करावें अशी विनंती कोणीं करावी? स्वामी सर्वज्ञ आहेत. विवेक मनास करून सांभाळ करणें हें स्वामींकडे आहे. विशेष विनंती काय लिहूं? रवाना रविवार चार घटका रात्र अवशींची. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः-दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] नोव्हेंबर १९०८. [अंक ४ था.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.




**राजा तोडरमल.**

(अकबर बादशहाचा सुप्रसिद्ध मंत्री.)

# २ राजा तोडरमल.

"Akber owed much of his success, and not a little of his renown, to the labours of his Minister of Finance, the celebrated Tudermull. The rules by them prescribed for the conduct of revenue officers are in liberality of spirit, and in justice of intention, not at all behind our most modern and approved revenue legislation."—*Charles Raikes.*

* * * *

"The grand innovation occasioned by the Moghul conquests in Maharashtra, under Shah Jehan, was the introduction of the revenue system of Todur Mull, whose name must be familiar to the generality of oriental readers as an eminent Hindoo statesman, who, by his financial arrangments, and his regulations in the mint department, during the reign of Akber, had acquired a character of no inconsiderable celebrity."—*Grant Duff.*

* * * *

हिंदुस्थानामध्यें, राज्यपद्धतींत सुधारणा करून प्रजेस सुख देण्याचे कामीं ज्या मुत्सद्द्यांनीं अतिशय परिश्रम केले, व ज्यांनीं राजाकडून व प्रजेकडून सारखेच धन्यवाद मिळवून आपली कीर्ति इतिहासामध्यें अजरामर केली, अशा मुत्सद्द्यांमध्यें राजा तोडरमल, मलिकअंबरप्रभृति राजकारणपटु पुरुषांची गणना करण्यांत येते. ह्यांपैकीं दिल्लीपति पुण्यश्लोक अकबर बादशाहा ह्याचा प्रधान मंत्री राजा तोडरमल ह्याचें संक्षिप्त चरित्र येथें सादर करितों.

राजा तोडरमल हा टंडननामक एका क्षत्रिय कुलामध्यें जन्म पावला असून त्याचें जन्मस्थान लाहोर हें होय. त्याच्या जन्माचें वर्ष जरी प्रसिद्ध नाहीं, तरी त्याच्या संबंधानें 'ऐने-अकबरी'ग्रंथामध्यें जी माहिती दिली आहे, त्यावरून त्याचा जन्म इ० स० १५३५ चे सुमारास झाला असावा, असें दिसून येतें. हा लहान असतांनाच ह्याचा बाप मृत्यु पावला. त्याच्या घरची स्थिति अगदीं गरीबीची असल्यामुळें, त्यानें आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षींच कारकुनीची जागा पत्करिली, आणि आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें व कर्तव्यतत्परतेनें तो उदय पावला. प्रथमतः शीरशाहाचे कारकीर्दींत, रोहटसचा किल्ला बांधतेवेळीं, तोडरमल ह्यानें आपलें बुद्धिचातुर्य व्यक्त केलें, व तो किल्ला बांधण्यास घक्कर लोकांनीं ज्या अडचणी आणिल्या होत्या, त्या त्यानें युक्तिप्रयुक्तीनें नाहींशा केल्या. त्यामुळें शीरशाहाची त्याजवर मर्जी बसली, व त्यास हा हिंदु तोडर खत्री, मोठा मुत्सद्दी पुरुष निपजेल अशीं चिन्हें दिसुं लागलीं. नंतर लवकरच त्याचें नांव अकबरबादशाहाच्या कानीं

गेलें, व त्या गुणग्रहणपटु व राजकार्यधुरंधर बादशाहानें त्यास आपल्या लष्करी खात्यांत लहानशी नौकरी दिली.

तोडरमल ह्यानें प्रथम लष्करखान मीरबक्षी ह्या सरदाराचे हाताखालीं कांहीं दिवस लष्करी नौकरी बजाविली. नंतर त्यास अकबर बादशाहानें, इ० स० १५६७ मध्यें, महमद कुलीखान व मुझफरखान ह्या दोन नामांकित सरदारांबरोबर, अयोध्या प्रांतांत शिकंदरशाहाचा पराभव करण्यासाठीं ६००० सैन्यानिशीं पाठविलें. त्या कामगिरीमध्यें त्यानें यश मिळविलें. ह्याप्रमाणें ज्या ज्या स्वारीमध्यें अकबर बादशाहानें त्याची योजना केली, त्या त्या स्वारींत त्यानें चांगलें यश संपादन केलें. हें पाहून बादशाहाची त्याच्यावर सुप्रसन्न मर्जी झाली, आणि त्यानें त्यास नुकत्याच जिंकून घेतलेल्या गुजराथ प्रांताची व्यवस्था करण्यासाठीं व सरकारसारा ठरविण्यासाठीं तिकडे इ० स० १५७६ मध्यें पाठविलें. तेथें त्यानें फार चांगली कामगिरी बजाविली. राजा तोडरमल सर्व प्रांताची पहाणी करीत व जमीनधारा ठरवीत सुरतेपर्यंत गेला. जागोजागचे संस्थानिक व जहागिरदार त्यास सामोरे आले, व त्यांनीं दिल्लीच्या बादशाहाचें सार्वभौमत्व स्वीकारून बादशाहाची खंडणी कबूल केली. ह्याप्रमाणें यशस्वी होऊन तोडरमल परत आग्र्यास गेला.

राजा तोडरमल ह्यानें गुजराथेंतील आपल्या कामगिरीचा वृत्तांत बादशाहास सादर केला. तेव्हां बादशाहा त्यावर फार सुप्रसन्न होऊन, त्यानें त्यास आपल्या कमरेची एक सुंदर रत्नजडित तलवार बक्षीस दिली, व त्यास खानखाना मुनीमखान ह्याचे हाताखालीं बंगालचे स्वारीवर रवाना केलें. ह्या वेळीं ओरिसा प्रांताचा अफगाण सुभेदार दाऊदखान ह्मणून होता. तो स्वतंत्र होऊन बादशाहास जुमानीनासा झाला होता. त्याचा पराभव करण्यासाठीं तोडरमल ह्यास ओरिसा प्रांतावर पाठविलें. त्यानें बरद्वान व मिदनापुर ह्यांच्या मध्यंतरीं मदरान येथें मुक्काम करून, व तेथून शत्रूच्या माऱ्याच्या सर्व जागा शोधून काढून, मोठ्या शहाणपणानें लढाईची बरोबर व्यवस्था केली. नंतर खानखाना व तोडरमल ह्यांनीं दाउदखानाबरोबर लढाया करून, त्याचा सर्व प्रांत जिंकून घेतला, व त्यास विनम्र करून तह करण्यास भाग पाडिलें.

राजा तोडरमल ह्यानें ह्या स्वारीमध्यें पुष्कळ संपत्ति व ३०।४० हत्ती जिंकून आणून बादशाहास नजर केले. त्यामुळें बादशाहाची स्वारी त्यावर खुष झाली; व त्यानें त्यास अनेक सन्मान व पोषाख बक्षीस दिले. ह्यानंतर गुजराथ प्रांतामध्यें पुनः गडबड झाली. तेव्हां अकबर बादशाहानें, तेथें जाऊन शांतता करण्यास योग्य, असा चतुर मुत्सद्दी तोडरमल हाच आहे, असें पाहून, त्यास

इ० स० १५७८ मध्यें पुनः गुजराथ प्रांतावर पाठविलें. त्याप्रमाणें तोडरमल चांगलें लढाऊ सैन्य घेऊन गुजराथप्रांतीं येऊन दाखल झाला. गुजराथचा राजा वजीरखान ह्यानें ३००० स्वार जमा केले होते. परंतु ह्यांमध्यें शिरजोर व बंडखोर लोकांचा भरणा फार असल्यामुळें, त्यांनीं आपआपसांमध्यें बंडें उत्पन्न केलीं होतीं. तेव्हां त्यानें तोडरमल ह्याचें साह्य घेऊन गुजराथेंतील बंडखोर लोकांचा धोलका येथें अगदीं पराभव केला.

ह्याप्रमाणें गुजराथेंत जिकडे तिकडे शांतता करून, तोडरमल पुनः बादशाहाच्या दरबारीं फत्तेपुरशिक्री येथें गेला. तेथें बादशाहानें त्याचा बहुमान करून त्यास आपला वजीर नेमिलें; व तेव्हांपासून बादशाहा सर्व राजकारणांमध्यें त्याची सल्लामसलत घेऊं लागला.

राजा तोडरमल ह्यास स्वस्थपणा असा मिळालाच नाहीं. तो गुजराथेंतून परत आला नाहीं तोंच, बंगाल व बहार प्रांतांमध्यें बंडें उद्भवल्याची बातमी आली. तेव्हां त्यानें राजा तोडरमल ह्याची तिकडे योजना करून, त्यास मदत करण्यासाठीं जानपूर येथील व त्या प्रांतांतील इतर सुभेदारांस बादशाही फर्माना रवाना केल्या. राजा तोडरमल ह्यानें पुनः बहार प्रांतावर स्वारी केली व मोंगीरचा किल्ला हस्तगत केला; आणि तेथील सर्व बंडखोर लोकांशीं शहाणपणानें लढून व त्यांचा पूर्ण नाश करून, तो मोठ्या विजयानें पुनः दिल्लीस परत आला. ह्या वेळीं त्यानें बादशाहास ५४ हत्ती नजर केले. ह्याप्रमाणें इ० स० १५८४ मध्यें राजा तोडरमल ह्यानें बंगाल देशाचा बहुतेक भाग दिल्लीपतीच्या सार्वभौमत्वाखालीं आणिला. ह्या प्रशंसनीय कामगिरीबद्दल अकबर बादशाहानें त्यास 'दिवाण' ही पदवी दिली. ह्यानंतर बादशाहानें आपलें सर्व लक्ष राज्यसुधारणेमध्यें घालविलें व त्या कामीं राजा तोडरमल ह्याचा चांगला उपयोग करून घेतला.

राजा तोडरमल हा जसा समरांगणावर समशेर गाजविण्यांत हातखंडा होता, त्याप्रमाणें मुत्सद्दीगिरीमध्येंही तो अद्वितीय होता. आणि खरोखर, त्याची खरी बुद्धिमत्ता जर कोठें प्रकाशित झाली असेल, तर ती राज्यसुधारणेंतच झालेली आहे. तोडरमल ह्याचें नांव पराक्रमी योद्धा ह्या नात्यापेक्षां, मोठा कुशलबुद्धीचा मुत्सद्दी म्हणूनच अधिक प्रसिद्ध आहे. अकबर बादशाहाच्या सत्कीर्तींत खरा अंश कोणाचा असेल, तर त्याच्या ह्या निवडक मुत्सद्द्यांच्या अंगीं वसत असलेल्या अलौकिक गुणांचाच होय. अकबर बादशाहाच्या उत्तम व न्यायी राज्यपद्धतीची जी एवढी वाखाणणी झाली, तिचें श्रेय बादशाहास तर आहेच; परंतु त्यांतील पुष्कळ भाग, त्या राजपद्धतीची योजना करणाऱ्या त्याच्या अलौकिक बुद्धीच्या

मुत्सद्द्यासही देणें रास्त आहे. त्याप्रमाणें अकबर बादशाहाच्या राज्यांतील वसूल-पद्धतीची जी अजरामर कीर्ति झाली, तिचें श्रेय राजा तोडरमल ह्यासच दिलें पाहिजे. असो.

मुसलमानी राज्यकर्त्यांनीं जमिनीची पाहणी व मोजणी करून, सरकारसारा ठरविण्याचा प्रयत्न, अकबर बादशाहाच्या पूर्वींपासून, थोडाबहुत करण्यास प्रारंभ केला होता. पूर्वीं तैमूरची वसूलपद्धति ह्मणून कांहीं ठोकळ नियम अस्तित्वांत होते. शीरशाहानेंही त्यांत चांगली सुधारणा करून जमिनीची आकारणी ठरविली होती. परंतु त्या सर्वांमध्यें, खरोखर प्रजेस व राजास सारखीच हितकारक, न्यायीपणाची, सुयंत्रित व सुव्यवस्थित अशी जर कोणती सुधारणा झाली असेल, तर ती राजा तोडरमल ह्यानें शोधून काढिलेली वसूलपद्धति हीच होय. ही अद्यापि प्रसिद्ध असून, सांप्रतच्या वसूलपद्धतींत ती तत्त्वतः दृग्गोचर झाल्यावांचून राहत नाहीं.

राजा तोडरमल ह्याच्या ह्या वसूलपद्धतीस 'असल–इ–जमा–इ–तुमार' असें नांव आहे. तिला दक्षिणेंत 'तनखा' असेंही ह्मणतात. प्रथमतः तोडरमल ह्यानें प्रत्येक प्रांतांतील जमिनीची एक प्रमाणांत मोजणी केली. निरनिराळ्या प्रांतांमध्यें निरनिराळे मोजण्याचे प्रकार होते. परंतु ते सर्व बंद करून, त्यानें एक प्रमाण ठरविलें. त्यास गज, तेनाब व बिगा अशीं नांवें दिलीं. पूर्वीं गजाचे प्रकार तीन होते. लोदी बादशाहा सुलतान शिकंदर ह्यानें मूळ ४१½ इस्कंदरींचा एक गज काढला. तो हुमायून बादशाहानें बरोबर ४२ इस्कंदरींचा पूर्ण गज केला. इस्कंदरी किंवा शिकंदरी ह्मणजे एक रुप्याचें व तांब्याचें मिळून केलेलें वाटोळें नाणें होतें. त्याच्या प्रमाणावर गजाची लांबी ठरविली. ह्या ४२ शिकंदरींचा गज ३२ बोटें भरत असे. कांहीं ग्रंथकार ह्मणतात कीं, हा गज लोदी बादशाहाच्या पूर्वींही अस्तित्वांत होता. तें कसेंही असो, परंतु शीरखान व सलीमखान ह्या बादशाहांनीं तो उपयोगांत आणिला ह्यांत शंका नाहीं. नंतर, मोजणीचें एक सारखें प्रमाण ठरवून तोडरमल ह्यानें जो नवीन गज काढिला, त्यास 'इलाही गज' असें नांव पडलें. तेनाब ही एक दोरी असे, व तिचा हिंदुस्थानांत मोजणीचे कामीं उपयोग होत असे. परंतु हवेच्या फेरफारामुळें तिचें प्रमाणही बरोबर जुळत नसे. ह्मणून, आतां बांबूस लोखंडी सांखळी जोडून त्याची तेनाब करण्यांत आली. बिघा किंवा जरीब ह्मणजे तीन हजार सहाशें चौरस गज असें एकंदर प्रमाण ठरविण्यांत आलें.

ह्याप्रमाणें मोजण्याचीं निश्चित प्रमाणें ठरविल्यानंतर, जमिनीचें वर्गीकरण करण्यांत आलें. पहिलें:–'पुलेज' ह्मणजे प्रत्येक ऋतूमध्यें यथायोग्य पीक देणारी

जमीन. ह्या जमिनीवर 'वजिफा' ह्मणजे पीकपाण्याचा विचार न करितां आकारलेली ठरींव पट्टी घेत असत. दुसरें 'पेरोती' ह्मणजे सतत एक पीक देणारी जमीन. अशी जमीन कांहीं दिवस पड'पडूं देत असत. तिसरें:—'चचर' ह्मणजे पाऊसपाण्यानें वाहून जाणारी जमीन. हिची लागवड करीत, त्या वेळीं तिच्यावर सरकारपट्टी एकदम घेत नसत. पहिले वर्षी, सरकारपट्टी $\frac{२}{५}$, व दुसरे वर्षी $\frac{३}{५}$, तिसरे वर्षी $\frac{४}{५}$, येणेंप्रमाणें सारा वसूल करीत. पुढें चौथ्या वर्षापासून शेंकडा पांच टक्केप्रमाणें वसूल व दर बिघ्यामागें एक दाम कर घेत असत. चौथें:—'वंजर' (वनचर) ह्मणजे पडजमीन हिचा आकार अगदीं माफक असे. 'ऐने—अकबरी'मध्यें असें लिहिलें आहे कीं, वंजर जमिनीमध्यें, पहिल्या वर्षी, फक्त दोन शेर धान्य सरकारपट्टी ह्मणून घेत असत. दुसरे वर्षी पांच शेर. परंतु तें जमिनीच्या मगदुरावर व परिस्थितीवर ठरवीत असत. शेतकऱ्यानें जमिनीचा सारा नक्त द्यावा किंवा धान्य द्यावें अशी सवलत ठेविली होती.

ह्या जमिनीच्या वर्गीकरणापैकीं पहिल्या दोन वर्गांतल्या जमिनीचा सारा नक्त घेण्याचा परिपाठ होता. ह्मणून, अकबर बादशाहाच्या कारकीर्दीच्या १९वर्षांचे धान्याचे दर काय होते, ह्याबद्दल बारीक रीतीची चौकशी करण्यांत आली. नंतर त्याची सरासरी काढून मग आकारणीचे दर ठरविण्यांत आले.

पहिल्या दोन वर्गांच्या जमिनी ह्मणजे पुलेज व पेरोती ह्यांच्यामध्यें पुनः उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशी वर्गवारी करण्यांत आली; व त्याप्रमाणें पुनः साऱ्याची आकारणी करण्यांत आली. ह्यांतही पुनः १९ वर्षांची सरासरी अधिक वाटूं लागली, ह्मणून अवघ्या १० वर्षांची सरासरी घेऊन, त्यावर आकारणीचें प्रमाण बसविलें.

राजा तोडरमल ह्यानें ही वसूलपद्धति ठरविण्यासाठीं दहा प्रमुख कानुगो ह्मणजे जमाबंदीचे मुख्य कामदार नेमिले. त्यांनीं, प्रांताप्रांतांतल्या कानुगो लोकांनीं तयार करून पाठविलेली माहिती एकत्र जमविली. ह्याप्रमाणें सर्व प्रांतांची वसूलआकारणी तयार झाल्यावर, 'तक्षीमसुलूक' ह्मणजे एकंदर राज्याची प्रांतवार जमा ठरवून, सर्व राज्याचा वसूलआंकडा कायम करण्यांत आला. ह्यामुळें हिंदुस्थानच्या बारा सुभ्यांची सुरेख व्यवस्था झाली. ह्या सुभ्यांचे सरकार व महाल असे भाग व पोटभाग केले होते. अकबर बादशाहाचे एकंदर सुभे बारा होते. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:— १ अलाहाबाद, २ आग्रा, ३ अयोध्या, ४ अजमीर, ५ अहमदाबाद, ६ बहार, ७ बंगाल, ८ दिल्ली, ९ काबूल, १० लाहोर, ११ मुलतान, आणि १२ माळवा. ह्या बारा सुभ्यांत वऱ्हाड, खानदेश आणि अहमदनगर हे तीन नवे सुभे सामील झाले व एकंदर संख्या पंधरा झाली. ह्या सुभ्यांसही हीच वसूलपद्धति लावण्यांत

आली. नवीन वसूलपद्धतीप्रमाणें अकबर बादशाहाचे राज्याचा एकंदर ज़मीन-महसूल ९,०७,४३,८८१ रुपये झाला.

राजा तोडरमल ह्यानें ही जी जमीनमहसुलाची पद्धति शोधून काढिली, ती सर्व-प्रिय झाली, व तिच्या योगानें प्रजेस सुख लागलें हें सांगावयास नकोच. ह्याच पद्धतीच्या आधारावर पुढील सर्व वसूलपद्धतींची योजना झालेली असून सर जॉन शोअर व मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं ह्या पद्धतीची प्रशंसा केलेली आहे. ह्या वसुलपद्धती-मध्यें जी दूरवर राजकीय दृष्टी दिसून येते, ती हिंदुस्थानच्या राजकर्त्यांसही, नवीन धान्याच्या पद्धती अंमलांत आणण्यापूर्वी, पुष्कळ उपयुक्त होण्यासारखी आहे. असो.

राजा तोडरमल ह्यानें आणखी एक मोठी सुधारणा घडवून आणिली. त्यानें सर्व मुलकी खात्यांत हिंदी भाषेच्या ऐवजीं फारसी भाषा उपयोगांत आणिली. ह्यामुळें सर्व राज्याचे हिशेब त्या भाषेमध्यें होऊं लागले. त्यामुळें फारशी भाषा शिकण्याचें हिंदु लोकांस विशेष अगत्य वाटूं लागलें, व तेणेंकरून त्यांना पुढें येण्यास व मुसलमानी राजकर्त्यांशीं धर्मभेद विसरून अधिक दळणवळण ठेवण्यास सुगम झालें. हिंदुस्थानामध्यें राजदरबारची इंग्रजी भाषा झाल्यामुळें जें स्थित्यंतर झालें, तसाच परिणाम कांहीं अंशीं ह्या नवीन सुधारणेनें झाला.

अकबरबादशाहाची उदार राज्यपद्धति व राजा तोडरमलसारख्या मुत्सद्द्यांची योग्य सल्लामसलत ह्यांच्या योगानें हिंदु लोकांस दिल्लीच्या राजदरबारीं उदय पावण्यास चांगली संधी मिळाली. तोडरमल ह्यानें फारशी भाषा राजदरबारांत सुरू केल्या-मुळें सर्व हिंदु लोक त्या भाषेंत प्रवीणता मिळवून, राजकारणांत पुढें येऊं लागले. त्यांना सर्व मुसलमान सरदारांच्या शिक्षकांच्या जागा मिळूं लागल्या. तेणेंकरून मुसलमान लोकांशीं त्यांचें अधिक संघट्टन वाढलें व त्याचा हिंदु लोकांस इष्ट असाच परिणाम घडून आला. उत्तरहिंदुस्थानांत सर्वसाधारण लोकांकरितां जी नवीन उर्दू भाषा निर्माण झाली, तिचा उगम ह्याच वेळीं झाला असें ह्मटलें तरी चालेल.

राजा तोडरमल ह्यानें अकबर बादशाहाच्या राज्यांतील वसूलपद्धतींत सुधारणा करून ज्याप्रमाणें लौकिक मिळविला, त्याप्रमाणें त्यानें बादशाही टंकशाळेमध्यें सुधारणा करून चांगलें नांव मिळविलें. त्यानें पूर्वींच्या नाण्यांत सुधारणा करून नवीन मोहोरा व रुपये पाडिले. अकबर बादशाहाच्या कारकीर्दींतील 'लालजिलाली' ह्मणून जी सोन्याची मोहोर प्रसिद्ध आहे, ती राजा तोडरमल ह्यानेंच तयार करविली. 'लालजिलाली' मोहोरेमध्यें शुद्ध सोन्याचा अंश फार असून, तिचें वजन एक तोळा व $१२\frac{३}{४}$ रती होतें. ह्या मोहोरेची किंमत ४०० दाम असे. ह्याशि-वाय त्यानें आणखी तीन प्रतींच्या मोहोरा पाडिल्या. मोहोरांप्रमाणें रुप्याच्या

नाण्यांतही बरीच सुधारणा करण्यांत आली. १२$\frac{1}{2}$ मासे वजनाचा चौकोनी जिलाली रुपया व वाटोळा अकबरी रुपया प्रसिद्धच आहे. जिलाली रुपयाची किंमत ४० दाम असे. ह्याप्रमाणें नाण्यांत सुधारणा केल्यामुळें राजा तोडरमल ह्याची कीर्ति पुष्कळ वाढली, व प्रजेचीही चांगली सोय झाली.

राजा तोडरमल हा दिल्लीस राहून राज्यकारभार पाहूं लागल्यानंतर, त्याजवर लढाईस जाण्याचे प्रसंग फारसे आले नाहींत. तथापि, काबूलच्या सरहद्दीवर पीररोषनाई लोकांचें एक बंड झालें. तें मोडण्यासाठीं त्यास एक वेळ तिकडे स्वारी करणें भाग पडलें. ह्या बंडामध्यें त्याचा परम मित्र राजा बिरबल हा मारला गेला. त्यामुळें बादशाहाच्या आज्ञेवरून त्यानें पुनः सेनाधिपत्य स्वीकारिलें, आणि सरहद्दीवरील डोंगराळ प्रदेशांत स्वारी करून, सदहू बंडखोरांचा चांगला समाचार घेतला.

राजा तोडरमल हा काबूलच्या सरहद्दीवरून परत आल्यानंतर लाहोर येथें आला. तेथें त्यास देवाज्ञा झाली. त्याच्या मृत्यूची ता० १० नोव्हेंबर इ० स० १५८९ ही दिलेली आहे. अर्थात् त्याचें मरणसमयीं ५४ वर्षांचें वय होतें.

राजा तोडरमल ह्याच्या संबंधानें मुसलमान इतिहासकारांनीं फार प्रशंसा केलेली आहे. अबुल-फजल ह्या सुप्रसिद्ध इतिहासकारानें असें लिहिलें आहे कीं, प्रामाणिकपणा, शौर्य, व्यवहारज्ञान, राजकारणकौशल्य इत्यादि गुणांमध्यें तोडरमल ह्याची प्रतिस्पर्धा करणारा हिंदुस्थानामध्यें दुसरा कोणीही पुरुष नाहीं. दुसऱ्या इतिहासकारांनींही त्याच्या गुणांची अशीच प्रशंसा केलेली आहे. राजा तोडरमल ह्यास अकबर बादशाहानें 'वकिल-उस्–सल्तनत' आणि 'मुश्रीफ–इ–दिवान' असे दोन मोठे अधिकार दिले होते. शिवाय, त्यास चारहजारी मनसबही दिली होती. ह्या मनसबदारीचा मान त्या वेळीं बादशाहाच्या दरबारामध्यें फार मोठा मानिला जात असे, व तो फार थोड्या हिंदु सरदारांस मिळत असे. चारहजारी मनसबदारास २७० खासे घोडे, ८० हत्ती, ६५ उंट, १३० गाड्या इत्यादि प्रकारचा बादशाही लवाजमा असे, व पगार दरमहा सुमारें २२००० रुपये असे. राजा तोडरमलसारखे हिंदु मंत्री अकबर बादशाहाजवळ मोठ्या प्रतिष्ठेस चढल्यामुळें हिंदु लोकांच्या उन्नतीस पुष्कळ साहाय्य झालें, ह्यांत शंका नाहीं.

राजा तोडरमल जरी मुसलमानी बादशाहाचा सेवक होता, तरी तो फार स्वधर्मनिष्ठ आणि ईश्वरभक्त असा होता. त्यानें आपला धर्म उत्तम रीतीनें पाळिला होता. तो प्रतिदिवशीं आपला कांहीं काळ ईश्वरभजनामध्यें नियमितपणें घालवीत असे व पुष्कळ दानधर्मही करीत असे. त्यानें त्या वेळेच्या धर्मसमजुतीप्रमाणें देवालयें व

विहिरी वगैरे बांधिल्या होत्या, असें दिसून येतें. श्रीक्षेत्र काशी येथें द्रौपदीकुंडामध्यें एक शिलालेख सांपडला आहे, त्यांत पुढील श्लोक आढळून येतातः—

**श्लोक.**

प्रत्यर्थि क्षितिपाल कालनसु * * * * ने दूतिका ।
मुद्रांकप्रकटप्रतापतपनप्रोद्भासिताशा मुखे ॥
क्षीर्णाशेकवरे प्रशासति महीं तस्मिन् नृपालावलि–।
स्फूर्जन्मौलिमरीचिवीचिरुचिरोदञ्चत्पदाम्भोरुहे ॥ १ ॥
तद्राज्यैकधुरंधरस्य वसुधासाम्राज्यदीक्षागुरोः ।
श्रीमट्टण्डनवंशमंडनमणेः श्रीटोडरक्ष्मापतेः ॥
धर्मैधिकविधौ समाहितमतेरादेशतोऽचीकर –।
द्वापीं पांडवमंडपे * * वनो गोविंददासः सुधीः ॥ २ ॥
ऋतुनिगमरसात्मा सम्मिते १६४६ वत्सरेशे ।
सुकृतिकृतिहितैषी टोडरक्षोणिपालः ॥
विहितविविधपूर्तोऽचीकरच्चारुवापीम् ।
विमलसलिलसारां बद्धसोपानपंक्तिम् ॥ ३ ॥

ह्या संस्कृत लेखावरून, टंडननामक क्षत्रियकुलाचा अलंकार जो राजा तोडरमल ह्यानें, पांडवमंडपांतील द्रौपदीकुंडाचा जीर्णोद्धार केला, असें व्यक्त होतें. ह्या लेखामध्यें संवत् १६४६ हें वर्ष दिलें आहे, त्यावरून तोडरमल ह्याच्या मरणापूर्वी हें पुण्यकृत्य झालें असावें, असें मानण्यास हरकत नाहीं.

राजा तोडरमल ह्यास धारु ह्या नांवाचा मुलगा होता. त्याजकडेही सातशें स्वारांची मनसब असून, तोही अकबरबादशाहाचे कारकीर्दींत प्रसिद्ध योद्धा होता. तो ठठ्ठा येथील युद्धामध्यें समरांगणावर मृत्यु पावला.

राजा तोडरमल ह्याच्या सारखे पुरुष हिंदुस्थानास सदैव भूषणभूत असुन, त्यांची कीर्ति इतिहासांत अखंड चमकत राहावी ह्यांत नवल नाहीं.





**व्यंकोजी राजे.**

(कारकीर्द-इ स १६७५—इ स १६८२)

# भाग ३ रा.

## तंजावर प्रांतांत मराठ्यांचा प्रवेश.

इ. स. १५६५ मध्यें तालिकोट येथील महायुद्धामध्यें, विजयनगरच्या हिंदु साम्राज्यसत्तेचा चुराडा उडाल्यानंतर, सर्व कर्नाटक प्रांतामध्यें, 'ज्याच्या हातीं ससा तो पारधी' ह्या ह्मणीप्रमाणें, ठिकठिकाणचे मांडलिक राजे, पाळेगार व जमीनदार स्वतंत्र होऊन, आपल्या ताब्यांत येईल तेवढा प्रांत बळकावून बसले. विजापूर, गोवळकोंडें येथील बादशाहांचा फारच त्रास झाला, तर तेवढ्यापुरती खंडणी किंवा करभार देऊन व त्यांचें सार्वभौमत्व स्वीकारून नम्रपणानें वागावें; बादशाही सैन्यानें पाठ फिरविली कीं, पुनः स्वतंत्र होऊन शिरजोरपणानें वागावें, असा त्यांनीं क्रम चालविला होता. विजापूर, अहमदनगर व गोंवळकोंडें ह्या तिन्ही राज्यांमध्यें, अंतःकलह, परस्पर मत्सर आणि दरबारी मुत्सद्द्यांची स्वार्थसाधक चढाओढ ह्यांच्या योगानें सुयंत्रित राज्यव्यवस्था, कोठेंही चार दिवस देखील टिकेनाशी झाल्यामुळें, कर्नाटक प्रांतांतील पाळेगार व मांडलिक राजे ह्यांच्यावर सक्त नजर ठेवण्यास कोणासच सवड मिळाली नाहीं. ह्यानंतर १७ व्या शतकाच्या प्रारंभापासून दिल्लीच्या मोंगल सैन्यानें दक्षिणप्रांत जिंकून घेऊन, तेथें दिल्लीपतीची सत्ता प्रस्थापित करण्याचा अटोकाट प्रयत्न चालविल्यामुळें, वर निर्दिष्ट केलेल्या मुसलमानी बादशाहांस, आपलीं राज्यें संभाळतां संभाळतां पुरेवाट झाली. अर्थात् अशा स्थितीमध्यें कर्नाटकचे पाळेगार व मांडलिक राजे अधिक शिरजोर व स्वतंत्र व्हावेत, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ह्याप्रमाणें ह्मैसूर, तंजावर, जिंजी, चंद्रगिरी, कनकगिरी, मधुरा, बेदनूर इत्यादि ठिकाणचे हिंदु राजे व सुभेदार, इ. स. १६०० पासून १६३० पर्यंत, अगदीं स्वतंत्र रीतीनें वागूं लागले होते, असें ह्मटलें असतां हरकत नाहीं.

ह्याच अवधीमध्यें एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. अहमदनगर व विजापूर येथील मुसलमानी दरबारांमध्यें एक नवीन सत्ता निर्माण झाली, व तिनें पुढें एक नवीन राष्ट्र निर्माण केलें. ही गोष्ट ह्मणजे सुप्रसिद्ध पराक्रमशाली भोंसले ह्यांच्या घराण्याचा भाग्योदय ही होय. ह्या घराण्याच्या अभ्युदयाचा इतिहास फार मनोरंजक आणि चमत्कृतिप्रचुर आहे. तो येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. कां कीं, तो योग्य प्रसंगीं प्रसिद्ध होणार आहे. तथापि, त्याचें संक्षिप्त दिग्दर्शन करणें येथें अवश्य आहे. ह्या घराण्याचा उदय प्रथमतः अहमदनगर येथील निजामशाहीमध्यें झाला, व

त्यांतील मूळ पुरुष मालोजी हा स्वतःच्या अलौकिक कर्तृत्वशक्तीनें, हिंमतीनें, स्वाभिमानानें आणि शौर्यपराक्रमानें तेथें नांवारूपास चढला. मालोजीचा जन्म इ. स. १५५० मध्यें झाला, व इ. स. १६०४ मध्यें, तो स्वपराक्रमानें मोठा सरदार होऊन, त्यास पंचहजारी मनसबदारीचीं वस्त्रें मिळालीं. मालोजीस फौजेच्या खर्चाकरितां पुणें, नासिक, अहमदनगर, खानदेश व दौलताबाद ह्या प्रांतांत जहागीर मिळाली होती. मालोजीनें निजामशाही दरबारांत स्वसामर्थ्यानें आपलें वजन चांगलें बसविलें होतें. निजामशाही मनसबदार लखूजी जाधवराव ह्यास आत्मप्रौढी व स्वकुलप्रतिष्ठा विशेष वाटत असे, ह्मणून त्याच्या तोलास तोल देऊन व बादशाहाकडून मनसब मिळवून, मालोजीनें आपला पुत्र शहाजी ह्यास जाधवरावांची कन्या जिजाबाई ही प्राप्त करून घेतली. मालोजी इ. स. १६१९ मध्यें मृत्यु पावला. नंतर त्याच्या पश्चात् त्याच्या मनसबदारीचीं वस्त्रें शहाजीस मिळालीं.

शहाजीचा जन्म ता. १८ मार्च इ. स. १५९४ मध्यें शिंदखेड मुक्कामीं झाला. शहाजी हा निसर्गतः बुद्धिमान् व चपल होता. तशांत तो मालोजीसारख्या बाणेदार व कर्तृत्वशाली बापाच्या शिक्षेंत वाढलेला असल्यामुळें, त्याच्या अंगचे उत्तम गुण व्यक्त होण्यास विलंब लागला नाहीं. त्यानें निजामशाहीदरबारांत आपलें वजन चांगलें बसविलें; आणि अहमदनगरच्या राज्यास मोंगली सैन्यानें ग्रासून टाकून तें अगदीं जर्जर केलें होतें, तरी मलिकंबरच्या साह्यानें, त्यानें नवीन निजामशाहा निर्माण करून, मृतप्राय झालेल्या निजामशाहींत नवीन जोम उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. इ. स. १६२० पासून १६२६ पर्यंत, शहाजीनें निजामशाहीमध्यें मनसबदारी करून चांगली प्रतिष्ठा मिळविली. पुढें मलिकंबर मृत्यु पावल्यामुळें व त्याचा मुलगा फत्तेखान आणि निजामशाही मनसबदार जगदेवराव जाधवप्रभृति सरदार हे त्याची स्पर्धा व द्वेष करण्यास तत्पर झाल्यामुळें, त्यास कांहीं दिवस स्वसंरक्षण करण्यासाठीं, जुन्नरप्रांतीं व कोंकणांत माहुली वगैरे ठिकाणीं राहावें लागलें. पुढें इ. स. १६३३ मध्यें, त्यानें पुनः नवीन बादशाहा निर्माण करून भीमगड येथें त्यावर छत्रचामरें उभारिलीं, व दौलताबादेसभोंवतालचा प्रांत जिंकून निजामशाहीचें पुनरुज्जीवन करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु मोंगली सैन्याच्या चढाओढीपुढें व अक्कलमंद निजामशाही सरदारांच्या आत्मघातक वर्तनामुळें शहाजीस विजापुरच्या बादशाहीचा आश्रय करणें भाग पडलें. शहाजीनें इ. स. १६२९ मध्यें खानजहान लोदीचा पक्ष प्रथम स्वीकारिला होता. परंतु पुढें शहाजहान बादशाहाची भेट घेऊन व क्षमा मागून, त्यानें आपली वडिलार्जित जहागीर—जी मध्यंतरींच्या गडबडीमध्यें मोंगली सैन्यानें काबीज केली होती—ती फिरून परत

मिळविली. तथापि, त्यानें मोंगलांच्या चंचल वर्तनास त्रासून इ. स. १६३२ मध्यें विजापूरदरबारचा आश्रय स्वीकारिला. ह्या वेळीं विजापूरचे दिवाण मुरार जगदेव हे होते. त्यांनीं शहाजीचा नांवलौकिक व त्याची कर्तृत्वशक्ती अवलोकन केली होती. त्यांना, असा सामर्थ्यवान् व प्रतापी सरदार विजापूरदरबारास प्राप्त झाला, तर त्यापेक्षां महत्त्वाची दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं असें वाटून, त्यांनीं आलेल्या संधीचा फायदा घेतला; व त्यास बादशाही तक्तापुढें मुजऱ्यास उभें करून अनेक सन्मान दिले. इ. स. १६३६ मध्यें शहाजी राजे ह्यास विजापूरच्या महमद आदिलशाहा बादशाहाकडून १२००० फौजेची सरदारी व तिच्या खर्चाकरितां मोठा सरंजाम मिळाल्याचा उल्लेख सांपडतो. ह्याच वेळीं बादशहानें पुणें व सुपें हे दोन प्रांत त्यास जहागीर करून दिले. त्याची व्यवस्था शहाजीनें दादोजी कोंडदेव मलठणकर ह्यास सांगितली.

शहाजीस इ. स. १६२३ मध्यें संभाजीनामक पुत्र झाला; व इ. स. १६२७ मध्यें महाराष्ट्रकुलभूषण शिवाजीनामक दुसरा पुत्र शिवनेरी किल्ल्यावर जन्म पावला. जाधवराव ह्यांनीं शहाजीची अप्रतिष्ठा व मानहानि केल्यामुळें जिजाबाईवर त्याची अप्रीति उत्पन्न झाली. ह्मणून त्यानें इ. स. १६३० चे सुमारास पोगरवाडीकर मोहिते ह्यांच्या घराण्यापैकीं तुकाबाई हिजबरोबर दुसरें लग्न केलें. ह्या स्त्रीपासून इ. स. १६३१ मध्यें त्यास व्यंकोबानामक तिसरा पुत्र झाला. संभाजी व व्यंकोजी हे शहाजी राजाचे दोन लाडके पुत्र असल्यामुळें ते त्याजजवळ असत. जिजाबाईवर त्याची अप्रीति झाल्यामुळें ती व तिचा पुत्र शिवाजी ह्यांस, त्यानें दादोजी कोंडदेव ह्याच्या देखरेखीखालीं पुणें प्रांतीं ठेविलें, हें इतिहासांत प्रसिद्ध आहेच.

इ. स. १६३७ मध्यें शहाजी विजापुरकरांच्या वतीनें रणदुल्लाखानाबरोबर कर्नाटक प्रांताच्या स्वारीस गेला. त्या वेळीं त्याजबरोबर नारोपंत हणमंते हे कारभारी ह्मणून गेले होते. रणदुल्लाखान हा शूर व प्रख्यात सरदार विजापुरच्या बादशाहाच्या पदरीं होता. त्यास बादशाहानें कर्नाटकच्या स्वारीवर मुख्य सेनापति नेमिलें होतें, व त्याच्या हाताखालीं शहाजी राजे ह्याची योजना केली होती. रणदुल्लाखानानें प्रथम कर्नाटकचा मुख्य पाळेगार केंपगौडा ह्यावर स्वारी केली, व त्याचा पराभव करून त्यास सावनदुर्गच्या किल्ल्यामध्यें हांकून लाविलें आणि त्याची मुख्य जागा बंगळूर ही जिंकून घेतली, व तेंच आपलें राहण्याचें ठिकाण केलें. रणदुल्लाखान ह्यास इ. स. १६३८ मध्यें बादशाहानें विजापुरास परत बोलाविलें. नंतर, कर्नाटकच्या सैन्याचें आधिपत्य शहाजी राजे ह्याजकडे आलें; व कर्नाटक व द्रविड देशांत जो बादशाही प्रांत पुंड पाळेगारांनीं दाबून टाकिला होता, तो

जिंकून घेण्याबद्दल त्यास दरबारची आज्ञा झाली. त्याप्रमाणें इ. स. १६३८ पासून इ. स. १६४८ पर्यंत, शहाजीनें कर्नाटक प्रांतांत विजापुरच्या बादशाहाची राजसत्ता स्थापित करून, तेथील राज्यसुधारणा करण्याचा प्रयत्न केला, हें निर्विवाद सिद्ध आहे. शहाजीनें कर्नाटक प्रांतामध्यें जसजसा आपला शक्तिप्रभाव व बुद्धिप्रभाव व्यक्त केला, तसतसे तिकडील पाळेगार त्याच्या ताब्यांत आले, व विजापुरचें स्वामित्व कबूल करून ते आज्ञाधारकपणानें वागूं लागले.

शहाजी ह्यास बंगळूर, कोलार, होसकोट, दोड्ड बाळापूर आणि शिरें हे पांच प्रांत विजापुरच्या बादशाहानें इ. स. १६३६ मध्यें जहागीर दिले. ह्या प्रांतांवर शहाजीचा अंमल इ. स. १६३९ पासून अबाधितपणें चालू झाला. शहाजीनें बंगळूर हें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. तथापि तो कांहीं दिवस दोड्ड बाळापूर व कोलार येथेंही राहत असे. कोलार प्रांत शहाजीनें चिक्करायल तिम्मा गौडा ह्या पाळेगारापासून जिंकून घेऊन, त्यावर त्यानें आपला थोरला पुत्र संभाजी ह्यास अधिकारी नेमिलें. संभाजी मेल्यानंतर त्याचा मुलगा सुरतसिंग हा कोलार येथेंच राहात असे. येणेंप्रमाणें कर्नाटकामध्यें शहाजीचा अंमल चांगल्या तऱ्हेनें बसल्या-नंतर त्यानें त्या प्रांताची वसुली सुधारणा केली, व तिकडील अनेक पुंड पाळेगार ह्यांच्यावरही स्वाऱ्या करून पुष्कळ संपत्ति मिळविली, आणि सर्व कर्नाटकप्रांतांत व द्रविडदेशांत चांगला दरारा बसविला.

तंजावर प्रांतामध्यें रघुनाथनायक व जिंजीचा व्यंकट नायक, आणि त्रिचना-पल्लीचा त्रिमलनायक ह्यांच्यामध्यें एकसारखे कलह चालू होते. ह्मणून शहाजीनें विजापुरच्या बादशाहाच्या आज्ञेनें तंजावरावर ह्याच वेळीं स्वारी केली असें दिसतें. ह्या स्वारीचें बरोबर वर्ष समजत नाहीं. तथापि, 'शिवदिग्विजय' बखरीमध्यें जी हकीकत दिली आहे, त्यावरून, शहाजीस शके १५५८ ह्मणजे इ. स. १६३६ मध्येंच अक्कलकोट, बागलकोट, बेंगरूळ, चंजी ( चंदी ), चंजाऊर ( तंजावर ), रतनपूर, होसकोट, बाळापूर, शिरें, देवगड, कनकगिरी, राजदुर्ग वगैरे प्रांत देऊन, 'कर्नाटक-प्रांत दरोबस्त अंमल करतील तितका करावा', अशी बादशाही आज्ञा झाली होती असें स्पष्ट होतें. ह्यावरून तो प्रांत जिंकून घ्यावा ह्या हेतूनें, शहाजीनें तंजावरावर ह्याच सुमारास स्वारी केली असावी, व त्यानें तंजावरचा विजयराघव ह्यास तंजावरचें ठाणें व कांहीं नेमणूक करून देऊन, त्या प्रांतावर बादशाही अंमल बसविला असावा, असें मानण्यास आधार सांपडतो.

इ. स. १६३७ पासून इ. स. १६४० पर्यंत शहाजीनें कर्नाटकांतील पुष्कळ पाळेगारांस जिंकून त्यांच्याकडून करभार घेतला होता, असें तंजावर येथील

शिलालेखावरूनही दिसून येतें. ह्या राजांची यादी तंजावरच्या शिलालेखामध्येंः— विधुपुरचा राजा वीरभद्र, कोंगदेशाचा राजा कोंगनायक, कावेरीपट्टणाचा राजा जगदेव, श्रीरंगपट्टणचा 'राजा कंठीरव (कांतराय?), तंजावरचा राजा विजय-राघव, चंदीचा राजा व्यंकटनायक, मदुरेचा राजा तिरुमल नायक, वालगुंडपुरचा राजा अरिकाल वेंकटनायक, विद्यानगरचा रंगशाई नायक, इसकुटपुरचा (होसकोट?) राजा तम्मा गोड नायक, येणेंप्रमाणें दिली आहे. अर्थात् तंजावर प्रांतामध्यें मराठ्यांच्या सत्तेचा प्रथमप्रवेश शहाजीनें केला, हेंच मानणें सयुक्तिक दिसतें.*

शहाजीनें, इ. स. १६३७ पासून १६४८ पर्यंत, कर्नाटक प्रांतामध्यें जे युद्ध-पराक्रम केले, किंवा जी राज्यव्यवस्था केली, तिचा संपूर्ण वृत्तांत उपलब्ध होत नाहीं. तथापि, कर्नाटकामध्यें त्यानें वसुलाची जी नवीन पद्धति अंमलांत आणिली तिचा उल्लेख केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. अर्थात् ह्याचें श्रेय सर्वस्वी विजापुरचा दरबार व त्यांतील हुशार मुत्सद्दी ह्यांसच दिलें पाहिजे.† त्यांनीं

*इ. स. १६३६ मध्यें मोंगलाच्या तहानें जो प्रांत विजापुरकरांच्या वांटणीस आला, तो जिंकून घेण्याचे कामीं शहाजीची योजना विजापूरदरबारांतून कर्नाटकामध्यें झाली व त्यानें तिकडील प्रांत जिंकून घेऊन तंजावरच्या राज्याचा पाया घातला, असें सातारचे रेसिडेंट सर बार्टल फ्रियर ह्यांनीही नमूद केलें आहे:—

"He (Shahajee) appears to have greatly distinguished himself in the settlement of the districts of Bijapur acquired by this treaty, and was shortly after sent as second-in-command of an army for the invasion of the Carnatic where the Jageers he acquired, as his own share of the country he subdued, formed the foundation of the Kingdom of Tanjore."

—*The Bhonslays of Satara, by Sir Bartle Frere.*

† ह्या संबंधानें कर्नल म्याकेंझीनामक एका कर्नाटक प्रांताच्या इतिहासकारानें काढलेले पुढील उद्गार वाचण्यासारखे आहेतः—

"* * * A superior knowledge of political finance seems also to have distinguished its (Bijapur) general administration. Their institutions for regulating the country breathed a spirit moderate and mild, and well-adopted to cherish agriculture, nor was commerce neglected, and they were sagaciously availed themselves of the acute and subtle genius of that class of their native subjects. which is so well accommodated to the arrangements of finance and of political economy. ......The choice of Shahjee under such a government may be therefore attributed to a superior degree of political sagacity; and we accordingly find, that the establishment of the new system of management is attributed to him, who was destined to be still more distinguished afterwards as the founder of a dynasty and power that in about 120 years was to extend its influence nearly over all India, and gave the first serious check to the progressive growth of the Mahomedan power, till the discomfiture of the Mahrattas at Panipat in 1761."

कर्नाटकामध्यें शहाजी राजासारख्या बुद्धिवंत व प्रतापवंत मुत्सद्द्याची जी योजना केली, ती त्यांच्या शहाणपणाची द्योतक होय ह्यांत शंका नाहीं. शहाजीनें आपल्या ताब्यांतील सर्व परगण्यांची उत्तम प्रकारें विभागणी केली, व त्यांचें संमत, तर्फ, मौजें, मजरें असे पोटभाग केले, व त्यांवर निरनिराळे अंमलदार नेमिले. पूर्वी विजयनगरच्या अमलामध्यें 'संप्रती' ह्मणून अंमलदार होते, ते त्यानें बदलून, देशपांडे, देशमुख, कुळकर्णी, सर नाडगौड आणि कानगो, असे नवीन अंमलदार नेमिले, आणि कर्नाटकांतील सर्व प्रांतांचे हिशेब त्यांच्याकडून तयार करविले. त्याचप्रमाणें, त्यानें सर्व परगण्यांत शिरस्तेदार नेमिले. ज्या वेळीं किल्लेदार किंवा मनसबदार ह्यांना सरकारांतून जहागीर देण्याचा प्रसंग येई, त्या वेळीं पूर्वीचे वसुलाचे हिशेब पाहून नवीन जमाबंदी ठरेल, त्याप्रमाणें जहागीरदारास उत्पन्न नेमून द्यावें, अशी पद्धति त्यानें अंमलांत आणिली. अशा रीतीनें वसूल ठरवितांना, इनामें वगैरे बाबी वजा करून निवळ आकार कमी किंवा जास्त झाला, हें तेव्हांच समजत असे. ह्याच वेळीं जमिनीचे कौलपट्टे मराठी भाषेमध्यें लिहिण्याचा शहाजीनें प्रघात घातला.

अशा रीतीनें शहाजी, राज्याची अंतर्गत व्यवस्था उत्कृष्ट रीतीनें करण्यांत गुंतला असतां, एक महत्त्वाची गोष्टी घडून आली. त्याचा भाग्यशाली पुत्र शिवाजी ह्यानें महाराष्ट्रामध्यें शिरजोर होऊन मुसलमानी सत्ता झुगारून देण्याचा प्रयत्न चालविला. त्यामुळें विजापुरचा बादशाहा महमद आदिलशाहा ह्यास दरबारी मंडळीनें, शिवाजीचा बाप शहाजी राजे हा त्यास अंतस्थ रीतीनें मदत करीत आहे, तेव्हां त्यास कैद केलें ह्मणजे शिवाजीचें बंड आपोआप मोडेल, अशी मसलत सांगितली. त्यावरून बादशाहानें बाजी राजे घोरपडे व यशवंतराव (घोरपडे?) ह्यांस शहाजीस पकडण्याबद्दल हुकूम केला. कांहीं ठिकाणीं विजापुरचा वजीर मुस्तफाखान यास बादशाहानें शहाजीस पकडून देण्याबद्दल सांगितलें, असाही उल्लेख सांपडतो.* त्यावरून त्यांनीं शहाजी राजास तंजावर प्रांतांत पकडून विजापुरास बादशाहाकडे पाठविलें. ही कामगिरी बाजी राजे घोरपडे ह्यांनीं केली ह्मणून बादशाहानें त्यांस इ. स. १६४९ मध्यें मुधोळची जहागीर बक्षीस करून दिली. शहाजीस इ. स. १६४९ पासून इ. स. १६५२ पर्यंत चार वर्षे बादशाही कैदेंत राहावें लागलें. त्या मुदतीमध्यें शिवाजीनें शहाजहान बादशाहाकडे सूत्र लावून, त्याच्या मार्फत विजापुरकरांकडे वशिला पोहोंचविला,

* मुस्तफाखान ह्यानें इ. स. १६४४ मध्यें चंदीचा किल्ला सर करून घेतला होता. तो तेथील सुभेदार होता. बाजी राजे घोरपडे हा त्याचा हाताखालील सरदारही असण्याचा संभव आहे.

आणि शहाजीची मोठ्या मुत्सद्दीपणानें सुटका करून घेतली. ह्या वेळीं विजापुरदरबारांतले शहाजीचे पुरस्कर्ते मित्र त्यास उपयोगीं पडले असावेत, ह्यांत शंका नाहीं.

शहाजीची सुटका झाल्यानंतर त्यास पुनः कर्नाटकची सुभेदारी मिळाली; व त्याच्या गैरहजिरीमध्यें कर्नाटकामध्यें जी अस्वस्थता उत्पन्न झाली होती, ती शांत करण्यासाठीं त्याची तिकडे रवानगी झाली. शहाजीचा एक मुलगा–संभाजी अथवा व्यंकोजी–बंगळुरास राहात असे व एक कर्नाटकांत तंजावर प्रांतीं राहात असे. शहाजीच्या गैरहजिरीमध्यें कनकगिरीच्या पाळेगारानें बंड केलें होतें, त्याजवर संभाजीनें बादशाही सैन्य घेऊन स्वारी केली. त्या लढाईमध्यें तोफेचा गोळा लागून संभाजी इ. स. १६५३ सालीं मृत्यु *पावला. शहाजीस हें वृत्त समजतांच त्याचें हृदय दुःखाग्नीनें होरपळून गेलें. तथापि, त्यानें आपला शूरपणाचा बाणा व सरदारीची इभ्रत कायम ठेवण्यासाठीं, एकदम कनकगिरीवर हल्ला करून, ती जिंकून घेतली. ह्याच समयास त्यावर पुनः दुःखाचा दुसरा प्रसंग आला. त्याचा प्रामाणिक व स्वामिनिष्ठ जुना कारभारी नारोपंत हणमंते हा मृत्यु पावला. ह्यानें कर्नाटक प्रांतांतील शहाजीच्या जहागिरीचा उत्तम बंदोबस्त ठेविला होता. तथापि, त्याचा मुलगा रघुनाथ नारायण हणमंते हा बापाप्रमाणेंच शहाणा व कर्तृत्ववान् निघाल्यामुळें, त्यानें शहाजीस कर्नाटकच्या जहागिरीची फारशी काळजी पडूं दिली नाहीं. इ. स. १६५३ पासून इ. स. १६६२ पर्यंत, सुमारें दहा वर्षें, शहाजी तंजावर व बंगळूर ह्या दोन प्रांतीं मिळून राहिला होता, असें दिसतें. त्याच्या सन्निध व्यंकोजी नेहमीं राहात असे.

इ. स. १६६२ मध्यें शहाजी, आपल्या प्रतापी पुत्राचा कीर्तिमहिमा श्रवण करून, त्यास भेटण्यासाठीं महाराष्ट्रांत आला. त्या वेळीं त्याचे बरोबर व्यंकोजी व तुकाबाई हीं आलीं होतीं. त्यांनीं भोसल्यांचें कुलदैवत जें श्रीशंभुमहादेव व तुळजापुरची अंबाबाई त्यांचें दर्शन घेतलें, आणि पंढरपुर, जेजुरी वगैरे क्षेत्रीं

*संभाजी कनकगिरीच्या लढाईमध्यें शके १६७५ ह्मणजे सन १६५३ मध्यें मारला गेला, असें ग्रांडडफही ह्मणतो व बखरीकारही ह्मणतात. रा. राजवाडे ह्यांनीं राईसकृत 'एपिग्राफिका कर्नाटिका' ग्रंथाच्या आधारें असें प्रसिद्ध केलें आहे कीं, संभाजीच्या नांवाच्या सनदा शके १५७६, १५७७ व १५८५ ह्मणजे इ. स. १६५४, १६५५ आणि १६६२ ह्या सालच्याही उपलब्ध आहेत, त्या अर्थीं तो, तोंपर्यंत जीवंत असला पाहिजे. आमच्याजवळील एका टिपणामध्यें, संभाजी राजे ह्यांस उमाजी राजेनामक पुत्र कार्तिक वद्य १२ शके १५७६ रोजीं झाल्याचा दाखला सांपडतो. ह्यावरून संभाजीच्या मरणाचें नक्की वर्ष अद्यापि समजत नाहीं.

जाऊन, सुमुहूर्तानें पुणें मुक्कामीं आपल्या नूतन राज्यसंस्थापक दिग्विजयी पुत्राची भेट घेतली. ह्या समयीं शिवाजीनें दाखविलेली अद्वितीय पितृभक्ति व प्रशंसनीय आदरबुद्धि, त्याच्यासारख्या पुण्यश्लोक नृपतीस साजण्यासारखी असून, त्याचें वर्णन बखरकारांनीं फार सुरस रीतीनें केलें आहे. ह्या स्वारीमध्यें शहाजीबरोबर त्र्यंबक नारायण हणमंते हे कारभारी होते. ह्यावरून, कर्नाटक प्रांतीं त्यांचे बंधु रघुनाथ नारायण हणमंते हे बंदोबस्तासाठीं राहिले असावेत, हें उघड आहे. शिवाजीची भेट झाल्यानंतर शहाजी हा व्यंकोजी राजासह तंजावर प्रांतीं परत गेला. तेथें गेल्यानंतर त्यानें तिकडील प्रांताचा बंदोबस्त करून, व्यंकोजीराजास आज्ञा केली कीं 'शिवाजीनें आपले जवांमर्दीनें नवें राज्य मेळविलें आहे. तुह्मीं आमची दौलत संपादिली आहे ही, यांत विठोजी राजे, आमचे काका, यांचे कुटुंबाचें व शरीफजी राजे यांचे वंशाचें, तुह्मीं वडीलपणें चालवावें; आणि प्रजापालन करून राज्य करावें.' ह्या वेळीं शहाजीनें व्यंकोजीस शिवाजीचें अनुकरण करून, शौर्य-पराक्रमानें त्याच्या प्रमाणेंच लौकिक मिळविण्याबद्दल उपदेश केला.* ह्यावरून तंजावर प्रांत ह्या वेळीं शहाजी राजे ह्यांच्या कर्नाटकांतील जहागिरीमध्यें समाविष्ट होता, असें मानण्यास पुष्टि येते.

ह्यानंतर लवकरच ह्मणजे इ. स. १६६४ मध्यें, शहाजी राजे यास विजापुरच्या बादशाहाकडून बेदनुरकर नायकावर स्वारी करण्याबद्दल फर्मान आला. त्याप्रमाणें शहाजी त्या मोहिमीवर बेदनूर प्रांतीं गेला. तेथें तो बासवापट्टणाजवळ तुंगभद्रेच्या कांठीं बेदिगिरी ह्या गांवीं शिकारीस गेला असतां, अरण्यामध्यें घोड्यावरून पडून इ. स. १६६४ मध्यें मृत्यु पावला. ह्या ठिकाणीं शहाजी राजाचें वृंदावन असून त्याच्या पूजेअर्चेबद्दल यरगटनहल्ली हें गांव चालत आहे. शहाजी राजे मृत्यु पावल्यानंतर, तंजावर प्रांतांतून व्यंकोजी राजे बासवापट्टण येथें आले. तेथें तुंगभद्रा-तीरीं राहून व वडिलांची उत्तर क्रिया करून ते परत बंगळुरास गेले. शहाजी राजे मृत्यु पावल्याची बातमी विजापूरदरबारास कळली. शहाजी हा विजापुरचा एक जुना व प्रतिष्ठित सरदार असून, त्यानें कर्नाटक प्रांतांत बादशाही सत्ता चांगल्या रीतीनें स्थापन केली व सरकारची सेवा एकनिष्ठेनें बजाविली, ह्मणून बादशाहानें कृपावंत होऊन, त्याचा पुत्र व्यंकोजी यांस शहाजीची जहागीर बक्षीस दिली, व त्याजकडे सहीशिक्क्याचे फर्मान पाठविले. ह्यावरून व्यंकोजी राजाकडे शहाजीची कर्नाटकांतील जहागीर तशीच चालू राहिली, हें स्पष्ट होतें. ह्या जहागिरीमध्यें तंजावर प्रांत होता, हें उघड आहे.

---

* शिवदिग्विजय पृष्ठ २०४.

# जुन्या ऐतिहासिक गोष्टी.

## १ शिवाजीचा किताब.

औरंगजेब बादशाहा महाप्रबल होऊन त्यानें अनेक हिंदु व रजपुत राजे आपल्या सिंहासनाचे दास करून सोडिले. त्या वेळीं हिंदु व रजपुत ह्यांच्या वतीनें राजे जयसिंग जयपूरवाले ह्यांनीं औरंगजेब बादशाहास 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा' असा किताब दिला. हें वर्तमान दक्षिणेंत शिवाजी महाराज ह्यांस कळलें. तेव्हां त्यांनीं रामदास स्वामींस पत्र लिहिलें; व सर्व हिंदु व रजपुत राजे ह्यांनीं औरंगजेब बादशाहास 'दिल्लीश्वर' म्हणजे केवळ 'जगदीश्वर' अशा बहुमानास पोहोंचविलें, असें सूचित केलें. त्याचा आशय तेव्हांच लक्षांत घेऊन, श्रीसमर्थ रामदास स्वामी ह्यांनीं शिवाजी महाराजांस उत्तर पाठविलें. त्यांत पुढील ओव्या लिहिल्याः—

**यश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणांसी नाहीं सीमा ।**
**नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १ ॥**
**देवाचा कैंपक्ष घेणें । ब्राह्मणांची चिंता वाहणें ।**
**बहुत जनांसी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ २ ॥**

ह्याचा आशय असा कीं, औरंगजेब बादशाहास मनुष्यांनीं किताब दिला, तुम्हांस 'देणें ईश्वराचें' आहे. तुम्हांस देण्यासारखी दुसरी कोणतीच उपमा नाहीं. तुम्ही अनुपम आहां. *

## २ निजामाची पुत्रांस देणगी.

हैदराबादचा इतिहासप्रसिद्ध निजाम-उलमुल्क ह्याच्या चातुर्याची व शहाणपणाची कीर्तिही त्याच्या शौर्याप्रमाणेंच प्रसिद्ध आहे. त्यानें आपल्या पुत्रांच्या नेमणुकीचे कागदावर दस्कत करितांना,

**'नान तहांहयात, दौलत ब-करामत'**

असें खास दस्तुर लिहून ठेविलें होतें. त्याचा अर्थ फार बोधपर व मौजेचा आहे. 'नान तहांहयात' म्हणजे 'अन्न जन्मपर्यंत' आणि 'दौलत ब-करामत' म्हणजे 'दौलत पराक्रमान्वयें.' ह्याचें तात्पर्यः—अन्न पाहिजे तर जन्मपर्यंत मिळेल. दौलत पाहिजे असेल तर पराक्रम करा. थोर पुरुषाच्या लेखणींतील ह्या दोन शब्दांत किती सुंदर उपदेश भरलेला आहे, तो रसिक वाचकांच्या लक्षांत येईलच.

---

* ही गोष्ट मल्हार रामराव चिटणीस ह्यांनीं श्रीमंत छत्रपति महाराज दुसरे शाहू राजे ह्यांच्यासाठीं लिहिलेल्या एका बखरीमध्यें दिली आहे.

# ३ स्वामिभक्त खंडेराव गुजर.*

औरंगजेबानें संभाजीराजाचा क्रूरपणानें वध केल्यानंतर, त्याचा सरदार झुल्फिकारखान ह्यानें मराठ्यांच्या राजधानीचें ठिकाण किल्ले रायगड, तेथील हवालदार सूर्याजी पिसाळ ह्यास फितूर करून, आपल्या स्वाधीन करून घेतलें. तेथें संभाजीचीं व त्याच्या मानकऱ्याचीं जीं बायकामुलें त्याच्या हातीं लागलीं, तीं सर्व त्यानें कैद करून, औरंगजेबाच्या स्वारींत पाठवून दिलीं. त्यांत शिवाजीचा प्रतापी सरदार प्रतापराव गुजर ह्याचींही मुलेंमाणसें होतीं. हीं सर्व माणसें बाटवून मुसलमान करावीं, अशी औरंगजेबास वारंवार हुक्की येई; परंतु त्याची कन्या त्याच्या इच्छेच्या आड नेहमीं येत असे. अखेरीस एके दिवशीं, कैदेंत असलेल्या सर्व लहानथोर स्त्रीपुरुषांस मुसलमानी धर्माची दीक्षा देण्याचा त्यानें संकल्पच केला. प्रथम संभाजीचा पुत्र शाहू ह्यास बाटविण्याचा आग्रह त्याने धरिला. पूर्वीप्रमाणें ह्याही वेळीं त्याची आवडती कन्या त्याच्या हेतूच्या आड आली तरी बादशाहा आपला हट्ट सोडीना. 'मराठे मंडळींत बायकामुलांनीं रडून आकांत केला. औरंगजेबाच्या कन्येनें त्यास सांगितलें कीं, शाहूस व त्याच्या मंडळीस मुसलमान केल्यास मी आत्महत्या करीन. आपल्या लाडक्या मुलीचें हें बोलणें ऐकून औरंगजेबाचें मन कठोर होतें तरी पण त्यासही द्रव आला. तथापि, शाहूच्या मोबदला त्याच्या कोणातरी तरुण मानकऱ्यास मी आज मुसलमान केल्याशिवाय राहणार नाहीं, असा हेका त्यानें धरिला. त्याची कन्याही आपला हट्ट सोडीना. तेव्हां अखेरीस प्रतापराव गुजराचा वडील पुत्र खंडेराव हा आपल्या खुषीनें शाहूच्या मोबदला मुसलमान झाला, व त्यामुळें शाहूवरील धर्मांतर करण्याचा आलेला प्रसंग टळला. पुढें औरंगजेबाच्या पश्चात् शाहूची सुटका होऊन तो राज्यपद पावल्यावर, त्यानें खंडेराव ह्यास, साताऱ्यानजीक परळी तर्फेतील साठ गांवांचे देशमुखांचें वतन, जें सुभानजी लावंघरे यास औरंगजेबानें दिलें होतें, तें त्याजकडून काढून दिलें. सुभानजी हा पूर्वीं मराठ्यांच्या विरुद्ध औरंगजेबास फितूर झाला होता, ती गोष्ट पुढें

* ह्या ऐतिहासिक गोष्टी मराठ्यांच्या इतिहासाचे मार्मिक व शोधक भक्त रा. रा. कृष्णाजी विष्णु आचार्य ह्यांनीं संग्रहित केल्या आहेत. त्यांनीं अशाच पुष्कळ आख्यायिका माजी भारतवर्ष, चालू शाळापत्रक, ह्यांच्या द्वारें प्रसिद्ध करण्याचें श्रेय घेतलें आहे. रा. आचार्य ह्यांचा संग्रह विपुल असल्यामुळें जुन्या ऐतिहासिक गोष्टी हें स्वतंत्र सदर देऊन, त्यांत त्या प्रसिद्ध करण्याचें आम्हीं योजिलें आहे. रा. रा. आचार्य ह्यांच्या आख्यायिकांशिवाय ज्या आख्यायिका उपलब्ध होतील, त्याही ह्याच सदरांत घालण्यांत येतील.

दिली आहे. ह्या खंडेरावाचे मुसलमानी धर्म पाळणारे वंशज सांप्रत परळीनजीक कामती येथें राहतात. हल्लींच्या वंशजाचें नांव भाऊसाहेब असें आहे. हा वंश वतनदार असल्यामुळें, आपण पूर्वीं कसे होतों व आतां कसे झालों, ह्या बाबतची सर्व माहिती त्यांतील लोकांस आहे. ह्या घराण्यांत मुसलमान लोकांप्रमाणें "महमद अहंमद" वगैरे नांवें ठेवण्याची वहिवाट नसून हिंदूंप्रमाणेंच ठेवण्याची आहे. हे हिंदूंचे सर्व सण पाळतात. नवरात्रादि उत्सवही करितात असें ह्मणतात. शिवाजीच्या वेळीं फलटणचे निंबाळकर असेच कांहीं कारणानें बाटून मुसलमान झाले होते; त्यांस शिवाजीच्या आईच्या सांगण्यावरून पुनीत करून स्वधर्मांत घेतलें होतें. त्याप्रमाणें खंडेराव गुजर ह्यांस स्वधर्मात घेण्यास मंडळी तयार होती. परंतु त्यांची मुसलमानीण बायकोवर फार प्रीति होती, व तिजसुद्धां मला पावन करा, असा त्यांचा आग्रह पडल्यावरून ती गोष्ट तशीच राहिली.

* * *

## ४ फितुरी सुभानजी लावंघरे.

वरील गोष्टींत सुभानजी लावंघरे यांजकडील देशमुखीचें परळी तर्फेचें वतन खंडेराव गुजर ह्यांस दिल्याचें लिहिलें आहे, त्या सुभानजीची हकीकत अशी:—सुभानजी लावंघरे हा परळीच्या देशमुखाच्या घराण्यांतील होता. त्या वतनांत ह्याचा फार थोडा हिस्सा होता. सातारा किल्ल्याच्या हवालदारीचें काम ह्यास मिळालें होतें. संभाजी राजाच्या पश्चात् मराठे आणि मुसलमान ह्यांचें जें महायुद्ध झालें, त्या वेळीं हा सातारा किल्ल्याचा हवालदार होता. हें युद्ध चालू असतांच राजाराम छत्रपति मृत्यु पावला, तथापि युद्ध पूर्वीच्याच आवेशानें चाललें होतें. खुद्द औरंगजेब फार मोठी फौज घेऊन साताऱ्च्या किल्ल्यास वेढा घालून बसला. हवालदार व किल्ल्यावरील नेहमींची शिबंदी ह्यांच्यानें किल्ल्याचें संरक्षण होण्यासारखें नव्हतें. ह्मणून त्या वेळचा मराठी राज्याचा मुख्य चालक रामचंद्रपंत अमात्य यानें, त्या प्रांताचा सुभेदार प्रयागजी अनंत ह्यास, निवडक फौजेसुद्धां साताऱ्यास पाठविलें. प्रयागजी अनंतानें मोठ्या शौर्यानें पुष्कळ दिवसपर्यंत किल्ला लढविला. पुष्कळ दिवस लढाई चालल्यामुळें किल्ल्यांतील धान्यसामुग्री सरत आली, तेव्हां प्रयागजी काळजींत पडला. इतक्यांत किल्ल्यावरच्या मराठ्यांच्या मदतीस परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि धावून आला. त्यानें आपलें ठाणें परळी

१ ह्या मुसलमान झालेल्या निंबाळकराचें नाव बजाजी निंबाळकर. शिवाजीनें त्यास स्वजातींत घेतल्यावर, त्याचा मुलगा माहदजी निंबाळकर यास आपली मुलगी सखूबाई दिली होती. ही एकच गोष्ट हल्ली समजलेली आहे, परंतु शिवाजीच्या वेळीं अशा पुष्कळ गोष्टी घडल्या असाव्या असें वाटतें.

किल्ल्यावर ठेविलें व सातारा किल्ल्याच्या पश्चिमेकडील बाजूकडे फितूर करून धान्याचे गोण किल्ल्यावर चढविले. नवी धान्यसामुग्री येऊन पोंचतांच, किल्ल्यावरील मराठ्यांस नवा दम चढला. ते मोठ्या आवेशानें लढूं लागले. मराठ्यांचें शौर्य पाहून औरंगजेबास वाटलें कीं अशानें किल्ला मिळणें कठीण आहे. मग त्यानें किल्ल्यांत फितूर करण्याची खटपट केली. किल्ल्याचा हवालदार सुभानजी लावंघरे यास सगळ्या परळी तर्फेची देशमुखी देण्याचें कबूल केलें. मराठे लोकांस देशमुखी, पाटीलकी वगैरे वतनाची लालूच फार असते, हें औरंगजेबास पूर्वीपासून ठाऊकच होतें. पूर्वी सूर्याजी पिसाळानें वतनाच्या लालचीनें जसा रायगड किल्ला ऐन वेळीं मोंगलांस दिला होता,. तसाच सातारचा किल्ला मुसलमानांस देऊन आपणही आपला फायदा करून घ्यावा, असें सुभानजीस वाटलें; व उभय पक्षांत फितुराची बाटाघाट सुरू झाली. असें फितुराचें एक पत्र प्रयागजी अनंताच्या हातीं लागलें. त्यानें लागलीच ही हकीकत परळीस प्रतिनिधीस कळविली.अमुक वेळीं मोंगलांचा हल्ला किल्ल्यावर चढणार व सुभानजीनें त्यांस दरवाजा खुला करून द्यावा, अशा संकेताचें तें पत्र होतें. किल्ल्यावरील कायमची शिबंदी सर्व हवालदाराच्या ताब्यांत असल्यामुळें त्यास एकदम कैद करून ठेवणेंही प्रयागजीस योग्य वाटेना. अखेरीस प्रतिनिधीनें विचार केला कीं, असा अकस्मात् किल्ला शत्रूच्या हातांत गेला, तर किल्ल्यावरील सर्व लोकांचा घात होईल. ह्मणून त्यानें, औरंगजेबाचा पुत्र अझीमशाहा याच्या मार्फत तहाचें बोलणें लाविलें. औरंगजेबानें तत्काळ तें मान्य केलें. त्यांत असें ठरलें कीं, किल्ल्यावरील मराठ्यांनीं आपल्या हत्यारांसुद्धां निघून जावें; त्यांस मोंगलांनीं हरकत करूं नये; व सुभानजीस परळीची देशमुखी बादशाह देईल, तें वतन मराठ्यांनीं त्यास उपभोगूं द्यावें. ठरावाप्रमाणें मराठ्यांनीं किल्ला सोडून दिला. त्यावर औरंगजेबानें आपलें निशाण चढविलें. सुभानजीस बादशाहानें देशमुखीची सनद दिली, व त्यास पंचहजारी सरदार केलें. सूर्याजी पिसाळाप्रमाणें त्यासही मुसलमान होण्याविषयीं बादशाहानें आग्रह केला; परंतु ती गोष्ट त्यानें कबूल केली नाहीं. ह्मणून बादशाह रागावला व त्याची पंचहजारी काढून घेतली. पुढें शाहूराजा कैदेंतून सुटून आल्यावर त्यास सुभानजीची हकीकत समजली. तथापि तो शरण आला ह्मणून निमे देशमुखी त्याजकडे ठेवून, निमे खंडेराव गुजरास दिली.

बडोदें येथील, 'मराठ्यांची रियासत' ह्या ग्रंथाचे कर्ते,. बुंदेल्याच्या ग्रंथावरून सुभानजीची हकीकत देऊन, हा सुभाना कोण, अशी पृच्छा करितात. त्यांनीं विचारिलेला तो हा सुभानजी लावंघरे होय.

## ५ प्रतापराव गुजराचा हिंदुधर्मी वंश.

प्रतापराव गुजराच्या मुसलमानी धर्मांत गेलेल्या खंडेरावनामक पुत्राची गोष्ट सांगितली. आतां त्याच्या हिंदुधर्मांतील वंशजांची हकिकत सांगतों. प्रतापराव गुजरची बायको व मुलें शाहुराजाबरोबर रायगडीं कैद करून औरंगजेबानें नेलीं, त्या वेळीं त्याची दुसरी बायको व तिचीं मुलेंबाळें त्याच्या वतनाच्या गांवीं होतीं. त्याच्या वतनदारीचा गांव मौजे भोसरें हा होय. हा गांव सातारा जिल्ह्यांत खटाव तालुक्यांत आहे. गुजर हे भोसऱ्याचे पाटील होत. हल्लीं तेथील पाटीलकी गुजर घराण्याकडेसच आहे. औरंगजेब दक्षिणेंत आल्यापासून तों मरेपर्यंत, मुसलमान व मराठे यांच्यांत जें भयंकर युद्ध चाललें होतें, त्या युद्धाच्या दंगलींत, प्रतापरावाचीं हीं मुलेंबाळें भोसरें येथेंच वाढलीं. ह्या वंशजांचा शोधसमाचार कोणींही फार दिवस घेतला नाहीं. पेशवाई बुडाल्यावर, सातारचे श्रीमंत छत्रपति श्री० प्रतापसिंह महाराज–यांना प्राचीन घराणीं कोणतीं व कोठें आहेत ह्याचा शोध करावयाची फार आवड असे.–त्यांनीं प्रतापराव गुजराच्या वंशजांचा शोध केला. तेव्हां त्यांस भोसरें येथील प्रतापरावाच्या वंशजांची हकीकत समजली. त्या वेळीं प्रतापरावाच्या वंशांत रघुनाथराव गुजर ह्या नांवाचा एक हुशार तरुण मुलगा होता. त्यास प्रतापसिंह महाराजांनीं आपल्याजवळ आणून ठेवून, त्यास चांगलें शिक्षण दिलें; व पुढें आपली एकुलती एक कन्या गोजराबाई त्यास दिली. ह्या गोजराबाईचे पुत्र प्रतापराव ह्या नांवचे सातारा येथें प्रसिद्ध शिकार करणारे होते, हें पुष्कळांस माहीत आहे.



## ६ गोविंदराव काळे यांचा मृत्यु.

पेशवाईतील प्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांच्या विश्वासांतील व परराज्यांतील वकिलीच्या कामांत चतुर असा गोविंदराव काळे नांवाचा प्रसिद्ध पुरुष, पुष्कळ दिवस निजामच्या दरबारीं, पेशव्यांच्या तर्फे वकिलीच्या कामावर होता. पेशव्यांचें राज्य बुडाल्यावर हा नामांकित पुरुष जिवंत होता. पेशवाईची अखेर होऊन मराठ्यांच्या राज्यावर इंग्रजांचा ताबा सुरू झाल्यावर, प्रसिद्ध इंग्रज मुत्सद्दी एल्फिन्स्टन साहेब ह्यानें पेशव्यांच्या पदरच्या लोकांस वर्षासनें व नेमणुका वगैरे करून देऊन त्यांचा धनी गेल्याचें दुःख त्यांना होऊं दिलें नाहीं. तथापि, ह्या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर, कांहीं अविचारी लोकांनीं इंग्रजांविरुद्ध कांहीं गुप्त कट करण्याचा बेत योजिला. त्या वेळीं एल्फिन्स्टन मुंबईचा गव्हर्नर होता. त्यास ही गुप्त कटाची बातमी ऐन वेळीं समजली. तेव्हां त्यानें त्या कटांतील लोकांस कडक शिक्षा

करून जिकडे तिकडे शांतता केली. ह्या कटांत पुण्यांतील व महाराष्ट्रांतील कोणीही प्रसिद्ध लोक नव्हते; तथापि गोविंदराव काळे यांचें नांव, त्यांच्या कोणी शत्रूनें त्या कटांत गोविण्याचा प्रयत्न केला. अशा अविचारी लोकांच्या मसलतींत गोविंदराव असणें संभवनीय नाहीं, असें एल्फिन्स्टन यांचें ह्मणणें पडलें. तथापि, बातमीची शहानिशा करण्याकरितां, गोविंदराव काळे यांस पकडून आणण्यासाठीं कांहीं लोक त्यांच्या राहत्या गांवीं–बारामतीस–पाठविले. परंतु, त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं! कारण, गोविंदराव त्या वेळीं कांहीं विकारानें मरण पावला होता व त्याचा प्रेतसमारंभ चालला होता! अशा वेळीं हे पकडणारे जाऊन पोंचले. त्यांनीं सदरहूप्रमाणें हकीकत वरिष्ठांस कळविली. त्या वेळीं एल्फिन्स्टन साहेबांनीं उद्गार काढले कीं, 'थोर मुत्सद्याची अब्रू मरणानें वांचविली!'



## ७ ज्ञानसागर कवि.

सातारा जिल्ह्यांत खानापूर तालुक्यांत विटें हा कसब्याचा प्रसिद्ध गांव आहे. खानापूर तालुक्याचें ठाणें हल्लीं तेथेंच आहे. ज्ञानसागर कवि हा ह्या ठिकाणचा राहणारा. ह्याचें खरें नांव भैरव ऊर्फ अप्पाजी असें होतें. ह्याच्या बापाचें नांव ज्योतिपंत व आईचें यमुना. ह्याचे गोविंद व गोपाळ असे दोघे भाऊ होते. ह्याच्या आज्याचें नांव मुकुंदपंत व आजीचें नांव निराबाई. ही निराबाई अद्वयचैतन्यनामक सत्पुरुषाची कन्या होती, व चिद्घन नामें साधु कवि हा तिचा भाऊ होता. अशी ह्याची मातृपितृकुलपरंपरा आहे. ह्याचे पूर्वज विटें येथील वतनदार जोशी कुळकर्णी. पतकेपणाचें वतनही ह्यांच्याकडे होतें. आजा मुकुंदपंत व वडील चुलता शिवाजीपंत हे विरक्त सत्पुरुष होते. शिवाजीपंताला मुलगा नव्हता. ह्मणून त्यानें भैरव ऊर्फ अप्पाजी बोवास पित्याच्या आज्ञेवरून दत्तक घेतलें होतें. अप्पाजी बोवाही विरक्त पुरुष होता. लक्ष्मीनाथ नामें अप्पाजी बोवाचा एक त्याच्या सारखाच परमार्थी मित्र होता. त्याच्या संगतीनें हा पैठणाला गेला. तेथें सदाशिव शंकर याची गांठ पडली. ह्या सदाशिव शंकराला पुढें हरिहरेंद्र स्वामी असें नांव पडलें. अप्पाजी बोवाचें उपनांव 'ज्ञानसागर' होतें. ह्या उपनांवाप्रमाणें तो खरोखरच ज्ञानसागर होता. ह्मणजे ज्ञानसागर हें नांव त्याच्या ठिकाणीं अन्वर्थक होतें. ह्यानें केलेल्या ग्रंथासही 'ज्ञानसागर' हेंच नांव आहे. हा ग्रंथ ओवीबद्ध आहे. ह्या कवीचीं पदें वगैरे कविताही पुष्कळ आहे. ह्याच्या पदाच्या शेवटीं "ज्ञानसागर शिवगुरु अवधूत" असें ह्मटलेलें असतें. हा ऋग्वेदी आश्वलायन शाखेचा देशस्थ ब्राह्मण. ह्याचें गोत्र विश्वामित्र. ह्यास दिगंबरबोवा ह्मणून एक पुत्र होता. दिगंबरबोवा हा अतिसुंदर अद्भुत

वक्ता, उत्कृष्ट कीर्तनकार व संगीत कलेंत केवळ प्रतिगंधर्व असून, घरचा श्रीमान् होता. ह्याला पाहिलेले बरेच लोक अजून आहेत. अप्पाजी बोवा ह्मणजे ज्ञानसागर कवि वारले त्यास सुमारें ८० वर्षें झालीं. अप्पाजी बोवाची गुरुपरंपरा खालीं लिहिल्याप्रमाणें आहे. अप्पाजी बोवांनीं विटें येथें दत्तमंदिर बांधून आपला मठ केला. शिंदे सरकाराकडून १२०० रुपयांचें उत्पन्न मठाकडे चालत होतें. आतां चालत नाहीं.




* * *

## ८ पेशव्यांची हुजूर पागा.

पेशव्यांच्या हुजूर पागेंत दहाहजार घोडे असत. कागदोपत्रीं ह्या घोडेस्वारांच्या फौजेस "हुजुरात" असेंही ह्मटलेलें असतें. शेवटचे पेशवे बाजीराव रघुनाथ, सवाई माधवरावांच्या मागून गादीवर बसले. त्या वेळीं हुजूर पागेवरील सरदार

कोण कोण होते, त्यांची यादी खालीं दिली आहे. कोणांचीं नुसतीं आडनांवें, कोणांचीं बापासुद्धां नांवें, व कोणांचीं नांव, बिनांव आडनांव, ह्यासुद्धां संबंध नांवें अशीं यादींत आहेत. ह्या हुजुराती फौजेचीं ५२ पथकें होतीं. त्या बावन पथकांवरील सरदारांचीं निरनिराळीं बिरुदें होतीं. हीं पेशव्यांचीं पथकें नामांकित माणसांनीं भरलेलीं असत. ज्या वेळीं अति घनघोर प्रसंग येईल, तेव्हां हे बावन बिरुदांचे धनी शत्रूंचा फडशा उडविण्यासाठीं जावयाचे ! हीं बिरुदें ह्मणजे कांहींतरी चिन्हें किंवा निशाणें असावींत असें वाटतें. तीं कोणतीं होतीं, तें अजून समजलें नाहीं. असो. रावबाजीच्या वेळच्या पथकांवरील सरदारांची यादी मिळाली आहे. ती अशीः—

१ ढेरे. २ गोविंदराव सदाशिव. ३ भिकाजी जनार्दन. ४ भास्कर जगन्नाथ. ५ बळवंतराव मुढे. ६ बळवंतराव थोरात. ७ कृष्णसिंग. ८ हैबतसिंग शिंदे. ९ लक्ष्मणसिंग. १० राजजी फडतरे. ११ राजजी दिघे. १२ बैदरजी मुळे. १३ नीळकंठराव रामचंद्र. १४ जगन्नाथ रघुनाथ ऐतोळे. १५ मालोजी पवार. १६ अमृतराव गावडे. १७ राघो हरी व गणेश हरी. १८ गणेश गंगाधर सोमण. १९ सखोजी माठ्ये रुजू द्वारकोजी. २० अनंतरावबाबा. २१ बाबुराव अनंत. २२ बळवंत सुबराव. २३ तुकोजी आनंदराव. २४ राघो बापूजी. २५ दौलतराव शेलार. २६ कनकोजी खलाटे. २७ सावजी निंबाळकर. २८ गमाजी निंबाळकर. २९ पर्वतराव भाणकर. ३० गिरजोजी बर्गे. ३१ बळवंतराव नागनाथ. ३२ जगन्नाथ केशव. ३३ बळवंतराव नागनाथ लिमगावकर. ३४ यादवराव देवकांते. ३५ रामजी मोहिते. ३६ पवार. ३७ बांडे रनाळेकर. ३८ हिरोजीराव पाटणकर. ३९ रंगराव राजेबहादर. ४० विंचूरकर. ४१ पुरंदरे. ४२ सचीव. ४३ प्रतिनिधी. ४४ नायगांवकर. ४५ आंबीकर. ४६ शितोळे. ४७ औसकर. ४८ गणपतराव अनंत. ४९ पारसनीस तिमाराव. ५० ढमढेरे पांडुरंगपंत. ५१ बजाबा शिरोळकर. ५२ शिवरामपंत थत्ते.

ह्या सरदारांपैकीं पुष्कळांचे वंशज पुण्यांतच असण्याचा संभव आहे. कित्येक पुण्यांतील आपली वस्ती मोडून, आपापल्या वडिलार्जित वतनाच्या गांवीं जाऊन राहिले व कित्येकांचे वंश बुडाले.

* * *

पुढें मसलत होणें ती होईल. प्रस्तुत तर स्तिबित मसलत पडली आहे. इंग्रज, खर्चावेंचासही मानसिकच, खासगी खर्चापुरतें देतात. खर्चाची तारंबळ फार आहे. हजार दीड हजार फौज श्रीमंतांजवळ आहे, व दोन हजार पायदळ तेंही, कांहीं लोकांनिशीं राजाराम गोविंद आमदाबादेकडे गेले होते, ते वाटेनें, गायकवाडानें कांहीं त्यांचा परामर्ष केला—लुटलें गेलें. तेंही उरल्या सरंजामानिशीं सुरतेस आलें. सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई बडोद्यास जाणार आहेत. सबब कीं, गायकवाडांनीं आपले पक्षीं असावें. त्यांस गायकवाडींचा निश्चय श्रीमंतचरणारविंदीं पुरता खचित दिसून आल्यास, कांहीं खर्चास तरी मागावें. या अर्थी बाई बडोद्यास जाणार ह्मणून वर्तमान बाजारी आहे. सत्य मिथ्या देव जाणे. प्रस्तुत छ १२ मिनहूस तीनशें आरब, कांहीं त्यांत गाडदी व रजपूत ऐसे मिळून, तीनशें आहेत. परंतु माणूस चांगले आहेत. तें महेश्वरास आले आहेत. समागमें एक बाळाजीपंत नामें कारकूनही आहे. त्यास शोध करितां ते बोलतात कीं, आह्मी बडोद्याहून आलों. उमेदवार नोकरीचे आहों. ऐकल्यांत असें आलें आहे कीं, गायकवाडांजवळ कांहीं गाडदी लोक होते. त्यांनीं कांहीं दादासाहेबांकडे फितूर केला होता. यास्तव गायकवाडांनीं, गाडदी सारेच दूर केले, असें ऐकिलें होतें. तें पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें होतें. त्यांपैकीं हे असले तर न कळेत. दुसरें ऐकतों जे, दादासाहेबांकडे लोक होते त्यांस खर्चावेंचास पावत नाहीं, यास्तव त्यांनीं निरोप दिला. सबब हे उमेदवारीनें येथें आले आहेत. ते तों चाकरीचे उमेदवारच असें बोलतात. तिसरें वर्तमान, बारीकपणें शोधास बाळंभट राहोरकर लाविला आहे. त्याच्या शोधांत आलें आहे कीं, श्रीमंत दादासाहेबांकडील कारकून व हे आरब सुरतेहून येथें आले आहेत. होळकराकडून पहिले दादासाहेबांस पंचवीस हजार रुपये देविले होते. त्यांपैकीं दहा हजार यांनीं हरी बावाजीच्या मन्वंतरांत दिले आहेत. बाकीचे पंधरा हजार देणें. त्यास ते सरकारांतून यांस मना केले आहेत. त्या ऐवजासाठीं कारकून व गाडदी हे आले आहेत. येथील व या प्रांतांतील बळाबळ पहावें, व सरदार इकडील, फुटफटी जागां जागां कारकून व हुजरे इकडे आहेतच, तेही शोध करावा, शकटभेद करून एखादी मसलत बळवावी, याही अर्थांत आहेत, ह्मणूनही ऐकितों. हें ऐकलें वर्तमान अहल्याबाईस सांगितलें. त्यांनींही आपले कारकून त्या आरबांकडे पाठविले जे तुह्मी येथें राहूं नका. आह्मी कोणास चाकरीस ठेवीत नाहीं. आह्मांस माणसें ठेवायाची प्रस्तुत दरकार नाहीं. तुह्मीं येथून निघून जाणें. त्यांनींही सांगितलें जे, आह्मीं पांघरुणें धुऊं टाकलीं

आहेत, तीं आलीं ह्मणजे जाऊं. असें बोलले आहेत. बाळाजीपंत कारकून व आरबांचे सरदार, त्यांचें बोलणें हेंही आहे कीं, श्रीमंत दादासाहेबांचा व इंग्रजांचा इमानप्रमाण पटला. दक्षिणेवर मसलत बळवावी ( यासाठीं ) दादासाहेबांचा पक्ष इंग्रजांनीं निश्चयपूर्वक धरला. इंग्रजांनीं दादासाहेबांबरोबर सात पलटणें व दोन हजार स्वार व तोफखाना देऊन, शंभर गोरा हमराह करून, दादासाहेब भडोचेस आले. मराठी फौज असावी या अर्थीं आह्मी पुढें आलों आहों. मागाहून हजार गाडदी व चार तोफा तेही येतात. प्रस्तुत इकडे पुण्याकडील कोणी ( अपूर्ण )."

---

**लेखांक १८.** ता० २२ सप्टेंबर इ. स. १७८०.
**श्रीगजानन.** मि० भाद्रपद वद्य ९ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २२ रमजानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वृत्तांतः—श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच आहेत. इंग्रज जागां जागां छावणीस आहेत. उभयतां सरदार आपलाले जागां आहेत. पाटीलबावांनीं बाळारावजींस इकडे मातुश्री बाईकडेस पाठविलें. ते इंदुराहून तुकोजीबावांचीही भेट घेऊन, त्यांशींही कांहीं बोलून इकडे आले. येथें छ ११ मिनहूस दोनप्रहरां आले. वाड्यांत बाईचे भेटीस आले. पुराण होत होतें. ते समयींच भेट झाली. त्यांनीं नजर केली. तें वर्तमान पेशजीं पत्रीं डाकेबरोबर विनंतीपत्रीं लिहून सेवेसी पाठविलें आहे. बाळारायांबरोबर लालाजी बल्लाळ ह्मणून मातबर मनुष्य, तेही पाटीलबावांनीं समागमें दिले आहेत. त्यास इतक्या दिवसांत, दोन वेळां बाईची व बाळारायांची चार चार घटका बैठक एकांतीं झाली. त्यास पाटीलबावांची आज्ञा कीं, बाळाराव व लालाजी बल्लाळ व शिवाजी नारायण असे त्रिवर्ग मिळून बाईशीं बोलावें. त्यास दोन वेळां एकांत झाला. ते बाळाराव व शिवाजी नारायण उभयतां आले. त्यांपैकीं बाळाराव एकलेच बाईशीं बोलूं लागले. बोलण्यांत बहुतकरून तुकोजीबावांच्या मतलबानुरूप बोलणें बोलूं लागले. बाईनींही उत्तरें समर्पकच केलीं. थोडासा बाईस संदेह वाटला जे शिवाजी नारायण येथें दीड वरीस आह्मांजवळ आहेत; त्यांस कितीक जाबसालांची माहितगिरी. येथील माहितगिरीनें तेथें पाटीलबावाशीं बोलले असतील. ते अन्वय या बोलण्यांत कांहींच दिसून येत नाहींत. तेव्हां अलीकडील इंदूरचें बोलणें हें आहे. असो. हे पेंडीचीं गुरें आहेत. तुकोजीबावांनीं कांहीं लालुच दाख-

उपाय काय? खानदेशांतील वर्तमानः—सुलतानपुरास होळकराकडील लोकांचे मोर्चे आहेत. वरचेवर येथून हे पथकें रवाना करीतच आहेत. बुळे व मकाजी गिते व महादजी होळकर व बारगळ हे चारशें लोक बाईनीं येथून रवाना केले. इंदुरीहून वाघाचें पथक चारशें व वाघमारे दोनशें असे येथें आले. तेही रेवा उतरून पार गेले. वाघ तों छ १७ रोजीं पलीकडून कूच करून गेले. वाघमारे छ २० रोजीं कूच करून गेले. चिमाजी बुळ्याचें पत्र सुलतानपुरीहून बाईस आलें होतें. छ १४ मिनहूचें पत्र छ १६ रोजीं दोन प्रहरां येथें आलें. त्यांत मजकूर होता जे, 'नंदुरबारेहून पांचशें स्वार, पांच पलटणांतील माणसें पायाचीं, हत्यारबंद ३००, असे केसोपंत दातारानें सुलतानपुरचे मदतीस नंदुरबारेहून रवाना केलीं आहेत. तापी उतरून येणार. यास्तव चिमाजी बुळ्यानें लिहिलें होतें जे,' आपण व मकाजी गिते व बारगळ ऐसे तीनशां लोकांनशीं तापी तीरास त्यांच्या उपरांत त्यांच्या तोंडावर गेलों. दोनशां लोकांनशीं महादजी होळकर सुलतानपुरच्या शहरावर आहेत. आणीक फौज पाठवा ह्मणून पत्रें आलीं होतीं. छ १९ रोजीं पत्र महादजी होळकराचें आलें जे राजश्री गणेशपंत बेहेरे रनाळ्याजवळ आहेत. त्यांसही पत्रें पाठविलीं आहेत कीं, तुह्मी इकडे सुलतानपुरास येऊन आह्मांस सामील होणें; अगर नंदुरबारेहून इकडे त्यांचे लोक येतात, त्यांस मधें अटकाव तरी करणें. ह्मणून पत्रें लिहिलीं. परंतु ते रनाळें सोडून बाहेर निघत नाहींत. दुसरें वर्तमान त्यांनीं लिहिलें जे, केसोपंतानें सुरतेस पत्रें लिहून सहा पलटणें कुमकेस आणविलीं. त्यांपैकीं तीन पलटणें नवापुऱ्यास आलीं ह्मणून वर्तमान आहे. सत्य मिथ्य देव जाणे. मागून आणखीही तीन पलटणें गुलजारखान घेऊन येत आहे. विजयादशमीचे मुहूर्तें राजश्री अमृतराव पोख्त सामानानशीं खानदेशांत येणार. याप्रमाणें पत्रीं वर्तमान लिहिलें आहे. जागां जागां बाजारी वर्तमानही हेंच आहे कीं, पलटणें कुमकेस नवापुरास आलीं. अशी गडबड इकडे आहे. रयतीपासून मनास येईल तसें लुटून पैका घेतात. खानदेशांत कांहीं रयतीस सुख नाहीं. असें वर्तमान वरचेवर येतें. राजश्री पांडुरंग शंकर इंदुरीहून येथें आल्यास दीड दोन महिने झाले आहेत. बाईनीं ठेवून घेतले आहेत, कीं बाळाराव येथें आल्यावर काय भाषण होईल, त्याप्रमाणें मशारनिल्हेची रवानगी इंदुराकडे करतील. एका दोन दिवसां बाईचें व बाळारायांचें भाषण काय होईल तें कळवून घेऊन, मागाहून काशीदजोडी रवाना करीन. सेवकाची खर्जाची फार तसदी आहे. कृपा करणार धनी समर्थ. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १९.** ता० १० अक्टोबर इ. स. १७८०.
**श्रीगजानन.** मि० आश्विन शुं० १२ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ११ सवालपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं डांकेबरोबर आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. आज्ञा कीं, राजश्री बाळाराव तेथें आले आहेत; त्यांचें व मातुश्री अहिल्याबाईचें बोलणें काय निश्चय ठरेल, तो लिहून पाठविणें. त्यास प्रस्तुत ठरलें आहे कीं, राजश्री नारो गणेश व सुलतानजी लांबहाते उभयतांनीं यावें. बाळारावांचे विद्यमानें बाईच्या भेटी कराव्या. कितीक बोलणीं गृहकृत्यांचीं बाईचीं व त्या उभयतांचीं मशारनिल्हेच्या विद्यमानें व्हावीं. यांचें त्यांचें रहस्य झालें ह्मणजे तुकोजी होळकरांस बोलवावें, याप्रमाणें निश्चय ठरला आहे. याप्रमाणें निश्चय करून कृष्णाजी आंबादास पाटीलबावांकडून आले होते ते, व कुशाबा ह्मणून गृहस्थ, नारो गणेश यांजकडील, बाळारायांबरोबर आले होते ते, ऐसे उभयतांसी निश्चयाच्या बोलण्याचा मथितार्थ सविस्तर उभयतां कारकुनांस बाळारायांनीं सांगून, पाटीलबावांकडे उज्जनीस छ ९ मिनहून रवाना केले. त्यांस सांगितलें जे, तुह्मी तीन दिवसांनीं उज्जनीस जाऊन, हें सविस्तर वर्तमान, पाटीलबावांस एकांतीं निवेदन करून, पाटीलबावांचें पत्र इंदुरच्या उभयतांस घेऊन येऊन, त्यांस सारें समजावून व पाटीलबावांच्या बोलण्याचे व येथील बोलण्याचे अर्थ सविस्तर समजावून, नारो गणेश व सुलतानजी लांबहाते यांस लवकर येथें घेऊन येणें. असें सांगून उभयतां कारकून उज्जनीस पाठविले. याप्रमाणें येथील वर्तमान पेशजीं काशीदजोडीबरोबर चंद्र ६ मिनहूस विनंतीपत्रें येथून रवाना केलीं आहेत. पावतील. अलीकडे खानदेशचें वर्तमान सुलतानपुराभंवतालीं हजार आठशें फौज होळकराची जमा झाली आहे. नित्य धिंगा भंवताला करितात. परंतु अद्याप सुलतानपूर जेर नाहीं. नंदुरबारेंत केसो कृष्ण आहेच. कांहीं कुमकही त्यांनीं सुलतानपुरांत पोंहोचाविली. राजश्री गणेशपंत बेहरे रनाळ्यापलीकडे पांच कोस आहेत ह्मणून एक वर्तमान. दुसरें ऐकिलें जे, सरकारची फौज कांहीं पुण्याहून रवाना झाली, ते गणेशपंतांकडे आली. गणेशपंतांसीं व केसो कृष्ण यांसीं नंदुरबारेजवळ लढाई झाली. उभयतांही बरोबरीच राहिले. असें वर्तमान ऐकिलें. परंतु हें बाजारी वर्तमान. सत्य मिथ्या देव जाणे. श्रीमंत दादासाहेब सुरतेसच आहेत. गाडर ह्मणून इंग्रेज मुंबईस गेला आहे. तो आला असला तर विजयादशमीचे मुहूर्तें दादासाहेब बाहेर निघणार. कांहीं

पलटणेंही पुढें खानदेशांत व पायागडाचे सुमारें व कोंडाईबारीकडे रवाना करणार. असें वर्तमान आहे. पायागडाकडून माळव्यांत पलटणें आलीं, तर उभयतां सरदारांचें देशीं येणें कळतच आहे. हिंदुस्थानांत पातशाहाकडून नजाबतखान पंचवीस तीस हजार फौजेनशीं, रणथंबोर किल्ल्याजवळ खांसा वीस हजार फौजेनशीं आहे. दहा हजार फौज जयपुरच्या मुलखांत आली आहे. त्यांनीं, उभयतां सरदारांचीं ठाणीं पांच सहा होतीं, तीं जयपुरवाल्यानें घेतलीं. जयपुरवाल्याचे बत्तीस परगणे तुर्कांनीं घेतले. जयपुरापासून बारा कोसांवर तुरकांचीं ठाणीं बसलीं आहेत, व जागीरदारांखालीं चवदा परगणे व गनीमांचे दोन एकूण अठ्ठेचाळीस गेले. बाकी खालसा चार राहिले आहेत. एकूण बावन परगण्यांचा झाडा जयपुरचा. जयपुरचा राजा जातीनें नाचतो. शिंपी कारभारी आहे. मारवाडचा राजा धार्मिक व बंदोबस्तही त्याचा चांगला आहे. वरकड वर्तमान यथास्थित असे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय, हे विज्ञप्ति."

---

**लेखांक २०.** ता० १५ आक्टोबर इ. स. १७८०.
**श्रीगजानन.** मि० आश्विन व॥ २ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १६ सवालपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. काल छ १५ मिनहूस, मातुश्री अहिल्याबाईस विचारून मी राजश्री बाळाराव गोविंद यांचे भेटीस गेलों होतों. भेट झाली. त्यांनींही श्रीमंताचें व आपले कुशलतेचें वर्तमान व फौजफांट्याचें वगैरे वर्तमान विचारिलें, तें सांगितलें. मीं त्यांस विचारिलें जे, आपणांस येथें दिपवाळी होईल कीं काय? त्यास मशारनिल्हे बोलले कीं, इतके दिवस लागणार नाहींत. आह्मीं एक पत्रावर आणून ठेविली आहे. राजश्री पाटीलबावांकडे पत्रें देऊन कृष्णाजी आंबादास कारकून पाठविले आहेत. त्याचें तेथून उत्तर आलें ह्मणजे मातुश्रीपुढें येऊन, आह्मी निरोप घेऊन जाऊं. मी बोललों कीं, आपण यश घेऊनच जातील. ते बोलले जे, यश घेऊन जायाचीच उमेद होती; परंतु येथील व इंदुराकडील उभय पक्षींही ओढक कारभार फार. यासी हार कोणीं यावें? जितकी पाटीलबावांची आज्ञा येईल तितका जाबसाल करावा. अधिकोत्तर खोल पाण्यांत शिरायाचा आमचा सांप्रदाय नाहीं. इतकें श्रीमंतांसही विदित आहे. असें बोलले. मी तेथून उठून दरबारास बाईकडे रात्रौ गेलों. सहा घटका रात्र झाली होती. तों उज्जनीहून बाळारायांस पाटीलबावांचें पत्र सातां प्रहरांत आलें. तें त्यांनीं वाचून तें पत्रच

बाईकडे बाळारायांनीं पाठविलें. तें बाईनीं एकांतीं वाचून पाहून, मजलाही एकांतीं तेथें बोलावून, तें पत्र मजजवळ दिलें. मनांतच वाचून पहा ह्मणाली. मीं पत्र वाचिलें. त्यांत मजकूर होता जे, चिंतो विठ्ठल पळून गेले होते, ते उज्जनींतच एका ब्राह्मणाचे घरीं लपून राहिले होते. गांवांत शोध करितां छ १४ रोजीं सांपडले. आतां त्यांस अलंकारभूषणें घालून, त्यांस व आणीख तिघांस ऐसें पुण्यास लवकरीच रवाना करितों. तुह्मींही तेथील जाबसाल उरकून मातुश्रीचे मर्जीप्रमाणें उरकून लवकर येणें. ह्मणून त्या पत्रांत मजकूर होता. बाई-ही बोलली जे, एवढा मातबर माणूस, पळायाचें नवतें. आतां गोष्ट भारी पडेल. असें बाई बोलली. वरकड इंदुरच्या व यांच्या भानगडीचा मजकूर किंचित दिसतो. येथें बाईचें बोलणें तरटणीचें फार आहे. तेथें नारो गणेश आहेत. त्यांचीही ऐट फार आहे. पहावें, काय इत्यर्थ ठरेल तो. कळल्याप्रमाणें सेवेसी लिहीन. बाईही हमेश मजशीं बोलतात जे, निश्चय ठरेल तेव्हां तुह्मांस सांगूं; त्याप्रमाणें तुह्मी लिहून पाठवा. इतका जाबसाल बोलत असतात. हरएक गोष्ट तार्यी बसेल असा रंग दिसत नाहीं. दुरापास्त मसलत दिसती. वरकड वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलें आहे. सेवकाची खर्चाची विपत्ती फार आहे. लटकें लिहीत असेन तर स्वामींच्या पायांची शपथ. अडीचशें रुपये लोकांचें देणें झालें आहे. पुढें खर्चास पाहिजे. धनी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति."

---

## लेखांक २१. ता. १८ आक्टोबर इ. स. १७८०.

पैवस्ती छ २९ सवाल. **श्रीगजानन.** मि० आश्विन वद्य ५ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १९ सवालपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं काशीद-जोडीबरोबर व डांकेबरोबर लिहिलें आहे. सेवेसीं पावलें असेल. प्रस्तुत येथील वर्तमानः— राजश्री पाटीलबावांकडून राजश्री बाळाराव येथें मध्यस्थीस आले आहेत. त्यास बाईशीं बाळाराव दोन तीन वेळां एकांतीं बोलले. त्या बोल-ण्यांत तुकोजीबावांचे व नारो गणेश यांचे भक्तिपुरस्सर भाव बोलूं लागले. त्यावरून बाईस संशय पडला. त्यास बाईनीं एकांतीं पाटीलबावांस पत्र पाठविलें. त्या पत्रावरून पाटीलबावांनीं तेथून कृष्णाजी आंबाजी कारकून बाईकडेस पाठविला. ते येथें येऊन बाईशीं एकांतीं बोलले, व बाळारायांबरोबरही बाईकडे येऊन बहुमानी बोलणें बोलले. एकांतींही बोलून गेले. ते कुपिया बाळारायांसही कळलें.

हें वर्तमान इंदुरींही कोणे द्वारें कळलें. हें वर्तमान पेशजीं एक दोन विनंतीपत्रीं लिहिलें आहे. त्यास, इंदुरीं उभयतांस संशय पडला कीं, बाईचें व पाटीलबावांचें अंतरंग एक आहे. त्यावरून बाईची व त्यांची चित्तशुद्धी होण्यांत उभयपक्षीं संशय आले. त्यावरून बाईचें व त्यांचें चित्तशुद्ध होऊन भेटी होतील, असा रंग दिसत नाहीं. इंदुरीहून तुकोजी होळकर व नारो गणेश यांनीं आपल्याकडील कारकून यमाजी मोरेश्वर पाटीलबावांकडेस पाठविले. त्यांजबरोबर पत्रेंही बहुत ममतापुरस्कर लिहिलीं. तीं पत्रें मशारनिल्हेंनीं एकांतीं पाटीलबावांस निवेदन केलीं; व मुखोक्तीं कितीक जाबसाल यांनीं सांगून पाठविले, त्याप्रमाणें ते कारकून बोलला. त्यावरून पाटीलबावांनीं आपला कारकून बेलभंडार देऊन इंदुरास यांच्या कारकुनाबरोबर पाठविला. बहुत समाधान या उभयतांचें केलें. उभयपक्षीं बेलभंडार, आणशपथ झाली कीं, आह्मांवांचून तुह्मीं कोठें जाऊं नये. तुह्मांवांचून आह्मीं कोठें जाऊं नये. ह्याप्रमाणें खचित झालें. पाटीलबावांकडील कारकून बोलला जे, पाटीलबावांनीं आणिक कांहीं बोलावयास सांगितलें आहे काय, कीं पुण्याहून श्रीमंतांनीं नारो शिवदेव पाठविले आहेत. हे नित्य ह्मणतात कीं, फौजेसुद्धां पुण्यास चला. त्यास आपण चार पांच वर्षें देशीं होतों. तेव्हां काय अधिकोत्तर त्यांनीं केलें? आतां आह्मी जाऊन काय करावयाचें आहे? हिकडे हिंदुस्थान हातचें गेलें. त्यास देशीं आपलें जायाचें कारण कांहीं नाहीं. परिच्छिन्न कारभाऱ्यांस सांगून पाठवावें कीं, हिंदुस्थानांत जायाची निकड फार आहे. यास्तव नर्मदेअलीकडे हिंदुस्थानचा बंदोबस्त आह्मी उभयतां करितों; आणि नर्मदेपलीकडे दक्षणेचा बंदोबस्त तुह्मी करा. नाहीं तर इकडील बंदोबस्त तुह्मी करा, तिकडील दक्षणेचा बंदोबस्तही आह्मी करतों. श्रीमंत रावसाहेबांसही सांभाळतों. कोणतें पुरवेल तें करा. फौज पाठवा ह्मणाल तर किती फौज पाहिजे ते पाठवूं. फौजेस खर्चास तुह्मी द्या. याप्रमाणें नारो शिवदेवाशीं आह्मी बोलून पुण्याकडे रवाना करितों. तुह्मीही त्यांसीं असेंच बोला. येविषयीं तुमचें मानस काय तें पक्केपणें लिहून पाठवा. इंदुरींहून उभयतांनीं इमानपुरस्कर सांगून पाठविलें जे, तुह्मी आह्मी पूर्वीपासून एकदील आहों. तुह्मीं जे मसलत केली, ते आह्मांस आवश्यक; आह्मीं केलें तें तुह्मांस अगत्य. नारो शिवदेवासीं आह्मीही असेंच बोलूं. याप्रमाणें उभयतां सरदारांचीं बोलणीं झालीं. हे बातमी हरकूबाईकडे आली. त्यांनीं एकांतीं हें वर्तमान मजला सांगितलें. दुसरेंही वर्तमान हरकूबाईनेंच सांगितलें जे, दिल्लीहून पातशहाचीं पत्रें शिंदे होळकरांस व अहिल्याबाईस ऐशीं पत्रें आलीं. त्यास अहिल्याबाईकडे काल छ १७ सवालीं पातशहाचें पत्र आलें. तें तृतीय प्रहरीं

बाई व हरकूबाई ह्या दोघी व तिसरा मुनशी ऐशीं एकांतीं बसून, पारशी पत्रें मुनशीनें उभयतां बायांस वाचून, अर्थ करून सांगितला. 'पातशाहानें बाईस लिहिलें होतें जे, 'कलकत्त्यास विलायतेहून नवा सुभा आला आहे. त्यास कदीम जो सुभेदार आहे, त्यासीं व नव्या सुभेदारासीं अद्याप ठीक नाहीं. उभयतांचींही पत्रें विलायतेस गेलीं आहेत. परंतु नव्या सुभ्यानें ग्वालेरीचे बंदोबस्तास चार पलटणें तयार केलीं आहेत, व आह्मांस सांगून पाठविलें आहे कीं, दिल्लीमध्यें आह्मी कोठी करतों; तेथें स्थळ द्या.' याप्रमाणें त्याचें पत्र आलें. 'ज्यांपक्षीं दिल्लींत इंग्रजांची कोठी झाली, तेव्हां आमचा हुकूम काय राहिला? जागां जागां बंदोबस्त करतील. तुह्मांसही बरें नाहीं. यास्तव तुमची व शिंद्यांची फौजसुद्धां सरदार इकडे पाठवा. आमचीही फौज आहे. राजेरजवाडे सारे एकत्र होऊन इंग्रेजांचें पारपत्य करूं.' याप्रमाणें पत्र दिल्लीहून आलें ह्मणोन दोन्ही वर्तमानें ते बाईनें सांगितलीं. ते सेवेसी लिहिलीं असेत.

खानदेशांतील वर्तमानः—सुलतानपुरांतून चंदरराव पवार पळून गेला, तेव्हां पाऊणशें घोडे यांस सांपडले व दोन तोफा सांपडल्या. एक तोफ त्यांनीं विहिरींत टाकिली. याप्रमाणें झालें. ते निघून गेल्यावर होळकराची फौज किल्ल्यांत गेली. ते समयीं शहर व किल्ल्यांतील रयत सारी यांच्या लोकांनीं लुटली. वस्त्राहरण केली. सुलतानपुरचा बंदोबस्त करून सारी होळकराची फौज राजश्री गणेशपंत बेहेरे यांजकडेस जाणार. याआधीं गणेशपंतांनीं तीन चार वेळां नंदुरबारेस जाऊन केसो कृष्ण दातार यांशीं लढाया चांगल्या केल्या. पुण्याहून कांहीं फौज आली, ते छ ७ मिनहूस गणेशपंतांस सामील झाले. मागाहूनही विसाजी आपाजी कांहीं फौज व तोफा व सरंजाम घेऊन गणेशपंतांकडे येतात ह्मणून वर्तमान येथें आलें. गुलजारखानाचें वर्तमानः—श्रीमंत दादासाहेबांकडे गेले होते. श्रीमंतांनीं बहुमान करून, खानदेशच्या सनदा देऊन बिदा केले आहेत. इंग्रजांस दादासाहेबांनीं सांगितलें जे, गुलजारखानाबरोबर दोन पलटणें तुह्मीं आपलीं देणें. त्यास इंग्रजांनीं उत्तर केलें जे, गाडर मुंबईस गेला आहे; तो आल्याशिवाय देतां येत नाहींत. मग गुलजारखानानें आपणच दोन तीनशें फौज व पांच सातशें गाडदी ठेऊन, व दादासाहेबांजवळ दोन पलटणें होतीं तीं केसोपंताबरोबर आलीं आहेत. बाकी शेंदोनशें लोक तेथें होते, त्यांस खायास मिळेना; यास्तव गुलजारखानाबरोबर दिले आहेत. सुरतेपासून तीन कोसांवर अलीकडे गुलजारखान उतरला आहे. खानदेशांत येणार. चिंतो विठ्ठल यांजकडील वर्तमान पेशजीं लिहिलेंच आहे. नवीन वर्तमान आलें जे, त्यांची बायको व

लेक विष खाऊन मेली, व दोघे कारकुनांस मार दिला, ते मेले, व पाटीलबावांनीं आपले पांच सहा बारगीर यांचे चौकीस होते ते मारले, व एक कारकूनही मारिला. याप्रमाणें येथें वर्तमान आलें. चिंतो विठ्ठल यांचे पायीं बेड्या आहेत. अन्न खात नाहींत. याप्रमाणें वर्तमान येथें आलें. तें देखील ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. बाळारायही आज रात्रीं बाईकडे आले होते. काय बोलणें झालें, तें मागाहून शोध करून लिहून पाठवितों. हरकूबाई ही बहुत मायाममतेंत आहेत. कितीक बारीक मोठें वर्तमान ममतापुरस्सर कळवीत असतात. यांजवर कृपा करणार धनी समर्थ. सेवकाची खर्चाची फार विपत्ति आहे. वारंवार लिहितों ह्मणून स्वामी रागें भरतील. परंतु येथें नाइलाज ह्मणून सेवेसी लिहितों. स्वामी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक २२.** ता० २८ आक्टोबर इ. स. १७८०.

पै॥ छ ५ जिल्काद इहिदे समानीन. **श्रीगजानन.** मि० कार्तिक शुद्ध १ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ २९ सवालपरीयंत मु॥ महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून डाकेबरोबर छ १९ सवालीं सेवेसी पाठविलें आहे. सांप्रत श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच आहेत. दहा हजार रुपये खर्चास इंग्रज देत असतात. तेवढे खर्च करून मात्र आहेत. वरकड सुरतेहून कोणीकडे स्वारीस निघावें, तर गाडर ह्मणून इंग्रज मुंबईस गेला आहे. तो आलीयावर स्वारीची तरतूद काय होणें ते होईल, असें वर्तमान आहे. कलकत्त्यास नवा सुभा आला आहे. जुन्या सुभ्याची त्याची नाचक्की झाली होती. परंतु विलायतेहून पातशाहाचीं पत्रें आलीं. नवा सुभाच कायम झाला. नव्या सुभ्याकडून दोन कंपू रवाना झाले. कलकत्त्याहून पाचां कोसांवर बाहेर उतरले आहेत. सुरतेकडे येणार असें बाजारी वर्तमान आहे.

खानदेशचें वर्तमान तर होळकरांची फौज सुलतानपुरचा बंदोबस्त करून राजश्री गणेशपंत बेहेरे यांजकडे गेले, परंतु छ २३ सवालीं राजश्री संताजी होळकर शेंदव्यांत आहेत. त्यांचें पत्र येथें बाईस आलें. त्यांत वर्तमान होतें जे, केसो कृष्ण दातार यांणीं नंदुरबारेंत एक पलटण ठेऊन, तेथील बंदोबस्त करून, एक पलटण समागमें घेऊन रनाळ्यास चालून गेला. तेथें गणेशपंताशीं व यासीं लढाई मातबर झाली. गणेशपंताचा पुतण्या कीं भाचा कोण होता, त्यास तोफेचा गोळा

लागून ठार झाला. गणेशपंत रनाळें सोडून निघाले. यांणीं एक पुरा रनाळ्याचा जाळला. रनाळ्यांत केसो कृष्ण आहेत. आतां होळकरांचीं फौज पांच सातशें गणेशपंताकडे सामील होण्यास गेली. याप्रमाणें शेंदव्याहून पत्र आलें होतें. आणीकही त्यांणीं बातमीस पाठविले आहेत. काय वर्तमान येईल तें लिहून पाठवूं ह्मणून त्यांणीं लिहिलें आहे.

राजश्री बाळाराव गोविंद भाद्रपद शुद्ध द्वादशीस येथें आले होते, ते आश्विन वद्य द्वादशीस बाईचा निरोप घेऊन, त्रयोदशीस स्वार होऊन येथून गेले. ते कार्तिक शुद्ध द्वितीयेस मुहूर्तेंकरून उज्जनीस दाखल होणार, असे येथें मुहूर्त विचारून गेले. द्वादशीचे दिवशीं बाईनीं मेजवानीस भोजनास वाड्यांत बोलाविलें होतें. भोजनें करून, प्रहर दिवस मागील होता तेव्हांपासून मुत्सद्यांसुद्धां बाई बसून, बाळारायासीं एकांतीं बोलणीं झालीं. तुकोजीबावाकडील कांहीं हिशेब यादीबुदी बाळारायास दाखवून, तेच हिशेबाचे कागद त्यांजबरोबर पाटीलबावांकडेस पाठविले. दोन घटका रात्रपरियंत बाळाराव वाड्यांत बोलत बसले होते. तदोत्तर बाईनीं बाळारायांस वस्त्रें व त्यांची मंडळी पांच सात जणांस वस्त्रें दिल्हीं. चौ घटका रात्रीं निरोप घेऊन गेले.

उभयतां सरदार आपलाले जागां आहेत. अद्याप फौजांची चडचड कांहीं येथें नाहीं. पैसा कोणास देत नाहींत. फौज जमा कोणाजवळ नाहीं. खानदेशांत दोन पलटणें मात्र केसो कृष्णांबरोबर आहेत. त्यांणीं रनाळ्यांतून गणेशपंतास उधळून दिल्हें. नंदुरबारेहून एकच पलटण रनाळ्यास गेलें होतें. प्रस्तुत गणेशपंत माळपुरावर आहेत. होळकराची फौज व गणेशपंत ऐसे एके जागीं झाले. बाजारी आवई आहे कीं, चंदरराव पवार यांणीं फिरून सुलतानपूर घेतलें. लिहिलें कोठें आलें नाहीं. इंग्रजांनीं मातबर सरंजाम केला आहे. गाडर सुरतेस आला ह्मणजे बाहेर निघावें अशी वदंता आहे. पाहावें. कोंकणांतील वगैरे देशचें वर्तमान नाना प्रकारें येथें बोलतात. बाईनींही दोन चार वेळां विचारलें जे, श्रीमंत कारभारी कांहीं फौज जमा करितात कीं नाहीं? मीं उत्तर केलें जे, फौज बनीबनाई आहे. नवी ठेवणें नलगे. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकास खर्चास नाहीं. कर्ज तीनशें रुपये झालें. स्वामींनीं खर्चास पाठविलें, त्यास नऊ महिने झाले. धनी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

**लेखांक २३.** ता० २८ आक्टोबर इ० स० १७८०.
**श्रीगजानन.** मि० कार्तिक शुद्ध १ शके १७०२.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब यांसः—विज्ञापना. राजश्री बाळाराव गोविंद यांसीं व मातुश्री अहिल्याबाईशीं बोलणीं झालीं. ते समयीं बाई व बाळाराव व आबाजी नाईक वानवळे, बाईकडील मंडळी राजश्री कृष्णाजी मुरार व मुकुंदराव दिवाण व वासुदेव चिमणाजी व जयराम रावजी व आबाजी रणसोड इतके बसले होते. बाईनीं फडणीसांस सांगितलें जे, चौ पांचां वर्षांचा हिशेब बाळारावांस दाखवा. सरदार दक्षणेस होते. चौ साला जमा नी खर्च जो जाला, तो दाखवा. ह्मणून बाईनीं सांगितलें. त्यास फडणीसांनीं बाळारावांस हिशेब दाखविला. समजावून दिल्हा. बाई बोलली जे, 'हा वेळपर्यंत आह्मीं हिशेब तुह्मांस नाहीं दाखविले. सुभेदारांचे वेळेस तुमचे हिशेब आह्मांकडे आले. कितीकदां आह्मीं पाहिले आहेत. परंतु सांप्रत तुकोजीबावा विजयध्वज दौलतकर्ते पैदा जाले, त्या योगेंकरून तरी हिशेबाचे महजब घरोघर देणें आह्मांस प्राप्त झालें! बरें, भगवत्-इच्छेस उपाय नाहीं! परंतु बाळाराव, तुह्मांस कळलें असूं द्या, अद्याप तुकोजीबावांनींही कोठें पराक्रम करून अधिकोत्तर मेळविलें नाहीं. सुभेदाराचेंच मेळविलें खातात, आणि महादजीबावांनींही अधिकोत्तर कांहीं मेळविलें नाहीं. राणोजी शिंद्याच्याच दौलतीवर उड्या मारितात. जयाजी शिंदे मेल्यावर, दत्ताजी शिंद्यानें कशी लढाई केली; तदोत्तरही कसे पराक्रम केले; तसे तुह्मीं अगर तुकोजीबावांनीं कोठें काय पराक्रम केले आहेत? आणि सांप्रत धनी लहान, मुत्सद्यांचा कारभार; राज्यांत मातबर सरदार तुह्मीच दोघे. तेही समयानरूप समजूनच तुह्मांशीं वर्ततात. कैलासवासी श्रीमंत रावसाहेब होते, ते वेळेस त्यांचे दाबही तसेच होते. तुमच्या वर्तणुकीही तशाच होत्या. असो. इतकें बोलावयास कारण हेंच कीं, तुकोजीबावांचें इतके दिवस वांकडें पाऊल पडलें नाहीं. परंतु चार पांच वर्षें उभयतांच देशीं होते, तेथें उभयतांची मसलत जशी जाली असेल, तशीं यांचीं पावलें पडत जातात. असो. काय चिंता आहे? तुमचें मानस असेल कीं, बाईस चहूंकडून उपद्रव जाल्यानें, सारेच बंदोबस्त आपण केल्यावर बाईनीं काय करावयाचें आहे? परंतु तुह्मांसही कळलें असूं द्या, मी सुभेदाराची सून आहें. केवळ तुकोजीबावाच दौलतीचे धनी आणि मी कशांत कांहीं नाहीं, असें समजूं नका. तुकोजीबावा हे माझे हातचे कामास लावलेले आहेत. त्यांणीं निमकहरामीचे फंद आह्मांसीं केल्यास, पुढें सुखरूप दौलत करूं ह्मणतील, तर त्या गोष्टी दुरापास्त आहेत. फार खराब होतील. आजकाल पाटीलबावांचा दम तुकोजीबावा फार

राखितात. आणि पाटीलबावांच्याही चित्तांत फार फंद असेल, तर उभयतांही फौजसुद्धां मजवर चालून यावें. सुभेदारांचे पुण्यप्रतापें येथेंही कोणी बांगड्या लेऊन बसलें नाहीं. श्रीमार्तंड समर्थ आहे. जें ईश्वर घडवील तें खरें!' इतकें बाई बोलल्यावर बाळारावांनींही फार नम्रतेचीं उत्तरें केलीं कीं, उभयतांसही वडील आपण आहेत. जितकीं आपण रागें भरून आज्ञापिलें, त्याचे लेशही पाटीलबावांच्या चित्तांत नाहींत. असें असतां कितीकांनीं कितीक गोष्टी विपर्यास आपणास समजाविले असतील. ते किमपी ध्यानांत न यावे. सुभेदारांचे जागां व राणोजी बावांचे जागां उभयतांसही आपण वडील आहेत. असें फार बाळाराव बाईशीं ममतायुक्त बोलले. बाई बाळारायाशीं बोलली जे, 'बहुत ममतापुरस्कर बोलतां. परंतु दोन्ही ज्ञानें तुह्मांस पाठ आहेत. वरते तोंडानें बोलत जावें, पायानें पाय तुडवीत जावें. हातपाय जोडून आदब करीत असावी, हे तालीम तुह्मांजवळून शिकणारांनीं शिकून जावी. असो. तुकोजीबावांनीं इतकें जें केलें आहे, तें तुमच्या मुखांतरें पुण्यांतही श्रीमंतांजवळ बंदोबस्त केलाच असेल. येविशीं पुण्याहून धन्याचेंच पत्र आह्मांस आणा कीं, सुभेदाराचे तुह्मी कांहीं नव्हां. त्यांचे दौलतीचे वारिसदारी तुह्मांस पोंहचत नाहीं. सर्वविशीं मुगुटमणी तुकोजीबावा आहेत. तुह्मीं उठून काशीयात्रेस जाणें. असें धन्याचें व कारभाऱ्याचें पत्र, शंभर स्वार, एक कारकून येऊन, त्यांनीं आह्मांस उठून जा ह्मटलें ह्मणजे आह्मी तुमचे आज्ञेचा उजूर करणार नाहीं. त्यांचीच आज्ञा आह्मांस शिरसावंद्य आहे.' बाळाराव बोलले जे, श्रीमंत धनी, ते आमचे ओंजळीनें पाणी पितात कीं काय? बाई बोलली जे, तेही काय करतील? आजचा काळ असाच आहे. अशीं फार बोलणीं झालीं. मग बाळारावही बाईच्या संतोषानरूप बोलून बाईस संतोष करून निरोप घेतला. निरोपसमयीं बाईनीं वस्त्रें पैठणी तिवट व शालजोडी व जामेवार व किनखाप अशीं चार वस्त्रें बाळारायांस व आबाजी नाईकांसही याप्रमाणेंच व दहापांच गृहस्थांस पैठणी दोन दोन वस्त्रें दिल्हीं. बाळारायांस एक सोन्याचें कडें देऊन विदा केलें. दुसरे दिवशीं वद्य त्रयोदशीचे दिवशीं बाळारायांच्या भेटीस मीही गेलों. त्यांसीं एकांतीं बोललों जे, तुह्मी येथें आल्याचें वर्तमान मीं श्रीमंतांस लिहून विनंतीपत्रें पाठविलीं आहेत. प्रस्तुत मातुश्रीचा निरोप घेऊन आपण उज्जनीस जातात. आपण येथून काय करून जातात? मी श्रीमंतांस काय लिहूं? येविशीं जे आज्ञा करतील, त्याप्रमाणें सरकारांत लिहून पाठवीन. त्यास बाळाराव एकांतीं बसून चार गोष्टी बोलले आहेत; व तदोत्तर ते गेलीयावर दुसरे दिवशीं मातुश्री अहिल्याबाईशींही एकांतीं विनंती केली जे, श्रीमंतांनीं तेथें चिरंजिवाकडून

मजला पत्र लिहिविलें होतें, तें पत्रच आपणांस वाचून दाखविलें. त्यास आपण बोलली जे, बाळाराव आले आहेत. यांचें आमचें काय भाषण होतें हें मनन करून, श्रीमंतांस उत्तर काय ल्याहावें तें तुह्मांशीं बोलूं.'अशी आज्ञा केली होती. त्यास बाळाराव निरोप घेऊन परवां गेले. आतां मजला श्रीमंतांस त्या पत्राचें उत्तर लिहिलें पाहिजे. तें काय लिहूं ? व बाळारायाचा व आपला बोलण्यांत काय इत्यर्थ ठरला हेंही आपणास विचारून श्रीमंतांस विनंतीपत्रें लिहिलीं पाहिजेत. येविशीं काय आज्ञा ? त्यास बाई बोलली जे, 'हे प्रतिपदा द्वितीया दिपवाळीची. हे दोन तीन दिवस पांच सात सहस्र ब्राह्मणभोजन, अन्नकूट होयाचें आहे. बोलण्याची गांठ पडणार नाहीं. त्रितीयेस तुह्मी आह्मी एकीकडे बसून दोन घटका बोलूं.' मीं उत्तर केलें जे, मजला चार गोष्टी विचारून घेतल्या पाहिजेत. बाई बोलली जे, मजलाही चार गोष्टी तुह्मांसीं बोलल्या पाहिजेत. ते बोलून मग श्रीमंतांस पत्रें लिहिणें तें ल्याहा. याप्रमाणें आज भाषण जालें. बाईचें बोलणें काय होईल तें, व बाळारायाचें बोलणें जालें तें, मागाहून विनंतिपत्रीं लिहून, कासीदजोडीबरोबर सेवेसी रवाना करीन. जालें वर्तमान तें सेवेसी वरचेवर श्रुत व्हावें. चिंतो विठ्ठल वगैरे चौघेजण पाटीलबावांनीं रवाना केले. काल रेवा उतरून पार जाले. पोंहचतील. हे विज्ञप्ती."

**लेखांक २४.** ता. ३० आक्टोबर इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि. कार्तिक शु॥ ३ शके १७०२.

"विज्ञापना काल कार्तिक शुद्ध द्वितीया रविवारीं संध्याकाळीं मातुश्री अहिल्याबाई एकांतीं बसली. मजलाही बोलाविलें. तिसरें कोणी नव्हतें. मजला ह्मणाली जे, बोला काय बोलतां तें. मीं उत्तर केलें जे, राजश्री पाटीलबावांकडून राजश्री बाळाराव गोविंद येथें आले. दीड महिना येथें होते. दहा पांच वेळा आपला एकांत झाला. ते वेळेस वरचेवर मी विनंति करीत गेलों जे, बाळाराव येथें आल्याचें वर्तमान श्रीमंतांस मी काय लिहूं ? तेव्हां आपण आज्ञा करीतच गेली जे, अद्याप त्यांचा आमचा जाबसाल कांहीं ठरला नाहीं. इत्यर्थ ठरेल तेव्हां तुह्मांस काय सांगणें तें सांगूं. त्याप्रमाणें तुह्मी श्रीमंतांस लिहून पाठवा. त्यास बाळाराव आज्ञा घेऊन आपल्या यजमानाकडे गेले, ते काय इत्यर्थ ठरून गेले ? मी श्रीमंत यजमानांस काय लिहूं, हे आज्ञा करावी. त्यास बाई बोलली जे बाळाराव बोलत गेले जे, 'तुकोजीबाबा व नारो गणेश हे आपल्याशीं वैषम्यभावें

वर्तणूक करितात. त्यास (कांहीं) जालें तरी आपण धनी. घरांत फूट नसावी. त्यांणीं एकनिष्ठतेनें सरळपणें आपणांशीं वर्तावें. पुढें धन्याची चाकरी करावी. सरदारीचा बंदोबस्त व्हावा. त्यांणीं आपले जागां अनेक प्रकारचे विपर्यास चित्तांत आणून एक प्रकारची वर्तणूक आपल्याशीं करावी हें उत्तम नाहीं. यांत जनापवाद व सरदारीची खराबी होती. खावंदांस अनेक प्रकारचे भास भासतात. यास्तव पाटीलबावांचें मानस कीं, तुकोजीबावांनीं व नारो गणेश या उभयतांनीं आपले आज्ञेंत पूर्ववत्प्रमाणें चालून सेवाचाकरी करावी. येविशीं उभयपक्षीं सरळता अंतःकरणपूर्वक करून द्यावी. याअर्थीं मजला सेवेशी पाठविले आहे.' बाई बोलली जे, फार उत्तम आहे. बाळाराव बोलले जे, आपली मर्जी काय असेल ती आज्ञा करावी. बाईनीं उत्तर केलें जे, त्यांणीं तमाम मुलखी बंदोबस्त बाहेरून सारा केला. आपले मार्फतीनें महालोमहाल मामलेदार पाठविले. सारें आकर्षण केलें. हें करावयास कारण काय? आह्मीं जो इतके दिवस कारभार केला, यांत यांची नासधूस काय केली? ते कोणते समविषम समजून मुलखी बंदोबस्त यांणीं केला, तें समजलें पाहिजे. आह्मीं जो कारभार केला, तें परभारा दिवाण-मुत्सद्दी लिहिणार सरकारचेच आहेत. त्यांसीं त्यांनीं समजून न घेतां उगाच दूरारोप ठेवला हें काय? दौलतीचे धनी हेच. आमचें कांहीं नाहीं? तत्रापि चारपांच वर्षे हे दक्षणेस गेले होते. यांस खर्चास वेंचास पाठविलें. जो यांचे महालाचा पैसा आला, तो यांचा यांस पोहचावला. असें असतां लटके दुराव वाढवायाचें कारण काय? हिशेब तयार आहेत. ते तुमचे मध्यस्ताचे विद्यमानें समजून घ्यावे. नाहकचा दोष ठेवून आपले जागां आढ्यता आणली, तर कोणी मनास आणणार नाहीं. काय काय करितात ते करिनात? धनी समर्थ आहेत. आतां तुह्मी आमचे भाऊ. तुह्मी आपण ह्मणून बोलावयास आलां आहां, तर यथास्थित प्रमाणें शोध करून, कोणीकडे शब्द हें मनन करून, कशी सरळता करतां तें करा. वाजवी रीतीनें आह्मांस मान्य आहे. याप्रमाणें बाळरायांशीं बोलून यांस बिदा केलें. काय त्यांचा जाबसाल येईल तो पुढें पाहतच आहों. याप्रमाणें बाळारायांचे खानगीचा मजकूर सांगितला. मीं विनंती केली जे, श्रीमंतांनीं चिरंजीवाकडून मजकूर लिहविला होता, त्याचें उत्तर काय लिहावें? बाई बोलली जे, नारो गणेश यांणीं, पुण्यास श्रीमंतांकडे राजश्री हरिपंत तात्यांच्या विद्यमानें कांहीं सूत्र लाविलें आहे. पाराजीपंतांचा भाऊ इकडूनच गेला आहे. त्यास, तात्यांनीं त्याची विनंती मान्य करून, श्रीमंतांशीं त्यांचे तर्फेचें बोलणें बोलतात. तुमचीं येथून पत्रें जातील, तीं हरिपंत तात्यांचे दृष्टीस पडतील. तेव्हां

तात्यांस त्यांचें अगत्य पडेल. श्रीमंतांस अनेक प्रकारें समजावितील. तेथें तुमचें लिहिणें आणि आमचें सांगणें काय ? मीं उत्तर केलें जे, श्रीमंत राजश्री नानासाहेब व राजश्री तात्या उभयतांचें मानसही आपल्याविशीं द्वैतार्थ नाहीं. हमेश मजला पत्रें ममतापुरस्कर येतात. तुम्हांविशीं दुसरा अर्थ उभयांच्या चित्तांत किमपि येणार नाहीं. त्यास बाई बोलली जे,मजला पुर्तेपणें ठाऊक आहे. तात्या नारो गणेशांकडील बोलणें बोलतात. नानांचा खमीर अद्याप बळकट आहे. त्यांसच पत्र ल्याहा. मीं उत्तर केलें जे, त्यांणीं आज्ञा केल्याप्रमाणें चिरंजीवानें लिहिलें होतें जे, कितीक बारीक मोठे जाबसाल पत्रीं लिहूं नयेत. श्रीमंतांची मर्जी कीं, मातुश्रीकडील कोणी तरी मातबर मनुष्य विश्वासूक यावा. त्यासी तोंडमोडीचे जाबसाल करतां येतील. कागदींपत्रीं लिहितां नये. तर कोणी मातबर जायाविशीं काय आज्ञा ? तेव्हां बाई बोलली जे, आमचे कागदींपत्रींही व एकांतीं बोलणारही पुण्यांत आहे, त्यांस आम्हीं लिहिलेलें आहे. तें ते श्रीमंतांशीं येथें बोलतात. परंतु आमचे बोलणार तों एकांतींच बोलत असतील. परंतु तुमच्या पत्रांचा फयेश न होय, एकांतीं श्रीमंतांजवळच पत्र जाय. तेंच वाचून उत्तर पाठवीत, असें करा. ह्मणून फार सांगितलें आहे.

दुसरेंही यांचें मानस कीं, आपले येथें बोलणार एकांतीं श्रीमंतांशीं बोलतात. त्याशीं श्रीमंत ममतापुरस्कर बोलतात कीं कसे ? हाही अन्वय समजला पाहिजे. त्यास बाई बोलली कीं, आमचींही आजउद्यां पत्रें श्रीमंतांस जातील. तुमचीं पत्रें लवकर जाऊं द्या.

इंदुराकडील वर्तमान बाईनीं सांगितलें जे, त्यांणीं कोणी गृहस्थाबरोबर सांगून पाठविलें जे, आम्हांस आपलें पत्र आलें ह्मणजे आम्ही भेटीस येऊं. भेटीनंतर श्रीमंतांचे चाकरीस जाऊं. त्यास बाई बोलली जे, माझे भेटीस या, असें मी कशास त्यांस पत्र लिहूं ? पत्राचें कारण काय ? मीं आपला खिजमतगार पाठविला आहे. बाळारायाबरोबर त्यास हातीं सांगून पाठविलें आहे जे, तुम्ही आधीं स्वामिकार्यास जा, सरकारचाकरी करून या. मग आमची भेट घ्या. आम्ही तुमचीच आहें. तेव्हां घरही आपलें; काय पाहाणें तें पाहा. मुख्य गोष्ट आधीं स्वामिसेवा होय तें करा, असें सांगून पाठविलें. आणीकही बाई बोलत होती जे, त्यांचें मानस आहे कीं, हजार पांचशें लोकांनशीं येथें भेटीस ह्मणून यावें. मीं साफ सांगून पाठविलें आहे जे, पंचवीस पन्नास परीयंत आले तर वाड्यांत येऊं देऊं. अधिकोत्तर आल्यास येऊं देणार नाहीं, असें सांगून पाठविलें आहे.

## लेखांक ३.

हें पत्र हरिपंत फडके ह्यांच्या मृत्यूसंबंधाचेंच आहे. हें पत्र नागपूर येथील भोंसल्यांच्या दरबारांतील कारभाऱ्यानें पुण्यांतील आपल्या वकिलास लिहिलें आहे. ह्यांत हरिपंतांच्या मृत्यूमुळें नानांस दुःख झालें, त्याचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला आहे. हेंही पत्र महत्त्वाचें आहेः—

**श्री.** ता. ९ जुलई इ. स. १७९४.

"पुरवणी. राजश्री कृष्णराव माधव गोसावी यांस. उपरीः-हरिपंत तात्यांचें शरीर दिवसेंदिवस कृश होऊन, शेवट ज्येष्ठ वद्य सप्तमी रोज गुरुवार देवाज्ञा जाली, म्हणोन लिहिलें तें कळलें. त्यास हें वर्तमान ऐकून बहुत वाईट वाटलें. अनुचित गोष्ट जाली! फारांचे उपयोगी ते मनुष्य होते. येथील तों अभिमान व बाणेकरी[१] त्यांजवर होती. दुसरें, राजश्री बाळाजीपंत नाना यांचे जातीस, सगळा विसावा त्यांचा किती होता, तो शोच[२] व खंती अंतःकरणींची, येथील, तेथील पत्रीं लिहवत नाहीं. ईश्वरसत्ता प्रमाण! ऐशा प्रकारास कोणाचा उपाय नाहीं. हें सर्व एकीकडेस ठेवून, जें प्राप्त तें करावें लागतें. त्यांत उणी गोष्ट दिसल्यास लौकिकाविरुद्ध. याच्या चाली येथून विचारवंतास व सर्वज्ञतेस त्याहाव्या ऐसें नाहीं. जेव्हां तात्यांचें दुखणें बारा चौदा महिने एक सतत लांबलें, चालही दुखण्याची या वेळेस अधिकोत्तर दिसों लागली, तेव्हां पुढील दुरंदेशीचा[३] (विचार?) आज आठा महिन्यांपासून चित्तांत आणून, याविषयींचा लेख तुह्मांस लिहिण्यांत आला होता. तोंच दिवस येत येत, या तऱ्हेचा आला. त्यापक्षीं जें दौलतेस उचित, तें करणारांनीं करावेंच. आपल्या साहाय्यास सोडूं नये. जहाला प्रकार तो पाठीमागें टाकावा. यावेगळी दुसरी उत्तम सलाह[४] नाहीं. आतां मदार राजश्री बाळाजीपंत नाना यांचे जातीवर आहे. त्यांनीं आपले अंगीं सारे अर्थ आणून व पाहून अधिक सतेजता आणावी. त्यांस सर्वस्वें अनुकूल असे. एक वेळ केल्यावांचून दौलतीचे चालीचे कर्तव्यास चांगलें पडावयाचें नाहीं. एवढी कृति करण्यास साहसायोग्य मनुष्य असावें, हें मनांत कदाचित् आणितील. तरी जे गोष्ट उपयोगाची मनीं धरून, खचितपणेचे विचार, एकवाक्यतेचे बाणेकरी, यांसी सर्व प्रकारें अनुसरून, अनुकूलतेचे अर्थास असो. हे पूर्वीं वळकटपणेचे विचार कुल[५] जाणवणीचे[६] लिहिण्यांत आले होते. तेंच हल्लींचें लिहिणें समजोन, त्यांत दुसरे हरगीज[७] होतेंच नाहीं. इकडील खमीर[८] याच दिवसांचे परिक्षेचा समजावा. कोणत्याही प्रकरणीं उणें राजश्री बाळाजीपंत नाना यांनीं दिसों दिलें नाहीं; हेंच श्री-जी घडवील. तेथें एक पक्षींच लिहिणें हेंच न समजावें. 'राजश्री पंतप्रधान दैवशाली पुरुष, व राजश्री

१ बाणेकरी=बाणा, कर्तृत्वशक्ति. २ शोच=दुःख, खेद. ३ दुरंदेशी=दूरवरचा विचार. ४ सलाह=सल्ला, मसलत, उपदेश, विचार. ५ कुल=सर्व. ६ जाणवणी= जाणीव, अंतरंगींचा विचार. ७ हरगीज= कधींही. ८ खमीर= बळकटी, दृढनिश्चय.

बाळाजीपंत नाना कृतकर्मे आहेत. ज्यांत सर्व कामें सतेजतेनें स्वराज्याचीं सिद्धीस जातील, ऐसेंच होईल. त्यांचे साहसाचा अर्थ कोणताही कमी पडावयाचा नाहीं. याची काय फिकीर आहे? हें मुख्य तात्पर्य साऱ्या प्रकर्णींचें चालींचें लिहिलें आहे. व जो आठा महिन्यांचा लेख तुह्मांस लिहिण्यांत आला आहे, तोच बहुधा ऐशा प्रसंगास तुह्मीं नेटाचा दाखविला असेल. अथवा आतां दाखवावा. यांतच बाणेकर! यांचे साहसासाठीं येथील विचार मनापासून कैसा ठेविला, तें प्रत्ययास यावें, व येईल. तेथें दुबारा तपशील वारंवार त्याहावा लागत नाहीं. त्याचा मात्र सारांश शिरोभाग हल्लीं हा लिहिला आहे. हें पत्रच तुह्मीं एकांतीं जाऊन राजश्री बाळाजीपंत नाना यांसी दाखवावें. आणि हेंच बोलण्यांत आणणें कीं, यांस परंतु, पूर्वील, व हल्लींचें लिहिल्या अन्वयीं, येथील खमीराविषयीं बेफिकिर राहावें. अंदेशा करूं नये. खमीरांत उणें पडूं देऊं नये. सेनासाहेबसुभा राजश्री बाळाजीपंत नाना यांजवळच आहे, ऐसें जाणावें. या पत्राचें उत्तर समर्पक सत्वर पाठवावें. या दिवसांत तुह्मीं तेथें राहून राजश्री बाबूराव विश्वनाथ व श्रीधर लक्ष्मण या उभयतांचें येणें होत आहे, हें नीट आहे. भवति न भवति हें बोलणें इतिकर्तव्यतेचें तेथें पडेल. येथूनही लिहिणें घडेल. याची सोय फार चांगली जाली. उभयतांचें निघणें होऊन दरमजलीनें पोहोंचतील. एकांतींचे विचार बोलतील. वरकड ज्या प्रसंगास चें उचित, तें निःसंशय इकडून घडण्यास कसूर व्हावयाचा नाहीं याची खातरजमाच बोलून करावी. जाणिजे. चंद्र ११ माहे जिल्हेज. सदरहू लिहिल्या अर्थाचें मनन करून, राजश्री बाळाजीपंत नाना यांसी बोलण्यांत आणावें. खातरजमा करावी. याचें उत्तर सत्वर यावें. बहुत काय लिहिणें?"



## १८. गंगाबाईचा मृत्यु.

श्रीमंत नारायणराव पेशवे ह्यांची पत्नी व श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांची मातुश्री गंगाबाई ही सासवड येथें ता. १२ जुलई इ. स. १७७७ रोजीं मृत्यु पावली. त्या वेळीं नाना फडणवीस पुण्यास होते. सखाराम बापू सासवडास होते. नानांनीं गंगाबाईच्या मृत्यूचें दुःखद वर्तमान हरिपंत फडके ह्यांस लिहिलें. त्याचें उत्तर त्यांनीं नानांस येणेंप्रमाणें पाठविलें आहेः—

### लेखांक १.

**श्री.**

" विज्ञापना. 'श्रीमंत मातुश्री गंगाबाई यांस सीतज्वर पांच सात दिवस येत होता. आह्मी पुण्यास होतों. बापू सासवडास होते. विशेष दुखणेंही नव्हतें. बापू आदले दिवशीं किल्ल्यावर आले. आषाढ शुद्ध ७ चिट्ठी पुण्यास आली. मध्यें अर्ध घटिका गेली

नाहीं, तों देवाज्ञा झाली. चिठ्ठी आली. इतके लवकर काल होईल असें कळलें नाहीं. फारच वाईट गोष्ट झाली ! याचा विस्तार किती ल्याहावा ? मरतेसमयीं आमचें स्मरण केलें. सावध फार होती. बापू जवळ होते. त्यांस सांगितलें कीं, नानांनीं व तुह्मीं मिळोन, श्रीमंतांचें व दौलतीचें रक्षण करावें. श्रीमंतांचा हात त्यांचे हातांत घातला. रामचंद्र नाईक व शिवाजीपंत सोडावे, व आजीनें जवळ असावें. बाजीपंतांनीं जवळ असावें. आणखी जवळ आहेत, त्यांचें चालवावें. याप्रमाणें सांगून, ईश्वरस्मरणीं समाप्त जाली. श्रीमंत लहान. हीच गोष्ट वाईट जाली. स्मरण फारसें करीत नाहींत.' ह्मणोन लिहिलें वर्तमान कळोन फारच वाईट वाटलें ! होणार. ईश्वरइच्छा चुकत नाहीं !! राजश्री बापू, आपण आहेत. श्रीमंतांचे संरक्षणाची निर्वणूक त्यांनीं उचित केली. मातुश्री बाई कैलासवासी जाली, ही गोष्ट स्वामींचे जातीस फार उणी पडली. परंतु ईश्वरी इच्छेस इलाज नाहीं. मोठें ठासण[1] होतें. करावें काय ? आतां श्रीमंतांचें रक्षण तीच गोष्ट करावी. यांत सर्व आहे. हे विज्ञापना."

### लेखांक २.

गंगाबाईनें आपल्या मरणाचे पूर्वीं जी यादी करून दिली आहे तीही उपलब्ध झाली आहे. ह्या यादीवरून तिच्या आप्तांचीं, विश्वासू नोकरांचीं व आश्रितांचीं नांवें समजून येतात.

"यादी श्रीमंत मातुश्री गंगाबाई यांनीं अंतसमयीं आज्ञा केली ते. सुमा समान सबैन मया व अलफ. चंद्र ६ जमादिलाखर.

| | |
|---|---|
| शिवाजी आपाजी यास सोडून द्यावें. | कलम. १ |
| महिपतराव कृष्ण साठे यांचें पूर्ववत्प्रमाणें चालवावें. | कलम. १ |
| महादेव जोशी व गोपाळ जोशी यांचें चालवावें. | कलम. १ |
| रामचंद्र भट वैद्य यांस गांव एक हजार रुपयांचा द्यावा. | कलम. १ |
| पुरुषोत्तमराव कृष्ण यांचे मुलांचें चालवावें. | कलम. १ |
| सौभाग्यवती गोदूबाई भागवत मावशी यांचें चालवावें. | कलम. १ |
| बाळाजी हरी साठे चुलते यांचें चालवावें. | कलम. १ |
| वाड्यांतील ब्राह्मण चाकरीचे व कुणबिणी व ब्राह्मण बायका आहेत, त्यांचें बाजीपंत सांगतील त्याप्रमाणें चालवावें. | कलम. १ |
| रामचंद्र महादेव परांजपे व दिनकर रामचंद्र यांस सोडून द्यावें व त्यांचें पूर्ववत् चालवावें. | कलम. १ |
| बाजी बल्लाळ परांजपे यांचें चालवावें. | कलम. १ |
| किरकोळ असामी, चिरंजीव रायाजवळ आहेत, त्यांचें चालवावें. | कलम. १ |

१. ठासण=ठासून बसविण्याची काठी असा मूळ अर्थ. येथें ठासण ह्मणजे आधार, आश्रय.

बळवंतराव कृष्ण पटवर्धन यांस एक हजार रुपयांचा गांव द्यावा. कलम. १
बाबूराव शंकर व नारोशंकर जोशी मामा यांचें चालवावें. कलम. १
चिमणाजी निळकंठ वगैरे पांच सातजण आहेत यांचें चालवावें. कलम. १
बाजीपंत सांगतील त्याप्रमाणें चालवावें.
येणेंप्रमाणें चौदा कलमें लिहिलीं असेत."

## १९. आनंदीबाईचीं दोन महत्वाचीं पत्रें.

श्रीमंत रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब ह्यांची पत्नी इतिहासप्रसिद्ध आनंदीबाई ही महा-राजकारस्थानी बायको होती. ह्या बाईचा संपूर्ण पत्रव्यवहार उपलब्ध झाला, तर पेशवाईतील अनेक राजकारणांवर पुष्कळ नवीन प्रकाश पडेल, ह्यांत शंका नाहीं. ह्या बाईचें नांव श्रीमंत नारायणराव पेशव्यांच्या वधामुळें कलंकित झालें आहे. तथापि, ज्या वेळीं रघुनाथराव दादासाहेब हे इंग्रजांस जाऊन मिळाले, त्या वेळीं ह्या राज-कारणी बाईनें, सखाराम बापू व नाना फडणवीस ह्यांस, दोन जोरदार पत्रें गुप्त रीतीनें लिहून, ब्राह्मणी राज्य बुडूं देऊं नका, ह्मणोन उपदेश केला आहे. हीं पत्रें खऱ्या अंतःकरणानें व सद्धेतूनें लिहिलीं असतील, तर त्यावरून आनंदीबाईस पेशव्यांचें राज्य–ब्राह्मणी राज्य–बुडूं देऊं नये, अशी इच्छा होती, असें स्पष्ट होतें. हीं पत्रें ता. २ सप्तंबर इ. स. १७७८ ह्या तारखेचीं ह्मणजे राघोबादादा इंग्रजांस मिळून पहिल्या मराठी युद्धास प्रारंभ होण्याच्या सुमाराचीं आहेत; व तीं खुद्द आनंदीबाईच्या हातचीं आहेत.

पै॥ छ. ३ रमजान तिस्सा. **लेखांक १.**

दाखल ता. २५ सप्तंबर इ. स. १७७८.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यांसीः–प्रति सौ॥ आनंदीबाई आशीर्वाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेषः–वर्ष दीड वर्ष परियंत जाहालें. तुह्मांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. आह्मी होऊन (पत्र) पाठवावें, तर कारणाखेरीज आह्मांस पत्रें पाठवितात, ह्मणोन तुह्मीच हंसाल. हा काळ समजोन पत्रें न पाठविलीं. हल्लीं पत्राचें कारण कीं, तुह्मी तीन पिढ्यांचे दौलतेंतील फडणीस असोन, दौलतेची तों गति झाली ती झाली. हल्लीं यवनाक्रांत[१] ब्राह्मणी दौलत फितुरांनीं होऊं पहाते. तुमच्या चित्तांतील उगीच आटी[२] जात नाहीं. आणि ब्राह्मणी तों बुडत चालली! या दौलतेंत पूर्वी कारभारी झाले, त्यांणी ब्राह्मणी

१ यवनाक्रांत=येथें यवन ह्मणजे इंग्रज असा अर्थ दिसतो. २. आटी=आट=अट=तेढ, वांकुडपणा, संशय.

स्थापली व दौलतेची वृद्धि केली. हा काळ प्रस्तुत श्रीसत्तेनें असा आला ! ! इंग्रेज बुंदेलखंडापर्यंत दोन कंपू आले; आणिकही मागून येणार. यांचा बारीक मोठा विचार जो करणें, तो तुह्मींच करणें. आह्मांस ह्मणाल, तर आपला जीव कोणास नकोसा नाहीं. त्यापक्षीं दोही गोष्टींचा आंदेशा करून, ब्राह्मणपण राहे तें करणें. आह्मी येथें तुमच्या स्वाधीन. पावणे दोन वर्षें जाहालीं. कार्यसिद्धी तुमची कांहींच न जाहाली. नुकसान पांच हजार फौजेचें, सरंजामी गुंतलें, हीं झालीं. विशेष कांहींच न झालें. तुमची फौज गुंतून, आमचा धन्याचे पायासीं वियोग. हें उभयपक्षीं नुकसान आहे. तर आह्मांस मुंबईस जाण्याविषयीं वोढेकेरास पत्र लिहिणें. छ १० माहे साबान. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

पैवस्त चंद्र ३रमजान तिस्सा. **लेखांक २.**

दाखल ता. २५ सप्तंबर इ. स. १७७८. **श्री.**

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखाराम भगवंत यांसी:—

प्रति सौ॥ आनंदीबाई नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेषः—तुह्मांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहिणें. बुंदेलखंडांत इंग्रेज दोन कंपू आले आहेत. हुजूरचीं पत्रें इंग्रेजांस जाऊन इंग्रेज आले. जबरदस्त आहेत. दौलत आपणास घेऊन देतों. आह्मांस कोठीस आपल्याजवळ जागा द्यावा व आमची फौज नेहमीं दहा हजारपर्यंत ठेवीत जावी. ही गोष्ट हुजूर कठीण असें समजलें. परंतु, ज्यापक्षीं रानोमाळ हिंडावें, त्यापक्षीं कबूल करावें, हें समजोन श्रमेंकरून कबूल केलें. हल्लीं इंग्रेज घरांत येऊं पाहतात. तमाम अंमल उठवून आपले अंमल बसवितात. आमचें निमित्य करून, सर्व दौलतेस गिराईक होतील. सुजाद्दौले व महमदअली यांच्या घरांतून प्रथम चाकरीस येतों ह्मणून नम्रतेनें पायरव करून घेतली, आणि आतां उभयतांस पोटापुर्तें देऊन सर्व दौलतीचे धनी जाले आहेत. ह्या सर्व गोष्टी तुह्मांस ठाऊक आहेत. तसेंच आमच्या घरांत होईल. ते जातीनें खबरदार व मनुष्यें जवळ चांगलीं, असें असोन उभयतांच्या गती याप्रमाणें झाल्या. आमचे येथें तो कारभारी जवळ मातबर कोण आहे, व पायरव कोणाची आहे, व मर्जीही कोणत्या तऱ्हेची आहे, ह्या सर्व गोष्टी तुह्मांस ठाऊक असोन, तुह्मी तिही पिढ्यांचे कारभारी, ही ब्राह्मणी दौलत बुडायाजोगी करितां, हें तुह्मांस करणें ठीक दिसत नाहीं. तुह्मांस हुजूरची मर्जी कोण्या तऱ्हेनें समजावल्यानें नीट राहाते हें सर्व, कोण्या तऱ्हेनें विनंती केल्यास बिघडतें, यास तुह्मी माहीत आहां. पहिल्यापासून आह्मांकडील दिमतीचे तुह्मीच कारभारी. मर्जी

१ धनी=राघोबादादा पेशवे. २ वोढेकर=धार संस्थानचे कारभारी. आनंदीबाई ह्या वेळीं धारेच्या किल्ल्यांत कैदेंत होती व राघोबा इंग्रजांस जाऊन मिळाले होते, सबब तिकडे जाण्याबद्दल तिचा हेतु दिसतो. ३ हुजूर=राघोबादादा. ४ पायरव=जाणेंयेणें, प्रवेश. ५ पायरव=येथें बाधा असा अर्थ दिसतो.

राखून सर्व गोष्टी करीत गेलां, आणि हल्लीं या तऱ्हा दिसतात. हें कालचक्र विपरीत आलें. परंतु आह्मांस हाच भरंवसा आहे कीं, तुह्मी कालचक्रासही फिरवाल हें जाणून तुह्मांस पत्र लिहिलें आहे. तरी ब्राह्मणी दौलत नीट राहून; हुजुरचाही संतोष राहून, सर्व गोष्टी बऱ्या होतील त्या कराव्या. न केल्यास जन्मभर चांगलें केलें आणि शेवटीं ह्मातारपणीं इंग्रेजांच्या घरांत ब्राह्मणी दौलत घातली, हें अपेश येई, तो अर्थ न करावा. हुजुर ऐकत नाहीं असें ह्मणाल, तर ज्यापक्षीं तुह्मी प्राण घेतां किंवा पेंचांत आणितां, त्यापक्षीं काय होईल तें हो, परंतु तुमचे हातीं नच लागावें हा निश्चय आहे. तो वाजवी आहे. कोणाचाही पेंच कोणासही सोसत नाहीं. ही गोष्ट सत्य मिथ्या तुह्मींच विचार करून आपल्या चित्तांत समजणें. सारांश हाच कीं, इंग्रेजांच्या हातीं ब्राह्मण[1] न चालतां, दौलतीचा बंदोबस्त होऊन यावा. विशेष लिहावें तरी तुमचे दशांशही आह्मांस समजत नाहीं. परंतु यश अपेश याचे धनी तुह्मी. ही गोष्ट लहान माधवराव पाळण्यांत आहेत त्यांसही समजते. मग दहा वर्षांवर जें मनुष्य असेल त्यास न समजे असा पर्याय नाहीं. आह्मी लिहून विशेष तों नाहीं. तुह्मी मोजीतही नाहीं! परंतु आकार दिसत चालला, यास्तव सूचना लिहिली आहे. तरी जें कर्तव्य असेल तें विचारें करावें. पूर्वीं तुह्मांस दोन पत्रें पाठविलीं होतीं, व नवी भावेजय[2] लाडकी केली, तिचें नांव काय ठेविलें, व दुसरी करावयाची कधीं, हा मजकूर विशेष लिहिला होता. त्याचें उत्तर कांहींच आलें नाहीं. पत्रें पोहोंचलीं कीं नाहीं हें नकळे. तर उत्तर पाठविणें. रवाना चंद्र १० माहे साबान. बहुत काय लिहिणें हे विनंती.”



## २०. गोपिकाबाई पेशवे.

गोपिकाबाई पेशवे ही इतिहासप्रसिद्ध राजकारस्थानी स्त्री, बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांची पत्नी होय. ही श्रीमंत नारायणराव यांचा वध झाल्यानंतर नासिकाजवळ पंचवटीस जाऊन राहिली होती. ती पुनःपुण्यास आली नाहीं. रघुनाथराव पेशव्यांनीं, मरणापूर्वीं, गोदातीरीं येऊन, ह्या बाईचें दर्शन घेण्याबद्दलचें बोलणें चालविलें. त्या वेळीं नाना फडनविसांनीं, गोपिकाबाईची मनधरणी करून तिची परवानगी मिळविण्याकरितां, खुद्द हरिपंत फडके ह्यांस नासिक येथें पाठविलें होतें. राजश्री हरिपंत तात्या ह्यांनीं गोपिकाबाईची भेट घेऊन, मोठ्या मिनतवारीनें तिची परवानगी मिळविली. बाई फार चतुर व मानी होती. हरिपंत तात्यांनीं तिच्या भेटीची व तिच्या संभाषणाची जी संक्षिप्त हकीकत नानांस लिहिली आहे, ती फारच मनोरंजक आहे. तिच्यावरून गोपिकाबाई फार राजकारस्थानी बायको

१ ब्राह्मण=राघोबादादा. २ नाना फडणविसांनी नवे लग्न ह्या सुमारास केलें होतें, त्यास अनुलक्षून ही टीका आहे. नानांस पुष्कळ बायका होत्या, हें प्रसिद्धच आहे.

असून, तिला सर्व राजकारणांचें कसें इत्थंभूत ज्ञान होतें, ह्याची चांगली कल्पना होते. त्याचप्रमाणें, रघुनाथराव पेशव्यांविषयीं तिच्या अंतःकरणांत किती तिरस्कार होता तोही स्पष्ट दिसून येतो. तिचा हेतु श्रीमंत रघुनाथराव दादासाहेबांकडून कृतकर्माचा उच्चार करवून, त्यास प्रायश्चित्त घ्यावयास लावावें, असा दिसतो. त्याप्रमाणें पुढें प्रायश्चित्ताचा विधि घडून आला. त्याबद्दलचीं पत्रें 'ऐतिहासिक चर्चे' मध्यें* छापलींच आहेत.

## लेखांक १.

श्री. ता. ३० जुलई इ. स. १७८३.

"विज्ञापना. मातुश्रीचे बोलण्यांत भाव रास्त्यांजवळ व बालकृष्णपंतांजवळ निघाला होता कीं, 'दाहा वर्षांत, नाना, हरिपंत कोणी आले कीं काय?' तें मजला कळलें होतें. तेव्हां प्रसंगोपात गांठ पडल्यावर विनंती केली कीं मी आलों ते समयीं श्रीमंतांनीं व नानांनीं पायांवर डोकी ठेवावयास सांगितलें होतें, तें ठेवितों. तेव्हां बोलली कीं, 'देवाचे पायांवर डोकी ठेवा!' मीं विनंती केली कीं, 'आपण देवतास्वरूप आहेत. मजला आज्ञा तसें करितों.' त्याजवर गोष्ट काढिली कीं 'दाहा वर्षांत इकडे यावयास उभयतांतून एका जणास अनकूल पडलें नाहीं!' तेव्हां विनंती केली कीं, 'वर्षास यावें, दर्शन घ्यावें, महिना पंधरा दिवस राहावें, हीच इच्छा. परंतु येथील मर्जी ऐकत गेलों कीं, कोणास दर्शन होत नाहीं. तेव्हां उगेच जाऊन वृत्तीस तिरस्कार करावयापेक्षां, पाय ध्यानांत आणून वर्तणूक करावी हेंच दर्शन. नाहींतर येण्यास अति संतोष. आतां मर्जी कळली याउपरी आज्ञेप्रमाणें घडेल.' त्याजवर बोलिली कीं, 'फडणीसपंतांनीं[१] यावें. एक वेळ तुह्मीं यावें. रास्त्यांनीं एका जणानें नेहेमीं राहावें. यांत मजला संतोष राहील. तितकी विश्रांत होईल.' त्याजवर मीं विनंती केली कीं 'याप्रमाणें मर्जी आहे, त्यापक्षीं असेंच घडेल.' दादांचे दर्शनाचा प्रकार इकडून असा, तिकडून तसा. तेव्हां येणें राहिलें. आतां कुंभारीस जाऊन, तेथील बंदोबस्त करून

* 'इतिहाससंग्रह'–अंक २–ऐतिहासिक चर्चा, पृष्ठ ६।७।८ पहा.

१ गोपिकाबाई नानाफडणविसांस 'फडणीसपंत' असें ह्मणत असे. 'नाना' हें नांव नानासाहेब पेशव्यांचे असल्यामुळें त्याचा उच्चार ती करीत नसे. ह्या संबंधानें हरिपंतांनीं लिहिलेलें पुढील पत्र फार मौजेचें आहे:—

"विज्ञापना. मातुश्रीचें दर्शन झाल्यावर फडणीसपंत काय करितात अशी गोष्ट प्रथम निघाली. तेव्हां मनांत आलें कीं, नाना कां ह्मणत नाहीं? 'फडणीसपंत' कां ह्मणतात? तेव्हां येथील माहितगारीनें मनास आणितां, नाना ह्मणत नाहीं, व मजला एक वेळ स्वामींनींही गोष्ट सांगितली होती कीं, 'फडणीसपंत' ह्मणत असतात. 'नाना' ह्मणजे नानासाहेबांचें नांव तें घेत नाहीं, असें सांगितलें. त्यावरून संशय गेला. नाहींतर 'फडणीसपंत' कुन्ह्यानें ह्मणतात असें वाटत होतें. मौजेची गोष्ट मनांत आली, ती लिहिली असे. रा॥ छ २९ साबान हे विज्ञापना."

पुण्यास जावें लागेल. तेव्हां आज्ञा झाली कीं, 'दोन दिवस येथें राहा. मग निरोप देईन.' तेव्हां राहिलों. उतावळी जाण्याची करावी तर भक्त[1] नाहींसी दिसते. याजकरितां राहिलों. दौलतसंबंधीं व कारभार करण्याची रीत येविसीं बोलणें फार वेळ पुष्कळ जालें. त्याचा इतिहास किती लिहूं? सेवेसी आलियानंतर सविस्तर विनंती करीन. येथें मातुश्रीजवळ बोलणें, वेळेस संभाळून, मर्जीस वांकडें न पडे, मर्जी प्रसन्न राही, असेंच भाषण केलें आहे. रवाना छ २९ साबान. हे विज्ञापना."

## लेखांक २.

श्री. ता. ३० जुलई इ. स. १७८३.

"विज्ञापना. दादासंबंधीं मातुश्रीचें बोलणें जालें, तें अलाहिदा लिहिलें आहे. रात्र प्रहर जाल्यावर बोलिली कीं, 'दादांच्या गोष्टी काढूं नका. वरकड कांहीं सांगा.' त्याजवर इस्तकबिलें[2] गंगाबाईचें राजकारण; पुरंदरास जाणें; त्याजवर मामांची लढाई बिघडली; त्याजवर गुजराथप्रांतीं दादाशीं लढाई; मग गुजराथेंतून पुण्यास येणें व तोतयासंबंधीं हकीकत व कर्नाटकांत जाणें; त्याजवर मोरोबादादाचा मनसुबा; सखारामपंताचे फितूर; त्याजवर मोरोबाचा बंदोबस्त करणें; सखारामपंतास कैद करणें; होळकर शिंद्याचें प्रकर्ण; तळेगांवीं इंग्रज आले, दादा हवालीं केले, शिंदे घेऊन गेले; हरी बावाजीचा नाश करून फिरोन इंग्रजांकडे गेले. मग आह्मांस हैदरखानांशीं सख्य करणें, मोंगल, भोसले लगामीं लावून घेणें, प्राप्त. तीन वर्षे जालीं, मसलतीचा शेवट न होय. इंग्रजांनीं होऊन सलुकाचा संदर्भ शिंद्याकडे लाविला. करणें प्राप्त केलें. परंतु दादानें चित्तास येईल तिकडे जावें असा करार. त्यास शिंद्याकडे गेल्यास सरकारांतच परंतु हिसके मारितील, याजकरितां इकडे आणावयाचें केलें. तेव्हां ह्मणों लागली कीं तिघांकडे गेला असता, तर फिरोन तुह्मांस अडचणी घालील, त्या कबूल कराव्या लागतील. केलें हें चांगलें. मीं विनंती केली कीं, सर्व गोष्टी आपले ध्यानांत आहेत. तेथें सांगणें काय? याजकरितां एक वेळ दर्शन होतें ह्मणजे आह्मीं केल्या कर्मास बळकटी होती. उत्तर हेंच कीं, 'याचा संबंध नको.' मधीं बोलिली कीं, 'दादा आमचे बंदीस होता; तेव्हां तो आमचे मुलांबाळास चांगलें पाहात होता कीं, काय? तसें तो येथें मुलें माणसें सुद्धां येणार. त्याजकडे मी वाईट डोळ्यांनींच पाहीन. माझे मनांतील दुःख गेलें नाहीं. संबंध नको!' राजकारणाचे प्रारंभींपासून विनती केली त्याचें उत्तर प्रत्युत्तराचे विस्तार फार आहेत. दर्शनांतीं विनंती करीन. स्वामींचे करण्यावर फार संतोषी आहेत. फितुरीं झाले, त्यांचीं यथायोग्य पारिपत्यें केलीं, यावरून मर्जी बहुत प्रसन्न. इतकें करतीलसा भरोंसा नवता परंतु फडणीस पुरातन एकनिष्ठ, व तुह्मांवर चिरंजीवांनीं कृपा केली, त्याचें सार्थक उभयतांनीं मिळोन केलें. यांत मजला संतोष आहे. ईश्वर तुह्मांस संकट पाडणार नाहीं. इतकें बोलोन मी राहुटीस आलों. रवाना छ २९ साबान, हे विज्ञापना."

१ भक्त=भक्ति, श्रद्धा. २ इस्तकबिल=पासून ( विवक्षित गोष्टीपासून ).

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] दिसेंबर १९०८. [अंक ५ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र धाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

वर दिलेल्या संक्षिप्त हकीकतीवरून तंजावर प्रांतामध्यें मराठ्यांचा प्रवेश शहाजी-राजे भोंसले यांचे कारकीर्दीत झाला, व तंजावरची मूळ जहागीर शहाजीराजे ह्यांनीं मिळविली, हें अगदीं स्पष्ट होतें. शहाजीचे पश्चात् व्यंकोजी राजे ह्यांस बंगळूर व तंजावर ह्या प्रांतांतील जहागीर विजापुरच्या बादशहाकडून पुनः मिळाली, हेंही निश्चित आहे.* शिवाजी महाराजांनीं व्यंकोजी राजास इ. स. १६७७ च्या सुमारास राज्याचा अर्धा वांटा मागण्याबद्दल जें पत्र पाठविलें आहे, त्यांत असा

* 'शिवदिग्विजय' बखरकार लिहितातः— "व्यंकोजीराजे आले. उत्तरक्रिया सांग केली. बादशाहाकडील दुखवटा येऊन, मनसबदारीचीं वस्त्रें व्यंकोजीराजे यांचे नांवें आलीं." (पृ० २०८). ह्याचप्रमाणें दुसऱ्या इतिहासकारांचाही समज आहे.

(१) क्याप्टन क्ल्यून्स ह्यांनींही ह्याच आशयाचा उल्लेख केला आहे:—

"Tanjore formed part of the conquests acheived by Shahajee, the general of the Mahrattas in the service of the king of Bijapur, and the father of Sivajee, the renowned asserter of Hindoo independence. On Shahajee's death in 1664, his second son, Venkojee was confirmed successor in his Jahageers and held them undisturbed until 1678, when Sivajee, having settled his conquests in other quarters, visited this part of the Peninsula, and after a slight unequal contest between the brothers, Venkojee was confirmed in the possession of Tanjore, on condition of paying half the revenue to Sivajee."—*Native States of India by Captain Clunes.*

(२) वेदोजी भास्कराचे वंशज व अरणीचे जहागीरदार श्रीमंत तिरुमलराव साहेब ह्यांनीं अरणीच्या जहागिरीची जी माहिती कृपा करून आह्मांस पाठविली आहे, त्यावरूनही प्रथम शहाजीनें तंजावर प्रांत जिंकून घेतला व तो विजापुरकरांनीं त्याच्या ताब्यांत ठेविला असें दिसून येतें. शहाजी मृत्यु पावला त्या वेळीं त्याजकडे बंगळूर प्रांतांतली जहागीर, अरणी, पोर्टो नोवो आणि तंजावर हे प्रांत होते. (The History of the Jaghire of Arnee).

(३) 'प्रतापवंशावळी' ह्या नांवाची एक शिवाजीची बखर पुण्याचे रेसिडेंट कर्नल क्लोज ह्यांनीं ह्मैसूरचे रेसिडेंट व ह्मैसूरचे राज्याचे इतिहासकार मेजर विल्क्स ह्यांस इ. स. १८०८ मध्यें पाठविली होती. तिचें भाषांतर Lucas Rawdon Burke आणि सुबराव ह्यांनीं केलें आहे. ह्या बखरीमध्यें तंजावर प्रांत शहाजीनें जिंकून घेतला व तो मेल्यानंतर तो व्यंकोजीकडे आला, अशी माहिती दिलेली आहे.

(४) शहाजी इ. स. १६६४ मध्यें मृत्यु पावला, त्या वेळीं त्याजकडे तंजावर प्रांत होता, असा ग्रांटडफनेंही उल्लेख केला आहे:—

"Shahjee possessed at his death, not only the districts originally conferred upon him in jagheer by the Beejapur government, but the fort of Arnee, Porto Novo, and the territory of Tanjore. He continued in obedience to Ali Adil Shah, who seems to have allowed him to retain his new acquisitions unquestioned."—*History of the Mahrattas,* Page 90.

उल्लेख केला आहे कीं, "कैलासवासी साहेबीं कैलासवास केला, त्यास आज तेरा वर्षें जालीं. महाराजांचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुलूख अवघेही राजश्री रघुनाथपंतीं तुह्मांला राज्यावरी बैसवून, संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा वांटा तेरा वर्षें तुह्मींच खादला. आह्मीं जरी तुह्मांजवळी मागावें, तरी बहुत दूर होतां. बऱ्या बोलें तुह्मी देणार नव्हां. ह्मणून तेरा वर्षें सबुरी केली." ह्यावरून शहाजी इ. स. १६६४ मध्यें मृत्यु पावल्यापासून तेरा वर्षें ह्मणजे इ. स. १६७७ पर्यंत, व्यंकोजी त्याच्या जहागिरीचा व संपत्तीचा उपभोग घेत होता, हें अगदीं सिद्ध आहे. आतां प्रश्न एवढाच आहे कीं, तंजावरच्या नायक वंशाचा अस्त केव्हां झाला, व व्यंकोजीनें तंजावर येथें स्वतंत्र गादी केव्हां स्थापिली? तंजावरच्या तामिल इतिहासकारांची माहिती ग्राह्य मानिली, तर इ. स. १६७५ मध्यें व्यंकोजी राजानें तंजावरास येऊन राज्य स्थापिलें, असें मानावें लागतें. परंतु मराठी बखरी व मुसलमानी इतिहास यांतील माहितीचा सूक्ष्म रीतीनें विचार केला, तर मराठ्यांच्या राजसत्तेचा प्रवेश तंजावर प्रांतांत शहाजीचे कारकीर्दीतच झाला, हें स्पष्ट दिसून येतें. तेव्हां एकंदर गोष्टींचा सारासार विचार केला ह्मणजे सयुक्तिक रीतीनें असें मानणें भाग आहे कीं, तंजावर प्रांतावर प्रथम शहाजीनें आपला अंमल बसविला, व विजापुरच्या बादशाहानें तो प्रांत त्याजकडे जहागीर करून दिला. तथापि, शहाजीचे कारकीर्दींत तंजावरचा नायक राजा विजयराघव हा सत्ताहीन व परतंत्र स्थितींत तंजावर येथें कायम होता. पुढें त्यावर त्रिचनापल्लीच्या नायक राजानें स्वारी करून त्याचा नाश केला व तंजावर हस्तगत केलें. त्या वेळीं व्यंकोजीनें त्या नायक राजावर स्वारी केली व त्याचें पारिपत्य करून तंजावर येथें आपला अंमल पूर्णपणें संस्थापित केला. ही गोष्ट इ. स. १६७५ मध्यें घडून आली. ह्याच समयीं व्यंकोजीनें तंजावरच्या नामधारी नायक राजास अजीबात नाहींसें करून, तंजावर येथील प्राचीन चोलमंडलाधिपतीचें सिंहासन हस्तगत केलें व त्यावर महाराष्ट्र राजसत्तेची प्राणप्रतिष्ठा केली, अशी तामिल लेखकांची कल्पना आहे.



# भाग ४ था.

## व्यंकोजी राजाची कारकीर्द.

(इ. स. १६७५-१६८४)

शहाजी राजा इ. स. १६६४ मध्यें मृत्यु पावल्यानंतर तंजावरची जहागीर त्याचा पुत्र व्यंकोजी ह्याच्या ताब्यांत आली, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. व्यंकोजीनें तंजावरची जहागीर स्वतंत्रपणानें केव्हां संस्थापित केली, हा मुख्य वादग्रस्त प्रश्न आहे. त्याचें संक्षिप्त विवेचन मागील भागांत केलेंच आहे. मराठी बखरकारांच्या ह्मणण्याप्रमाणें पाहिलें, ह्मणजे शहाजीच्या कारकीर्दीपासून तंजावर प्रांतावर मराठ्यांचें स्वामित्व असून, इ. स. १६६४ पासून तो प्रांत व्यंकोजीच्या ताब्यांत होता, असें मानावें लागतें. तामिल लेखकांचें ह्मणणें लक्षांत घेतलें, तर व्यंकोजीनें इ. स. १६७४ मध्यें तंजावर प्रांतावर स्वारी करून, तेथें इ. स. १६७५ मध्यें मराठ्यांची स्वतंत्र गादी संस्थापित केली, असें मानावें लागतें. दोन्ही बाजूंची माहिती नीट रीतीनें मनन करून तोलून पाहिली ह्मणजे, दोन्ही लेखकांचें ह्मणणें कांहीं अंशीं ग्राह्य मानून, तंजावरची जहागीर इ. स. १६६४ मध्यें शहाजीच्या पश्चात् व्यंकोजीस मिळाली; परंतु तेथें व्यंकोजीनें इ. स. १६७५ मध्यें स्वतंत्रपणें राज्य स्थापन केलें, असें ठरविणें अधिक युक्तिवादाचें होईल, असें आह्मांस वाटतें. इ. स. १६६४ पासून १६७५ पर्यंतच्या व्यंकोजीच्या हालचालींची साधार माहिती कोठेंही उपलब्ध नसल्यामुळें त्याबद्दल विशेष चर्चा करण्यांत अर्थ नाहीं.*

* ह्मैसूरचे इतिहासकार मेजर विल्क्स ह्यांस जी मराठ्यांच्या इतिहासाची सामुग्री मिळाली होती, तींत तंजावर प्रांत शहाजीनें जिंकून घेतला अशीच माहिती होती. परंतु 'म्याकेंझी कलेक्शन' मधील तामिल इतिहासांच्या योगानें त्यांच्या मनाचा गोंधळ उडून, त्यांनीं असें ठरविलें कीं, शहाजीनें तंजावर प्रांत जिंकून घेतला व तो व्यंकोजीच्या ताब्यांत दिला. परंतु व्यंकोजीनें तेथें खरी राज्यस्थापना इ. स. १६७५ ह्या वर्षीं केली. ते लिहितात:—

"I hesitate to follow the manuscript which assigns to Shahjee the conquest of Tanjore, which he left under the charge of Eecojee; but from a comparison of authorities I am disposed to suspect that the author confounds this event with some former invasion for the purpose of levying contributions, one of which we know to have occurred in 1656. The terms of submission of Tanjore on that occasion may have been considered as equivalent to an actual conquest; but the final occupation of that country was probably achieved by Eccojee after the death of his father. This event is placed by a manuscript history of Tanjore in the Tamil language, belonging to the Mackenzie collection, and by several concurring testimonies in 1675."—*Wilk's Historical Sketches of the South of India, Vol. I, Page 78.*

तंजावर येथें व्यंकोजीनें मराठी राज्याची स्वतंत्र गादी केव्हां व कशी संस्थापित केली, ह्याबद्दलची माहिती तामिल ग्रंथकारांनीं निरनिराळ्या प्रकारची दिली आहे. तामिल भाषेंत तंजावरच्या इतिहासासंबंधानें 'भोसलवंशम्' व 'नरपतिविजयम्' असे दोन ग्रंथ मुख्य आहेत; आणि त्यांशिवाय, तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवालयांतील मराठी शिलालेखामध्येंही हा राज्यसंस्थापनेचा वृत्तांत दिलेला आहे. परंतु ह्यांमध्यें कोणाचा कोणास मेळ जमत नाहीं. 'भोंसलवंशम्' हा तामिल ग्रंथ आणि तंजावरचा शिलालेख ह्यांतील माहितीचा मात्र चांगला मेळ जमतो. तथापि, त्या दोन्ही इतिहासलेखकांच्या मतें, व्यंकोजी राजानें इ. स. १६७४ मध्यें तंजावरच्या विजयराघवावर स्वारी केली, व तेथील राज्य त्यानें इ. स. १६७५ मध्यें जिंकून घेतलें. कर्नल म्याकेंझी ह्यांच्या ग्रंथसंग्रहांतील 'तंजावरुवारिचरित्रम्' ह्या ग्रंथामध्यें, विजयराघवास चोकनाथ नायकानें मारून अलगिरीनामक आपल्या प्रधानाकडे तंजावरचें राज्य सोंपविलें; पुढें ह्या युद्धामध्यें विजयराघवाचा नातू चेंगमल ( अथवा सेंगमल ) दास ह्या राजपुत्राचा त्याच्या दाईनें मोठ्या चातुर्यानें प्राण रक्षण केला; पुढें तो मोठा झाल्यावर व्यंकण्या रायसम् ह्यानें विजापुरास जाऊन व्यंकोजीराजास व पादशाही वजिरांस घेऊन येऊन इ. स. १६७४ मध्यें तंजावरचें राज्य परत घेतलें, वगैरे वृत्तांत दिला आहे. वास्तविक पाहूं गेलें तर ह्या ग्रंथांतील व्यंकोजीच्या स्वारीचा वृत्तांत 'भोसलवंशांतील' वर्णनाशीं बरोबर जुळतो. फक्त तंजावरच्या गादीवर त्या वेळीं विजयराघव होता किंवा अलगिरी होता, ह्या प्रश्नाचा निकाल होत नाहीं. अर्थात् अस्सल कागदपत्रांचा खात्रीलायक आधार मिळत नसल्यामुळें तो प्रश्न तसाच संदिग्ध ठेवणें भाग आहे. ज्या अर्थी 'भोसलवंशम्' व 'तंजावरचा मराठी शिलालेख' ह्यांतील माहितीचा मेळ अधिक जमतो, व त्यास 'तंजावरुवारिचरित्रा'चाही पुष्कळ आधार मिळतो, त्या अर्थी व्यंकोजी राजाच्या तंजावरावरील स्वारीचा व तेथील राज्यस्थापनेचा जो वृत्तांत 'भोसलवंशम्' ह्या तामिल ग्रंथांत दिला आहे, तोच प्रस्तुत प्रसंगीं अधिक ग्राह्य मानणें प्रशस्त होय.

'भोसलवंशम्' ग्रंथामध्यें व्यंकोजी राजानें तंजावर येथील राज्य कसें आक्रमण केलें, त्याचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहेः—

"येकोजी* राजा हा भोसलवंशांतील ह्या नांवाचा चवथा राजा होय. तो बंगळूर येथें राज्य करीत असतां, विजापुरचा बादशाहा अल्ली आदिलशाहा ह्याजकडून

* तामिल ग्रंथांत व्यंकोजी राजास 'येकोजी' ह्या नांवानें संबोधिलें आहे; व अद्यापि तंजावरचे लोक व्यंकोजी ह्या नांवाऐवजीं 'येकोजी' असेंच ह्मणतात. मराठी कागदपत्रांतही कोठें कोठें येकोजी असेंच नांव लिहिलेलें आढळतें.

त्यास अशी फर्मान आली कीं, 'तंजावर येथील विजयराघव नायकावर त्रिचनापल्लीच्या नायकराजानें स्वारी करून तंजावरास वेढा दिला आहे; ह्याकरितां कुमक मागण्यासाठीं तंजावरच्या नायकराजाचा वकील आमच्याकडे आला आहे. ह्यासाठीं आह्मीं त्याजकडे कादिल अलासखान व अबदुलअल्ली असे दोन वजीर पाठविण्याचें योजिलें आहे. तरी तुह्मीं देखतपत्र आपल्या सैन्यानिशीं तंजावरप्रांतीं जावें; व त्रिचनापल्लीच्या नायकराजाचा पराभव करावा; व त्यास तेथून हांकून द्यावें. तंजावर येथील बादशाही खंडणी फार तुंबली आहे, ह्याकरितां तंजावरच्या राजास नजरबंद कैदेंत ठेवून ती वसूल करावी; आणि तुमच्या सर्व स्वारीचा खर्च तेथून जमा करून हुजूर पाठवून द्यावा.' ह्याप्रमाणें बादशाहाचा हुकूम येतांच, येकोजी राजानें बंगळूर प्रांताची व्यवस्था सूर्यराव नांवाच्या आपल्या कारभाऱ्याच्या हातीं सोंपवून तो स्वसैन्यानिशीं बादशाही वजिरांबरोबर लवकरच तंजावराकडे चालता झाला. मार्गामध्यें त्यानें अरणीचा बळकट किल्ला हस्तगत केला. नंतर त्यानें तंजावरावर हल्ला केला; व त्रिचनापल्लीच्या नायकराजाचा पराभव करून त्यास तेथून पळवून लाविलें. नंतर त्यानें तंजावर येथें लष्करी लोकांचा पाहारा ठेवून चांगला बंदोबस्त केला, व बादशाही पेषकश व फौजेचा खर्च वसूल करण्यासाठीं विजापुरच्या दोन वजिरांस तेथें ठेवून, तो स्वतः त्रिमलवाडी येथें येऊन राहिला."

"येकोजी राजा त्रिमलवाडी येथें असतांना त्याचा दुसरा मुलगा सरफोजी शालिवाहन शके १५९६ [इ. स. १६७४] राक्षसनामसंवत्सर ह्या वर्षीं जन्म पावला."

"तंजावरचा विजयराघव नायक व त्याचे भाऊबंद ह्यांनीं आपल्याकडील परचक्र गेलें असें पाहतांच, आपसांमध्यें पुनः गादीबद्दल तंटा सुरू केला. त्यामुळें राज्यामध्यें पुनः अव्यवस्था उत्पन्न होऊन बादशाही खंडणी तुंबली. त्यांनीं विजापुरच्या वजिरांस फसविण्याचा प्रयत्न करून तिकडे पाठविलेल्या आपल्या वकिलास रजा दिली. ह्याप्रमाणें त्यांचीं कृष्णकारस्थानें व कपटी मुत्सद्दीगिरी सुरू झाली. हें पाहातांच तेथील राजाचा मुख्य प्रधान व इतर दरबारी मुत्सद्दी ह्यांस त्यांचा तिटकारा उत्पन्न झाला. त्यांनीं असंतुष्ट होऊन, ह्या नायकराजांच्या हातून राज्यकारभार सुरळीत रीतीनें चालणार नाहीं असें पाहून, विजापुरच्या दोन वजिरांकडे संधान लाविलें; व त्यांना स्पष्ट रीतीनें असें सांगितलें कीं, ह्या नायकराजांना राज्य करण्याची अक्कल नाहीं; व सामर्थ्यहीं नाहीं; सर्व राज्यामध्यें झोटिंगबादशाही सुरू झाली आहे व सर्व प्रजा असंतुष्ट झाली आहे; ह्याकरितां तुह्मीं सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घ्यावा. ह्याप्रमाणें तंजावरच्या मुत्सद्यांचें राजकारण ध्यानीं घेऊन विजापुरच्या वजिरांनीं दोन दिवस त्याबद्दल विचार केला; व शेवटीं त्यांस ह्या कामीं

येकोजी राजाची सल्लामसलत घेण्याबद्दल सांगितलें. नंतर ते मुत्सद्दी त्रिमलवाडी येथें येकोजी राजाच्या भेटीस गेले. तेथें त्यांनीं सर्व राजकीय वृत्तांत त्यास निवेदन केला. तो ऐकून येकोजी राजा थोडेसे निवडक लोक बरोबर घेऊन गुप्तरीतीनें तंजावरास गेला, व तेथें त्यानें त्या वजिरांची भेट घेतली; आणि त्यांच्याशीं सर्व राजकारणांची चर्चा करून तंजावरचें राज्य घेण्याची मसलत कायम ठरविली.''

"तदनंतर माघ शुद्ध ७ शके १५९६ राक्षसनाम संवत्सर ह्या दिवशीं, येकोजी राजा व बादशाही वजीर ह्यांनीं तंजावरच्या राजवाड्यावर हल्ला करून, तेथील नायकराजास व त्याच्या भाऊबंदांस धारातीर्थी पाठविलें व तंजावरचा राजवाडा व किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. ज्या दरवाज्यांतून ते विजय मिळवून परत आले, त्यास 'फत्तेदरवाजा' असें ह्मणतात. येकोजी राजानें तंजावरचा किल्ला नायकराजाच्या जुन्या मुख्य प्रधानाचे स्वाधीन केला, व सर्व राज्यकारभार विजापुरच्या वजिरांचे हातीं दिला. मंतर येकोजी राजा ह्यास बंगळूर प्रांतीं जाण्याची त्वरा उत्पन्न झाल्यामुळें त्यानें त्या वजिरांचा निरोप मागितला. परंतु त्या दोनी वजिरांमध्यें कांहीं राजकारणांत मतभेद उत्पन्न झाल्यामुळें त्यांनीं त्यास तंजावर येथें कांहीं दिवस राहण्याबद्दल आग्रहाची विनंति केली. ह्याप्रमाणें दोन महिनेपर्यंत सर्व राजकारणें स्तब्ध राहिलीं.''

"पुढें दोन महिन्यांनीं, औरंगजेब बादशाहानें दक्षिणेंतील विजापूर खेरीज सर्व राज्यें काबीज केल्याचें वर्तमान आलें. तेव्हां कदाचित् विजापुरावरही त्याचा मोहरा वळेल, असा संशय व भीति एकसमयावच्छेदेंकरून विजापुरच्या वजिरांच्या मनांत उत्पन्न झाली. तेव्हां वजीर अबदुलअल्ली व कादिल अलासखान ह्यांनीं असा विचार मनांत आणिला कीं, 'अशा आणीबाणीच्या प्रसंगीं येकोजी राजा बंगळुरास निघून गेला व आपण दोघे जर भांडत बसलों, तर आपल्या हातून तंजावर प्रांताचें संरक्षण होणार नाहीं. शिवाय, त्रिचनापल्लीचे नायकराजे फार पराक्रमी आहेत. ते ह्या संधीचा फायदा घेऊन तेव्हांच तंजावरावर चाल करतील व तो प्रांत काबीज करतील. विजापुरच्या बादशाहास तर तो प्रांत त्यांच्या ताब्यांत देण्याची मुळींच इच्छा नाहीं. तेव्हां, अशा प्रसंगीं येकोजी राजासारख्या पराक्रमी पुरुषाच्या हातींच हा प्रांत राहणें इष्ट आहे. कारण, तो त्रिचनापल्लीच्या नायकांना पुरून उरण्यासारखा असून, त्याचा भाऊ शिवाजी राजा हा महाप्रतापी व प्रबल आहे, प्रत्यक्ष विजापुरच्या बादशाहासही तो शिरजोर होऊन बसला आहे. ह्यासाठीं त्यासच तंजावर येथील गादी देऊन त्याची येथें स्थापना करावी, हा मार्ग सर्व प्रकारें उचित होय.' त्याप्रमाणें त्यांनीं येकोजी राजास कळविलें; व विजापुरच्या बादशाहाची मंजुरी आणवून, त्यांनीं त्यास तंजावर येथील नायकराजांच्या प्राचीन सिं-

ह्यासनावर, चैत्र शुद्ध १ प्रतिपदा नलनाम संवत्सर शके १५९७ रोजीं, मोठ्या समारंभानें विराजमान केलें. येकोजी राजानें ह्या मंगलप्रसंगीं विजापुरच्या बादशाहास नजरनजराणा पाठवून, ह्या वजिरांस तंजावर येथें ठेवण्याबद्दल त्याची परवानगी मागितली. येकोजी राजाचा शौर्यपराक्रम पाहून बादशाहा फार प्रसन्न झाला, व त्यानें मोठ्या आनंदानें नजरनजराण्यांचा स्वीकार करून, येकोजी राजास तंजावरची जहागीर वंशपरंपरेनें बक्षीस करून दिली, आणि त्यास बहुमूल्य वस्त्रें व राज्याची सनद पाठवून दिली. ह्याप्रमाणें येकोजी राजास तंजावरची राज्यप्राप्ति झाली व तेथें तो त्या वजिरांच्या साह्यानें उत्तम रीतीनें राज्य चालवूं लागला."

'नरपतिविजयम्' ह्या ग्रंथामध्यें व्यंकोजी राजाच्या स्वारीचा जो वृत्तांत दिला आहे, तो असंबद्ध, विसंगत, सत्यापलापयुक्त आणि असंभवनीय असा आहे. त्यांत व्यंकोजी राजावर कृतघ्नतेचा व कपटप्राचुर्याचाही आरोप केलेला आहे. परंतु इतिहास-दृष्ट्या त्यांत अनेक दोष असल्यामुळें त्यावर भरंवसा ठेवण्याची प्रवृत्ति होत नाहीं.*

* 'नरपतिविजयां'तील लेखाचा सारांश पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:--

"तंजावर येथे विजयराघव ह्या नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या पूर्वजास विजयनगरच्या कृष्ण रायल राजानें तंजावरची जहागीर मोठ्या इतमामानिशीं दिली होती. मधुरेच्या राजास आपल्या सैन्याच्या शक्तिप्रभावाचा विशेष गर्व उत्पन्न होऊन त्यानें एकाएकीं तंजावरावर स्वारी केली, व तेथील राजा विजयराघव ह्याचा वध करून तंजावरचें राज्य हस्तगत केलें. विजयराघव ह्याचा चेंगमल नायक ह्या नांवाचा एक मुलगा होता. त्यानें आपल्या वकिलास मोठ्या त्वरेनें बंगळुरास पाठविलें. तेथें त्यानें येकोजी राजे ह्यांची भेट घेऊन त्यांस अशी विनंती केली कीं, 'तंजावरचा राजा चेंगमल ह्यानें मला आपल्याकडे पाठविलें आहे. मधुरेच्या राजानें तंजावरावर स्वारी करून माझें राज्य हस्तगत केलें आहे. ह्मणून आपण आपल्या सैन्यानिशीं माझ्या मदतीस येऊन, माझें राज्य मला परत मिळवून द्यावें. मी आपल्या सर्व फौजेचा खर्च देण्यास तयार आहें.'

"ह्याप्रमाणें तंजावरच्या राजाच्या वकिलानें दीनवाणीनें विनंति करून येकोजी राजे ह्यांचें मन वळविलें. तेव्हां त्यास दया उत्पन्न होऊन, त्यानें त्याचें ह्मणणें मान्य केलें. नंतर त्यानें ह्मैसूरचा चिकदेवराजा ह्यास आपल्या तंजावरावरील स्वारीचा विचार कळविला; व फौजेच्या खर्चाकरितां त्यास बंगळूर प्रांत देऊन, त्याबद्दल बारा लाख रुपये घेतले. नंतर त्यानें आपल्या शूर सैन्यानिशीं तंजावरावर स्वारी केली. येकोजीनें तंजावर प्रांतांत येतांच, तंजावरच्या राजास ५००० स्वारांची वाटखर्ची मागितली; आणि ती हातीं येताच, त्यानें अधिक कुमक आणण्याच्या मिषानें परत येऊन, अरणीच्या किल्ल्यावर हल्ला केला; व तेथील शिबंदीचा पराभव करून तेथें वेदाजी नामक आपल्या सरदाराची योजना केली. नंतर तेथून तो २०० स्वारांनिशीं तंजावरास आला. तेथे त्यानें तंजावरच्या नायक राजास असें कळविलें कीं, 'माझ्या सैन्याचा पगार फार दिवस तुंबला आहे. पगारबाकीचा निकाल केल्यावांचून

फौज पुढें येत नाहीं. ह्याकरितां फौजेच्या खर्चाची भरपूर रक्कम मिळेल, तर मी तुमच्या बतीनें लढण्यास सिद्ध आहें.' नंतर त्यानें कुंभकोनम् येथें देवाची शपथ घेतली व इमानप्रमाण कबूल केलें. तेव्हां चेंगमल नायकानें त्यास मधुरेवर स्वारी करण्यास पुरे इतकें द्रव्य दिलें. नंतर ह्या कृतघ्न येकोजीनें मधुरेच्या राजाशीं अंतस्थ रीतीनें सख्य करून, पुन: कांहीं दिवसांनीं चेंगमल नायकाकडे असा निरोप पाठविला कीं, 'तुमच्या करितां मी माझा बंगळूर प्रांत चिकदेवरायाजवळ ठेवून तुमच्या मदतीसाठीं मी ह्या प्रांतीं आलों. ह्याकरितां माझ्या कुटुंबास राहण्यासाठीं चांगली सुरक्षित जागा तुह्मीं दिली पाहिजे.' त्यावरून चेंगमल राजानें त्यास तंजावरच्या किल्ल्यांत त्याच्या सैन्यानिशीं राहण्याची परवानगी दिली. तदनंतर येकोजी राजानें किल्ल्याचा नीट बंदोबस्त केला; आणि तो आपल्या कबजांत येतांच त्यानें राजास अशी धमकी दिली कीं, तूं मुकाट्यानें तंजावरची गादी सोडून जा. नाहींतर मी हा किल्ला तुझा शत्रु जो मधुरेचा नायक त्याच्या हातीं देईन. तेव्हां तो राजा मुकाट्यानें तंजावरचा किल्ला सोडून गेला. येणेंप्रमाणें तंजावरची गादी येकोजी राजानें मिळविली, व तेथें आपलें राज्य स्थापन केलें. तंजावरचा हा हतभागी राजा पुढें म्हैसुरास चिकदेवरायाच्या आश्रयास जाऊन राहिला."

ह्या लेखामध्यें व्यंकोजीस कृतघ्न ठरविलें आहे. परंतु ह्या लेखाचा नीट रीतीनें विचार केला, तर सर्व लेख किती असंबद्ध आहे, हें तेव्हांच दिसून येतें. 'नरपतिविजया'चा लेखक व्यंकोजीवर कृतघ्नपणाचा आरोप करितो, परंतु दुसरा तामिल लेखक त्याच्या स्वामिनिष्ठेचा उल्लेख करितो. तोही येथें दाखल करण्यासारखा आहे:—

"At all this the *Royasam-Venganen* was deeply grieved, and he thought "Though I had conducted *Sengamala-dasu* to Vijayanagaram, and with so much negociation and unmeasurable pains procured him an interview with the *Secandra-Padshah*, bringing thence an army, conquering the enemies, and causing him to be crowned; yet notwithstanding all this, not to give me the post of *Dalakarten*, but to bestow it, by the advice of a nurse, on a street keeper! And did he not also bid me obey and act according to that person's orders?" With these reflections he quitted Tanjore in great anger and going to *Ekoji Raja* at Combaconam he said to him as follows.:—"You come from a great distance, and after great and varied efforts you took the fort; but wherefore give it over to *Sengamala-dasu?* Who besides would thus have given over so large a tract, perfectly in their own power, and yielding the annual revenue of a *crore?*" On hearing his speech *Ekoji-Raja* replied, "*Hari Hari!* Why dost thou gabble on at this kind of rate?" and was angry. But the *Royasam-Venganen*, not ceasing on that rebuke, continued to carry on the like insinuations every day, for a period of six months. *Ekoji-Raja* did not assent; and said, "should the *Secandra-Padshah* hear this speech severe punishment would visit us; and therefore we dare not act contrary to his written orders."—*Oriental Historical Manuscripts by Taylor. Vol. II-Page 202.*

सालीं संस्थापित केली; आणि त्यानें कर्नाटकांतील सर्व पाळेगार लोकांस आणि त्रिचनापल्ली, मधुरा, रामनाथ येथील राजांस आपला शौर्यप्रताप दाखवून, त्या प्रांतांत आपला चांगला दरारा बसविला. परंतु त्यास शहाजीराजाची जहागीर व वडिलार्जित दौलत पुष्कळ मिळाली होती, त्यामुळें संपत्ति व प्रभुत्व ह्यांच्या योगानें त्याच्या वृत्तीमध्यें आत्मप्रौढी व गर्विष्ठपणा ह्या दुर्गुणांचा प्रादुर्भाव लवकरच झाला. त्याच्या पदरीं शहाजीच्या वेळचे स्वामिनिष्ठ, प्रामाणिक व राजकारणचतुर असे शहाणे मुत्सद्दी पुष्कळ होते. त्यांमध्यें रघुनाथ नारायण हणमंते हे अग्रगण्य होते. परंतु व्यंकोजी राजास तंजावरची गादी प्राप्त झाल्यानंतर त्यास 'आपण थोर राजे झालों,' असा गर्व जाहला; व त्यानें रघुनाथपंतासारख्या जुन्या व नांवाजलेल्या मुत्सद्याची सल्लामसलत ऐकण्याचें सोडून दिलें व त्याचा कित्येक वेळां अपमानही केला. त्यामुळें रघुनाथपंतानें मानहानीस कंटाळून व्यंकोजीची रजा घेतली, व शिवाजी महाराजांकडे संधान लावून आपल्या मुत्सद्दीपणाचा प्रभाव व्यंकोजीस दाखविण्याचा पण केला.

येथें एक महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. व्यंकोजी व शिवाजी हे सापत्न बंधू होते, तरी उभयतांची परिस्थिति अगदीं भिन्न असल्यामुळें उभयतांचे स्वभाव अगदीं वेगळे बनले होते. शिवाजीच्या अंगीं स्वातंत्र्याचें पाणी उत्पन्न होऊन तो महाराष्ट्रराज्याचा संस्थापक बनला. व्यंकोजीनें आजन्म बादशाही जहागिरीचा उपभोग घेतल्यामुळें तो यवनी बादशाहीचें स्तोम आजन्म विसरला नाहीं. शिवाजीस सर्व हिंदुस्थानामध्यें महाराष्ट्रराज्याचा प्रसार करण्याची महत्त्वाकांक्षा होती. व्यंकोजीचे ठिकाणीं स्वतःच्या जहागिरीमध्यें गुंग होऊन स्वतःस धन्य मानण्यापलीकडे अधिक उच्च भावना नव्हती. अशा प्रकारचा उभयतांच्या प्रकृतीमध्यें विरोध असल्यामुळें, व्यंकोजीस महत्पद प्राप्त होतांच, त्यानें शिवाजीविषयीं आपली मत्सरबुद्धि व्यक्त केली; आणि कित्येक अहंपणाच्या वृथा वल्गना सुरू केल्या. अर्थात् ही व्यंकोजीची कृति त्या परमपूज्य व परमवंद्य नृपतीच्या भक्तांस असह्य होऊन त्यांनीं त्याची चांगली कानउघाडणी केली. परंतु व्यंकोजी कांहीं मुसलमान सरदारांच्या नादानें वागून सुविचारापासून विन्मुख झाल्यामुळें, त्यास ताळ्यावर आणण्याकरितां त्याच्या पदरच्या मुत्सद्यांनीं शिवाजी महाराजांकडे प्रेष करून त्यांस कर्नाटकप्रांतीं स्वारी करण्याबद्दल प्रोत्साहन दिलें. शिवाजीस दक्षिणेंत अनेक राजकारणें साधावयाचीं होतींच. तेव्हां त्यानें ही संधि साधून दक्षिणदिग्विजय करण्याचा निश्चय केला. शिवाजीची दक्षिणेंतील स्वारी ही तंजावरच्या व महाराष्ट्राच्या इतिहासांत एक फार महत्त्वाची गोष्ट होय. ही घडवून आणण्यास पुष्कळ अंशीं व्यंकोजीचे कारभारी रघुनाथ नारायण हणमंते हे कारणीभूत होत.

शिवाजी इ. स. १६७६ च्या अखेरीस ३०००० हजार घोडेस्वार व ४०००० पायदळ बरोबर घेऊन कर्नाटकच्या स्वारीस निघाला. प्रथम तो गोवळकोंड्यास गेला. तेथें गोवळकोंड्याच्या बादशाहाच्या व त्याच्या आदरपूर्वक भेटी झाल्या. दिवाण मादण्णापंत ह्यांच्या मार्फत त्याचीं सर्व राजकारणें सिद्धीस जाऊन बादशाहानें त्याचा चांगला आदरसत्कार केला, व पुष्कळ नजरनजराणा व जवाहीर त्यास अर्पण केलें. ह्याप्रमाणें एक महिनापर्यंत भागानगर येथें राहून व बादशाही सख्य करून शिवाजी निवृत्तिसंगम उतरून कर्नूल प्रांतीं दक्षिणेंत वळला. प्रथम तो श्रीशैल्य पर्वतावर जाऊन व तेथें दैविक प्रसाद घेऊन तो कर्नाटकप्रांतीं आला. नंतर त्यानें चंदी येथील बळकट डोंगरी किल्ला विजापुरचा सरदार अंबरखान ह्याच्याकडून जिंकून घेतला व तेथें रामाजी नलगे ह्यास हवालदार नेमिलें; व चंदी महालाची व्यवस्था करण्यासाठीं विठ्ठल पिलदेव ह्याची योजना केली. ह्याप्रमाणें शिवाजीनें कर्नाटक प्रांतामध्यें आपल्या शौर्यप्रतापाचें अल्पप्रदर्शन केलें नाहीं, तोंच त्याच्या सैन्यानें वेलोरच्या किल्ल्यास वेढा घालून व साजरा गोजरा ह्या टेंकड्यांवरून त्यावर तोफांचा मारा करून तो किल्ला जिंकून घेतला. ह्यामुळें शिवाजीच्या बाहुपराक्रमाची कर्नाटक प्रांतामध्यें तेव्हांच प्रसिद्धी होऊन, त्याच्या शौर्यतेजापुढें सर्व पाळेगार व राजे दिपून गेले.

शिवाजीचा मुख्य उद्देश तंजावर प्रांतावर स्वारी करून व्यंकोजीराजास विनम्र करावें असा होता. व्यंकोजीचा विचार प्रथम मधुरेचा नायक व इतर मुसलमान लोक ह्यांच्या साह्यानें शिवाजीच्या फौजेवर चाल करून त्याचा पराभव करावा असा होता. परंतु शिवाजीचें पराक्रमतेज अवलोकन करितांच त्याचे साह्यकर्ते सर्व वीर मागें सरले. तेव्हां व्यंकोजी राजानें लढाईचा विचार रहित करून, शिवाजीची भेट घेण्याचा बेत ठरविला. त्याप्रमाणें तो त्रिमलवाडी येथें शिवाजीच्या भेटीस आला. शिवाजीनें त्याचा फार आदरसत्कार करून त्यास सामोपचारानें वडिलार्जित जहागिरीचा व संपत्तीचा अर्धा वांटा देण्याबद्दल सांगितलें. व्यंकोजीनें, ही जहागीर बादशाही देणगी आहे, तेव्हां त्यांत वडिलांचा कांहीं संबंध नाहीं. बादशाही परवानगीवांचून मला कांहीं वांटणी करितां येणार नाहीं; वगैरे शुष्क कारणें दाखवून शिवाजीचें ह्मणणें मान्य केलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर आपल्या दुराग्रही व एककल्ली वर्तनानें त्यानें शिवाजीची मर्जी नाखुष केली. शिवाजीसारख्या मानी व कर्तृत्वशाली पुरुषास अर्थात् हें धाकट्या बंधूचें वर्तन पसंत पडलें नाहीं. त्यानें त्याच्या पदरच्या मुत्सद्यांकडून परोपरीनें त्याची समजूत करण्याचा प्रयत्न केला, परंतु तोही निष्फळ झाला. एके वेळीं शिवा-

जीच्या मनांत व्यंकोजीस कैद करण्याचाही विचारतरंग उत्पन्न झाला. परंतु आपल्याकडे भेटीसाठीं आलेल्या भावास कैद करून आपल्या थोरपणास कालिमा लावणें योग्य नाहीं असें वाटून त्यानें त्यास निरोप दिला, आणि तंजावरास पाठविलें. तेथेंही शिवाजीनें भले लोक पाठवून व परोपरीनें त्याची समजूत करून गृहकलह नाहींसा करण्याची खटपट केली. परंतु राज्याचा अर्धा वांटा देण्याची सुबुद्धि व्यंकोजीस झाली नाहीं. तेव्हां शिवाजीनें चंदीप्रांतीं संताजीराजे, हंबीरराव मोहिते वगैरे शूर लोक व कांहीं सैन्य ठेवून व त्यांना कर्नाटकांतील प्रबळ जागा जिंकून घेण्याची आज्ञा करून, राजकारणनिमित्तानें तो पन्हाळप्रांतीं तोरगल येथें आला.

इकडे व्यंकोजीनें, शिवाजी दक्षिणेंत परतला असें पाहून, मुसलमान लोकांच्या मसलतीनें, त्याच्या सैन्यावर स्वारी करून त्यास कर्नाटकांतून घालवून देण्याची कुबुद्धि मनांत आणिली; आणि हंबीरराव मोहिते ह्यांच्या सैन्यावर चाल केली. शिवाजीचें सैन्य चांगलें शूर व लढाऊ असल्यामुळें त्यानें तंजावरच्या लोकांची दाणादाण केली, आणि त्यांच्यावर तरवारींचा व भाल्यांचा मारा करून त्यांचें पांच सातशें माणूस ठार केलें, व पुष्कळ लोक जखमी केले. त्या चकमकीमध्यें शिवाजीच्या लोकांनीं, प्रतापजी राजे, भिंवजी राजे, व शिवाजी डबीर असे तंजावरचे तीन सरदार पाडाव केले, व कित्येक मानकरी जखमी केले. ह्याप्रमाणें व्यंकोजीच्या सैन्याचा पूर्ण पराभव झाला. हें लढाईचें सविस्तर वर्तमान शिवाजी राजे ह्यांस तोरगलप्रांतीं लिहून गेलें. शिवाजी महाराजांस हें आपल्या सापत्न बंधूचें अविचाराचें कृत्य विदित होऊन फार खेद वाटला. तथापि, त्यांनीं पुन्हां व्यंकोजी राजाची चांगली कानउघडणी करून त्यास ताळ्यावर आणण्याबद्दल रघुनाथ नारायण हणमंते ह्यांस पत्रें पाठविलीं; आणि खुद्द व्यंकोजी राजे ह्यांस एक बोधपर पत्र लिहिलें. ह्या पत्रामध्यें त्यांनीं व्यंकोजी राजास परोपरीचा उपदेश करून व महाभारतांतील कौरवपांडवांच्या गृहकलहाचे दाखले देऊन, आपल्यामधील वैमनस्य नाहींसें करावें व वडिलार्जित जहागिरीची व संपत्तीची योग्य प्रकारें वांटणी करावी व नीतिमार्गानें आचरण करावें, असा उपदेश केला. हें पत्र अत्यंत महत्त्वाचें असून त्यांत शिवाजी व व्यंकोजी ह्यांच्या कलहाचा साद्यंत इतिहास थोडक्यांत आलेला आहे ह्मणून तें येथें दाखल करणें अवश्य आहे. हें *पत्र येणेंप्रमाणें:—

* शिवाजी महाराजांनीं व्यंकोजीराजास लिहिलेलीं जीं अस्सल पत्रें उपलब्ध झालीं आहेत त्यांपैकीं हें होय. मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ साहेब ह्यांनीं हीं अस्सल पत्रें पाहिलीं असून, तीं रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्या वंशजाकडून तंजावराहून बळवंतराव मल्हार

## श्री महादेव श्रीकुलस्वामिनी.

"श्री सहस्रायु *चिरंजीव अखंडितलक्ष्मीअलंकृत राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति राजश्री शिवाजीराजे, आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. उपरि, कैलासवासी साहेबीं कैलासवास केला, त्यास आज तेरा वर्षें जालीं. महाराजांचे पैके व जडाव व हत्ती व घोडे व मुलूख अवघेही राजश्री रघुनाथपंतीं तुह्मांला राज्यावर बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा वांटा तेरा वर्षें तुह्मींच खादला. आह्मीं जरी तुह्मांजवळीं मागावें, तरी बहुत दूर होतां. बऱ्या बोलें तुह्मी देणार नव्हां; ह्मणून तेरा वर्षें सबुरी केली. मनामध्यें ऐसा विचार केला कीं, बरें, महाराजांचे पुत्र तेही आहेत, खाती तोंवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समयीं आह्मांला फावेल, ते समयीं आह्मी वेव्हार सांगोन घेऊं. असें मनीं धरोन होतों. ऐशियास राजाकरणप्रसंगें आह्मी कुतुबशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजीस आलों. चंजी घेतली, व येलूरतर्फेचा मुलूख घेतला, व सदर खानास (शेरखानास?) झगड्यांत मोडून गर्दीत मेळविलें. सदर खानाचे हातीं मुलूख होता तेवढाही घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुह्मांस पत्रें लिहिलीं कीं, राजश्री गोविंदभट गोसावी व राजश्री काकाजीपंत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यक्षियार राऊ असे भले लोक आह्मांपासीं पाठविणें, ह्मणून तुह्मांला बहुतां रीतीं लेहून पाठविलें. त्यावरून सदरहू भले लोक आह्मांपासीं पाठवून दिले. त्या भल्या लोकांशीं बहुतां रीतीं घरोबियाचा व्यवहार सांगून, आमचा अर्धा वांटा आह्मांस बऱ्या बोलें द्या, ह्मणून सांगून पाठविलें. व त्या बराबरी राजश्री बाळंभट गोसावी, राजश्री कृष्ण ज्योतिषी, व कृष्णाजी शेखजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुह्मांजवळीं जाऊन बहुतां रीतीं बोलले कीं, गृहकलह करूं नये. आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा. असें बोलले. परंतु कपटबुद्धि तुह्मीं ऐसी मनीं धरिली कीं, या समयांत आह्मी थोर राजे जालों आहों. आह्मांसी आपण खांसा भेटीस येऊन आह्मां जवळ नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षें सारें राज्य आपणच खादलें. पुढेंही आपणच सारें राज्य खावें, अशी बुद्धि मनीं धरून, वांटियाचा निवाडियाचा तह न करितां आपण खांसाच आमचे भेटीस आले. यास आमची व तुमची भेट जाहली. त्याउपरी आह्मी बहुतां रीतीं तुह्मांसी बोलिलों, कीं आमचा अर्धा वांटा द्या. परंतु तुह्मीं वांटा द्यावा हा विचार मनीं धराचना. मग जरूर जाहलें, कीं तुह्मी धाकटे भाऊ, आपण होऊन आमचे भेटीस आल्यास तुह्मांला धरावें आणि

---

चिटणीस (कारकीर्द प्रतापसिंह महाराज इ. स. १८१८–३९) ह्यांच्या आज्ञानें मोठ्या प्रयत्नानें आणविलीं, असें त्यांनीं लिहिलें आहे. हीं पत्रें शिवाजीचे चिटणीस बाळाजी आवजी ह्यांच्या हातचीं आहेत. वरील अस्सल पत्र आमचे मित्र कै० मल्हार खंडेराव चिटणीस ह्यांनीं आह्मांस दिलें होतें, त्याची ही नक्कल आहे.



**श्रीमंत छत्रपति शिवाजीमहाराज.**

('De Gancigny and X .Raymond's Inde

या फ्रेंच पुस्तकांत प्रसिद्ध झालेलें घोड्यावरचें चित्र.)

# ९ प्रतिनिधी पदाची मूळ उत्पत्ति.

प्रतिनिधिपद श्रीमंत छत्रपति राजाराम महाराज ह्यांनीं प्रल्हाद निराजी ह्यांस चंदीचे मुक्कामीं इ. स. १६९२ मध्यें दिलें अशी इतिहासांत प्रसिद्धी आहे. प्रल्हाद निराजी हे शिवाजी महाराजांचे न्यायाधीश निराजी रावजी ह्यांचे चिरंजीव असून, ते महाराजांचे तर्फे गोवळकोंडें येथील बादशहाच्या दरबारांत वकील होते. हे अत्यंत स्वामिनिष्ठ, राजकारणकुशल व बुद्धिमान् होते. त्यांनीं चंदीचे मुक्कामीं राजाराम महाराजांस महाराष्ट्रराज्यरक्षणाचे कामीं अप्रतिम' साह्य केलें ह्मणून त्यांनीं अष्टप्रधानांहून वरिष्ठ असें प्रतिनिधि हें नवीन पद योजून तें त्यांस अर्पण केलें. त्या वेळीं प्रल्हाद निराजी ह्यांनीं आपला अष्टपैलू शिक्का तयार करून त्यांत पुढील अक्षरें कोरिलीं होतीं:—

"श्रीलक्ष्मीनृहरेप्रीते ॥ मुद्रा निराजी जन्मनः
राजाराम प्रतिनिधे ॥ प्रल्हादस्य विराजते ॥"

ह्यावरून प्रल्हाद निराजी ह्यांस राजाराममहाराजांचे वेळीं हें पद मिळालें हें उघड होतें. तथापि, एका जुन्या बखरीमध्यें ह्या पदाचा वृत्तांत निराळा दिला आहे. ज्या वेळीं शिवाजी महाराजांनीं कर्नाटकांत तंजावरप्रांतीं स्वारी केली, त्या वेळीं तंजावरचे व्यंकोजी राजे ह्यांचा व शिवाजी महाराजांचा वडिलार्जित संपत्तीच्या वांटणीबद्दल थोडासा कलह लागला. रघुनाथ नारायण हणमंते व प्रल्हाद निराजी हे महाराजांजवळ त्या प्रांताचे माहितगार व शहाणे मुत्सद्दी होते. शिवाजी महाराज व व्यंकोजी राजे ह्यांची भेट झाली, त्या वेळीं व्यंकोजी राजे ह्यांनीं महाराजांशीं सौजन्याचें वर्तन केलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांचा अपमानही केला. त्या वेळीं महाराजांस त्यांचा किंचित् राग येऊन त्यांनीं व्यंकोजी राजांस कैद करावें अशी आज्ञा केली. ही गोष्ट प्रल्हाद निराजी व रघुनाथ नारायण हणमंते ह्यांस कळतांच, त्यांना फार काळजी उत्पन्न झाली. शिवाजी महाराजांनीं खरोखर व्यंकोजी राजांस कैद केलें, तर महाराजांच्या धवल कीर्तीस कलंक लागेल; तेव्हां ही गोष्ट अमलांत येऊं देणें इष्ट नाहीं. असा त्यांचा विचार ठरला. परंतु, महाराजांच्या आज्ञेचा भंग करण्याची त्यांची प्राज्ञा नव्हती. तेव्हां प्रल्हाद निराजी ह्यांनीं एक गुप्त राजकारण केलें. ते व्यंकोजी राजाचा वेष घेऊन शिवाजीच्या लोकांबरोबर मेण्यांत बसून त्यांच्या लष्करांत आले, आणि सारेरात्र शिवाजीच्या लष्करांत व्यंकोजी राजे ह्मणून राहिले. दरम्यान रघुनाथ नारायण हणमंते ह्यांनीं, महाराजांची क्रोधमुद्रा थोडी शांत झाली असें पाहतांच, व्यंकोजीस कैदेंत ठेवणें महाराजांच्या थोरपणास कमीपणाचें आहे अशी महाराजांची खात्री केली. तेव्हां महाराजांनीं लागलेंच व्यंकोजीराजांस आपल्या

डेऱ्यांत आणण्यास सांगितलें व निरोपाचीं वस्त्रें मागविलीं. तोंपर्यंत शिवाजी महाराजांची व्यंकोजी राजे आपल्या आज्ञेप्रमाणें कैद झाले आहेत अशी कल्पना होती. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. प्रल्हाद निराजी ह्यांनीं व्यंकोजीचा वेष घेतला होता. महाराजांचें बोलावणें येतांच प्रल्हाद निराजी यांस समोर जाण्यास मोठी पंचाईत उत्पन्न झाली. तथापि, ते चतुर व राजकारणांत तरबेज झालेले होते. शिवाय, रघुनाथ नारायण हणमंते हे त्यांस मदत करण्यास जवळ हजर होते. व्यंकोजीचें रूप धारण केलेले प्रल्हाद निराजी जवळ येतांच, रघुनाथ नारायण ह्यांनीं हात जोडून विनंति केली कीं, 'महाराज, व्यंकोजीराजे सरकारापुढें येण्यास लाचार आहेत. त्यांचे प्रतिनिधि आज्ञेप्रमाणें सरकारापुढें हजर आहेत.' हें भाषण ऐकून शिवाजी महाराज आश्चर्यचकित झाले व ह्मणालेः– 'ह्मणजे, व्यंकोजी राजे कैद होऊन आले नाहींत कीं काय?' रघुनाथपंतांनीं स्मित करून सांगितलें:–'महाराज, सरकारच्या बंधुप्रेमास हा अपकीर्तीचा कलंक लागूं नये. ह्मणून प्रल्हादपंतांनीं व्यंकोजी राजाच्या वतीनें ही कैद स्वीकारिली आहे व त्यांचे प्रतिनिधि ह्मणून सरकारचरणाजवळ हजर आहेत!' हें ऐकून महाराजांनीं ह्या चतुर मुत्सद्यांचें गौडबंगाल तेव्हांच जाणलें, व प्रल्हादपंतांकडे मोठ्या प्रसन्नमुद्रेनें अवलोकन करून त्यांस सांगितलें कीं, 'तुह्मी व्यंकोजी राजाचेच काय, पण आमचे देखील प्रतिनिधि होण्यास पूर्ण पात्र आहांत. आजपासून आह्मी तुह्मांस 'प्रतिनिधि' हें पद अर्पण करितों. तुह्मी प्रतिनिधिपद धारण केलें ह्मणून आमचा नांवलौकिक राहिला. धन्य तुमची!!'

शिवाजी महाराजांनीं प्रल्हाद निराजीस हें पद दिल्याचा उल्लेख कांहीं बखरींमध्यें आढळतो. संभाजीच्या कारकीर्दीत सर्व अष्टप्रधानांची पदच्युतता झाल्यामुळें प्रल्हाद निराजीच्या ह्या प्रतिनिधिपदाचा अस्त होणें अगदीं साहजिकच आहे. ह्या प्रतिनिधिपदाचा पुनः राजाराम महाराजांच्या कारकीर्दींत उदय झाला, हें इतिहासांतरीं प्रसिद्धच आहे.

⁂ ⁂ ⁂

## १० कचेश्वरकवि.

महाराष्ट्रांतील मध्यकालीन कवींपैकीं हा एक आहे. ह्याची बरीच कविता अलीकडे छापून प्रसिद्ध झाली आहे. हा चाकण (तालुका खेड, जि० पुणें) येथील एका वैदिकब्राह्मणाच्या घराण्यांत जन्मला. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. उपनांव ब्रह्मे. ह्याचें गोत्र काश्यप. हा चाकणच्या रानांत आश्रम करून मुलांबाळांसुद्धा अयाचित वृत्तीनें राहत असे. हा तत्त्वशील व तपस्वी ब्राह्मण असल्यामुळें लोकही याचा योगक्षेम चालविण्याच्या कामीं हातभार लावीत. अशा प्रकारें

ह्या तेथें असतां, शाहू राजा मोंगलांच्या कैदेंतून सुटून, आपलें राज्य मिळविण्याकरितां महाराष्ट्रांत आला. तो चाकणावरून येत असतां, त्यानें कचेश्वराचा आश्रम जवळ असल्याचें ऐकिलें. तेव्हां तो त्याच्या दर्शनाकरितां आश्रमांत आला. त्या वेळीं कचेश्वरानें त्याचा यथोचित आदरसत्कार करून भोजनाकरितां त्यास ठेवून घेतलें. भोजनोत्तर शाहूनें कचेश्वर व त्याची पत्नी ह्यांस नमस्कार करून व त्यांचा आशीर्वाद घेऊन, तो पुढें सातान्याकडे आला, व त्याच्या मनोदयानुरूप त्यास राज्यप्राप्ति झाली. नंतर शाहूनें कचेश्वरास सातान्यास आणून त्याचा उपदेश घेतला. शाहू त्यास पुष्कळ वैभव देत असतांना त्यानें तें नाकारिलें, व तो आपल्या अयाचित वृत्तीनेंच सातारा येथें काहीं दिवस राहिला. राजाकडून जरी शिधा आला, तरी देखील रोजच्या निर्वाहापेक्षां तो अधिक घेत नसे. राजानें त्याचा उपदेश घेतल्यापासून लोक त्यास 'राजगुरू' असें ह्मणूं लागले. पुढें त्याच्या वंशजांसही राजगुरू हें उपनांव पडलें, व तें हल्लीं चालू आहे. ह्याच्या कोणी शिष्यानें 'आदि' नांवाचा ग्रंथ केला आहे. त्यांत कचेश्वराचें वर्णन केलें आहे. कचेश्वर सातान्यास फार दिवस राहिला नाहीं. तो पुढें अखेरपर्यंत उंब्रज येथें कृष्णातीरींच राहिला होता.

राजा देत असतांही कचेश्वरानें कांहीं घेतलें नाहीं व आपल्या दोघां पुत्रांसही कांहीं घेऊं दिलें नाहीं. शेवटीं राजानें, रामचंद्र खटाटोपे ह्मणून कचेश्वराचा एक शिष्य होता, त्याच्या हातावर गुरूद्देशानें सहा गांवांचें दानोदक घातलें. पुढें खटाटोपे यानें ते सहा गांव कचेश्वराच्या पुत्रांच्या नांवें करून दिले. ते हल्लीं त्याच्या वंशजांकडे चालतात. ते गांव येणेंप्रमाणें:-सातारा जिल्ह्यांत १ मौजें सासवडें, व २ मौजें अतीत; आणि पुणें जिल्ह्यांत, १ वाकीबुद्रूक २ चांडोली ३ धावडी व ४ पांगरी. कचेश्वरास दोन पुत्र होते. त्यांपैकीं एकाच्या वंशजाकडे १ अतीत २ वाकीबुद्रूक व ३ चांडोली हीं गांवें चालतात; व बाकीचीं तीन गांवें दुसऱ्याच्या वंशजांकडे चालतात. हे वंशज हल्लीं अतीत व सासवडें वगैरे गांवीं राहतात. सहा गांव मिळून सुमारें १५।२० हजारांचें उत्पन्न आहे, परंतु बहुतेक ऋणग्रस्त आहे.

कचेश्वराचें देहावसान उंब्रज येथें कृष्णातीरीं झालें, तथापि त्याचा प्रिय शिष्य रामचंद्र खटाटोपे ह्यानें त्याच्या देहाचें दहनादि सार्थक कृष्णावेणीसंगमीं आपल्या गांवीं माहुली येथें केलें, व आपल्या घराच्या आंगणांत त्याच्या अस्थी पुरून त्यावर समाधि बांधिली. तिचा एक मजला जमिनींत आहे, त्यांत कचेश्वराच्या पादुका आहेत, व वरच्या मजल्यांत देवाच्या मूर्ती आहेत. ह्या ठिकाणीं त्याच्या वंशजांपैकीं अतीतकर राजगुरू हे दरसाल येऊन फाल्गुन शुद्ध द्वितीयेच्या दिवशीं पुण्यतिथीचा समारंभ करितात. बाकीचे वंशज आपापल्या राहत्या गांवीं करितात ह्मणून समजतें.

पुणें जिल्ह्यांत खेड व चांडोली ह्या ठिकाणीं ह्यानें स्थापिलेल्या पांडुरंगाच्या मूर्ती आहेत.

ह्या साधू कवीनें अनेक अभंग, पदें, आरत्या व आख्यानें रचलीं आहेत. त्याच्या कवितेचा संग्रह त्याच्या वंशजांपाशीं व शिष्यसांप्रदायी लोकांपाशीं पुष्कळ असल्याचें समजतें.



## ११ ठाकूरदास बोवा.

हा जातीचा कान्यकुब्ज (कनौजा) ब्राह्मण. भागीरथीच्या कांठीं गुसाईजीचें शिवराजपूर ह्मणून एक गांव आहे तेथचा राहणारा. ह्याचें मूळचें नांव बालाप्रसाद. ह्याच्या बापाचें नांव नीलकंठ, उपनांव द्विवेदी, गोत्र काश्यप. लहानपणापासूनच ह्याची वृत्ति विरक्तासारखी होती. अकरा वर्षांचा असतांच हा घरून पळून गेला, व तीर्थयात्रा करीत करीत, दक्षिणहैद्राबाद ऊर्फ भागानगर येथें आला. त्याचें भजनकीर्तनादि पाहून पुष्कळ लोक त्याच्या भजनीं लागले. त्या वेळीं हैद्राबाद येथें चंदूलाल हा कायस्थ जातीचा हिंदुस्थानी गृहस्थ दिवाण होता. हा मोठा धार्मिक आणि हिंदुधर्माचा अभिमानी होता. त्यानें ह्यास आपल्या घरीं नेऊन ठेविलें. कांहीं दिवस तेथें राहून तो रामेश्वराकडे गेला, व पुन्हां फिरत फिरत पंढरपुरास आला. तेथील भजनाचा सोहळा व अठरापगड जातींचे वारकरी अभिमान सोडून एकमेकांस नमस्कार करीत आहेत अशी त्यांची समता पाहून, तेथें बालाप्रसादाच्या चित्तास प्रेमाचे पाझर सुटले, व त्या भूवैकुंठांत तो पुष्कळ वर्षें राहिला. तुमचें नांव काय असें विचारिल्यास, माझें नांव ठाकूरदास असें सांगे. त्यावरून पुढें त्याचें नांव 'ठाकूरदास' असें पडलें. श्री. बाजीराव रघुनाथ पेशवे एके वेळीं पंढरीस आले. त्यांबरोबर भूदेवमिश्र नांवाचा कनौजा पंडित होता. त्यानें पुंडलिकाच्या देवळासमोर ठाकूरदास ह्याचें कीर्तन ऐकिलें. तेव्हां तो अगदीं लुब्ध होऊन गेला. ही हकीकत त्याच्या द्वारें बाजीराव व बापु गोखले ह्यांनीं ऐकून तेही दुसरे दिवशीं कीर्तनश्रवणास आले. त्या वेळीं साधा शिपाईगडी गोखला तर त्या कीर्तनांत इतका रमला कीं, ह्या भवसागरांतून तारणारा सद्गुरु हाच आहे असें त्यास वाटून, त्याचा चेला बनला. त्यानें पेशव्यास सांगून ठाकूरदास यास सातारा जिल्ह्यांतील तारगांव येथील जिल्हे अंमल ह्मणजे मोकासा $\frac{3}{4}$ अंमल इनाम दिला व पुढें ह्या अमलाबद्दल श्रीमंत छत्रपति महाराज प्रतापसिंह यांणीं आपलीं दुमालपत्रें दिलीं व २००।४०० रु. आकाराची शेतीची जमीन दिली.



# ३. रत्नागिरीच्या बंदरांतील सरकारी जासूद गलबतें.

## शके १७१६।१७१७.



१. मराठ्यांच्या आरमारांपैकीं जासूद गलबतांच्या आमदरफ्तीची रत्नागिरीच्या बंदरांतील खालील याद आहे. बंदरास ९.

( १ )

**श्री.**

जासूदगी गो जंजीरे रत्नागिरी पो सु॥ खमस तिसैन मया अलफ ताा छ १५ जिलकाद अखेर.

**गलबत राजहंस.**

० छ १० राखर तरता जाहाला.
० छ २० राखर राा उपर वाा.
१ हाजीर छ २१ रजब.
० छ २६ रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ ६ साबान.
० छ १७ साबान राा खाडी जैगड.
१ हाजीर छ २८ साबान.
० छ ३ रजमान राा खाडीमाार.
१ हाजीर छ १५ रमजान.
० छ २६ रजमान राा उपर वाा.
१ हाजीर छ २७ सवाल.

( २ )

जासूदगी गो जंजीरे रत्नागिरी सुाा खमस ताा छ १५ जिलकाद अखेर.

**गाा नागीण.**

० छ ६ राखर तरतें रेवदंडियासी जाहालें.
१ हाजीर छ १५ राखर.
० छ २० राखर राा उपर वाा.
१ हाजीर छ २१ रजब.
० छ २६ रंजब खाडी साचवली.
१ हाजीर छ ६ साबान.

० छ १६ साबान रा। उपर कल्याणास गला आणावयासी.
१ हाजीर छ ९ सवाल.
० छ १९ सवाल खाडी गोपाळगड.
१ हाजीर छ २८ सवाल.

( ३ )

जासूदगी गो। जंजीरे रत्नागिरी सु॥ खमस ता। छ १५ जिल्काद अखेर.

गा। वेताळ.

० छ १० जावल तरता जाहाला.
० छ १९ जावल रा। उपर वा।.
१ हाजीर ४ रजब.
० छ '१५' रजब रा। उपर वा।.
१ हाजीर छ ३० रजब.
० छ ६ साबान रा। उपर वा।.
१ हाजीर छ १ सवाल.
० छ ६ सवाल रा। खाडी जैगड.
१ हाजीर छ १५ सवाल.
० छ २० सवाल रा। खाडीमा।र.
१ हाजीर छ ५६ सवाल.

( ४ )

जासूदजी गो। जंजीरे रत्नागिरी सु॥ खमस ता। छ १५ जिल्काद अखेर.

गा। नारायण.

० छ ८ राखर तरता.
० छ १० राखर रा। उपर वा।.
१ हाजीर छ २१ रजब.
० छ २६ माहे रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ ६ साबान.
० छ १७ साबान रा। खाडी जैगड.
१ हाजीर छ २८ साबान.
० छ ३ रमजान रा। खाडीमा।र.
१ हाजीर छ १५ रमजान.
० छ २६ रमजान उपर वा। पोहचवावयासी.
१ हाजीर छ २७ सवाल.

( ५ )

जासूदगी गैा जंजीरे रत्नागिरी सुा खमस ता छ १५ जिल्काद अखेर.

गा रघुनाथ.

० छ २६ राखर तरता.
० छ १ जावल खाडी जैगड.
१ हाजीर छ ६ जावल.
० छ ९ जावल रा खाडीमार.
१ हाजीर छ १३ जावल.
० छ १९ जावल रा उपर वकवा.
१ हाजीर छ ४ रजब.
० छ १५ रजब रा उपर वा.
१ हाजीर छ ३० रजब.
० छ ६ साबान रा उपर वा.
१ हाजीर छ १ सवाल.
० छ ५ सवाल रा खाडी जैगड.
१ हाजीर छ १५ सवाल.
० छ २० सवाल रा खाडीमार.
१ हाजीर छ २६ सवाल.

( ६ )

जासूदगी गैा जंजीरे रत्नागिरी सुा खमस ता छ १५ जिल्काद अखेर.

गा दर्यामौज.

० छ जाखर तरता जाहला.
० छ ११ जाखर रा खाडी जैगड.
१ हाजीर छ २४ जाखर.
० छ २ रजब रा खाडीमार.
१ हाजीर छ ११ रजब.
० छ १५ रजब रा उपर वा.
१ हाजीर छ ३० रजब.
० छ ६ साबान रा उपर वा.
१ हाजीर छ १ सवाल.
० छ १६ सवाल खाडी जैगड.

१ हाजीर छ २२ सवाल.
० छ २६ सवाल रा। खाडीमाार.
१ हाजीर छ ६ जिल्काद.

( ७ )

जासूदगी गो। जंजीरे रत्नागिरी सुा। खमस ताा छ १५ जिल्काद अखेर.

गाा बहिरी.

० छ २८ सफर तरता.
० छ ५ रावल खाडी जैगड.
१ हाजीर छ १२ रावल.
० छ १४ रावल रा। खाडीमाार.
१ हाजीर छ २० रावल.
० छ २३ रावल खाडीमाार.
१ हाजीर छ २९ रावल.
० छ ३ राखर रा। छबिना.
१ हाजीर छ ११ राखर.
० छ १३ राखर खाडी जैगड.
१ हाजीर छ २१ राखर.
० छ २४ राखर रा। खाडीमाार.
१ हाजीर छ १ जाावल.
० छ ५ जाावल खाडीमाार.
१ हाजीर छ १४ जाावल.
० छ १७ जाावल खाडीमाार.
१ हाजीर छ २७ जाावल.
० छ १ जााखर रा। खाडीमाार.
१ हाजीर छ ११ जााखर.
० छ १३ जााखर खाडीमाार.
१ हाजीर छ २३ जााखर.
० छ २५ जााखर खाडी साचवली.
१ हाजीर छ ३ रजब.
० छ ११ रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ १८ रजब.

० छ २० रजब रा। खाडीमाार.
१ हाजीर छ ७ साबान.
० छ १० साबान रा। खाडी भाटिये.
१ हाजीर छ १३ साबान.
० छ २० साबान छबिना दर्यांत.
१ हाजीर छ ५ रमजान.
० छ ८ रमजान खाडी जैगड.
१ हाजीर छ १८ रमजान.
० छ २१ रमजान खाडीमाार.
१ हाजीर छ २९ रमजान.
० छ ३ सवाल रा। जैगड.
१ हाजीर छ १८ सवाल.
० छ १९ सवाल रा। तिवरी.
१ हाजीर छ २४ सवाल.
० छ २६ सवाल रा। जैगड.
१ हाजीर छ ५ जिल्काद.
० छ ६ जिल्काद जैगड.
१ हाजीर छ १४ जिल्काद.

( ८ )

जासूदगी गें। जंजीरे रत्नागिरी सु॥ खमस ता। छ १५ जिल्काद अखेर.

**गा। समशेर.**

० छ २९ रावल तर्ते.
० छ १ राखर खाडी भाटिये.
१ हाजीर छ ४ राखर.
० छ ५ राखर रा। स्वारीस.
१ हाजीर छ २७ राखर.
० छ १ जावल खाडी जैगड.
१ हाजीर छ १० जावल.
० छ १२ जावल खाडीमाार.
१ हाजीर छ २० जावल.
० छ २३ जावल जैगड.
१ हाजीर छ २९ जावल.

० छ १ जाखर खाडी जैगड.
१ छ ११ जाखर हाजीर.
० छ १२ जाखर खाडी सील.
१ हाजीर छ १४ जाखर.
० छ १६ जाखर रा जैगड.
१ हाजीर छ २३ जाखर.
० छ २५ जाखर खाडी भाटिये.
१ हाजीर छ २७ जाखर.
० छ २९ जाखर जैगड.
१ हाजीर छ ८ रजब.
० छ १० रजब खाडीमार.
१ हाजीर छ १९ रजब.
० छ २१ रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ २८ रजब.
० छ ३० रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ ७ साबान.
० छ १५ साबान खाडी भाटिये.
१ हाजीर छ २९ साबान.
० छ १ रमजान रा जैगड.
१ हाजीर छ १० रमजान.
० छ १३ रमजान खाडी जैगड.
१ हाजीर छ २४ रमजान.
० छ २६ रमजान जैगड.
१ हाजीर छ ६ सवाल.
० छ ८ सवाल जैगड.
१ हाजीर छ १६ सवाल.
० छ १९ सवाल खाडी जैगड.
१ हाजीर छ २९ सवाल.
० छ ३ जिल्काद जैगड.
१ हाजीर छ १० जिल्काद.

( ९ )

जासूदगी गो जंजीरे रत्नागिरी सुा खमस ताा छ १५ जिल्काद अखेर.

गाा रावां जैगड.

१ छ २८ जााखर जैगडीं हाजीर.
० छ २ रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ ११ रजब.
० छ १५ रजब खाडी जैगड.
१ हाजीर छ २९ रजब.
० छ ४ साबान राा जैगड.
१ हाजीर छ १४ साबान.
० छ १६ साबान राा जैगड.
१ हाजीर छ २८ साबान.
० छ ३ रमजान खाडी जैगड.
१ हाजीर छ १७ रमजान.
० छ २९ रमजान राा जैगडचे बंदरीं.

२ वरील यादींतील आमदरफ्तीवरून, रत्नागिरी व जैगड या दोन बंदरांत केवळ सरकारी गलबतांची आमदरफ्ती शके १७१६ त किती होती, तें दिसून येईल. व्यापारी गलबतांची आमदरफ्ती ह्या दोन बंदरांत, तर, ह्याहून शंभरपट असली पाहिजे.

वि. का. राजवाडे.

## ४. शके १७१६ तल्या चोरीबद्दलचें एक गमतीचें पत्र.

साधारण प्रकारची चोरी करणें या अपराधास नाना फडणविसांचे अमदानींत दंडाची शिक्षा सांगत असत, हें ज० राबडे यांनीं ता० ३० जून सन १९०० रोजीं रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें वाचिलेल्या आपल्या निबंधांत दिलेंच आहे. ग्रामपंचाइतींत झालेल्या निकालाची अंमलबजावणी पुण्याहून होत असे. शके १७१६ त, होळीचे अगोदर चार पांच दिवस, पौडखोऱ्यांतील आवळस गांवीं राहणाऱ्या कांहीं ब्राह्मणांनीं केलेल्या चोरीबद्दल चौकशी पंचाइतीमार्फत चालली होती. त्या बाबतींत एक पत्र पुण्याहून आवळस येथें रवाना झालें. तें बरेंच गमतीचें असून

त्यावरून तत्कालीन सामाजिक परिस्थितीवर अंशतः तरी उजेड पडतो व निदान कधीं कधीं दंड कसा वसूल करण्यांत येई, हें कळतें.

पो फाल्गुन वद्य ३ रविवार श्री.
शके १७१६ खमसतिसैन

"राजश्री गोविंदपंत आपा स्वामींचे सेवेसीः—विनंति उपरि तुह्मीं पत्र पो तें पावलें. फणस चोरांनीं नेले, येविसींचे तपसिलें लिहिलें, तें कळलें. व रा॥ जोसीबाबांनीं संकलित मार सांगितला होता. तुमच्या पत्रापूर्वी जोसीबावा जांभुळपाड्यास प्रातःकाळीं गेले. सारांश मार, चोरी करणें तरी होळी जळाल्यानंतर करावी. पदार्थ आणिला तरी होळीवर सर्वांनीं भक्षावा. मागारा द्यावयाचा असल्यास पोस्त घेऊन द्यावा ही चाल कोठें आहे. पोर्णिमेपूर्वी येकादसीस फणस चोरिले ही चोरी सिमग्याची नव्हे. ही आस्तेची चोरी. सांपडल्यास पारपत्य करावयाचें. गुंता नाहीं. असो. पोर्णिमेचे दिवसीं होळीपूर्वी दिवसा फणसे नेलीं, त्या पो येक चोर जयराम ब्राह्मण सांपडला. फार उत्तम जहालें. त्याणें आणखी तिघांची नांवनिसी सांगितली. त्याची याची रुजुवात करावी व पोतें व फणस रानांत सांपडले हेंहि खरें. पोतें चौघांपैकीं कोणाचें त्याची चौकसी करावी. हे चोर सिमग्याचे नव्हेत. हे सोकलेले चोर आहेत. त्यांस शिक्षा असली पाहिजे. सिमग्याचा मार्ग वेगळाच आहे. राजेश्री गंगाधर तात्या बापट हेही घरीं आहेत. त्यांचे विद्यमानें जोसीबावांचें बोलणें व नमस्कारही जाहले. ब्राह्मणास नमस्कार केला उचित. परंतु ब्राह्मण असतां बदकर्म केलें, तरी त्यास शासन यथायोग्य करितात. प्राणनाश मात्र करूं नये, हा सांप्रदायच आहे. हालीं मार लिहिल्याप्रमाणें रुजुवात करून ठेवावी वगैरे यास मसाला करणार होतों. परंतु ते लग्नास जोशीबावासुद्धां गेले ह्मणोन न केला. फणस पाहावयास दोन पो, ते पावले. रा॥ तात्याची खातरजमा पोतेंसुद्धां जाली ह्मणजे सदर्हु चोरांची नांवनिसी लेहून पाठवावी, ह्मणजे त्यांत आणवावयासी येईल. सोमणाचे मुलाच्या तोंडांत मारिली ह्मणोन चोर अडून उपास करीत बसले. परंतु पोर्णिमेपूर्वी चोऱ्या केल्या याचा अर्थ समजला नव्हता कीं काय? येकादसीस फराळ निर्शनास फणस लोकांचे चोरून आणून खावे, मग निराहाराचें श्रेय काय? व भाजीही सदर्हू प्रमाणें याचा निर्णय सिष्टच सांगतील. पोतें माघारें पो आहे. याची चौकशी करून चौघां चोरांतून कोणाचे घरचें तें जयरामास पुसोन, पत्ता ठीक करावा. इतकीयांत मंडळी लग्नाहून आल्यानंतर, ज्याजकडे अन्याय लागेल त्याणें, ग्रामस्तास पोस्तास सर्व मंडळीस बुंदीचे लाडू भोजनास घालावे ह्मणजे सर्व झाले. सिष्टसमुच्चय करून करावयाचे. समजोत होईल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

"यशवंत."

परंतु ते अचानक येतील असें दिसतें. काय चिंता आहे ? असें बाई बोलली. प्रस्तुत ऐकिल्यांत आलें जे, राजश्री बाळाराव येथून गेलीयावर, इंदुरीं तुकोजी होळकर व नारो गणेश यांची भेट घेऊन पलीकडे गेले. तेथें ऐकिल्यांत आलें जे, इंदुरीहून उभयतांनीं प्रस्थान केलें. बाईचे भेटीस येणार.

खानदेशांतील वर्तमान तरः–राजश्री गणेशपंत बेहेरे व होळकरांची फौज एके जागां जाले. रनाळ्यांत केसो कृष्ण एक पलटणानशीं होते. ते यांजवर छापा घालायास छ २६ सवालीं गेले. गणेशपंत वगैरे तेही सावधच होते. त्यांनीं दोन टोळ्या केल्या. गणेशपंत पुढें होते. त्यांचे पाठीशीं पलटण लागलें. मागून होळकराचे फौजेनें पिछाडीवर घातलें. दहावीस माणसें त्यांचीं मारलीं. पांच सात फिरंगी धरले. बायका कांहीं धरल्या. ते सारीं थाळनेरच्या किल्ल्यांत पाठविले. आतां गणेशपंत व ह्यांची फौज सारे एके जागां रनाळ्याजवळ आहेत. काल छ २ मिनहूस इंदुरची बातमी आली जे, तुकोजी होळकर व नारो गणेश यांणीं इंदुरीहून कूच केलें. पांच सातशें स्वार समागमें आहेत. येथें येतात. बाईनीं मजला बोलावून एकांतीं सांगितलें जे, इंदुरीहून उभयतांनीं कूच करून इकडे येतात. परिछिन्न त्यांच्या चित्तांत बेइमानी आहे. नाना प्रकारचे घोळ घालून आह्मांस उपद्रव करावा, अशा विचारें येतात. यास्तव तुह्मी श्रीमंतांस लवकर लिहून पाठवा. आह्मांस तों सर्वविशीं आश्रय श्रीमंतांचा आहे. असें बाईनीं सांगितलें. बाईचें मानस कीं, लवकर श्रीमंतांस पत्रें पाठवून, श्रीमंतांचीं पत्रें तुकोजी होळकरांस व नारो गणेशांस दाबाचीं यावीं कीं, तुह्मी बाईशीं नौदिगर केल्यास परिछिन्न कामास येणार नाहीं. तुह्मीं हुजूर येणें. बाईशीं अमर्यादा न करीत, अशीं. पत्रें सुतरस्वारांबरोबर लवकर येथें यावीं. असें बाईचें मानस फार आहे. यास्तव, हीं पत्रें एकांतीं स्वामींनीं वाचून, ते क्षणींच त्या उभयतांस दाबाचीं पत्रें कीं, बाईशीं अमर्याद वर्तणूक न करीत अशीं, व बाईस समाधानीचें पत्र, अशीं येथें सेवकाजवळ सरकारच्या सुतरस्वाराबरोबर यावीं. सरकारचीं पत्रें लवकर यावीं, या अर्थीं येथें बाईचा जीव फार उतावळा जाला आहे. धन्याची मर्जी. मीही यांसीं बोललों आहें जे, हें वर्तमान ऐकिल्यावर श्रीमंत टाकोटाक पत्रें पाठवितील. येथें बाईचें मानस कीं, राजश्री हरिपंततात्यांशीं नारोपंतांनीं जाबसाल लावला आहे. ते आह्मांविशीं कांहीं श्रीमंतांच्या चित्तांत विपर्यास घालतील. यास्तव तात्यांस कळूं न द्यावें ह्मणतात. परंतु पाहतां, तात्यांचे ठायीं यांची ममता फार आणि तात्याही हमेश यांस कृपेचींच पत्रें लिहितात. परंतु अलीकडे यांस तात्यांविशीं कोणीं काय भासविलें आहे न कळे. असो. जसें स्वामींचे मर्जीस येईल तें करावें. उत्तर फार

सत्वर यावें. येथें गडबड अशी आहे. सेवकास खर्चाची विपत्ति फार आहे. नऊ महिने जाले, येथें लौकांचें देणें जालें आहे. खर्चासही नाहीं. स्वामी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक. २५

**श्रीगजानन.** ता. १ नोव्हेंबर इ. स. १७८०.

पैा छ १६ जिल्काद इहिदे समानीन. मि. कार्तिक शुद्ध ५ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना ता. छ ३ जिल्कादपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मु॥ महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील राजश्री बाळाराव गोविंद येऊन गेलेः त्यांचें व बाईचें बोलणें मुत्सदियांचे रुबरू जालें तें, व श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेंतच आहेत तें, व खानदेशप्रांताचें सविस्तर वर्तमान पेशजीं डांकेबरोबर छ ३० सवालीं येथून पत्रें रवाना केलीं आहेत तीं, सेवेसी पावलीं असतील. बाळाराव गोविंद येथून जातेसमयीं, मी भेटीस गेलों होतों. ते वेळेस त्यांस विचारलें जे, आपण मातुश्रीचा निरोप घेऊन उज्जनीस यजमानाकडेस जातां, त्यास आपण काय करून गेले, हें श्रीमंतांस काय लिहूं ? त्यास एकांतीं बसून सेवकासीं बोलले जेः—दीड महिनापरीयंत येथें होतों. दहा पांच वेळां मातुश्रीशीं आह्मीं एकांतीं भाषणें केलीं; परंतु बाईचे मर्जीचा थांग लागला नाहीं. दुसरें, आज जे भाषणें झालीं, तेंच बोलणें खचित असा रंग नाहीं. जाबसालांत धरसोड फार देखली आणि विश्वास हा कोणाचाही नाहीं. पदरीं मातबर मनुष्य मोडून गोष्ट सांगायायोग्य नाहीं. जें करणें तें आपण स्वतांच करावें, अशा तऱ्हा येथें आहेत. एक, कितीक गोष्टी तोडीमोडीस हरकूबाई बरीच आहे, आणि बाईही थोडें थोडें तिचें ऐकत आहे. सारांश, तुकोजीबावाचें स्वरूपज्ञान बाईस कळून चुकलेंच आहे. सारी धरपकड नारो गणेश करितात. त्यांचा उपमर्द व्हावा आणि यांणीं त्यांणीं एकविचारें असून दौलतीचा बंदोबस्त करावा. त्यास, येविशीं पाटीलबावांचे विद्यमानें हा बंदोबस्त व्हावा. येविशींचें बाईचें आमचें भाषण कीं, नारो गणेश यांणीं सरळ आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावी. तुकोजीबावांनीं व त्यांनीं पूर्ववत्प्रमाणें आज्ञेत असून, साहेबचाकरी यथास्थित करावी. धन्याचा बट्टा लावून घेऊं नये. याप्रमाणें सरळता तुमच्यानें होईल तर करा, असें बाई बोलली. बाळारायांनीं उत्तर केलें जे, याप्रमाणें पाटीलबावांच्या विद्यमानें तुमची त्याची सरळता करून देतों. पुढें महिना दोन महिने यथास्थित वर्तले, त्यापुढें त्यांणीं फंदफरीद केले, तर आह्मांकडे आपला शब्द नाहीं,

असें बाळाराव बोलले. त्यास बाई बोलली जे, असें जाल्यावर तुमची मध्यस्ती काय? तेव्हां यांतच तुमचे कावित्र दिसून येतें. तुह्मीच त्यास सांगाल कीं, आमचे मध्यस्तीनें दोन महिने सरळतेनें बाईचे आज्ञेप्रमाणें कारभार करा. पुढें तुमच्या चित्तास येईल तसें तुह्मी करा. अशी आमची समजावणूक व त्याजकडून यश असें घेण्यास तुह्मी आलां आहां. तर असें आह्मांस कपटी मध्यस्ती नलगे! तेव्हां बाळाराव बोलले जे, आह्मी आपल्या पायांशीं कपट करणार नाहीं. असें आपल्या चित्तांत आलें, तेव्हां आह्मी जे विनंति करितों ते सरळतेनें परवानगी द्या. कोणती? बाळाराव बोलला जे, आमचे विद्यमानें जे करारमदार होतील, त्याप्रमाणें त्यांनीं चालावें. जर मध्यें नारोपंतांनीं खलेल केली, आपला आज्ञाभंग केला, आणि आह्मांस बट्टा लावला, तर परिछिन्न आह्मी नारोपंताचें पारपत्य करूं. येविशीं आपण वाईट मानूं नये. बाईही बोलली कीं, बदफैली केल्यास पारपत्य करणें युक्तच आहे. असें बाई बोलली. हे परवानगी बाईची घेतली. याप्रमाणें बाळारायांनीं एकांतीं सांगितलें. हें सेवेशी श्रुत होय. राजश्री विसाजी शामराज इंदुरीं आहेत. त्यांचीं पत्रें येथें बाईस हरकूबाईच्या विद्यमानें नित्य पत्रें येतात, कीं आपण चिंता न करावी; यांच्यानें आपलें कांहीं होत नाहीं. आपण आपले जागां सावध मात्र असावें. अशीं पत्रें येतात आहेत. हीं पत्रें सारीं एकांतीं अक्षरशः पाहून, यांचीं उत्तरें लवकर सुतरस्वारीबरोबर यावीं. कळावें, सेवेसी श्रुत होय हे विनंति."

---

**लेखांक २६.** ता. ४ नोव्हेंबर इ. स. १७८०.
**श्रीगजानन.** मि. कार्तिक शुद्ध ८ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ६ जिलकादपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून छ ३ मिनहूस कासीदजोडी रवाना केली आहे. सांप्रतचें वर्तमानः— राजश्री तुकोजी होळकर व नारो गणेश हे दोन तीन हजार फौजेनशीं इंदुराहून कूच करून, पुढें दोन कोस बिजलपुरास आले आहेत, ह्मणून वर्तमान आहे. छ ५ मिनहूस तेथून कूच करून, दरमजल महेश्वरास बाईचे भेटीस येणार. पेशजीं इंदुरीहून उभयतांचेही प्रेश, राजश्री पाडुरंग शंकर व लांबहात्याचा कारकून ऐसे दिपवाळीच्या हंगामांत आले होते जे, बाईची चिटी यावी ह्मणजे आह्मी भेटीस येतों. त्यास ते उभयतां येथें आलियावर बाईसीं कितीक प्रकारें बोध केला जे, आपण पत्र उभयतांसही पाठवावें, कीं भेटीस येणें. त्यास येथें बाईनीं उभयतां कारकूनांस उत्तर

केलें जे, आपल्या घरास येयास त्यांस कागदपत्र कशास पाहिजे? तथापि, आमचे भेटीस तुह्मी या, असें मी तरी कशास पत्र पाठवूं? त्यांनीं अमान्यच केलें, तर असो! मुख्य गोष्ट स्वामिकार्य आधीं. त्यांनीं पुण्यास श्रीमंतांकडेस जावें. स्वामिकार्य करून मग येथें यावें. 'आह्मी त्यांचेच आहों. धन्याचा संतोष राखून यावें हें उचित आहे. मग आह्मांसही भेटावें. घरही आपलें. काय सांभाळणें तें सांभाळावें. यांत उत्तम आहे, प्रस्तुतच त्यांचें मानस येथें येयाचें असल्यास चाळीस पन्नासानशीं त्यांनीं यावें. घर त्यांचें आहे. त्यांनीं ह्मटलें जे, हजार दोन हजारानशीं येऊं; तर परिछिन्न आह्मी गडावर घेणार नाहीं. नाहक उपाध होईल. यांत उत्तम नाहीं असें त्या उभयतां कारकूनांशीं बोलून त्यांस छ ३ मिनहूस येथून बिदा केलें. प्रस्तुत वर्तमान ऐकिलें जे, ुकोजी होळकर व दिवाण ऐसे इंदुरीहून कूच करून बिजलपुरास आले. समागमें दोनतीन हजार फोज आहे. दाहाबारा तोफाही आहेत. याप्रमाणें येतात. बाईनींही मजला एकांतीं बोलावून सांगितलें जे, तुकोजीबावा व दिवाण ऐसे जमीयतेनशीं येतात. त्यांच्या चित्तांत कांहीं कटकट आह्मांसीं करावी, लोकांचे दंगधरणीं येथें आह्मांजवळ आणून बसवावीं, अशा उपाधीवर येतात. तुह्मी श्रीमंतांस लिहून पाठवा. विस्तारपूर्वक पेशजीं पत्रीं कासीदजोडीबरोबर विनंतीपत्रें लिहिलीं आहेत. बाईनीं राजश्री पाटीलबावांसही एकांतीं पत्रें लिहिलीं आहेत. राजश्री विसाजी शामराव इंदुरींच आहेत. त्यांचे कागदपत्र हरकुबाईच्या विद्यमानें येतात कीं, मी पाटीलबावांस घेऊन तेथेंच येतों. पाटीलबावा तेथें आलीयावर कोणतीही एक मसलत जाबसालावरच पडेल. हरएक गोष्टीचा कजिया होऊं देणार नाहींच. परंतु यामध्येंही आपलें पत्र तुकोजीबावांस व नारो गणेश यांस यावें कीं, बाईची अमर्यादा न करितां, बाईस भेटून तुह्मीं हुजूर येणें. आह्मांस धनीपणाचें पत्र यावें व बाईसही समाधानाचें पत्र यावें. बाईनींही दोन तीन वेळां मजला याअन्वयें सांगितलें आहे कीं, मजला आश्रय सर्वांविशीं धन्यांचा आहे. दुसरें, बाई बोलत होती जे, राजश्री हरिपंततात्याकडे नारोपंतांनीं व तुकोजीबावानीं सूत्र लाविलें आहे. त्यास तात्या त्यांचें बोलणें श्रीमंतांसीं बोलतात. अद्याप श्रीमंतांचा खमीर बळकट आहे. अद्याप नाना फुटले नाहींत. यास्तव येथील वर्तमान सविस्तर वरचेवर श्रीमंतांस लिहून पाठवीत जातां, त्यांची ममता आह्मांविषयीं एक प्रकारची जालीशी दिसती. बरें, तुह्मीं श्रीमंतांस लिहून पाठवीत जाणें. मींही बहुत प्रकारें मनोधारण केलें. येथील मानस कीं, वरचेवर पत्रेंही सरकारचीं येत असावीं. तुकोजीबावांस व नारो गणेश यांस, बाईची अमर्यादा न होय, येविषयीं येथें पत्रें यावीं. प्रस्तुत बाईस वाटतें कीं, आपले कोणी

नाहीं. धन्याचा भरंवसा होता. तेंही तात्या त्यांचें बोलणें ममतायुक्त बोलतात. तेव्हां आपलें कोणी नाहीं. अशी उदास फार आहे. बाह्यात्कारें बाईनीं किल्ल्याचाही बंदोबस्त करितात. शिबंदी आरब वगैरे सात आठशें माणूस ठेविलें आहे. पहिलेंही चार पांचशें माणूस आहे. जागां जागां बुरजावर तोफा व जुंबरे व सुतरनाला चढवितात. जागां जागां नाकेबंदी करून बंदोबस्ती करितात. विसाजी शामराज नित्य हरकूबाईस पत्रें लिहितात जे, तुह्मी कांहीं चिंता करूं नका. यांच्यांनीं कांहीं होत नाहीं. हरकूबाईनें आपले पंचवीस स्वार तुकोजीबावांकडेस पाठविले होते कीं, मणिरामाकडे माझा लाखोचा कज्या आहे. हिशेब समजला पाहिजे. यास्तव मणिरामास पाठवून देणें. त्या तुकोजी होळकरांनीं मणिरामास निरोप दिला कीं, तुह्मी जाऊन मावशीबाईचा गुंता आपला वारा. तुह्मी त्यांचे दिवाण. लाखोंचा त्यांचा कारभार केला आहे. तुह्मी जाऊन त्यांचा फडशा करणें. याप्रमाणें सांगून मणिरामास निरोप दिला. तोही दो ती दिवसां येथें येणार. धारेचें वर्तमान ऐकिल्यांत आलें जेः—लक्ष्मणराव ह्मणून परभू होता, तो खंडेराव पवाराशीं मिळून, त्याची दिवाणगिरी कबूल करून, कांहीं पाटीलबावांची पागा एक, समागमें घेऊन, धारेंत किल्ल्यांत जाऊन बसला. तें वर्तमान राजश्री रंगरावजीस कळलें. त्यांनीं आपले जमीयतसुद्धां रंगराव येऊन, त्याचें पारिपत्य करून, लक्ष्मणराव धरून बंदोबस्तींत ठेविले. तेथेंही खंडेराव पवार हमेश खूळ करायावरच आहेत. याप्रमाणें तेथील वर्तमान. खंडेराव पवार हुजूर गेल्याशिवाय धारेचें खूळ तुटणार नाहीं, असें बोढेकराकडील कारकून येथें आले होते, त्यांचें भाषण. छ ५ मिनहूस इंदुरीहून बातमी आली तें वर्तमानः— तुकोजी होळकर व नारो गणेश शेंब्रूडच्या घाटापर्लीकडे ओढ्यावर आहेत. तीन चारशें फौज पागा वगैरे समागमें आहेत. लोकांच्या देण्याचा गवगवा आहे. याप्रमाणें येतात. पाटीलबावांचीही येथें येयाची आवई आहे. येथें बाईही आपले जागां किल्ल्याची मजबुती करून आहेत. पाहावें. येथें आलीयावर कसें होईल तें पाहावें. राजश्री फत्तेसिंह गायकवाड यांजकडील वकील राजश्री महिपत मल्हार ह्मणून गृहस्थ त्यांचीं पत्रें घेऊन उज्जयनीस आले आहेत. येथें बाईकडेही येणार. मजला पत्र त्या गृहस्थांचें आलें होतें. ते येथें आलीयावर त्यांचें वर्तमान मनन करून शेवेसी लिहीन. सुरतेहून चार पलटणें केसो कृष्ण यांच्या उपराळ्यास आलीं ह्मणून वदंता आहे. पुरतें वर्तमान आलीयावर लिहीन. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक २७.** ता० ५ नोव्हेंबर इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि० कार्तिक शु० ९ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ जिल्कादपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—श्रीमंत दादासाहेबांकडील वर्तमान. कोठें कोठें गृहस्थांचे कागदपत्र ज्या ज्याचे तिकडे कोणीं आहेत पाठविलीं आहेत. गुसाऊ तें वर्तमान जे, श्रीमंत दादासाहेबाजवळ जमीयत सत्रा पलटणें इंग्रेजी सुरतेस जमा आहेत, व मुंबईवाल्याची कुमक, पांच पलटण व कलकत्त्याहून गोरा तुरकस्वार तीन हजार, व पांच पलटण व अकरा तोफा ऐसे सुरतेस आले. इतका जमाव जाला आहे. पोख्त सरंजाम करितात. पहिले गायकवाडाचे पत्रींही असेंच होतें. मराठी फौज दादासाहेबांजवळ तीन हजार आहे. याप्रमाणें सरंजाम. पुढें मसलतीचा रंग. बोली आहे कीं, प्रथम अमदाबाद सर करावी; तदोत्तर पुढें दक्षणेस जावें, अशी मसलत आहे. गाडराचेही कागदपत्र सुरतेस जात येत असतात. कोणी बोलत जे, आपला जीव रक्षण करायास कागदपत्र पाठवितात. पुण्यास वकील इंग्रजाचा गेला आहे. तेथून काय ठरून येईल तेव्हां सल्ला अगर बिघाड. याप्रमाणें कोणा कोणाचे कागदीं पत्रीं वर्तमान. बाजारी वर्तमान कीं, दादासाहेबाची तयारी जाली आहे. परंतु कलकत्त्याहून कोणी खासा पांच पलटणानशीं येणार आहे. त्याची मार्गप्रतीक्षा करितात हें एक—व दुसरेंही बाजारीच वर्तमान जे, दादासाहेब स्वारी तयार करून सुरतेहून बाहेर निघून, आधीं अमदाबाद घेऊन पुढें सोनगडास यावें. तेथें श्रीमंतांस ठेऊन, राजश्री बाजीराव मुख्य व सर्व कर्ते सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई व अमृतराव दिवाण ऐसे पुढें दक्षिणेस येऊन पुणें पाहावें. गुदस्तां दादासाहेब पुण्याजवळून आले, परंतु पुणें पाहिलें नाहीं. हे आरीयत मातुश्रीस फार आहे. असेंही बाजारी कितीक वर्तमान बोलतात. राजाराम गोविंद मवाशांतून निघून गेले म्हणून येथें वर्तमान आहे. तथ्य वर्तमान दोचौ दिवसांत येईल. येथील वर्तमान, अहिल्याबाई होळकर यांस येथें बापोजी होळकर यांच्या फौजेच्या देण्याची निकड पडली आहे, व पाटीलबावांकडील वीस लक्षांची वरात घेऊन, शिवाजी नारायण व भगवंतराव ऐसे दोघे कारकून येथें आहेत. चार लक्षपर्यंत आज नव महिन्या जाला आहे. बाकीच्या ऐवजास आज उद्यां करितात. कोठें कोठें वराताही दिल्या आहेत. त्याही अद्याप वसूल जाल्या नाहींत. कारकून धरणींपारणीं करितात. अहिल्याबाईनीं कोणी परगण्याचा वगैरे कमाविसदार उभें करून कोणी परगण्याचा कमाविसदाराजवळून रसद घेऊन कमाविसदार पाठवितात. तेथें राजश्री तुकोजी-

बावाही त्याच परगण्याची रसद तेथें घेऊन कमाविसदार परगण्यावर पाठवितात. हेही आपले जागां अशी श्रमी आहेत. अद्याप कोणताही निकाल नाहीं. मजला बाई पुसत होती जे, इंग्रजांचा वकील पुण्यास गेला आहे ह्मणतात. श्रीमंतांचा व इंग्रेजांचा तह कसा जाला, व हैदरखानाचा सल्ला कीं बिघाड? नबाबाचें श्रीमंताचें कसें आहे? त्यास उत्तर केलें जे, नबाबाचा व श्रीमंतांचा ऐक्यभाव इमानपुरस्कर अकृत्रिमता उभय पक्षीं आहे, व हैदरखानाचा वकील श्रीमंतांकडे येऊन कांहीं द्रव्य देऊन, श्रीमंतांची कृपा संपादून खानमजकुरांनीं घेतली; व तुंगभद्रेअलीकडील मुलुख तमाम सोडून पलीकडे गेला, असें वर्तमान ऐकतों. व इंग्रेजांकडील वकील पुण्यास गेला आहे ह्मणून येथेंच ऐकिलें; आणि तेथेंही काय तह जाला, हाही कळला नाहीं. बाई बोलली जे, श्रीमंतांचें दैव समर्थ आणि कारभारीही चांगले सत्य, कोणाचा द्वेष करीत नाहींत. बरे आहेत. असें बोलली देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति.''

---

**लेखांक २८.** ता० १७ नोव्हेंबर इ. स. १७८०.

**श्रीगजानन.** मि० कार्तिक वद्य ६ शके १७०२.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ जिलकादपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामीच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबरोबर सेवेसीं पत्रें पाठविलीं आहेत. डाकेबरोबरही हमेश पत्रें पाठवीतच आहें. पावतात न पावतात हें डाकेचें वर्तमान कांहीं कळत नाहीं. प्रस्तुत इकडील वर्तमान तर, श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच आहेत. उभयतां सरदारांपैकीं पाटीलबावा तर उज्जनीसच आहेत, तुकोजी होळकर इंदुराअलीकडे चार कोस पिंपळें आहे, त्या ओढ्यावर उतरले आहेत. तीनचारशें पागा वगैरे समागमें आहेत. लोकांचा देण्याचाही दंगा फार आहे. लोकांस ह्मणतात जे, महेश्वरास जाऊन बाईजवळून कांहीं घेऊन तुह्मांस देऊं. लोक कोणी ऐकत नाहींत. असा गवगवा आहे. अलीकडे ऐकिलें जे, तेथें कोणाजवळून कांहीं कर्जवाम घेऊन लोकांस कांहीं देतात. समजूत आली ह्मणजे कूच करून इकडे महेश्वरास येणार असें ऐकतों. दुसरें वर्तमान ऐकिल्यांत आलें जे, पाटीलबावाकडील कोणी गृहस्थ तेथें तुकोजी होळकराकडे आले आहेत. बोलणें बोलतात जे, तुह्मी कूच करून कोठें जातां? देशीं जाऊन काय कराल? प्रस्तुत हिंदुस्थान प्रांतीं फौजा रवाना करणें आहेत, ह्या कराव्या. त्यांचे रवानगीस सहजच दोन महिने लागतील. तोंवर तिकडे इकडे काय होतें तें पाहून,

देशीं जाण्याचें पडलें तर तुह्मी व आह्मी मिळूनच जाऊं. प्रस्तुत जाऊन खर्चाखालीं यावें, यांत नफा काय ? याप्रमाणें ते गृहस्थ बोलले. त्यावरून तुकोजीबावाही देशीं येयाविषयीं स्थिरच आहेत. किंबहुना, महेश्वरीं येऊन कांहीं घोळ घालतील असा रंग दिसतो. असें वर्तमान ऐकिलें. दुसरें वर्तमान, फत्तेसिंह गायकवाड यांजकडील दोघे गृहस्थ मातबर महिपत मल्हार ह्मणून पालखीनशीन आहेत. त्यांनीं फत्तेसिंग गाइकवाड याजकडील पत्रें पाटीलबावांस व तुकोजीबावांस व मातुश्री अहल्याबाईस ऐशीयांस घेऊन आले आहेत. त्यास प्रस्तुत उज्जनीस पाटीलबावांकडे गेले आहेत. बाह्यात्कारें जाबसाल असा करितात कीं, आह्मी इंग्रजांच्या पेंचांत इतके दिवस होतों. आतांसे त्यांच्याच सलुखानें आपलीं स्थळेंही मोकळीं केलीं. परंतु इंग्रजांचें पारपत्य यथास्थित झालें पाहिजे. यास्तव तुह्मी व आह्मी मिळून यांचें पारपत्य करावें अशा गोष्टी पाटीलबावांशीं बोलतात. या गोष्टींत सरकारचे वकील राजश्री नारो शिवदेव पाटीलबावांजवळ आहेत, त्यासही घेऊन पाटीलबावा गाइकवाडांच्या वकीलाशीं बोलतात भवति न भवति करितात, असें आहे. परंतु कुपिया बातमी कोणी सांगणारांनीं सांगितली जे, अंतस्थ ते गृहस्थ गाइकवाडांच्या विद्यमानें श्रीमंत व जळचरें ह्यांजकडून आले आहेत. बाह्यात्कारें बोलणें जाहलियावर अंतस्थही पाटीलबावाचें व त्यांचें बोलणें होत असतें. असेंही कुपिया वर्तमान ऐकिण्यांत आलें आहे. उज्जनीहून वकील सरकारांत लिहीतच असतील. ऐकिलें तें वर्तमान सेवेशीं लिहिलें असे. सत्य मिथ्या देव जाणे. होळकरांच्या लष्करांतून कोणी गृहस्थ येथें आज काल आले आहेत. त्यांची जबानी वर्तमान कीं, तुकोजीबावा व नारो गणेश वद्य पंचमी षष्ठीस येथें येणार; असेंहि सांगतात. दुसरें बोलतात कीं, पाटीलबावाविषयीं तुकोजीबावाच्या चित्तांतही तिरस्कारच आहे. परंतु, विप्राचा निश्चय पाटीलबावाशींच बळकट आहे. तें सूत्र एक आहे. खानदेशचें वर्तमान स्तिंबितच आहे. एक लढाई जाली. यांणीं त्यास हटविलें ऐसें बोलतात. नवीन वर्तमानः उज्जनीहून एक गृहस्थ आला, त्यांनीं वर्तमान सांगितलें जे, पाटीलबावांनीं आंबोजी इंगळे यांची रवानगी ग्वाल्हेर प्रांतीं करितात. सात आठ हजार फौज देऊन त्यांजकडील इंगळे व होळकरांकडील बापू होळकर यांजबरोबरही चार पांच हजार फौज, एकूण दहा बारा हजार फौजेनिशीं, उभयतांकडील फौजांची रवानगी करणार. बापू होळकराची यांणीं समजुती करून आपल्याकडेस घेऊन आले. अवाईचें वर्तमान आहे कीं, तुकोजीबावा इंदुरांतून बाहेर निघतेसमयीं मुहूर्त सुधे नव्हते, यास्तव त्रयोदशीस माघारे इंदुरांत गेले. वद्य तृतीयेस मुहूर्त काढून, बाहेर निघून, षष्ठी सप्तमीस येथें येणार, अशी वदंता आहे कुपिया वर्तमान आहे कीं, तुकोजीबावाचें लक्ष बाईजवळ फार आहे. परंतु कार-

भाऱ्याची व रखमाबाईची चित्तप्रशस्तता उज्जनीचे मसलतीवर फार आहे. त्यांचे आज्ञेंत वर्तावें, असेंही नानाप्रकारें बोलतात. येथें बाईजवळीलच कोणी कोणी बोलतात जे, यंदा गुजराथची मसलत फसली ह्मणून श्रीमंत खट्टे आहेत. सरदारापैकीं एकाचा अटाहास फार, परंतु उपयोग कोणताही घडला नाहीं. यास्तव अलीकडल्यास बोलावून, त्यांची पाठ थापटून, मसलतीस उपयोगीं पडावें, या अर्थीं एकांतपत्रें सरकारचीं, राजश्री तात्यांच्या विद्यमानें तकारनामकां आलीं होतीं. त्या अर्थीं हे बाहेर निघून, महेश्वरचें नांव करून निघून पुण्यास यावें, असे योजनेनें बाहेर निघाले होते. परंतु तेंही वर्तमान पलीकडे कानभ्रष्ट जालें, या अर्थीं त्यांनीं अटकाविलें, असेंही येथें कितीक बोलतात. अहल्याबाई आपले जागां स्तिमित आहेत. होतां होतां काय होईल तें पाहावें. असो. येथील मानस पाहतां, येथील लक्ष धन्याच्या पायांशीं खचित आहे. मजला वारंवार पुसतात कीं, पुण्याकडून कांहीं तुमचीं पत्रें येत नाहींत, तें कां? डांकेबरोबर छ १ मिनहूचें पत्र आलें, तें परभारा बाईजवळीच गेलें. त्यांनीं लाखोटा फोडून पाहिला. त्यांत मजकूर हाच होता जे, तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. वर्तमान विदित जालें. यावरही बारीक मोठें वर्तमान लिहित जाणें. पत्र लहान होतें. चारपांच ओळी होत्या. त्यावरून हांसूं लागली जे, इतकें लांबचें पत्र एवढेंसें! कोऱ्या कागदाची चौकशी फार आहे, असें बोलली. मजकडेस पाठवून दिलें. तेथून काय पत्रांत मजकूर येतो तें पहावें. आपल्या विषयीं श्रीमंतांची मर्जी कशी काय लिहितात, हें लक्ष येथें फार आहे. छ १७ मिनहून राजश्री सुलतानजी लांबहाते पन्नास स्वारांनिशीं येथें येऊन महेश्वरीवर उतरले. येतांच भेटीस येणार होते. बाईनीं सांगून पाठविलें जे, बोलावूं तेव्हां या. तदोत्तर संध्याकाळीं जासूद बोलावूं पाठविले. सुलतानजीबावा पालखींत बसून दहा माणसांनिशीं आले. बाईस कुरनिशा करून बसले. बाई व मावशीबाई उभयतांच होत्या. बाई फार रागें भरून बोलली. यांणीं बहुत नम्रतेनेंच उत्तरें केलीं. चार घटका बसले होते. हा बावा बोलला कीं, सकाळीं मजला विनंती करणें ती करीन. बहुतकरून जाबसालामध्यें मावशीबाईच फार आहे. पुढें जाबसाल काय होतील, ते सेवेसी लिहीन. सुलतानजीबावामागून बापूजी होळकर येतात. त्यांजमागून रखमाबाई होळकर. तेही दहा विसा स्वारांनिशीं येतात. तुकोजीबावांचेंही अंतस्थ बहुत नम्रतेच्या चिठ्या येतात. अशी घटवटना येथें आहे. दुसरेंही येथें बोलतात जे, तुकोजीबावा परभारें पुण्यास जाणार. काय होतें तें पहावें. खानदेशांतील वर्तमानः—केसो कृष्ण यानें पांच सात जागा घेतल्या, सरकारचे नंदुरबार परगणे येतांना घेतले. राजश्री गणेशपंत बेहरे व होळकरांची फौज सारे तीन चार हजार आहेत. परंतु मुलूख फार लुटितात. त्यांचें कांहीं होत

नाहीं. राजश्री तात्या मातबर फौजेनिशीं बऱ्हाणपुराजवळ येते, तर हे दोघेही सरदार लगी लागत. येथीलही मर्जी अशीच आहे सेवेसी श्रुत होय. खर्चास कांहीं नाहीं खर्चायाची विपत्ति फार आहे. दहा महिने जाले, दोनशांची वरात पाठविली होती. तीनशें रुपये येथें कर्ज जालें आहे. स्वामी कृपाळू, समर्थ. तुकोजीबावाही एक दिवस इंदुरास जाऊन मुहूर्त टाळून रात्रीं निघून आले. तेथून कूच केलें. उदईक घाटीं उतरतील, असें वर्तमान येथें आलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति"

---

**लेखांक २९.** ता. १८ नोव्हेंबर इ. स. १७८०.
मि. कार्तिक वद्य ७ शके १७०२.

"चंद्र सोळा १६ मिनहूचें वर्तमानः–अहल्याबाईनीं गुलजारखानाच्या शोधास जागां जागां पत्रें पाठविलीं होतीं. त्यास रामपुरा व बिजागड येथून काल वर्तमान आलें जे, गुलजारखान पलीकडे पहाडांत गेला. धिंगडखान ह्मणून भिल्ल मातबर जमियतीनिशीं आहे. तेथें त्याजवळ गुलजारखान आहे. ही बातमी आल्यावर बाईनीं मजलाही बोलावून सांगितलें, अशा पहाडांत कसें करावें ह्मणाली. मींही विनंती केली जे, आपण इकडून त्याच्या शोधास फौज पाठवावी. मी तिकडून विसाजीपंतासही लिहितों. तिकडून त्यांचीही फौज येईल. इकडून आपलीही फौज जावी. त्यास बाईनीं मान्य केलें. पांच सातशें फौज पागा वगैरे शिलेदार व बापूजी होळकरच जाईन ह्मणतात. पहावें. आज उद्यां फौजेची रवानगी होईल. तिकडून विसाजी आप्पाजी फौजसुद्धां व पाराजीपंत आपल्या जमीयतसुद्धां व भगीरथ शिंदे ऐसे तिकडून पहाडाच्या बरोबरीनें पिच्छास आहेतच. बाईनींही आपल्याकडील पागा शरीफखान तीनशें लोकांनिशीं व यशवंतराव फणशाचें पथक तीनशें, असें रवाना केलें. चंद्र २० मिनहूस पागा (रेवा) पार जाली. फणशाचें पथक उदईक रेवापार होईल, व सेंदव्यासही संताजी होळकरांस बाईनीं लिहिलें आहे जे, पन्नास स्वार व दोनशें पायदळ पहाडचें हवें. माहितगार या फौजेबरोबर देऊन गुलजारखानाच्या शोधास रवाना करणें ह्मणून पत्रें लिहिलीं आहेत. सुलतानपूर नंदुरबारच्या नाक्यांसही बाईनीं पत्रें पाठविलीं आहेत कीं, गुलजारखान त्या वाटेनें सुरतेस चालला, तर अटकावून आह्मांस लिहून पाठवणें. गुलजारखान राजमहाल पहाडांत गेला. उकर्डा भिल्लांचा नाईक आहे, त्याजकडे गेला. माधवराव बांडे ज्या आळीस गेले होते तिकडे गेला. जमियत खानमजकुराजवळ फारशी नाहीं. पंचवीस स्वार व दोनशें पायदळ इतक्यानिशीं आहे, ह्मणून खबर आज आली. सुरतेकडील वर्तमानः–आज ब्राह्मण तेलंग आला. त्यानें सांगितलें जे, श्रीमंत दादासाहेब फार जलदीनें बाहेर निघणार. मुहूर्ताची योजना करितात. वसईस इंग्रजांचीं पलटणें

गेलीं आहेत. त्यांचे पुस्तपन्हाईस आणखी दोन पलटणें व एक इंग्रज मातबर पालखीनिशीन ऐसे गेले. व मुंबईवाल्यास वरचेवर सुरतेहून ताकिदा जातात जे, वसईकडे जो पाहिजे तो सरंजाम रवाना करणें. मराठ्या फौजा आल्या नाहींत तोंवर वसई सर करणें ह्मणून. येथें दरबारांत बोलत होते जे, वसई जेर आहे; आणि श्रीमंतांनीं हुजुरात व उभयतां सरदारांच्या फौजा ऐसी रवाना केली आहे. ते घांटमाथां फौजा जाऊन पोंहचल्या. लवकरीच फौजा वसईस जातील. बाई बोलली जे, ये समयीं सरकारची फौज व आंगरे व फरासीस एकत्र होऊन फरासीसांस मुंबईस लावावें, आणि फौज व आंगरे यांनीं वसईची पुस्तपन्हाई करावी. ह्या तरतुदी श्रीमंतांनीं तेथें केल्याच असतील. असें बोलत होती. गुलजारखानाच्या पारिपत्यास बापूजी होळकरास पाठविणार होते, परंतु त्यांचे लोक ऐकेनात. लोकांनीं गवगवा केला कीं, आमची तलब भरून देणें. यास्तव ते राहिले. खेचीवाड्यांत वरूण ह्मणून सरकारचा महाल आहे. त्यास मदुसूदनगड दादासाहेबांच्या जप्त्या बसल्या त्या समयीं राजाराम गोविंदाकडे मदुसूदन-गड श्रीमंतांनीं दिला होता. जप्त्या उठल्या ते समयीं, राजाराम गोविंद, तो गड आठ हजारांवर, खेचीचे राजाचे भाऊबंद होते त्यांजकडे देऊं लागला. ते समयीं खेचीच्या राजानें सावकाराजवळ आठ हजारांस गहाण ठेऊन, रुपये राजारामपंतांस देविले. तो गड सावकाराकडेच आहे. त्यास होळकरांचें कर्ज खेचीवाल्याकडे कांहीं होतें, त्याबद्दल तेथील राजाचा दिवाण, येथें कर्ज वारायास आला होता. त्यास ते जाते समयीं, बाईनीं मजला सांगितलें जे, सरकारचा मदुसूदनगड याचे विद्यमानें सावकाराजवळ ठेविला आहे; तो जाबसाल यांजकडून करून घ्या; ह्मणून मजला सांगितलें. त्यावरून मीं त्यांजकडे माणसें पाठविलीं. त्यांनीं बाईस सांगितलें. बाईनींही सांगितलें जे, मदुसूदनगडचा जाबसाल यांसीं करून जाणें. त्यावरून त्यांनीं आपला वकील पाठविला. आह्मांसीही बोलावून नेलें. त्यांनीं सांगितलें जे, राजाराम गोविंद आमचे दायादांच्या बहाला करून आठ हजार रुपये त्यास मागत होते. ते देतही होते. आह्मांस कळल्यावर आह्मीं पर-भारां सावकाराजवळ आठ हजारांवर गहाण ठेऊन राजाराम गोविंदास रुपये दिले. गड तुमचा, आह्मीं असा राखिला आहे. सावकाराचा रुपाया देणें आहे. गड तुमचाच आहे. आह्मांस कांहीं अभिलाष गडाचा नाहीं. दुसरें ते बोलले जे, वरूण महाल सरकारांत आहे. त्याचा ऐवज वसूल काय होतो, आणि सरका-रांत ऐवज काय जातो, हा शोध सरकारांत नाहीं. वसुलाप्रमाणें ऐवज सरकारां-तही पोंहचत नाहीं असें आहे. या अर्थी एकंदर ठराव करून, अमका ऐवज

सरकारांत द्यावा असा निश्चय करून तो महाल आमचे स्वाधीन केला, तर कराराप्रमाणें ऐवज आह्मी क्षेपनिक्षेप पावता करूं. आह्मी आपले वकील तेथें पुण्यांत ठेऊं, व श्रीमंतांस भरंवसा न पटे, तर आपला भाई बेटे सरकारांत चाकरीस ठेऊं दुसरें, सरकारच्या फौजा हिंदुस्थानांत आल्यास हजार दोन हजार फौजेनिशीं चाकरी करूं, परंतु शेर पीठ पोटास द्यावें. राजेरजवाडे अगत्य लागल्यास फौज जमा करूं, असे इतबाराच्या गोष्टी फार बोलले. हें वर्तमान बाईसी सांगितलें. बाईही बोलली जे, खेची (कर) इमानी आहेत त्यांजवरून अंतर पडणार नाहीं, असें दिसतें. सरकारची मर्जी ज़शी असेल तसें करितील. तुह्मी याप्रमाणें लिहून तपशीलवार पाठवा. येविषयीं काय आज्ञा आली ह्मणजे त्यांच्या वकिलासी सांगूं. दुसरें वर्तमान ऐकिलें जे, इंग्रजांनीं श्रीमंत दादासाहेबांस वसईचा किल्ला लिहून मागितला. त्यास दादासाहेब बोलले जे, किल्ला आह्मांस देणें नाहीं. वरकड कित्येक प्रकार जे तुह्मांशीं बोललों आहों, ते खचितच आहेत. त्यावरून इंग्रजांचे मर्जीस ठीक न पडलें. यास्तव सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई व अमृतराव यांनीं वसई लिहून दिली. दादासाहेबांच्या नांवचीं पत्रें शिक्कयानिशीं करून दिलीं. तें वर्तमान दादासाहेबांस कळलें. फार रागें भरले. बाईशीं व श्रीमंतांशीं कडवीं भाषणें फार जालीं. अमृतराव वसईस इंग्रजांच्या कुमकेस जाणार. याप्रमाणें वर्तमान एका ब्राह्मणानें सांगितलें. सत्य मिथ्या देव जाणे. पाटीलबावांकडील शिवाजी नारायण येथें आहेत. ते चंद्र २० रोजीं संध्याकाळीं बाईशीं बोलले जे, पाटीलबावांनीं श्रीमंतांजवळ अट घातली आहे कीं, आसेरीचा किल्ला खालीं करून द्यावा अगर नगरचा किल्ला द्यावा. या दोन्हींतून एक स्थळ दिल्याशिवाय उभयतांनींही तेथून कूच करूं नये. त्यास बाई बोलली जे, सध्यां दोन्हींतून कोणतें स्थळ देतील? त्यांनीं उत्तर केलें जे, सध्यां नगर देणार. नगरचे किल्लेदारांस शिवनेरचा किल्ला द्यावा असें नेमलें आहे. असें बाईनीं ऐकून घेऊन, दों घटका मजला बोलावून, एकांतीं हें वर्तमान सांगितलें. बाई बोलली जे, श्रीमंतांचें असें व्हावें, आणि यांनीं ह्या अडी घालाव्या! वसईस इंग्रजांचा शह पडला आहे. त्या स्थळास उपद्रव करितात, आणि यांस श्रीमंतांच्या घरांत काय आहे तें आपण घेयाची हांव सुटली आहे, असा जमाना आला! बाई बोलली जे, श्रीमंतांनीं कांहीं न केलें. संग्रहींची फौज व हुजरात तोडली. असो. भगवतूइच्छा! दैवाच्या गोष्टी आहेत. मीही पेशजीं सरकारच्या पत्रान्वें बोललों. त्याचें उत्तर बाईनीं केलें जे, राजश्री तात्या विनंती करतील. राजश्री बजाबाची स्त्री जेजुरीजवळ वारली, हें कागदपत्रीं वर्तमान व सकारनामकाचें हेंच वर्तमान बाजारी उठलेलें आहे. राजश्री खंडेराव त्रिंबक याजकडे विसाजी आप्पाजींनीं पत्रें लिहिलीं

होतीं. मींही पत्र लिहिलें होतें. त्याचें त्यांनीं उत्तर पाठविलें आहे. तेंच पत्र सेवेसी पाठविलें आहे. दिल्लीकडील वर्तमान पादशाहाजवळ दिवाण नजीबकुलीखान होता. त्याचा चेला नजीबखान-जो हिंदुस्थानांत पंचवीस हजार फौज घेऊन फिरत होता-त्यास पादशाहाचें व दिवाणाचें एकचित्त होऊन, या नजीबखानास नाबूद करावें, हे मसलत त्यांनीं केली. तें वर्तमान नजीबखानास कळलें. त्यावरून नजीबखान तेथें जाऊन, दिवाण व आपण एकांतास गेले. तेथें नजीबकुलीखान दिवाणास नजीबखानानें मारून टाकलें. आतां नजीबखानच पातशाहाजवळ आहे. जयनगरच्या राजानेंही हिंदुस्थानांत धूम केली आहे. चहूंकडे गर्दी जाली आहे. हें वर्तमान बाईचें येथें आलें. तें सेवेसीं लिहिलें असे विज्ञप्ति."

---

**लेखांक ३०.** ता. २० नोव्हेंबर इ. स. १७८०.

**श्रीमंगलमूर्ति.** मि० कार्तिक वद्य ९ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ जिल्कादपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामीच्या कृपावलोकनें-करून वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील व श्रीमंत दादासाहेबांकडील वर्तमान पेशजी विनंतीपत्रीं लिहून, डाकेबरोबर रवाना केलीं आहेत. सांप्रत श्रीमंत दादासाहेब सुरतेसच आहेत. अद्याप सल्ला बिघाड हा कांहीं ऐकिल्यांत येत नाहीं. वर्तमान स्तिंबित आहे. इकडील वर्तमान तरः-राजश्री बापूजी होळकर यांच्या फौजेच्या देण्याचा राडा पडला आहे. अद्याप कांहीं निकाल होत नाहीं. अहिल्याबाई ह्मणतात जे, तुह्मी फौजेसुद्धां वाफगांवास जाणें. आह्मीं तुह्मांस कोठून काय द्यावें ? तुकोजीबावाकडे जा. येथून दाहा कोस गेल्यावर एक रोजमुरा तुह्मांस देऊं. लोक ऐकत नाहींत. सारी तलब तुह्मांजवळूनच घेऊं ह्मणतात. शिंद्याकडील कारकून शिवाजी नारायण व भगवंतराव ऐसे येथें आहेत. तेही नित्य दंगे धरणी करितात. येथें बाई कोणी महालास कमाविसदार योजून, रसद घेऊन सिंद्यांकडील कारकुनास द्यावी, वराता कराव्या, तों तुकोजीबावाची जप्ती त्याच महालावर येती; याप्रमाणें येथील वर्तमान आहे. पहावें कसें होईल. आपल्याकडील वर्तमानाची बाजारी अफवा जेः-श्रीमंत नानासाहेब पुण्याहून जांबगांवास राजश्री पाटीलबावांकडेस गेले आहेत. पाटीलबावांचे समजाविशीस गेले आहेत. होळकर श्रीमंतांसीं रुसून आहेत. त्यांचीही समजाविश पाटीलबावांचे विद्यमानें होणार. वसई प्रांतीं इंग्रेजांकडील एक कंपू व पांचशें तुरकस्वार सरंजामसुद्धां गेले आहेत. ते कांहीं वसईच्या खटपटींत आहेत. यास्तव श्रीमंत वसईकडे कांहीं फौज पाठविणार.

दुसरें वर्तमानः—हैदरनायकाचा सल्ला झाला. तीसा लक्षांवर कर्नाटकची मामलत चुकली. वीस लक्ष रुपये त्यांनीं नक्त पाठविले. दहा लक्ष अखेर सालीं देणार. तुंगभद्रेअलीकडे हैदरखानानें ठाणीं घेतलीं होतीं, तीं त्यानें सोडलीं. याप्रमाणें आपल्याकडील वर्तमान येथें बोलतात. येथें बाईचीं कार्तिकमासचीं दीपदानें व ब्राह्मणसंतर्पणें व श्रीतुलसीचीं लग्नें वगैरे धर्म चालतच आहे. अलीकडे छ १२ मीनहूस सुरतेकडील वर्तमान आलें जे, श्रीमंतांस सुरतेंत दादासाहेबांच्या शरिरास पान्याचा उपद्रव जाला होता. अंगास जागां जागां फोड आले होते. त्यास इंग्रजांनीं औषधी उपाय करून उपद्रव दूर केला; परंतु हवालदिल आहेत. इंग्रेज जे मसलत करणें ते दादासाहेबांशीं करीत नाहींत. निराळींच खलबतें करितात. दादासाहेबांस दरमहा खर्चास चाळीस हजार रुपये देत असतात. दादासाहेबांजवळ जमीयत दीड दोन हजार फौज मऱ्हाटी, व चार पलटणें इतकीं आहेत. लोकांची खर्चाची गिराणी फार आहे. नाटकशाळांमुळें सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई ही बहुत रुष्ट आहेत. दादासाहेबांस ज्यानें जे मसलत सांगितली, तें बरेच ह्मणतात. सल्ला-मसलत तोडमोड कांहींच होत नाहीं. बाई व अमृतराव इतकी मात्र जे गडबडी करणें त्या करितात. इंग्रेजांसही दादासाहेबांचा प्रकार कळला. त्यावरून सलाह मसलत जें करणें तें इंग्रज आपल्या मंडळीनशींच करितात. प्रस्तुत सरकारचा व इंग्र-जांचा बिघाड जाला, असें इकडेही ऐकिल्यांत आलें. इंग्रेजांनीं ममईचीं पलटणें कुमकेस आणविलीं होतीं, तीं माघारीं मुंबईस पाठविलीं. त्यासमागमें आणखीही सात पलटणें रवाना केलीं त्यास दोन मसलती मुंबईवाल्यांस लिहून पाठविल्या आहेत जे, वस-ईस उपद्रव लावावा; वसईचे कुमकेस श्रीमंत फौज पाठवितील, ते फौज फिरून माघारे घाट चढूं देऊं नये; व तमाम घाट बंद करावे. इकडून सुरतेकडून इंग्र-जांची चाल जाली ह्मणजे सहजच साऱ्या फौजा या तोंडावर येतील. पुण्याजवळ फौज राहाणें तर थोडी राहील. तेव्हां मुंबईवाल्यानें पुणेंप्रांतीं धूम करावी. असा दुरोख शह देयाची मसलत इंग्रजांची जाली आहे. याप्रमाणें धन्यास वर्तमान कळ-लेंच असेल. येथेंही सुरतेहून दोघे ब्राह्मण एका गृहस्थाकडे आले. त्यांनीं हें वर्त-मान सांगितलें. केवळ अप्रमाण हें वर्तमान नाहींसें दिसल्यांत आलें. ऐकिलें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. राजाराम गोविंद अद्याप मवाशांतच आहे. परंतु बाईचीं सुर-तेहून वरचेवर पत्रें मशारनिल्हेस येतात. हेहीं लवकरीच जाणार. फत्तेसिंग गाय-कवाडाचें वर्तमान त्या ब्राह्मणानें सांगितलें जे, दादासाहेबांनीं गायकवाडास पत्रें पाठविलीं होतीं जे वीस लक्ष रुपये खर्चास पाठवून देणें व बारा हजार फौजेनशीं चाकरीस लवकर येणें, अशीं पत्रें गायकवाडाकडे गेलीं आहेत. प्रस्तुत गायकवाडा-

कडेही लोकांचा दंगा आहे ह्मणून ऐकिलें. येथें बापोजी होळकराची तीन हजार फौज चांगली आहे. परंतु या लोकांचाही तलबेचा निर्गम अद्याप कांहीं झाला नाहीं. बाईच्या बोलण्यांत आहे कीं, या लोकांचे तलबेची सरंजामी कोठेही महालीं करावी, तर तेथें तुकोजीबावाची जप्ती येती. मग आह्मीं तरी कोठून काय करावें? लोकांस तुकोजीबावाकडे जा ह्मणतां तेही जात नाहींत. अशी भानगड पडली आहे. राजश्री विसाजी आप्पाजी यांनीं अहिल्याबाईस व मजलाही पत्रें लिहिलीं होतीं. त्यांत मजकूर कीं गुलजारखान बदफैली करून कोणीकडे पाहाडांत निघून गेला. पाहाडांत रामपुरानजीक बिज्यागडांत गेला आहे ह्मणून पत्रें येथें आलीं होतीं. त्यास बाईनींही संताजी होळकरास सैंदव्यास रामगडाकडे बातमीस माणसें पाठविलीं. तिकडील बातमी आली ह्मणजे बाई ह्मणाली, कीं फौज पाठवूं असें सांगितलें. आणखीही बाई बोलली जे, इतकी फौज असतां गुलजारखान पळून गेला ह्मणतात, यास काय ह्मणावें? तत्रापि तो पळून गेल्यावर पांचां दिवसांनीं कागद आह्मांकडे आला. येथून आह्मी बंदोबस्त करितों. पळाल्या मनुष्यास तों झाडाचे राऊत दिसतात. तो पाहाडांतून निघून कोणीकडून कोणीकडे गेला असेल हें कोण जाणे. दुरारोप मात्र आह्मांवर कीं यांचा तालुका असतां, हे बंदोबस्त करिनात, असें श्रीमंतांस वाटेल. पळून जाणारास एक वाट आणि पहाणारास शंभर वाटा. तितक्यांत इकडे झाडी व पाहाड व मवासा जागां जागां. अशामध्यें कोणीकडे पाहावें? सरकारच्या अपशब्दाचें कारण तुह्मी आह्मांवर करितां, असें बाई बोलली. परंतु जागां जागां पत्रें व माणसें पाठविलीं आहेत. खंडेराव त्रिंबक व देवासेकर पवार यांजकडे विसाजीपंताचीं पत्रें गेलीं. मींही लिहिलीं आहेत जे, सरकारची आज्ञा आहे जे, तुह्मीं उभयतां आपले फौजसुद्धां तयार होऊन, राजश्री विसाजी आप्पाजीजवळ जावें ह्मणून पत्रें गेलीं आहेत परंतु येतील असा भरंवसा दिसत नाहीं. दंगे धरण्याचा बोभाट लिहितील. सुरतेहून ब्राह्मण आला, त्यानें आणखीही वर्तमान सांगितलें जे, दक्षिणेंतून कोणी सरदारानें श्रीमंत दादासाहेबांस पत्र लिहिलें होतें जे आह्मी थोडक्याच दिवसांत फौजसुद्धां तिकडे येतों. ते प्रांतीं आलीयावर आपले मनोदयानरूप जे मसलत होणें ती होईल. तेथून उत्तरें त्यास गेलीं जे, तुह्मी ते प्रांतींच असां. आह्मीच जमाव इंग्रेजसुद्धां दक्षिणेस येतों. तिकडे आलियावर जे मसलत करणें ते करूं. याप्रमाणें परस्परें पत्रें गेलीं ह्मणून तो ब्राह्मण सांगत होता कीं हें वर्तमान खरें आहे. त्यानें सांगितल्याप्रमाणें सूचनार्थ सेवेसी लिहिलें असे. सत्य मिथ्या देव जाणे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ३१.** ता० २४ नोव्हेंबर इ० स० १७८०.

**श्रीगजानन प्रसन्न.** मि० कार्तिक वद्य १३ शके १७०२.

" सेवेशी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तारीख छ २५ जिल्कादपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील वर्तमान पेशजी विनंतीपत्रीं लिहून कासिदजोडीबरोबर व डांकेबरोबर सेवेसी रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान वेदमूर्ति राजश्री व्यंकटरमण शास्त्रीपासून सुरतेहून ब्राह्मण आला. त्यास सुरत सोडल्यास वीस दिवस जाले. पंधरा दिवसांनीं येथें आला. त्यानें वर्तमान सांगितलें जे, श्रीमंत राजश्री दादासाहेब मंडळीसुद्धां सुरतेसच आहेत. वरकड इंग्रज सारे लढवय्ये जितके होते, तितकेही मुंबईस गेले आहेत. जमाव करून वसईस कांहीं गेले आहेत. कांहीं जाणार. येथें वदंता आहे कीं, इंग्रजांचीं सत्रा जहाजें सुरतेहून वसईस गेलीं आहेत. आणीकही थोरलालीं जहाजें सुरतेस व मुंबईस तयार होत आहेत. तो ब्राह्मण एकांतीं सांगत होता जे, दादासाहेबांस इंग्रजांनीं उगीच आशेस लाविलें आहे. परंतु इंग्रजांचा मतलब हा आहे कीं, दादासाहेबांचा दाब दाखवून कोंकणपट्टीचे किल्ले तमाम घ्यावे, या विचारांत आहेत. इंग्रज आपलें काम करितात. शास्त्रीबावाही तेथें राहून राहून कंटाळले. दादासाहेब कांहीं देत नाहींत. त्यांसच खर्चाची आबळ आहे. यास्तव शास्त्री निरोप घेऊन इकडे येणार. इंग्रजांची इकडे देशांत येण्याची उमेद नाहीं. गुजराथचा मुलूख सुटला आहे, तोच फार आहे. मुख्य त्यांचा इरादा कीं, समुद्रकिनाऱ्याचीं स्थळें हस्तगत करावीं. या अर्थीं मुंबईस सरंजामाचा भरणा करितात. इकडे आतां इंग्रजांची आवाई फारसी पहिलेसारखी नाहीं. अंतरवेदींत मात्र एक कंपू आला आहे ह्मणतात. ग्वालेर प्रांतीं चार पलटणी आहेत. तिकडे सुज्यायेतदौल्याच्या मुलखांत थोडे थोडे आहेत. हिंदुस्थानांतही पातशाहाचे फौजेशीं व जैनगरवाल्याशीं लढाई होतच आहे. बारा परगणे जैपूरवाल्याचे नजीबखानानें घेतले. आणखी घेतच आहेत. पातशाहाचे फौजेजवळ इंग्रज नाहींत. इंग्रजांसारखीं काळीं तांबडीं पलटणें नजीबखानानें सजविलीं आहेत. तोफा मुबलक त्याजपाशीं आहेत. जैनगरवाल्यानें होळकराचीं ठाणीं जितकीं होतीं तितकीं उठविलीं. शिंद्यांचीं करवर समेंदी वगैरे दोन तीन ठाणीं आहेत. यांची फौज तिकडे कोणी न गेली तर तेही उठवितील. शिंद्याकडील अंबाजी इंगळे दहा हजार फौजेनिशीं ग्वालेरप्रांतीं जाणार. खानदेशांत मात्र दोन पलटणें दादासाहेबांकडील केसो कृष्ण दातार आहेत. धूम करितात. सरकारचे राजश्री गणेशपंत बेहरे व होळकराकडील हजार बाराशें फौज ऐशीं त्याजभंवताले आहेत.

## लेखांक ३.

श्री.

पु॥ "सेवेसी विज्ञापना. जी गोष्ट बोलिलों, ही घरीं पंतांस लिहून पाठवा. त्यांणीं पत्र लिहिलें. दोन दिवस यासंबंधीं बोलणें जालेंच नाहीं. पत्र आलें ते समयीं, फिरोन, गंगाधरराव, कोंडोबा, आह्मीं मातुश्रीकडे जाऊन विनंती केली कीं, असें जातीचें पत्र आलें आहे; आतां विनंति मान्य करावी. तेव्हां एक दोघे दुसरे जवळ होते. त्यांस काढून मातुश्री व तिघे आह्मी बोलायास लागली कीं, *'यास अनुताप झाला नाहीं. मी दर्शन घेत नाहीं. यास लोकलज्जा. तेव्हां पश्चात्ताप ,कांहीं नाहीं. लबाडी आहे. याची प्रकृति मजला ठाऊक आहे.' मीं विनंती केली कीं, आपण यास वाकफ आहां, तितके कोणी नाहीं. त्याजवर यांचें दुर्गुणाचेंच भाषण चाललें. मीं सांगितलें, 'आहे त्याप्रमाणें प्रायश्चित्त घेऊन एकटा येईल तर दर्शन होईल, येथें कांहीं रजबद्दल करूं नये. आनंदवल्लीस राहूं नये. मजपासून दहा कोसांवर सुखरूप रहावें.' त्याजवर मीं विनंती केली कीं, आहे पदार्थ तो निवेदन केला. याउपरी मर्जी. आह्मांस नानांची आज्ञा अशीच आहे. ह्मणून फिरून गोष्ट काढिली कीं, नानाचें मानस आपले मर्जीनें होईल तें करावें. याजकरितां बाळकृष्णपंत गद्रे मजकडे मुजरत पाठविलें कीं, आह्मीं दहा वर्षे श्रम केले; त्याचें सार्थक हेंच कीं, मातुश्रीची मर्जी रक्षावी. त्याजवर बहुत प्रसन्न होऊन हास्य केलें कीं, 'फडणीसपंत आमचे तसेच आहेत. खावंद कृपा करीत होते, त्याचें सार्थक केलें.' मग बोलली कीं, 'तुमचा खावंद गेला. त्याचे मागें श्रम साहस करून, त्याचीं उसनीं फार घेतलींत. श्रम भोगिले. ब्राह्मण्य रक्षिलें. याजमुळें मी येथें स्वस्थ राहिलें. नाहीं तर नारायणरायाचा काल होतांच, आनंदवल्लीस लक्ष-भोजन आरंभिलें; हें मी पाहून दुःखी जालें! तुमचा मनसुबा आला, तेव्हांपासून पंचवटीं वास केला. हें सर्व मजला समजतें. परंतु माझे पोटांतील दुःख गेलें नाहीं. दादाचें दर्शन, त्याचा सहवास, अति दुःखप्रद आहे. मीं ह्मटलें असें होत असलें तर करा, नाहीं तर तुह्मी चार दिवस मजजवळ राहून मग तेथील बंदोबस्त करा. दादाचा विश्वास धरूं नका. याची बुद्धि स्थिर नाहीं.' त्याजवर मी बोलिलों कीं, 'ही गोष्ट सर्वांचे मनांत आहे. मी पुण्याहून निघालों ते समयीं नानांनीं सांगितलें कीं, दादांच्या शपथा पूर्वी फार वेळ झाल्या आहेत, आतांही आह्मी करितों, परंतु विश्वास नाहीं. यांत एक गोष्ट आहे कीं, मातुश्रीचें दर्शन जाल्यावर त्याजपासून पायावर हात

---

* ह्या पत्राचा आरंभींचा बंद गहाळ झाला आहे. तो कोठें सांपडत नाहीं ही दुःखाची गोष्ट होय. राघोबादादा पेशव्यांनीं प्रायश्चित्त घेण्याचें कबूल केलें व आतां गोपिकाबाईची परवानगी पाहिजे ह्मणून हरिपंतप्रभृति मंडळी बाईस विनंति करण्यास गेली. त्या प्रसंगाचा या पत्रांत मजकूर आहे.

---

१. वाकफ=माहितगार, तरबेज. २. मुजरत=मुद्दाम, तेवढ्यासाठीं.

ठेऊन घ्यावा, ह्मणजे कांहीं तरी त्याचे मनास स्मरण राहील. याजकरितां दर्शनाची विनंती करितों. नाहीं तर कांहीं प्रयोजन नाहीं. तेव्हांही हाच जाबसाल कीं, 'मजला घोरांत घालूं नका. फडणीसपंत, तुह्मी, विश्वासू आहां व यशस्वी आहां. कळेल तसा बंदोबस्त करा.' आह्मीं विनंती केली कीं, 'सर्व यश आपला आशीर्वाद आहे.' तेव्हां बोलली कीं, 'माझा आशीर्वाद पूर्ण आहे. कांहीं तुह्मांस संकट पडणार नाहीं.' इतक्यास चौदा घटिका रात्र झाली. मी विनंति केली कीं, निद्रा करावी. राहील तें सकाळीं विनंति करीन. जालें वर्तमान बोलण्यांतील स्वामींस कळावें ह्मणून अंशतः लिहिलें आहे. रा॥ छ २९ साबान. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

* * *

## २१. सातारचे शाहू महाराज व कोल्हापूरचे संभाजी महाराज.

इ. स. १७३१ मध्यें सातारचे छत्रपति शाहूमहाराज व कोल्हापुरचे छत्रपति संभाजी महाराज ह्यांच्या राज्याच्या वांटणीबद्दलचा तहनामा ठरून, कोल्हापूर व सातारा हीं दोन्हीं संस्थानें विभक्त झालीं. ह्या तहास 'वारणेचा तह' असें ह्मणतात. अर्थात् कोल्हापूर व सातारा हीं दोन्हीं संस्थानें राजकीय दृष्टीनें जरी वेगवेगळीं झालीं, तरी दोन्हीं ठिकाणचे राजे परस्परांवर फार प्रेम करीत असत. शाहू महाराजांचें संभाजी महाराजांवर फार प्रेम होतें व संभाजी महाराजांसही शाहू महाराजांबद्दल फार आदरबुद्धी होती. संभाजी महाराजांनीं शाहू महाराजांस लिहिलेलीं पुढील दोन पत्रें वाचण्यासारखीं आहेत.

### लेखांक १.

"श्रीमंत सकलतीर्थस्वरूप राजश्रियाविराजमान्यराजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेसीः–

अपत्ये संभाजीराजे कृतानेक दंडवत विनंती उपरी येथील कुशल श्रीकृपें व वडिलांचे आशीर्वादें जाणोन, वडिलीं आशीर्वादपत्रीं कुशल वर्तमान सदैव लेखन करून समाधानपत्र पाठविलें पाहिजे. विशेषः–वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें, तें उत्तम समयीं प्रविष्ट झालें. कुशल वृत्त अवगत होऊन संतोषावाप्ति झाली. निरंतर याच रीतीं परामर्ष करणें वडिलांस उचित आहे. तीर्थस्वरूप मातुश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा ह्मणोन वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्परें विवेक होऊन लोकोत्तर उभयपक्षीं निरपेक्ष कीर्ति व्हावी, हेंच आह्मांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बाजी प्रभू यांसीं पाठवावयाविषयीं लिहिलें होतें; तेव्हांच पाठवावें, तरी त्याचे शरिरीं सावकाश नव्हतें. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसी आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करितील. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेत." (मोर्तब.)

## लेखांक २.

"श्रीमंत सकल तीर्थस्वरूप राजश्री दाजीसाहेब वडिलांचे सेवेसीः-

अपत्ये संभाजी राजे कृतानेक दंडवत विनंति उपरी येथील कुशल वडिलांचे आशीर्वादें जाणोन निरंतर आशीर्वादपत्र पाठवून परामर्ष केला पाहिजे. विशेषः— आशीर्वादपत्र पाठविलें तें व ममतापुरस्सर वस्त्रें व तरवारढाल आदिकरून जिन्नस पाठविला तो आशय यादीप्रमाणें प्रविष्ट झाला. त्याचे अवलोकनें व पत्रीं कित्येक ममतातिशय अर्थ लेखन केला, ते श्रवणें वडिलांचे अंतःकरणपूर्वक लोभाचा विस्तार राजश्री बावाजी प्रभू यांनीं सविषद लिहिला, ते दृष्टीं, संतोषाच्या कोटी जाहाल्या. तो विस्तार पत्रीं किती ह्मणोन लिहावा ? वस्त्रादि जें पाठविलें, तें परम प्रसाद ऐसें जाणोन घेतलें. श्रीमन्मातुश्री आईसाहेब आली, तें वर्तमान लिहावयासी आवकाशावरी पडलें. त्याचें कारण लिहिलें, तेंही अवगत जालें. तुह्मांपेक्षां अधिकोत्तर इतर तें काय आहे ? तुमचा परामर्ष न करावा ऐसें नाहीं ह्मणोन लिहिलें, तरी हे गोष्ट यथार्थच आहे. वडिलांचें निर्व्याज वात्सल्य तैसेंच आहे. आह्मांसही वडिलांपेक्षां इतर दैवत तें काय आहे ? वडिलीं वरचेवरी याच रीतीं सांभाळ करावा, हेंच वडिलांसही विहित. ये गोष्टीस वडिलांपासून अन्यथा काय निमित्य होईल ? बावाजी प्रभू यांनीं तुमचा चित्ताभिप्राय सविस्तर निवेदन केला, त्यासी राजश्री सुलतानजीराव निंबाळकर आलियावर यासी जे आज्ञा कर्तव्य तें केलें जाईल, ह्मणोन लिहिलें. तरी वडील आह्मांस पितृस्थानीं. आमचा मनोरथ सिद्ध करून आह्मांस संतोष पावावा व आमचा सर्व प्रकारें सांभाळ करावा हेंच वडिलांस विहित आणि कीर्तिरूप आहे. हा अर्थ, वडील सर्वज्ञ, वडिलांस अनवगतसा काय आहे ? तेच गोष्टीची प्रतीक्षा करीत आहे. वडिलांस उचित तें वडील करितीलच. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती." ( मोर्तब ).



## २२. शाहू महाराजांचा दरारा.

श्रीमंत छत्रपति शाहू महाराज यांचा पेशव्यांवर पुष्कळ दरारा असे. त्यांच्या हातून महाराजांच्या मर्जीविरुद्ध कांहीं गोष्ट घडली तर महाराजांस फार राग येत असे, व मग पेशव्यांना त्यांच्या पुढें नाकदुऱ्या काढितां काढितां पुरे वाट होत असे. बाजीराव, बाळाजी बाजीराव, चिमाजी आपा, सदाशिवरावभाऊ वगैरे पेशव्यांवर शाहूमहाराजांची गैरमर्जी झाल्याबद्दलचीं पत्रें केव्हां केव्हां दृष्टीस पडतात. तीं पाहून शाहू महाराजांच्या रागाची कल्पना करितां येते. अशा मासल्याचें एक पत्र येथें देतों. ह्या पत्रामध्यें, पेशव्यांनीं, कोल्हापूरच्या संभाजी महाराजांविरुद्ध

लढाई करणाऱ्या राणोजी घोरपडे व भगवंतराव रामचंद्र ह्या दोन सरदारांस सैन्याची कुमक दिली, ह्मणून शाहू महाराज ह्यांनीं, चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी आपा ह्यांची चांगली कानउघडणी केली आहे.

"राजमान्य राजश्री चिमणाजी बल्लाळ यांस आज्ञा केली ऐसी जेः—चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसी राणोजी घोरपडे व भगवंतराव रामचंद्र यांणीं अमर्यादा केली. त्यांचें पारिपत्य चिरंजीव राजश्री करीत असतां, तुह्मीं आपणांकडील पांच सातशें राऊत घोरपडे यांचे मदतीस पाठविले आहेत, ही गोष्ट उत्तम कीं काय? स्वामींचा व चिरंजीव राजश्रींचा द्वैतार्थ नसतां, घोरपडे यांचे कुमकेस तुह्मीं फौज पाठवून, चिरंजीव राजश्री यांकडील प्रांतास उपसर्ग करावा, ही गोष्ट कार्याची नाहीं हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी पत्रदर्शनीं आपणाकडील फौज माघारी आणविणें. तेणेंकडून चिरंजीव राजेश्रीचे चित्तांत कोणे गोष्टीचा विपर्यास न ये, तो अर्थ करणें. त्या प्रांतें लोकांचे कबिले आहेत, तेच लोक गेले, ह्मणून उत्तर लिहून पाठवाल, तरी ते गोष्टी कार्याची नाहीं. चिरंजीव राजश्रीचें पत्र स्वामींस आलें तेंच बजिन्नस पाठविलें आहे, त्यावरून कळेल. चिरंजीव राजश्री यांनीं इतकें लिहिलें असतां, फौजेविषयीं पर्याय लावून लिहाल, तरी सर्वार्थी न लिहिणें. पत्र पावतां-क्षणीं जी फौज गेली असेल, त्यांस पत्रें पाठवून माघारी आणवणें. त्यास उजूर एकंदर न करणें. याविषयींची आज्ञा राजश्री दादोबा यांस केली आहे. ते लिहितील त्यावरून कळेल. "तुह्मी सूज्ञ असतां, लोकांच्या सांगण्यावर घोरपडे याचे कुमकेस फौज आह्मां न विचारतां पाठीली, हें उचि न केलें. तर देखतपत्र फौजेस बोलावनें. रा‍ा चा व आमा सख्य आहे, ही जानतच आहां. जर फऊज बोलावित नाहीं, तर आह्मी चित्तांत नाखुस होऊं. तर पत्रदरसनीं बोलवा. नाहींतर आह्मी त्याचं साहित सरवस्व करू लागत. हेंही तुह्मी जानतच आहां. बहुत काय लिहिन. सूज्ञ असा.*"



* शेवटच्या अवतरणचिन्हांतील ओळी खुद्द शाहू महाराजांच्या हातच्या आहेत. त्यावरून महाराजांच्या मराठी भाषेचा मासला कळून येतो. ह्या अशुद्ध मराठीची शुद्ध मराठी येणेंप्रमाणें:—

"तुह्मी सुज्ञ असतां लोकांच्या सांगण्यावर घोरपडे यांचे कुमकेस फौज, आह्मांस न विचारतां पाठविली, हें उचित न केलें. तर देखतपत्र फौजेस बोलावणें. राजश्रीचें ( संभाजी महाराजांचें ) व आमचें सख्य आहे हें जाणतच आहां. जर फौज बोलवीत नाहीं, तर आह्मी चित्तांत नाखुष होऊं. तर पत्रदर्शनीं बोलवा. नाहींतर आह्मी त्याचें साहित्य सर्वस्वीं करूं लागतों हेंही तुह्मी जाणतच आहां. बहुत काय लिहिणें. सुज्ञ असा."

१ कबिले=बायकामुलें. २ उजूर=हरकत, विलंब.

## २३. अद्भुत चमत्काराची नोंद.

पेशवाईमध्यें, कोठें उल्कापात, धरणीकंप, वगैरेसारख्या किंवा इतर अद्भुत चमत्काराच्या गोष्टी घडल्या, तर त्यांची नोंद ठेवून, त्या त्या ठिकाणच्या गांव-कामदारांनीं किंवा सुभेदारांनीं त्या त्या गोष्टी हुजूर कळविल्या पाहिजेत, अशी सक्त ताकीद होती. अशा प्रकारच्या अद्भुत गोष्टी त्या वेळच्या लोकांनीं लिहून हुजुरास कळविल्या आहेत व कित्येक प्रसंगीं आपल्या अज्ञानाचें व भोळसरपणाचें प्रदर्शनही केलें आहे. तें पाहून कोणासही कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. अशा पत्रांपैकीं एक मासल्याचें पत्र येथें सादर करितोंः—

श्रीराम.

"सेवेसीं विज्ञापना:—कसबे शेळगांव परगणा जालनापूर येथें पौष शुद्ध १४ रविवारीं खलवाडीजवळील मळा राघो शिंदा वाहातो. त्या विहिरींत दोन घटका दिवस राहातां, घागर पाण्याची भरलेली निघोन वरती होती. मळेकरांनीं पाहिली. आश्चर्य ह्मणून दहापांच लोकांस त्यानें सांगितलें. लोक पहावयास गेले. तों सायंकाळ झाला. तैसीच चार प्रहर रात्र होती. दुसरे दिवशीं सोमवारीं पूर्णिमेस दोन घटिका दिवस चहडल्यावर घागर पाहिली. तों तैसीच उदकानें भरलेली उदकावर होती. ते काहडोन गांवांत आणली. घागर चैत्रमासीं विहिरींत कुणबी याजवळून पाणी आणावयास गेला होता, तेव्हां हातची पडली होती. ते दहा महिने उदकांत राहिली. पौष शुद्ध १४ स येणेंप्रमाणें निघाली. गांवांत आणून, पूजा करून, पुनः त्या विहिरींत सोडून दिल्ही. आश्चर्य वर्तमान ह्मणून सरकारांत विनंति करणें ऐसें पत्र आलें आहे. तरी विनंति सादर केली असे. हे विज्ञप्ति."



## २४. जयपूरच्या राजाचें भागवत.

जयपूरचा राजा प्रतापसिंह ( इ. स. १७७९–१८०३ ) ह्यास कलाकौशल्याची अभिरुचि विशेष असून, त्यानें आपल्या पदरीं उत्तम चित्रकार व मिनेगार ह्मणजे मिन्याचें नक्षीकाम करणारे लोक बाळगले होते. ह्या राजानें सदर चित्रकारांकडून श्रीभागवताचा ग्रंथ सचित्र तयार करविला आहे. प्रत्येक पृष्ठावर कथानुसंधानाप्रमाणें सुंदर रंगीत चित्रें काढलीं आहेत. तीं चित्रें पाहिली ह्मणजे जयपुरास १८ व्या शतकामध्यें चित्रकला कशी होती, तें चांगलें व्यक्त होतें. ह्या ग्रंथासाठीं पुष्कळ द्रव्य खर्च झालें असून, हें काम कित्येक वर्षें चाललें असावें ह्यांत शंका नाहीं. हा ग्रंथ फार अप्रतिम असून, त्याचें मूल्य इतिहासदृष्टीनें विशेषच मानिलें पाहिजे. ह्या ग्रंथाची बातमी नाना फडणविसांस समजली. त्या वेळीं त्यांनीं शिंद्यांचे दिवाण

आपाजीराम दाभोळकर ह्यांस ह्या ग्रंथाचा शोध करून तो पाठविण्याबद्दल लिहिलें. त्यांनीं नानांस पाठविलेलें उत्तर वाचण्यासारखें आहे. तें येणेंप्रमाणें:—

श्री.

"विज्ञापना ऐसीजे:—छ. १ जमादिलावलचीं पत्रें सादर जालीं. त्यांत एके पुरवणीपत्रीं आज्ञा जे, 'जयपूरचे राजांनीं श्रीभागवताचे चित्रांची पोथी तयार केली आहे ह्मणोन पुर्ता शोध आहे. येविसीं जैपूरकराचा कारभार होऊं लागेल, तेव्हां राजश्री पाटीलबावांस सांगावें कीं, तेव्हडी पोथी राजानें तयार केली आहे, ती मागून घेऊन, आह्मांकरितां पाठवावी. अथवा, तूर्त रायाजी पाटील त्या मसलतीवर आहेत, त्यांस एवढें आमचें घराऊ काम करावें ह्मणोन सांगोन करावें.' ऐशास येविसींचा मजकूर राजश्री रायाजी पाटील यांसी बोलून ठेविला आहे. तेही ह्मणतात, त्यांची आपली मामलत बनल्यास जरूर हें काम श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें करीन. परंतु सध्यां तर फाठ आहे. त्यास तुरुत घडत नाहीं. हें काम रहस्याचे पोटीं घडून येईल."

ह्यापुढील पत्रव्यवहार सांपडत नाहीं. परंतु पाटीलबावांच्या राजपुतान्यांतील राजकारस्थानामध्यें हा सर्वोत्कृष्ट ग्रंथ त्यांनीं मिळवून नानांस पाठविला, अशी माहिती मिळते. हा ग्रंथ अद्यापि अस्तित्वांत आहे.

* * *

## २५. जयपूरचा भोजराज मिनेगार.

जयपूरच्या कारागिरीबद्दलची प्रसिद्धी अद्यापि आहेच. तिकडील चित्रकार व इतर कारागीर दक्षिणेंत आणून मराठ्यांच्या राज्यांतही कलाकौशल्याची वृद्धि करावी असा नाना फडणविसांचा फार प्रयत्न होता. उत्तर हिंदुस्थानामध्यें भोजराज ह्मणून एक नामांकित मिनेगार होता. तो मिन्याचें काम फारच अप्रतिम करीत असे. त्यास दक्षिणेंत आणून दक्षिणी लोकांना मिन्याचें काम शिकवावें असा नानांचा हेतु होता. महादजी शिंद्यांनीं ह्या कारागिरास बोलावून लष्करास नेलें. तेथून राजाच्या बोलण्यावरून त्यास दोनशें रुपये खर्चास देऊन परत जयपुरास पाठविलें. जयपुर येथें गेल्यानंतर राजानें त्याच्या घरावर जप्ती बसविली व त्याजवळून जयपूर सोडून गेल्याबद्दल पैशाची मागणी केली. पुढें पाटीलबावांनीं हस्तें परहस्तें राजाची समजूत करून त्याच्या घरावरील जप्ती खुली केली. परंतु त्यास पुण्यास जाण्याची परवानगी मात्र मुळींच मिळाली नाहीं. ह्यासंबंधानें शिंद्यांचे दिवाण लिहितात:—

"भोजराज मिनेगाराचा मजकूर पूर्वीं तपशिलेकडोन लिहिलाच आहे. दोनशें रुपये खर्चास त्यास देऊन तो जयपुरास गेला. त्याजवर, त्याच्या घरावर राजानें पंचवीस तीस प्यादे चवकी बसवून भोजराजास धरून नेलें. त्याजवळ पैका मागत, हें

वर्तमान येथें आह्मांस कळलें. तेव्हां एका गृहस्थाचे हातून राजासीं बोलून, ह्यास सोडून देवविलें व घरावरील चवकी उठविली. परंतु पुण्यास जाण्याविसीं परवानगी देत नाहीं! त्याजमुळें तेथें अटकला आहे. आतां लष्करचे कोणी जयपुरास येत जात नाहींत. परंतु भोजराजास युक्तिप्रयुक्तीनें आणावयाचे उद्योगांत आहों. विना राजाचे परवानगीखेरीज कोणी शहराचे बाहेर निघूं पावत नाहीं. बाहेर निघावयास राजाची आज्ञा पाहिजे. रायाजी पाटील वगैरे या मंडळींतील कोणा एकाच्यानें सांप्रत हें कार्य घडत नाहीं!!"

ह्या पत्रावरून दक्षिणेंत विविधकलाकुशल कारागीर येण्यास त्यां वेळीं कशा अडचणी होत्या हें दिसून येतें; व त्यावरून उत्तर हिंदुस्थानांतील कारागिरांचा दक्षिणेंत कां प्रवेश झाला नाहीं त्याचीही थोडीशी कल्पना करितां येते.

* * *

## २६. ह्मसवडचे नागोजी माने.

ह्मसवड ह्मणून सातारा जिल्ह्यांत एक प्राचीन गांव आहे. ह्या गांवचे प्रसिद्ध देशमुख माने हे होत. माने हे मुसलमानी अमदानींत उदयास आलेल्या मराठे सरदारांपैकीं एक होत. त्यांच्या घराण्याचा इतिहास फार मनोरंजक आहे. हे मराठे सरदार, श्रीमंत छत्रपति राजाराम महाराज ह्यांचे कारकीर्दीपर्यंत, मुसलमानांच्या बाजूचे होते. परंतु नागोजी माने चंदीच्या लढाईत राजारामास येऊन मिळाले, व त्यांनीं चांगली कामगिरी करून मराठी राज्यास मदत केली. त्या वेळीं राजाराम महाराजांनीं त्यांस पुढील सनद दिली:—

श्री.

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १७ प्रजापती नाम संवत्सरे चैत्र बहुल नवमी मंदवार क्षत्रिय कुलावतंस श्रीराजाराम छत्रपति स्वामी यांणीं राजश्री नागोजी बिन रताजी माने यांसी दिल्हें अभयपत्र ऐसीजे:—

तुह्मी पूर्वीं तांब्राकडे होतेत. ऐसियासी स्वामींचें राज्य ह्मणजे देवताभूमि. या राज्यास तांब्रांचा उपद्रव न व्हावा, महाराष्ट्रधर्म राहावा, स्वामींच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी, या उद्देशें, स्वामींच्या पायांपाशीं एकनिष्ठता धरून, कर्नाटकांत चंदीचे मुक्कामीं स्वामीपासीं आलेती. येऊन विनंति केली कीं, आपणास देशांत सरदेशमुखीचें वतन करून दिल्हें पाहिजे. ता॥:—

| | |
|---|---|
| १ कसबे ह्मसवड येथील बारा वाडिया. | १ कर्यात दहीगांव. |
| १ कर्यात सांगोलें. | १ कर्यात भालवणी. |
| १ कर्यात आडपाडी. | १ कर्यात नाशरें. |
| १ कर्यात ब्रह्मपुरी. | १ कर्यात कासेगांव. |
| १ कर्यात अकलूज. | १ कर्यात...? |
| १ कर्यात मंगळवेढें. | १ कर्यात कलेढोण. |
| ६ | ६ |

एकूण महाल १२ बारा महालचें वतन द्यावया आज्ञापत्र देविलें पाहिजे ह्मणोन विदित केलें. ऐसीयासी तुह्मी स्वामिसेवेवर एकचित्तें वर्तत आहां. तुह्मांवर स्वामी कृपाळु होऊन नूतन सरदेशमुखीचें वतन सदहू बारा महालचें करून दिल्हें असे. तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्र अनुभवून सुखरूप खाणें. निदेश समक्ष. मोर्तब."



## २७. पेशवाईतील राजकारणांत ज्योतिष्यांची सल्ला.

पेशवाईमध्यें फलज्योतिषावर लोकांचा पुष्कळ भरंवसा असे, असें अनेक प्रसंगांच्या जुन्या पत्रांतील उल्लेखावरून दिसून येतें. नाना फडणवीस ह्यांचे कारकीर्दींत जोधपुरचा मुरलीधर जोशी ह्मणून एक प्रख्यात ज्योतिषी होता. त्याजवर नानांचा फार भरंवसा असे. त्याजकडून नाना फडणवीस महांचें इष्टानिष्ट फल पाहून त्याप्रमाणें राजकारणें घडवून आणीत असत, असें केव्हां केव्हां दिसून येतें. मुरलीधर जोशी ह्याच्या पत्रांत अनेक राजकारणांच्या गोष्टींचा उल्लेख वारंवार आढळतो. त्याचा एक मासला येथें देतों:—

"* * * आह्मीं शिंदे यांस विचार करून सांगितलें होतें कीं तुह्मीं जयपूरकरांशीं लढाई न करावी. आमचें सांगितलेलें मानलें नाहीं. आह्मी उठोन जोधपुरास गेलों; आणि श्रीनाथजीजवळ हें मागितलें कीं श्रीबाळाजी जनार्दन यांस आनंद असावा. रात्रीं स्वप्न जाहालें कीं, आह्मी साहाकारी आहों. संवत् १८४५ जेष्ठ कृष्ण अमावास्येचे दिवशीं, गत घटी बेवीस, पळें एकोणिसांनंतर सूर्यग्रहण होईल. ते दिवशी रुप्याची तुला श्री पेशवासाहेब यांची करावी. एक गजदान, एक अश्वदान, करावें. या ग्रहणाचें फलः–थोरथोर पूर्वपश्चमचे सरदार आपआपल्यांत लढतील. फिरंगी व हैदर नाईक यांचे देशावर हें ग्रहण पडिलें आहे. पेशवासाहेब यांची फत्ते होईल. थोर थोर देश हातास लागतील. शत्रू मारले जातील. नजबकुलीखान व दलबेखान यांचे मारफतीनें पादशाहाचा सल्लक ठरावांत आला आहे. फिरंगी यांणीं पातशाहा यांस लिहिलें आहे कीं, तुह्मीं आगरे यास यावें; आह्मी सुज्याअतदौला यांचे पुत्रास घेऊन येऊन भेटी घेतों; आगरे याचा किल्ला घेतों. प्रतापसिंग यासी बहुत नाराजी जाहाले, व पुकारून सांगितलें कीं, फौजा दक्षणेंतून आल्या ह्मणजे आह्मी त्यांसी मिळोन, या दोहों राज्यांवर मोहीम करूं. याप्रमाणें दरबारांत पातशाहा बोलले. मित्ती फाल्गुन शु॥ १० संवत् १८४४ कासीद अजुरेदार पा असे. याच कासीदाबराबर हुंडी पाठवावी."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] जानेवारी १९०९. [अंक ६ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.




**महाराज दौलतराव शिंदे.**

कारकीर्द:—इ. स. १७९४-इ. स. १८२८.)

# १२. महाराज दौलतराव शिंदे.

महाराज अलिजाबहादर दौलतराव शिंदे हे महादजी शिंदे ह्यांचे दत्तक पुत्र होत. महादजी शिंदे हे वानवडी येथें इ. स. १७९४ मध्यें मृत्यु पावले. त्यापूर्वींच त्यांनीं दौलतराव शिंदे ह्यांस दत्तक घेऊन त्यांचें लग्न केलें होतें. महादजी शिंदे मृत्यु पावल्यानंतर दौलतराव शिंदे ह्यांस सरदारीचीं वस्त्रें मिळालीं. दौलतराव शिंदे हे महादजी शिंद्यांच्या मृत्यूनंतर बरेच दिवस दक्षिणेंत होते. पुणें येथें सवाई माधवरावांचा मृत्यु व रावबाजीचें राज्यारोहण ह्या महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या, त्या प्रसंगीं ते दक्षिणेंत होते. ह्या वेळीं त्यांचें अगदीं अल्प वय होतें. तथापि, ते दिसण्यांत फार पाणीदार असून, त्यांचा पोषाख व बाणा मराठी सरदारास साजेसा होता.* पुणें येथें सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर जीं राजकारणें घडून आलीं, त्यांमध्यें दौलतराव शिंद्यांचें नांव प्रधानत्वेंकरून प्रसिद्ध आहे. परंतु दौलतरावांचें अल्पवय व अज्ञान, पदरच्या मुत्सद्दी मंडळींची दुही, स्वार्थपटु दुष्ट सरदारांचें प्राबल्य, आणि बाजीराव पेशवे गादीवर आल्यामुळें पुणें दरबारची झालेली अत्यंत शोचनीय स्थिति, इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या, म्हणजे केवळ एकट्या दौलतरावांवरच सर्व दोषांचा आरोप लादणें रास्त होणार नाहीं. दौलतराव शिंदे व नाना फडणवीस ह्यांच्या अंतस्थ करारमदारांची जी माहिती उपलब्ध झाली आहे, तिच्यावरून नानांशीं विरुद्ध रीतीनें वागण्याची दौलतरावांची प्रवृत्ति दिसत नाहीं. ह्या करारमदारांची हकीकत मोठी मनोरंजक आहे:—

---

* दौलतराव शिंद्यांच्या स्वरूपाचें व पोषाखाचें वर्णन त्यांस प्रत्यक्ष पाहिलेल्या एका इंग्रज गृहस्थानें पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—

"In person, Doulat Rao Sindhia was about five feet seven inches in height, stout built, his complexion dark, his visage round, with a rather flat nose; his complexion commanding yet benevolent, with great dignity of deportment. His dress and manners strongly recalled Holbein's portrait of our own Henry VIII. This arose partly from his mode of wearing a turban, which was small, twisted in the fashion of a rope and placed on the side of the head. His garb was very simple–a white *ungah* or tunic, *Goutana*, or light silk trowsers, down to the knee; common amongst the Mahrattas. His necklaces were gorgeous, consisting of many rows of pearls, as large as small marbles, string alternately with emeralds. The pearl (*moti*) was his passion, and the necklace was constantly uudergoing change, whenever a finer bead was found; title of 'Lord of a Hundred Provinces' was far less esteemed by him than that of *Motiwalla*, the man of pearls; by which he was commonly designated in his camp."—*The Anglo-India Vol III. Page 148.*

दौलतराव शिंद्यांजवळ आबा चिटणीस ह्मणून पाटीलबावांच्या पूर्ण विश्वासांतले एक जुने मुत्सद्दी होते. त्यांनीं नाना फडणविसांकडून दौलतराव शिंद्यांस सरदारीचीं वस्त्रें देवविलीं. त्या वेळीं आबांस, नाना फडणविसांनीं असें कबूल केलें कीं, 'राणोजी शिंदे यांजपासून पांच पिढ्या कसें वर्तत आलें, हें ध्यानांत आणून तुह्मीं एकनिष्ठपणें चालावें, व आमचे मर्जीनुरूप वर्तावें. तुमचें स्वरूप राखणें व तेज वाढविणें आह्मांकडे. खातरजमा ठेवावी. उणें पडणार नाहीं.' परंतु पुढें बाजीरावाच्या मोहानें दौलतराव शिंदे ह्यांच्या मर्जीचा कल नानांच्या विरुद्ध दिसूं लागला. तेव्हां नानांनीं आबा चिटणिसांचे मार्फत दौलतराव शिंद्यांस आपला व पाटीलबावांचा झालेला एक जुना अंतस्थ करार दाखविला. दौलतराव शिंद्यांची पाटीलबावांचे ठिकाणीं फार पूज्य बुद्धि व श्रद्धा होती. त्यांच्या दिनचर्येच्या बातमीपत्रांत असें लिहिलें आहे कीं, ते पुणें येथें असतांना प्रत्यहीं पाटीलबावांच्या समाधीचें दर्शन घेतल्यावांचून भोजन करीत नसत. अर्थात् त्यांना पाटीलबावांविषयीं इतकी आदरबुद्धि असल्यामुळें त्यांनीं त्यांचें शपथपूर्वक केलेलें करारपत्र पाहून, आपल्या मनांतील किंतु सोडून दिला, व नानांस नवीन करारपत्र लिहून दिलें. हीं दोन्ही पत्रें महत्त्वाचीं आहेत. महादजी शिंदे ह्यांनीं नानांस दिलेलें करारपत्र येणेंप्रमाणें:—

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसी:—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महादजी शिंदे दंडवत विनंती उपरी:—आह्मांकडील अर्थ राजश्री रामचंद्र शिवदेव यांणीं आपणांस सांगितल्यावर, आपण शपतपूर्वक खातरजमा करून श्रीवरील तुळसी देतों, असें निश्चयपूर्वक बोललां, आणि सरदारी माझी आणि फडणिशी त्यांची; बंधुत्वाप्रमाणें वर्तणूक करूं; ज्यांत सरदारीचें कल्याण तें संधान चालवूं; जो अनिष्ट चिंतील त्याचें पारपत्य करूं; ह्मणोन बोललां. तो मजकूर मशारनिल्हेंनीं लिहिला. तो सर्व समजोन चित्तास परम संतोष जाहला. आह्मींही श्रीवरील बेलभंडार पाठविला आहे व हें पत्र शपतपूर्वक लिहिलें आहे. आपण बंधुत्वाविसीं संशय न मानावा. मशारनिल्हे बोलतील तें आमचें बोलणें जाणावें. ही सरदारी आपली व फडणिशी आमची असें निश्चयें जाणणें. जेथें आपण आहेत तेथें मी आहें, हें शपतपूर्वक जाणावें. रवाना छ २५ सफर बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे विनंति."

हें पत्र पाहून दौलतराव शिंद्यांनीं नानांस पुढील पत्र लिहून दिलें. तेंही वाचण्यासारखें आहे.—

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसी:—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ दौलतराव शिंदे दंडवत विनंती उपरी:—तीर्थरूप कैलासवासी महादजी शिंदे पाटीलबावा यांनीं आपणास

पत्रांत शपत लिहून दिल्ही कीं, सरदारी आपली व फडणिशी माझी; बंधुत्वाप्रमाणें परस्परें चालावें. तें पत्र आह्मीं पाहून, सरदारी आपली व फडणिशी आमची; जें लक्ष आपलें तें आमचें; आपल्या लक्षाशिवाय आह्मी चालणार नाहीं. व कोणी कसेही यांत अंतर पडावयाचें सांगितल्यास त्याचें ऐकणार नाहीं. यांत अंतर करूं तर आपले कुलस्वामीची व पाटीलबावांची व तुळशीची शपथ असे. व श्रीमंतांचे दौलतीस जो वाईट करील, त्याचें पारपत्य आपल्या नक्षाप्रमाणें करूं. छ ७ जमादिलावल बहुत काय लिहिणें. लोभ असों दीजे. हे विनंती."

परंतु नानांच्या दुर्दैवानें हे करार पुढें सिद्धीस गेले नाहींत, व त्यांना दौलतराव शिंद्यांच्या सर्जेराव घाटगे नामक शिरजोर व जुलमी सरदाराच्या हातून रावबाजीच्या मूर्खपणामुळें बंदिवासांत राहावें लागलें. तथापि, दौलतराव शिंद्यांनीं आपली पराकाष्ठा करून, बाजीरावाशीं पुनः करारमदार करून, नानांची सुटका करून दिली. बाजीरावाबरोबर झालेल्या करारनाम्यामध्यें दौलतराव शिंदे व नाना फडणवीस ह्यांबद्दल असा मजकूर होता कीं, "नानांकडील पुस्तपन्हा[1] खातरजमेनें करून, पूर्ववत्प्रमाणें बंदोबस्त करून देऊन, निभावणी[2] करून द्यावी, येविषयीं दौलतराव शिंदे ह्यांजकडून बेलतुळशी फकीरजी गाढवे यांनीं लष्करांतून आणून नानांस दिल्या, आणि नानांनीं बेलतुळशी दौलतराव शिंदे यांस दिल्या. त्या फकीरजी गाढवे यांचे स्वाधीन केल्या, कीं दौलतराव शिंदे ह्यांचे दौलतीचें व जातीचें कल्याण करावें. उभयपक्षीं न्यून अधिक पडेल तें उभयतांनीं मनांत आणूं नये. नानाकडील ऐवज, चीजवस्त वगैरे सरकारांत गेली आहे, ती सरकारांतून माघारें द्यावी. उभयपक्षीं क्रियाशपत झाली आहे, त्याप्रमाणें कोणीं कोणास अंतर न करितां, उभयतांनीं एकविचारें चालावें." परंतु हे करार रावबाजीच्या चंचल व कपटी स्वाभावामुळें सिद्धीस गेले नाहींत.

दौलतराव शिंदे इ. स. १८०१ सालीं उत्तर हिंदुस्थानांत गेले. तिकडे त्यांचें व इंग्रजांचें कांहीं दिवस युद्ध चालू होतें. पुढें सुर्जी अंजनगांव येथें तह होऊन दौलतराव शिंदे इंग्रजसरकारचे दोस्त झाले. ह्यानंतर दौलतरावांनीं इंग्रजांशीं विरुद्ध वर्तणूक केली नाहीं. इ. स. १८१० मध्यें त्यांनीं ग्वाल्हेर येथें आपली कायमची छावणी केली. तेव्हांपासून लष्कर-ग्वाल्हेर ही शिंद्यांची राजधानी झाली. दौलतराव शिंदे ह्यांच्या पत्नी महाराणी बायजाबाई साहेब ह्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. दौलतराव इ. स. १८२८ मध्यें मृत्यु पावले. त्यांची छत्री ग्वाल्हेर येथें आहे. त्यांच्या संबंधाच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत.



१ पुस्तपन्हा=मदत, बळकटी, पुष्टीकरण. २ निभावणी=पूर्तता, शेवट.

# १३. रामसिंग मालम.

कच्छ संस्थानामध्यें रामसिंग मालम ह्या नांवाचा एक लोकोत्तर बुद्धिमान् व कल्पक कारागीर होऊन गेला, त्याची माहिती येथें देण्यासारखी आहे. कच्छ संस्थानचा राजा राव लाखाजी ह्मणून एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेला. त्यानें कच्छमध्यें इ. स. १७४१–१७६० पर्यंत राज्य केलें. ह्याचे कारकीर्दीत रामसिंग मालम नांवाचा एक अद्वितीय साहसी पुरुष कच्छ संस्थानची राजधानी भुज येथें प्रसिद्धीस आला. राव लाखाजी ह्यानें त्याची कल्पकता व बुद्धिमत्ता पाहून त्यास आपल्या पदरीं नोकरीस ठेविलें. त्यानें कच्छ संस्थानामध्यें एक बंदुका करण्याचा कारखाना व रेशीम व कांच करण्याचे कारखाने संस्थापित केले. एवढेंच नव्हे तर, त्यानें घड्याळें व युरोपियन नमुन्याबरहुकूम पुतळे व इतर जिन्नस तयार केले, आणि कच्छ संस्थानांतील कलाकौशल्याची विशेष सुधारणा केली. कच्छ प्रांतांतील कारागिरी अद्यापि प्रसिद्ध आहे, तिचें पुष्कळ श्रेय रामसिंग मालम ह्याच्याकडे आहे. राव लाखाजीनें रामसिंग मालम ह्यास कल्याणपूर नांवाचा एक गांव जहागीर दिला. तो त्याजकडे त्याच्या हयातीपर्यंत चालत होता.

रामसिंग मालम ह्याचें स्मारक ह्मणजे भुज येथें बांधलेला राव लाखाजीचा राजवाडा होय. हा राजवाडा इ. स. १७५० मध्यें बांधला असून त्यास ३०,००,००० रुपये खर्च झाले. ह्या राजवाड्यांतील आयनेमहाल फारच अप्रतिम आहे. ह्यामध्यें रामसिंग मालम ह्यानें तयार केलेले नाना प्रकारचे कलाकौशल्याचे जिन्नस त्याच्या स्मारकार्थ ठेविले आहेत. त्यांतील जुनीं डच व इंग्रजी घड्याळें, आकाशांतील ताऱ्यांचे व पृथ्वीचे गोळे, व युरोपांतील चित्रकलेचे नमुने दाखविणाऱ्या अनेक जुन्या तसबिरी आणि इतर कलाकुसरीचे जिन्नस फार अप्रतिम आहेत. हे सर्व जिन्नस रामसिंग मालम ह्यानें स्वतः तयार केलेले किंवा युरोपखंडांतून १८ व्या शतकाच्या मध्यामध्यें आणलेले आहेत.* युरोपखंडामध्यें

* मिसेस पोस्टन्सनामक एका विदुषी बाईनें आपल्या 'कच्छवर्णन' पुस्तकामध्यें भुज येथील सुप्रसिद्ध राजवाडा व तो बांधणारा कारागीर रामसिंग मालम ह्याच्याबद्दल खाली लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे:—

"The most strikingly curious object in the city, is a large and well built palace, most grotesquely ornamented by a variety of carvings, of dancing girls, tigers, and roystering looking Dutch knaves, each of the men holding a bottle and glass, with somewhat drunken, but most winning grace. The interior as well as the exterior displays much rich and beautiful carvings; but the taste of the designs is evidently European, which seems explained




**उर्दू बेगी.**

( मुसलमानी अमदानीतील स्त्रियांच्या सैन्यावरील स्त्री अधिकारी. )

रामसिंग मालम ह्यानें अनेक वेळां समुद्रपर्यटणें केलीं होतीं. दर्यावर्दीपणामध्यें कच्छी लोकांची प्रसिद्धी पूर्वीपासूनच आहे. त्यांचीं जहाजें, त्यांचीं हत्यारें, व त्यांचीं समुद्रांतील नौकानयनाचे मार्ग दाखविणारीं चित्रें व नकाशे ह्यांची प्रशंसा सर अलेक्झांडर बर्न्‌सारख्या युरोपियन लोकांनीं केलेली आहे. ज्योतिषशास्त्र, नौकानयनशास्त्र आणि नौकाबंधनशास्त्र ह्यांची माहिती पूर्वीपासून हिंदुस्थानच्या लोकांस उत्कृष्ट प्रकारची होती. त्यांत रामसिंग मालम ह्यानें अधिक भर घातली. तो आपली नौका घेऊन यूरोपखंडांत गेला, व हालंड देशामध्यें राहून तेथें ह्या शास्त्रांची आणखी माहिती घेऊन हिंदुस्थानांत परत आला; आणि स्वतःचें नवीन ज्ञान स्वदेशबांधवांस देऊन, त्यानें कच्छी लोकांच्या कलाकौशल्याची अभिवृद्धि केली. हिंदुस्थानामध्यें रामसिंग मालमासारखे लोकोत्तर साहसी व उद्योगी पुरुष निर्माण व्हावेत व त्यांनीं आपल्या देशाच्या औद्योगिक सुधारणेची अभिवृद्धि करावी; परंतु त्यांची माहिती इतिहासांत प्रसिद्ध नसावी, ही खेदाची गोष्ट होय.

## १४. उर्दू बेगी.

( स्त्रियांच्या लष्करावरील स्त्रीअधिकारी. )

हिंदुस्थानांतील स्त्रिया ज्याप्रमाणें राजकारणादि अनेक गुणांमध्यें प्रसिद्ध आहेत त्याप्रमाणें त्या लष्करी विद्येंतही प्रसिद्ध असल्याचे दाखले सांपडतात. शौर्यगुणामध्यें अनेक स्त्रिया प्रसिद्ध होत्या, ह्याची साक्ष इतिहास देत आहे. त्यांत मुसलमान, रजपूत, मराठे, ब्राह्मण वगैरे सर्व जातींच्या स्त्रियांचीं नांवें दृष्टीस पडतात. लष्करी विद्येंत मुख्य कलम ह्मणजे घोड्यावर बसणें; त्यांत स्त्रियांची प्रसिद्धी आहेच. यशवंतराव होळकराची मुलगी भीमाबाई—कीं जिनें सर जॉन मालकमसारख्या योद्ध्यास आश्चर्यचकित करून सोडिलें व त्याजकडून, "ती घोड्यावर बसण्यांत पटाईत असुन भाला फेंकण्यांत तिचा हात कोणी धरीत नसे"* असें सर्टिफिकिट घेतलें;

by the story, that the architect, Ramsing, having been a child stolen from some part of the Kathiawar coast by pirates, was taken by them to Holland, where he became initiated into a knowledge of the fine arts, and returned to decorate his native land. 'He was the servant of one of the early and most wealthy princes of Cutch, Rao Lacca, at whose command he ornamented the province with many specimens of architectural beauty."

—*Cutch by Mrs. Postans.*

* "She rode with grace, and few excelled her in the management of the spear."—*Central India by Sir John Malcom.*

व झांशीची राणी लक्ष्मीबाई—कीं जिनें सर ह्यू रोजसारख्या कसलेल्या वीराशीं टक्कर देऊन आपली शिपाईगिरी सर्व जगास श्रुत केली, आणि त्याजकडून आपल्या शौर्याबद्दल धन्यधन्य ह्मणवून घेतलें. ह्या दोन उदाहरणांवरून हिंदुस्थानांतील स्त्रिया प्रसंगविशेषीं रणांगणामध्येंही आपलें अलौकिक कर्तृत्व दाखविण्यास समर्थ होत्या असें सिद्ध होतें. तथापि, हिंदुस्थानामध्यें स्त्रियांचें पलटण किंवा स्त्रियांचें सैन्य तयार करण्याचा कसकसा प्रयत्न झाला होता, ह्याची माहिती चांगलीशी प्रसिद्ध नाहीं. मुसलमान बादशाहांनीं प्रथमतः आपल्या पडदानशीन राण्यासांठीं स्त्रियांची फौज तयार करण्याचा प्रयत्न केला होता असें दिसतें. मनुशी नांवाचा एक इटालियन प्रवासी औरंगजेब बादशहाचे वेळीं हिंदुस्थानांत आला होता. त्यानें मोंगल लोकांच्या जनानखान्यावर पाहरा करण्यासाठीं खोजे लोकांच्या ऐवजीं स्त्रियांची योजना होऊन त्याचें लष्कर तयार झाल्याचें पाहिलें होतें. त्या स्त्रीसैन्यावर जो मुख्य कामगार असे, त्याचें नांव 'उर्दू बेगी' असें असून, त्याचें जनानी बुरख्यासह त्यानें चित्र दिलें आहे. तें मौजेचें व प्रेक्षणीय आहे. तें सोबत जोडलें आहे. ह्या चित्रावरून मुसलमानी जनानखान्यावरील लष्करी स्त्रीअंमलदाराच्या पोषाखाची कल्पना करितां येते. स्त्रियांचें स्वतंत्र पलटण उभारण्याचा प्रयत्न हैदराबादच्या निजामअलीनें केला होता. व सातारचे श्रीछत्रपति प्रतापसिंह ऊर्फ बुवासाहेब महाराज ह्यांनींही आपल्या राण्यांकरितां चोपदार, भालदार वगैरेंचीं कामें स्त्रियांस दिलीं होतीं, असें सांगतात. महाराणी बायजाबाई शिंदे ह्यांनीं एक बायकांचें पलटण तयार केलें होतें. खरोखर, हिंदुस्थानांतील स्त्रीसैन्याची विस्तृत माहिती व त्यांचे पोषाखाचीं चित्रें मिळालीं, तर इंग्लंडमधील अर्वाचीन Suffragettes च्या सैन्याप्रमाणेंच तीं मनोरंजक होण्याचा संभव आहे. शोधकांनीं प्रयत्न करावा.



## १५. जमालखान अथवा जमाल सरदार.



श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या कारकीर्दींत लष्करी पेशानें वागणारी व लष्करी कवाईत वगैरे जाणणारी एक युरोपियन बाई आली होती. ती फ्लारेन्स येथील मूळची राहणारी असून, तिनें मि० जेम्स हॉल नांवाच्या एका मद्रास येथील युरोपियन बारिस्टरबरोबर लग्न केलें होतें. तिचें व तिच्या नवऱ्याचें पुढें पटेना. तेव्हां तिनें शिपाईगिरीचा धंदा स्वीकारिला. ती हिंदुस्थानांतील

संस्थानिकांजवळ राहून त्यांच्या दरबारांत स्त्रियांची पलटणें तयार करीत असे. तिचें खरें नांव मिसेस जेम्स हॉल असें होतें. परंतु पुढें तिच्या लष्करी पेशावरून तिचें नांव 'जमालखान' ऊर्फ 'जमाल सरदार' असें पडलें. जमालखान हें नांव ( Jam.-Hall ) ह्या नांवाशीं बरेंच जुळतें आहे. असो.

ही बाई इ. स. १७८८ चे सुमारास पुण्यास आली. तिनें पुण्यास कांहीं सरदारांच्या मनांत प्रेरणा करून एक स्त्रियांचें पलटण उभारिलें. हैदराबादच्या निजामानें त्या वेळीं स्त्रियांचें कवाईत शिकलेलें स्वतंत्र पायदळ पलटण व रिसाला तयार केला होता. त्याप्रमाणें पेशव्यांच्या दरबारांत स्त्रीसैन्य तयार झालें नव्हतें. परंतु त्यास प्रारंभ करण्याचा प्रयत्न ह्या बाईनें केला होता. ही मोंगल सरदाराप्रमाणें पोषाख करीत असे. अंगांत एक लांब जामा, पायांत विजार, डोक्यावर परांचा तुरा लावलेलें शिरस्त्राण आणि कमरेस एक समशेर असा तिचा मर्दानी वेष असे. ती लष्करी विद्या चांगली जाणत असे. परंतु तिचा स्वभाव फार कडक असे. तिनें पुण्यांत राहून पेशव्यांच्या व इतर सरदारांच्या स्त्रियांना लष्करी विद्या शिकवून, मराठी जनानखान्यांत मोठी क्रांति घडवून आणिली असती. परंतु तिच्या हातून एक भयंकर अपराध घडल्यामुळें तिला बंदीवास प्राप्त झाला; त्यामुळें तिचा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं. तिच्या तैनातींतील एका ब्राह्मण नौकरानें तिचा कांहीं अपराध केल्यामुळें तिनें त्याला मरेमरेपर्यंत चोप दिला. अर्थात् ब्राह्मण प्रभूच्या राजधानींत अशी गोष्ट घडून आल्यामुळें, तिला नाना फडणविसांनीं कैद करून लोहगडच्या किल्ल्यांत बंदींत टाकिलें. ती तेथें ७ वर्षें होती. पुढें दौलतराव शिंद्यांचा फ्रेंच सेनापति मनसूर पेरू ( Monsieur Perron ) ह्यानें मध्यस्थी करून, मोठ्या मिनतवारीने तिची सुटका करून घेतली. ती पुण्याहून पुढें मुंबईस गेली, व तेथें इ. स. १७९८ सालीं मृत्यु पावली. पुण्यास असतांना तिला निजामाकडून सेनापतीच्या मोठ्या हुद्यावर येण्याबद्दल मागणी आली होती. परंतु तिच्या दुर्दैवानें तिला बंदीवास मिळाल्यामुळें तिचें लष्करी कर्तृत्व अस्तास गेलें. तथापि, पुण्यामध्यें 'जमालखान' ह्या नांवानें तिची प्रसिद्धी होती.

* * *

## १६. राघो केशवाचे चिरंजीव.

थोरल्या बाजीरावसाहेबांचे मस्तानीचे पोटीं झालेले समशेरबहादर ह्या नांवाचे एक चिरंजीव होते. हे इतिहासांत प्रसिद्ध आहेत. हे रणशूर असून पानिपतच्या

लढाईमध्यें मारले गेले. ह्यांच्या हाताखालीं स्वतंत्र पागापथक होतें. त्याची फडणिशी राघो केशव ह्यांच्याकडे होती. हे मोठे कर्ते पुरुष होते. ह्यांना पालखीचा सरंजाम असे. हे पाणिपतच्या युद्धामध्यें गेले होते. ते तिकडेच मृत्यु पावले. त्यांस पाणिपतच्या अपयशामुळें कांहीं कर्जवाम झालें होतें. त्यांचे चिरंजीव सदाशिव रघुनाथ ह्मणून होते. त्यांनीं पुढें समशेरबहादराचे चिरंजीव अलीबहादर ह्यांजकडील पागेची फडणिशी आपणास मिळावी ह्मणून पेशव्यांच्या दरबारांत अनेक वेळां विनंति केली. परंतु त्या वेळीं शिलेदारांच्या कारकुनांतच पागेच्या फडणिसाची योजना झाल्यामुळें तो दरक त्यांजकडे आला नाहीं. तेव्हां त्यांनीं रुष्ट होऊन, नाना फडणविसांस आपली हालअपेष्टा विदित केली, व आपल्या वडिलांचा मोठेपणा व त्यांचा बडेजाव वर्णन केला. तेव्हां नानांनीं त्यांस कळविलें कीं, तुमच्या अंगीं तशी योग्यता दिसत नाहीं. तेव्हां निराशेनें उद्विग्न होऊन सदाशिव रघुनाथांनीं नानांसः—

त्वयि प्रसन्ने मम किं गुणेन ।
त्वय्यप्रसन्ने मम किं गुणेन ॥
रक्ते विरक्ते च वरे वधूनां ।
निरर्थकः कुंकुमपत्रभंगः ॥ १ ॥

असा एक संस्कृत श्लोक लिहून पाठविला. तेव्हां नानांनीं त्याचा आशय लक्षांत घेऊन, त्यास 'राघो केशवाचे चिरंजीव' ह्मणून फडणिशी सांगितली. तेव्हांपासून नाना, सदाशिव रघुनाथास, 'राघो केशवाचे चिरंजीव' ह्या संज्ञेनें ओळखीत असत.

* * *

## १७. ठाकूरदासबोवा व बापू गोखले.

कोणे एके वेळीं बापू गोखले यांची स्वारी तारगांव (तालुके कोरेगांव, जिल्हा सातारा) येथें आपले गुरु ठाकूरदासबोवा यांजकडे आली असतां, त्यांच्याकडे एक वैष्णव ब्राह्मण भिक्षुकीकरितां गेला. त्या दिवशीं शिवरात्र होती. वैष्णव ब्राह्मण जेऊन खाऊन, अंगारा अक्षद कपाळास लावून, विडा खाऊन आलेला पाहून, बापू गोखले यांस फार राग आला; व ते त्या ब्राह्मणाबरोबर धर्मसंबंधानें कांहीं वाद करूं लागले. तेथें जवळच ठाकूरदासबोवा बसले होते. त्यांनीं हटकून बापूंस सांगितलें कीं, "हें शस्त्राचें काम नव्हे. शास्त्राचें आहे!" तें ऐकून गोखले चूप राहिले.

* * *

रघुनाथ रणसोड ह्याजकडे मुंबईचे वकिलीचें काम दुसरे बाजीराव पेशवे गादीवर येईपर्यंत होतें. रावबाजी गादीवर आल्यानंतर त्यांनीं राज्यकारभारामध्यें ज्या अनेक घालमेली केल्या, व जुन्या लोकांस कामांवरून दूर केलें, त्यांतच रणसोड कृष्ण ह्यास रजा मिळाली. ह्यास ता. १ एप्रिल इ. स. १७९७ रोजीं मुंबईच्या वकिलीवरून दूर करून, रामचंद्र कृष्ण (?) नामक दुसऱ्या एका इसमास वकिलीवर नेमल्याचा दाखला सांपडतो. हा रामचंद्र कृष्ण कोण तें समजत नाहीं. तोही फार दिवस मुंबईस राहिला नाहीं. त्यासही लवकरच ह्मणजे ता. २० मे इ. स. १७९८ रोजीं बडतर्फ केल्याचा हुकूम सुटला; व त्याचे जागीं हरि सदाशिव नामक दुसऱ्या इसमाची नेमणूक झाली. तो पुढें किती दिवस मुंबईच्या वकिलीवर राहिला, तें समजत नाहीं.

रघुनाथ रणसोड ह्यास पेशव्यांकडून सालीना ५४२ रुपयांची नेमणूक होती. त्यांत नक्त १०० रुपये जातीस, परदरबारीं राहण्याबद्दल दरमहा १२ रुपये गाडीस व १२ रुपये पोटखर्चास ह्याप्रमाणें सालाचे २८८ रुपये, व दहा खंडी भात—अजमासें १५४ रुपये, ह्याप्रमाणें ५४२ रुपयांची तैनात होती! असो. रघुनाथ रणसोडासंबंधानें अधिक माहिती उपलब्ध झाल्यास ती मोठ्या आनंदानें आह्मी प्रसिद्ध करूं. इंग्रजी ग्रंथांत रघुनाथ रणसोडाची माहिती प्रसिद्ध नाहीं, हें आश्चर्य होय. ह्यावरून मराठ्यांच्या इतिहासांतील पुष्कळ भाग अद्यापि अप्रसिद्ध आहे, हें सिद्ध होतें.

---

## प्रकरण २ रें.

## गोंवेंकर फिरंगी यांजजवळील वकील.

## नारायण विठ्ठल धुमे.

मुंबईकर इंग्रजांप्रमाणें मराठ्यांचीं राजकारणें गोंवेंकर फिरंगी अथवा पोर्तुगीज ह्यांच्याबरोबर पुष्कळ दिवसांपासून चालत होतीं, व त्याकरितां फिरंगी लोकांजवळ मराठ्यांच्या दरबारामार्फत वकील राहत असत. परंतु त्यांची माहिती कागदपत्रांच्या अभावामुळें अगदीं अप्रसिद्ध आहे. मराठ्यांस, उत्तरेस दमणपासून दक्षिणेस कारवारपर्यंत सर्व कोंकणकिनाऱ्यावर, आपली राजसत्ता प्रस्थापित करण्याचे कामीं, ज्या परराष्ट्रांच्या प्रतिस्पर्धेपासून पुष्कळ त्रास सोसावा लागला, त्यांपैकीं पोर्तुगीज

अथवा फिरंगी हें एक राष्ट्र होय. ह्या राष्ट्राशीं मराठ्यांचा खरा संबंध श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज ह्यांचे कारकीर्दींत जडला, व तेव्हांपासून त्यांचीं व मराठ्यांचीं जीं राजकारणें घडून आलीं, त्यांचा इतिहास अतिशय महत्त्वाचा व मनोरंजक आहे. तो उपलब्ध झाला, तर पोर्तुगीज लोकांच्या राजकारस्थानांतील मराठे वकिलांची माहिती सहजच प्रसिद्ध होईल. मराठे व पोर्तुगीज ह्यांच्या राजकारणांचा साद्यंत इतिहास प्रसिद्ध होण्याचा योग केव्हां येईल तेव्हां येवो, परंतु त्यापूर्वीं फिरंगी लोकांच्या व मरठ्यांच्या राजकीय संबंधाचें सिंहावलोकन, व त्यांचे वकील नारायण विठ्ठल धुमे ह्यांची अल्प माहिती—जी आह्मांस उपलब्ध झाली आहे ती—येथें सादर करितों.

सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं, पोर्तुगीज लोकांचा सुप्रसिद्ध योद्धा अलफांझो डि अलबुकर्क ह्यानें, ता. २५ नोव्हेंबर इ. स. १५१० रोजीं गोमांतक प्रांतांतील मुख्य शहर गोंवें हें, विजापुरचा बादशाहा युसफ आदिलशाहा ह्याकडून हस्तगत करून घेतल्यापासून, फिरंगीसत्ता गोमांतकांत कायमची संस्थापित झाली. ह्या सत्तेनें सोळाव्या शतकाच्या प्रथमार्धामध्यें पश्चिम समुद्रकिनाऱ्यानें उत्तर कोंकणांत प्रवेश करून, इ. स १५३४ मध्यें ठाणें, वसई, तारापूर, दमण वगैरे जागा जिंकून घेतल्या; आणि इ. स १५४८ मध्यें बाणकोटापासून गोंव्यापर्यंत आपल्या तीक्ष्ण तरवारीचा प्रताप दाखवीत, सर्व गांवें जाळून व लुटून उध्वस्त केलीं. एक शतकपर्यंत ह्या सत्तेचें प्राबल्य एकसारखें वाढत होतें. ह्या अवधीमध्यें तिच्या धर्मप्रसाराचा छळ हिंदु लोकांस अत्यन्त तापदायक व असह्य झाला. परंतु १७ व्या शतकाच्या मध्यंतरीं, त्यांच्या सुदैवानें, हिंदुधर्माभिमानी शिवनृपति अवतीर्ण झाला, व त्यानें महाराष्ट्रराज्यसंस्थापन केलें; त्यामुळें फिरंगीसत्तेच्या प्रसारास पुष्कळ प्रतिबंध झाला. शिवाजीस फिरंगीराष्ट्र एकदम जिंकण्याचें सामर्थ्य होतें असें जरी केवळ मानितां येणार नाहीं, तथापि त्याच्या बाहुप्रतापामुळें फिरंगी लोकांची सत्ता १७ व्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें कोंकणकिनारा व गोमांतक ह्यामध्यें कांहींशी मर्यादित झाली, असें मानिलें असतां चुकीचें होणार नाहीं.

शिवाजीनें इ. स. १६६१ मध्यें कोंकणप्रांतावर स्वारी करून शृंगारपुरचे दळवी रसातळास पोहोंचविले व राजापुरचीं इंग्रजी वखार लुटून कोंकणकिनाऱ्यावर आपला दरारा बसविला. त्यामुळें पोर्तुगीज लोकांची थोडीशी हालचाल कमी पडली. परंतु पुढील वर्षी ह्मणजे इ. स. १६६२ मध्यें, त्यानें वाडीकर सांवतांवर स्वारी केली; व त्यांना गोमांतकांत पळावयास लाविलें. त्या वेळीं मात्र फिरंगी लोकांस चांगलीच दहशत बसली. त्या वेळीं गोंव्याच्या अधिकाऱ्यांनीं पळून आलेल्या लोकांस शिवाजीच्या भीतीनें आपल्या सरहद्दीच्या बाहेर घालविलें; व शिवाजीच्या

शत्रूंस बिलकूल आश्रय दिला नाहीं. त्यामुळें वाडीकर सावंत शिवाजीस शरण आले व त्यांनीं त्याशीं सख्य केलें. एवढेंच नव्हे तर, त्यांनीं पोर्तुगीज लोकांकडून घेतलेली एक उत्कृष्ट तलवार शिवाजीस नजर केली. हीच शिवाजीस प्रत्येक स्वारींत विजयश्री मिळवून देणारी सुप्रसिद्ध 'भवानी तलवार' होय. शिवाजीनें सांवतांशीं सख्य केल्यानंतर त्यांच्याच मदतीनें एक जंगी आरमार उभारिलें, आणि कोंकणकिनाऱ्याचें संरक्षण करण्याकरितां मालवण येथें सिंधुदुर्ग नांवाचा नवीन किल्ला बांधिला; व कुलाबा, सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथील बंदरी किल्ल्यांची दुरुस्ती करून, त्यांच्या बंदोबस्तासाठीं जागोजाग आपलीं आरमारी जहाजें सज्ज केलीं. शिवाजीच्या आरमाराचे सेनापति दर्यासारंग व मायनाक भंडारी हे होते. ह्यांनीं पश्चिम समुद्रकिनाऱ्यावर चांगली नाकेबंदी करून फिरंगी लोकांचीं गलबतें लुटण्याचा क्रम चालू केला. त्यामुळें त्यांची आमदरफ्ती अगदीं बंद होऊन, त्यांना मराठ्यांपुढें नाकदुऱ्या काढणें भाग पडलें. तेव्हां त्यांनीं शिवाजीकडे तह करण्यासाठीं आपला एक वकील पाठविला. शिवाजीनें फिरंगी लोकांकडून भरपूर दारूगोळा व बंदुका घेण्याचा ठराव करून, त्यांच्या जहाजांस त्रास न देण्याचें कबूल केलें. फिरंगी लोकांकडून ह्या वेळीं शिवाजीकडे कोण वकील आला होता, हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि, इ. स. १६६२ पासून मराठ्यांचीं व पोर्तुगीज लोकांचीं प्रत्यक्ष राजकारणें सुरू झालीं, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

फिरंगी लोकांनीं शिवाजीस युद्धसामुग्री पुरविण्याचें मान्य करून ती वेळोवेळीं दिल्यामुळें, कांहीं वर्षेंपर्यंत शिवाजी व पोर्तुगीज ह्यांच्या मध्यें युद्धप्रसंगाचें कारण उत्पन्न झालें नाहीं. परंतु मराठ्यांची सत्ता कोंकणप्रांतांत जसजशी प्रसार पावूं लागली, तसतसें उत्तर कोंकणामध्यें जंजिरेकर हबशी, सुरतकर इंग्रज आणि साष्टीकर फिरंगी ह्यांना तिचा हेवा व स्पर्धा अधिकाधिक वाटूं लागली; आणि त्यांनीं त्या सत्तेचा प्रतिरोध करण्याचा उघड व गुप्त रीतीनें प्रयत्न चालविला. परंतु मराठ्यांचें लष्करी सामर्थ्य व कर्तृत्व त्या सर्वांपेक्षां अधिक असल्यामुळें, त्यांनीं त्यांस मुळींच दाद दिली नाहीं. त्यामुळें उघड रीतीनें फिरंगी व मराठे ह्यांची चांगली चकमक उडाली. इ. स. १६७० मध्यें दमणजवळ मराठ्यांच्या आरमाराची व फिरंग्यांच्या आरमाराची गांठ पडून मोठी निकराची लढाई झाली. त्या लढाईमध्यें पोर्तुगीज लोकांचें एक प्रचंड लढाऊ गलबत मराठ्यांनीं सर करून दाभोळ बंदरांत नेऊन ठेविलें. इकडे पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांच्या १८ लहान फत्तेमाऱ्या जिंकून वसईस नेल्या. अशा रीतीनें शिवाजीची व पोर्तुगीज लोकांची चांगलीच चुरस लागून राहिली.

शिवाजीनें इ. स. १६७२ मध्यें मोंगल सैन्यास जिंकून उत्तर कोंकणांत आपला अंमल पूर्णपणें संस्थापित केल्यानंतर, फिरंगी लोकांस नतिजा देण्याचा संकल्प केला. प्रथम त्यानें दमण व वसई ह्यांच्या सन्निध आपलें सैन्य नेऊन फिरंगी लोकांस दहशत उत्पन्न केली, व घोडबंदरावर आकस्मिक रीतीनें हल्ला केला. तथापि, इ. स. १६७४ पर्यंत फिरंगी लोकांनीं मराठ्यांस चांगलीशी दाद दिली नाहीं. इ. स. १६७४ मध्यें शिवाजीचा प्रधान मोरोपंत पिंगळे ह्यानें कोंकणांत सैन्य नेऊन व पोर्तुगीज लोकांस आपल्या तरवारीचे चार हात दाखवून त्यांना मराठ्यांस खंडणी देणें भाग पाडिलें. तेव्हां त्यांनीं मराठ्यांस विनम्र होऊन त्यांची 'चौथ' कबूल केली, पोर्तुगीज इतिहासकार ही गोष्ट प्रसिद्ध करीत नाहींत. परंतु मराठ्यांच्या बखरीमध्यें शिवाजीस पोर्तुगीज लोकांनीं वारंवार खंडणी दिल्याचे उल्लेख आढळतात.

इ. स. १६८० मध्यें शिवाजी मृत्यु पावल्यानंतर फिरंगी लोक पुनः शिरजोर-पणानें वागूं लागले. तेव्हां संभाजीनें पुनः त्यांच्यावर स्वारी करून त्यांना जेरीस आणण्याचा प्रयत्न केला. संभाजीची व पोर्तुगीज लोकांची चेऊल येथें इ. स. १६८३ मध्यें एक जंगी लढाई झाली, पण तींत यश न आल्यामुळें त्यानें गोमांतक प्रांतावर स्वारी करून फोंडें येथें फार निकराचें युद्ध केलें. त्या युद्धामध्यें संभाजीचें शौर्य उत्तम रीतीनें व्यक्त झालें. परंतु मराठयांचा शत्रु औरंगजेब ह्याजकडे पोर्तुगीज लोकांनीं संधान बांधून त्याचा आश्रय मिळविल्यामुळें, संभाजीस पोर्तुगीज लोकांस अगदीं रसातळास मिळविण्याचा विचार सिद्धीस नेतां आला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्यांस मोंगलांच्या महाराष्ट्रांतील हालचालीमुळें तिकडील मोहीम संपविणें भाग पडलें. तथापि त्यानें स्वस्थ न बसतां, वसईपासून दमणपर्यंत, फिरंगी अमलास अगदीं त्राहि त्राहि केल्यामुळें, गोंव्याचा व्हाईसराय ( Francisco de Tavora ) ह्यानें त्यांशीं तहाचें बोलणें लाविलें. परंतु संभाजीनें त्यांजपासून ५० पन्नास लाख रुपये खंडणी मागितल्यामुळें मराठ्याचा व फिरंग्यांचा संधि झाला नाहीं.

संभाजीच्या पश्चात् मराठी राजसत्तेस कांहीं कालपर्यंत संकटावस्था प्राप्त झाली; परंतु ह्या प्रसंगीं महाराष्ट्रराज्याचे कट्टे अभिमानी वीर निर्माण झाले, व त्यांनीं आलेलें संकट दूर करून महाराष्ट्रराज्याचें रक्षण केलें. राजारामाचे कारकीर्दींत पोर्तुगीज लोकांनीं जरी थोडीबहुत गडबड केली, तरी मराठी आरमाराचा अधिपति कान्होजी आंग्रे ह्यानें कोंकणकिनाऱ्यावर परराष्ट्रांच्या चळवळी बिलकूल चालूं दिल्या नाहींत. शाहूच्या कारकीर्दींत आंग्रे व पेशवे ह्यांनीं पोर्तुगीज लोकांस चांगलीच तंबी देऊन, त्यांच्या ताब्यांतील पुष्कळ जागा जिंकून घेतल्या. तेव्हां

त्यांना अलीबाग मुक्कामीं ता. ९ जानेवारी इ. स. १७२२ रोजीं मराठ्यांशीं तह करणें भाग पडलें. ह्या वेळीं गोंव्यांचा व्हाईसराय फ्रान्सिस्को जोजे द सँपो ए कास्ट्रो हा होता. त्या तहामध्यें मुख्यत्वेंकरून (१) आंग्र्यानें व मराठ्यांनीं फिरंगी लोकांच्या ताब्यांतील मुलखांतून खंडणी घेऊं नये; (२) फिरंग्यांनीं मराठ्यांचीं जहाजें आपल्या बंदरकिनाऱ्यास कोलावणं[1] न घेतां, जाऊं येऊं द्यावीत; (३) मराठ्यांच्या शत्रूंस आश्रय देऊं नये; (४) परस्परांनीं परस्परांस लागेल तेव्हां मदत करावी; आणि (५) परस्परांचीं जप्त केलेलीं गलबतें पुनः परत द्यावीं; हीं मुख्य कलमें होतीं.

ह्यानंतर कांहीं दिवस फिरंग्यांची हालचाल अगदीं बंद पडली. परंतु पुढें त्यांनीं कोंकण प्रांतांत पुनः गडबड केल्यामुळें मराठ्यांनीं वसई साष्टी वगैरे जागा जिंकून घेण्याचा निश्चय केला; व त्याप्रमाणें त्यांच्या व पोर्तुगीज लोकांच्या झटापटी सुरू झाल्या. त्या इ. स. १७३९ मधील वसईच्या तुमुल युद्धापर्यंत एकसारख्या चालू होत्या. शेवटीं चिमाजी आपा पेशवे ह्यानीं वसईवर हल्ला करून पोर्तुगीज लोकांशीं निकराचें युद्ध केलें. ह्या युद्धामध्यें फिरंग्यांनींही आपल्या शिपाईगिरीची शर्थ केली, परंतु मराठ्यांच्या अद्वितीय शौर्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. शेवटीं, त्यांनीं ता. १६ मे इ. स. १७३९ रोजीं, चिमाजीआपास शरण जाऊन वसईचा किल्ला सोडून दिला. ह्या वेळीं मराठ्यांनीं शरणागतांस अभय देऊन त्यांना सुरक्षितपणें जाऊं दिलें, व त्यांच्याशीं केलेलें वचनप्रमाण अक्षरशः पाळलें. ही गोष्ट पाश्चात्य इतिहासकारांनींही कबूल केली आहे.*

वसई येथें पोर्तुगीज लोकांचा अगदीं पराभव झाला, तरी त्यांची चळवळ आणखी दोन वर्षें तशीच चालू होती. परंतु आंग्रे, सांवतवाडीकर भोंसले व बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं त्याना जागोजाग नतिजा दिल्यामुळें, त्यांना मराठ्यांबरोबर तह करणें भाग पडलें. अखेर त्यांनीं मराठ्यांना चेऊल बंदर देऊन, साष्टी व बारदेश ह्यांवरील मराठ्यांचे शह उठविले. हा मराठ्यांचा व पोर्तुगीज लोकांचा तह ता. १८ सप्टेंबर इ. स. १७४० रोजीं झाला. तो मुंबईचे

१ कोलावण=जहाजांवरील जकात. मराठ्यांच्या ताब्यातील बंदरकिनाऱ्यावर ही वसुलाची मोठी बाब असे.

* "On the departure of the Portuguese from Bassein the Marathas took possession of that place, and testimony is borne to the fact that they faithfully observed all the conditions of the capitulations, permitting all who wished to remain there in peace."—*The Portuguese in India* Vol II. P. 412.

गव्हरनर स्टीफन लॉ ह्यांच्या वतीनें, क्याप्टन इंचबर्ड ह्यांनीं मध्यस्ती करून, बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांच्याकडून मान्य करविला. ह्या वेळीं पोर्तुगीज गव्हरनर दों पेद्र मस्करे (Dom Pedro Mascarenhas) हा होता. ह्या तहामध्यें मुख्यत्वेंकरून:—(१) साष्टी बारदेशांतून पेशव्यांनीं आपलें सैन्य परत न्यावें (२) कुकोलीचा किल्ला पोर्तुगीज लोकांस परत द्यावा. (३) दमण गांव व किल्ला पोर्तुगीज लोकांकडे ठेवावा, व त्याच्या बेगमीस न्हेर परगणा द्यावा. (४) पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांच्या ताब्यांतील वसई, दमण, साष्टी, बेलापूर, उरण, रेवदंडा वगैरे प्रांतांस बिलकूल उपसर्ग करूं नये. (५) फोंडें, जांबोली, पंचमहाल, सोंधें, बेदनूर वगैरे प्रांतांत मराठ्यांचा तालुका आहे तेथें उपसर्ग लावूं नये. (६) मराठ्यांचीं तारवें व तरांडीं ह्यांस बिनहरकत दर्यांत आमदरफ्ती करूं द्यावी. (७) चेऊलचा किल्ला व तेथील दारूगोळा मराठ्यांचे ताब्यांत द्यावा. (८) परस्परांचे कैदी परस्परांकडे पाठवावे. (९) परस्परांच्या शत्रूंस परस्परांनीं आसरा देऊं नये; वगैरे मुख्य कलमें होतीं. ह्याप्रमाणें तह झाल्यानंतर पुन: न्हेर परगण्यांतील गांवांचे वांटणीबद्दल कांहीं वाद राहिला, ह्मणून पुनः वसईचे सुभेदार शंकराजी केशव व दमणचे अधिकारी ह्यांचेमध्यें ता. २९ जानेवारी इ. स. १७४१ रोजीं पुरवणी तहनामा होऊन, पोर्तुगीज व मराठे ह्यांचें सख्य झालें. परंतु तें फार दिवस टिकलें असें दिसत नाहीं.

इ. स. १७४४ मध्यें गोंव्याचा गव्हरनर बदलून त्याचे जागीं दों पेद्रो द अलोर्ना हा आला. ह्यानें मराठ्यांच्या ताब्यांतील फोंडें, सांकळी, डिचोली वगैरे प्रांत घेण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें वाडीकर सांवत आणि पेशवे ह्यांच्याबरोबर पोर्तुगीज लोकांचें भांडण व दुही एकसारखी चालू राहिली. व त्यांत पुनः कोल्हापुरचे संभाजी राजे आणि कुलाब्याचे तुळाजी आग्रे ह्यांच्या स्वार्थसाधक राजकारणांची भर पडली. त्यामुळें पोर्तुगीज लोकांचा व मराठ्यांचा बरींच वर्षे एकसारखा विग्रह चालू होता, असें ह्मटलें तरी चालेल. इ. स. १७५६ मध्यें मराठ्यांनीं सोंधें प्रांतावर स्वारी केली, आणि त्यांच्याकडून फोंड्याचा किल्ला घेण्याचा घाट घातला. त्या वेळीं पोर्तुगीज गव्हर्नर कांडे ड आल्व्हा (Conde de Alva) ह्यानें मराठ्यांशीं सामना करून, त्यांना मागें परतविण्याचा प्रयत्न केला. त्या प्रसंगीं पोर्तुगीज व मराठे ह्यांच्या सैन्यांची मोठी घनघोर लढाई होऊन तींत पोर्तुगीज गव्हरनर ठार मारला गेला. ह्या सोंध्याच्या राजकारणांत पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांचें वर्चस्व प्रस्थापित होऊं न देण्याबद्दल फार प्रयत्न केला, परंतु तो यशस्वी झाला नाहीं. अखेर ता. २६ आक्टोबर इ. स. १७६० मध्यें, पोर्तु-

गीज गव्हरनरानें बाळाजी बाजीराव पेशव्यांशीं तह करून कांहीं वेळपर्यंत त्यांच्यांशीं सलोखा केला. मराठ्यांना ह्या वेळीं पोर्तुगीज लोकांकडून लढाऊ आरमाराचें साह्य घेऊन हबशाचा जंजीरा जिंकून घेण्याची इच्छा होती. त्यामुळें त्यांनीं त्यांच्याशीं स्नेह जोडून, दंडा–राजपुरीपर्यंत फिरंगी गलबतें आपल्या साह्यास आणिलीं. परंतु मराठ्यांना ह्या आरमाराचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तें येण्यापूर्वींच इंग्रजांनीं जंजिऱ्याच्या सिद्दीपासून जंजिरा सर करून घेतला! असो. अशा रीतीनें फिरंगी व मराठे ह्यांचें सख्य झालें, तथापि त्यांची मनांतली चुरस कमी झाली नाहीं. त्यामुळें त्यांच्या आरमाराचे वारंवार सामने होत असत, व मराठे लोक त्यांचीं जहाजें पाडाव करून नेत असत. असा क्रम बरेच दिवस चालू होता. पुढें इ. स. १७७४ सालीं, दों जोजे पेद्र दा काम्र (Dom Jose Pedro da Camara) ह्या नांवाचा गव्हरनर आला. तो मोठा शहाणा व धूर्त मुत्सद्दी होता. त्यानें मराठ्यांशीं कलह वाढविणें हें योग्य नाहीं असें जाणून, आपल्या वतीनें नारायण विठ्ठल धुमे ह्या नांवाचा वकील पाठवून त्यांच्याशीं तह केला व त्यांचा स्नेह संपादन केला. ह्याप्रमाणें नारायण विठ्ठल धुमे हे फिरंग्यांच्या वतीनें पेशवेदरबारांत वकिलावतीवर येईपर्यंत पोर्तुगीज व मराठे ह्यांच्या पूर्वापार राजकारणांचें अल्प दिग्दर्शन आहे. येथून मराठे व फिरंगी ह्यांच्या राजकारणांचे मुख्य सूत्रचालक नारायण विठ्ठल धुमे हेच होते, असें ह्मटलें तरी चालेल.

पोर्तुगीज व मराठे ह्यांच्या राजकीय संबंधाचें वर जें अल्प विवेचन केलें आहे त्यावरून, मराठ्यांचें व त्यांचें इ. स. १७२२, १७४०, १७६० इतके वेळां तहाचे प्रसंग आले, हें उघड आहे. ह्यापैकीं एका प्रसंगीं मुंबईकर इंग्रजांच्या वतीनें क्याप्टन इंचबर्ड व त्यांचा वकील शिवाजी रणसोड[1] हा होता. परंतु बाकीच्या प्रसंगीं कोण वकील होते, हें समजण्यास मार्ग नाहीं. फिरंग्यांकडे मराठ्यांचे वकील इ. स. १७३३ पासून असल्याचा दाखला सांपडतो. त्यांत पहिले वकील बाळाजी महादेव हे होते. हे इ. स. १७३७ पर्यंत होते. इ. स. १७५६ पर्यंत राघो गणेश ह्या नांवाचे वकील होते. परंतु ह्यापुढें नारायण विठ्ठल धुमे ह्यांच्या खेरीज ह्मणण्यासारखें दुसरें नांव आढळत नांहीं. नारायण विठ्ठल धुमे हे इ. स. १७७६ पासून इ. स. १७९२ पर्यंत, मराठ्यांच्या वतीनें पोर्तुगीज लोकांच्या राजकारणांत होते, अशी साधार माहिती मिळते.

---

१. मुंबईकर इंग्रजांकडे रघुनाथ रणसोड संजगीरी ह्मणून जो वकील होता, त्याचा हा भाऊ असावा असें नांवावरून वाटतें. तसें असेल तर इंग्रजांच्या राजकारणांत इ. स. १७४० पासून हें संजगिरीघराणें प्रसिद्ध आहे असें ह्मटलें पाहिजे.

नारायण विठ्ठल धुमे ह्यांची पूर्वीची माहिती आह्मांस मुळींच मिळत नाहीं, तथापि ते गोमांतकांतील धुमे ह्या प्रसिद्ध घराण्यांतील असून ते पोर्तुगीज भाषा चांगली जाणत असत, व त्या कारणानें ते आपल्या बुद्धिमत्तेनें मराठ्यांच्या राजकारणांत प्रसिद्धीस आले असावेत, असें दिसतें. वर सांगितलेंच आहे कीं, गोंव्यास इ. स. १७७४ मध्यें दों जोजे पेद्र दा काम्र ह्मणून जो गव्हरनर आला, त्यानें मराठ्यांशीं सख्य केलें. त्या वेळीं मराठ्यांच्या वतीनें राजकीय बोलणें करण्यास नारायण विठ्ठल धुमे हेच प्रमुख होते. ह्यावरून त्यांचें वजन ह्या वेळीं बरेंच असलें पाहिजे, हें उघड आहे. दा काम्र हा गव्हरनर गोंव्यांत प्रसिद्ध असून, त्याचे कारकीर्दींत गोंव्याची पहिली खानेसुमारी झाली, ही गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे.

मराठ्यांचें विजयदुर्ग येथील आरमार दिवसेंदिवस प्रबल होऊन, रणशूर आनंदराव धुळपाच्या प्रतापानें तें युरोपियन राष्ट्रांस अगदीं अजिंक्य वाटूं लागलें. त्यानें दर्यांमधून आमदरफ्ती करणारीं परराष्ट्रीय व्यापारी जहाजें हल्ला करून पाडाव करण्याचा व लुटण्याचा सपाटा चालविला. तेव्हां पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांच्या आरमाराशीं टक्कर देण्याची सोय नाहीं असें पाहून, मुकाट्यानें तह करण्याचा, दूरदृष्टीचा, पोक्त विचार मनांत आणिला. धुळपानें पोर्तुगीज लोकांचीं तरांडीं समुद्रांतून फिरकूं देण्याचें अगदीं बंद केलें, त्या वेळीं फिरंगी गव्हरनर दा काम्र ह्यानें पेशव्यांशीं पत्रव्यवहार करून तहाचें बोलणें सुरू केलें; आणि आपल्या वतीनें नारायण विठ्ठल धुमे ह्यांस पुण्यास पाठविलें. त्यांनीं पुणें दरबारच्या मुत्सद्द्यांचें मन वळवून, त्यांच्याकडून फिरंगी सरकाराशीं सलोखा करण्याबद्दलची एक कलमबंद यादी लिहून घेतली. पुणें दरबारचे प्रधान मंत्री सखारामबापू व नाना फडणवीस ह्यांना, राघोबादादांच्या कलहामुळें फिरंग्याशीं स्नेह करणें अनेक राजकीय हेतूंस्तव इष्ट होतें. तेव्हां त्यांनीं नारायण विठ्ठल ह्यांस पुढें दिलेलीं कलमें मान्य केलीं:—

## लेखांक १.

श्री. ता. २४ आगष्ट इ. स. १७७६.

"यादी दों जुजे पेद्र द कांम्र विजरे गोंवें सुमा सबा सबैन मया व अलफ. गोंवेंकराकडील वकील नारायण विठ्ठल धुमे हुजुर आले. सरकारचा व गोंवेंकराचा निखालस स्नेह व्हावा ह्मणोन विनंती केली. त्याजवरून सरकारांतून कलमें

सरई धुळपांनीं पाडाव करून आणिली, त्यास सरई माघारी फिरंग्यास दिली. त्यांत सरंजाम होता तो सरकारांत राहिला.

| | |
|---|---|
| त्याची किंमत अजमासें. | रुपये ६६४५४ |
| बतेला विजयदुर्गास सांपडला, त्यांतील मालाची किंमत अजमासें. | १८०० |
| | ६८२५४ |

यास मुदती.
२३००० भाद्रपद शुद्ध पौर्णिमा.
२३००० कार्तिक शुद्ध १५.
२२२५४ पौष शुद्ध १.
६८२५४

अडुसष्ट हजार दोनशें चौपन्न. सदरहू मुदतीप्रमाणें क्षेप निक्षेप सरकारांतून द्यावे. येणेंप्रमाणें पावला ऐवज बजा करून द्यावे. येणेंप्रमाणें करार करावे.

सरकारचा व फिरंग्यांचा निखालस स्नेह झाला, त्यापक्षीं राजश्री दादासाहेब अगर इकडील शत्रु कोणी गेला आला, त्यास आसरा देऊं नये. निखालसपणें वर्तावें. येणें-प्रमाणें व सरकारांतूनही आसरा देऊं नये. येणेंप्रमाणें करार करावें.

बतेला धुळपास सांपडला आहे, तो माघारा द्यावा. तो बतेला न आला तर वस-ईचे आरमारपैकीं मोबदला बतेला द्यावा, येणेंप्रमाणें तीन महिन्यांत द्यावा. येणेंप्रमाणें करार करावें.

सरई फिरंग्यांस माघारी दिली; त्याजवरील सरंजाम, आरमारी शिडें, काठ्या, दोर-खंडें वगैरे सरकारांत राहिलीं ह्मणतात. त्याची किंमत अजमासें ३००० रुपये.

तीन हजार रुपयांचीं लांकडें वसईहून दवणेस पावतीं करावीं ह्मणोन विसाजी केशव यांस सनद देवावी.

सरकारचा फिरंग्यांचा स्नेह झाला, सबब फिरंग्यांस सरकारांतून गांव कमाल बेरजेचे १५००० रुपये.

पंधरा हजार रुपयांचें, दवणेचे उपयोगी व सरकारांतून दिले असतां सरकार अमलास पेंच नाहीं असें पाहून द्यावें. येणेंप्रमाणें सरकार अमलास वगैरे पेंच नाहीं असें द्यावें. गांव देऊं त्यांत इमारत करूं नये. येणेंप्रमाणें करार करावें.

चंद्र ९ रजब सन सबा सबैन अधिक भाद्रपद मास."

ह्याप्रमाणें पुणें दरबारची कलमबंदीची कच्ची यादी गेल्यानंतर गोंव्याचे गव्हनर दा काम्र ह्यांनीं नारायण विठ्ठल धुमे ह्यांचें बरोबर सखारामबापू बोकील ह्यांचे नांवें एक दोस्तीचा खलिता लिहून पाठविला. हा पोर्तुगीज भाषेंत असून त्यावर त्यांची सही आहे. ह्या खलित्यामध्यें 'शाश्वत दोस्तीचा व सलुखाचा' तह करण्यासाठीं पेशव्यांनीं नारायण विठ्ठल ह्यांचे ताब्यांत १२००० बारा हजारांचे गांव द्यावेत वगैरे मजकूर आहे. ह्या खलित्याचें त्या वेळचें जुनें भाषांतर उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें:—

## लेखांक २.

### तालिक–खत–फिरंगे.

"अजम सखाराम भगवंत

शहामतपन्हों हशमतदस्तगाहों:–

अर्जी दों जुजे पेद्र दा काम्र ज्यांहांपन्हां हुमायून बादशाह पोर्तुगाल फिदेलिस्म यांचे खलवते व गोवर्नदोर व कपितान् व जनरल हजरत इस्ताद दाईंद्य व आजिये पुर्तुगेश–

आं शाहामतपन्हां यांहीं किताबेत निविस्तन केली. पोहोंचून त्यामधील मजनूंन जाहीर जाहला.

ईजानेब अज हजरतइस्तादाचे अमलास दाखल होतांच नारायण विठ्ठल धुमा येथील आदमी रवाना करून, अमारत व आलीमर्तबेत राव पंडित प्रधान यांची दोस्ती रखोन, जानुबेनें चालवयाची प्रचीति दाविली. बाकी इकडील पृथ्वीवलयांकित सामर्थिकांसीं मध्यम असोन, त्यांस मदद न देतां, व हरवख्त इच्छून व हालींही ते इच्छीत असतां, त्यांस अज हजरत इस्तादाचे कबजांतील ठाणेंत पैवस्त न केलें. अमारत व आलीमर्तबत यांसाठीं हे सदरहू सन्मान दिलांत आणिलेवरून, नारायण विठ्ठल धुमा याकडे द्यावयाचा करार केला आहे. ते पृथुक दवणेकडील परागणे अज हजरत इस्तादास ओपूनें द्यावे. यास सेरतें याचे परिणामास व दृढ दोस्ती होऊन जियादतीनें चालवयास आं शाहामतपन्हा यांहीं मेहनत खातरेंत आणावी म्हणून ईजानेब च्याहाताहों.

आं शाहामतपन्हास सांगोन घेतलें विना राहवत नसे कीं, ज्याहाज सांत आज वोपून दिलें. परंतु त्याचे सामानासाठीं द्यावयाचे करार केले पाळून आले नाहींत. त्याचे हुंडी अज मैकान राजधान गोवेंत पाठवून फौरकात केली पाहिजे.

ज्याहाज मजकूरचे आवदनाबद्दल लांकडांसमंदें दवणेमधें बारा हजार रुपये द्यावयाचे केले. ते तेथील कोटच्या गोवर्नदोराताबीन होणेस अनकरी बहुकूम फर्माविले पाहि-

१ तालिक+खत+फिरंग=नक्कल+पत्र+फिरंगी=फिरंगी पत्राची नक्कल. २ शहामतपन्हा=राज्यरक्षक, राजकार्यधुरंधर. ३ हशमतदस्तगाहा=वैभवसंपन्न, ऐश्वर्यमंडित. ४ ज्यांहापन्हां=जगद्रक्षक. ५ किताबत=पत्र, खलिता. ६ निविस्तन केली=लिहिली. ७ मजनून=मजकूर. ८ ईजानेब=आम्ही. ९ हसरतइस्ताद=(बहुमानार्थी) तुमचें सरकार, तुम्ही. १० अमारत व आलीमर्तबत=फारसी मायना. ह्याचा अर्थ राजसत्ता व ऐश्वर्य ह्यांनीं मंडित. ११ जानुबैन=उभयतांमध्यें. १२ पैवस्त न केलें=प्रविष्ट होऊं दिलें नाहीं. १३ ओपून देणें=मोबदला देणें, विकणें. १४ सेरत=शर्त, अट. १५ जियादतीनें=सरळ रीतीनें. १६ मकान राजधान=ठिकाण राजधानी गोंवें. १७ फारकात=फारकत, निकाल. १८ आवदन=सामान, जहाजाचीं लांकडें वगैरे.

जेत ह्मणून च्याहाताहों, व त्याजप्रमाणें रत्नागिरीस तरांडीं दस्त केलीं, सामानसुद्धां सुरळीतपणीं बहुमानें वोपून देववावीं.

हे किताबतींत सदरहू निविस्तन केलेस, आं शाहामतपन्हाचे जबाबावरून अजहजरत इस्तादामध्यें व अमारत आलीमर्तबत यांमध्यें, शाश्वत दोस्तीचा व सलुकाचा तह केला जाईल. खुदायँताला आं शाहमतपन्हास आपले पन्हैंमध्यें रखो. हे नि॥ गोंवा व तारीख २१ माहे जनेर सन १७७७."

दों जुजे पेद्र दा काम्र. ( सही फिरंगी. )

ह्याप्रमाणें पोर्तुगीज गव्हरनराचें पत्र नारायण विठ्ठल ह्यांनीं पुणें दरबारास सादर केलें. नंतर त्यांच्या पत्राप्रमाणें फिरंगी लोकांस दमणप्रांतीं बारा हजारांचे गांव देण्याचें पुणें दरबारानें कबूल केलें, व उभयतांचा दिलभरंवसा जुळून नारायण विठ्ठल ह्यांचे मार्फत तहाचीं कलमें ठरविण्यांत आलीं. प्रथमतः ता. १८ रमजान समान सबैन ह्मणजे ता. २१ आक्टोबर इ. स. १७७७ रोजीं एक तहनामा उभय पक्षांच्या संमतीनें मंजूर झाला. परंतु पुनः कांहीं तेढी निघाल्या. त्यांचें निराकरण होऊन ता. ६ जिल्हेज सुरुसन समानीन–ता. १५ दिसेंबर इ. स. १७७९ रोजीं दुसरा तहनामा नारायण विठ्ठल धुमे ह्यांच्या विद्यमानें नमुदांत आला. हा तहनामा अतिशय महत्त्वाचा असल्यामुळें येथें दाखल करणें अवश्य आहे.

## लेखांक ३.

श्री.

"करारनामा सरकार राजश्री माधवराव पंडित प्रधान सुरुसन समानीन मया अलफ. अजम दों जुजे पेद्र द काम्र फिरंगी विजुरे गोंवें यांजकडून राजश्री नारायण विठ्ठल धुमे हुजूर येऊन, सलुखाचा मजकूर विदित करून, सरकारचा व फिरंगी गोंवेंकर यांचा तहाचा ठराव जाहला. कलमें बितपसीलः—

सरकारचें आरमारासीं व फिरंगी यांचे आरमारासीं अगर एकाही तरांडीयासीं अथवा एकही तर्फेचें एकच तरांडें व दुसरें तर्फेचे आरमारासीं दर्यांत गांठ पडली तर सलुखानें वर्तावें. कलम १.

चीनच्या प्रांतांतील फिरंगी यांचे बंदरचीं जहाजें माल भरून उदमास हरएकाचे बंदरीं खरेदी फ्रोख्तास समुद्रांत फिरतात, त्यास सरकारतर्फेच्या आरमारानें मुजाहीम होऊं नये; व चीनच्या बंदरीं सरकारतर्फेचे बंदरचीं जहाजें उदमास जाण्याकरितां समुद्रांत फिरतील, त्यांस फिरंगी यांनीं मुजाहीम होऊं नये. कलम २.

या तहनाम्याचे अगोदरचे लढे असतील ते दुतर्फाही काढूं नयेत. कलम ३.

---

१ खुदायताला = परमेश्वर. २ पन्हा = संरक्षण, आश्रय. ३ विजुरे = व्हाइसराय. ४ फ्रोख्त = विक्री. ५ मुजाहीम = अडथळा, हरकत.

सरकारच्या राज्यांत फिरंगी यांजकडील मुलकांतील सावकारी तरांडीं, पडाव्या, बतेले, माल घेऊन येतील, उदीम व्यवसाय करणार. त्यांणीं सालाबादप्रमाणें जकात सरकारांत देऊन करावा व कोणापासून तोशीस होऊं नये. सावकार आपला जिन्नस विकून, दाणा वगैरे जिन्नस खरेदी करून सुखरूप न्यावा. याप्रमाणें सरकारचे राज्यांतील सावकारांनीं बतेले व पडाव्या फिरंगी यांचे मुलकांत दाणा वगैरे जिन्नस विकून, तेथील जिन्नस मुबदला वगैरे खरेदी करून घेणार तो घ्यावा. सालाबादाप्रमाणें जकात देतात ती देऊन सुखरूप जावें. कोणापासून उपसर्ग होऊं नये. दुतर्फा करार असे. कलम ४.

सरकारचे आरमारास व गनीमासीं गांठ पडून युद्ध होत असतां, त्या समयीं फिरंगी यांचें आरमार व फरगत येऊन पावलें, तर गनीम फिरंगी याचा स्नेही नसल्यास, होईल तें साहित्य व कुमक करावी. याप्रमाणें दुतर्फाचे आरमारानें करावें. कलम ५.

सरकारचे राज्यांतील फिरंगी यांचे मुलखांत खुन्या, मातबर व घरचे वडील धाकटे व जमीदार वगैरे हरकोणी पळोन जाऊन सरकारचे प्रांतांत दांडगावे व फितुर करील त्यांस आश्रा देऊं नये व फितुर करूं देऊं नये व परस्परें राज्यांतील सरदेस[१] फितुरी यास जागा राहण्यास देऊं नये. याप्रमाणें फिरंगी यांचे मुलखांतील सरकारचे राज्यांत खुन्या मातबर जमीदार वगैरे हरकोणी पळोन येऊन फिरंगी यांचे प्रांतांत दांडगावे व फितुर करील, त्यास आश्रा देऊं नये व फितुर करूं देऊं नये. परस्परें राज्यांतील सरदेस फितुरी यास जागा राहण्यास देऊं नये. याप्रमाणें दुतर्फा चालावें. कलम ६.

सरकाराचे राज्यांत, गुजराथ, व काठेवाड व सोरठ वगैरे सुद्धां हरएक जागां फिरंगी यांनीं पुढें ठाणें घालूं नये व पहिल्यापासून फिरंगी यांजकडे हल्लीं बंदरें आहेत तेथून आमदरफ्ती[२] करावी. कलम ७.

फिरंगी यांनीं सरकारांत स्नेह बहुत चालविला व पुढेंही विशेष स्नेह चालविणार, येविशीं नारायण विठ्ठल धुमे यांनीं निशा केली. त्याजवरून दवणेस सालमजकुरापासून बारा हजार रुपयांचे गांव सरकार अमलास वगैरे पेंच नाहीं असे नेमून द्यावे. त्यांत फिरंगी यांनीं इमारत करूं नये. याप्रमाणें करार केला असे. गांव नेमून दिले जातील. कलम ८.

सरकारच्या आरमारासीं व फिरंगी यांचे आरमारासीं मार्गीं गांठ पडून, एक तर्फेस पाणी व फाटी नसल्यास दुसरे तर्फेनें पाणी व फाटी अधिक शिल्लक असेल तर द्यावें, व गल्ला एकाच्या आरमारावर शिल्लक नसोन दुसरे आरमारावर अधिक शिल्लक असेल तर नख्त रुपये घेऊन गल्ला द्यावा. येणेंप्रमाणें दुतर्फा चालावें. कलम ९.

सरकारचे राज्यांतील बंदी व गुलामें फिरंगी यांचे मुलकांत पळोन जातील. तीं त्यांणीं हवालीं करावीं. याप्रमाणें दुतर्फा चालावें. कलम १०.

दुतर्फा तह हल्लीं ठरला त्यास दरम्यान हरएक किलाफ[३] भासल्यास वकिलाचे मार्फतीनें बोलून निखालस दुतर्फा चालावें. कलम ११.

---

१ सरदेस=सरहद्दीवर. २ आमदरफ्ती=जाणें येणें. ३ किलाफ=भांडण, तंटा.

सरकारचे राज्यांतील व फिरंगी याचे मुलखांतील सावकारी तरांडीं हरएक बंदरीं जावयाकरितां समुद्रांत फिरतात. तीं दुतर्फांचे आरमारास अगर हरकोणी युद्धाचे जहाजास किंवा शिबाडास सांपडलीं, तर कौलें[1] नाहीं ह्मणोन धरूं नये. सुखरूप जाऊं द्यावीं. दुतर्फा राज्यांतील सावकारी तरांडें समुद्रांत गनीम नेत असेल आणि दुतर्फांमधील कोणाचेंही आरमार किंवा एकादी तरांड्यांसीं गांठ पडली, तर मदत करून जोर पोहोंचल्यास सोडून, जवळसार खाडीपावेतों पोहोंचवावें. याप्रमाणें जो सरदार करील त्याचा खावंदानें बहुमान करावा. कलम १२.

सरकारचा व फिरंगी यांचा तह जाहला, याअन्वयें परस्परें सरदेच्या वगैरे अमलदारास व आरमारास ताकीद व्हावी. कदाचित् मामलेदारापासून व मराठे राज्यांतील अधिकारी यांजपासून अंतर पडों लागल्यास, ज्याचें त्यांणीं ताकीद करून बंदोबस्त करावा. याप्रमाणें दुतर्फा. कलम १३.

सरकारचे गनीमास फिरंगी यांणीं मदत करूं नये व साहित्य वगैरे जिन्नस देऊं नये. व फिरंगी यांचे गनीमास सरकारांतून साहित्य व मदत व जिन्नस वगैरे देऊं नये. कलम १४.

दुतर्फांतून एकीकडे कमजोर पडल्यानें दुसऱ्यानें दिकतें[2] काढून कलह करूं नये. कराराप्रमाणें सलुखानें वर्तावें. कलम १५.

सरकारचे राज्यांतील शिपाई लोक वगैरे फिरंगी यांचे मुलखांत पळोन गेले तर ठेवूं नये, व आस्रा देऊं नये. माघारे द्यावे. याप्रमाणें फिरंगी यांजकडील सरकारचे राज्यांत फिरंगी लोक वगैरे पळून आले तर ठेवूं नये व आस्रा देऊं नये. माघारे द्यावे. कलम १६.

सरकारच्या राज्यांतील साहुकारी तरांडें शिकस्त व फुटोन फिरंगी यांचे बंदरीं लागलें, तर तरांडें मालसुद्धां माघारें द्यावें. अगर गनीमाच्या भयास्तव बंदरीं आलें तर त्यास मुजाहीम होऊं नये. याप्रमाणें दुतर्फा चालावें. कलम १७.

पेशजी फिरंगी यांची सरई सरकारांत विजयदुर्ग आरमारानें धरून आणिली, ती फिरंगी याचा स्नेह जाणोन माघारी दिल्ही. त्या मालाचा पैका द्यावयाचा करार रुपये:–

६६४५४ नख्त एकसाला.

३००० लांकडें सागवानी वसईहून दवणेस पोहोंचवावीं एकसाला.

६९४५४

एकूण एकूणहात्तर हजार चारशें चोपन रुपये नेमून दिले जातील. कलम १८.

एकूण अठरा कलमें करार केलीं असेत. सदर्हूप्रमाणें दुतर्फा चालावें. येणेंप्रमाणें करार करावें.

छ ६ जिल्हेज सुरुसन समानीन मार्गशीर्ष."

हा तहनामा पुणें दरबारच्या राजकारणांचा दर्शक आहे. पुणें दरबारांत दुफळी होऊन राघोबादादा इंग्रजांस मिळाले होते. तेव्हां पोर्तुगीज लोकांशीं सख्य करून

१ कौल=परवाना. ( Permit. ) २ दिकत=शंका, संशय.

त्यांचें साह्य घेणें पुणें दरबारास जरूर होतें. त्याप्रमाणें त्यांनीं फिरंग्यांसीं सलूक करून आपला राजकीय मतलब सिद्धीस नेला. ह्या कामीं नारायण विठ्ठल धुमे ह्यांचा पुणें दरबारास फार उपयोग झाला; व त्यांची पुणें दरबारांत चांगली प्रतिष्ठा वाढली.

ह्या दोस्तीचा तह ठरल्यानंतर मराठे व फिरंगी ह्यांचा फारसा हर्षामर्ष झाला नाहीं. ह्या वेळेपासून हिंदुस्थानांतील पोर्तुगीज लोकांचें क्षात्रतेज मंदावत चाललें, आणि दुसरें युरोपियन राष्ट्र रणभूमीवर येऊन, त्यानें आपल्या युद्धकौशल्यानें व बुद्धिचातुर्यानें सर्व हिंदुस्थानामध्यें आपलें वर्चस्व स्थापित केलें. हें राष्ट्र इंग्रज हें होय, हें निराळें सांगावयास नकोच. पोर्तुगीज लोकांचा तह झाल्यापासून मराठ्यांस ह्या राष्ट्राबरोबर टक्कर देऊन स्वसत्ता रक्षण करणें भाग पडलें. ह्या व इतर युद्धप्रसंगीं पोर्तुगीज लोकांचा अंतस्थ रीतीनें मराठ्यांस लढाईचे कामीं बराच उपयोग झाला, असें मानण्यास हरकत नाहीं. तळेगांव वगैरे सुप्रसिद्ध रणसंग्रामामध्यें मराठ्यांच्या लष्करामध्यें फिरंगी लोक आपल्या युद्धकलेचें प्रदर्शन करीत असल्याचें दिसून येतें. असो.

फिरंग्यांचे दरबारांतील वकील नारायण विठ्ठल ह्यांच्या संबंधाचे संपूर्ण कागदपत्र उपलब्ध न झाल्यामुळें त्यांच्या हातून घडलेल्या सर्व राजकारणांची सविस्तर माहिती समजण्यास मार्ग नाहीं. तथापि, इ. स. १७८५।८६ मधील मराठ्यांच्या टिपूवरील मोहिमेसंबंधानें जीं थोडींशीं पत्रें नाना फडणविसांच्या दप्तरांत उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून मराठ्यांच्या वतीनें नारायण विठ्ठल धुमे हे फिरंगी सरकाराकडे कोणत्या प्रकारें राजकारणें चालवीत असत, त्याची अल्पशी कल्पना करितां येते.

इ. स. १७८५ मध्यें टिपूनें कर्नाटकावर स्वारी करून, मराठ्यांच्या स्वामित्वाखालील नरगुंद, कितूर वगैरे संस्थानें काबीज केलीं; नरगुंदकरास कुटुंबासहित कैद करून त्याच्या सुस्वरूप तरुण मुलीस आपल्या जनानखान्यांत नेलें; हिंदु लोकांवर फार जुलूम चालविल्यामुळें २००० ब्राह्मणांनीं त्याच्या भीतीनें जीवंत जलसमाधि घेतल्या; अशा प्रकारें अत्यंत अनर्थ उडवून दिला. त्यामुळें मराठ्यांस त्यावर स्वारी करून त्यास तंबी देणें भाग पडलें. ह्या प्रसंगीं नाना फडणविसांनीं स्वतः लढाईवर जाण्याची तयारी केली, आणि टिपूची खोड मोडण्याकरितां इंग्रज व पोर्तुगीज ह्यांची लष्करी कुमक मागविली. ह्या वेळीं फिरंगी लोकांकडे बोलणें करण्यासाठीं नारायण विठ्ठल धुमे ह्यांस नाना फडणविसांनीं गोव्याहून पुण्यास मुद्दाम बोलावून आणिलें, व पूर्वीच्या तहाप्रमाणें फिरंग्यांनीं मराठ्यांस मदत करावी असें त्यांच्याकडे बोलणें चालविलें. गोंव्याहून पत्रोत्तरें येण्यास बराच वेळ लागला, त्यामुळें

नारायण विठ्ठल ह्यांचें पुणें मुक्कामीं राहणें पडलें. दरम्यान नाना फडणविसांस राजकारणाच्या त्वरेकरितां कर्नाटकावरील स्वारीची सिद्धता करून डेरेदाखल होणें भाग पडलें. त्यामुळें फिरंग्यांकडील राजकारणांचा पत्रव्यवहार, नानांचे परराष्ट्रांकडील बोलणें करणारे चिटणीस रा. रा. बहिरो रघुनाथ मेहेंदळे ह्यांचे मार्फत पुण्याहून नानांच्या लष्करांत चालू झाला. नारायण विठ्ठल ह्यांचें राहणें पुण्यास लांबत चाललें व फिरंग्यांकडील कलमबंदीचे जाबसाल येण्यास विलंब लागत चालला, त्या प्रसंगीं नाना व बहिरोपंत ह्यांच्यामध्यें झालेला कांहीं पत्रव्यवहार सांपडला आहे. त्यावरून नारायणराव धुमे ह्यांच्या मार्फत फिरंगी सरकाराकडे चाललेलीं मराठ्यांचीं राजकारणें अल्पशीं समजून येतात. हीं पत्रें येणेंप्रमाणें:—

## लेखांक ४.

पेवस्ती चंद्र ४ जमादिलावल. **श्री.** ता. १ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २९ रबिलाखरपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. चंद्र २० रबिलाखरचें आज्ञापत्र सादर जाहलें. तेथ आज्ञा कीं राजश्री नारायणराव वकील गोंवेंकर यांसीं टिपूचे मसलतप्रकरणीं बोलणें होऊन, यादी कलमबंदीच्या जाहल्या असतां, अद्याप फिरंगी यांजकडील उत्तर येत नाहीं हें काय? तर तुह्मी मशारनिल्हेसी बोलोन उत्तर पाठविणें, आणि फिरंगी यांनीं कलमबंदीचे अन्वयें उद्योग करावा, ह्मणोन आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें कलमबंदीच्या यादी नारायणरायांनीं गोंव्यास पाठविल्या. त्यांनीं त्या कलमांत कांहीं दिक्कती काढोन जाबसाल लिहिले होते. ते नारायणरायांनी पंढरपुरचे मुक्कामीं पत्रें लिहिलीं होतीं. त्याचीं उत्तरें, पहिल्या कलमांत अधिक उणें व्हावयाचें नाहीं, ह्मणोन सरकारांतून झालीं. तें पुन्हां मशारनिल्हेंनीं फिरंगी यांस लिहिलें. तथाप फिरंगी यांनीं पुन्हाही दिक्कती काढोन यांस जाबसाल लिहिला. तेव्हां नारायणरायांनीं सेवकास पुसलें. त्याजवरोन मीं आज्ञेचे अन्वयें उत्तर सांगितलें की, जो ठराव कलमांत लिहिला आहे, तो ठीक आहे. अधीक उणें श्रीमंत ऐकणार नाहीं. त्याजवरोन आणिक यानीं त्यांस निक्षून जाबसाल लिहिला, कीं वारंवार दिक्कतीचें ल्याहावयाचें कारण नाहीं; पहिल्या यादीचे कलमाप्रमाणें तुह्मीं मान्य करावें हे उत्तम आहे. नाहींतर तसेच उत्तर ल्याहावें. याप्रमाणें पुन्हां पत्रें लिहिलीं. त्याचा अद्याप जाबसाल आला नाहीं. आणि हल्लीं नारायणरायांचे बोलण्यांत दिसतें कीं फिरंगी याचे तालुक्यासन्निध टिपूचे जमाव, सडें, सुपें, तीनई, सामराण, कितूर, जांबोट ठिकाणें टिपूचीं, तेथें लोक व फौजा त्यांच्या आहेत, व कोंकण प्रांतीं दक्षिणेस गोंव्याचे काणकोण वगैरे जागां त्यांचे लोक आहेत. त्यापक्षी सन्निध गनीम असतां, गोंव्याचा फिरंग्यांचा जमाव बाहेर मसलतीस जाणें यास्था फिरंग्यांस विचार पडेल, व पहिले फिरंगी यांचे

लिहिण्यांत, नारायणरायांस लिहिलें होतें कीं जलदीनें मसलत जाल्यास उत्तम. चैत्र मासापुढें समुद्रांतून आरमार फिरावयाचें अवघड. तेव्हां आमचा उपयोग कसा पडेल? असें लिहिलें आलें होतें. तों चैत्र मासही सन्निध आला. याजवरोन फिरंगी याचा मसलतीस निघावयाचा अनमान पडेलसें वाटतें. तत्राप त्याचें उत्तर एक वेळ निश्चयाचें, कबूल करितों कीं नाहीं असें येईल तें खरें. टिपूकडील फौज सडें याहून निघोन कितुरास गेली. कांहीं लोक सब्यास राहून ठाणें पाडोन बराबर करीत आहेत. कितुरास जमाव आहेच. याप्रमाणें गोंव्याहून लिहिलें आहे. स्वामींस कळावें. याजप्रमाणें नाराणरायाचें बोलणें जाहलें, तें सेवेसी लिहिलें आहे. मागाहून त्याचीं उत्तरें येतांच तेही सेवेसी लिहीन. विदित व्हावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ५.

**श्री.** ता० ४ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ३ माहे जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. फिरंगी यांचे व सरकारचे जाबसाल मागील तहनाम्याचे अन्वयें बहुतेक उरकले. त्यांजकडील वकील राजश्री नारायणराव स्वामींची स्वारी पुण्यास असतां निरोप मागत होते. त्यास स्वामींनीं आज्ञा केली कीं, हल्लीं टिपूचे मसलतीस मदत फिरंगी यांनीं यावें, येविषयींचें बोलणें होत आहे; याचा काय तो निश्चय जहाला ह्मणजे मशारनिल्हेस निरोप देऊं, ह्मणोन आज्ञा जाली होती. त्यास अद्याप फिरंगी यांजकडोन निश्चयाचीं उत्तरें आलीं नाहींत. आणि गैरहंगाम होत चालला, व फिरंग्यांचे तालुक्यासन्निध टिपूचे जमाव त्याचा विचार पहिला लिहिला आहे. त्याजवरून ध्यानांत आलाच असेल. तस्मात् फिरंगी यांकडोन अनमानसा दिसतो. तेव्हां उत्तरेंही यावयास विलंब लाविला. व उत्तरें आलीं तरी दिक्कतीचीं येतील. त्यापक्षीं कामावेगळ उगीच पुण्यांत राहण्याचें कारण नाहीं. मर्जी असल्यास लष्करांत न्यावें अथवा गोंव्यास जावयासी निरोप देवावयाची आज्ञा करावी. गोंव्यास जाऊन राजकारणाचे मजकूर आपले मर्जीचे अन्वयें फिरंग्यांसी बोलोन होईल तो मजकूर शेवेसी लेहूं. आपली आज्ञा येईल त्याप्रमाणें बोलाविल्यास स्वामीकडेस येऊं. यास्तव काय ती आज्ञा व्हावी ह्मणोन मशारनिल्हे नारायणराव यांचें, विनंती लिहिण्याविषयीं मजजवळ बोलणे जालें, तें सेवेसी लिहिलें आहे व या अन्वयें त्यांनींहीं विनंतीपत्र लिहिलें आहे, त्यास पुण्यास येऊन बहुत दिवस जाहले. घरचे दारचे वाखे गुदरले. सध्यां सून वारली, याजमुळें फार दिक्क आहेत. तूर्त येथें कामही नाहीं. त्या अर्थी लष्करांत बोलावयाचें असल्यास साहित्य सरंजामाविषयीं आज्ञा व्हावी. लष्करांत येतील. नाहीं तर गोंव्यास जावयास निरोप व्हावा. काय उचित परामर्ष सरकारांतून घेणें त्याविषयीं राजश्री अमृतराव भाऊस लेहून आज्ञा देवावी. वरकड सरकारचे लक्षांत, व उपयोगी चाकरी कामकाजाविषयीं कसे

केसो कृष्ण यानें गुजराथ व खानदेश प्रांताचे मिळून चार हजार लोक पायेचे व स्वार ठेविले आहेत. त्याजवळ सत्रा गोरे व सात तोफा व दोन पलटणें ऐसा सरंजाम आहे. जागां जागां खंडण्या घेतात. होळकराची व सरकाराची फौज त्यांजभवताले फिरतात. दोन्ही फौजा मुलूख लुटतात. याप्रमाणें येथें खबरा येतात. गुलजारखान सुरतेस गेला आहे कीं, केसो कृष्ण यास आपले ताबे करून घ्यावे, आणि सुरतेहून दादासाहेबांजवळून आणीख दोन पलटणें घेऊन यावें, आणि खानदेशांत धूम करावी. त्यास दादासाहेबांनीं गुलजारखानास विचारलें जे, गुदस्तां तुह्मीं खानदेशांत दोन तीन परगणे लुटले. लाखोंची पैदास्त केली, त्यांपैकीं तुह्मीं आह्मांस काय पाठविलें जे, आतां तुह्मांस सर्फराज केल्यानें पुढें काय उपयोग आहे ? असें बोलले. गुलजारखान कोणी ह्मणते जे दादासाहेबांजवळीच आहे. कोणी ह्मणते कीं, तेथून निघून अलीकडे आला; इकडे येत आहे. अशी बाजारी वदंता आहे. तुकोजीबावांचा तोफखाना सेंध्रुडचा घाट उतरत आहे. पाराजीपंत घाटाखालीं आहेत. खासे वरच आहेत. शिंदेही लवकरच येणार अशी वदंता आहे. सुलतानजी लांबहाते बाईशीं एकांतीं बोलून छ २३ मिनहूस प्रातःकाळीं सडे तुकोजीबावांकडे गेले. खटला त्यांचा तेथेंच आहे. तुकोजीबावा तोफखानेसुद्धां घाट उतरून वापस आले. इकडे बाईचे भेटीस येणार. हे विज्ञप्ति."

येथील महेश्वरचें वर्तमानः—सुलतानजी लांबहाते येथें आल्याचें वर्तमान पेशजीं डाकेबरोबर विनंतीपत्र पाठविलें आहे. प्रस्तुत बाईचीं व लांबहात्याचीं बोलणीं एकांतीं होतात. एकांतीं बोलण्यांत हरकुबाई मात्र असतात. लोकांतींही दरबारी बोलणें बोलतात. हरकुबाई बोलत होती जे, बाईचा व त्यांचा सुधासा बोलण्याचा रंग पटता दिसत नाहीं. बाईस मीं विचारिलें. त्यास बाईनें सांगितलें जे, अद्याप त्यांचें आमचें बोलणें जालें नाहीं. काय ठरेल तें तुह्मांस सांगूं. सात आठ दिवस जाले, बाई मजशीं एकांतीं बोलली जें, आह्मी ऐकितों कीं, तुकोजीबावा व नारो गणेश यांनीं विसाजी आप्पाजी आठवले यांच्या हातें राजश्री हरिपंततात्याकडे सूत्र लाविलें आहे. तात्यांनीं श्रीमंतांस विनंति केली. श्रीमंतांनीं एक दोन वेळ ऐकिलें नाहीं. परंतु आतां ऐकितों कीं, श्रीमंतांनींही मनन करून, श्रीमंतांचीं व तात्यांचीं पत्रें त्यांजकडे गेलीं. सिलसिला जाबसालाचा त्यांचा त्यांचा लागला आहे. मीं उत्तर केलें जे, श्रीमंत आपल्याकडून चुकले नाहींत. आमच्या चिरंजीवाकडून मजला लिहिविलें होतें जे, कितीक बारीक मोठे जाबसाल कागदींपत्रीं त्याह्माचे नव्हत. कोणी त्यांजकडील मातबर मनुष्य

येऊन ह्या तोडीमोडीचे जाबसाल केले पाहिजेत, तेव्हां एखादा जाबसाल करारांत येईल. असें लिहिविलें होतें. तें पत्रच बजिन्नस मीं तुह्मांस वाचून दाखविलें. त्यावर तुह्मी बोललां कीं आमचे तेथें जाबसालास आहेत, बोलतात. मीं उत्तर केलें जे असें बोलणें तुमचें लागू झालें असतें तर श्रीमंत असें लिहिवितेना. असो. राजकारणें आहेत! त्यावर स्नानास उठली. त्यावर तिसरे दिवशीं प्रातःकाळच्या दोन घटका रात्रीं बाईकडे मीच गेलों होतों. ते वेळेसही कांहीं बोलली जे, 'तुकोजीबावा इकडे येतात. बेइमानीच्या रोखावर येतात. बरें, काय चिंता आहे? परंतु आह्मांस भरंवसा श्रीमंतांचा. कदाचित् श्रीमंतांनीं त्याचकडे डौल दिला, तर आमचा ईश्वर आहे.' असें बोलली. येथें बाईनींही किल्ल्याचा बंदोबस्त केला आहे. बुरजांवर व सफेलीवर तोफा व रेंहकले व जंबुरे चढविले आहेत. दोन हजार पायेचीं माणसें, आरब व सिद्दी ठेविले आहेत. कमजाफा हजार आठशें स्वारही आहेत. या सरंजामानिशीं येथें बाई आहेत. सुलतानजी लांबहाते एक पालखी व पांच खिजमतगारांनिशीं आंत घेतले. याप्रमाणें बंदोबस्तीनें बाई आहेत. तुकोजीबावांकडील वर्तमान ऐकिल्यांत आलें जे, एकांतींचें, तुकोजीबावांचाही येथें येयाचा अनमानच आहे. सबब कीं, सरकारांत त्यांचा जाबसालाचा सिलसिला लागला आहे. यास्तव येथें बाईचा थाक पाहून परभाराच सेंद्रुडचा घाट उतरून पुण्याकडेच जावें. लांबहाते येथून गेलीयावर काय विचार करणें तो करतील. दुसरें कुपिया वर्तमान आहे कीं, तुकोजीबावांनीं इकडे बाईचे भेटीस येणें, तर पाटीलबावांच्या विद्यमानें यावें. एकले येऊं नये. पाटीलबावाही लवकरीच बाहेर निघणार. किंबहुना निघाले असतील. ते व ते मिळून येथें येणार. येथें घोळ घालावा. बाईचाही एकांतीं कागदींपत्रीं पाटीलबावांकडे सिलसिला आहे. उभयतां येथें आलियावर जाबसालांत उज्जनीचें चक्र कोणीकडे फिरेल कीं पहावें. बाई एकांतीं मशीं बोलतां बोलली कीं, तुकोजीबावांनीं व नारो गणेशांनीं श्रीमंतांशीं नानाप्रकारें बोलणीं लाविलीं असतील. सरकारकिफायतीची लालुच व चाकरी करून दाखवायाचे मजकूर दर्शविले असतील, तर तेही मतलब येथून बिघडूं शकतील. तुकोजीबावा केवळच निष्कर्षावर प्रवर्तले तर आपल्यासही दुसरे मांडीवर घेणें प्राप्त. केवळ त्यांची दिल्ही भाकर खाईन, ह्या गोष्टी होणार नाहींत. इतकें बोलून फिरून बोलली जे, आतांच ह्या मजकूर किमपि श्रीमंतांस लिहायाचा नाहीं. ते काय करितात, श्रीमंतांची मर्जी कशी होती, तें पुरतेपणें पाहून, पुढें जो विचार करणें तो करूं. बाईची मर्जी अशी आहे कीं, श्रीमंतांची ममता कोणीकडे होती हें पाहून, मग काय करणें तें करावें. इतक्या जाबसालास

पुष्टीकरण वारंवार हरकुबाईचें कीं, श्रीमंतांचे पायाशीं अंतर करूं नये. या उभयतां बायांचेच एकांत फार होतात. आह्मांसही कितीक बारीक मोठें वर्तमान एकांतींचें हरकूबाईकडूनच फार कळतें. कांहीं बाईही तात्पर्य बोलतात. प्रस्तुत यांनीं कांहीं *जाबसाल स्वामीजवळ यशवंतराव गंगाधर व त्रिंबक विनायक यांजकडून लाविला* आहे, असें येथें संकलित संकलित बोलण्यांत येतें. सुलतानजी लांबहाते येथें बोलायास आले होते. ते कांहीं बाईशीं एकांतीं बोलून, सडेच, एक पालखी व दोन घोडीं इतक्यानशीं छ २३ मिनहून प्रातःकाळींच तुकोजीबावांकडेस गेले. आंतील बोलण्याचा मजकूर बाई बोलली जे, तुकोजीबावांनीं स्वामिकार्यें आधीं करून, मग आमच्या भेटीस यावें. तत्रापि तुमचा आग्रह आहे कीं, तुकोजीनें येथें येऊन पायावर डोई ठेवून जावें. तुह्मी जसें सडे आलां, तसें त्यांनींही सडे यावें. अधिकोत्तर आल्यास परिच्छिन्न येऊं देणार नाहीं. दारूगोळा सिद्ध आहे. लांबहातेही बोलून गेले जे, त्यास मी घेऊन येतों. आपलें त्याचें बनलें तर फारच उत्तम. न बनलें तर मी त्यास नेऊन, त्याच्या लष्करांत घालीन. बाई बोलली जे आह्मी कोणासही लढून पडत नाहीं. आतांही तुमचा आग्रह ह्मणून या ह्मटलें; नाहीं तर त्यांनीं आपले स्वामिकार्यास जावें, हें उत्तम आहे. असे जाबसाल होऊन लांबहाते गेले आहेत. दुसरें वर्तमानः—तेथून तुकोजीबावांच्या लष्करांतून कारकून यांचे ममतेचाच आला. त्यानें मजलाही एकांतीं वर्तमान सांगितलें जे, तुकोजीबावा व नारोपंत यांनीं तमाम मऱ्हाटे (मराठे) व पागे जमा करून, इमान प्रमाण करावा कीं, लढाईत तुह्मीं इकडील तिकडे होऊं नये. त्यास सारे मराठे व पागे मिळून बोलले जे, ‘अन्यत्रासीं व शिंद्याशीं, एखादे वेळेस श्रीमंतांशीं, तुह्मीं लढाई केल्यास आह्मी तुमचे चाकर आहों. तुह्मांपुढें मरूं. परंतु अहिल्याबाईशीं तुह्मी लढाई करूं ह्मणाल, तर आह्मी तुमचे चाकर नाहीं.’ याप्रमाणें लोकांचा एका जाला. इतकें बोलले. त्यावरून उभयतांही शिथिल जाले. घाटाखालीं उतरले. बाईचे भेटीस यावें असें तुकोजीबावांच्या चित्तांत तर आहेच. नारोपंतांनीं यावें, न यावें असें आहे. येथीलही मानस असेंच आहे कीं, त्यांनीं न यावें. याप्रमाणें दरबारांत बोलतात. जसें वर्तमान ऐकितों तसें सेवेशीं लिहिलें आहे. तो कारकून सांगत होता जे, तुकोजीबावांचें व शिंद्याचें सूत्र तुटलें. सबब कीं, बाईकडील कागदींपत्रीं सिलसिला एकांत दुकांतींचा तिकडे लागला आहे. यास्तव शिंदे अद्याप उज्जनीसच आहेत. हें एकांतींच वाचून फाडून टाकावें. कितीक बारीक वर्तमान आतांच कांहीं लिहूं नका ह्मणाली आहेत. परंतु मी चाकर. देखलें ऐकिलें वर्तमान वरचेवर लिहिलें पाहिजे. यांचेही कोणी तेथें आहेत,

त्यास कळल्यास यास येथें सूचना लिहितील. तेव्हां हें बारीक मोठें एकांतीं बोलणार नाहींत; कितीक वर्तमान कळूं देणार नाहींत. यास्तव विनंती लिहिली असे. सेवकाची खर्चाची फार विपत्ति आहे. वारंवार दर पत्रीं लिहितों. धनी रागें भरतील कीं काय? येथें साडेतीनशें रुपये लोकांचें देणें जालें आहे. नित्य खर्च पाहिजे. देणेदारांचीही तडन. खर्चासही कांहीं कोठें मिळत नाहीं. सेवकाविषयीं तेथें कोण वारंवार स्मरण देतो? चिरंजिवाचीही अन्नाची सोय कांहीं जाली नाहीं. आह्मां गरिबांस स्वामींचे पाय वशिला आहे. वरकड आणीख काय विनंती लिहूं? सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३२. ता. १ दिसेंबर इ. स. १७८०.

पैा छ १३ जिल्हेज समानीन. **श्रीगजानन.** मि. मार्गशीर्ष शु. ५ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ४ जिल्हेजपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशर्जी विनंतीपत्रीं लिहून कासीदजोडी छ [illegible] रवाना केली आहे. प्रस्तुतचें वर्तमानः—श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतसच आहेत. वरकड इंग्रज सारे मुंबईकडे वसईच्या उद्योगास गेले आहेत. इकडे पूर्वेकडून पांच सहा पलटणें, कांहीं तोफा, ऐसे कलकत्त्याहून रवाना जालीं. त्यांपैकीं चार पलटणें, पुढें निघून आलीं, तें थेट ग्वालेरीस आलीं. तेथें गोहजवाल्याचा वेढा होता, तो उठवून निर्वेध ग्वालेर करून, पुढें शिप्री कोंल्हारसास आलीं. तेथून चौ पलटणांत सरदार इंग्रज होते, त्यांणीं पाटीलबावांस पत्रें पाठविलीं होतीं जे, पलटणें सुरतेस जातात; यांस उपद्रव न देतां जाऊं द्यावीं. नाहीं तर रयतीस उपद्रव करूं नये. ते पत्रें पाहून पाटीलबावांनीं आंबाजी इंगळे त्यासमागमें दहा हजार फौज देऊन, चौ पलटणांच्या तोंडावर रवाना केले. मागून दोन पलटणें येत होतीं, ते दतियावाला राजा व आणीकही राजेरजवाडे मिळून तें दोन्ही पलटणें तुडविलीं ह्मणून येथें खबर आहे. त्यावर येथील वर्तमान तर सुलतानजी लांबहाते बाईशीं बोलून तुकोजीबावांकडे गेलें होते. त्यांशीं बोलून छ २५ रोजीं संध्याकाळीं येथें आले. बाईनीं सांगून पाठविलें होतें जे, प्रथम तुह्मी स्वामिकार्यास जातां, ते जाऊन सरकारचाकरी करून येणें; अगर चित्तांत समाधानी असेल तर सडे भेटीस येणें. त्यांस त्यांणीं मध्यस्ताबरोबर सांगून पाठविलें जे बाईचें वचन पुर्तेपणें घ्यावें जे, आपण कोणावर इतराजी करूं नये. असें वचन घेऊन या, मग आह्मी येऊं. त्यास लांबहाते येथें येऊन बाईशीं

बोलले. बाई ह्मणाली जे, 'आह्मांजवळ वचन कशाचें मागतां? आपल्या घरास येयास वचनें कशास पाहिजेत? आह्मीं कोणास वचन दिलें नाहीं. आतांही देत नाहीं. येणें तर यावें. चित्तांत विकल्प असल्यास येऊं नये.' असें साफ सांगितलें. तुकोजीबावांचें बोलणें जे, तुमच्या आमच्या भेटींत व बोलण्यांत पाटीलबावांचा संदर्भ कांहीं असूं नये. बाईचें उत्तर कीं, इतके दिवस तुह्मी पाटीलबावांच्या आंगें उडत होतां. त्यांचे आज्ञेशिवाय कांहीं करूं नये असें तुमचें त्यांचें होतें. आतां पाटीलबावा कां नको? हे गोष्ट कार्याची नाहीं. तुमच्या आमच्या जाबसालास मध्यें अवश्यमेव पाटीलबावा असले पाहिजेत. असा बाईचा आग्रह आहे. हे गोष्ट त्यांस अनिष्ट! प्रस्तुत पाटीलबावांचें व तुकोजीबावांचें सूत्र तुटलें आहे. इतक्याही जाबसालांत तुकोजीबावा नांवाचे धनी मात्र आहेत. परंतु इतकेही जाबसाल नारो गणेश करितात. प्रस्तुत छ २८ जिल्कादीं रात्रीं, बाई व घरमंडळी व लांबहाते मिळून दोन प्रहर रात्रपरीयंत खिलबत जालें, आणि प्रातःकाळींच लांबहाते सडेच तुकोजीबावाकडे छ २९ जिल्कादीं गेले. यांजबरोबर सांगून पाठविलें जे, पूर्वींपासून आह्मी जो आपला कारभार करीत आलों तो करूं. तुह्मी जें चाकरीचें काम करीत आलां तें तुह्मीं आपली साहेबचाकरी करीत जावी. आह्मीं कोणावर कृपा व कोणाचें पारपत्य करणें तें करूं. त्यांत तुह्मीं रदबदली करूं नये. असें कबूल असल्यास भेटीस येणें. नाहींतर तुह्मी स्वामिचाकरीस जातां हें फार उत्तम आहे. जावें. याप्रमाणें लांबहत्याबरोबर सांगून पाठविलें आहे. पाहावें काय जाबसाल होतो. हें इतकें खिलबतीचें वर्तमान हरकुबाईच्या मुखें आह्मांस कळलें. तुकोजीबावाचे बायकोशीं व तुकोजीबावाशीं व नारो गणेशाशीं विरुद्ध फार आहे. रखमाबाई आपलें मूल घेऊन अहिल्याबाईकडे येण्याचे तजविजींत फार आहे. परंतु ते उभयतां येऊं देत नाहींत. चार पागा त्या बाईच्या तैनात केल्या आहेत. याप्रमाणें तेथील वर्तमान. तुकोजीबावाजवळ फौज चार पांच हजार आहे व तेरा तोफा व अडीच तीन हजार बाण इतका सरंजाम आहे. पेंढारेही सात आठ हजार काल आले. लूट जंगलांत फार होत आहे. सरकारचें कसरावद व कानापूर वगैरेचा शिवार चारितात. हरकुबाई बोलत होती जे, आमचे गांव वैजापूर परगण्याचे श्रीमंतांनीं मोंगलाचे भरतीस घातले ह्मणून ऐकतों. बरें, कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांनीं आमच्या ह्मातारपणास दिले होते, ते यांणीं आह्मांवर नाहकचा दूरारोप ठेऊन आमचे गांव घेतले. येवढ्यानें काय श्रीमंतांचें अधिक जालें? मीं उत्तर केलें जे, श्रीमंत देणार नाहींत. हरकुबाईनीं अहिल्याबाईच्या कानावर घातलें. बाई बोलली जे, त्या

धन्यांनीं गांव कृपा करून दिले होते, या धन्यांनीं घेतले. आपण क्षित कशास करावी ? आणि त्यांणीं गांव घेतले हें कोणाजवळ सांगायाचें आहे? त्यांच्या थोरपणास जें येईल तें करोत. थोरास कान असतात. ज्याणें जें वर्तमान सांगितलें, तें त्यास खरेंच वाटतें. असो. दिवसांचा फेर असाच आहे. याप्रमाणें बाई बोलली. दुसरें तुकोजीबावा व नारो गणेश देशीं जातात, आणि श्रीमंतांसही भरंवसा आहे कीं, तुकोजीबावा आपले ममतेंत असले ह्मणजे एखादें महत्कार्य करतील. परंतु यांणीं पहिले दोन चार मसलती आपल्या आंगीं लावून घेऊन केल्या. त्या तुकोजीबावांनीं सिद्धीसच पाविल्या! कोणकोणत्याः-प्रथम तों धोडपेचे सालीं दादासाहेबांकडे डौल दिला ते दादासाहेबांचें तसें जालें, ते मसलत फसली. दुसरें, हिंदुस्थानांत गेल्यावर जाबेतेखानाचा पक्ष केला, शेवटीं त्यास तळावरच बसविलें. देशीं राजश्री मोरोबादादाचा पक्ष केला, तो पाहेल्यांतच येत आहे; व रघुपतराव नारायणाचा पक्ष केला, ते किल्लेनशीन केले; व गोविंदराव गाईकवाडाचा पक्ष केला ते भीक मागत फिरतच आहेत. आणीकही दोघां चौघांचीं नांवें घेतलीं, परंतु स्मरण नाहीं. प्रस्तुत ऐकिल्यांत येतें कीं, श्रीमंतांनीं विसाजी आपाजी सरदार यांच्या विद्यमानें श्रीमंतांकडे सूत्र लावून श्रीमंतांनींही विश्वास मानून पत्रें पाठविलीं आहेत. देशीं हे जातात परंतु श्रीकृपेंकरून यश घेवोत. विसाजी आपाजींनीं खानदेशांत येऊन गुलजारखानाचें पारपत्य यथास्थित पाराजीपंतांनीं व त्यांनीं केलें. पुढें गुजराथच्या मसलतीसही हरोळीस उभयतांच होते. ते यश घेऊन आतां हे मसलतीस प्रारंभ केला आहे. इकडून फौजेचे आघाडीस पाराजीपंतच आहेत. तिकडून श्रीमंतही विसाजीपंतांसच पुढें पाठवितील. याप्रमाणें दरबारांत बोलतात. बाईनीं हें ऐकून बोलली जे, आमचे बारा कारभारी मिळून, ये दौलतीस अपाय करितात, ते गोष्टीस आपला उपाय काय ? आमचे वडिलांपासून आजपरीयंत श्रीमंतांच्या पायाशीं अवज्ञा घडली नाहीं. श्रीसर्वोत्तम पुढेंही आह्मांजवळून अन्यथा विचार त्यांच्या पायाशीं घडवणार नाहीं. याप्रमाणें बाई बोलली. आणिकही वर्तमान ऐकिल्यांत आलें आहे जे, प्रस्तुत बाईचा व पाटीलबावांचा कागदींपत्रीं सिलसिला फार लागला आहे. तेव्हां मसलत एखादी सिद्ध होईलसी दिसती. बाईकडूनही कागदपत्र सरकारांत येतच आहेत. तो दाखला कांहीं मजकडे नाहीं. प्रस्तुत सरकारचीं पत्रेंही इकडे येत नाहींत. कागदींपत्रीं सिलसिला जाबसालाचा असतो. त्याणें बारीक मोठें वर्तमान तेही बोलतात. आपल्यासही वर्तमान कळतें. सिप्री कोल्हारसवाल्यांनीं कांहीं जमीयत मिळवून इंग्रजांचें पारपत्य केलें, ह्मणून वर्तमान येथें ऐकिण्यांत आलें. परंतु अद्याप तथ्य नाहीं. विशेष बाईचे व तुकोजी होळकर यांचे भेटीचें

बनलें नाहीं. काल छ ३ मिनहूस तुकोजी होळकर रेवातीरींहून कूच करून पुढें चार कोस बलकवाड्यास गेले. रोंख सेंदव्याचा. सुलतानजी लांबहाते व कृष्णाजी तानदेव हे उभयतां येथें आहेतच. त्यांनीं कूच करून पुढें गेले. बाईचें अंतस्थ बोलणें ऐकिल्यांत आलें जे, यांचें कूच जालें हें ऐकून बोलली जे काय चिंता आहे. हे दौलत पेशव्यांची आहे. त्यांणीं कृपा करून चाकरी घेतली तर चाकरी करून दाखवीन; नाहींतर हे इतकीही दौलत त्यांच्या घरांत घालीन. मग यांस नवे महाल देऊन श्रीमंतांनीं यांची उभारणी करून चाकर ठेवले तर ठेवोत. परंतु या सरंजामांतून एक कवडी देणार नाहीं. याप्रमाणें ऐकिलें. राजश्री विसाजी शामराज उज्जनीहून येथेंच आले आहेत. त्यांशीं मावशीबाईच्या विद्यमानें निराळेंच खलबत होत असतें. तुकोजीबावा व नारोपंत उभयतांची, व मणिराम मावशीबाईची पुंजी बळकावून बसले आहेत, ते तिसरे. हे तिघे मात्र एकदिल. वरकड कोणी त्यांचे नांवें सुखी नाहीं. मावशीबाई बोलत होती जे, हें बरें जालें नाहीं. आतां एखादा वनवासी कोण उभा राहील? काल संध्याकाळ (फाटलें आहे) वर्तमान पुढें जें होईल तें सेवेसी लिहीन. अलीकडे सरकारचीं आज्ञापत्रें येत नाहींत. हे नित्य पुसतात. सेवकास खर्चास कांहीं नाहीं. दर पत्रीं विनंति लिहितों. श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

**लेखांक ३३.** ता १७ दिसेंबर इ. स. १७८०.
**श्रीगजानन.** मि. मार्गशीर्ष शु. ११ शके १७०२.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० जिल्हेजपरीयंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून छ ४ मिनहूस डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः—राजश्री तुकोजी होळकर व नारो गणेश हे उभयतां बलकवाड्याहून शुद्ध ६ स्थिरवारीं कुच करून सेंदव्याच्या रोंखें गेले. ते दिवशींच येथून सुलतानजी लांबहात्यास बाईनीं वस्त्रें देऊन बिदा केलें. शिष्टाईस येथें आले होते. ते तुकोजी होळकर यांजकडे गेले. तुकोजीबावांनीं ये प्रांतीं जितके महालचे कमाविसदार बाईचे उठवून आपले कमाविसदार बसविले होते, तितक्या महालांवर बाईनीं आपले कमाविसदार पाठवायास सिद्ध केले. एक दोघांस चंपाषष्ठीचे मुहूर्तें वस्त्रें दिलीं. तमाम महालोमहालीं बाई आपले कमाविसदार पाठवणार व कांहीं फौजही ठेवणार. राजश्री विसाजी शामराज पथकसुद्धां येथेंच आहेत. त्यांचे विद्यमानें राजश्री पाटीलबावांचीं

पत्रें बाईस व मावशीबाईस येत असतात. राजश्री माधवराव गंगाधर उज्जनीस पाटीलबावांजवळ होते, त्यांसही बाईनीं बोलाविलें आहे. पाटीलबावांनींही त्यांस वस्त्रें देऊन बिदा केलें. उज्जनीहून निघाले एका दों दिवसां येथें येणार. येथें बाई कोणतीही मसलत करणार, त्या मसलतीस संमत पाटीलबावांचें. विसाजी शामराज पाटीलबावांच्या इतल्यानें प्रस्तुत नेहमीं येथें आहेत. सांप्रत सल्लामसलतीस पोख्त तेच आहेत. इंग्रजांचा मजकूरः-तर सिप्री कुलारसेस होते, तेथें शिकस्त पाऊन दोन मजला माघारें जाऊन, गुजराथचा रोंख धरून आहेत. पाटीलबावांनीं मावशीबाईस लिहिलें होतें जे, 'प्रस्तुतच माझें येणें तिकडे होत नाहीं. इकडे इंग्रजांचा तळ बसला आहे. मी तिकडे आलीयावर तमाम माळवा इंग्रजांच्या दहशतीनें ओस होईल व महालकरी कमाविसदारांसही धीर वाटणार नाहीं. तमाम उठतील, आणि इंग्रेज इकडे चाल करतील. यास्तव इंग्रेजांचा बंदोबस्त करून कांहीं दिवसां लवकरीच येईल. तोंवर विसाजी शामराज तेथें आहेत. तुम्हींही बाईस सांगायाअन्वयेंच बाईसही पत्र लिहिलें आहे. बाईचे पत्रीं लिहिलें होतें जे, तुकोजीबावा व नारो गणेश उभयतां आपली भेट न घेतां, कूच करून गेले. त्यांनीं इतकी अमर्यादा करून जायाचें नवतें. बरें. त्यांच्या विचारास जे मसलत आली ते त्यांनीं केली! फौजेशिवाय तों कोणतेंही काम होणार नाहीं. त्यास फौज ठेवणें प्राप्तच आहे. पुढें तुम्हीं आम्हीही फौज ठेऊनच साहेबचाकरीस जाणें लागेल. तुम्ही जे फौज ठेवाल, ते तुम्ही आपल्या सरंजामावर ठेऊन घेऊन जाल. परंतु तुकोजीबावा फौज ठेवतील त्या फौजेच्या देण्याचें संकट श्रीमंतांस पडेल. कां कीं, तिकडील पत्रें कोणाचीं आलीं आहेत, आणि हे हांवभरी होऊन गेले आहेत! तेव्हां फौजेच्या त्यांच्या देण्याचें संकट श्रीमंतांच्या गळां पडेल. असो. त्यांनीं काय समजून त्यांस बोलविलें आहे? या उभयतांनीं तुमची भेट न घेतां काय समजून गेले आहेत हें नकळे. ही मसलत श्रीमंत नानासाहेबांची नाहीं. विसाजी आपाजीचे बोलें राजश्री तात्यांनीं बुद्धीस श्रीमंतांच्या विपर्यास घालून हे मसलत उभी केली आहे, हें पुढें वाईट दिसतें. बरें. तुम्ही आपले जागां सावध असा. इकडील इंग्रजांचा बंदोबस्त करून मीही आपले भेटीस लवकरीच येतों. याप्रमाणें पाटीलबावांनीं विसाजीपंताचे विद्यमानें बाईस पत्र लिहिलें होतें, तें विसाजीपंतांनीं हरकुबाईस वाचून दाखविलें. त्या द्वारें एकांतीं वर्तमान कळलें. मावशीबाईही बोलली जे, श्रीमंतांनीं घरांत फूट अशी करूं नये. ज्या पक्षीं अहिल्याबाई, आम्ही, त्यांच्या पायाशीं निष्ठेनें एकविधा भक्तीनें बसलों आहों, त्यापक्षीं श्रीमंतांस हें विहित नाहीं. तुकोजीबावाचा व नारोपंताचा

काय मजकूर आहे? तुकोजीबावांसही बाईनींच केलें आहे, आणि त्यांची अमर्याद वर्तणूक पाहून त्यांचे ठायीं प्रसन्नता नाहीं. ज्यास हातीं धरतील तो सवाई तुकोजी करून दाखवितील. त्यांनींही इतकी अमर्यादा करावयाची नव्हती, आणि श्रीमंतांनींही भलत्याचेच मसलतीवर अशी घरांत फूट पाडूं नये. फक्त नारोपंत आपल्या बचावासाठीं दोहींकडीलही खराबी करीत आहे. परंतु श्रीमंतांनीं पेशआंदेशी करून समजावें, यांत चांगलें नाहीं. नारोपंत व आमचा मणिराम या उभयतांजवळही रुपये फार जाले आहेत. मणिरामासही मीं तीन बोलावणीं पाठविलीं. भेटीस न येतां परभारा गेला आहे. काय चिंता आहे? पूर्वी आह्मीं तुह्मांकडून श्रीमंतांस लिहिविलें होतें कीं, मणिरामाचे बजिन्नस मुद्दे सुमेरसिंगाबाबत आह्मीं धरले आहेत. हा एक सरकारचा लढा व माझे दहा लक्ष घेऊन बळकावून बसला आहे. त्याची चौथाई वाजवी सरकारांत घेऊन त्याजपासून आमचा ऐवज आह्मांस देवा. तें न घडलें. श्रीमंतांस त्यांची भीड पडली, आणि मीं कांहीं न करितां, विसाजीपंतांनीं आपली बलाय मजवर टाकिली. ते श्रीमंतांनीं विचार न करितां माझे रांडरोव्याचे गांव बरे लवकर बंद केले! तेही कैलासवासी धन्यांनींच आमच्या ह्मातारपणास दिले होते. येकूण श्रीमंतांस जें भिऊन वागेल त्याचा संभाळ धन्यांनीं असा करीत असावा! जो घटाई करील त्याचें श्रीमंतांकडून कांहींच होऊं नये. असो. आह्मांस कोण आहे? कोणतेंही जड भारी आह्मीं धन्यास सांगावें. आमचे त्राते ते. युगधर्मेंकडून ते क्रोधच करूं लागले, तर आमचा उपाय काय? परंतु आतां जें श्रीमंत एकास जवळ, एकास दूर धरितात, हें बरें नव्हे. पुढें हें वाईट दिसतें.' याप्रमाणें हरकुबाईचें बोलणें. इतक्यांत विसाजी शामराजही तेथें मावशीबाईचे येथेंच आले. त्यांची माझी भेटही तेथेंच जाली. विसाजीपंत (फाटलें) याअन्वयें बोलले जे, 'अहिल्याबाईचा (फाटलें) करून तुकोजीबावास व नारोपंतास बोलाविलें (फाटलें). श्रीमंत नानासाहेबांचीच मसलत नाहीं आणि राजश्री तात्याही असें करणार नाहींत. परंतु आणीक कोणाचे सांगितल्यावर त्यांणीं यांस बोलावलें ह्मणावें, तर आह्मांस ठाऊक आहे कीं, नानासाहेबाची कायम मिजाज जितकी आहे तितकी आणीक कोणाची माझ्या पाहिल्यांत नाहीं आली. आधीं एखाद्या कोणत्याही कामास मातबर असो, लहान असो, त्या गोष्टीस नानासाहेबांनीं करून देतों मुखावाटे ह्मणणें हेंच दुरापास्त. अभय दिल्यानें मग कोणीं कसे विक्षेप मधें घातले, तर ते ध्यानास न आणितां त्याचें कार्य करून द्यावेंच, इतका खमीर श्रीमंतांचा बळकट आहे. हें मजला पुरतें ठाऊक आहे. अहिल्याबाईविशीं श्रीमंतांची ममता फार माझ्या पाहिल्यांत आली. राजश्री मोरोबादादाच्या वगैरे मनवंतरांत तुकोजीबावांचें स्वरूपज्ञान सर्व त्यांच्या ध्यानांत येऊन चुकलें आहे. असें

असतां बाईशीं विरुद्ध करून, तुकोजीबावांस ते बोलावितील असें माझ्या मनांत येत नाहीं. या उभयतांच्या ऐवजाची खोली रुंदी सर्व श्रीमंतांच्या व तात्यांच्या ध्यानांत आहे. परंतु आतांची ससलत या उभयतांस बोलावण्याची जे केली आहे, याची पेशआंदेशी पाहतां पुढें वाईट फारच दिसतें. बाई व पाटीलबावा एकत्र जाल्यावर हे उभयतां पंचवीस हजार फौजेनशीं चाकरीस जाऊन उभे राहतील. बाई आपले मुलखाचा बंदोबस्त करील, तेव्हां तुकोजीबावांस इकडील कवडी देणार नाहींत. तें तुकोजीबावांस फौजेचा देण्याचें संकट पडेल. तेव्हां तुकोजीबावा श्रीमंतांच्या गळां पडतील. तेथें बोलतील कीं, आह्मीं तुमच्या पत्रावरून बाईशीं विरोध केला. तेव्हां तें संकट श्रीमंतांस पडेल. ते तरी काय करतील? तेथें आहे नाहीं हें सर्व विदितच आहे. तेव्हां हे कजिये सांभाळतील, शत्रूचा पराभव करितील, हे दोन्ही संकटें पुढें दिसत आहेत. दुसरें, सरदार बेदील जाल्यास पुढें कामेंकाजें घडून येणें ह्या गोष्टी दुरापास्त. यास्तव शिंदे व होळकर या उभयतांची फूट कदापि करूं नये. पहिलेही धनी होते, त्यांणींही ह्या गोष्टी समजूनच जोडफळाचा सांधा सांधून टाकला आहे. उभयतांत कोणाचा आब कोणाकडून चालतो. प्रस्तुत श्रीमंतांचे दौलतींत कस राहिला नाहीं. कोठवर ठिगळें देतील? महा संकट आहे. यास्तव श्रीमंतांनीं तुकोजीबावांस टांकोटांक पत्र पाठवावें कीं, तुह्मी मातुश्रीची भेट घेऊन त्यांची कृपा संपादून इकडे चाकरीस येणें. त्यांची भेट न घेतां इकडे येणें उचित नाहीं. असें पत्र त्यांस तुकोजीबावांस लिहून माघारें बाईचे भेटीस पाठवावें. बाई व तुकोजीबावा ममतापुरस्कर भेटून, एक विचारें बंदोबस्त आपले घरचा करून, बाईच सरबराई करून त्यांस चाकरीस पाठवतील यांत अति उत्तम आहे. श्रीमंतांची वारंवार तुकोजीबावांस शिक्षा अशी असावी कीं, बाईचे आज्ञेंत राहत जाणें. ह्यातान्यांचीं ह्यातारपणें, वडीलांचीं वडीलपणें राखण्याविशीं व कोठें फूट पडूं नये येविशींच्या शिक्षा पूर्वापर श्रीमंतांचे घरच्याच होत. असें असतां प्रस्तुत तुकोजीबावा बाईची अमर्यादा करून श्रीमंतांकडेस गेले, हें आश्चर्य वाटतें. परंतु बाईची भेट न घेतां तुकोजीबावा येतात, असें ऐकिल्यावर श्रीमंत येऊं देणार नाहींतसें वाटतें. तत्रापि, श्रीमंतांच्या चित्तांत येईल कीं, उभयतां सरदारांचा काय मजकूर आहे? आमचे भोंसले आहेत; नबाब आमचा आहे; गाइकवाड सरकारचे सरदार आहेत; या उभयतांच्यांनीं काय होयाचें आहे? तर ते दौलतीस कलविकल, तर नबाब मूळ (फाटलें) इच्छा करतील. भोंसले राज्याचा दावा सांगतील. गाइकवाड गुजराथच सांभाळून राहतील. असो. हे उभयतां सरदार, ते दौलतीचें बरेंच इच्छितील. कितीक कळवळा पहिले सुभेदार व राणोजी शिंदे यांणींच परिहार केल्या आहेत,

आणि आतांही ममतापुरस्कर जितके हे उभयतां सरदार अर्थप्राण वेंचतील, तितकें अन्यत्रांच्यांनीं होणार नाहीं. यास्तव उभयतां सरदारांत श्रीमतांनीं फूट होऊं देऊं नये. घरांत फुटी व अमर्यादा होऊं देऊं नयेत. हे दौलत विश्वकुटुंबी होय. श्रीमंत जे करितात हें विश्वाच्या बऱ्यासाठीं करितात. यास्तव प्रस्तुत श्रीमंतांनीं तुकोजीबावांस निषेध करून पत्रें पाठवावीं आणि बाईचे भेटीस पाठवावें, यांत फार उत्तम आहे. आह्मी सर्वही श्रीमंतांच्या कल्याणाचे शुभचिंतक आहों.' याप्रमाणें विसाजी शामराज बोलले. श्रीमंतांस लवकर लिहून उत्तरें आणवा आणि तुकोजीबावांस श्रीमंतांनीं तशीं पत्रें ल्याहावीं, आणि येथें बाईसही समाधानयुक्त पत्रें यावीं कीं, तुकोजीबावांपासून अंतर पडलें असेल तें ध्यानास न आणितां त्यास लवकर फौजसुद्धां इकडे चाकरीस पाठवून द्यावें. याप्रमाणें सरकारचीं दोहींकडे पत्रें यावीं. तुकोजीबावांबरोबर सरंजामी लोक व पागा व जुने लोक जितके आहेत, तितक्यांचे कारकून व पत्रें बाईकडे येतात. त्यास बाई त्यांशीं बोलतात कीं, ते चाकरीचा बाहणा करून गेले आहेत; त्यापक्षीं आह्मांस तुह्मांस आतांच बोलावतां नये. श्रीमंतांकडील अर्थ पुर्तेपणें आह्मांस समजल्यावर काय तुह्मांस आज्ञा कर्तव्य ते करूं. याप्रमाणें बाई लोकांशीं बोलली. तुकोजीबावा सरकारचे चाकरीस न येतां, आणीक कोणीकडे जातील असा भास कदाचित् आपल्या चित्तांत आला, तर लोक कोणी त्याजबरोबर जाणार नाहींत, असें येथें पक्केपणें जालें आहे. लोक सर्व बाईचे आज्ञेंत आहेत. प्रस्तुत त्यांचा मुक्काम सेंदव्यावर आहे. सडे किल्यांत राहावयास गेले होते. तेथूनही कूच जालें असेल. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. धनी कृपाळू समर्थ. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. मागाहून कासीदजोडी लवकरीच येईल हे विज्ञप्ति."

---

पैा छ ६ मोहरम इहिदे समानीन. **लेखांक ३४.** ता० २७ दिसेंबर १७८०.
दाखल ता० २ जानेवारी १७८१. **श्रीगजानन.** मि० पौष शुा २ शके १७०२.

"सेवेशी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ३० जिल्हेजपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं छ १९ जिल्हेजचें आज्ञापत्र सेवकास पाठविलें, तें डाकेबरोबर छ २७ जिल्हेजीं येथें पावलें. तें पत्र वाचून पाहून संध्याकाळीं दरबारास जाऊन मातुश्री अहिल्याबाईस वाचून दाखविलें. पत्र मनन करून बाई बोलली जे, 'श्रीमंतांनीं तुह्मांस लिहिलें आहे. असो. राजश्री तुकोजीबावा व नारो गणेश या उभयतांनीं राजश्री बळवंतराव वांकडे यांजकडे महाल

सांगितले; बंदोबस्त करून उभयतां खानदेशांत गेले. येथें आह्मांजवळही तेच दौलतीचा लबाजमा, हत्ती व पागा, व शागीर्दपेशा इत्यादि येथें आहे. त्याचे खर्चास काय ठेऊन गेले, हें बळवंतरायांसच श्रीमंतांनीं विचारावें. सरकारपरीयंत बोभाट तो आमचे नांवाचा कीं, सारे मामलतीचा पैका बाई खर्च करितात. हेच गाऱ्हाणीं राजश्री पाटीलबावाजवळही असेंच सांगितलें. पाटीलबावा आह्मांविशीं श्रमी. त्यास पाटीलबावांस आह्मीं लिहून राजश्री बाळारायांस येथें आणविलें. त्यांसही सविस्तर वर्तमान आदिकरून हिशेब समजाविले. त्यांनीं पाटीलबावांस सविस्तर निवेदन केलें. त्यांणीं यांस विचारूं लागल्यास त्यांशीं विटवून निघून खानदेशांत गेले. सर्वा ठिकाणींही रीती आहेत. कोणीही आपले घरसंसार पाहत विचारीत आहेत. येवढी दौलत श्रीमंतांची, परंतु तेही नित्य संध्याकाळीं हिशेब पाहत असेत. असो. यांसही विचारलें जे, दौलतीचा मुलकी वगैरे पैसा आला तो जाऊन, खर्चवेंच कसा जाला हें मजला पुसा. तुह्मी सांगा, दौलत आहे तेथें कर्जवाम लागलेंच आहे. ते अर्थ कोणतेही मनास न आणितां, मुलकी बंदोबस्त केले. कोणत्या कमाविसदाराकडे काय तकरीर निघाली ? कोणता दूरारोप ठेऊन यांणीं दूर करून नवे ठेवले ? सुभेदारांचे हातचे पन्नासासाठीं वर्षांचे कमाविसदार, ज्यांनीं महालांच्या उस्तवाऱ्या केल्या, जमेस अधिक चढविले, ते का ( फाटलें ) काय ? आतां बळवंतरायांनीं आपणास ( फाटले ) असेल अगर त्यांणीं श्रीमंतांस लिहिलें असेल. त्यास श्रीमंत धनी. लिहिल्यावरून बरीं लवकर लवकर पत्रें श्रीमंतांनीं पाठविलीं ! आह्मी इतके दिवस पत्रें लिहीत आहों. यांणीं मनास येईल तशा लबाड्या केल्या. तमाम महालचे बंदोबस्त केले. जागांजागां आपले हुकूमहकम करून गेले. जालें वर्तमान आह्मी तुह्मांस सांगत गेलों. आह्मीही लिहीत गेलों. परंतु धनी पहातच गेले.' मीं उत्तर केलें जे, 'श्रीमंत हमेश लिहीत गेले. आपल्याकडूनच हरएक गोष्टीची सोड मोकळ जाली असेल. श्रीमंतांकडे काय शब्द आहे !' बाई बोलली जे, 'श्रीमंतांकडे पुसायाचे अधिकार आहेत. असो. प्रस्तुत श्रीमंतांनीं लिहिलें आहे. आह्मांस आज्ञा मान्यच आहे. परंतु यास चाकरीस जाऊं द्या; सारेंच होईल. आह्मीही तों हेंच नित्य तुह्मांदेखत ह्मणतों कीं, श्रीमंतांवर गाढ मसलत पडली आहे. या समयास उभयतां सरदारांनींही चाकरीस जावें. ते चाकरी एकीकडेच राहून घरचींच हुंडीभांडीं पाहतात, तेही सुखी पाहोंत. परंतु मजला पुसावें, मी पुसेन तें सांगावें, तें कांहीं नाहीं. परभारांच मनास येईल ते कारभार करूं लागले ! तेव्हां ये दौलतींत आमचें कांहीं नाहीं ? हेच वारीसदार ! अस्तु. तत्रापि श्रीमंत धनी शिरावर आहेत. त्यांचे मुखें जालें ह्मणजे आह्मीही हुंडी भरपाई (करून) आह्मांसही

चार गोष्टी पुसणें असतील त्या धन्यास पुसून, जें कर्तव्य तें करूं. आपलें घरदार पाहत असतां, चाकर व दिवाण मुत्सद्यांशीं पूसतपास करीत असतां, कोणी सांगणारांनीं युक्त धन्यास सांगून पत्र लिहिवावें. धनी आपले घरीं लहानंमोठे हुद्देदारांस पूसतपास चौकशी करीतच आहेत. चाकरीचा विषय ह्मटला तर हे गुजराथेस होते, ते समयीं त्यांस खर्चास पोंहचलें कीं नाहीं? इतके दिवस पोंहचत गेलें कीं नाहीं? आतांच धन्यापावतर बोभाट कां? असो. अझूनही हे श्रीमंतांचे मसलतींत चाकरीस गेलीयावर इकडून जें घडणें तें घडेल. केवळ धनी पै दरपै चाकरीस बोलावीत असतां न जावें, आणि घरांतच रामायण कथीत बसावें, हें कोणास पुरवणार नाहीं. कामगारांनीं चाकरीच करावी. चाकरीचे ( फाटलें + + + ) धंदा काढून बसावें हे काय गोष्ट आहे? आह्मी त्यास नित्य हेंच ह्मणतों कीं, तुह्मी चाकरीस रुजू असा. धन्यावर मसलत पडली आहे. हा समय घरीं बसायाचा नव्हे. त्यांणीं हे कजिये उपस्थित केले आहेत. त्यास सेवक लोकांनीं वल्गना मनास येईल तशा कराव्या, आणि सर्वांनीं तमाशे पाहत असावें. आपले कजिये लोकांचे येथें गेल्यास मग काय महत्त्व राहिलें? असो. इतकेंही कारस्थान बळवंतराव वांकडे यांणीं श्रीमंतांस बिंबविलें आहे. त्यावरून श्रीमंतांनीं लिहिलें आहे. आह्मांस ही आज्ञा शिरसा वंद्य आहे. त्यांणीं चाकरीस जावें हाच आमचाही मनोदय आहे. बळवंतरावजीस निकड लागली आहे कीं महालास दुसरे कमाविसदार जालीयावर आपले हातचा ऐवज जाईल. पेशजीं फौजेस व त्यांस खर्चास ऐवज आह्मीं कर्जें काढून दिला, त्या साहुकारांस त्या महालावर वराता दिल्या, ह्या दूर करून अन्यत्रांस कसे त्यांणीं महाल लावून दिले? दुसऱ्यानें कोणी साहुकार पातेजेल कीं काय? आतांच श्रीमंतांनीं लिहिलें आहे कीं, तुकोजीबावांस चाकरीस बोलाविलें आहे, त्यास खर्चास पोंहचावीत जा. कोठून खर्चास पाठवावें हें धन्यांनींच त्यांस विचारावें. सारें पहाणें विचारणें धन्याकडे आहे. ज्याचीं गृहकृत्यें त्यासच पुसलें पाहिजे. दुसऱ्यास काय कळे? उगाच पाल्हाळ कशास सांगावा? तुकोजीबावांस आधीं चाकरीस जाऊं द्या. पूर्ववत्प्रमाणें येथून जें घडणें तें घडेल. महाल जाणें, आह्मी जाणूं.' याप्रमाणें भाषणें जालीं. तुकोजीबावा तिकडे चाकरीस येण्याचा संशय दिसतो. उभयतां सरदारही देशीं येण्याचा रंग दिसत नाहीं. बाईनीं पाटीलबावांस येथें येण्याविशीं किती पत्रें पाठविलीं. शेवटीं, विसाजी शामराज व बाजी विठ्ठल पाठविले. ते पाटीलबावांस घेऊन येतात. उद्यां परवां येथें येणार. सडे दो ती हजार फौजेनशीं येतात. दोन चार दिवस येथें राहून फिरून माघारी जाणार. बाईचें मानस कीं, कोण्याही

प्रकारें पाटीलबावांस हुजूर चाकरीस पाठवावें. कोणत्याही प्रकारें ये समयीं उभयतां सरदार हुजूर चाकरीस येऊन पोंहचत हें बाईचें मानस. आतां पाटील-बावा येथें आलीयावर काय होईल तें मागाहून लिहून पाठवीन. प्रस्तुतचें वर्तमानः- मल्हारगड ह्मणून महाल आहे. येथें चाळीस हजार रुपये रसद घेऊन पाटीलबा-वांच्या कर्जीत साहुकारास दिलें. ते मामलत राजश्री गोविंद कृष्ण यांजकडे सांगितली होती. तेथें तुकोजीबावांनीं तीन चार पागा पाठवून मामलेदारांशीं लढाई केली. त्यांचीं साठ माणसें जखमी केलीं. फडणीस मुजमदाराचीं घरें लुटलीं. मल्हारगडांत आपले मामलेदार तुकोजीबावांनीं बसविले. हें वर्तमान आज आलें. आतां त्यांचे चाळीस हजार रुपये कोठून द्यावे? हे एक श्रीमंतांकडे चाकरीस जाणार ह्मणून तुह्मी सांगतां, आणि श्रीमंतही लिहितात कीं, ते चाकरीस येतात. असो. हें असें होत आहे, तुह्मी पाहा. साम्र नानाप्रकारें श्रीमंतांस सांगतां तेंच खरें वाटतें. याप्रमाणें ऐकिलें व पाहिलें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. केवळ त्यांच्या लिहिल्यावर अगर कोणाच्या सांगितल्यावर विश्वास मानावा असें असूं नये. येथें बाईचें लक्ष हेंच कीं, एक एक दिवस चाकरीचा जातो. उभयतांनींही या सम-यास श्रीमंतांजवळ चाकरीस असावें. त्यांजवर श्रम न पडावे. ते श्रम आपण करून त्यांस तोष करावा. पाटीलबावांस यास्तवच बोलाविलें आहे कीं, त्यांस रीत परोगतीच्या गोष्टी सांगून, उभयतांसही देशीं पाठवावें. त्यास ते सडे येतात, आणि मागें पायबंद पलटणें ग्वालेरप्रांतीं आलीं आहेत, त्यांजवर गेलें पाहिजे, ह्या खबरा सांगत येतात. सारांश, या उभयतां सरदारांच्याही चित्तांत देशीं येण्याचा संशय आहे. हे येत नाहींत. स्वामींच्याही प्रत्ययास येईल. श्रीमंतांस सांगणार समर्थ आहेत. येथें बाईचें मानस रात्रंदिवस गादीचें कल्याण असावें, त्यांचें थोर केल्यानें आह्मी थोर, असें अंतःकरणपूर्वक बोलतात. हें खरें आहे. उगाच कालबोल्या गोष्टी तेथें सांगाव्या, येऊन जाऊन खर्चाची रड सांगून चाकरीस न यावें, देशाकडे तोंड करूं नये हें अस्सलपणें मानस त्यांचें असे. खचित ऐकिल्यांत येतें. आतां पाटीलबावा येथें येतात; तेही कोण्या प्रकारें तिकडील संकटें सांगून निघून पुन्हां उज्जनीस जातील, असें येथें बाईनींही आपले जागां निश्चय केलाच आहे. पुढें पाहावें कसें होईल. रामचंद्र गणेशाचें विपरीत वर्तमान ऐकून बाई फार श्रमी जाली. बाईही बोलली जे, 'तिकडील यश श्रीमंतच घेतील. हें उभयतांही रत्नाकर सांगत बसतील. अखेर यांच्यांनीं इकडीलही कांहीं होणार नाहीं.' याप्रमाणें बाई बोलली. फार श्रमी उभयतांवरही आहेत. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्ति आहे. वारंवार कोठवर लिहूं? धनी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति.''

पौा छ १४ मोहरम | **लेखांक ३५.** | ता० १ जानेवारी १७८१.
इहिदे समानीन. बरोबर डांक | **श्रीगजानन.** | मि० पौष शु॥ ६ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ५ मोहरमपरीयंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमानें पेशजीं विनंतीपत्रीं लिहून डाके-बरोबर सेवेसी पाठविलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान राजश्री महादजी शिंदे छ १ मिनहूस येथें आले. येथून दों कोसांवर आलीयावर येथून बाईनीं यशवंतराव फणसे व माधवराव गंगाधर व बाईचे भाऊ, मुत्सद्दी मंडळी दों तीनशा लोकांनशीं पुढें पाठविले. दों कोसांवर यांच्या त्यांच्या भेटी जाल्या. तेथून बरोबरच सारे, प्रहर सात घटका दिवस राहतां, वृषभलग्नावर भेटी व्हाव्य असा निश्चय होतांच वाड्यांत आले. येथें बिछायत वगैरे आरास केलीच होती. बाई आपले स्थलींच बसली होती. पन्नासा लोकांनशीं पाटीलबावा वाड्यांत आले. बाकी लोकांस गोटांत वाटे लावले. वाड्यांत येऊन बाई व मावशीबाई उभयतां बसल्या होत्या. पाटील-बावांनीं बाईच्या पायावर डोई ठेवली. मावशीबाईसही मुजरा केला. एक दीड घटका बसलें. क्षेमसमाचार उभयपक्षीं विचारले. तदोत्तर विडे अत्तर देऊन निरोप दिला. भोजनाचा सरंजाम पाकनिष्पत वाड्यांतच केली होती. बाईनीं पाटीलबावांस सांगितलें जे, लवकरीच बोलावूं पाठवीन; सारे मंडळीसुद्धां भोजनास यावें. असें सांगून निरोप दिला. तदोत्तर पाटीलबावा गोटास गेले. महेश्वरचे पश्चिमेस आंबराई-पलीकडे राहायास स्थळ रेवातीरीं केलें. तेथें बाईनीं दोन डेर व बिचोबा व राहुट्या शमीने फरासखान्याचा सरंजाम पाठविलाच होता. तेथें जाऊन राहिले. येथून घास लकडी व दाणा व ब्राह्मणमंडळीस दाणावैरण, शिधे मेजवानी सरंजाम, कारकून मंड-ळीस फराळांची आदिकरून सर्व पाठविलें. संध्याकाळीं भोजनास बोलाऊं पाठविलें. चार पांचशा लोकांनशीं भोजनास आले. स्वयंपाकांत दोन तीन पक्कान्नें व त्यांचें भक्ष असे पदार्थ केले होते. सहा घटका रात्रपरीयंत भोजनें झालीं. बाईही जवळच बसली होती. भोजनसमयीं राजश्री विसाजी शामराज व नारो शिवदेव व बाईकडील मंडळी असे जवळीच बसले होते. त्यास विसाजी शामराज बाईशीं बोलले जे, आज पाटीलबावाही वाटेनें चालून आले आहेत. आपणासही श्रम जाले आहेत. आतां रात्रही फार जाली आहे. भोजनोत्तरं पाटीलबावांस आज्ञा द्यावी. उद्ईक आप-णही प्रहर दहा घटकांत स्नान व पूजा उरकावी. पाटीलबावाही लवकरच भोजन करून वाड्यांत येतील. बोलण्याचा प्रसंग उद्ईक दोन अडीच प्रहरपरी-यंत व्हावा. बाईनींही मान्य केलें. पाटीलबावांनींही मान्य केलें. भोजन होऊन

एक घटका बसले. विडे घेऊन, बाईचा निरोप घेऊन, कांहीं कमप्रहर रात्रीं आपले मंडळीसुद्धां गोटास गेले. छ २ रोज भृगुवारीं दीड प्रहर दिवसा पाटीलबावा आपलीं स्नानभोजनें उरकून वाड्यांत आले. एक घटका बाईजवळ पुराणांत बसले होते. तदोत्तर बाईनीं सांगितलें जे, तुह्मी बंगल्यांत बसा. माझें भोजन जालीयावर बोलवीन. त्यास बाईचें पुराण होऊन भोजन करून आली. तों दिवस प्रहर उरला. पाटीलबावांचा समाचार आणविला. तों ते निजले होते. त्यावर बाईही घडीभर लेटून, कांहीं विसाजी शामराज यांशीं बोलत होती. तदोत्तर मुद्पाखांत जाऊन पाटीलबावांचे भोजनाची तरतूद केली. तों घटका दिवस उरला. मग भोजनाची तरतूद जाली. शंभर खासा पाटीलबावांकडील होते. सहा घटका रात्रपरीयंत भोजनविडे देऊन बसले. कांहीं बोलावें तर शुक्रवारची रात्र; यास्तव निरोप घेऊन गोटास गेले. छ ३ रोज स्थिरवारीं दों प्रहरांनंतर बाईनीं पाटीलबावांस बोलावूं पाठविलें. एक घटका दिवस राहतां वाड्यांत आले. बाई जपास बसली होती. यावर दों घटका रात्रीं बाईचा जप जाला. तोंवर पाटीलबावा व आबा चिटणीस व राणेखान या त्रिवर्गांचें खलबत जालें. तदोत्तर बाई इकडे आली. मुद्पाखांत भोजनाची सरंजामी झाली. चाळीस पन्नास लोकांनशीं भोजनें केलीं. तदोत्तर विडे घेऊन, पाटीलबावांनीं बाईस वस्त्रें शुभ्र पोषाख, पैठणी पातळ व चोळी व शालजोडी तीन सनगें दिलीं. सौभाग्यवती मुक्ताबाईस पैठणी पेल्याचें पातळ तांबडें व चोळी खिनखाप व पासोडी पैठणी, तिच्या दोघी लेकींस चोळी लुगडीं असीं चार सनगें, मुक्ताबाईच्या भ्रतारास व पुत्रास चार चार सनगें पैठणी व किनखाप जामेवार ऐसीं उभयतांस आठ सनगें ऐसीं वस्त्रें दिलीं. मावशीबाईचे येथेंही एक दिवस मेजवानी होणार आहे. रात्रीं वस्त्रें देऊन चार घटका बाई व पाटीलबावांनीं, आबा व राणेखान ऐसे एकांतीं बसून कांहीं बोलली. त्यावर पाटीलबावांनीं निरोप घेतला. आबाही त्यांजबरोबरीच गेले. राणेखान व बाई उभयतांच चार पांच घटका रात्रीं बसून उभयतांचाच एकांत जाला. वरकड सारे मुत्सद्दी मंडळी आदिकरून बाहेर बसले होते. नव घटका रात्र वाजल्यावर उठली. राणेखान आपल्या गोटास गेले. बाईही आपले निद्रेस गेली. पुण्याकडील वर्तमान वसईचें अस्ताव्यस्त बाईस पाटीलबावांनीं सांगितलें. त्यावरून फार श्रमी जाली. बाई बोलली जे, 'वसईसाठीं कैलासवासी श्रीमंतांनीं फार श्रम केले व पैसाही फार खर्च जाला. तसें स्थळ गेलें ! केवळ त्यांजवरच मसलत पडली ! आपलें कोणीच तेथें नाहीं. कारभारी काय आपले चित्तांत ह्मणत असतील ? आपल्याकडून कांहींच जालें नाहीं.' पाटीलबावा बोलले जे, 'काय करावें ? इकडेही

## २८. नाना फडणविसांचें शांतवन.

नाना फडणवीस ह्यांची एक पत्नी निवर्तली. तेव्हां त्यांस त्यांच्या अनेक मित्रांकडून शांतवनपत्रें आलीं. त्यांतील गोदातीरच्या एक गृहस्थाचें पत्र वाचण्यासारखें आहेः—

॥ श्रीमद् गुरवे नमः ॥

"विज्ञापना. येथील क्षेम कार्तिक बहुल दशमीपर्यंत गोदातीरीं सुखरूप असें विशेषः—कार्तिक शुद्ध ११ स सौभाग्यवती यांस कैलासवास जाहला त्यामुळें बहुतच उदासीन वृत्ति जाहली ह्मणोन ऐकिलें. त्यास ही गोष्ट ईश्वरस्वाधीन आहे. आपण मजवर अनुग्रह केला. मीं आपणांस त्याहावें हे योग्यता नाहीं. परंतु प्राकृत श्लोक आहेः—

संसारीं असतां अलिप्त नलिनीपत्रापरी राहणें ।
आब्रह्मांड समस्त स्वप्न कळतां चिंता वृथा वाहणें ॥
साक्षी होउनि वर्तणें निजसुखें, दुःखासि का साहणें ।
जालें तें अवलोकिलें, अथ पुन्हां होईल तें पाहणें ॥ १ ॥

* * *

## २९. सखारामबापू व नाना फडणवीस ह्यांचे मधील करार.

श्रीमंत माधवराव नारायण पंतप्रधान ह्यांची दौलत राखण्याबद्दल सखाराम-बापू व नाना फडणविस ह्यांनीं इ. स. १७७८।७९ सालीं केलेला पुढील अंतस्थ करारनामा फार महत्त्वाचा आहे. त्यावर उभयतांनीं श्रीसांबाची शपथ घालून सह्या केल्या होत्या. परंतु राज्याधिकाराचा फाजील लोभ व स्वार्थाची अनावर इच्छा ह्या मानवी दुर्गुणांमुळें हा करारनामा अमलांत आला नाहीं. तो जसाच्या तसाच कागदावर राहिला !

श्री.

"यादी श्रीमंत राजश्री माधवराव नारायण पंतप्रधान यांचे दौलतीविषयीं राजश्री बापू व नाना यांनीं सरळ चालून अकृत्रिमपणें दौलतीचा बंदोबस्त करावा, ह्याविषयींचीं कलमें. सु॥ तिसा सबैन मया व अलफः—

१ श्रीमंत रावसाहेब यांच्या पायांशीं उभयतांनीं एकनिष्ठपणें असोन, अकृत्रिमपणें सरळ रीतीनें दौलतीचा बंदोबस्त करावा. श्रीमंत दादासाहेब यांचे बरेंवाईटाचें लक्ष उभयतांचें सारखें असावें, व आंत बाहेर असूं नये.

१ नानांनीं दौलतींत बापूंचें वडीलपण सर्वप्रकारें रक्षावें. बापूंनीं नानांवर दौलतीचा भार ठेवावा. उभयतांनीं सरळ चालून अकृत्रिमपणें असावें. आपपर, किमपि

लेखूं नये. बरेंवाईटास उभयतांनीं परस्परें अनुकूल असावें. सारांश, उभयतांनीं काडीचा संशय न धरितां, एकदिलपणें वर्तणूक करावी. दिक्कत वाढली व संशय आला; तरी समक्ष बोलून संशयनिवृत्ति होत जावी. किंतु वाढूं देऊं नये. आंत बाहेर नसावें. द्वैतार्थ तिळमात्र नसावा.

१ दौलतसंबंधें कारभाराचे यादीवर बापूंनीं 'देवावें' करावें. नानांनीं 'येणेंप्रमाणें' करावें. याप्रों उभयतांनीं चिन्हें करीत जावीं.

१ बापूंस पुत्र होईल अथवा दत्तक घेतील, त्यास नानांनीं शहाणें करावें. स्वरूपास आणावें. बापूंप्रमाणें स्वरूप पाहून त्याचे हातून 'देवावें' करवीत जावें. त्यास वडील सर्वप्रकारें नाना.

१ दौलतींत पैक्याची ओढ. याजकरितां जमेचीं कामें येतील तीं उभयतांनीं मन घालून उलगडीत जावीं; अथवा हरएक तरतूद करणें ती उभयतांनीं अंतःकरणपूर्वक परस्परें अनुकूल राहून करावी. दिक्कत नसावी. कसर करूं नये. आंत बाहेर असूं नये.

१ बापूंच्या व नानांच्या जातीस परस्परें आंच लावूं नये. बापूंनीं नानांस पैक्याचा उपद्रव देऊं नये.

१ मागील गुणदोष उभयतांनीं मनांत तिळमात्र वाईट आणूं नये व करण्यांत वाईट आणूं नये.

१ किल्लेकोटाचा बंदोबस्त पूर्ववत्प्रमाणें उभयतांचे विचारें आहे तसा असावा. यांत वांकडें असल्यास बापूंचे कानावर घालून बंदोबस्त करीत जावा.

१ उभयतांचे मनांत वर करण्यांत दौलतसंबंधीं वगैरे दरज नसावी.

१—( फाटलें ).

१ सातान्याचे खालील कारभारास कारकून पुरंदरे यांचा असावा. त्यांनीं उभयतांनीं सरळ असावें. फडणीशीस कारकून नानांकडील असावा.

१ सचीवपंतांवर उभयतांची ममता असावी.

१ रा. मोरोबा दादा व बज्याबा यांसीं बरेंवाईट बोलणें व करणें उभयतांनीं एक लक्ष धरून करून, आंत बाहेर असूं नये.

१ दौलतींत वांकडे फंदफितूर करतील त्यांचा बंदोबस्त, आपपर न पाहतां, उभयतांचे विचारें करीत जावा. आंतून बाहेरून करूं नये.

१ बापूंच्या मनांत कोणास देणें असलें तरी नानांस स्पष्ट सांगत जावें. नानांनीं मान्य करीत जावें. नानांच्या मनांत असल्यास नानांनीं स्पष्ट सांगत जावें. बापूंनीं मान्य करीत जावें.

१ दौलतींत न समजून वांकडें झालें असेल तें, योग्य अयोग्य असेल तें, उभयतांनीं विचार करून नीट करावें.

१ दौलतीचें कल्याण तीच नीत बापूंनीं नानांस सांगीत जावी. त्याजप्रमाणें नानांनीं लक्ष रक्षीत जावें. उभयतांनीं परस्परें ध्यान धरून उत्तम तें करीत जावें.

१ दौलतींत कामें काजें व खर्च वेंच करणें तो परस्परें परस्परांस बोलून करीत जावा. त्यांत कुन्हा ठेवूं नये. आंत एक, बाहेर एक नसावें.

१ बाहेर राजकारणें करणें व पाहणें हीं उभयतांचीं अंतःकरणपूर्वक एक असावीं. परस्परें कळवीत जावीं. आंतून एक, बाहेरून एक नसावें."

* * *

## ३०. हिंदुस्थानांतील इंग्रजी आतषबाजी.

इंग्रज लोक हिंदुस्थानांत आपल्या आतषबाजीचें कौशल्य दाखवून एतद्देशीय संस्थानिकांस सतुष्ट करीत असल्याचे दाखले लखनौचा नबाब असफद्दौला ह्याच्या कारकीर्दीपासून ( १७७५–१७९७ ) देखील सांपडतात. लखनौच्या नबाबाच्या दरबारीं, इ. स. १७९० चे सुमारास, इंग्रजांनीं आतषबाजीचा ह्मणजे दारूकामाचा एक अपूर्व तमाशा दाखविला होता. त्याच्या वर्णनाचें बातमीपत्र लखनौच्या वकिलानें नाना फडणविसांस पाठविलें आहे. तें मनोरंजक असून त्यांत त्या वेळच्या इंग्रजी दारूकामाचें मजेदार वर्णन आहे, ह्मणून मासल्याकरितां येथें दिलें आहेः—

श्री.

"**करार**नामें[1] इंग्रज आतशबाज[2] विलायतेहून कलकत्त्यास येऊन, आतशबाजीच्या हुन्नरांत[3] आपले हाताचें कौशल्य कलकत्तेकर साहेबाला कैस[4] दाखवून, दोन वेळ मातबर इनामें कडोन सरफराज झाला होता. ही गोष्ट चहूंकडे वाजट ( ? ) व दुनियांत महसूर झाली. मिस्तर इडोर व अलपूसाहेब बहादर लखनौकर यांनीं त्याची उत्तम विद्या पाहून, कीं ते या मुलखच्या सरदारांस अपूर्वतर आहे, सबब आतशबाज पाठवून देण्याकरितां कलकत्त्यास लिहिलें. माहा महिने झाले कीं कलकत्तेकराच्या बमोजीब[5] आतशबाज मजकूर लखनौत येऊन आतशबाजी तयार करीत होते. त्यास आतशबाजी तयार झाल्यावर, इडोर व अलपूसाहेब यांनीं चंद्र १९ मोहरमीं हरकाराच्या जमातदाराच्या हातीं, मिर्जा आमानी यांस सांगून पाठविलें. संध्याकाळीं ऐन तयारीच्या समयीं आभाळाचा तुकडा आकाशीं प्रगट झाला; ह्मणजे ढग आला. सबब, ते दिवशीं महकूफ ठेऊन, चंद्र २० विसावीचे रात्रीं तमाशा पाहावयाचे ठरावांत आलें. ते दिवशीं मिर्जा आमानी वाटेंतून फिरून आपल्या घरीं दाखल झाले. आज चंद्र २० विसावीच्या रात्रीं आभाळ स्वच्छ होतें. दुसऱ्यानें तयारी झाली. मिर्जा आमानी हसनरजाखां व हैदरबेगखां व राजे मंगतराव व सर्व कारभाऱ्यांच्या सहित मिस्तर

---

१ करार+नामें=करार नांवाचा. करार हा कांहीं युरोपियन नांवाचा चुकीचा उच्चार आहे. २ आतशबाज=दारूकाम करणारा. ३ हुन्नर=कला. ४ कस=कर्तृत्व. ५ बमोजीब=इशाऱ्याप्रमाणें; सूचनेप्रमाणें.

इडोर व अलपूसाहेब यांच्या मकानीं बिबिपुरास गेले. करार अतीशबाज यानें प्रथम आतशबाजी...... .....तयार केली, व एका चौकोन्या खांबावर पुतळा [ उभा केला ]. निश्चय केला होता कीं बदूक लागतांच हाच पुतळा आतशबाजीस सुरू होईल. त्यास कितीएक इंग्रजांनीं बंदुका मारिल्या, निशाण लागलें नाहीं. राजे जवानसिंग यांनींही बरकंदाजी चांगली केली. गोळी निशाणास न लागली. शेवटी मिर्जा आमानी यांनीं खाशी बंदूक घेऊन आपल्या स्वहस्तें सोडिली, तत्रापि निशाण चुकलें या घालमेलींत रात्र प्रहराहून अधीक गेली. करार मजकूर यानें पुतळ्याचा तमाशा महकूफ ठेऊन, आपल्या हातानें एका आतशबाजीच्या झाडास बत्ती दिली. त्या झाडांतून अपूर्व फुलें निघालीं, कीं कधींही कोणीं पाहिलीं नसावीं. एका नळाच्या कुलाब्यांतून भडका निघाला. त्यांतून हें दृष्टीस येत होतें कीं, दाऊदीचीं फुलें व केशराच्या कपाऱ्या व हिरवीं फुलें लवलवीत व सुरूचीं झाडें प्रफुल्लित व लसलशीत-जशीं बागांत उत्पन्न होतात तशीं-प्रगट झालीं. हा तमाशा एक घटकापर्यंत राहिला. तों एकाएकीं दुसऱ्या नळांतून भडका निघोन आसमानांत गेला. त्यांतून सितारे आकाशांत उंच जाऊन, फिरतेसमयीं रंग दुसरा ह्मणजे सहस्रावधि सर्प फणा काढून पृथ्वीवर पडत होते. त्याचप्रमाणें आणखी आतशबाजींतून शतावधि मासे मोठे आतशबाजीच्या रोशनीतून निघोन, सिताऱ्याप्रमाणें आकाशांतून पृथ्वीवर येत होते, त्यानंतर एका क्षणांत आतशबाजींतून पर्जन्याचा मोसम पैदा झाला. पर्जन्याची वृष्टि झिरमिर नजरेस पडूं लागली, व दुसऱ्या आतशबाजीच्या झाडांतून अपूर्व नक्षा दृष्टीस आला. ह्मणजे एक मशीद ती गजांची, बहुतच अपूर्वतर प्रगट झाली. कांहीं एक वेळ हाच नक्षा कायम राहिला. तों त्यांतून एकाएकीं बंदुकीच्या व तोफेच्या शलकेचे आवाज सुरू झाले. आवाज येथवर उंच होऊं लागले कीं, बिबिपुराहून लखनौच्या लोकांनीं ऐकिले. हा तमाशा समाप्त झाला कीं एका आतशबाजीच्या नळाच्या भडक्यांतून सूर्य बाहेर येऊन आकाशीं चालला, व आपल्या प्रकाशेंकडोन त्या मैदानास प्रकाशित केलें. असाच चंद्राचाही तमाशा नजरेस आला. शेवटीं एक्या आतशबाजींतून सूर्यमुखीच्या फुलाप्रमाणें फूल भ्रमण करीत निघालें, व अपूर्व कारागिरी केली होती कीं, त्या फुलाच्या फिरण्यांत ही बैत स्वच्छ अक्षरें काढोन सर्व लोक तमाशा पाहाणाऱ्यांच्या दृष्टीस आलीं. करारानें असफदौला बहादूर यांच्या एकबळेंकडोन आपली कारागिरी नादिर केली. सारांश, अशी आतशबाजी होती कीं, मागेंही कधीं कोणें ऐकिली नाहीं व पाहिली नसावी. सर्व लोकांनीं इंग्रजांस बहुत शाबासकी दिधली, व दीडप्रहर रात्र जालियावर मिर्जा आमानी तेथून स्वार होऊन आपल्या घरीं दाखल झाले. चंद्र २१

१ मकान=घर, बंगला, कोठी. २ बरकंदाजी=निशाण मारणे. ३ कुलाबा=कलाव=गोळा. ४ दाऊदी=प्रकारविशेष. ५ सितारे=तारे. ६ रोशनी=प्रकाश, उजेड. ७ मोसम=ऋतु, देखावा. ८ नक्षा=देखावा. ९ शलक=सरबत्ती. १० नादर=उत्कृष्ट, अत्युत्तम.

विसावीचे प्रातःकाळीं सर्व कारभाऱ्यांनीं खिलत[1] दिले. मिर्जा गुलास-हुसेनखानास पांच पारच्यांचा[2] खिलत पश्चमेच्या रुखसेते[3] बाबत देऊन, दोन घटका दिवस चढल्यावर कूच करून सैरजुमा डेऱ्यांत दाखल झाले."

* * *

## ३१. घोरपडीची लढाई.

इ. स. १८१७ मध्यें दुसरे बाजीराव पेशवे व इंग्रज ह्यांच्यामध्यें खडकी व घोरपडी येथें लढाई होऊन बाजीराव पळून गेले व पुण्यास ब्रिटिश सरकारचा अंमल कायमचा स्थापन झाला. ह्या लढाईचा वृत्तांत इंग्रजी इतिहासांत आलेलाच आहे. परंतु प्रत्यक्ष त्या वेळीं पुण्यांत हजर असणाऱ्या इसमानें लिहिलेलें मराठी पत्र पाहण्याची आमची फार इच्छा होती, त्याप्रमाणें एक पत्र उपलब्ध झालें आहे. पत्रावर लिहिणाराचें नांव नाहीं. तथापि तें नाना फडणविसांच्या पत्नी जिऊबाई भानु ह्यांस त्यांच्या वतीच्या कारभाऱ्यानें किंवा नातेवाईकानें लिहिलेलें आहे. ह्यामध्यें जनरल स्मिथ ह्यांच्या सैन्याची व बापू गोखल्याची घोरपडी येथें ता. १६ नोव्हेंबर इ. स. १८१७ रोजीं जी लढाई झाली, तिचें व त्यापुढील पुण्यांतील आठ दिवसांच्या घडामोडीचें वृत्त आहे तें येणंप्रमाणें:-

श्री.

"विज्ञापना तागाईत कार्तिक शुद्ध १५ रविवारपावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. रविवारीं अष्टमीस दोनप्रहरांपासून लढाईची तोफ चालती झाली. घोरपडीजवळ खंडोबाची टेकडी आहे, त्याचे नजीक टेकडी पीराची आहे, त्याजवर इंग्रजांनीं दोन तोफा लागू करून मोर्च्या कायम केला. त्याजवर आरब व गोसावी पायदळ नदीपुढें जाऊन गोळी चालली. त्यांचा मोर्चा पाडाव केला. नंतर सरकारी तोफा चालल्या, परंतु फिरोन इंग्रजांची तोफ चालली. ती मध्यानरात्रपावेतों. एकसारखा श्वेत उभयतांकडून चालला. गोखले, पुरंदरे, रास्ते व नारोपंत आपटे व पटवर्धन वगैरे मंडळी तोफांजवळ उभे होते. घोरपडीकडून एक पलटण आले ह्मणोन गोखले वगैरे तिकडे लढत गेले. त्यास घोरपडीपलीकडे लढत नेला, तों रात्र प्रहर राहिली. संगमावर पलीकडे विंचूरकर पांच हजार फौज व चौधरीकडील पांच तोफा तेथें असतां, विंचूरकरांनीं घोडा घातला नाहीं, व तोफ लाविली नाहीं. पलटणास मार्ग दिल्यामुळें दोन पलटणें सरकारचे तोफांजवळ जाऊन, तोफा वेढून उभे राहिले. हें वर्तमान गोखल्यास कळल्यावर विंचूरकरांकडे सांगून पाठविलें कीं, हे लोक कोणाचे आले? तुह्मी तेथें उभे असतां तिकडून लोक आले, ह्मणोन दोष लावून

१ खिलत=पोषाख, वस्त्रें. २ पारच्यांचा=वस्त्रांचा. ३ रुखसते बाबत=निरोपाबद्दल.

बोलल्यावर, त्यांजकडून उत्तर आलें कीं चौधरीचे लोक यावयाचे ते आले. असा निरोप आला. परंतु इंग्रजांचे लोकांनीं सरकारच्याच तोफा त्यांजवर लागू करून मारगिरी चालली. तेव्हां सूर्योदय झाल्यावर गोखले वगैरे मंडल तमाम गेलें. यास कारणें दोन झालीं. प्रथम, प्रहर रात्रीस श्रीमंत लष्करांतून पळोन गेले. त्याजमुळें फौजेचा धर सुटोन तमाम लोक पळूं लागले. गोखले वगैरे मंडळी लढत असतां असा प्रकार केला. व ..................... केला. याजमुळें सरकारचा अपजय झाला. दौलत खराब झाली. इंग्रजी अंमल सरकारवाड्यांसुद्धां केला आहे. बुधवारचा शुक्रवारचा वाडा, चावडी, व शहर[1]पन्हासह बंदोबस्त झाला. सिंहगडास सरकारच्या तोफा होत्या, त्या आणावयास हजार लोक व घोरपड्याचे स्वार गेले. तोफा आणिल्या. परंतु तेथें लोक गेले, त्यांचा नाश फारच झाला. मनुष्यें मात्र किल्ल्यावर गेलीं. चीजवस्त सर्व घोडीं उंट वगैरे सुद्धां गेले. वानवळे पिपडी (?) साहुकार व अण्णा नगरकर व राहतेकर वगैरे यांचा नाश बहुत झाला. श्रीमंत[2] माहुलीस आहेत ह्मणोन वर्तमान आहे. काल एलफिस्टन्‌साहेबांचा कूच, दोन पलटणें व तुरूप व घोरपड्यांचे स्वारसुद्धां लोणीस गेले. बेटांतील सैरंजाम जो गेला, तो सर्व आणआणून देतात. त्यास थोडें बहुत बक्षीम पावतें. नातू कारभारी बरोबरच गेले. शनवारचे वाड्यांत रॉबिन्सनसाहेब कामकाजास आहेत. मंगळवारीं नवमीस भेटीस गेलों. भेट झाली. बहुत खुषी आहेत. दुसऱ्यानें गुरुवारीं गेलों. नंतर शुक्रवारीं आपले शिपाई आल्यावर पत्राचा मजकूर सांगावयास गेलों, त्याजवरून खुषी झाली. परंतु पत्राची निभावणी पडली नाहीं. आपले दरमाहाचें बोललों. तूर्त रुपये मुंबईस देवावे ह्मणोन बोलल्यावर, ते बोलले कीं तूर्त गडबड आहे ह्मणून तेथें देऊं; मग येथें ध्यावे. या-

१ शरहपन्हा=शहरचा कोट. २ श्रीमंत=बाजीराव पेशवे. पुण्याहून साताऱ्याजवळ माहुलीस पळून गेले. माहुली येथे त्यांची व मालकम साहेबांची भेट झाली. त्या भेटीत त्यांनीं मालकम साहेबांजवळ अशी तक्रार केली कीं, 'मि० एल्फिन्स्टन हे माझी अगदी बितं बातमी काढतात. माझ्या जेवणांतील पदार्थहि त्याम एकून एक समजतात!' ३ खडकी येथें ता. ५ नोव्हेंबर इ. स. १८१७ रोजी लढाई होऊन, तीत संगमावरील मि० एल्फिन्स्टन ह्यांच्या बंगल्याची व इतर युरोपियन लोकांच्या सामानाची लुटालूट झाली. त्यांतील वस्तू लोकांनीं पुढें परत नेऊन दिल्या. ह्याचा प्रत्यंतर पुरावा असिस्टन्ट रेसिडेंट मि० ब्रिग्ज ह्यांच्या लेखांतही आहे. त्यांचे मूल्यवान् ग्रंथ व पुस्तकें त्यांना पुढे लुटाऱ्यांनी आणून दिली. ४ नातू=सुप्रसिद्ध बाळाजीपंत नातू. यांनी ब्रिटिश सरकारचा अंमल पुण्यामध्ये संस्थापित करण्याचे कामीं मि० एल्फिन्स्टन साहेबास उत्कृष्ट मदत केली, हें सर्वश्रुतच आहे. ५ नाना फडणविसांचे पत्नीस दरमहा १००० रुपये पेशव्यांचे दरबारांतून इंग्रजांमार्फत देण्याचा जनरल वेलस्ली ह्यांनीं ठराव केला होता. त्याप्रमाणें ते मुंबईस मिळत असत. ते पुढें पुण्यास मिळूं लागले.

प्रमाणें बोलले, व मला चार घटका बसा ह्मणोन बोलले. त्याजवर साहा घटका रात्र-पावेतों बसलों. गांठ पडली नाहीं, ह्मणोन घरीं आलों. ते रात्रीस कूच करून लोणीस गेले. मार्ग सुबत्ता नाहीं ह्मणोन गेलों नाहीं. दोन असामी शिपाई येथें ठेवितों. बाहेर-गांवीं मनुष्य निभावत नाहीं. महाप्रयास आहे. उंट आणावयास शिपाई पाठवावयाचा त्याची निभावणी होणें अवघड. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. सदाशिवपेठचे वाड्याचे व वामनभट कर्वे राहतात तो एकूण दोन वाड्यांचा मजकूर नातूंजवळ बोललों आहें. हौदाचें पाणी बाहेर गेलें तें बंद करावयाचें, येणेंप्रमाणें मजकूर बोललों आहें. नातू रॉबिन्सनसाहेबांची आज भेट करून देणार आहेत. त्यांजवळ बोलून काय होईल तो मजकूर मागाहून लिहीन. हे विज्ञापना.''

* * *

## ३२. प्रतिनिधींचें राजकारण.

पेशव्यांनीं सातारच्या छत्रपतीस कैदेंत ठेवून सर्वच राजसत्ता आपल्या हातीं घेत-ल्यामुळें प्रतिनिधि व इतर सरदार ह्यांनीं नागपूरच्या भोसल्यांशीं राजकारण करून सातारच्या छत्रपतीस स्वतंत्र करण्याचा प्रयत्न केला होता. त्या प्रसंगीं प्रतिनिधि व जानोजी भोंसले ह्यांनीं केलेला अंतस्थ करार उपलब्ध झाला आहे. तो इतिहास-दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे:—

### श्री आई आदिपुरुष.

ता. ११ एप्रिल इ. स. १७६३.

''राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांसी:—अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि आशीर्वाद विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन केलें पाहिजे. विशेष:—श्रीमंत महाराज स्वामी छत्रपति याजला राजश्री पंतप्रधान याणी तेरा वर्षे अमर्याद होऊन सेवेची रीत टाकून नजरबंद ठेविलें. श्रीकृपेनें त्याचा फलादेशही त्यास जाहला. त्यावरी रा० रघुनाथपंत यांणीं रा० गमाजीबावा दिवाण यांस क्रियाशफत देऊन स्वामींस किल्याखालीं उतरविलें, आणि फिरून पहिल्या योगाप्रमाणेंच वर्तणूक करूं लागले—किंबहुना त्यापेक्षां विशेष केलें. व पदाच्याही घालमेल्या केल्या. याजबाबद छत्रपति महाराज यांणीं आह्मांस आज्ञा केली कीं, तुह्मी रा. गमाजीबावास पाठवून नबाबास फिरविणें. त्याजवरून मशारनिल्हेची रवानगी केली. तुह्मांसही सामील येऊन होण्याची आज्ञा केली. त्याजवरून फौजेसुद्धां कलबुर्ग्याचे मुकामीं स्वामिसेवेसी येऊन तत्पर जाहला. तुह्मी पंचवीस हजार फौजे-निशीं येतांच नबाबही माघारें फिरले. त्यास पुढें राज्याचा बंदोबस्त आला पाहिजे; व शत्रूचा पराभव व्हावा. सालमजकुरीं तुह्मीं पंचवीस हजार फौज ठेविली आहे. तिचा निर्वाह पुढें मातबर फौजेनिशीं संनिध राहून, राज्यास अनिष्ट चिंतणार त्यांचें

पारपत्य यथास्थित करून स्वामीचे कृपेस सत्पात्र जाहला. पुढें राज्य स्वस्थ चालावें याजकरितां तुह्मांस सरंजाम द्यावयाचा करार केला. बितपसीलः—

१ छत्रपति कैलासवासी महाराजाचे कारकीर्दीत तुह्मांकडे सरंजाम. प्रांत वराड[1] दरोबस्त, देवगड[2], प्रांत चंद्रपुर[3], सुभाकटक[4], मकसुदाबाद[5], सुभा पटणे[6], कित्ता परगणे[7] नर्मदातीरीं सोळा मंडळाचे, सिवाय नेमाड, येणेंप्रमाणें सरंजाम तुह्मांकडे पूर्वीपासून चालत आला आहे, तेणेंप्रमाणें करार आहे. सदरहू सरंजाम अनभवून या सरंजामावर जितकी चाकरी करीत आला, तितकी सुखरूप करावी. याशिवाय पंचवीस हजार फौजेचा सरंजाम जास्ती करार केला असे. कलम. १

२ कडेवळीतचे देशमुखीचें वतन तुमचें आहे. तें सुरळित करून देऊं. कडपाचें ठाणें देखील तुह्मांकडे देऊं. कलम. १

३ नवीन सरंजाम पंचवीस हजार फौजेस नेमून द्यावा. त्याऐवजीं पुणें देश नेमून देऊं. कलम. १

४, ५ जास्ती सरंजाम हल्लीं तुह्मांस द्यावा. पंचवीस हजार फौजेचा दर हजारीं तीन लक्ष रुपये प्रमाणें एकून पंचाहत्तर लक्ष रुपयांचा सरंजाम, पैकीं फत्तेसिंग भोंसले यांचा सरंजाम स्वराज्यांतील व मुलकी गंगथडी वगैरे सदरहू फौजेचे जारीस द्यावा. तुपरेस राहील तो दुसरे जागा नेमून द्यावा, खानदेश वगैरे नर्मदे अलिकडील. कलम. १

६ तुमचे साक्षात् तिघे भाऊ व तुमचे घरांतील भाऊबंद यांस नेमणुकेप्रमाणें तुह्मी आजवरी देत आलां, त्याप्रमाणें पुढें चालवावें. सरकारांतून निराळी जागा देऊन ठेवणार नाहीं. कलम. १

७ तुह्मांकडील सरदार नूतन माजून आला, तरी सरकारांत ठेवणार नाहीं. तुमचा तुह्मांकडे समजावून लावून देऊं. कलम. १

८ तुह्मांस किल्ले राहावयास द्यावे हा करार असे. बि॥ किल्ले सिंहगड, किल्ले पुरंदर, किल्ले लोहगड, किल्ले परळी, किल्ला....

एकूण आठ कलमें करार राजश्री गमाजीबावा पाठवून, तुह्मांसीं करार करून, महत्कार्यास राज्याच्या बंदोबस्तास आणिलें. तुह्मीही आलां. तरी या कराराप्रमाणें महाराज छत्रपति स्वामी यांजकडून करार करून आपण देऊं. तुह्मी आह्मांसीं अणुमात्र वंचना न करावी. जें आमचें नुकसान तें तुमचें. तुमचें नुकसान तें आमचें. उभयतांनीं एका विचारें राहावें. आमचें नुकसान्न ज्यांत असेल तें, जिवादारभ्य श्रम तुह्मीं करून निवारण करावें. याप्रमाणें यावत् तुमचा जीव व तुमचे वंशेचें कोणी होईल, त्यांणीं वंचना न करावी. वंचना करील तो रघुजी बावाच्या वंशींचा नव्हे. आह्मीं यावत्जीवन व तावत्कालपर्यंत व आमचे आवलादींत तुह्मांसी अंतर करील, तरी तो परशरामपंताचे वंशींचा नव्हे. उभयतांनीं एक विचारें चालावें. इमानपुरस्कर दुसरीयाची सोय न धरितां, कोणेविसीं अंतर न देतां चालावें. चंद्र २६ माहे रमजान सु॥ सलास सीतैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें लोभ असावा, हे विनंति.”

❦ ❦ ❦

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] फेब्रुवारी १९०९. [अंक ७ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



राणी रूपमती आणि बाजबहादुर.

## १८. राणी रूपमती आणि बाजबहादूर.

माळव्याच्या इतिहासामध्यें राणी रूपमती व बाजबहादूर हीं दोन नांवें फार प्रसिद्ध आहेत. बाजबहादूर हा माळव्याचा शेवटचा बादशाहा असून, त्यानें मांडवगड ऊर्फ मंडू येथें, इ. स. १५५४ पासून इ. स. १५६४ पर्यंत, राज्य केलें. हा बादशाहा फार विलासी, मृगयाकुशल आणि संगीतलोलुप होता. त्याची राणी रूपमती ही प्रणयललना असून, त्या उभयतांचें अलौकिक प्रेम हा माळव्याच्या इतिहासांतला एक अद्भुत व रमणीय असा कथाप्रसंग होऊन राहिला आहे, व त्यानें बाह्यतः शुष्क व नीरस वाटणाऱ्या इतिहासरसामध्यें देखील अंतरंग खुलविणाऱ्या अद्भुत रसाचें मिश्रण केलें आहे.

राणी रूपमती हिचा जन्म उज्जनीच्या ईशान्येस ५५ मैल अंतरावर असलेल्या सारंगपुरनामक गांवीं झाला. तिच्या आईबापांची व लहानपणाची हकीकत चांगलीशी उपलब्ध नाहीं. सर जॉन मालकम ह्यांनीं असें लिहिलें आहे कीं, ही सारंगनयना सारंगपुरची एक नृत्यांगना होती. दुसऱ्या एका इंग्रज ग्रंथकारानें लिहिलें आहे कीं, ती मंडलेश्वराजवळील रेवातीरच्या एका रजपुत ठाकुराची मुलगी होती. परंतु एवढें निश्चित आहे कीं, ती अत्यंत सौंदर्यवती असून, तिला संगीतशास्त्राचें चांगलें ज्ञान होतें. तिचा आवाज तर इतका मधुर होता कीं, तिच्या मंजुल आलापलहरी ऐकून सहृदयअंतःकरण वेधून गेल्यावांचून राहत नसे.

बादशाहा बाजबहादूर हा एके दिवशीं नर्मदेच्या कांठीं सृष्टिसौंदर्यानें मंडित अशा एका वनप्रदेशामध्यें शिकारीस गेला होता. त्या वेळीं रूपमती ही, रेवातीरीं आपल्या मंजुल स्वरानें निसर्गदेवतेचें स्तवन करीत, एका वृक्षाखालीं बसली होती. तिच्या संगीताचा सुस्वर ध्वनि बाजबहादुराच्या श्रवणीं जातांच, तो अगदीं तल्लीन होऊन गेला, व दर्शनोत्सुक होऊन ह्या सौंदर्यलतिकेजवळ येऊन दाखल झाला. नंतर त्यानें तिचें दर्शन घेतलें. तिच्या गानमाधुर्यानें त्याचें अंतःकरण जितकें वेधलें, त्यापेक्षां तिची लावण्यकांति अवलोकन करून तो सहस्रपटीनें तिजवर प्रेमानुरक्त झाला. नंतर त्यानें तिला आपल्या बरोबर लग्न लावून आपली पट्टराणी होण्याविषयींची इच्छा प्रदर्शित केली. त्या वेळीं तिनें बादशाहास असें सांगितलें कीं, 'मी रजपुत वीराची कन्या आहें. मला मुसलमानाशीं लग्न लावणें शक्य नाहीं.' नंतर बादशाहानें तिची अनेक प्रकारें विनवणी केली. तेव्हां तिनें त्यास निक्षून सांगितलें कीं, 'तूं जर ह्या पवित्र नर्मदा नदीस मांडवगडावर नेऊन, तेथून तिचा प्रवाह वाहत जाईल असें करशील, तर मी तुझी पट्टराणी होईन.' मांडवगड हें ठिकाण नर्मदा-

प्रवाहापासून १२०० फूट उंच असल्यामुळें तेथें नर्मदाप्रवाह येणें शक्यच नव्हतें. तथापि, बादशाहानें आपल्या राज्यांतील सर्व संपत्ती व सर्व साधनें उपयोगांत आणून, हें अचाट कृत्य सिद्धीस नेण्याचा निश्चय केला; व लागलीच मांडवगड फोडून नर्मदाप्रवाह वर आणण्यास सुरुवात केली. प्रेमाकरितां मनुष्य काय न करील? बादशाहाचें निस्सीम प्रेम व त्याचा चमत्कारिक पण पाहून, साक्षात् श्रीरेवानदी त्याच्या स्वप्नांत आली, व तिनें बादशाहास असा दृष्टांत दिला कीं, 'तुझें रूपमतीवरील निस्सीम प्रेम पाहून मी प्रसन्न झाल्यें. तूं आतां व्यर्थ खटाटोप करूं नको. मांडवगडावर जेथून माझा प्रवाह दिसतो, तेथें जवळच तूं खणून पहा. तेथें तुला माझ्या प्रवाहाचा झरा सांपडेल. ती साक्षात् रेवानदी आहे असें समज; व तेथें तुझा व तुझ्या प्रणयपात्र रूपमतीचा प्रीतिसंगम होऊं दे.' असा श्रीरेवानदीचा दृष्टांत झाल्यावर बादशाहानें रूपमतीस तेथें आणिलें, व तिची खात्री करून देऊन तिच्याशीं विवाह केला.* हें रेवाकुंड अद्यापि अस्तित्वांत

* दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, बादशाहानें रूपमतीशी विवाह करण्याचा निश्चय केला. ही गोष्ट तिचा बाप जो धर्मपुरीचा ठाकूर त्यास कळली. तेव्हां त्यानें, रजपुताच्या मुलीनें मुसलमानाशीं विवाह करण्यापेक्षां विषप्राशन करून नर्मदातीरीं आपला प्राणनाश करणें चांगलें असें समजून, त्यानें तिच्याकरितां विषाचा प्याला तयार करविला; व नर्मदातीरीं तो तिला प्राशन करण्यास देऊन तिच्या सुकुमार शरीराची रक्षा नर्मदाप्रवाहांत टाकण्याचा निश्चय केला. ज्या वेळी तो विषाचा प्याला तिजपुढें आला, त्या वेळीं तिनें नर्मदेची प्रार्थना करून कांहीं पद्यें ह्मटलीं. तिचा मधुर स्वर ऐकून बादशाहा दैवगतीनें तेथें अकस्मात् प्राप्त झाला व त्यानें रूपमतीची सुटका करून तिला आपल्या राजवाड्यांत नेलें. ह्या प्रसंगीं तिनें जीं पद्यें ह्मटलीं, त्यांपैकीं दोन पद्यांचा आशय एका इंग्रज ग्रंथकारानें इंग्रजीमध्यें दिला आहे. तो वाचनीय आहे.

"King of the crystal depths! Ah! Where,
Nurbudda, shall thy sparkling wave
The young Rajpootnie's ashes bear?
Leave them where thy ripples lave
The emerald marge, and lilies wave
Their deathless petals. Let the chime
Of thy glad wave sound o'er her grave,
Cut off in virgin prime."

*

"And if, perchance, of foreign blood
But kindred soul, a warrior come
To ponder o'er thy twilight flood,
And seek the form for ever gone,
Tell him the maid of Rajasthan,
True to her faith nor false to him,
Thus binds her bridal garland on,
Cut down in virgin prime."

आहे, व ह्याच्या नजीकच बाजबहादुराचा राजवाडा व रूपमतीचा महाल हेही विपन्न स्थितीमध्यें अद्यापि आहेत. रूपमतीच्या महालापासून दिसणारा दूरांतरावरील पवित्र नर्मदानदीचा प्रवाह व वनश्रीचा रमणीय देखावा फारच उदात्त व चित्ताल्हादक आहे. असो.

राणी रूपमती व बाजबहादूर ह्यांचा प्रेमसंबंध इ. स. १५५७ चे सुमारास जडला. तेव्हांपासून सुमारें ७ वर्षेपर्यंत बाजबहादूर ह्यानें आपलें लक्ष राजकारभारांत न घालितां, जनानखान्यांतील शृंगारसुखामध्यें व मदनविहारामध्यें घालविल्यामुळें राज्याचा बंदोबस्त चांगल्या प्रकारें राहिला नाहीं. त्यामुळें दिल्लीच्या मोंगल सैन्यानें माळवा प्रांतावर स्वारी करून, इ. स. १५६४ मध्यें बाजबहादूर ह्याचें राज्य जिंकून घेतलें; आणि राणी रूपमती व बाजबहादूर ह्यांचा प्रेमसंबंधाचा दुःखपर्यवसायी शेवट लाविला.*

ज्या वेळीं अकबर बादशाहानें आपल्या आदमखाननामक सरदारास सैन्य देऊन माळव्यावर पाठविलें, त्या वेळीं बाजबहादुरानें सारंगपूर येथें मोंगल सैन्याशीं टक्कर देण्याकरितां आपल्या सैन्याची जमवाजमव केली. परंतु मोंगल सैन्य रणशूर असल्यामुळें त्याजपुढें बाजबहादूर ह्याचा टिकाव व लागून त्यास पळ काढावा लागला. त्यामुळें त्याचा खजिना, त्याचीं राजचिन्हें, त्याचे हत्तीघोडे वगैरे सर्व शत्रूच्या ताब्यांत गेलें; आणि त्याचा जनानखाना व त्यांतील सौंदर्यललना राणी रूपमती ही देखील त्याच्या हातांत पडण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं बादशाहानें आपल्या विश्वासु सैनिकांकडून सारंगपूर येथें आपल्या राण्यांचा तरवारीच्या धारेकडून वध केला. काफीखान इतिहासकार ह्मणतो कीं, 'रूपमती ही मोंगल सेनापति आदमखान ह्याच्या हातांत सांपडली. त्यानें तिचें सौंदर्य पाहून तो तिजवर लुब्ध झाला, व तिला वश करण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. परंतु ती फार पतिनिष्ठ असल्या-

* मध्यहिंदुस्थानातील एका लष्करी अधिकाऱ्यानें शुजालपुरच्या काजीसाहेबाकडून एक फारसी तवारिख मिळविली होती. तिच्या मध्यें अशी हकीकत दिली आहे की, बाजबहादूर बादशाहाच्या पदरी मानखान ह्या नावाचा एक गवयी होता. तो अकबरबादशाहाकडे गेला, व त्यानें रूपमतीच्या सौंदर्याची महती बादशाहाजवळ वर्णन केली. बादशाहानें बाजबहादुरास रूपमतीला दिल्ली येथें पाठविण्याबद्दल पत्र लिहिलें. तें पाहून बाजबहादुरास फार सताप आला; व त्यानें दिल्लीपतीचा उपमर्द करून असें उत्तर पाठविलें की, तुमच्या जनानखान्यांतील महाराणी धोकलबाई हिला आमच्याकडे दोन महिने पाठवावें; ह्मणजे राणी रूपमतीस तुमच्याकडे पाठवून देऊं. हें उत्तर ऐकून बादशाहास फार क्रोध उत्पन्न झाला, व त्यानें सारंगपुरावर सैन्य पाठवून बाजबहादुराचा पराभव केला, व त्यास धारातीर्थीं पाठवून त्याचें राज्य जिंकून घेतलें.

मुळें तिनें विषप्राशन करून आपली प्राणहत्या केली.' राणी रूपमती हिचा शेवट धारातीर्थी होवो किंवा विषप्राशनानें होवो, परंतु तो करुणरसपूरित असून तो पतिनिष्ठ सतीस साजेसाच झाला आहे. राणी रूपमती हिचें बाजबहादुराचे ठिकाणीं इतकें शुद्ध व अचल प्रेम होतें कीं, तिनें त्याजवर नाना प्रकारचीं पद्यें रचलीं आहेत. हीं पद्यें हिंदी भाषेंत असून, तीं माळव्यांतील कर्णप्रिय लोकगीतें होऊन राहिलीं आहेत. ज्या वेळीं बाजबहादूर मृत्यु पावला असें ह्या राणीस कळलें, त्या वेळीं तिनें पुढील दोहा ह्मणून प्राण सोडिलाः—

**तुम बिन जियरा रहत हत, मांगत है सुख राज।**
**रूपमती दुखिया भई, बिना बहादुर बाज॥ १॥**

ह्या राणीनें सुप्रसिद्ध भूपकल्याण राग शोधून काढिला असें ह्मणतात. असो. राणी रूपमती ही एक अद्वितीय स्त्री होऊन गेली व तिनें आपल्या संगीत कलेनें व अलौकिक पतिप्रेमानें आपलें नांव माळव्याच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें, ह्यांत शंका नाहीं.* राणी रूपमतीच्या कविता अद्यापि प्रसिद्ध झाल्या नाहींत. परंतु एकदोन संशोधक इंग्रज ग्रंथकारांनीं ज्या कांहीं भाषांतररूपानें प्रसिद्ध केल्या आहेत, त्यांपैकीं जनरल कनिंगह्यम ह्यांचें पुढील भाषांतर फार मनोरम आहे. रूपमतीनें बाजबहादुरास आपल्या प्रेमाचें महत्त्व वर्णन केलें आहेः—

"Friend! let others boast their treasure-
Mine's a stock of true love's pleasure;
Safely cared for every part,
'Neath that trusty lock, my heart;
Safe from other women's peeping,
For the key's in mine own keeping;
Day by day it frows a little,
Never loses e'en a tittle;
But through life will ever go,
With Baz Bahadur, weal or woe."



* एका युरोपियन लेखकानें राणी रूपमतीबद्दल पुढील उद्गार काढिले आहेतः—

"* * * She was a high-minded woman, who did not choose to survive the loss of her honour, and who bore such an enthusiastic attachment to her lord that she deemed her existence insupportable without him. The end of her career has some resemblance to that of Cleopatra, but her history is more romantic as well as much more moral. To a great extent her experience may be compared to that of Sappho. Both were gifted with a high poetic vein, and both were ardently fond of the objects of their loves; and the sad end of both proceeded from pining and separation. They have both left behind them the most impassioned poetry to cherish the memory of their names. The songs of Rupmati are still sung all over Malwa; and in their simple natural style, form the genuine outpourings of a fervent heart."—*The Calcutta Review.*

वांटा मागावा, ही गोष्ट थोरपणाचे इजतीमध्यें लायख नव्हे. यानिमित्त तुह्मांला चंजाउरास जाण्याचा निरोप दिला. तुह्मी चंजाउरास गेलेती. त्याउपरी गृहकलह वाढवूं नये, वाढविल्यानें पहिले युगीं पांडव कौरव बहुत कष्टी जाले, ते सारी भारताची कथा मनांत आणून, गृहकलह वाढविलियां उभयपक्षीं कष्टी होईजे, ऐसें मनांत जाणून, राजश्री शामजी नाईक व कोन्हेरीपंत व शिवाजी शंकर यांहातीं मागतें बहुतां रीतीं सांगून पाठविलें, कीं तुह्मी व आह्मी वांटे करून घेऊं; परस्परें समाधानें राहूं. परंतु तुह्मीं दुर्योधनासारखी दुष्टबुद्धि धरून संधि न करावा. युद्ध करावें, ऐसेंच मनीं धरिलें. ऐशियास आह्मांला रायगड प्रांतें बहुत कांहीं कार्य होतें. यानिमित्तें चिरंजीव संताजी भोसले व राजश्री रघुनाथपंत व राजश्री हंबीरराव असे ते प्रांतीं ठेवून आह्मी स्वार होऊन तोरगळ प्रांतास आलों. येथें अशी खबर ऐकली कीं तुह्मीं तुरुक लोकांच्या बुद्धीस लागून, आमचे लोकांशीं झगडा करावा ऐसें मनीं धरून, आपली सारी जमेत एकवट करून, आमचे लोकांवर पाठवून दिलेती. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालून आल्यावर तुमचे आमचे लोकांत थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी डबीर ऐसे तिघे धरिले, व कितीएक लोक मारिले, कितीएक लोक पळून दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार ऐकिला. हें ऐकून बहुत नवल ऐसें वाटलें, कीं कैलासवासी महाराज, त्यांचे तुह्मी पुत्र, बहुत थोर लोक, ऐसें असून कांहीं विचार करीत नाहीं व धर्माधर्म विचारीत नाहीं. ऐसे असतां कष्टी व्हाल याचें नवल काय ? तुह्मी ह्मणाल कीं कैसा विचार करावा ? तरी ऐसा विचार करावा होता कीं, अधर्मेकरून तेरा वर्षें आपण सारें राज्य खादलें तें खादलें; आतां अर्धा वांटा मागतात, तो त्यांचा त्यांला द्यावा, आणि आपण सुखी राहावें. ऐसा विचार करावा होता. दुसरा विचार करावा होता, कीं श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यांवरी पूर्ण जाली आहे. दुष्ट तुरुकांला ते मारितात. आपल्या सैन्यांत तुरक लोकच असतां जय कैसा होतो, आणि तुरुक लोक कैसें वाचूं पाहतात. हा विचार करावा होता; आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुद्धि करून युद्ध केलें आणि लोक मारविले. जें जाहलें तें जाहलें. पुढें तरी हट्ट न करणें. तेरा वर्षें तुह्मीं सारें राज्य खादलें तें खादलें. याउपरी कितेक प्रांत आमचे आह्मीं घेतले असेत. अरणी, बंगरूळ, कोलार, हसकोट, शिराळकोट, व किरकोळ जागे व चंजाऊर असे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती, ते आमचे लोकांचे हातीं देणें; आणि जमेत, पैका व जडाव व हत्ती व घोडे यांचा अर्धा वांटा देणें. ऐसा विचार करून आह्मांशीं संधि करणें. तुह्मीं ऐसा निर्मलपणें संधि केलिया, आह्मी आपणापासून तुह्मांला तुंगभद्रेअल्याड पन्हाळेप्रांतें तीन लक्ष होनांची दौलत देऊं. अथवा आह्मांजवळील दौलत तुह्मांला मानेना, तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासून तुह्मांस तीन लक्षांची दौलत देऊं. असे दोनही विचार तुह्मांला लिहिले आहेती. या दोनहीमधील एक मनीं धरून मान्य करणें.

हट्टाचे हातीं न देणें. आपल्या आपल्यांत आपण कलह करावा आणि कष्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं. याउपरी तरी आमचा आपला संधि व्हावा ऐशी बुद्धि मनीं धरून वांटियाचा व्यवहार निर्गमून टाकणें, आणि सुखी राहणें. गृहकलह बरा नव्हे. आह्मीं रीतीनें वडीलपणें ह्याजवरी तुह्मांला सांगितलें, आतांही सांगतों. ऐकाल तरी बरें. तुह्मी सुख पावाल. न ऐकाल तरी तुह्मीच कष्टी व्हाल. आमचें काय चालतें? बहुत काय लिहिणें." (मोर्तब)

ह्याप्रमाणें शिवाजी महाराजांचें व्यंकोजी राजांस पत्र आलें. हें पत्र वाचून व आपली परिस्थिति पाहून, शिवाजी महाराजांशीं वैर करून आपलें चालणार नाहीं, अशी व्यंकोजी राजांची खात्री झाली. शिवाजीच्या सैन्याशीं टक्कर देण्याचें आपल्या सैन्यांत सामर्थ्य नाहीं; पुन्हां लढाई करण्याचा विचार करावा, तर सैन्याची नवीन उभारणी करण्यास पुष्कळ द्रव्य खर्च केलें पाहिजे. इतकें करून बंधुत्वांत विपर्यास; व शेवटीं वांटा दिला पाहिजे तो चुकत नाहीं. तेव्हां आतां काय उपाय करावा, ही व्यंकोजी राजांस फार मोठी चिंता उत्पन्न झाली, व ते अत्यंत उदासीन झाले. ही सर्व स्थिति अवलोकन करून, व्यंकोजी राजांची पत्नी दीपाबाई हिनें आपल्या पतीस हितबोध केला, आणि शिवाजी महाराजांसारख्या राज्यसंस्थापक, सामर्थ्यवंत, कीर्तिशाली व विजयसंपन्न बंधूबरोबर विग्रह न करितां त्यांस शरण जाऊन व धर्मन्यायानें जो वांटा देणें रास्त असेल तो देऊन, स्नेहभाव संपादन करावा हीच सर्वथा हितावह गोष्ट आहे, अशी विनंति केली. दीपाबाईची ही अत्यंत शहाणपणाची व सुविचाराची सूचना व्यंकोजी राजांस पसंत पडली; व त्यांनीं कादरखां, हिंमतखां, मनीरखां, राजेखां वगैरे मुसलमान सरदारांचे शिवाजी महाराजांबरोबर युद्ध करण्याचे विचार एकीकडे ठेवून, त्यांनीं शिवाजी महाराजांचे कर्नाटक प्रांतांतील मुख्य कारभारी रघुनाथ नारायण हणमंते ह्यांस भेटण्यासाठीं तंजावरास बोलाविलें. परंतु रघुनाथपंतांनीं, शिवाजी महाराजांच्या आज्ञेवांचून भेटतां येत नाहीं असें कळवून, महाराजांस व्यंकोजीराजांची इच्छा प्रदर्शित केली; व त्यांच्या भेटीस जाण्याबद्दल परवानगी मागितली. शिवाजी महाराजांचा, बंधुविरोध करून व्यंकोजी राजांचा छल करण्यांत कांहीं दुष्ट हेतु मुळींच नव्हता. तेव्हां त्यांनीं रघुनाथपंतांस तंजावरास जाऊन व्यंकोजी राजांस भेटण्याबद्दल परवानगी दिली. नंतर रघुनाथपंत चंदीहून तंजावरास गेले. तेथें त्यांची व्यंकोजी राजांनीं स्वागतपूर्वक भेट घेतली, आणि आपल्या हातून झालेल्या चुकीबद्दल त्यांची क्षमा मागून महाराजांचा व आपला सलोखा करून द्यावा ह्मणून त्यांची प्रार्थना केली. रघुनाथपंतही परम चतुर व भोसल्यांचे खरे हितचिंतक सेवक होते. त्यांना शिवाजी व

व्यंकोजी ह्यांचें सख्य होऊन महाराष्ट्रराज्याचा विस्तार व्हावा हीच सदिच्छा होती. त्यांनीं, मोठ्या विनयानें, व्यंकोजी राजांस शिवाजी महाराजांचें मानस कळवून व त्यांची योग्य रीतीनें समजूत करून देऊन, उभय बंधूंच्या वांटणीचा तह करून दिला. शिवाजी महाराज ह्या वेळीं पन्हाळप्रांतीं होते. तेथें सर्व कागदपत्र पाठवून त्यांच्या संमतीनें हा तह ठरावांत आणिला. ह्या तहाची यादी 'शिवदिग्विजय' बखरी-मध्यें दिली आहे. ती अस्सल कागदपत्रांवरून घेतलेली असून अतिशय महत्त्वाची असल्यामुळें येथें सादर करणें अवश्य आहे. ह्या तहामध्यें एकंदर एकोणीस कलमें आहेत. त्यांपैकीं कांहीं खाजगी व कांहीं राजकीय आहेत. ही यादी येणेंप्रमाणें:—

"१ सोइरे मानकरी यांचा बंदोबस्त माफक करून, अपमान होऊं न देतां, आदर ठेवीत जावा. कामांत वागवूं नयेत.

२ दरकदार मंडळी व कामदार यांचे इतल्याशिवाय कामकाज होऊं नये. बरी वाईट सल्ला विचारीत जावी. इतबारी असेल त्याजपासोन काम घ्यावें. परंतु लौकिकांत याचे हातीं कांहीं नाहीं असें दिसण्यांत येऊं नये. दरखांत खलेल करूं नये. भूषण देऊन चालवावें.

३ शागीर्दपेशा मंडळी चांगली, कुलीन, इमानी, इतबारी, पाहून, जामीन घेऊन जवळ बाळगावे. कृपेंत ठेवावे. बातमी सर्वां ठायींची राखावी. परंतु त्यांचें ऐकितात असें दुसरियास कळों न देतां, जरबेंत वागवून, नाजूक कामीं सर्व चाकरी घेत जावी.

४ शत्रुमित्राचे ठायीं संस्थानमाफक वकील व हरबातमींदार ठेवून, दुसरियास न समजतां, सर्व जागेंतील बातमी वरचेवरी येऊन पोहोंचत असावी. यास अंतर नसावें.

५ घरपागा, शिलेदार, पथकें, यांचें काम पाहून योग्यता ठेवावी. उगेंच घोडे माणूस हुशार राखावें. शिलेदार घोड्याघोड्याचे असतील, त्यांस पागा पेठ्यांत ठेवून त्यांची सरबरा करून, चाकरीचा राबता नित्य ठेवावा, ह्मणजे हुशारी राहाते. नाहीं तरी गाफिली येऊन, परचक्र आलें असतां नाश होतो. यास्तव पागा, तोफा वगैरे कारखाने सर्व कायम ठेवावे.

६ दुष्ट, दुरात्मे, निग्रही, हिंदुद्वेषी, चोरटे, चहाड, सोदे, फितवेकरी, दरवडेकरी, दावे-करी, मद्यपी, हिंसक, यांसी आपले राज्यांत ठेवूं नये. ठेविल्यास जामीनदंड घेऊन दिक हरकत होऊं नये, येविषयीं बंदोबस्त पक्का राखावा. याची गाफिली करूं नये.

७ अहदनामे, तह लहान थोरांशीं केले, त्यांचा तंटा पडूं नये. गोरगरीब अनाथ यांचा अभिमान धरून चालवावें. देववावें. हरकत न होय तें करावें.

८ धर्मादाय, देवस्थानें, अग्रहारें चालत आल्याप्रमाणें चालवीत जावीं. त्यांचा उच्छेद होऊं नये. बंदोबस्त चांगला ठेवीत जावा.

९ कजिया, तंटा, बखेडा, भाऊपणा, देणेंघेणें, वादी, फिर्यादी यांची पंचाईत

सोंपणें, बाजवी करणें, लांच न घेतां इनसाफ तोडणें, गोरगरीब यांचा अभिमानी सरकार, मायबाप, त्यांनीं मनावर घेऊन उलगडा करावा. त्याचा लोभ पैशाचा धरूं नये. धरला असतां वाईट.

१० वचनप्रमाण, अभय देणें, त्यांशीं पुन्हा दंडेली करणें, हें आपले कुलांत जालें नाहीं व पुढें होऊं नये.

११ किल्ले अरणी हा महाल वेदो भास्कर यांस पूर्वी महाराजांनीं दत्त दिल्हा आहे. त्यांस पुत्र आठ जण आहेत. त्यांचे उचितास येऊन चाकरीवरी राहिल्यास उत्तम. न राहिले ह्मणून महालास इजा चाकरीबद्दल ह्मणून उपद्रव देऊं नये. दोन रुपयांची लालूच ठेवूं नये.

१२ विजापुराकडून सनदी अंमल आहे. कांहीं दौलताबादकराकडून इकडे येतां, त्यांचा अंमल तहांत घेतला. त्याखेरीज जरबेनें कित्येक पाळेगार बसांत आणून, खास अंमल केला. त्यांत इजमायली जमेंत कमकसर आहे. तशी विजापुरकराकडे पांच हजार फौजेनिशीं चाकरी करावी लागते. त्यास पांच हजार फौजेनिशीं चाकरीचें कलम, आमचा त्यांचा तह जाला त्यांत आह्मी चाकरी करणार नाहीं, वख्तशीर मदत देऊं, इमानें इतबारें मेहेनत करूं, असें तीर्थरूप असतां ठरलें आहे. त्यास चाकरी तुह्मांकडे नाहीं. सबब, चाकरीबद्दल वख्तशीर काम लागेल त्या समयीं तुह्मीं फौज देत जावी. न दिल्यास त्याचा जाब तुह्मांस विचारूं. खर्च पडेल त्याचा पैसा घेऊं.

१३ वरघाटीं हिंगणी बेरडी, देऊळगांव वगैरे पाटिलक्या आहेत व देशमुख्या व नाडगौड्या वगैरे वडिलार्जित वतनें आहेत. त्याविशीं तुह्मीं बोलूं नये. आह्मी वहिवाटूं.

१४ वख्तशीर माणूस इकडील तिकडे, अगर तिकडील इकडे आल्यास, परस्पर संभाळोन, त्यांचा संतोष राखोन, समजूत करून, खुलासा करून जिकडील तिकडे सोंपावें. त्याविशीं हरकत करूं नये.

१५ परगणे बेंगरूळ आह्मीं सोडविलें, त्यास आसपास ठाणीं हासकोटें, व सिलेकोटें ऐसे तीन महाल, दोन लाख वराईचें उत्पन्न आज आहे. जमेवर आल्यास पांच लाखांपर्यंत उत्पन्नास येतील. त्यास आह्मीं आपले तर्फेनें चिरंजीव सौ० दीपाबाईस चोळी बांगडीस दिल्हे आहेत. त्यास याचा विभाग तुमचे वंशांनीं करूं नये. मुलींनीं परंपरा आपले खाजगी खर्चांत ठेवावें. त्याची चौकशी तुह्मीं राखीत जावी. सौभाग्यवती देतील त्यांणीं खावेत.

१६ चंदी प्रांतानजीक आह्मीं प्रांत सोडविला, त्यापैकीं सात लाख होनांचे महाल, चिरंजीव राजश्री व्यंकोजी राजे यांस दूधभाताकरितां इनाम परंपरेनें चालण्यास दिल्हे आहेत. त्यास त्यांची याद तुह्मी करून पाठवाल, त्याप्रमाणें मजुरा देऊं. सनद पाठवूं. अनुभवीत जाणें.

१७ तुमचा चोर आमचे राज्यांत आला, तरी तुमचा तुह्मीं मागितल्यास देऊं, तसा आमचेकडील हरामखोर आल्यास, तुह्मीं आमचे स्वाधीन करावयास अंतर करूं नये.

१८ महाराजांचे छत्रीकडे नेमणूक दरमाही चौघड्यासुद्धां तुह्मीं ठेवावी. थोडा हत्ती, कारकून असावे. येविशीं ढील होऊं नये."

येणेंप्रमाणें १८ कलमें व्यंकोजी महाराजांसंबंधाचीं आहेत, व एकुणिसावें कलम, कर्नाटकांतील शिवाजीचे कारभारी बहिरजी राजे ह्यांचेकडून, वडिलार्जित सेवक रघुनाथ नारायण हणमंते ह्यांस एक लक्ष होनांची जहागीर द्यावी, असेबद्दल आहे. ह्या तहाचा सूक्ष्म रीतीनें विचार केला, तर शिवाजी महाराजांच्या राजकारण-कुशलतेची तारीफ केल्यावांचून राहावत नाहीं. ह्या तहाच्या योगानें त्यांनीं, व्यंकोजी राजास आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या कक्षांत आणून, महाराष्ट्रराजसत्तेचें वर्चस्व त्यावर प्रस्थापित केलें, आणि कर्नाटक व महाराष्ट्र ह्या दोन्ही राज्यांचा एकजीव करून तंजावर प्रांतावरील विजापुरकराचें सार्वभौमत्व आपोआप नाहींसें केलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हा तह इ. स. १६७९ मध्यें झाला.

ह्याच समयास कर्नाटकामध्यें दुसरी एक राजकीय महत्त्वाची गोष्ट घडून आली. शिवाजीचें व गोंवळाकोंड्याच्या बादशहाचें सख्य होऊन, त्यांनीं विजापुरकरांचा दक्षिण कर्नाटकांतील मुलूख काबीज करण्याचा प्रयत्न चालविल्यामुळें, विजापुरचा दिवाण अबदुल करीम ह्यानें बादशाही सैन्याचा अधिपति दिलेरखान ह्याजकडे संधान लावून गोंवळकोंड्यावर स्वारी करण्याचा घाट घातला. परंतु गोंवळकोंड्याचा दिवाण मादण्णापंत ह्यानें मोठ्या दक्षतेनें निवडक सैन्यानिशीं टक्कर दिल्यामुळें ह्या संयुक्त सैन्यांस अपयश घेऊन पळ काढावा लागला. अर्थात् ह्या प्रसंगीं विजापुरच्या सैन्याची कमकुवत मोंगल सैन्यास कळून चुकली. तथापि, दिलेरखान ह्याचें व अबदुल करीम ह्याचें अंतस्थ रहस्य असल्यामुळें त्यांनीं विजापुरदरबारांतील दुफळी मोडून तेथील सैन्याची सुधारणा करण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. विजापुरच्या खजिन्यांत पैशाची टंचाई झाल्यामुळें विजापुरचे पुष्कळ लष्करी लोक औरंगजेबास व शिवाजीस जाऊन मिळाले. दरम्यान अबदुल करीम अतिशय आजारी पडला, व औरंगजेब बादशहास, दिलेरखानानें उत्कृष्ट संधि आली असतां विजापुर घेतलें नाहीं, ह्मणून त्याचा राग आला, व त्यानें विजापुरास वेढा घालून विजापुर हस्तगत करावें ह्मणून त्यास हुकूम फर्माविला. ह्या प्रसंगीं मसाऊदखान ह्मणून एक हबशी सरदार विजापुरचा मुख्य दिवाण झाला. त्यानें सैन्याच्या खर्चास वगैरे देऊन, विजापुरची बादशाही राखण्याचा थोडासा प्रयत्न केला. परंतु औरंगजेबाच्या हुकुमाप्रमाणें मोंगल सैन्य विजापुरावर चालून आलें व त्यानें शहरास वेढा दिला. मसाउदखान ह्यास आतां विजापुराचें रक्षण करणें कठीण वाटून त्यानें शिवाजीशीं सख्य केलें, व त्यास कोपाळ व बल्लारी यांचा

मधील प्रांत व द्रविड देशावरील व तंजावर आदिकरून शहाजीच्या जहागिरीवरील सर्व सार्वभौमत्वाचे हक्क देऊन, त्यास आपल्या साह्यास बोलाविलें. त्याप्रमाणें शिवाजीनें आपल्या निरनिराळ्या सरदारांच्या हाताखालीं सैन्य पाठवून मोंगल सैन्याचा पराभव केला, आणि मसाऊदखानाचें संकट निवारण करून विजापुरावरील वेढा उठविला. अर्थात् विजापुरच्या वजिरानें ह्या वेळीं शिवाजीचा गौरव करून त्याची समक्ष भेट घेतली व त्याचे उपकार मानून त्यास बादशहाच्या बरोबरीचे सर्व मान दिले. तेणेंकरून शिवाजी महाराजांचें वर्चस्व व महत्त्व विजापूरदरबारीं अधिक वाढून कर्नाटकप्रांतामध्यें त्यांचा जयजयकार विशेष झाला.

व्यंकोजी व शिवाजी ह्यांचें सख्य होऊन त्यानें शिवाजी महाराजांस अर्धा हिस्सा दिला. त्याची व इतर कर्नाटकांतून जिंकून घेतलेल्या प्रांतांची व्यवस्था शिवाजीचे सरदार पाहूं लागले. तेणेंकरून व्यंकोजीचें स्वातंत्र्य कमी झालें; आणि चोहोंकडून शिवाजीच्या पराक्रमी व कर्तृत्ववान सरदारांनीं सर्व सत्ता आकर्षून घेतल्यामुळें व्यंकोजी राजास मोठी मानहानि वाटूं लागली. तशांत विजापुरच्या बादशाही वजीरानें तंजावर प्रांताचें सर्व सार्वभौमत्व शिवाजीस दिल्यामुळें व्यंकोजीचा पुढेंमागें स्वतंत्र होण्याचा आशातंतू सर्वस्वीं नाहींसा झाला. त्यामुळें तो अत्यंत दुःखी व उदास झाला; आणि त्यानें सर्व राज्यकारभार सोडून देऊन वैराग्यवृत्ति स्वीकारिली. ही गोष्ट शिवाजी महाराजांचे कारभारी रघुनाथ नारायण हणमंते ह्यांनीं शिवाजी महाराजांस कळविली. शिवाजी महाराजांस जरी हिंदुपदपादशाहीचें सार्वभौमपद प्राप्त झालें होतें, तरी आपल्या बंधूची अशी शोचनीय स्थिति व्हावी अशी बिलकूल इच्छा नव्हती. व्यंकोजी राजाचें हें उदासीन स्थितीचें वर्तमान समजून त्यांस फार खेद वाटला, व त्यांनीं मोठ्या कळकळीनें त्यास एक उपदेशपर पत्र पाठविलें. हें पत्र शिवाजी महाराजांच्या थोर अंतःकरणाचें व बंधुप्रेमाचें एक उत्कृष्ट चित्र असून, तें आह्मांस अस्सल उपलब्ध झाल्यामुळें तें येथें सादर केल्यावांचून आमच्यानें राहावत नाहीं. हें पत्र* येणेंप्रमाणें:—

श्री.

"श्रियासह चिरंजीव अखंडित–लक्ष्मी–अलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज व्यंकोजीराजे प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद. येथील क्षेम

* हें पत्र बाळाजी आवजी चिटणीस ह्यांच्या हातचें आहे. ह्याचे शब्दशः भाषांतर ग्रँट डफ साहेबांनीं आपल्या इतिहासांत दिले असून ह्या पत्रासंबंधानें असें ह्मटलें आहे:—"On this occasion Sivajee addressed a letter to him, full of energy and good sense. This letter was amongst the last that Sivajee ever dictated." ह्यावरून ह्या पत्राची योग्यता किती आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

जाणोन स्वकीय कुशल लेखन करणें. विशेष:—कितेक दिवस जाले, तुमचें पत्र येत नाहीं. याकरितां समाधान वाटत नाहीं. सांप्रत राजश्री रघुनाथपंतीं लिहिलें कीं तुह्मीं आपले ठायीं उदासवृत्ति धरून पहिलेसारखे आपलें शरीर संरक्षण करीत नाहीं. सणवार उत्सवादिक हेंही कांहीं करीत नाहीं. सेना बहुत आहे. परंतु उद्योग करून कार्यप्रयोजन करवावें हेंही कांहीं करीत नाहीं. वैराग्य धरिलें आहे. एखादे तीर्थीचें बसून कालक्रमणा करूं, ऐशा गोष्टी सांगतां ह्मणोन विस्तारें लिहिलें होतें. तरी या गोष्टी आह्मांस बहुत अपूर्व वाटल्या कीं कैलासवासी स्वामींनीं कसे कसे प्रसंग पडले ते निवाह करून, यवनांच्या सेवा करून, आपल्या पुरुषार्थें बाजी संवारून, उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला. तें सर्व तुह्मी जाणतां. त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धियुक्ति सर्वही तुह्मांस उपतिष्ठोन त्यापासून शहाणे जाले आहां. त्याउपरी आह्मींही जे जे प्रसंग पडले, ते निर्वाह करून कोणे तऱ्हेनें राज्य मिळविलें, हें जाणतां व देखत आहां. असें असोन तुह्मांला ऐसा कोणता प्रसंग पडला जे इतक्याचमध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून, नसतें वैराग्य मनावरी आणून, कार्यप्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकांहातीं रिकामेपणीं द्रव्य खाऊन, नाश करवणें व आपल्या शरीराची उपेक्षा करणें. हें कोण शहाणपण व कोणती नीति ? व आह्मी तुह्मांस वडील मस्तकीं असतां चिंता कोणे गोष्टीची आहे ? याउपरी सहसा वैराग्य न धरितां मनांतून विषण्णता (काढून) कालक्रमणा करीत जाणें. सणवार उत्साह पूर्ववत् करीत जाऊन तुह्मीं आपलें शरीरसंरक्षण बरें करीत जाणें. जमेती सेवक लोकांना रिकामे न ठेवून, कार्यप्रयोजनाचा उद्योग करून, त्यांपासून सेवा करून, पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. तुह्मी त्या प्रांतें पुरुषार्थ करून संतोषरूप असलिया, आह्मांस समाधान व श्लाघ्य आहे कीं कनिष्ठ बंधु असे पुरुषार्थी आहेती. रा. रघुनाथ पंडित त्या प्रांतें आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन. तुह्मांसीं कोणे रीतीनें वर्तावें हें निपुण जाणितात. आह्मांस मानितात तैसें तुह्मांस मानितात. आह्मीं त्यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे. तैसा विश्वास तुह्मींही ठेवून, कार्यप्रयोजनास परस्परें अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. रिकामे बैसोन, लोकांहातीं नाचीज खाववून, काल व्यर्थ न गमावणें. कार्यप्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडें. आज उद्योग करून आह्मांसही तमासे दाखविणें. बहुत काय लिहिणें. तुह्मी सुज्ञ असा." (मोर्तब. मर्यादेयं विराजते.)

ह्या पत्रांमध्यें जी प्रेमळ, प्रोत्साहक आणि जोरदार भाषा वापरली आहे, तिचा परिणाम कोणाच्याही अंतःकरणावर झाल्यावांचून राहणार नाहीं. मग व्यंकोजी राजे तर शिवाजी महाराजांचे प्रत्यक्ष सापत्न बंधु होते. त्यांना ही शिवभूपतीची दिव्य वाणी वाचून, त्यांच्या हृदयांत सुविचार उत्पन्न झाला असेल, ह्यांत कांहीं नवल नाहीं. असो. हें पत्र लिहिल्यानंतर लवकरच, ह्मणजे ता. ५ एप्रिल इ. स. १६८० रोजीं, छत्रपति शिवाजी महाराज रायगड येथें मृत्यु पावले, व महा-

राष्ट्रामध्यें मोठा हाहाःकार उडाला. ह्यानंतरच्या महाराष्ट्राच्या घडामोडीशीं कांहीं कालपर्यंत तंजावरच्या इतिहासाचा संबंध नाहीं.

शिवाजी महाराज मृत्यु पावल्यानंतर व्यंकोजी राजे ह्यांनीं तंजावर येथें अवघें तीनचार वर्षेंच राज्य केलें. व्यंकोजीच्या कारकीर्दींतील मुख्य गोष्ट ह्मणजे कर्नाटक प्रांतावरील शिवाजीची स्वारी व तंजावरावर मराठ्यांचें सार्वभौमत्वसंस्थापन ही होय. व्यंकोजी राजाच्या कारकीर्दींत ह्यापेक्षां अधिक महत्त्वाची दुसरी गोष्ट घडून आल्याचें इतिहासांत प्रसिद्ध नाहीं. व्यंकोजी स्वभावानें मानी असून स्वतःच्या वैभवाचा व जहागिरीचा विशेष तोरा बाळगणारा होता. त्याच्या अंगीं शौर्य व साहस हेही गुण कमी नव्हते; परंतु त्याचा सर्व जन्म मुसलमान बादशाहीच्या सेवेंत गेल्यामुळें स्वातंत्र्याचें व स्वाभिमानाचें पाणी त्याच्या अंगामध्यें विशेष खेळत नव्हतें. त्याचे सल्लागार व प्रधानमंत्री कित्येक मुसलमान सरदार असून त्यांच्या तंत्रानें तो वागत असे. त्याच्यामध्यें स्वाभिमानाची उच्च कल्पना असती व त्यास शिवाजीच्या स्वराष्ट्रसंस्थापनेचें उदात्त तत्व कळलें असतें, तर त्याजमध्यें व शिवाजीमध्यें विरोध उत्पन्न झाला नसता. असो. व्यंकोजी राजानें तंजावरचें राज्य जिंकून तेथें मराठ्यांची स्वतंत्र गादी उभारली, हीच त्याच्या शौर्यपराक्रमाची निदर्शक गोष्ट आहे. तंजावर येथें त्यानें नुसती गादीच संस्थापित केली नाहीं, परंतु त्रिचनापल्ली, मधुरा व रामनाद वगैरे ठिकाणच्या नायक राजांना त्यानें आपल्या पराक्रमाच्या जोरावर बिलकूल वर डोकें काढूं दिलें नाहीं. तंजावरच्या शिलालेखांत असें लिहिलें आहे कीं, त्यानें एक वेळ त्रिचनापल्लीच्या नायक राजाच्या मदतीस जाऊन त्याजकडून सोंदल महाल मिळविला. असो. शिवाजीशीं सख्य झाल्यानंतर व्यंकोजीनें स्वतःच्या राज्यकारभारांत लक्ष घालून प्रजेस सुखी करण्याचा प्रयत्न केला असावा असें दिसतें. कारण, इ. स. १६८० नंतर व्यंकोजीनें कोणाबरोबर लढाई केल्याचा उल्लेख आढळत नाहीं. एकंदरींत व्यंकोजीनें तंजावर येथें मराठ्यांची स्वतंत्र गादी स्थापन करून व चांगला राज्यकारभार करून, द्रविड देशाच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर केलें, ह्यांत शंका नाहीं.*

---

*कर्नाटकचे इतिहासकार कर्नल म्याकेंझी ह्यानें व्यंकोजीच्या तंजावरावरील स्वारीचें विवेचन करितांना पुढील प्रशंसापर उद्गार काढले आहेत, ते वाचण्यासारखे आहेतः—

"Whatever might be the exciting causes of Ekojee's expedition to Tanjore, it was conducted with an address and decision highly favourable to his reputation as a stateman and warrior; though he appears immediately after to have relinquished the last, for the more pacific occupation of



**राजा शहाजी.**

( व्यंकोजीचा वडील पुत्र व तंजावरचा दुसरा राजा )

आहेत, खर्च किती, पावलें काय, व त्यांचा नाश येथें किती जाहला, तो सर्व पर्याय ध्यानांत आहे; व विनंतीही पहिलीच केलेली आहे. सर्व समजोन कृपा करोन, संतोषपूर्वक जात, अशी रवानगी करणार स्वामी समर्थ असेत. विस्तारें सेवकानें ल्याहावेंसें नाहीं. कदाचित् लष्करांत त्यांस नेण्याविषयीं मर्जी असल्यास, त्यांस येथें राहाण्यामुळें चार रुपये लोकांचें देणें घेणें जहालें आहे; ऐशास सरकारांतून परामर्ष करणें. त्याची आज्ञा येथेंच स्वामींनीं लेहून करविलें ह्मणजे देणेघेण्याचा निर्वाह करोन सेवेसी येतील. सर्व हरद स्वामींचे लक्षांत आहे. सूचनार्थ विनंति लिहिली आहे."

## लेखांक ६.

**श्री.** ता. ५ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी विज्ञापना:-राजश्री नारायणराव वकील गोंवेंकर यांची सून वारली ह्मणोन त्यांजकडे समाचारास गेलों होतों. त्यांनीं विनंती ल्याहावयास सांगितली कीं, फिरंगी यांजकडे कलमबंदी मसलतप्रकरणीं पहिली पाठविली, व मागाहूनही लष्करांतील उत्तरें त्यांस लिहिलीं. त्यांचा जाब, अद्याप मार्ग ठीक नाहीं, याजमुळें आला नाहीं. तो येईल. परंतु मनसब्यानें दिसतें कीं, सडें घाटमाथां ठिकाण होतें, तें टिपूचे लोकांनीं घेऊन घाटमाथां राहिले. खालीं तालुका फिरंगी व सांवतांचा. तेव्हां सहजच घाटाखालीं नाकेबंदी मजबुती आपले तर्फेनें आपले सरदेवर फिरंगी यांस करणें प्राप्त. सन्निध गनीम. त्याचा पायबंद असतां त्याचे मुलखावर मसलत करोन जावयास जमावाची सोय कशी बनेल, याचा विचार पडला असेलसें वाटतें.* ह्मणोन स्वामींस ल्याहावयास सांगितल्यावरोन लिहिलें आहे. विजयदुर्गचे बातमींत घाटाखालीं उतरला ह्मणोन वर्तमान आहे. त्यास गोंव्याहून अद्याप लिहिलें आलें नाहीं, आणि घाटाखालीं उतरेलसें वाटत नाहीं. घाटावरच आहे. तेव्हां घाटाखालोन फिरंगी सावंत एक जाले आणि घाटावरोन उपराळेयास फौज घाटावर सरकारची सडें यासन्निध गेली, तर खालोन फिरंगी सावंतांनीं घाट चढावा. वर सरकारची फौज असावी.

* ह्यास प्रत्यंतर पुरावा पोर्तुगीज लोकांच्या इतिहासांतही आढळून येतो. पोर्तुगीज लोकांस मराठ्यांचें हें मागणें वस्तादगिरीचें वाटलें व त्यांनीं मदत करण्याची टाळाटाळ केली व आपल्या सरहद्दीवर सैन्य ठेविलें असें मि० डान्व्हर्सही लिहितात:-

"Earlier in the year an ambassador had arrived at Goa, from the Mahratta, to propose that the Portuguese forces should join those of the Mahratta and of the Bounsulo, in order to levy war against the Nabob. This offer was, however, declined, as it was suspected that the proposal was only a cunning device of the Mahratta to get possession of Bicholim and Parnem. The Captain-General therefore marched troops to the frontier for the defence of those parts in case of an attack."

—*The Portuguese in India. Vol. ii. P. 446.*

असें जाल्यानें तेथोन गनीम उधळोन जाईल, आणि फिरंगी यांचा जमाव मोकळा होऊन, पहिला विचार ठरला आहे, त्या मसलतीस उपयोग पडेलसें माझे विचारें दिसतें. यांतील अर्थ स्वामींनीं ध्यानांत आणोन, आज्ञा जाल्यास नारायणरायांसी बोलोन गोंव्यास जलद लेहून पाठवूं. गनीम सन्निध त्यापक्षीं सांवत फिरंगी एक होतील. कदाचित् राजश्री जिवाजी गोपाळ कोंकणांतोन रवाना होणार, ते घाटावरोनच व दुसरी कांहीं फौज मिळोन घाटावरच रवाना जाले. तरी फिरंगी व सांवत घाटाखालोनच पुरतील असा विचार आहे. मर्जीस येईल ती आज्ञा लौकर लिहिली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक ७.

पैवस्ती चंद्र १३ जमादिलावल. **श्री.** ता. ८ मार्च इ. स. १७८६.

''सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेषः—आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं टिपूचे मसलतसंबंधीं कलमबदीच्या यादी फिरंगी यांजकडे गेल्या आहेत. तें त्यांस कबूल होतें न होतें ह्याचें उत्तर कळत नाही तर लौकर उत्तर आणून त्याहावें, व सरकारांतून राजश्री होळकर व गणेशपंत बेहेरे घाटावरोन फौजसुद्धां, टिपूचा जमाव कितुरावर आहे, त्याजवर रवाना केले असेत. घाटाखालोन राजश्री जिवाजी गोपाळ रवाना जाले आहेत. त्यास फिरंगी सांवत एक होऊन, सामील होऊन, टिपूचे प्रातावर जावें. असें होत असल्यास राजश्री नारायणराव वकील गोवेंकर यांसीं बोलोन फिरंगी यांस लेहवावें, व नारायणराव जाबसाल करितील तो लष्करांत लिहिणें, ह्मणोन आज्ञा. त्यास पहिले यादीचें उत्तर फिरंगी यांजकडील नारायणराव यांस आलें. त्या पत्राचीच नक्कल करोन सेवेसी पाठविली आहे. त्यांतील भावः-कलमबंदी येथोन लेहून गेली, ती त्यास कबूल नाहीं. अधिक उणे बोलणें, कलमबंदीशिवाय, ती याद लेहून पाठविली आहे. त्याजवरोन ध्यानास येईल. अधिक बोलणे सरकारांत मान्य करावयाजोगतें नाहीं, त्यापक्षीं तो कारभार राहिलासा दिसतो. तथाप नारायणरावासमक्षच त्यांसी बोलोन पाहतील. त्यांत जीव पडेसा असल्यास सेवेसी सविस्तर लिहितील. नंतर जशी आज्ञा होईल तसे करावयाचें. मशारनिल्हेस याच जाबसालाकरितां ठेऊन घेतले होते. त्या जाबसालाचा अर्थ समजला. त्या पक्षीं नारायणरायांस निरोप द्यावयाचा. लष्करांत नेऊन समक्ष निरोप द्यावयाची मर्जी असल्यास, लष्करांत येण्यास ते गैरसरंजामी. सरकारांतून ओझ्याचें वगैरे साहित्य द्यावें लागेल. ते लष्करांत येण्यासही सिद्ध आहेत आणि पुण्याहूनच निरोप देवावयाची मर्जी असल्यास, निरोपसमयीं बहुमानवस्त्रें वगैरे द्यावयाचीं, काय परामर्ष खर्चाविषयींचा करणे त्याची आज्ञा, राजश्री अमृतराव पेठे यांस जाहली ह्मणजे येथोनच निरोप देतील. खर्चाविषयींचे परामर्षाचा विस्तारें करोन अर्थ पहिले विनंतीपत्रांत लिहिला आहे. साडेआठ वर्षांत हजार रुपये पावले आहेत. पांचशें

रुपये दरमहा द्यावयाचा करार होता. सरकारचाकरी त्यांनीं केली व त्यांचा खर्च व नाश जाहला तोही ध्यानांत आहेच. सर्व अर्थ समजोन आज्ञा जाहली पाहिजे. पुढेंही त्या दरबारीं चाकरीचे उपयोगी व उमेदवार आहेत. माणूस प्रामाणिक, चांगले, सरकार-लक्षांतील. बहुमान निरोपसमयीं करणें तो खासे व चिरंजीव व कारकून दोन असाम्या. खाशांस वस्त्रें साडेतीन दसरेयाचीं पावत असतात. जवाहीर दागिना शिरपेंच द्यावयाची आज्ञा व्हावी. त्यांनीं सरकारांत लग्नसमयीं शिरपेंच वगैरे नजर केलें आहे. स्मरणार्थ सूचना केली असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ८.

श्री.

"गोंव्याहून कलमबंदीचीं उत्तरें आलीं. किरकोळ जाबसाल आगळे उणे पहिल्या व दुसऱ्या कलमांत आहेत. त्याचें फारसें नाहीं. मुख्य तिसऱ्या कलमांत तपशील व चवथ्या व पांचव्या. बाकी कलमांत कांहीं कांहीं आहे.

हजरद इस्ताद भारी खर्च करून, पंत प्रधान यांस अनुकूल होऊन, मुलूख किल्ले काबीज करावे, आणि पैका खर्चाचा घ्यावा हें योग्य नाहीं. याकरितां उभयपक्षीं मुलूख किल्ले काबीज करितील, त्यांपैकीं संवदे प्रांत, लांबी तीस कोस व रुंदी तीस कोस, हें राज्य इस्तादाकडे असावें. कां तर, तेथील राजे इस्ताद यांकडे आहेत. त्यांचें चालवितात म्हणून. याखेरीज पंतप्रधान स्नेहममतेकरून देतील तें घेऊं. वरकड राज्य किंवा किल्ले काबीज होतील ते पंतप्रधान यांचे हें त्या कलमांतील रहस्य आहे.

पंतप्रधान यांस खंडणी घेऊन टिपूसीं तह करणें प्राप्त. घेतलेला मुलूख व किल्ले माघारा द्यावे असें ठरल्यास, इस्ताद घेतलेले किल्ले व मुलूख माघारा देतील. पंतप्रधान यांकडून सदरहू खंडणीची चौथाई घेऊं.

पंतप्रधान यांस खंडणी न घेतां, टिपूसीं घेतलेला मुलूख व किल्ले माघारे देऊन तह करणें प्राप्त जहाल्यास, इस्तादखर्च मागणार नाहीं. परंतु मुलूख व किल्ले आपण काबीज करितील, ते माघारे देणार नाहींत. येणेंप्रमाणें मुख्य कलमें तीन आहेत. कळावें."

## लेखांक ९.

पैवस्ती चंद्र १३ जमादिलावल. श्री. ता. ८ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र ७ जमादिलावल-पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं, कितूर प्रांतीं टिपूकडील फौज आहे. त्यांचे पारिपत्यास राजेश्री तुकोजी होळकर व गणेशपंत बेहेरे जात आहेत. कोंकणांतून रा. जिवाजी गोपाळ येतील. त्यास फिरंगी व सांवत एक होऊन, जिवाजीपंतांबरोबर कितूरप्रांतीं घांट चढून यावें आणि टिपूचे फौजेचें पारि-

पत्र व्हावें, येविसीं रा. नारायणराव वकील गोंवेंकर यांसी बोलोन, असें होत असल्यास त्यांजकडोन फिरंगी यांस लिहिवावें, व नारायणराव काय उत्तर करितात हें लकरांत लिहून पाठविणें ह्मणोन आज्ञा. त्याजवरोन आज्ञेप्रमाणें मशारनिल्हे नारायणराव यांसीं बोललों. त्यांचे विचारास ही गोष्ट येऊन, 'उत्तम आहे. मी फिरंगी यांस लिहितों.' ह्मणोन उत्तर करोन वरचेवर गोंव्यास पत्रें आज्ञेप्रमाणें रवाना केलीं. फिरंगी यांस मान्य जाल्यास, तसेंच परभारें फिरंगी यांनीं रा. गणेशपंत यांस सूचना लिहावी. आणि आपण जमावासुद्धां घाटावर जावें, ह्मणजे दिवसगत लागणार नाहीं; याप्रमाणें वकिलांनीं फिरंगी यांस लिहिलें आहे. त्याचे विचारास काय येईल तें येऊ. वरकड पहिले कलमबंदीचे यादीचें उत्तर फिरंग्यांनीं लिहिलें, त्या मजकुराचें पत्र अलाहिदा लिहिलें आहे. त्याजवरोन ध्यानास येईल. कलमबंदीचे यादींत दिकती त्यांनीं घेतल्या आहेत. त्याजवरोन अर्थ दिसतो कीं, त्यांचे मनांत कुमक करावयाची नाहीं. मदतीस येत नाहीं स्पष्ट ह्मणावें, त्यापक्षीं कलमांत दिकती काढाव्या. सरकारांत अशीं कलमें कबूल होणार नाहींतच, या भावानें दिकती लिहिल्या आहेतसें वाटतें. नारायणरायांस जाब लिहिला आहे, त्यांत शेवटीं तोडून लिहिला नाहीं. 'आह्मीं दिकती काढिल्या आहेत, तथापि श्रीमंतांची निदान मर्जी काय आहे ती पुसोन उत्तर कळवावें,' ह्मणोन खालीं लिहिलें आहे. परंतु त्यांत जीव दिसत नाहीं. याजवरोन कितूर प्रांतीं गणेशपंतांबरोबर फिरंगी उपयोगी कदाचितच पडेलसें दिसतें. सविस्तर ध्यानांत यावें ह्मणोन विनंति लिहिली असे. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना."

## लेखांक १०.

पैवस्ती चंद्र २९ जमादिलावल. श्री. ता. १३ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १२ जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र ६ जमादिलोवलचें आज्ञापत्र सादर जालें. तेथें आज्ञा कीं, टिपूचे मसलतीस फिरंगीयांनीं उपयोगीं पडावें, त्यास हल्लीं दर्यांतून गलबतें फिरावयाचीं राहिलीं तर चिंता काय? खुषकीनें पलटणें बाहेर काढोन, सरकारचे फौजेस सामील होऊन मसलत करावी. तालुक्याचें रक्षण होऊन मसलत कशी होईल असें तुह्मीं लिहिलें होतेंत. त्यास सरकारचे फौजेचा शह बसला, तेव्हां तालुक्यास उपद्रव काय लागणार? व असे अंदेशानें मसलत काय होणार? सरकारची गोंवेंकरांची दोस्ती. त्यांनीं उपयोगीं पडावें हें चांगलें. तुह्मीं राजश्री नारायणराव यांसी बोलोन लेहून पाठवावें ह्मणोन आज्ञा. त्यांस पूर्वी स्वामींनीं नारायणराव यांस आज्ञा येविषयींची केली, तेव्हां खुषकीनें फिरंगी यांचे पलटणाचा खर्च भारी, व भारबारदारी[१], उंटें, घोडीं, बैलसरंजाम फार लागतो. तें ठीक नाहीं. यास्तव घाटाखालीं टिपूचे कोंकणप्रांतीं बंदरकिनारे वगैरे जागां खुषकीनें व जलमार्गें फिरंगी यांनीं स्वतंत्र मसलत

१ भारबारदारी=ओझें वाहणारे लोक, मजूर वगैरे.

कबूल करोन, जाऊन काम बजावावें ऐसें बोलणें होऊन, त्या तऱ्हेचे कलमांची याद कलमबंदीची लिहिली. ती याद मीं लष्करांतून येतेसमयीं स्वामींजवळ दिली आहे. पाहिलेयावर मजकूर ध्यानांत येईल. तेव्हां त्या मसलतीस गैरहंगाम जंहाला. हल्लीं स्वामींचे आज्ञेंत, सरकारचे फौजेंत सामील खुषकीनें होण्याचा मजकूर, तो नारायणराव यांजपाशीं बोललों. त्यांनीं विनंति ल्याहावयास सांगितली कीं, 'फिरंगी रोजमरा घेऊन पलटणें देत नाहींत; तेव्हां त्यांनीं कलमांचे लढे काढिले. त्यांची याद सेवेसी पहिली पाठविली आहे. ती मनन करोन, त्यांतील कमजास्त कांहीं मान्य करावयाची मर्जी असल्यास समजली पाहिजे, व खुषकीनें, भारबारदारी ओझ्याची बेगमी फरासखानासुद्धां उटें, घोडीं, बैल, छकडे, गाडे वगैरे तोफखान्यास साहित्य लागेल, त्या देखील याची सोय पाहून आज्ञा ल्याहावी. येथोन फिरंगी यांस लिहितों. ते एकेक दिक्कती काढोन उत्तरें लिहितात. मागतीं त्यांचे जाब येथोन ल्याहावे याखालींच दिवस जातात. अवकाश राहिला नाहीं. यास्तव मलाच निरोप द्यावा. मी समक्ष जाऊन, कळेल तसें बोलोन, समजावून, होतें कीं नाहीं असें पक्केपणें पाहून, बनतसें असोन थोडी बहुत दिक्कत आढळली, तर तसेंच स्वामींस लिहीन; ह्मणजे घडावयाचें असल्यास लौकरच उपयोग पडेल. नाहीं तर एक नाद तरी तुटेल. फिरंगी यांचे लिहिण्यांत नाद तोडीत नाहीं आणि अमलांतही येत नाहीं. यास्तव मला आज्ञा जाहल्यानें लौकर काय तें ठरावीन. सहस्र प्रकारें सरकारचाकरीस माझा प्रयत्न चालेल तो चुकणार नाहीं.' असें मशारनिल्हेंनीं उत्तर केलें. याचा विचार करोन लौकर काय ती आज्ञा सादर झाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ११.

पैवस्ती चंद्र २४ जमादिलावल. **श्री.** ता० २० मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ११ मिनहूचें आज्ञापत्र सादर जाहलें, तेथें आज्ञा कीं, राजश्री नारायणराव वकील गोंवेंकर यांचें मानस जावयाचें आहे, त्यापक्षीं निरोप देवावा; व फिरंगी यांनीं सरकारमसलतीचे उपयोगीं पडावें; जलमार्गें गैरहंगाम जाहला तर खुषकीनें सरकारचे फौजेस सामील व्हावें; राजश्री जिवाजी गोपाळ रवाना जाहले आहेत, यांस मिळावें; याअन्वयें नारायणरायांसीं बोलावें आणि निरोप देवावा ह्मणोन आज्ञा. त्याजप्रमाणें मशारनिल्हे यांजपाशीं बोललों. त्यांचीं उत्तरें झालीं, तीं येणेंप्रमाणें कलमें:–

आपले जाण्याविषयीं सरकारचा निरोप देण्याचें ठरलें. अतःपर गोंव्यास लेहून तेथील उत्तर आणवून, सरकारचा निरोप घेऊन जाऊं. मध्यें जातां नये, यास्तव त्यांनीं आपले कुटुंबाचे रवानगीची सिद्धता केली आहे. आपण तिकडील उत्तर आलें ह्मणजे जाणार. कलम १.

गोंव्यास मशारनिल्हेस जाणें, त्यास हे सरकारांत आले तेव्हां फिरंगी यांचीं पत्रें व वस्त्रें सरकारांत आणिलीं आहेत. हल्लीं हे जातात, तेव्हां सरकारांतून निरोप देऊन तुह्मांकडे रवाना केले असेत, ह्मणोन सरकारचें पत्र व फिरंगी यांस त्यांचीं आलीं त्याचे मुबदला वस्त्रें, ऐशीं यावीं ह्मणतात. येविषयींची आज्ञा राजश्री अमृतरायांस जहाली पाहिजे. कलम १.

फिरंगी यांस जलमार्गाचा गैरहंगाम, त्यापक्षीं खुषकीनें यावें. त्यास खुषकीनें आल्यास ओझ्यास सरंजामास तोफखान्यासुद्धां भारी लागतो. हें पहिलें बोलणें यांत आलें होतें, व अलिकडे स्वामींस पुन्हां विनंती लिहिली आहे. त्याचा विचार होऊन आज्ञा येईल, त्याप्रमाणें फिरंगी यांसी बोलोन ठरेल तें सेवेसी लिहितील.

कलम १.

नारायणरायांनीं सरकारचे जाबसाल महतीचे वगैरे आज्ञेप्रमाणें फिरंगी यांसीं बोलोन माघारें सरकारांत यावें,अशी मर्जी सरकारची असल्यास, फिरंगी यांचे पत्रीं, कित्येक जाबसाल सरकारचे व तुमचे नारायणरायांस सांगोन, निरोप देऊन तुह्मांकडे पाठविले आहेत; त्यास जाबसालाचे मजकुराचीं उत्तरें सांगोन मशारनिल्हेस पुन्हां सरकारांत लौकर रवाना करावें ह्मणोन, पत्रांत मर्जी सरकारची असल्यास त्याहावयाचें स्मरणार्थ.

सदरहूप्रमाणें विदित व्हावें. याचें उत्तर येईल त्याप्रमाणें त्यांस सांगोन, निरोप-समयीं सरकारांतून करावयास बहुमानवस्त्रें व शिरपेंच यावयाचें लिहिलें तें उत्तम आहे. खर्चास चार हजार रुपये यावयाची आज्ञा. ती सूचना मशारनिल्हेस केली. त्यास सर्व अर्थ हैरद्र[1] आपले श्रीमंतांस माहीत असोन चार हजार रुपये देविले. त्यानें आपला निर्वाह—येथील सावकारी देणें जाहलें त्याचा देखील—होत नाहीं. त्यापक्षीं श्रीमंतांची कृपादृष्टि आहे ती पूर्ण असावी. गोंव्याहून ऐवज आणवून येथील सावकारापासून मुक्त होऊन निरोप घेऊन जाईन. याप्रमाणें उदासपणानेंच उत्तर केलें. श्रीमंतांस विनंति याप्रमाणें निक्षून त्याहावी ह्मणोन त्यांनीं सांगितल्या-वरोन विनंति लिहिली आहे. सर्व अर्थ वारंवार त्याहावेंसें नाहीं. ध्यानांतच आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. नारायणरायांनीं विनंतीपत्र लिहिलें तें सेवेसी पाठविलें आहे. त्याचे उत्तरांची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. हे विज्ञापना.”

ह्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें नारायणराव ह्यांनीं लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें:—

१ हैरद्र=अंतःकरणांतलें गुह्य.

# लेखांक १२.

श्री. ता. २० मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी नारायण विठ्ठल धुमे साष्टांग नमस्कार विज्ञापना चंद्र १९ जमादिलावल तागाईत सेवकाकडील वर्तमान यथास्थित असे. विशेषः—आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें तें कळलें. तेथें आज्ञा कीं, गोंवेंकराकडील मजकूर बहिरोपंतांसी बोलिला, तो त्यांनीं लिहिला तो कळला. त्यास तुमचे बोलण्यांत तों बरेंसें दिसत होतें. हल्लीं असें कसें बोलतां ह्मणून तर मी खुद्द खावंद नव्हे, हें स्वामींस कळलेंच आहे. सरकारची सेवा करून दाखवावी हा हेतु. लहान थोर जेंहाला तरी दरबार आहे. कामाकाजा उरकोन यावीं, तीं उगीच कशीं येतात? मी येथें लिहून माझ्याच ह्मणितल्यासारिखें सारेंच मान्य कसें होतील? मागां सेवा करून दाखविली. खर्च मज पडला नाहीं असें नाहीं. राजश्री तात्यांस तेव्हांच दखलही केलें. हल्लीं खर्चा-खालीं आलेमुळें मजकडे पण काय आहे? स्वामींचा निरोप आला असतां कर्ज फारीक करून जावें हें योग्य. ह्मणून माणसांची रवानगी करून मी प्रस्तुत राहिलों आहें. तेव्हां त्यास गोष्ट मानेना. जाबसाल आले. स्वामींस कळविलें. फिरून उत्तरें दोन तीन वेळ लिहिल्याचीं आलीं. तींही राजश्री बहिरोपंत यांस सांगितलीं. त्यांनीं सेवेसी लिहिलीं असतील. त्यांचा जाबसाल स्वामींनीं कांहींच केला नाहीं, आणि गरीब नारायणरावावर शब्द ठेवितां, तो अंगिकार करावयास मी योग्य आहें. याउपर प्रांतीं जाईन तेव्हां समक्ष बोलून होईल तेथवर पैगम करीन. सेवा करावी हा हेतु आहे. जाहल्यास सेवकापासून अंतर होणार नाहीं. 'तुह्मीं निरोपाचें लिहिलें, त्यास उत्तम आहे. तेविषयीं बहिरोपंतांस लिहिलें आहे. ते तुह्मांसी बोलतील' ह्मणून आज्ञा. त्यास राजश्री बहिरोपंत बोलिले. उत्तरही करावयाचें केलें. सेवेसी निवेदन करितील. सेवकावर कृपा असावी ही मुख्य विनंति आहे. 'राजश्री जिवाजी गोपाळ यांची रवानगी विजयदुर्गाकडे केली आहे. त्यांचे मदतीस गोंवेंकरांनीं जावें याप्रमाणें घडेसें करावें.' ह्मणून आज्ञा. उत्तम आहे. परंतु मागील पुढील बोलणीं होऊन चुकलीं, त्याचें स्मरण करून राजश्री बहिरोपंतांसीं बोलिलों. आहूं फिरंगी लोक. त्यांच्या मातबऱ्या व चाली स्वामींस सर्व विदित आहेत. तेव्हां उगेच एकाएकीं जिवाजीपंताबरोबर युद्धाचे मदतीस तुह्मी चला, असें खावंदांस लिहून योग्य मी, असें स्वामींच्या ध्यानास आल्यास, मज आज्ञा प्रमाण आहे. 'तुह्मी फिरंग्यांकडील जाबसालांत असतां जाबसाल आला नाहीं. अपूर्व आहे.' ह्मणून आज्ञा. तर जाबसाल आले. मीं राजश्री बहिरोपंतांस कळविलें. कलमाची नक्कल देखील करून मी स्वामींकडे

१ दखल=माहित, विदित. २ कर्ज फारीक करणें=वारणें, निकाल करणें. ३ पैगम=बोलण्याचा प्रवेश. ४ आहूं=आह्मी.

पाठवावी ह्मणून दिली आहे. त्याचें उत्तर पाठविलें तें त्यांस पावलें. फिरून त्याच-प्रमाणें दोन तीन वेळ लिहिणीं आलीं. तींही राजश्री बहिरोपंतास सांगितलीं आहेत. 'तुह्मांस निरोप द्यावयाचा नव्हता. परंतु सरकारकाम कराल असें जाणून निरोप दिला असे. सरकारची मर्जीप्रमाणें जाबसाल उगवून पाठवावे' ह्मणून आज्ञा. स्वामींनीं निरोप दिला तरच जाणें. तो दिला, फार संतोष जाहला. लक्षलाभ मानून, खावंदांच्या निरोपास जलद लिहून पाठविलें आहे. स्वामींचा निरोप होईल ते क्षणीं लिहावें. निरोप पाठवीन ह्मणून त्याचें लिहिणें होतें. वस्त्रें व पत्र सरकार-तर्फेचीं द्यावयास आज्ञा करावी. कृपा करून निरोप दिला. फार वर्षांनंतर जाऊन भेट सर्वांची घडेल. मजी असल्यास आज्ञा करावी. त्याप्रमाणें लवकरच माघारें येईन. निरोप दिला ह्मणून स्वामींचा सेवक नव्हे व आज्ञेप्रमाणें माघारे येणार नाहीं, असा समज नसावा. 'इंग्रेज, फरासीस यांकडील बातमी जे असेल ते कळवीत जावी.' ह्मणून आज्ञा. त्याप्रमाणें करीत जाईन. बहुत काय लिहावें, लोभ करावा हे विज्ञापना."

## लेखांक १३.

प्रैवस्ती चंद्र २९ जमादिलावल. **श्री.** ता. २५ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ जमादिला-पर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २४ मिनहूचें आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं फिरंग्यांकडून टिपूचे मसलतीसंबंधी यादीचीं उत्तरें आलीं, तीं ठीक नाहींत. पहिली सरकारांतून याद गेली आहे, त्याप्रमाणें जाहल्यास राजश्री नारायणराव वकील जात आहेत यांनीं बोलून करावें. न जाहल्यास राहिलें. सोय पडल्यास राजश्री गणेश-पंतांकडे जमाव फिरंग्यांनीं पाठवावा. हें घडल्यास उत्तम, व कांहीं बंदुका व दारू चांगली सरकारांत द्यावी. याप्रमाणें नारायणरायांसी बोलावें ह्मणोन आज्ञा आज्ञेप्रमाणें मशारनिल्हेसी बोललों. त्यांचीं उत्तरें येणेंप्रमाणें कलमें:—

नारायणरायांस स्वामींकडोन निरोप देण्याची आज्ञा आल्यानंतर त्यांनीं गोंव्यास फिरंगी यास लिहिलें आहे त्याचें उत्तर यावयाचें आहे. व येथें चार रुपये लोकांचें देणें जाहलें आहे, त्याची तजवीज गोंव्याहून होऊन येणें यास्तव राहिले आहेत. तेथील निरोप आला ह्मणजे येथोन सावकारांचा उलगडा पडोन, आज्ञा घेऊन गोंव्यास जाऊन, आज्ञेप्रमाणें फिरंगीयांसीं बोलोन, ठरेल तें सेवेसी विनंती लिहितील. कलम १.

गणेशपंताकडे खुषकीनें लोक फिरंगी यांचे गेले तर जावयाचे. त्यास ओझ्याची वगैरे देणेघेण्यासोईचा मजकूर कोणते तऱ्हेनें निघेल ते आज्ञा समजावी ह्मणोन पेशजीं विनंति लिहिली आहे. त्याचेंही आज्ञाउत्तर मर्जीस येईल त्याप्रमाणें सादर जाहलें पाहिजे. ह्मणजे त्याप्रमाणें नारायणरायांस फिरंगी यांसीं बोलावयास ठीक पडेल. कलम १.

राजश्री गणेशपंतांकडे जमाव पाठविणें दिसत नाहीं ह्मणोन स्वामींनीं लिहिलें, तेंही अर्थात् प्रमाण. परंतु नारायणराव तेथें गेल्यानंतर बोलण्यांत ठरेल तें सेवेसी लिहितील, व पहिलेंही फिरंगी यांस येविषयीं आज्ञेप्रमाणें यांनीं (याद) लिहिली आहे; इतक्यांत उत्तर येईल, तेंही विदित करितील. कलम १.

बंदुका व दारू सावकारी उदमियांकडे मिळणार नाहीं. फिरंगी यांचे सरकारांत अधिक असल्यास, दोस्तीचे जागां वाजवी किमतीचा पैका घेऊन देतील. येविषयीं आज्ञेप्रमाणें फिरंगी यांसी बोलतील. परंतु दारू व बंदुका किती प्रयोजन असेल ती आज्ञा समजली पाहिजे. कलम १.

फिरंगी यांजकडील थैली आलेली सेवकाकडे पाठविली ती पाहिली. त्यांत विठ्ठल विश्रामाचा ऐवजाबद्दलचा मजकूर नाहीं. तेव्हां पुन्हां दुसरें पत्र सरकारचें फिरंगी यांस त्याविषयीं लेहवितों. कलम १.

सदरहूप्रमाणें विदित व्हावें. कैलासवासी दादासाहेब याजबा। सदाशिव रामचंद्र व विठ्ठल विश्राम यांचे गुजारतीनें सावकाराकडे ऐवज गोंव्यास आहे. त्याविषयीं फिरंगी यांस पेशजी सरकारांतून लिहिलें होतें. त्याचें उत्तर अद्याप आलेंच नाहीं. आणि जासुदांस दुसरा जाब देऊन फिरंगी यांनीं रवाना केलें. त्यास येविषयीं पुन्हां नारायणरायांबराबर पत्र लेहून द्यावें ह्मणोन आज्ञा. त्यास मशारनिल्हेचे जाणेयास थोडासा अवकाश आहे. आणि त्यांचे मतें पत्र जासूदजोडीबराबर परभारें जावें; आणि हे गेल्यानंतर समक्ष सांगितलें आहे ह्मणोन यांनीं बोलावें; तें बरें पडेल. असें नारायणरायांचे मतें आहे. त्यापक्षीं आज्ञेप्रमाणे फिरंगी यांस सरकारचे पत्र लेहवून मुजरद जासूदजोडीच पाठवितों. कळावें, सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १४.

पैवस्ती चंद्र २ जमादिलाखर सीत चैत्र. **श्री.** ता. २६ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसी बहिरो रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः—गोंवेकर फिरंगी यांजकडील जमाव राजश्री गणेशपंतांकडे येऊन खुषकीनें उपयोगीं पडावा, येविषयीं राजश्री नारायणराव वकील गोंव्यास जाऊन, त्यांसीं बोलोन, फिरंगी यांनीं कबूल करोन जमाव दिल्यास उत्तम. कदाचित् तें न होय, तर नारायणरायांची विनंति आहे कीं, फिरंगी यांचे कवाइती लोकांतील चार पांचशेंपर्यंत लोक फुटकळ, किरकोळ कारस्थानीनें मेळवून पाहूं. त्यांत चाळीस पन्नास गोरे, बाकी किरिस्तांव काळे; फिरंगी व एक मातबर माणूस फिरंगी सरदार; त्याजखालीं दोन तीन दुसरे फिरंगी मातबर; ऐसा जमाव एकंदर होऊन जमा होऊन आल्यास सरकारांत तूर्त लढाईचे उपयोगीं चांगले पडतील. त्याचा खर्च येणेंप्रमाणें बसेल:—

गोरे दर असामीस दरमहा रुपये ३०.

फिरस्तांव काळे फिरंगी यांस दर असामीस दरमहा रुपये २०.

सरदार फिरंगी येतील.

१ मुख्य येईल त्यास दरमहा मातबर करावा लागेल.

२ मुख्याचे खालीं दुसरे फिरंगी येतील त्यांस दरमहा चांगला करावा.

२ त्याचे खालीं दुसरे.

—

५

कारकून वकील एक मातबर त्याजबरोबर येईल, त्यास दरमहा चांगला करावा.

कलम १.

गोलंदाज दाहा पांच चांगले गोरे व काळे आणिल्यास दरमहा पन्नास रुपये पडेल. परंतु चांगले येतील. कलम १.

याजप्रमाणें खर्च पडेल आणि पैका दरमहा निवळ रोख द्यावा लागेल. त्यास सरकारांत उपयोग असोन खर्च याप्रमाणें दरमहा निवळ पडेल. पैका रोख द्यावा लागेल. यांतील मर्जीस आल्यास आज्ञा करावी. नारायणराव उद्योग करोन, याची तरतूद करितील. पांचशें लोकांवर हजार लोकपर्यंत मिळाल्यास पाहातील. परंतु पांचशेंपर्यंत मिळतीलसें वाटतें. फुटकळ लोक गोंव्याबाहेर सरकारतालुक्यांत घाटावर जमा करावे. एकंदर जमा होत तों महिना दीड महिना लागेल. जो माणूस येईल, त्याची तेरीख लाविली पाहिजे. एक कारकून सरकारचा पाठवावा. त्यानें येईल त्याची तेरीख लावून खर्चास द्यावें. याप्रमाणें करावें लागेल. लोक मिळोन आल्यास लढाईचे उपयोगीं चांगले पडतील. याप्रमाणें नारायणराव यांनीं विनंती ल्याहावयास सांगितल्यावरोन लिहिलें आहे. मर्जी असेल त्याप्रमाणें आज्ञाउत्तर सादर करावें. मशारनिल्हेस सांगेन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. लोकांचा शेरा येथें मुसा नारजचा[१]—गोरे व काळे फिरंगी यांचा आहे—त्याजपेक्षां उणा कबूल करणार नाहींत. *यास्तव त्याप्रमाणें लिहिलें आहे. हे विज्ञापना.*"

ह्या पत्रव्यवहारावरून नारायण विठ्ठल धुमे ह्यांची बरीच माहिती अवगत होते. त्याचप्रमाणें त्यांची पेशव्यांच्या दरबारीं किती योग्यता होती व त्यांनीं मराठ्यांची सेवा किती निष्ठेनें व तत्परतेनें बजाविली आहे, तेंही दिसून येतें. बहिरोपंतांनीं आपल्या ता. ८ मार्च इ. स. १७८६ च्या पत्रांत, नानांस त्यांच्याबद्दल तारीफ करितांना असे स्पष्ट उद्गार काढिले आहेत कीं, "माणूस प्रामाणिक, चांगले, सरकारलक्षांतील व पुढेंही त्या दरबारीं चाकरीचे उपयोगी व उमेदवार आहेत." म्हणून, त्यांना निरोपसमयीं जवाहीर, दागिना, शिरपेंच वगैरे देऊन बहुमान करावा असें

१ मुसा नारज=हा पोर्तुगीज इसम पेशव्यांच्या पदरीं नौकर होता. हा लष्करी विद्येंत निपुण असून, त्यानें तळेगांवच्या लढाईंत चांगलें शौर्य दाखविलें होतें.

सूचित केलें आहे. त्याच पत्रावरून, नारायण विठ्ठल ह्यांचे चिरंजीव ह्या वेळीं त्यांचे बरोबर होते असें दिसून येतें. ता. ४ मार्चचे पत्रांत त्यांची सून वारल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून ते पुण्यास सहकुटुंब आले होते असें वाटतें. श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या लग्नसमारंभासही ते आल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून पुणें दरबाराशीं ह्यांचें पुष्कळ दळणवळण होतें, हें सिद्ध होतें. पुणें दरबारानें त्यांना दरमहा ५०० रुपये देण्याचा ठराव केला असून, त्यांना ८॥ वर्षांत अवघे ८ हजार रुपये दिले, असें बहिरोपंत एका पत्रांत नानांस लिहितात! ह्यावरून व त्यांच्या खर्चाच्या अडचणीबद्दल केलेल्या उल्लेखावरून, पुणें दरबारची पैशाचे बाबतींत असमाधानकारक स्थिति होती असें ह्मणावें लागतें!

नारायण विठ्ठल हे बहिरोपंतांचा निरोप घेऊन इ. स. १७८६ मध्यें गोंव्यास परत गेले. पुढें त्यांचें व फिरंगी सरकारचें काय बोलणें झालें तें समजत नाहीं, परंतु त्यांनीं गोंव्याचा गव्हरनर फ्रान्सिस्को डकुना ए मेनेझ (Fransisco Dacunha e Menezes) ह्यांच्याकडून मराठ्यांस मदत करण्याचें मान्य करविलें असें दिसतें. पण, पोर्तुगीज लोकांच्या मदतीचें मराठ्यांस विशेष कारण राहिलें नाहीं. कारण, मराठ्यांच्या फौजेनें टिपूच्या सैन्याचा पराभव करून, नरगुंद, कितूर, बदामी वगैरे प्रांत घेतला, व टिपूस नामोहरम करून त्याजला तह करण्यास भाग पाडिलें. ह्या तहामध्यें मराठ्यांनीं त्याजकडून ४५ लक्ष रुपये खंडणी घेण्याचा ठराव केला. हा तह एप्रिल इ. स. १७८७ मध्यें झाला, हें इतिहासांत नमूद आहे.

ह्यानंतर इ. स. १७८६ पासून इ. स. १७९२ पर्यंत नारायण विठ्ठल ह्यांची कांहींच माहिती समजत नाहीं. इ. स. १७९३ सालीं गोंव्याकडील वकिलाचे जागीं विठ्ठल नारायण धुमे हें नांव आढळतें. त्यावरून ह्या सुमारास नारायण विठ्ठल मृत्यु पावून, त्यांचे चिरंजीव विठ्ठल नारायण धुमे ह्यांस फिरंगी दरबारांतील वकिलतीचें काम मिळालें असावें असें दिसतें. विठ्ठल नारायण हेही ह्या वकिलीवर फार दिवस राहिले नाहींत. इ. स. १७९७ मध्यें श्रीमंत दुसरे बाजीराव पेशवे ह्यांस फिरंगी गोंवेकर ह्यांजकडील वकील विठ्ठल गोरक्ष हे कमाविसभेटीचीं वस्त्रें घेऊन आल्याचा बाजीराव पेशव्यांच्या रोजनिशींत उल्लेख आहे. त्या अर्थीं इ. स. १७९७ पर्यंत धुमे ह्यांच्या घराण्यांत हें वकिलीचें काम होतें, हें निश्चित आहे. अर्थात् इ. स. १७७७ पासून इ. स. १७९७ पर्यंत, वीस किंबहुना त्याहूनही अधिक वर्षें, ज्या घराण्यानें फिरंगी दरबारांतील मराठी राजकारणें खेळ-

विली, त्याची विस्तृत माहिती उपलब्ध होणें अत्यंत अवश्य आहे. गोमांतक प्रांतांतील इतिहासभक्त इकडे लक्ष देतील अशी आशा आहे.*

---

* मुंबईचे आमचे सन्मान्य मित्र रा. ब. घनश्याम नीलकंठ नाडकर्णी हे नारायण विठ्ठल धुमे ह्यांच्या बंधूचे नातू शिवराम धुमे ह्यांच्या मुलीचे चिरंजीव होत. ह्यांनीं गोमांतकांतून धुमे घराण्याची वंशावळी मिळवून आमच्याकडे पाठविली आहे. त्याचप्रमाणें नारायण विठ्ठल धुमे ह्यांची माहिती मिळविण्याचीही प्रयत्न चालविला आहे. तो यशस्वी होऊन कांहीं अधिक माहिती मिळाल्यास परिशिष्टरूपानें पुढें दाखल करण्यात येईल. रा. ब. नाडकर्णी ह्यांनीं गोमांतक प्रांतांतून रा. रा. सखाराम राया धुमे यांच्याकडून मिळविलेली वंशावळी येणेंप्रमाणें:—

धुमे घराण्याची वंशावळी.



'हें पलटणें आलीं आहेत. यांचा बंदोबस्त न जाला, तर ये प्रांतीं ते उपद्रव करायास चुकणार नाहींत. फौजेच्या देण्याच्या ओढी या प्रकारच्या. काय करावें!' बाई बोलली जे, 'तुह्मी शंभर ओढी सांगा. एक वसई कायम असती तर कांहीं चिंता नवती. परंतु आतां हें तुमचीं बोलणीं व्यर्थ! असो. आपल्यास शब्द लागणार. यास काय उपाय? नबाबांनीं आपला इमान रक्षिला.' नबाबाच्या थोरपणाच्या व आणीक राजेरजवाड्यांच्या गोष्टी जाल्या. बाईचें यांचें काय ठरेल तें पहावें. बाईचें मानस आहे कीं, पाटीलबावा काय सिद्धांत ठरावून जातात पाहावें. तदोत्तर कांहीं फौजेची सरंजामी करून हिंदुस्थानाकडे पाठवावी. कांहीं फौज ठेऊन माधवराव गंगाधर पुण्याकडे पाठवावे, असेही योजनेंत आहेत. पाहावें काय घडेल तें खरें. स्वामींनीं अलीकडे दोन पत्रें सेवकास व एक बाईस पत्र पाठविलें. त्यांत आज्ञा कीं, राजश्री तुकोजीबावा इकडे चाकरीस येतात. यांणीं तिकडे महालो-महाल बंदोबस्त केला आहे. यांचे ठेवलेले कमाविसदार बाई उठवून आपले कमाविसदार पाठवितात. हें न करावें. ते चाकरीस येतात, त्यांचा बंदोबस्त राखून त्यांस खर्चाची मदतगारी करणें. ते पत्रें पाहून बहुत खिन्न जाली. बोलली जे, 'इतके दिवस आपलें तापत्रय श्रीमंतांस लिहिवीत गेलों, तें व्यर्थ गेलें. बरें असो. भगवत्इच्छा.' मीं सरकारच्या पत्राचें उत्तर मागितलें. ते वेळेस बाई बोलली जे, पाटीलबावा आले आहेत. यांचें आमचें बोलणें काय होतें तें पाहून उत्तर देऊं. असें खिन्न मानसें बोलली. बाईचें व भाईचें एकांत बोलणें जालें. त्या उभयतांत तिसरें कोणीच नवतें. राजश्री माधवराव गंगाधर यांस एकांतीं विचारलें. त्यास ते ह्मणाले जे, आह्मी बाईस विचारून सविस्तर तुह्मांस सांगूं. यांचेंही लक्ष पाहतां श्रीमंतांच्या पायावितरीक्त दुसरें लक्ष नाहीं. मीं एकांतीं बाईस विचारलें कीं, मी श्रीमंतांस वर्तमान काय लिहूं? बाई बोलली जे, आज व्यतिपात आहे. उद-ईक बोलूं. जालें वर्तमान देखलें ऐकिलें सेवेसी लिहिलें असे. राजश्री नारो शिव-देव व आपाजीराम दाभोळकर हे उभयतांही पाटीलबावांबरोबर येथेंच आले आहेत. मीही काल लष्करांत त्यांस भेटायास गेलों होतों. त्यांणींही कितीक वर्तमान सांगितलें. सारांश, पाटीलबावांचें मानस फार करून उज्जनीसच जाणार असें ऐकि-ल्यांत आलें. बाईनीं तों येथें आणिले आहेत, कीं कांहींही उपाय करून पाटीलबावांस दक्षणेस पाठवावें अशा अर्थीं बोलाविलें आहे. पुढें पहावें काय मसलत होती. पाटी-लबावांची तों ओढ उज्जनीकडे जायाची फार आहे. याप्रमाणें इकडील वर्तमान. सु-रतेकडील वर्तमान ऐकल्यांत आलें जे, श्रीमंत राजश्री दादासाहेबांस हवालदिल जाला आहे. अन्योन्य भाषणें करितात. असें साहुकाऱ्यांत आपल्यांत आपण बोलतात.

सत्य मिथ्या देव जाणे. इकडेही पलटणें आलीं आहेत. आणीखही पलटणें येणार ह्मणून वदंता आहे. छ ४ रोज रविवारीं संध्याकाळीं पाटीलबावा वाड्यांत येऊन बाईस मुजरा करून बंगल्यांत बसले. बाईचा नित्यनेम दोन घटका रात्रपरीयंत जाला. मुदपाखांत येऊन यांची भोजनाची तरतूद करविली. दों घटका रात्रीनंतर पाटीलबावांस बोलाविलें. तीस चाळीस लोकांनशीं भोजनें केलीं. जेवणाच्या अगोदर पाटीलबावा बसले होते. मींही जवळीच होतों. हरी बावाजीकडील वर्तमान मजला सविस्तर विचारलें. मीं विदित केलें. त्यावर दादासाहेबांच्या गोष्टी निघाल्या. मीं विचारलें जे, अलीकडे दादासाहेबांच्या बुद्धीस कांहीं विपर्यास पडला आहे ह्मणून कितीक बोलतात; आपल्याही कांहीं ऐकिल्यांत आलें कीं काय? बावा बोलले जे, 'श्रीमंतांस कान दुखायाची व्यथा आहेच. इंग्रजांनीं उदंड उपाय केले. कान देखील साच स्थानभ्रष्ट करून उदंड औषधी उपाय केले, परंतु अद्याप वाहतच आहे. ठणक रात्रंदिवस लागलीच आहे. अलीकडे हवालदिलही जाला आहे. बुद्धि स्थिर नाहीं. अन्योन्य भाषणें करितात. बाई दादासाहेबांचा शेवट करील. मग पुढें काय अन्य योजना करणें ते करील.' अशीं भाषणें केलीं. तदोत्तर भोजनें करावयास बसले. बाईही जवळ येऊन बसली. भोजन जालीयावर कोठडींत बिछाने टाकले. तेथें बाई व पाटीलबावा व राणेखान ऐसीं त्रिवर्ग एकांतास बसलीं. चौ घटका रात्रींत भोजनें उरकलीं. तदोत्तर एकांतास बसलीं. सात घटकांपरीयंत तिघांचींच बोलणीं जालीं. वरकड मुत्सद्दी मंडळी बाहेरच होते. अकरा घटका रात्र वाजलीयावर खिलबत अखेर जालें. बारावे घटकेस उठली. पाटीलबावा आपले गोटास गेले. बाईही आपले निद्रास्थलास गेली. मजला तों निरोप दिला. परंतु राजश्री माधवराव गंगाधर व गोविंद रघुनाथ हे उभयतां एक घटका बाईजवळ होते. त्यावर हेही उभयतां आपलाल्या घरास आले. आजउद्यां बाईस व माधवरावजीस विचारून काय मथितार्थ कळेल तो मागाहून कासीदजोडीबरोबर विनंतीपत्रें रवाना करीन. आज छ ५ रोजीं इंदुवासरीं मावशीबाईचे येथें पाटीलबावांस मेजवानी आहे. उद्ईक मंगळवारीं पाटीलबावा कूच करून उज्जनीकडे जाणार, अशी बोलवा आहे. प्रस्तुत पाटीलबावांचे येथें कारभारी आबा व भाई आहेत. बाळाराव कांहीं इतराजीखालीं आहेत ह्मणून ते फौजेंत ठेऊन आले आहेत. राजश्री नारो शिवदेवही बोलत होते जे, पाटीलबावा उज्जनीस चालले ह्मणजे आह्मी निरोप घेऊन पुण्यास जाऊं. उज्जनीस जाणार नाहीं असें बोलत होते. आपाजीरामही निरोप घेऊन पुण्यास जाणार. या उभयतांच्या बोलवा अशा आहेत. पुढें पाहावें कसें होईल. राजश्री तुकोजीबावांकडील वर्तमान येथें ऐकिल्यांत आलें जे, प्रस्तुत खानदेशांतच

आहेत. पुढें कूच होऊन चांदवडास जाणार. तेथें माघमासीं पुत्राचें लग्न करून पुढें पुण्याकडे जाणार. याप्रमाणें देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. लोकांचें देणें व पुढें कालक्षेप चालणें फार होय. संकट जालें आहे. येथें चार दिवस उपासी राहिलें तर कोणी समाचार घेणार नाहीं. धनी कृपालु समर्थ. चिरंजीव सेवेसी आहेच. कोठें सोय करून देणार स्वामी समर्थ. हे विज्ञप्ति. डाकेचे कासीद उठून नारोपंताजवळ आले होते. खायावांचून हैराण. यांणीं येथून पंधरा रुपये देऊन, थोडें थोडें खावयास देऊन, पुन्हा डाकेवर पाठविले. डाकेचाही बंदोबस्त स्वामी करविती हे विनंति."

---

## लेखांक ३६.

पौष शु॥ ९ शके १७०२. **श्री.** ता. ४ जानेवारी इ. स. १७८१.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेबांचे सेवेसीः—

विज्ञापना. स्वामींनीं व राजश्री तात्यांनीं बाईस पत्रें लिहिलीं होतीं. सेवकासही आज्ञापत्र होतें. तीं पत्रें दोन्ही सेवकाच्याच लाखोट्यांत होतीं. छ ८ मिनहूस येथें दाखल जालीं. पत्रें वाचून रात्रीं दरबारास जाऊन बाईस एकांतीं सांगितलें. तदोत्तर दों घटकांनीं दरबार बरखास्त केला. बाईचे जवळ बाईचे भाऊ शहाजी पाटील शिंदे व जांवई यशवंतराव फणसे व मी ऐसें बोलत होतों. ते समयींच राजश्री गोविंद रघुनाथ गानू बाईचे खासगी तेही आले. ऐसे पांचजण होतों. गोविंदपंताजवळीच मीं चारी पत्रें दिलीं. त्यांणीं वाचून दाखविलीं. बाईस बहुत संतोष जाला. त्याअन्वयेंच मीही बाईशीं बोललों. फार खातरजमा केली. माझे पत्रीं धन्यांनीं खास दस्तूर लिहिलें होतें जे, घरकलहामुळें सरकारकामांत हरकत होती. तेविशीं बाई बोलली जे, पुण्यांत आमचे तर्फेचे बोलणार श्रीमंतांशीं बोलणें बोलतात. तें ध्यानांत आणून पुर्तेपणें अभिमानयुक्त खातरजमा जालीयास धन्याच्या मनोदयानरूप पूर्ववत्प्रमाणें चाकरी घडून येईल. हें बोलणें बाई मावशीबाईच्या विद्यमानें सेवकाशीं बोलली आणि कितीक गोष्टी राखूनही बोलली. त्या बोलण्याचे अन्वयें मावशीबाईनीं एकांतीं सांगितलें जे, बाई व पाटीलबावा हे एकचित्त जाले. माधवराव गंगाधर यांस बोलावूं पाठविलें आहे. ते दो चौ दिवसांनीं येथें आले ह्मणजे हे एकविचारें होऊन फौजेची निगादास्त करणार. पाटीलबावाही येथें येणार. आठ दिवस येथें राहून सारे विचार पक्केपणें करून, फौज ठेऊन डौल दुसरे उभे करणार. हें पक्कें जालीयावर हिंदुस्थान व हा प्रांत व देशीं ऐसे महालो-

महाली कमाविसदार नवे पाठविणार, व जुने कमाविसदार आहेत त्यांस ताकिदी पाठविणार जे, तुकोजीबावांकडेस कांहीं ऐवज देऊं नये. याप्रमाणें येथील योजना जाली. माधवराव व पाटीलबावा येथें आलीयावर असें होणार. तकारनामकाचे गुण-दोष फार बोलली आहेत. परंतु अतःपर होळकरांचे सरदारीचा जाबसाल फौज ठेवणें चाकरी करणें व ये दौलतीचा सरंजाम हें सारें बाई आपल्याकडे ओढणार. तुकोजीबावांची चाकरी व त्यांचे फौजेचें देणें सर्व सरकाराकडे. जितके पागे व सरंजामी जुने लोक, तितक्यांचीं आर्तें बाईकडे कायावाचामनसेंकडून आहेत. बाईचें येथून एक पत्र गेलें ह्मणजे ते निघून बाईकडे येणार. असा प्रकार येथें जाला आहे. परंतु अद्याप मुखेंकडून बोलत नाहींत. दुसरें वर्तमानः—बाईच्या व मावशीबाईच्या बारीक बातम्या तुकोजीबावांचे जवळ निकट आहेत. त्यास तुकोजीबावांचे जाबसाल सुरतेकडेही जात येत आहेत. सुभेदाराजवळ पारसीनवीस पुरुषोत्तमपंत बहुत सुभेदारांच्या मायेममतेंत होते. त्यास प्रस्तुत त्यांचे पुत्र गोविंदराव पुरुषोत्तम आतां तुकोजीबावांजवळ आहेत. त्यांच्या हतें एकांतीं कागदपत्र लिहून सुरतेस जात असतात. या कुटांत मणिरामही—सुमेरसिंगाचा व्याही—तोही आहे. पत्रें यांणीं लिहून द्यावीं आणि मणिरामानें एकांतीं माणसें पाठवून पत्रें पोंहचावून उत्तरें आणवून, तुकोजीबावा व नारोपंत व मणिराम हे तिघे बसून गोविंद पुरुषोत्तम मुनसींनीं वाचून दाखवितात. ते वाचून पाहून तेच समयीं पत्रें सुरतेकडील जाळून टाकितात. याप्रमाणें कुपीया वर्तमान फार एकांतींचें उभयतां बायांजवळ मात्र आहे. दुसरें कोणास ठाऊक नाहीं. हें वर्तमान ऐकूनही बाईस फार संताप जाला आहे. मावशीबाई बाईस बोलली जे, मणिराम दहा लक्ष रुपये माझे घेऊन त्यांच्या कुटांत मिळाला आहे, आणि सुमेरसिंगाबाबद ठेवरेवही मजला ठाऊक आहे. बाई बोलली जे, इतकेंही विठ्ठलपंताकडून श्रीमंतांस लिहिवा. मावशीबाई बोलली जे, पहिलेंच मीं लिहिविलें आहे; परंतु त्यांजकडून कांहीं जालें नाहीं. तेव्हां बाई बोलली जे, तेथेंही कानच आहेत. तुमच्या गांवाविशीं मीही दोन चार वेळां लिहिविलें होतें. परंतु त्यांणीं सोडले नाहींत. मजकुर थोडका ! त्यांणीं इतकी निकड करावी असें कांहींच घडल्यांत आलें नाहीं. परंतु सांगणारांचें ऐकणें तेथें फार आहेसें दिसतें. याप्रमाणें उभयतां बाईचीं भाषणें जालीं. मावशी-बाईचें गांव मर्जीस आलें तर सोडणार धनी समर्थ. अखेर कोणी तरी मातबर भीड घालीलच. मावशीबाईशीं मीही बोललों आहें कीं, श्रीमंतांस लिहून गांव सोडवीन. त्या आशेस्तव कितीक बारीक मोठें वर्तमान एकांतीं त्यांचें, सेवकास कळतें. सेवकाचें वचन निभवणार धनी समर्थ हे विज्ञप्ति.

हें पत्र एकांतीं वाचून जाळून टाकावें.”

**लेखांक ३७.** ता० १० जानेवारी १७८१.

**श्रीगजानन.** मि० पौष शु॥ १५ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र १४ मोहरमपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून डाकेबराबर पाठविलें आहे. सांप्रत स्वामींनीं सेवकास आज्ञापत्र व अहल्याबाईस पत्र चंद्र २३ जिल्हेजचीं पाठविलीं, तीं चंद्र ८ मोहरमीं पावलीं. दोन्हीं पत्रें बाईस वाचून दाखविलीं. बाईनीं आपले पत्राचें उत्तरही दिलें आहे व मी आज्ञेप्रमाणें बोललों. त्यांनीं उत्तरें केलीं जे, देपाळपुर व देवळें या दोही महालचे कमाविसदार आह्मीं जुनेच स्थापिले आहेत. त्यास देवळ्यापैकीं पन्नास हजार रुपये सुलतानजी लांबहात्यास तुकोजी बावांनींच देविले आहेत; व देपाळपुरचे पंधरा वीस हजार रुपये राजश्री बळवंतराव वांकडे यांनीं कमाविसदार ठेवला होता, त्याजकडून वसूल करून घेतले. ते त्यांचे त्यांसच आह्मीं दिले. देपाळपुरचा कमाविसदार बहुत दिवसांचा. त्याजवळून कांहीं अंतरही पडलें नाहीं. दूर करावयास कारण काय ? मीं उत्तर केलें जे, तुकोजीबावांनीं आपले फौजेच्या देण्याविषयीं रसदेपैकीं ऐवज त्यांजवळ मागितला. त्यांनीं न दिला. तदोत्तर राजश्री बळवंतराव वांकडे यांजवळून रसदेचा ऐवज घेऊन महाल त्यांजकडेस लावून दिला. देपाळपुर व देवळें दोन्ही महाल बळवंतराव वांकडे यांजकडून ऐवज घेऊन त्यांजकडे सांगितले. त्याचा ऐवज वसूल न होतां, तुह्मीं कमाविसदार आपले पाठविले. त्याविषयीं श्रीमंतांनीं दोन चार पत्रें लिहिलीं आहेत. त्यास श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें तुकोजीबावांनीं बळवंतराव यांजकडेस महाल सांगितले आहेत. ते त्यांजकडेस बहाल असूं द्यावे. यांत श्रीमंताची मर्जी बहाल आहे. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, गुदस्तां शिंद्याच्या वीस लक्षांच्या वराता आल्या, व पुण्याकडील मसलतीस तुकोजीबावा होते, ते वेळेस लाखों रुपये खर्चास तेथें पाठविले आहेत. ज्या सावकारांचे काढून दिले आहेत, त्यांस त्या त्या महालावर वराता दिल्या आहेत. त्यांचा ऐवज न पावतां मामलती काढल्या, तर पुढें सावकार कसें पातेजतील? श्रीमंतांचें येथें काय होतें आहे? मीं उत्तर केलें जे, हीं तुमचीं गृहकृत्यें तुह्मीं नी तुकोजीबावांनीं आपल्या घरांत समजावें. जें करणें तें समजून करावें. प्रस्तुत बळवंतराव वांकडे यांनीं ऐवज दिला आहे, त्याची वाट काय? बाई बोलली जे, तुकोजीबावांनीं महालाची घालमेल करणें ती समजून करावी. मीं उत्तर केलें जे, यांत बळवंतरायांचा तो आग्रह कांहीं नाहीं. तुमचीं हीं गृहकृत्यें त्यांस काय

ठाऊक? त्यांच्या ऐवजास कोणता उपाय तो सांगावा. बाई बोलली जे, 'घरचा विचार त्यांनीं आह्मीं एकत्र होऊन, आपलें घर देणें घेणें हें पाहून, मामलतीची घालमील करणें ती करावी. तो प्रकार त्यांनीं न करितां आपलीं मनोराज्यें केलीं. परंतु पेशजीं लाखोंच्या वराता ज्या केल्या आहेत, तो ऐवज कोठून द्यावा? मीं उत्तर केलें जें, हा विचार श्रीमंतांकडेस अगर बळवंतराव सावकाराकडेस पुसायाचा आहे कीं काय? बाई बोलली जें, सावकाराकडे हा जाबसाल नाहीं. परंतु श्रीमंतांनीं जीं आह्मांस दोन पत्रें लिहिलीं, व तुह्मांस लिहिलीं, तीं कशावरून? त्यांनीं गैरवाका समजाविलें, त्याप्रमाणें धन्यांनीं लिहिलें. परंतु शब्द आह्मांवर स्थापिला कीं, तुकोजीबावा साहेबचाकरीवर आले असतां मागें बाईनीं महालोंमहाल घालमील केली. तेव्हां श्रीमंतांच्या चित्तांत विक्षेप पडला कीं, सरकारांत येवढी मसलत पडली असतां ते चाकरीस आले आहेत, आणि बाई सर्वोविषयीं समंजस असतां असें कसें केलें?' मीं उत्तर केलें जें, असें समजलें तेव्हांच पत्रावर पत्रें येत गेलीं. बाई बोलली जें, श्रीमंतांचे येथें करोडीच्या मामलतीच्या रसदा घेतात. मामलेदारांस मामलती देतात. धनी व कारभारी एकमतें कारभार करितात, कीं ज्याच्या चित्तास येईल तें करितात? येविषयींचें त्यांनीं येथें श्रीमंतांस काय समजाविलें असेल तें समजावोत. परंतु कारभार करणें हा एक मताचा आहे. तुकोजीबावा व कारभारी इतके दिवस इंदुरांत होते. त्यांनीं येथें येऊन, आपलें घरीं देणें घेणें गृहकृत्य .समजून, जें करणें तें करावें कीं नाहीं? श्रीमंतांस हें काय ठाऊक? तत्रापि, तुकोजीबावांनीं गुजराथेंतून येतांच आठ दिवसही घरीं राहूं दिले नाहींत. तसेंच साहेबचाकरीस बोलावून श्रीमंतांनीं नेले. असो. ते चाकरीस गेले, परंतु कारभारी यांनीं येथें येऊन आपले घरांत मागील पुढील देणींघेणीं समजावीं, आह्मांस विचारावें, आह्मीं त्यास देणीं घेणीं खर्चवेच कसे जाले, कोणांचीं देणीं घेणीं, पुढें तरतूद कशी काय, कोणी सावकारांस दोन दिवस राहवणें, कोणास तुरुत देणें हें एकमतें घरांत विचार करून मामलतीच्या रसदा घेणें अगर सावकाराच्या आंगीं मामलती लाऊन देणें, हें कारभाऱ्यांनीं आह्मीं एकविचारें करावें, कीं मनास येईल तें त्यांनीं करावें आणि गैरवाका श्रीमंतांस समजावून शब्द नाहकचे आह्मांवर स्थापावे? तरी नीतीचीं चालणीं श्रीमंतांचे येथें चालतात. त्यांचे चाकर आह्मी. आह्मांजवळून अवनीत घडल्यास शब्द लावतीलच. परंतु स्वराज्य अगर परराज्यांत जो कारभार करणें तो धनी कारभारी एकमतें करितात. असो. श्रीमंतांस काय ठाऊक? तुकोजीबावा व कारभारी गाढ मसलतीस टाकोटाक जाऊन सामील जाले आहेत

आणि आम्हीं येथें महालांची घालमील केली म्हणून श्रीमंतांस समजाविलें, त्या अर्थी त्यांनीं पत्रें पाठविलीं ! बरें, श्रीमंतांची आज्ञा आम्हांस शिरसा वंद्य आहे. दोही महालांची घालमील केली ती केलीच. पुढें दुसऱ्या महालांची घालमील करीत नाहीं. परंतु पुरतेपणें श्रीमंतांनींही समजावें. याप्रमाणें उत्तरें प्रतिउत्तरें जाहलीं. बाईनींही सेवेसी पत्रें लिहिलीं आहेत. वरकड इकडील राजकी वर्तमान आलाहिदा विनंतीपत्रीं लिहिलें आहे. सविस्तर श्रवणारूढ होईल. श्रीमंत राजश्री रावसाहेबांस अहिल्याबाईनीं मेवे जात नासपातां फळें सुमार सहा पेटारींत चार व गलेफी दोन ऐकूण सहा पाठविलीं आहेत. हे सरकारचे कासीदजोडीबरोबर पाठविलीं आहेत. हीं सेवेसी पावतील. मेवा पावल्याचें उत्तर बाईस पाठविणार स्वामी समर्थ. वो राजश्री गबाभटजी कसरावंदच्या मामलतीकरितां सेवेसी आले आहेत. पावले असतील. चिरंजीवाची सोय कोठें जाली नाहीं. कृपा करून या महालांत एखादी असामी धन्यांनीं करून दिली तर धन्यांची मर्जी. माझे गरिबाविषयीं विनंती करायास कोण आहे ? घरीं मुलेंमनुष्यें अन्नवस्त्रांवांचून व कर्जदारांच्या वगैरे उपद्रवानें फार हैराण आहेत. चिरंजीवही दीड वरीस सेवेंत आहे. अद्याप कोठें सोय जाली नाहीं. हे श्रम कोणाजवळ सांगावे ? स्वामीशिवाय करुणा कोणास येईल ? सर्वजाण धनी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३८. ता० ११ जानेवारी इ. स. १७८१.

पै॥ छ २७ मोहरम इहिदे समानीन. **श्रीगजानन.** मि० पौष व॥ १ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ १५ मोहरमपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मु॥ महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजी विनंतीपत्रीं लिहून डाकेबरोबर छ ६ मिनहूस येथून रवाना केलीं आहेत. राजश्री पाटीलबावा येथें आले होते. त्यास अहिल्याबाईशीं व पाटीलबावा व राणेखान या त्रिवर्गाशीं येथें दोन एकांत जाले. त्यांत बाईनीं पाटीलबावांस बोध करून निश्चितार्थ ठरविला कीं, येथून उज्जनीस जाऊन येथें बंदोबस्त करून, पुढें शिप्री कोल्हारसावर पलटणें आलीं आहेत, त्यांजकडे फौजेची रवानगी करून माघ शुद्ध प्रतिपदेस येथें येतों. येथून वसंतपंचमीचे मुहूर्तें निघून दरमजल श्रीमंतांच्या दर्शनास जाऊं. याप्रमाणें करार ठरवून, बाईनीं फार प्रकारें सांगितलें कीं, आपण ये मसलतीस तेथें जात नाहीं तर जन्मपरीयंत श्रीमंतांचा व जधन्याचा शब्द आपल्यास लागेल. इकडील पलटणें

आलीं आहेत. या मसलतीची सरबराई मजकडे लागली. तुह्मीं तिकडे आंबाजी इंगळे पाठविलेच आहेत. आह्मींही त्रिंबकजी इंगळे तयार केले आहेत. पांच सात हजार फौज त्यांजबरोबर देऊन तिकडे पाठवितों. परंतु तुह्मीं आह्मीं इकडील संधान राखणें मुख्य गोष्ट होय. पाटीलबावांनींही शपथपूर्वक कबूल करून, पाऊण महिन्यांनीं फिरून येतों असा करार ठरवून, छ ६ मिनहूस आठा घटका आंत पाटीलबावा निरोपास वाड्यांत आले. निरोपसमयीं बाईनीं पाटीलबावांस पैठणी शेलापागोटें व चिकडी (?) जामेवार व किनखाप याप्रमाणें वस्त्रें दिल्हीं. व दोन सोन्याचीं कडीं व जडावाचा शिरपेंच व जिगा एकूण तीन दागिने बहुमान दिल्हा. हत्ती देण्यास आणिला होता, तो पाटीलबावांनीं घेतला नाहीं. घरचे घरीं कशास, हे आहेत माझेच आहेत, असें बोलले. निरोप घेऊन उज्जनीस दरमजल गेले. राजश्री नारो शिवदेव येथूनच पाटीबावांचा निरोप घेऊन येथेंच राहिले, कीं नारो शिवदेव यांणीं पुण्यास दरमजल यावें व सदाशिवपंत दाजी यांणीं बराणपुरीं रहावें. पाटीलबावा इकडून देशास चालतील, त्यांजबरोबर त्यांणीं देशास यावें. याप्रमाणें निश्चय जाला होता. येथेंच मुक्काम करून राहिले होते. परंतु पाटीलबावा जे दिवशीं येथून गेले, तेच दिवशीं रात्रीं डाकेबरोबर सरकारचीं पत्रें नारो शिवदेव यांस आलीं. ते मशारनिल्हेनीं वाचून पाहून, ते पत्रें देऊन रातोरात सदाशिवपंत दाजीस पाटीलबावांकडेस पाठविलें. तेथें त्यांची सरकारपत्रांच्या अन्वयें काय मसलत जाली असेल हें न कळे. सदाशिवपंत दाजी त्रितीय प्रहरीं दुसरे दिवशीं छ ७ रोजीं आले. छ ८ रोजीं येथें मुक्काम केला. त्रितीय प्रहरीं चार घटका बाईचा व नारोपंताचा एकांत जाला. तदोत्तर उभयतांस वस्त्रें देऊन बिदा केलें. छ ९ मिनहूस प्रातःकालीं कूच करून उज्जनीकडे गेले. राणेखान व आबा चिटणीस यांस तीन तीन वस्त्रें दिल्हीं. व शेंपन्नास लोकांस दोन दोन वस्त्रें बाईनीं दिलीं. पाटीलबावा येथून करार करून गेले आहेत. परंतु काल पत्रें सरकारचीं आलीं आहेत, त्यावरून उज्जनीस काय मसलत ठरेल ते पाहावी. येथें तों बाईनीं बहुत प्रकारें पाटीलबावांस सांगून 'पुण्याकडेस जावें अशी मसलत करारांत आणिली होती. इतःपर पहावें कशी मसलत उज्जनीस होईल तें. तेथून स्वामींस लिहितील. येथेंही कळल्यावर सेवेसी लिहीन. स्वामींनीं दोन तीन आज्ञापत्रें सेवकास व अहिल्याबाईसही दोन तीन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. बाईचीं पत्रें व माझीं पत्रें ऐसीं सारींच बाईस एकांतीं वाचून दाविलीं. जाबसालही केला जे, राजश्री तुकोजीबावा साहेबचाकरीवर गेले आहेत. त्यांणीं येथें महालोमहालीं

कमाविसदार ठेऊन बंदोबस्त करून गेले आहेत. त्यांचे कमाविसदार दूर करून आपण आपले कमाविसदार पाठविले. येविशीं महालीं कमाविसदारांची घालमेल न करावी ह्मणून श्रीमंतांनीं मजलाही दोनचार आज्ञापत्रें पाठविलीं जे, 'बाईस सांगून महालीं घालमेल न होय आणि येथें तुकोजीबावांचे चित्तांत किंतू पडून सरकारमसलतीस विपर्यास पडेल असें करूं नये. आपल्यासही दोन पत्रें सरकारचीं आलीं आहेत. सांप्रत कोंकणांत मसलत भारी आहे. ये समयीं तुह्मीं सर्वांनीं एकदिल होऊन अर्थप्राणें ते मसलतीवर नमूद व्हावें. तत्रापि, तुकोजीबावा आहेत त्यांच्या चित्तास विकल्प होय, असें तुह्मीं येथें न करावें. तत्रापि श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर येत असतां आपण त्याप्रमाणें न करावें हें उचित नाहीं. बाई बोलली जे, 'श्रीमंतही वरचेवर पत्रें पाठवितात. तुह्मी येथें आह्मांसीं रागें भरून बोलतां. त्यास पहिलें पत्र श्रीमंतांचें आलें, ते वेळेस आह्मीं तुह्मांस सांगितलें आहे आणि आतांही सांगतों जे, श्रीमंतांची आज्ञा आह्मांस लक्षोपलक्ष वेळ शिरसा वंद्य आहे. सरकारचें पत्र आलें त्यापासूनच आह्मीं घालमेल मना केली. एक देपाळपुर व देवळें या दोही महालांचे कमाविसदार पहिले होते तेच आह्मीं बहाल केले. कां कीं देपाळपुरचा कमाविसदार तीस चाळीस वर्षांचा. तो दूर करायास कारण कांहीं नव्हतें. तत्रापि बळवंतराव वांकडे यांजकडील कमाविसदारांनीं पंचवीस तीस हजार वसूल घेतला आहे, तो कोणीं त्यांजवळून घेतला नाहीं. त्यांजकडेच ऐवज दिल्हा. देवळ्याचे पन्नास हजार रुपये तुकोजीबावांनींच लांबहात्यास देविले आहेत. असें असतां येथून तेथवर बोभाट. श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर दो महालांसाठीं यावीं. देशीं महाल आहेत त्या महालचा पैका तिकडेच जात आहे. त्यांची देशच्या महालांची अगर खानदेशच्या महालांची वगैरे महालांची आह्मीं घालमेल श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें कांहीं केलीच नाहीं. गुदस्तां विसा लक्षांच्या शिंदांच्या वराता आह्मांवर जाल्या. पुण्यांतील मसलतीवर होते, ते समयीं साहुकारापासून कर्जें काढून लाखोंच रुपये खर्चास पाठविले. त्या साहुकारांस व वरातदारांस पैका दिला पाहिजे कीं नको? श्रीमंतांचे येथेंही फौजेचेच कारभार होतात. तेथेंही साहुकारांचीं देणीं घेणीं श्रीमंत करितात. जागां जागां सचोट्या राखितात. तेव्हां दौलतीचे कारभार येवढाले चालले आहेत. श्रीमंत सर्व जाणत आहेत. परंतु इतका निग्रह बळवंतराव वांकडे यांचा आहे. त्यांचा पैका वसूल जाला पाहिजे. या अर्थीं त्यांची भीड ह्मणून वरचेवर श्रीमंतांस विनंती करून पत्रें पाठवितात. त्यांस मंत्रोपदेशीही दुसरेच आहेत. असो. श्रीमंत मसलतशीर आहेत. अधिक विस्तार काय बोलावें? इतके दिवस श्रीमंतांस वर्तमान

कळतच गेलें आहे. सविस्तर वर्तमानास माहितगारी श्रीमंतांस आहे. परंतु प्रस्तुत आतांचे पत्रीं आज्ञापिलें आहे कीं, तुकोजीबावा येतांना भेटून आले नाहींत ह्मणून चित्तांत राग कां आणावा, असें श्रीमंतांनीं लिहिलें आहे. त्यास त्यांणीं सुलतानजी लांबहाते पाठविलेच होते कीं भेटीस येतों. परंतु स्वामिचाकरीपेक्षां भेटीचें कार्य अधिकोत्तर नाहीं. यास्तव आह्मींच येऊं दिल्हे नाहींत, कीं तुह्मीं साहेबचाकरीस जाणें. न भेटून गेले येविशींचा अन्य भाव आमच्या चित्तांत नाहीं. मुख्य स्वामिकार्य आह्मांस अगत्य. तुकोजीबावा तर अद्याप खानदेशांत. आतांसे चांदवडास गेले असतील. अद्याप कोणत्या मसलतीस गेले नाहींत. खामखा वसईचें ठाणें कायम करायास गेले होते, आणि तेथें दोही महालांची घालमेल ऐकून, चित्ताची विक्षेपता होऊन, मसलत टाकून पुन्हां चांदवडास आले, असें तरी जालें असतें तर हें असो. श्रीमंतांचे पत्रें बरजाहा होती. असो. प्रस्तुत दोही महालची घालमेल जाली. अतःपर श्रीमंतांची आज्ञा मान्य. दुसरी घालमेल होणार नाहीं. येथीलही देण्याची ओढ सर्व श्रीमंतांस विदित आहे.' याप्रमाणें जाबसाल जाले."

---

**लेखांक ३९.** ता० १२ जानेवारी इ. स. १७८१.

पो. छ. २८ मोहरम. **श्रीगजानन.** मि० पौष वा २ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराव चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १६ मोहरमपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वर्तमान पेशर्जी विनंतीपत्रीं लिहून डाकेबरोबर छ ६ मिनहूस येथून रवाना केलीं आहेत. राजश्री पाटीलबावा येथें आले होते. त्यास अहिल्याबाईशीं व पाटीलबावा व राणेखान या त्रिवर्गाशीं येथें दोन एकांत जाले. त्यांत बाईनीं पाटीलबावांस बोध करून निश्चितार्थ ठरविला कीं, येथून उज्जनीस जाऊन तेथें बंदोबस्त करून, पुढें सिपरी कोल्हारसावर पलटणें आलीं आहेत त्यांजकडे फौजेची रवानगी करून, माघ शु॥ प्रतिपदेस येथें येतों. येथून वसंतपंचमीस मोहर्तें निघोन दरमजल श्रीमंतांच्या दर्शनास जाऊं. याप्रमाणें करार ठरवून, बाईनीं फार प्रकारें सांगितलें कीं, आपण ये मसलतीस तेथें जात नाहीं, तर जन्मपर्यंत श्रीमंतांचा व जघन्याचा शब्द आपल्यास लागेल. इकडील पलटणें आलीं आहेत, या मसलतीची सरबराई मजकडे लागली. तुह्मी तिकडे आंबाजी इंगळे पाठविलेच आहेत. आह्मींही त्रिंबकजी इंगळे तयार केले आहेत. पांच सात हजार फौज त्यांजबरोबर देऊन तिकडे पाठवितों. परंतु तुह्मीं इकडील संधान राखणें मुख्य

गोष्ट होय. पाटीलबावांनींही शपथपूर्वक कबूल करून, पाऊण महिन्यांत फिरून येतों असा करार ठरावून, छ ६ मिनहूस आठ घटका आंत पाटीलबावा निरोपास वाड्यांत आले. निरोपसमयीं बाईनीं पाटीलबावांस पैठणी शेलापागोटें व चिकडी जामेवर व किनखाफ याप्रमाणें वस्त्रें दिलीं, व दोन सोन्याचीं कडीं व जडावाचा शिरपेंच व जिगा ऐसे तीन दागिने बहुमान दिल्हा. हत्ती देण्यास आणिला होता, तो पाटीलबावांनीं घेतला नाहीं. 'घरचे घरीं कशास. हे आहेत माझेच आहेत.' असें बोलले. निरोप घेऊन उज्जनीस दरमजल गेले. राजश्री नारो शिवदेव येथूनच पाटीलबावांचा निरोप घेऊन येथेंच राहिले कीं, नारो शिवदेव यांणीं पुण्यास दरमजल यावें व सदाशिवपंत दाजी यांणीं बराणपुरीं रहावें. पाटीलबावा इकडून देशास चालतील त्याजबरोबर त्यांणीं देशास यावें. याप्रमाणें निश्चय जाला होता. येथें १ मुक्काम करून राहिले होते. परंतु पाटीलबावा जे दिवशीं येथून गेले, तेच दिवशीं रात्रीं डाकेबरोबर सरकारचीं पत्रें नारो शिवदेव यांस आलीं. तें मशारनिल्हेनीं वाचून पाहून तीं पत्रें देऊन रातोरात सदाशिवपंत दाजीस पाटीलबावांकडेस पाठविलें. तेथें त्यांची सरकारपत्रांच्या अन्वयें काय मसलत जाली असेल हें नकळे. सदाशिवपंत दाजी तृतीय प्रहरीं दुसरे दिवशीं छ ७ रोजीं आले. छ ८ रोजीं येथें मुक्काम केला. तृतीय प्रहरीं चार घटका बाईचा व नारोपंतांचा एकांत जाला. तदोत्तर उभयतांस वस्त्रें देऊन बिदा केलें. छ ९ मिनहूस प्रातःकाळीं कूच करून उज्जनीकडे गेले. राणेखान व आबा चिटणीस यांस तीन तीन वस्त्रें दिलीं व शेपन्नास लोकांस दोन दोन वस्त्रें बाईनीं दिल्हीं. पाटीलबावा येथून करार करून गेले आहेत. परंतु काल पत्रें सरकारचीं आलीं आहेत, त्यावरून उज्जनीस काय मसलत ठरेल, ते पाहावी. तेथें तों बाईनीं बहुतां प्रकारें पाटीलबावांस सांगून पुण्याकडेस जावें अशी मसलत करारांत आणिली होती. इतःपर पाहावें कशी मसलत उज्जनीस होईल तें. तेथून स्वामींस लिहितील. येथेंही कळल्यावर सेवेसी लिहीन. श्रीमंतांनीं दोन तीन आज्ञापत्रें सेवकास व अहल्याबाईसही दोन पत्रें पाठविलीं, तीं पावलीं. बाईचीं पत्रें व माझीं पत्रें अशीं सारींच बाईस एकांतीं वाचून दाखविलीं. जाबसालही केला जे, राजश्री तुकोजीबावा साहेबचाकरीवर गेले आहेत. त्यांनीं येथें महालोमहालीं कमाविसदार ठेवून बंदोबस्त करून गेले आहेत. त्यांचे कमाविसदार दूर करून आपण आपले कमाविसदार पाठविले. येविसीं महालीं कमाविसदारांची घालमेल न करावी. म्हणून श्रीमंतांनीं मजलाही दोनचार आज्ञापत्रें पाठविलीं जे, बाईस सांगून महालीं घालमेल न होय आणि येथें तुकोजीबावांचे चित्तांत किंतू पडून सरकारमसलतीस विपर्यास पडेल, असें करूं नये. आपल्यासही दोन पत्रें सरकारचीं आलीं आहेत.

सांप्रत कोंकणांत मसलत भारी आहे. ये समयीं तुह्मीं सर्वांनीं एकदिल होऊन अर्थ-प्राणें ते मसलतीवर नमुद व्हावें. तत्रापि तुकोजीबावा गेले आहेत. त्यांच्या चित्तास विकल्प होय असें तुह्मीं येथें न करावें. तत्रापि श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर येत असतां आपण त्याप्रमाणें न करावें, हें उचित नाहीं. बाई बोलली जे, श्रीमंतही वरचेवर पत्रें पाठवितात. तुह्मीं येथें आह्मासी रागें भरून बोलतां. त्यास पहिलें पत्र श्रीमंतांचें आलें. ते वेळीं आह्मीं तुह्मांस सांगितलें आहे आणि आतांही सांगतों कीं श्रीमंतांची आज्ञा आह्मांस लक्षोपलक्ष वेळ शिरसा वंद्य आहे. सरकारचें पत्र आलें त्यापासूनच आह्मीं घालमेल मना केली. एक देपाळपुर व देवळें या दोही महालीं कमाविसदार पहिले होते तेच आह्मीं बाहाल केले. का कीं देपाळपुरचा कमाविसदार तीस चाळीस वर्षांचा, तो दूर करायास कारण कांहीं नव्हतें. तथापि बळवंतराव वांकडे याजकडील कमाविसदारांनीं पंचवीस तीस हजार रुपये वसूल घेतला आहे. तो कोणीं त्याजवळून घेतला नाहीं. त्याजकडेच ऐवज दिल्हा. देवळ्याचे पन्नास हजार रुपये तुकोजीबावानींच लांबहत्यास देविला आहे. असें असतां येथून तेथवर बोभाट, श्रीमंतांचीं पत्रें वरचेवर दो महालांसाठीं यावीं. देशी महाल आहेत त्या महालांचा पैका तिकडेच जात आहे. त्याचीं देशच्या महालांची अगर खानदेशच्या महालांची वगैरे महालांची आह्मीं घालमेल श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें आह्मीं कांहींच केली नाहीं. गुदस्तां विसा लक्षांच्या शिंद्यांच्या वराता आह्मांवर जाल्या. पुण्यांतील मसलतीवर होते ते समई साहुकारापासून कर्ज काढून लाखोंच रुपये खर्चास पाठविले. त्या सावकारांस व वरातदारास पैका दिल्हा पाहिजे कीं नको ? श्रीमंतांचे येथेंही फौजेचे कारभार होतात. तेथेंही सावकारांचीं देणीं घेणीं श्रीमंत करितात. जागां जागां सचोटी राखितात. तेव्हां दौलतीचे कारभार येवढाले चालिले आहेत. श्रीमंत सर्व जाणत आहेत. परंतु इतका निग्रह बळवंतराव वांकडे यांचा आहे. त्यांचा पैका वसूल जाला पाहिजे. या अर्थी त्यांची भीड ह्मणून वरचेवर श्रीमंतांस विनंती करून पत्रें पाठवितात. त्यांस मंत्रोपदेशीही दुसरेच आहेत. असो. श्रीमंत मसलतशीर आहेत; अधिक विस्तार काय बोलावे ? इतके दिवस श्रीमंतांस वर्तमान कळतच गेलें आहे. सविस्तर माहितगिरी श्रीमंतांस आहे. परंतु प्रस्तुत आतांचे पत्रीं आज्ञापिलें आहे कीं, तुकोजीबावा येतांना भेटून आले नाहींत ह्मणून चित्तांत राग कां आणावा ? असें श्रीमंतांनीं लिहिलें आहे. त्यास त्यांणीं सुलतानजी लांबहाते पाठविलेच होते कीं, भेटीस येतों. परंतु स्वामिचाकरीपेक्षां भेटीचें कार्य अधिकोत्तर नाहीं यास्तव आह्मींच येऊं दिल्हे नाहींत, कीं तुह्मीं साहेबचाकरीस जाणें. न भेटून गेले येविसींचा अन्यभाव आमच्या चित्तांत नाहीं. मुख्य स्वामिकार्य

आह्मांस अगत्य. तुकोजीबावा तर अद्याप खानदेशांत. आतांसे चांदवडास गेले असतील. अद्याप कोणत्या मसलतीस गेले नाहीं. खामखा वसईचें ठाणें कायम करायास गेले होते आणि तेथें दोहों महालची घालमेल ऐकून चित्ताची विक्षेपता होऊन मसलत टाकून पुन्हां चांदवडास आले, असें तरी जालें असतें तर हें असें श्रीमंतांचें पत्रें बरजाहा होतीं. असो. प्रस्तुत दोही महालची घालमेल जाली. अतःपर श्रीमंतांची आज्ञा मान्य. दुसरी घालमेल होणार नाहीं. येथीलही देण्याची वोढ सर्व श्रीमंतांस विदित आहे.' याप्रमाणें जाबसाल जाले.* इकडे शिप्री कोलारसावर चार पलटणें इंग्रजांचीं आहेतच. मागाहून आणखी चार पलटणें व कांहीं राजेरजवाड्यांचीही फौज तीन चार हजार ऐसें एकत्र होऊन कोव्यापलिकडे चारमजली शाहाबाजेस आले आहेत. पुढें या पलटणांस सामील होण्यास येतात ह्मणून येथें वदंता आहे. राजश्री बावा येथून बाईसीं करार करून गेले आहेत कीं तिकडील बंदोबस्त करून महिन्या पाऊण महिन्यांत लवकरीच येथें येतों. येथून देशास दरमजल श्रीमंतांच्या दर्शनास जाऊं, असा करार करून गेले आहेत. त्यास अलीकडे सरकारचीं पत्रें राजश्री नारो शिवदेव यांजकडे आलीं आहेत; आणि नारोपंतीं निरोप घेऊन देशास जात होते ते माघारी पाटीलबावांनीं बोलावून घेतले. यास्तव संदेह जाला आहे कीं, पाटीलबावांस तिकडीलच मसलतीची श्रीमंतांनीं आज्ञा दिली कीं काय असें भासतें. प्रस्तुत बाईनींही त्रिंबकजी इंगळे तयार केले आहेत. चार पांच हजार फौज देऊन हिंदुस्थानाकडे व पलटणाच्या तोंडावर पुढें पाठवणार. तेथेंही ओढ फार जाली आहे. देण्याचे फौजेचे व सावकारांचे गरगसे पडले आहेत. परंतु बाईचें लक्ष हा वेळपर्यंत श्रीमंतांकडेच आहे. दुसरा अर्थ किमपि नाहीं. याप्रमाणें इकडील वर्तमान. बाई आपलें स्मरण हरवक्त करीत असतात. दोन तीन वेळां मजला विचारिलें जे तात्या कोंकणांत गेले आहेत. त्या तात्यांचें पत्र येत नाहीं. तुह्मांस तरी पत्र येतें कीं नाहीं? मीं उत्तर केलें जे, एक पत्र आलें होतें, त्या तागाईत अद्याप पत्र आलें नाहीं. तिकडे लढाईचाही मजकूर शंभरा जागांची (फाटलें आहे.) बाई बोलली जे, त्याच ब्राह्मणांचा हक्क होय कीं हें दौलतीचें ओझें, धनी लहान, पदरीं पैका नाहीं, असेंही असतांना चारी संधानें राखितात. जो ज्याचा कागदपत्र येईल त्याचें स्मरणपूर्वक उत्तर देणें, चहूंकडील मसलतीचीं संधानें राखणें, हे आवरणशक्त त्यांचीच होय. असा बहुत

---

* या पत्रांतील येथपर्यंतचा मजकूर लेखांक ३८ च्या मजकुराची पुनरुक्ति आहे. लेखांक ३८ व ३९यांच्या तारखा भिन्न असून हा दुबार मजकूर कसा आला तें समजत नाहीं. हें पत्र मुळाप्रमाणें छापलें आहे, सबब हा दुबार मजकूरही तसाच कायम ठेविला आहे.

प्रकारें स्तव केला. कोणी येणाराबरोबर बाईसही एखादें पत्र येत असावें. चिरंजि-वांनीं लिहिलें होतें कीं, अद्याप कोठें अन्नाची सोय नाहीं. त्यास तात्या आपल्याशि-वाय आमचा वशिला कोण? लोकांच्या देण्याची व घरसंसाराची अन्नवस्त्राचें फार संकटांत आहे. आपण सर्व जाणतात. आपल्याशिवाय आमची गरिबाची ममता कोणास येईल? गरीब अनाथ स्वामींच्या पदरचे. असो. श्रीगजानन आपल्यावर कृपावंत असो हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती छ २८ मोहरम, इहिदे समानीन. **लेखांक ४०.** ता. १७ जानेवारी इ. स. १७८१. **श्रीगजानन.** मि० पौष वद्य ८ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ मोहरमपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतीपत्रीं लिहून काशीद-जोडीबरोबर व डाकेबरोबर रवाना केलीं आहेत. सांप्रत सरकारचें आज्ञापत्र छ १३ मिनहूचें डाकेबरोबर आलें तें छ २० मिनहूस येथें पावलें. पत्रार्थ पाहून वाचून बाईस वर्तमान सविस्तर विदित केलें. बाई बोलली जे, एतद्विषयीं श्रीमंतांनीं ममतापुर-स्कर चारपांच पत्रें तुह्मांस व दोन पत्रें आह्मांसही पाठविलीं. या अन्वयाचीं उत्तरें आह्मीही लिहून तुह्मांजवळीच दिलें आहे. तुह्मींही पाहिलें ऐकिलें तें लिहिलेंच असेल. मग हरघडीं तोच मजकूर श्रीमंत कशास लिहितात? असें बोलली. मीं उत्तर केलें जे, श्रीमंत मसलतशीर आहेत. तुकोजीबावा चाकरीस गेले आहेत. येथें आपण मामलतीची घालमेल केल्यानें येथें त्यांच्या चित्तास विक्षेप होईल. असें होऊं नये या अर्थी वारंवार आज्ञापत्रें येतात. 'गृहकृत्याचे जाबसाल होऊन येयास पुढें दिवस उदंड आहेत.' बाई बोलली जे, 'साहेबचाकरी घडून यावी हेंच आमचेंही लक्ष आहे.' इतका जाबसाल जाला. येथील देखिलें ऐकिलें वर्तमान स्वामी वारंवार आज्ञापत्रीं आज्ञापितात जे, बाईनीं सांगितल्यावरून तुकोजीबावांस चाक-रीस बोलाविलें आहे. यांतील अर्थ कीं, बाईच्या बोलण्याअन्वयें स्वामींनीं त्यांस बोलाविलें. पहिलें कितीक प्रकारचीं तापत्रयें गृहकृत्यें सेवेसी लिहिलीं आहेत. तो मतलब साराच गाळल्यांत आला. प्रस्तुत येथील मामलतीविषयींची घालमेल न व्हावी, तुकोजीबावांचें मन दुखवेल, येविषयीं ममता येथें. पेशजीं त्यांस खर्चास पाठविलें आहे व वरातदार शिंद्यांकडील वगैरे साहुकारांच्या देण्याचे दंगे धरणीं नित्य बसतात, येविषयींची ममता कोणास यावी? धन्याचे येथेंही फौजांचीं ठेवणीं व देणींघेणीं सर्व आहेत. त्यांचे निकाल व हिशेबकितेब पाहाणें, दिवाण कारभा-न्यांसीं विचार करणें, हें कामें हमेश परदरबारांत आहेत. स्वामी सर्व जाणतात.

असा राजमार्गाचा पथ तेथीलच. सर्वोठायीं उपदेश असे असतां तुकोजीबावा साहेबचाकरीस गेले हें उत्तमच आहे. परंतु येथून फौजेचा पुरवठा करणें अगर खर्चावेचाची त्यांची तरतूद करणें हें दिवाण कारभाऱ्यांनीं आह्मीं बसून आपलें घरदार देणें घेणें अदबशाद पाहून तरतूद करावी कीं नको? येविषयीं नारो गणेश यांनीं येथें यावें, आह्मांस त्यांनीं पुसावें, आह्मीं त्यांस सांगावें, त्यांनीं आह्मांस हिशेब दाखवावा, खर्चजमा आपले घरीं पाहावी, पुढें तरतूद करणें ते करावी. हे अन्वय सर्व पेशजी लिहिल्यावरून स्वामींच्या ध्यानांत आलेच असतील. परंतु राजश्री बळवंतराव वांकडे व रखमाजी दादाजी यांच्या सांगितल्यावरून तो सारा मजकूर गाळून हेंच वारंवार धनी लिहितात. येविषयींचें धनी काय उत्तर आज्ञापितात, तें श्रवण होयाचें मानस. दुसरें तुकोजीबावाच धनी. बाईचें या दौलतींत कांहींच नाहीं. जें नारोपंत सांगतील तेंच प्रमाण. असें असल्यास हेही आपली पुढें काय तरतूद करणें ते करितील. येविषयींची जी काय आज्ञा ते आली पाहिजे. नाहीं तर तुकोजीबावा चाकरीस आलेच आहेत. नारोपंतांस येथें पाठवावें. ते येथें आल्यास येथून सारेच गोष्टीचा पुरवठा तुकोजीबावांचा होईल. तुकोजीबावा एक चाकरीचेच धनी. कारभाऱ्यांच्या चित्तास येईल तसें यांनीं करावें. शेवटीं धन्याजवळ हाका माराव्या कीं, बाईनेंच सर्व आकर्षण केलें आहे. फौजेस देयास नाहीं. कर्जें जालीं आहेत. हे ( फाटलें आहे ) गुण. स्वामिसेवा धड होऊं नये. दरबारांत मनास येईल तर दरबारखर्च कारभाऱ्यांनीं करावे. त्या आशेनें सर्वत्रांनीं एकवाक्यताच धन्याजवळ बोलावी. तेंच प्रतिपाद्य व्हावें. दुसऱ्यावर दुरारोप स्थापावे अशी मुळचीच मर्जी असल्यास येथीलही ईश्वर समर्थ आहे. येथील मर्जी कीं, स्वामिकार्य यथास्थितप्रमाणें वडील करीत आलेत त्याप्रमाणें घडावें. तें कांहींच न घडतां, मनांत येईल, तें खर्च करून, शेवटीं स्वामिकार्यांत विघड पडावें, वडिलांच्या नांवास बट्टा लागावा, दुरारोप दुसऱ्यावर स्थापावे, इतकेही प्रकार स्वामींच्या ध्यानांत आहेत. परंतु त्यांचे भिडेस्तव व सर्वांचे एकवाक्यतेमुळें मुलाजा सर्वांचा तोडवत नाहीं, ह्मणून स्वामी वारंवार असें लिहितात. इतक्या राज्यांची आक्रमशक्ति व इंगितें स्वामींच्या ध्यानांत आहेत. हेंही इंगीत नकळे, असे कोण गोष्ट? इतके दिवस पाटीलबावांचा आश्रा जाला. आतां मुख्य स्थळीं आर्जव मांडलें आहे. परंतु धनी सर्वज्ञ आहेत. येविषयींचें मनन काय तें करून, मजकूर न गाळितां उत्तर आज्ञापिणार धनी समर्थ. दुसरा मजकूर लगट चार पांच पत्रें आलीं त्यांवरून येथें यांच्या चित्तांत वैषम्य फार वाढलें आहे. येथील तात्पर्य असें दिसून येतें जे, उज्जनी व महेश्वर एकदिल होऊन पुढें काय कर्तव्यता ते करावी. केवळ बोलण्यांत हें नाहीं. अंतस्थ मानस

असेंच दिसतें. इतके दिवस यांचे एकनिष्ठतेस व ममतेस अंतर देखिल्यां ऐकिल्यांत आलें नाहीं. प्रस्तुत सेवकाशींही आतां बोलण्याचालण्यांत पडदासा दिसतो. आपल्या चित्तांत फार श्रमी आहेत कीं, श्रीमंतांस दिवाणाचें अगत्य पडलें. त्याच्या सांगितल्यावर तेंच खरें असें मानून आमचे ठायीं अनास्था. कोणे वेळेस बोलण्यांत आलें आहे कीं, शिंद्यांनीं बायकांच्या भेखा खांदाडीस दिल्या, तसें येथें होणार नाहीं. सुभेदारांच्या पुण्यप्रतापें जें घडणें तें यथायोग्यच घडेल. असें दोन चार वेळां भाषणें जालीं आहेत. प्रस्तुत राजश्री बाजी विठ्ठल व आपाजी गिते काल उज्जनीस गेले आहेत. ऐकिल्यांत तों आलें आहे कीं, पाटीलबावांस येथें बाईनीं बहुत प्रकारें सांगितलें आहे कीं, श्रीमंतांवर मसलत भारी, यास्तव सर्व कामें टाकून फौजेसुद्धां तिकडे जावें. त्यांनींही कबूल करून गेले आहेत कीं, तिकडे बंदोबस्त करून एक महिन्या पाऊण महिन्यांत येतों. तें वचन बळकट आहे किंवा नाहीं, यास्तव बाजी विठ्ठल गेले आहेत असें ऐकितों. इकडील वर्तमान इंग्रेज शिप्री कोल्हारसावर चार पलटणें आहेत व कोटें प्रांतीं चार पलटणें आलीं आहेत ह्मणून वदंता व केसो कृष्ण ईश्वरवाडीस आहे. नंदुरबादेपासून बारा कोसांवर आहे. दोन हजार जमाव आहे व मागाहून तीन पलटणें व चार हजार फौज गायकवाडांची ऐसे सोनगडावर आले. हें खरें वर्तमान आहे. पायगड प्रांतींही दोन तीन पलटणें आलीं ह्मणून वदंता आहे. खानदेशांत नंदुरबार सुलतानपुर वगैरे तमाम लोक पळतात. याप्रमाणें इकडील वर्तमान. मणिराम शेवगांववाले ह्यांनीं हरकुबाईचे दहा लक्ष रुपये घेऊन गेले आहेत. तेही नारोपंताची पाठ निघाले आहेत. हरकुबाईनें दोन चार पत्रें त्यांस इंदुरीं व येथें त्यांस पाठविलीं कीं, भेटीस येणें. तेही यांस न भेटतां गेले. प्रस्तुतची रीत अशी जाली आहे ह्मणून बोलत होती. याविषयीं पेशजींही मीं विनंती लिहिली होती. स्वामींच्या ध्यानांत असेल. याप्रमाणें मीं लिहिलें ह्मणून स्वामी रागें भरतील कीं काय? परंतु देखिलें ऐकिलें वर्तमान लिहिलें तर स्वामी रागें भरतील. या पत्राचें उत्तर तपशीलवार येण्याविषयीं लेखकास आज्ञा करणार धनी समर्थ. मर्जीस आलें तर बाईस पत्र समाधानयुक्त यावें. केवळ मनोकल्पित वर्तमान लिहिलें असें नाहीं. बाईचे रुबरू.मुत्सद्दी मंडळीशीं सेवकासीं जाबसाल जाले. तें तपशीलवार वर्तमान सेवेसी लिहिलें असे. राजश्री त्रिंबकजी इंगळे यांस छ १९ रोजीं बाईनें वस्त्रें दिलीं. तीन हजार फौज तयार करून त्यासमागमें देऊन हिंदुस्थानांत रवाना केले. एका दो दिवसां येथून कूच करून जातील. आणखीही फौज ठेवून त्यांजकडे पाठविणार. प्रस्तुत कामाकाजांत बाईजवळ राजश्री माधवराव गंगाधर आहेत. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति."

## ३३. आनंदीबाईचीं आणखी दोन पत्रें.

आनंदीबाईचीं दोन महत्त्वाचीं पत्रें १९ नंबरच्या टिपणामध्यें छापलीं आहेत. आणखी दोन पत्रें येथें देतों. हीं पत्रें अनुक्रमें नाना व सखारामबापू ह्यांस सवाई माधवरावांच्या जन्मानंतर लिहिलेलीं आहेत. ह्यांवरून बाईचा मानी स्वभाव आणि शहाणपणाचा अभिमान थोडासा दिसून येतो.

### लेखांक १.

**श्रीशंकर.** ता. २९ एप्रिल इ. स. १७७४.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नाना यांसीः—

प्रति सौ॥ आनंदीबाई आशीर्वाद. विनंति उपरी येथील ता॥ अधिक वैशाख वद्य ३ पर्यंत मु॥ ब्ऱ्हाणपूर येथें वर्तमान यथास्थित असो विशेषः-तुह्मांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. हें अपूर्व आहे. सर्वदा पत्र पाठवून संतोषवीत जावें. चिरंजीव नारायणराव यांस पुत्र जाहल्याचें वर्तमान तिकडे हुजूर ल्याहावें आणि आह्मांस न ल्याहावें, असा तुमचा आमचा ऋणानुबंध आह्मांकडून नाहीं. तुह्मांकडूनही नसेल असें आह्मांस वाटतें. असें असोन चार पांच महिने पत्र न यावें हें काय ? कदाचित् आह्मांस ह्मणाल कीं, आपण पत्र पाठविलें नाहीं. तर मागें एक दोन पत्रें देशांत कोणास लिहिलीं ? ते जासूद माघारे आले नाहींत; यास्तव आह्मीं पत्रें पाठविलीं नाहींत. तुह्मीं पंधरा दिवसांचे अंतरानें पत्र वरचेवर पाठवीत जावें. *किल्ल्याची हवा बहुत सरद आहे. लेंकरू लहान, यास्तव तुह्मी व राजश्री सखाराम बापू उभयतां विचार करून, ज्या जाग्यास या गोष्टीनें लेंकरास सुख पडे तें करावें. तुह्मांसही याजविसीं काळजी आहेच. आह्मीं ल्याहावें असें नाहीं. थोरपणाची रीत हीच आहे कीं, कोणासीं कोण्याही गोष्टीविसीं बहुत वेढूं नये. चुणूक दाखविण्यांत चमत्कार आहे असें आह्मांस वाटतें. परंपरा पाहोन, योग्य असेल तो अर्थ समजून घ्यावा. सूचना मात्र लिहिली आहे. बहुत काय लिहिणें हे विनंति."

ह्याच विषयासंबंधानें दुसरें पत्र सखारामबापूंस लिहिलें आहे. बापूंच्या पत्रांत बाईची भाषा किती खोंचदार आहे, हें वाचकांस दिसून येईलच.

### लेखांक २.

**श्रीशंकर.** ता. २९ एप्रिल इ. स. १७७४.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखारामपंत यांसः—

प्रति सौ॥ आनंदीबाई नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत अधिक वैशाख वद्य ३ पर्यंत मुकाम ब्ऱ्हाणपूर येथें सुखरूप असों विशेष. आह्मीं आल्या तागाईत पत्र पाठवून वर्तमान कळत नाहीं; तर हें अपूर्व आहे. सर्वदा पत्र पाठवून

* श्रीमंत सवाई माधवराव पुरंदर किल्ल्यावर जन्मले, तेथील हवा सर्द आहे असा अर्थ.

संतोषवीत जावें. चिरंजीव नारायणराव यांस पुत्र जाहाला ह्मणून तिकडेस पत्र ल्याहावें आणि आह्मांस न ल्याहावें, ऐसा पहिल्यापासून तुमचा आमचा ऋणानुबंध चालत आला कीं काय, हें स्मरण करून या पत्राचें उत्तर लिहून पाठवावें. आह्मांस पत्र पाठवावें किंवा न पाठवावें हे विचार तुह्मां आह्मांमध्यें नाहींत. असें असोन न पाठविलें! बरें, असो. आतां या पत्राचें उत्तर जलद पाठवून द्यावें. आह्मांस नातू जाहला ह्मणून पत्रें घेऊन खिजमतगार आले (?) त्यास येथें इनाम सोन्याचीं कडीं द्यावीं; परंतु येथें तयार नवतीं. करून द्यावीं तर मजलदरमजलीमुळें फावत नाहीं. यास्तव तुह्मीं तेथें दोघांस दोन कडीं सोन्याचीं आमचे वरचीं द्यावीं. बहुत काय लिहिणें. चिरंजीव बाळाचा समाचार नित्य घेत जावा. वरचेवर लिहून पाठवीत जावें. बहुत काय लिहिणें हे विनंति. तुमच्या नांवास व वयास जें योग्य असेल, तें याउपरी तरी करावें. केलेंच असाल. केलें नसिलें तर सूचना लिहिली आहे. तुह्मी आमचें थोडें बहुत आईकत असतां. आह्मांविषयीं न आईकावें ह्या अभिमान धरीत नाहीं, ह्मणून लिहिलें आहे. तुह्मांकडेस वडीलपणा आहे. योग्य असेल तें करा. दुर्लौकिक न होतां काय करणें हेंच तुह्मांसारिख्यास योग्य, असें असून अधिक जाहाले! अतः-पर जें करणें तें समजून करावें. पत्र वाचून मनांत अर्थ पुर्ता घ्यावा. बहुत काय लिहिणें हे विनंति.''

* * *

## ३४. मराठे सरदारांच्या शिपाईगिरीची तारीफ.

कोणतेंही युद्ध किंवा मोहीम झाली ह्मणजे त्यावरील मुख्य सेनापतीनें पेशव्यांकडे रणांगणावर शर्तीची तरवार मारून स्वामिसेवा केलेल्या सरदारांची तारीफ करण्याचा पूर्वीपासून प्रघात असे. मग त्या शिफारसीप्रमाणें श्रीमंतांकडून त्या रणशूर योद्ध्यास, किंवा तो धारातीर्थीं पडला असल्यास त्याच्या मुलास बक्षीस मिळत असे. कर्नाटकावरील मोहिमीमध्यें हरिपंत फडके मुख्य सेनापति असत. त्यांनीं अशा सरदारांबद्दल लिहिलेलें एक शिफारसपत्र मासल्याकरितां पुढें दिलें आहे. ह्यामध्यें मालोजी घोरपडे *मुधोळकर, आपाजीराव पाटणकर आणि यशवंतराव माने

* मुधोळकर मालोजी घोरपडे हे पेशवाईमध्यें फार जुने व रणशूर योद्धे होते. ह्यांची कारकीर्द सुमारें इ. स. १७१६ पासून इ. स. १८०५ पर्यंत झाली. ह्या अवधीमध्यें त्यांनीं किती तरी लढाया जिंकल्या असतील. असें सांगतात कीं, त्यांनीं कोणतेही लढाईमध्यें शत्रूस पाठ दाखविली नाहीं. त्यांच्या उजव्या बाजूस एकंदर ९६ जखमा झाल्या होत्या. असो. मालोजी घोरपडे हे हरिपंत फडक्यांच्या बरोबरीचे सरदार होते. टिपूवरील व कर्नाटकांतील स्वाऱ्यांमध्यें त्यांनीं अनेक वेळां आपल्या शौर्यपराक्रमानें विजय मिळविला होता. त्यांच्या शिपाईगिरीबद्दल हरिपंतांनीं नानांस अनेक पत्रें लिहिलीं आहेत. ह्या मराठे सरदाराचें चरित्र फार महत्वाचें व वीररसप्रचुर आहे.

ह्मसवडकर ह्यांच्या शिपाईगिरीबद्दल उल्लेख असून, त्यांचा बहुमान करण्याबद्दल नानांस शिफारस केलेली आहे. मुधोळकर मालोजी घोरपडे ह्यांच्याबद्दल सर्वांत अधिक उल्लेख असून त्यांच बहुमान विशेष करावा अशी तारीफ केलेली आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"विज्ञापना:— राजश्री मालोजी घोरपडे जखमी. घरास जाऊन दोन महिने उपाय जाल्याखेरीज बरें होणार नाहीं, याजकरितां निरोप दिला, व आपाजीराव पाटणकर यांस समाधान नाहीं, ह्मणोन निरोप दिला. यशवंतराव माने पांच वर्षे घरास गेले नाहींत. ह्मसवडचा बंदोबस्त जाला नाहीं, ह्मणोन निरोप दिला, गुदस्तांची नालबंदी[1] सवाची देणें. त्यास ज्यांणीं निरोप घेतला, त्यांचे समजावीस नालबंदीचा फडशा करून वराता दिल्या आहेत. वरकडांच्या मागाहून येतील. थोरले फौजेचे फडशे केले पाहिजेत. गुदस्ताची नालबंदी पावली पाहिजे. लोकांनीं चाकरी मेहेनतीस अंतर केलें नाहीं. आपाजीराव, मालोजी घोरपडे, यशवंतराव माने स्वामीसन्निध येतील, त्यांचा बहुमान करावा. आपाजीरायांस व घोरपड्याकडील राघोपंत पानसी यांसी सविस्तर बोलिलों आहों. विनंति करतील. मालोजी घोरपड्यांनीं शिरा[2] तरवार मारली. दोन वेळां जखमा लागल्या. परंतु वस्त्रें बहुमान कांहीं घेतला नाहीं. त्यांस तेथें आल्यावर वस्त्रें द्यावीं, व बहुमान एक मोत्यांची कंठी चांगली द्यावी. ते निरोप घेतात ते समयीं चौकडा पावत असतो. मागील दाखला दप्तरीं निघेल. त्याप्रमाणें देवावा. पैक्याचाही निकाल, कांहीं तूर्त, कांहीं मुदतीनें, याप्रमाणें निकाल करून, निरोप देऊन उमेदवार करणार धणी समर्थ आहेत. शहाजी नाईक निंबाळकर प्रथम दिवशीं लढाईंत पडले. त्यांस पांच हजारांचा गांव इनाम द्यावा असें सर्वांचे रजबदलीनें जालें. इतकें द्यावयाचें नव्हे. परंतु मालोजी घोरपडे यांनीं फारच रजबदल केली, यामुळें ऐकावें लागलें. आपाजीराव विनंति करितील. बहुमान केला पाहिजे. वरकड फौजेचे नालबंदीचा पैका कधीं पावेल, वराता कशा कराव्या, ते आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

* * *

## ३५. सुप्रसिद्ध ताराबाई.

सातारचे छत्रपति राजाराम महाराज ह्यांची पत्नी महाराणी ताराबाई ही इतिहासप्रसिद्धच आहे. हिच्या सारखी महत्त्वांकांक्षी व राजकारस्थानी स्त्री महाराष्ट्रस्त्रियांत क्वचितच सांपडेल. हिच्या संबंधाच्या महत्त्वाच्या व राजकीय अशा अनेक गोष्टी अद्यापि अप्रसिद्ध आहेत. हिचीं पत्रेंही फार महत्त्वाचीं आहेत. त्यांपैकीं एक पत्र मासल्याकरितां येथें देतों. ह्या पत्रामध्यें तिनें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांस कसें निरुत्तर केलें आहे, तें दिसून येईल.

---

१ नालबंदी=फौजेचा खर्च. २ शिरा=शिरें मुक्कामीं. शिऱ्याची लढाई प्रसिद्ध आहे.

श्री.

"श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांणीं राजमान्य राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली ऐसिजेः–तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहाला. कैलासवासी चिरंजीव यांनीं एकच तालुका सांगोन सेवा घेतली. त्यामागें साहेबीं सेवकावर कृपा करून सर्व राज्यभाराचा एखतियार दिल्हा. सेवकानें दीड वर्षे जीं जीं कार्यें केलीं, तीं आज्ञेनेंच केलीं. तेणेंकरून सर्व स्नेहतेसीं आज्ञेच्या वर्तणुकेमुळें विक्षेप वाढले. या प्रसंगीं सेवक हुजूर आला असतां साहा महिन्यांत विक्षेप वाटला असेल त्याचा अर्थ करावयाबद्दल साहेबीं इतबारी कोण्ही पाठवावा, अगर सेवकास आज्ञा केलीयानें आपले तर्फेनें कोण्ही पाठवून देऊं. यासी तुह्मी एकनिष्ठ सेवक. याल तर राज्यकारभाराचा अखत्यार तुह्मांस आहे. असें असतां जीं जीं कार्यें जालीं तीं तुह्मी साहेबांचें आज्ञेनेंच केलीं असतां, विरुद्ध कायबद्दल दिसोन आलें. आणि संपूर्ण दिल्ली रामेश्वरपर्यंत लौकिक स्वामिसेवकभावाचा जाहाला ? हेही कर्तव्यता जाली ती आज्ञेनेंच जाली ! तस्मात् दिसोन आलें जे, ह्या काळपर्यंत जीं जीं कार्यें जालीं, तीं साहेबांचे आज्ञेवरून जालीं. आतां इतबारी कोण्ही पाठवावा, त्यानें याच गोष्टीचा परिहार ऐकून यावें. त्यासी तुह्मी एकनिष्ठ सेवक. आज्ञेनें वर्तलां. त्याचें प्रमाण इतकें जे, या समयीं तुह्मीं फौजसुद्धां येऊन परिघ घातला आहे, तो उठवून तुह्मीं स्वस्थळास जावें. तदनंतर जे बोलणें असेल तें सांगोन, हर कोणी आपले तर्फेनें पाठवून द्यावा. त्यासीं जाबसाल करावें तो केला जाईल. येणेंकरून लौकिक उभय पक्षांचा उत्तम. स्वामिसेवकभावमर्यादाही राहिली. पूर्वी लौकिक जाहला आहे त्याचेंही परिमार्जन या गोष्टीनें होतें. तुह्मी मातबर सेवक. वडिलांचा अव्हेर करावा ऐसा किमपि साहेबांच्या चित्तांत अर्थ नाहीं. जाणीजे. छ १७ जमादिलाखर बहुत काय लिहिणें सुज्ञ असा ( लेखनसीमा )."

❋ ❋ ❋

## ३६. सुरतेचें राजकारण.

सुरत येथें मराठ्यांनीं आपलें ठाणें कायमचें बसविलें नव्हतें. तथापि, तेथील बंदरची कौलावण वगैरेवर त्यांनीं आपला हक्क ठेविला होता. खुद्द सुरतेच्या किल्ल्यांत मराठ्यांचा अंमल नव्हता. तथापि, सुरतेच्या सभोंवतालच्या प्रांतावर त्यांनीं आपली चौथ बसविली होती. सुरतेचा नबाब तेगबख्तखान ह्याच्या कारकीर्दींत (इ स. १७३३–१७४६) मराठ्यांनीं तेथें प्रवेश करून नबाबाशीं तह करण्याचा प्रयत्न केल्याचें दिसून येतें. नबाब तेगबख्तखान ह्यानें आपला भाऊ बेगलरखान ह्यास सर्व अधिकार देऊन सुरतेच्या किल्ल्याचा नायब नबाब केलें होतें. ह्याच्याशीं शंकराजी केशव, वसई प्रांताचे सरसुभे, ह्यांनीं राजकारण जुळवून, तहाचा घाट घातला होता. ह्या तहासंबंधाचें त्यांनीं बाजीराव पेशवे ह्यांस इ. स. १७३५–३६ चे सुमा-

रास लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें महत्त्वाचें व मनोरंजक असल्यावरून येथें सादर केलें आहेः—

श्री.

"सेवेसी विनंतिः—सुरतेस बेगलरखान व सबदरखान व फारसखान व हरि किसनदास यांस पत्रें पाठवावीं कीं, सुरतेच्या तहाचा एखत्यार शंकराजीपंतांवर आहे. ऐशीं पत्रें पाठवावीं ह्मणजे ते बोलों ह्मणतात. ह्मणोन सेवेसी लिहिलें होतें. त्यास स्वामींनीं आज्ञापत्रीं लिहिलें कीं, तुह्मी तहाचा विचार त्यांसीं काय बोललां, ते काय ह्मणतात, तें सविस्तर विदित जालियावर पत्रें पाठवणें तीं पाठविलीं जातील ह्मणोन लिहिलें. त्यास सारांशः—सुरतेचे शहरांत वाजवी पाहातां सरकारचा तालुका नाहीं. दर्यांत मात्र सरकारचा कौलावणीचा अंमल आहे. त्यास पक्के दाहा मण बारदर गलबतावर चढला, तर त्याची सुरती खंडी होते. त्यास कौलावण पेशजीं करार सुरतेचे हकिमांसीं जाला, तेव्हां सुरती दर खंडीस रुपये ·॥· निम व शंभर खंडी नजर रुपये १० दाहा प्रमाणें जाला. त्यास ते समयीं सिद्धांत आह्मांकडून न जाला. याजमुळें सुरतेचे तरांडियांस सालगुदस्तांपासून सुरती दरखंडी रुपये १ एक प्रमाणें व शंभर खंडींस नजर रुपये १० दाहाप्रमाणें घेतों. येथील मामल्यास तोटा. यास्तव हा अर्थ चित्तांत आणून, दोन तीन वर्षे त्यास धमक देऊन लिहितों कीं, रायगड किल्ला सरकारांत आला, त्याची जहागीर एक लाख रुपये सुरतेस आहे. तर, तनखा घेऊन व दर्याराहा, जलमार्गें माल येतो जातो, त्याची जकात सुरतेचे बंदरीं होते. खुषकीचा अंमल गायकवाडाकडे आहे. जलमार्ग दर्या सरकारचा अंमल, यास्तव नखतवर आह्मी चौथाई सरदेशमुखी घेऊं. ऐशीं पत्रें सुरतकरांस पाठविलीं. त्यास ते ह्मणूं लागले कीं, तनखा पादशाही सनदेखेरीज शहरांत देवत नाहीं, सनद आणा. त्यास जाबसाल पाठविले कीं, जे समयीं कैलासवासी श्रीमंत राजश्री नानासाहेब सैदासमागमें दिल्लीस गेले, तेच वखतीं चौथाई सरदेशमुखीची सनद आणिली. त्याच सनदेवर आज तागायेत तमाम हिंदुस्थान पावत, सरकारचा अंमल ज्यारी जाला. सरकारास फेर सनद आणावी लागत नाहीं· हे सुदायँत सरकारची आहे. तुह्मी अंमल न द्या, तरी मंडलें व वोडसें बुंदेले यांची गत होईल. ऐसें कितेक प्रकारें दबाव टाकिले. त्यास ते ह्मणतात कीं, आह्मीं काय ह्मणोन तनखा द्यावा ? त्यास पूर्वींच कांहीं बसलें असतें; परंतु सैद नाखुदा होता, त्यानें दरम्यान सुरतेस लिहिलें होतें कीं, शंकराजीपंतावर येखत्यार नाहीं. यांचें ह्मटलें आईकों नका. त्यावरून त्यास तें खरें भासलें होतें.' त्यास अलीकडे एक दोन वेळां, गुदस्ता सरकारचा वकील सुरतेस आहे त्याजपासीं, त्याचे कारभारी बोलिले कीं, शंकराजीपंत ह्मणतात त्यास येणेंप्रमाणें करून देऊंः—

१ तालुका=प्रांत, मुलूख असा मूळ अर्थ. येथें अर्थ अंमल. २ हकीम=मालक, अधिकारी, नबाब. ३ दर्याराहा=दर्याचा रस्ता, समुद्रांतील मार्ग. ४ नानासाहेब=बाळाजी विश्वनाथ पेशवे. ५ सैदासमागमें=सय्यदबंधूंबरोबर (इ. स. १७१७). ६ सुदायत= हक्क, अधिकार.

१ तनखा सालबसाल[1] पन्नास हजार ५००००.— कलम १.
१ वकील सुरतेस दाहा माणसांनसीं राहील.— कलम १.
१ सरकारच्या जिनसास पन्नास हजारांचे मालाची जकात माफ— कलम १.
१ सुरतेचे तरांडियांनीं कौल घेऊन आमदरफ्ती करावी. त्यास कौलावण बसली आहे त्याप्रमाणें. कलम १.

येणेंप्रमाणें तह करून घ्यावा. हा विचार गुदस्तां त्यांचा एक वेळ बोलिले. फिरोन बोलतनासें जालें. त्यास येंदा साल मजकुरींही धमका दिल्या. त्यावरून बोलिले कीं, आधीं शंकराजीपंतावर येखत्यार तहाचा आहे ऐसीं पत्रें हुजूरचीं आणा, ह्मणजे मग बोलों. ह्मणोन खबदरखान आपले जबानीनें बोलिले. त्यावरून सेवेसी लिहिलें. त्यास पत्रें न आलीं. दिसगत लागली. याजमुळें जो भला माणूस दरम्यान आहे, त्यांणीं एक दोन वेळां लिहिलें कीं, पुतळाजीस पत्रें देऊन पाठवा. त्यावरून हल्लीं हें सविस्तर लिहिलें आहे. त्यास पत्रें येणेंप्रमाणें खामखा पाठवावीं:—

| | |
|---|---|
| १ बेगलरखान | १ हरिकिसनदास कारभारी. |
| १ सफदरखान | १ सैद महमद हादी. |
| १ फारसखान | १ सिद्दी मसूदखान. |

एकूण साहा पत्रें पाठवावीं कीं, सुरतेचे बोलीचालीचा तहाचा येखत्यार मशारनिल्हेवर सोंपिला असे. बोलीचालीचा करार बनोन येईल त्याप्रमाणें चालेल. ऐसें त्याहावें. सेवकास इतकें करणें कायबदल (कीं) या मामलियास तोटा तो साधावा. पायेंडा[2] करून घ्यावा. अरमारासही पैदास्त[3] नाहीं. हें जालें तरी उत्तम. यास्तव सेवेसी लिहितों. विदित होय. पत्रें आलियावरी आपला वकील तेथें पाठवून बोलीचाली जोंपावत ठरेल, तोंपावत ठरावूं. अशांत जालें तरी होईल. पुढें नबाब निजामनमुलूक सुरतेस जाणार हा विचार आहे. त्याचा यांचा आपला एखलास[4] असिला तरी पुढें कितेक गोष्टी याजवरी नबाब गेलेच तरी घडोन येतील. समय यांसीं पडिला तरी कुमक उपराळा[5] सख्यत्वामुळें मागतील. तदनसार पुढें होणें तें होईल. यास्तव पत्रें पाठवावीं. सेवेसी लिहिलें असे. हें पत्र पावतांच पत्रें पाठवावीं हे विज्ञापना."



## ३७. नानांच्या आयुष्यांतील संकटप्रसंग.

नाना फडणविसांनीं आपल्या आयुष्यामध्यें कसकसे संकटप्रसंग आले व ते परमेश्वरकृपेनें टळले, त्याचें एक स्वदस्तुरचें टांचण केलें आहे. तें वाचण्यासारखें आहे.

श्री.

"श्रीं हरिहरात्मक ब्रह्मउभयतां देव मजवर कृपा करतात, ती वर्णवतां बुद्धि चालत नाहीं. दान, तप, योग, परोपकार, पूजा, ध्यान, सेवा कांहींएक घडलें नाहीं, व शास्त्रविषय धर्मशास्त्र आदिकरून कांहीं नसतां, कृपासमुद्र, दीनदयाळ, भक्तानुकंपी शरण्य ह्या नामाचें सार्थक माझे ठाईं केलें.

---

१ सालबसाल=प्रतिवर्षी. २ पायेंडा=पायंडा=प्रवेश करण्यासाठीं आधार, प्रवेश. ३ पैदास्त=प्राप्ति, मिळकत. ४ एखलास=स्नेह, दोस्ती. ५ उपराळा=मदत (सैन्यद्वारें).

१ नावेंत वाहात होतों, तेथें उदकापासून नाव बुडत असतां व नावधारी यांणीं आपला उपाय नाहीं, पुढें जवळ खडकावर फुटणार, तों नाव काढून वांचविलें.

त्रिभ्रत करणाचे तीन प्रकार लिहिले. यावितरिक्त १ पाणिपतावर बारा तेरादा शत्रूशीं गांठ पडली. जवळील मनुष्यें मारलीं. मला वांचविलें.

१ नारायणरायाचे वेळेस गाडद्यांकडून वांचविलें.

१ दादासाहेबांस बुद्धि चांगली देऊन रक्षिलें.

१ पुरंदराचे समयीं. २ नारायणरायास मारल्यावर. ३ रावसाहेबाचा मोड होऊन पेंचांत आल्यावर.

१ ज्योतिषशास्त्रास एकीकडे ठेवून रक्षिलें.

१ तळेगांवावर मसलत निघतांच दिवा गेला. २ करंडा हारवला. ३ पक्षी डेऱ्यावर बसला. तीन अपशकुन मातबर झाले असतां शत्रुपराभव करून यश दिल्हें.

१ पुरंधरास गेलियावर, 'द्वादशाष्टमजन्मस्थशनिरंगारको गुरुः' असें अनुक्रमें जालें असतां, त्याचें वाईट फळ होऊं न देतां चांगलें दिल्हें.

१ मंत्रशास्त्र्यांकडून शत्रूंनीं बहुत अनुष्ठानें करविलीं व खतां केलीं. परंतु माझें वाईट न होऊं देतां, उरफाटीं शत्रूचींच वाइटें होऊन नाश जाहाले.

१ एके मांत्रिकास सप्तशृंगची देवी तेथेंच दृष्टांत दाखविला कीं, मोरोबाचे अनुष्ठानें फल होणार नाहीं; करूं नको. नानाकडून केलें असतां फल होऊन तुझें कार्य होईल. त्याप्रमाणेंच जाहालें.

१ एक मांत्रिकास आमचे वाइटाविसीं मंत्रदेवताच स्मरेनासें झालें.

१ घोड्यावरून पडलों तेव्हां दोन दिवस भान नाहीं. हें पृथ्वीपासून वांचविलें.

१ दिवाणखान्यांत रुजाम्यावर दिव्याचा कोळी अवशीचे प्रहर रात्रीस पडला. बाहेरून कवाडें लावून कुलूप घातलें. आंत रुजामा पेटला व रुदार पडदा पेटला. त्याणें सुरुदार लांकडी खांब थोडासा जळत होता. दुसरे दिवशीं प्रहर दिवसास झाडावयास ह्मणोन कवाड उघडलें. पाहातात तों रुजामा चार हात व पडदा दोन हात जळाला. हळू हळू जळतो. अग्नि बारीक ह्मणावा तर रुवास जाळण्याचा दृष्टांत देतात. व लांकडाचा खांब दोन बोटें जळाला. याप्रमाणें अग्नि असतां रुजाम्यावर हळू चालतो. सा घटकांत अगदीं दिवाणखाना पेटल्यावर बाहेर कळावें, असें प्रकारचें असतां चार प्रहर चार हात रुजामा जळतो. माणसास बुद्ध कवाड उघडावयाची देऊन विझवून टाकविलें.

१ गंगाबाई गरोदर असतां बुद्ध त्यांस काढून न्यावयाची देऊन कीर्ति करून दाखविली. दादासाहेबांजवळ पन्नास हजार फौज असतां अशी बुद्धि दिल्ही. पुढें पुत्र कीं कन्या याचा निश्चय नाहीं. मारलेंच जावें. परंतु कृपा करून रावसाहेबांचा जन्म होऊन सर्वांनीं अतर्क्य कर्म केलें असें ह्मणविलें.

१ मोरोबा होळकर यांस सखारामपंतांनीं क करून अवघे मातबर त्यांत मिळाले. मी एकटा. परंतु सर्वांचीं पारपत्यें यथायोग्य करवून माझें थोरपण वाढविलें. राज्यांतील शाहाणे एकीकडे. त्यापुढें मीं एकट्यानें काय करणें. परंतु ईश्वरानें केलें.

१ दंगे करणारांनीं केले:— १ बळवंतराव पटवर्धन वगैरे मंडळी मिळून. १ बाळाराव यांणीं बऱ्हाणपुरावर. १ बाबूजी नाईक यांणीं तोतयाचे समयीं. १ पुरंधरप्रकरण. १ खंडेराव लिंबाजी वगैरे. १ आनंदीबाई.

ह्या दंग्यांपासून रक्षण करून तितक्यांचीं पारपत्यें ईश्वरानें केलीं."

* * *

## ३८. दादासाहेबांचें पाटीलबावांशीं कारस्थान.

श्रीमंत राघोबादादा पेशवे ह्यांनीं महादजी शिंदे ह्यांस पुढें लिहिलेलें पत्र फार महत्त्वाचें आहे. ह्यावरून दादासाहेबांनीं पाटीलबावांकडे कसें सूत्र लाविलें होतें तें दिसून येतें:—

श्री. ता. २८ एप्रिल इ. स. १७७८.
मि० वैशाख शुद्ध २ शके १७००.

"राजश्री महादजी शिंदे गोसावी यांस:—

सकलगुणालंकरण अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्ने॥ रघुनाथ बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष:— तुह्मीं येसू गायका व लक्ष्मण घाटगा याजबराबर पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें; व उभयतांचे जबानीं सांगोन पाठविलें कीं खासा स्वारी बाहेर निघणार, तरी मजबुदीनें निघावी. ह्मणून कितेक निष्ठेचे अर्थ व जामगांवास यावयाचा मजकूर सांगोन पाठविला, तो विदित होऊन बहुत संतोष जाहाला. त्यास विलायेतेचा हुकूम सरकारकुमकेविसीं मुंबईकर जनराल कोषलास आला; व बंगाला, मदराजेस ताकीद आली. हुजूरच्या कुमकेविसीं बंगालेकर निक्षून पल्लयावर येऊन मुंबईकरास त्यांचीं पत्रें आलीं. प्रयागपर्यंत बंगाल्याचीं पलटणें येऊन पोहोचलीं. त्यास पुण्याकडून राजश्री तुकोजी होळकर व बजाबा पुरंधरे व मोरो बाबूराव यांणीं निष्ठा धरून सरकारसेवा केली. पुण्यांत सरकाराची द्वाही फिरवून बंदोबस्त केला. तेव्हां बंगाला व मदराज येथील इंग्रजी फौजेचा दरकार नाहीं ह्मणून मना करविली; आणि मुंबईपैकींच इंग्रजी सरंजाम सुद्धां बाहेर निघावयाची तयारी जाहाली. परंतु सखाराम भगवंत यांच्या व त्यांच्या भेटी जाहल्या. नंतर निष्ठेत अंतर दिसोन आलें. गोपाळ नाईक तांबेकर यांजकडून कांहीं बोलावयास हुजूर येणार, याजमुळें त्यांचे विपरीत भाव समजण्यांत आले, तेव्हां अंग्रेजी जाजती फौज पाहिजे. सबब कांहीं मदराजेहून फौज आणविली आहे. त्याची प्रतीक्षा करीत आहों. आणीकही दरकार पडल्यास बंगाल्याहून फौज आणवूं. तुह्मीं कोल्हापूरचे मसलतीचा निकाल पाडला आहे; तरी याउपरी तुह्मीं फौजेस निरोप न देतां जामगांवास येऊन राहावें. सरकारलक्षांतील कितेक फौज आहे, ते तुमच्या फौजेंत राहातील. खासा स्वारी अंगरेजी जमीयत व जंगी सरंजामसुद्धां बाहेर निघतांच अगोदर तुह्मांस सूचना केली जाईल. त्याप्रमाणें तुह्मीं हुजूर येऊन पोहोंचावें. जाणीजे. छ १९ रबिलावल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।

पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] मार्च १९०९. [अंक ८ वा.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें

तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत

बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं

मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# ३. मस्तानीचा शेवट कसा झाला?

मस्तानी ही सौंदर्यवती स्त्री बुंदेलखंडाच्या छत्रसाल राजाची दासीकन्या होय. श्रीमंत थोरले बाजीराव पेशवे ह्यांनीं इ. स. १७२९ सालीं बुंदेलखंडावर स्वारी करून बंगसखानाचा पराभव केला, त्या वेळीं छत्रसाल राजानें त्यांच्यावर संतुष्ट होऊन त्यांस ही नजर केली. तिच्यावर बाजीराव पेशवे ह्यांचें फार प्रेम जडलें, व तिच्यापासून त्यांस समशेरबहादर नांवाचा मुलगा झाला, तो इतिहासांत प्रसिद्धच आहे. मस्तानी व बाजीराव ह्यांची परस्परांवरील प्रेमासक्ति पुढें इतकी वाढली कीं, तेणेंकरून शाहू राजाची त्यांच्यावर अप्रसन्न मर्जी झाली; व लोकांमध्येंही त्याबद्दल फार चर्चा सुरू झाली. मस्तानीच्या मोहानें बाजीराव अगदीं प्रेमवेडे होऊन मद्यपानादि व्यसनांच्या अधीन झाले असाही लोकप्रवाद आहे. शाहू महाराजांच्या कानापर्यंत ह्या गोष्टी गेल्या. असा अनिष्ट प्रकार झाल्यामुळें बाजीरावांचे बंधू चिमाजी आपा व वडील चिरंजीव नानासाहेब ह्यांनीं मोठ्या युक्तीनें तिला कैद केलें, असें अस्सल पत्रांवरून दिसतें. परंतु मस्तानीनें आत्महत्या केली किंवा अन्य रीतीनें तिचा शेवट झाला, हें कांहीं समजत नाहीं. ह्या संबंधानें आह्मांस जीं थोडींशीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत, तीं येथें सादर करितों. ह्या पत्रांवरून मस्तानीनें बाजीरावांस आपल्या मोहिनी विद्येनें अगदीं भारून टाकिलें होतें, व त्यामुळें त्यांस ताळ्यावर आणण्याकरितां चिमाजी आपा व नानासाहेब ह्यांना मोठें कारस्थान करावें लागलें, असें दिसून येतें.

### लेखांक १.

हें पत्र बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांचें आहे. ह्या पत्रामध्यें सौ. मातुश्री ताई ह्मणजे बाजीराव पेशवे ह्यांची पत्नी काशीबाई ह्यांचें व नानासाहेबांचें बाजीरावांच्या दुर्वर्तनाबद्दल कांहीं भाषण झाल्याचा उल्लेख आहे. 'त्यांनीं निश्चयपूर्वक आण वाहिली कीं, कधीं घेणार नाहीं' ह्या वाक्याचा अर्थ चतुर वाचकांस सांगावयास नको. बाजीराव फार प्रेमांध व विलासी होऊन मस्तानीच्या अधीन झाले, त्या वेळीं नानासाहेबांनीं गुप्त कारस्थानें करून मस्तानीस वश करून घेण्याचा प्रथम प्रयत्न केला, असें दिसतें.

"विनंति सौभाग्यवती मातुश्री ताईस एकदोनदां आह्मी बोललों. त्यांनीं निश्चयपूर्वक आण वाहिली कीं, कधीं घेणार नाहीं. मागतीं एक दोहों दिवसांआड एकदोनदा घेतलें. मागतीं आह्मीं ह्मटलें कीं आण वाहून हें काय? अतःपर आह्मी तुह्मांकडे येणार नाहीं ऐसें बहुत कष्टयुक्त सुबराव जेठीपासीं सांगून पाठविलें. त्यावरून बहुत फजित जाहाली. येणेंप्रमाणें आजतागाईत त्यांचें आमचें वर्तमान जाहालें. कालरात्रीं ताईनीं

कृष्णंभटास बोलावून वर्तमान सांगितलें कीं, ग्रहणास भीमेस गेलों होतों, त्या तागाईत त्यांची नानाची मैत्रिकी बहुत जाहली. दोहों प्रहर रात्रीं आज ते येथें नानाकडे आली होती. ऐसें वर्तमान बहुतां प्रकारें सांगितलें. लोकही बोलूं बाहेर लागले आहेत कीं नानांची मस्तानीची मैत्रिकी जाहाली. ताई स्वामींस हें वर्तमान लिहितील, यास्तव लिहिलें असे. पुढें जशी आज्ञा होईल तशी वर्तणूक करूं. मस्तानी येथें. आह्मांस आठा दाहा दिवशीं राजश्री स्वामींकडे गेलें पाहिजे. हे ठीक घरीं कशी राहते, याची काय तजवीज करावी, तें लिहिलें पाहिजे."

लेखांक २. ता. १९ आगस्ट इ. स. १७३९.

हें पत्र बाबूराव गणेश ह्यांचें आहे. ह्या पत्रामध्यें, नानासाहेबांचें व मस्तानीचें विशेष मित्रत्व जडल्याचा उल्लेख आहे. परंतु मस्तानीस त्यांचा खरा हेतु समजतांच पुढें तें मित्रत्व टिकलें नाहीं व त्यावरून तिचा व नानासाहेबांचा विरोध झाला, असें दिसतें.

"श्रीमंत राजश्री नानास्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक बाबूराव गणेश कृतानेक शिरसा० नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता श्रावण वद्य १२ रविवारपर्यंत स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेषः—डावे बाजूचे लोकांचें वर्तमान तरी श्रावण वद्य ९ नवमीचे दिवशीं आह्मांस प्रातःकाळींच बोलावून नेलें, आणि वर्तमान सांगों लागली जे, आह्मीं मनोभावेंकरून नानास्वामीसीं मित्रत्व केलें, आणि सा चार महिनेपर्यंत अतिशयेंकरून मित्रत्व चाललें. पुढेंही न चाले असें जाहलें. होत्सातां आपण सर्व लोकांमध्यें बदलाम व श्रीमंत राजश्री आपासाहेब यांजपाशींही आमची बदलामी जाहली. होऊन मागतीं पुढेंही त्यांहीं आह्मांसीं मित्रत्व करून आह्मांवर माया करूं लागलेच होते अथवा न होते, यास्तव त्यांचें मत तेंच जाणत. परंतु सांप्रत दोन चार महिने आह्मांस कागदही येत नाहीं. लष्करामध्यें दोन बोटें कागद एक दोन वेळां आला होता. प्रस्तुत दोन महिने न आला. यास्तव आह्मांजवळ बहुत दुःखित होऊन पाल्हाळें सांगितलें. तें पत्रीं लिहितां कार्यास न ये. स्वामी ह्मणतील कीं इतकें दुःख एकाकींच आठवावयासी काय कारण? तरी गोकुळ अष्टमीचे दिवशीं रात्रीं हरिकीर्तन जाहालें. अडीच प्रहर रात्रपर्यंत कथा होऊन मग आपण खांसा नृत्यास उभी राहिली होती. तत्समयीं सौ० मातुश्री ताई तेथें गेली होती. त्यास नाच जाहलियावर मातोश्री बोलली कीं, नानाचें पत्र आज आह्मांस आलें होतें. खुशाल आहों ह्मणून लिहिलें होतें. त्यावरून त्यांच्या मनांत आलें कीं, आठां चौरोजीं ताईकडे पत्र येतें. आह्मींच काय केलें आहे? बरें, नाना बेइमान जाहाले तरी सुखरूप होत. आपण तो त्यांसीं एकनिष्ठच होतों व पुढेंही असूंच. परंतु हे गोष्ट कांहीं मित्रपणास विहित नव्हे. ऐशा बहुत गोष्टी सांगितल्या. परंतु त्या पत्रीं कोठवर लिहाव्या? स्वामींनींही ऐसें न करावें. कागदीं पत्रीं समाचारास अंतर काय

१ राजश्री स्वामी=शाहू महाराज. २ डावे बाजूचे लोक=येथें मस्तानी असा अर्थ. ३ बदलाम=दुर्लौकिक.

'निमित्य करावें? आपण तों सर्व जाणतच आहेत. परंतु जाहलें वर्तमान सेवकानें लिहिलें असे. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपालोभास अंतर न करावें हे विज्ञाप्ति."

## लेखांक ३.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. ह्या पत्रावरून मस्तानीबद्दल बरींच महत्त्वाचीं कारस्थानें झालेलीं दिसतात. बाजीरावांस मस्तानीचा नाद सोडण्याबद्दल त्यांची मातुश्री राधाबाई व बंधू चिमाजी आपा, आणि महादाजीपंत पुरंधरे, मोरशेट काका वगैरे मंडळींनीं फार सांगितलें; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं चिमाजी आपा व नानासाहेब ह्यांनीं तिला बाजीरावांपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला; पण ती पळून बाजीरावांकडे निघून गेली.

"सेवेसी विनंति उपरी राजश्री माहादाजीपंत पाटसीं[१] जाऊन चार गोष्टी सांगितल्या व आपणही वरचेवरी पत्रे लिहिलीं, त्यावरून मस्तानीस पुण्यास रवाना केलें. परत आपलें दर्शन जाल्यावरी पाठवावयाची पुढें रदबदल करवावी ऐसें आहे. यास्तव काय विचार करावा? दोन कामे, एक जागिरीचें व एक सुलतानीकडील, हें तो जरूर एक जागा होऊन करावींच लागतात. त्यासी श्रीमंत करतीलच. टाकून जातील ऐसे नाहीं. आपण जाऊन तेथे रदबदल केली तरी ऐकणें नाहीं, तेव्हां विरुद्ध दिसेल. यास्तव दुरूनच बरें कीं काय ह्मणोन आज्ञा. ऐसियासी राजश्री माहादाजीपंत, मोरशेट काका याजपासीं बोलोन चालोन तिला वाटें लाविली असेल. पुढेही आपल्याशीं अंतर न करीत. कदाचित् रदबदलही केलीच तरी उभयतांसीं बोलिलेच आहेत. उभयताही चार गोष्टी समजाऊन सांगतील. स्वामी ह्मणतील कीं वऱ्हाड (?) गोष्टीच लिहिल्या. तरी आह्मी चाकर लोक; लटकाच तर्क करून एखादा मनसबा लिहिला. आधीं तों स्वामी सर्वज्ञ आहेत. विचारेंच जे करणें तें करील. कदाचित् तेंच ध्यानास येऊन केलें, भेटीस न गेलेंत आणि त्याच्या ध्यानात काहीं आले, उभयतामध्यें विपर्यास आला, तरी केव्हढी दौलत, केव्हढे लौकिक, एखादा अपाय होऊं शके. तेव्हा, आह्मी काडीचे माणूस होतों, ते लक्षाचे केल्याचें हेंच सार्थक की, अपायास मूळ जाहालों. तेव्हां आह्मांस इहलोकीं छीथू आणि परलोकीं नरक, दोनी गोष्टी होणार. यास्तव चाकर कोणी-

१ पाटस=पुण्याजवळ गाव आहे. येथे बाजीराव असतांना मस्तानी पळून आली. त्याबद्दल पुरंधऱ्याच्या रोजनिशीमध्ये पुढील उल्लेख आहे:—"मार्गेश्वर शुद्ध ५ मदवारी रात्रीं, मस्तानी, राजश्री रायांची कलवंतीण, आपले हवेलींतून निघोन पाटसास रायाकडे गेली. तिचा व रायाचा अतिसहवास जाला, याजमुळें राऊ विलासी फार जाले. याजकरिता मातुश्रीनीं व आपांनी रायास सांगितलें की, इचा वियोग चार दिवस करावा. ऐसें ह्मणोन तिजला हवेलीत ठेविलें. बाहेर जाईल रायाकडे ह्मणून चौक्या ठेविल्या. राऊ रागेंच कुरकुबास श्रीच्या दर्शनास गेले. पाटसीं येऊन राहिले. इजला त्या खेरीज खमेना (करमेना ?). त्याजलाही खमेना. याजकरितां युक्तीनें हवेलीतून निघून गेली असे." (राजवाडेकृत मराठ्याच्या इतिहासाचीं साधनें—भाग ६.)

ही विचारानुरूपच जेथील तेथें मर्जी राखोन सांगेल. परिछिन्न कोणाच्यानें उभयतांस सांगवत नाहीं. परंतु आपण सर्वज्ञ, जें करणें तें विचारेंच करतील. त्यांचा आब राहोन्, सर्वा गोष्टींची तूट सोसून, त्यांचें बरें होईल तें स्वामी करतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति."

लेखांक ४. ता. २६ जानेवारी इ. स. १७४०.

हें पत्र नानासाहेबांचें आहे. त्यांनीं अखेर मस्तानीस ता. २६ जानेवारी इ. स. १७४० रोजीं पर्वतीच्या बागेंत मोठ्या युक्तीनें कैद केली. हें पत्र फार महत्त्वाचें आहे. ह्या पत्रामध्यें मस्तानीच्या पायीं, नासरजंगाचा मनसबा बुडाला व राजाची मर्जी गेली, व रायाभोंतीं चौकी केली पाहिजे, असे स्पष्ट उल्लेख आहेत. ह्यापुढें मस्तानीचा शेवट काय झाला तें मात्र समजत नाहीं. बाजीराव पुढें संतप्त होऊन खानदेशांत गेले व तेथें रावेर मुक्कामीं ता. २८ एप्रिल इ. स. १७४० रोजीं मृत्यु पावले. त्या वेळीं मस्तानी त्यांच्याबरोबर सती गेली अशी लोकवार्ता आहे.

"तीर्थरूप आपा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें नानानें सा० नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता छ ७ जिल्काद शनवार संध्याकाळ पर्वतीचा बाग येथें असों. मस्तानीस बागांत बोलावून कैद केली. कोणीं हत्यार धरिलें नाहीं. रात्रीं घरास घेऊन जाऊं. मग घरीं ठेवावीसा विचार जाहाला तर घरांत स्वामींचे लिहिल्याप्रमाणें बंद करून ठेवूं. अथवा चोरून दहा माणसें बराबर देऊन, कोथळा, घनगड येथें भलते जागां पाठवूं. स्वामींनीं रायाचा जीव जतन करावा. नासरजंगाचा मनसबा तों या गोष्टीनें बुडाला. राजाची[1] मर्जी गेली! असें असतां स्वामींची आज्ञा व आमचा तवकल[2] करून येणेंप्रमाणें आज संध्याकाळीं जाहालें. येथून घरांत घेऊन गेल्यावर सुचेल तें करूं. मारीत नाहीं. घरीं ठेवूं अथवा गडावर चोरून पाठवूं. रायाभोंवतीं चौकी केली पाहिजे. नासरजंगाचा मनसबा तों होत नाहीं. तवकल करून फंद (?) नियमित केलें. कपाळीं असेल तें होईल. हे विनंति."*

* हीं पत्रें आह्मांस आमचे कै. मित्र रा. रा. वामनराव लेले वकील ह्यांच्याकडून मिळालीं आहेत. रा० लेले ह्यांच्याजवळ थोरल्या माधवरावांनी गोपिकाबाईस लिहिलेल्या अस्सल पत्रांचा संग्रह बहुत होता. तो त्यांनी सर्व आमच्या स्वाधीन केला आहे. हे गृहस्थ इतिहासाचे फार भोक्ते असून ह्यांच्या सांगण्यांत असें येत असे कीं, मस्तानीचीं कांहीं गुप्त पत्रें कै० रा. ब. गोपाळराव हरि देशमुख ह्यांच्याजवळ होती; व त्या पत्रांवरून बाजीरावांकरितां मस्तानी नाना प्रकारचीं सरबतें, व मद्यें पाठवीत असे, असें दिसून येत असे. पुण्यांत हीं पत्रें होतीं; परंतु तीं पुढें कोठें गुप्त झालीं त्यांचा पत्ता लागत नाहीं !

१ रायाची मर्जी ह्मणजे शाहू महाराजांची मर्जी बाजीरावांवर मस्तानीमुळें फार अप्रसन्न झाली, ह्याचा उल्लेख पेशव्यांच्या बखरींत आहे ( पृष्ठ ३९ पहा ). २ तवकल करणें=यशापयशाची पर्वा न बाळगतां मनाचा निश्चय किंवा हिय्या करून धाडसाचें जें कृत्य करणें तें.

# १९. घांशीराम कोतवाल.

श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांचे कारकीर्दीत घांशीराम कोतवाल ह्या नांवाचा एक अंमलदार होऊन गेला. हा जातीचा कनोजा ब्राह्मण असून उत्तर हिंदुस्थानचा राहणारा होता.* मराठ्यांची राजसत्ता सर्व हिंदुस्थानभर पसरल्यामुळे पुणें हें तिचें केंद्रस्थान बनून, तेथें हिंदुस्थानांतील सर्व जातींचे व सर्व धर्मांचे लोक राजकारणनिमित्तानें, लष्करी पेशानें, व्यापारधंद्यासंबंधानें, किंवा रोजगाराच्या उद्देशानें येत असत. अशांपैकींच घांशीराम हा एक होता. ह्याच्या बापाचें नांव सावळदास असें होतें. ह्याची पूर्वीची माहिती बिलकूल मिळत नाहीं. तथापि, हा मोठा गोड बोलणारा असून, दुसऱ्यावर छाप कशी बसवावी ही कला त्यास चांगली अवगत होती. त्यानें पुण्यास राहून, आपल्या मधुर वाणीनें व विनम्र वर्तनानें, पेशव्यांचे मुख्य कारभारी नाना फडणवीस ह्यांच्याकडे प्रवेश केला, आणि त्यांची मर्जी संपादून कोतवालीचा हुद्दा मिळविला. कोणी ह्मणतात कीं, त्यास एक सुस्वरूप व मनोहर अशी ललितागौरी नांवाची कन्या होती; तिच्या नेत्रकटाक्षांच्या तीव्र आघातानें नानांचें अंतःकरण प्रेमपाशांत बद्ध होऊन त्यांनीं पुण्यनगरचा सर्व बंदोबस्त घांशीरामाकडे सोंपविला.† कोणत्याही कारणानें असो, परंतु घांशीराम ह्याजवर नाना फडणविसांची मर्जी सुप्रसन्न होऊन, त्यांनीं त्यास इ. स. १७८१ मध्यें पुण्याचे कोतवाल नेमिलें.

पुण्याची कोतवाली हा पेशवाईमध्यें फार अधिकाराचा व महत्त्वाचा हुद्दा असे. हा हुद्दा थोरल्या माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत अस्तित्वांत आला. थोरले बाजीराव व बाळाजी बाजीराव ह्यांनीं जरी पुणें येथें आपलें राहण्याचें ठिकाण केलें व तेथें राज्यकारभारही चालविला, तथापि तेथें लोकसंरक्षणार्थ

* पुण्याचे रेसिडेंट सर चार्लस मालेट ह्यांनी लिहिलेल्या माहितींत, घांशीराम गौड ब्राह्मण असून औरंगाबादचा राहणारा होता, असें आहे.

† मराठी भाषेंत 'घाशीराम कोतवाल' ह्या नांवाचें कादंबरीवजा एक जुनें पुस्तक इ. स. १८६३ सालीं प्रसिद्ध झालेलें आहे. त्यांचे कर्ते रा. मोरोबा कान्होबा ह्यांनीं स्पष्टपणें असें लिहिलें आहे कीं, "घाशीरामाची कन्या सुस्वरूप होती. तिजवर बाळाजी जनार्दन भानू ऊर्फ नाना फडणवीस यांचा मोठा लोभ झाल्याच्या योगानें, घाशीराम याजला शहरची कोतवाली प्राप्त झाली." पुण्याच्या ग्याझिटियरमध्येंही हा आरोप स्पष्टपणें नमूद केला आहे:— "Ghashiram was a Kanoj Brahman of Aurangabad, who rose to be the head of the Poona Police, by giving his daughter to be the mistress of Nana Fadanvis."—*Poona Gazetteer*, Part III., Page 369.

स्वतंत्र कोतवाल नेमल्याचा दाखला सांपडत नाहीं. थोरल्या माधवराव पेशव्यांनीं शहराची लोकवस्ती अधिक वाढलेली पाहून, इ. स. १७६४ मध्यें पोलीसखातें स्वतंत्र करून तेथें स्वतंत्र कोतवाल नेमिला. ह्या पहिल्या कोतवालाचें नांव बाळाजी नारायण लोणकर असें होतें. त्यानंतर धोंडो बाबाजी व आनंदराव काशी असे कोतवाल झाले. आनंदराव काशीची कारकीर्द इ. स. १७७५ पासून इ. स. १७७८ पर्यंत झाली. तेथून पुढें घांशीराम कोतवाल ह्याची कारकीर्द सुरू झाली, असा कोठें कोठें उल्लेख आढळतो. परंतु घांशीराम ह्यास कोतवालीचा पूर्ण अधिकार इ. स. १७८१ मध्यें मिळाला, असें जुन्या कागदपत्रांवरून दिसून येतें.

पुण्याच्या कोतवालाचा अंमल पुणें शहरच्या रयतेपुरताच असे. श्रीमंतांचे राजवाडे किंवा सरदारांच्या पागा ह्यांच्याकडे कोतवालाचा कांहीं संबंध नसे. राजवाड्यांवरील पाहाऱ्यास स्वार, शिबंदी वगैरे लोक लष्करी खात्यापैकीं असत. अर्थात् शहरच्या वस्तीपुरताच कोतवालाचा संबंध होता. तथापि, त्याचा अधिकार फार मोठा असे. त्याजकडे फौजदारी व दिवाणी असे बहुतेक सर्व अधिकार असत. त्यामुळें त्याचा दरारा फार असे. कोतवालापुढें विशेषेंकरून चोरी, बदफैली, जारकर्म, मद्यपान, वगैरे मुख्य गुन्हे येत असत. कोतवालाचे मार्फत ह्या सर्व खटल्यांचा निकाल होत असे. कोतवालीच्या उत्पन्नाचे, हरकी व खंडगुन्हेगारी, पाटदाम, कर्जचौथाई, बैतनमाल, कबले, बटछपाई, नजर, जुव्याबद्दल दंड, ह्या मुख्य उत्पन्नाच्या बाबी असत. कोतवालीचें उत्पन्न ३० हजारांपासून ५० हजारांपर्यंत असे. अर्थात् हें सरकारी उत्पन्न असे. ह्याशिवाय अंतस्थ व कारकुनी ही वेगळी !!

घांशीराम कोतवाल ह्याचा पगार दिवट्यासुद्धां सालाचा ६२१ रुपये होता. त्याच्या हाताखालीं मुजुमदार, फडणीस व दसरदार असे तीन अधिकारी असत. त्यांचा सर्वांचा मिळून सालिना ६४० रुपये पगार होता. पुणें शहरच्या मुख्य चावड्या पांच होत्या. त्यांचीं नांवें:— चावडी सोमवार, वेताळ, आदितवार, नारायणपेठ व शनिवार. ह्या पांच चावड्यांवर मिळून कोतवालाची शिबंदी (पोलीस शिपाई) ७८ लोक होते. तेवढ्यानें भागेना, ह्मणून इ. स. १७८८ मध्यें २५ इसम अधिक ठेवण्याची परवानगी मिळाली. त्यांचा सर्वांचा मिळून सालाचा खर्च अदमासें तीन साडेतीन हजार रुपये होता. ह्याशिवाय, पांच चावड्यांवर पाहाऱ्याकरितां प्रत्येकीं २ प्रमाणें १० इसम असत. ते सर्व मिळून, घांशीरामाचे अमलामध्यें सुमारें ११३ पोलीस शिपाई सर्व पुणें शहराकरितां असत. ह्यानंतर पुढें ही संख्या अधिक वाढली. रावबाजीच्या कारकीर्दींत कोतवाली मक्त्यानें देण्याचा प्रघात सुरू झाला.

• घांशीराम कोतवाल ह्यानें आपल्या दहा वर्षांच्या कारकीर्दीमध्यें पुण्याच्या लोकांवर अतोनात जुलूम केला. त्याचा करडा अंमल लोकांना फारच त्रासदायक झाला. नाना फडणवीस ह्यांची त्यावर मेहेरनजर असल्यामुळें गरीब लोकांची दाद लागेना. घांशीरामाच्या जुलमाच्या गोष्टी अनेक प्रसिद्ध आहेत, व त्यांवरून 'घांशीरामी जुलूम' ही ह्मण मराठी भाषेंत पडली आहे. परंतु, अशा नराधमावर नानासारख्या शाहण्या मुत्सद्याचा दाब कसा नव्हता, हें मोठें गूढ आहे. उलट नानांच्या दप्तरांतील कागदांमध्यें, घांशीरामाच्या उत्तम कामगिरीबद्दल त्यास हजारों रुपये बक्षीस मिळाल्याचे दाखले सांपडतात. त्याच्या मुलाच्या लग्नास १५०० रुपयांचे सोन्यारुप्याचे दागिने, १२०० रुपये धर्मादाय, देहेनगी खर्च व अन्नखर्च, आणि ७०० रुपयांचें कापड त्यास बक्षीस दिल्याचा उल्लेख आहे. घांशीरामावर नानांची मेहरबानी असण्याचें खरें कारण काय असेल तें असो, परंतु घांशीरामानें सवाई माधवरावांच्या लग्नाच्या वेळीं पुण्याचा बंदोबस्त चांगला ठेविला होता, आणि त्यानें पुण्यामध्यें 'नजरबाज' (डिटेक्टिव्ह) लोक ठेवून फंदफितुरी करणाऱ्या लोकांवर सक्त नजर ठेविली होती, ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. नाना फडणविसांचे कारकीर्दींत कोतवालाच्या वहिवाटीचे जे नियम होते, त्यांत राजद्रोही, फंदफितुरी, वगैरे लोकांवर सक्त नजर ठेवून त्यांची बारकाईनें चौकशी करून सरकारांत वरचेवर समजावीत जावें, हा पहिला नियम होता. ह्यावरून घांशीरामानें हें काम चौकस 'नजरबाजां' कडून करवून, नानांची मर्जी खूष केली असें कां न ह्मणावें?

घांशीरामासंबंधाचे अस्सल कागदपत्र सांपडले तर पुण्याच्या कोतवालीचा मनोरंजक इतिहास प्रसिद्ध होईल. घांशीरामाची जी माहिती मिळत आहे, तिच्यावरून त्यानें पुण्यास एक खासगत बाग व एक तळें बांधलें, असें दिसून येतें. तें अद्यापि घांशीरामाचें तळें ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या तळ्यासंबंधानें घांशीरामानें श्रीमंतांस इ. स. १७८९ मध्यें लिहिलेली एक यादी उपलब्ध झाली आहे. ती मनोरंजक वाटल्यावरून येथें दिली आहे:—

"यादी घांशीराम सावळदासः—शहरचे पूर्वेस, नवापुऱ्याचे शेऱ्यास, हडपसरचे मार्गावरील तळें चिरेबंदी बांधिलें. त्यांतील पाणी, वाटमार्गी लोकांचे व गुराघोड्यांचे वगैरे, व शहरची वस्ती लगत आहे त्याचे, व आपण खासगत बाग केला आहे त्याचे उपयोगीं पडतें. त्यास उष्णकाळ दिवस आले ह्मणजे तोटा येतो. याजकरितां मौजे कोंढवें बुद्रुख तर्फ कर्यात मावळ येथील पूर्वेचे बाजूस ओढा आहे, तेथून पाणी नळ बांधून तळ्यांत सोडावें हा उद्योग करून, पाण्याचे ठिकाणापासून नळाचें काम बंदिस्त गज

आठशें तयार केलें. त्यास खर्च अजमासें रुपये पांच हजार लागले. पुढें काम चालवून पाणी तळ्यांत आणावयास सामर्थ्य नाहीं. कामास पंचवीस तीस हजार रुपये मध्यम प्रत काम केल्यास लागणार. तूर्त पाटाचें पाणी आणून सोडिलें आहे. त्यास बंदिस्ती-बद्दल 'अजमास पैक्याचा पाहून, स्वामीनीं कृपाळु होऊन, सरकारांतून ऐवज बक्षीस देविल्यास, सेवकानें बाग केला आहे त्यास पाणी येऊन, कुटुंबाचा योगक्षेम चालेल; व तळ्यालगत शहरची वस्ती आहे त्याचे उपयोगीं पडेल. त्यास कस्त मेहनतीनें कोंढव्याचे ओढ्याचें पाणी बंदिस्त करून तळ्यांत आणून सोडणार येविषयीं सरकारांतून ऐवज. रुपये.''

ह्या यादींत रुपयांचा आंकडा नाहीं. ह्या यादीप्रमाणें पुणें दरबारानें पुढें त्यास पैसे दिले किंवा नाहीं, तेंही समजत नाहीं. असो.

घांशीरामाचा जुलूम पुण्याच्या ब्राह्मणांवर अतिशय होऊं लागला. पुणें येथें श्रावणमासच्या दक्षणेसाठीं ब्राह्मणांची गर्दी फार होत असे. ही गर्दी मोडण्याचें व बंदोबस्त ठेवण्याचें काम घांशीरामाकडे असे. दक्षिणेस येणारे तेलंगी ब्राह्मणही अति उद्धट व उन्मत्त असत. तेही बेमुर्वतीचें वर्तन करीत. अशा प्रसंगामुळें घांशीरामासही आपला कोतवाली अंमल गाजवावा लागे. ह्यामुळें त्याचें व लोकांचें फार वितुष्ट आलें. तें इतकें वाढलें कीं, इ. स. १७९१ सालच्या रमण्यामध्यें त्याचा भयंकर परिणाम झाला. ता. २९ आगस्ट रोजीं रमण्यासाठीं आलेल्या तेलंगी ब्राह्मणांनीं फार दंगा केल्यामुळें, त्यांपैकी ३४ लोकांस घांशीरामानें एका चौकीवर कोंडून ठेविलें. ती जागा लहान असल्यामुळें त्यांपैकी २१ ब्राह्मण रात्रींच्या रात्रीं गुदमरून मेले, व १३ मरण्याच्या पंथास लागले. ते मोठ्या कष्टानें दुसरे दिवशीं जीवंत निघाले. अर्थात् इतक्या ब्राह्मणांची प्राणहत्या झाल्याचें वर्तमान गांवभर पसरलें व श्रीमंत सवाईमाधवराव पेशव्यांच्या कानांवरही गेलें.* त्यामुळें त्यांनीं संतप्त होऊन, घांशीरामास हत्तीच्या पायाशीं बांधून बंदीखान्यांत पाठविण्याचा हुकूम केला; आणि त्याच्या बायकामुलांस कैदेंत टाकिलें. दुसरे दिवशीं, सर्व नागरिक लोकांनीं एकच गोंधळ करून, त्या बिचाऱ्यास उंटाच्या मागील बाजूस बांधिलें; व त्याची धिंड काढून व पांच पाट काढून, त्याचा चेंदामेंदा करीत, अत्यंत क्रूर रीतीनें त्यास गांवाबाहेर एक मैल लांब नेलें. तेथें त्याचा एक हात पागोट्यानें बांधून त्यास हलालखोरांच्या ताब्यांत दिलें; आणि शेवटीं त्यांनीं तेलंगी ब्राह्मणांस बोलावून त्यास त्यांच्या स्वाधीन केलें. त्या नराधमांनीं त्यास दगडाखालीं ठेंचठेंचून

* लोकहितवादीकृत ऐतिहासिक गोष्टीमध्यें ही हकीकत मानाजी शिंदे ऊर्फ मानाजी फांकडे ह्यांनीं श्रीमंतांच्या कानावर घातली असें लिहिलें आहे.

त्याचा अत्यंत क्रूरतेनें वध केला!* पुणें येथें (सेंट मेरीच्या देवळाच्या पश्चिमेस) घांशीरामाचा वाडा होता. तेथें, एके वेळीं पुणें शहरावर सत्ता गाजविलेल्या ह्या कोतवालाचा, अशा भयंकर रीतीनें, ता. ३० आगष्ट इ. स. १७९१ रोजीं, शेवट झाला!!

नानांच्या कारकीर्दींत असा जुलमी अधिकारी एवढ्या मोठ्या अधिकारावर कसा राहिला हें आश्चर्य आहे. मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ् साहेब ह्यांनीं

* ह्या अमानुष मनुष्यवधाची अत्यंत हृदयद्रावक हकीकत पुण्याचे त्या वेळचे रेसिडेंट सर चार्लस मालेट ह्यांनी क्याप्टन फोर्बस ह्यास कळविली. ती त्या वेळच्या प्रत्यक्ष पुण्यास हजर असलेल्या गृहस्थानें लिहिली असल्यामुळे येथे दाखल करणें अवश्य आहे:—

"On the 29th of August, thirty four men of the caste of Telingu Brahmins having been confined in a chokey, or close room, by the officers of the Cutwal, the head magistrate of the police at Poonah, twenty-one were taken out dead the next morning, and the remaining thirteen were with difficulty restored to life. In the evening the popular clamour became violent against the Cutwal, who was a Gour Brahmin, named Gaunsiram, a native of Aurangabad, and whose office, in the city where the most rigorous police is established, necessarily rendered him an obnoxious character. The Peishwa improperly yielding to the furious mob, delivered up the Cutwal, who was tied backward on an elephant, and in that manner conveyed to a prison without the town, amidst the shouts and insults of the populace, while guards were sent to seize his family, dependants and property. The day following the clamour grew more violent being encouraged by many persons desirous of mortifying the ruling minister, through the ignominy of the Cutwal, his dependant. The unhappy man was tied backward on a camel and in that disgraceful manner reconducted into the city, amidst the reproaches of the people here he was made to alight, and his head having been publicly shaved, he was again placed in the same manner on the camel and having been carried through the principal streets of Poonah, escorted by a strong guard, he was for the last time led to a spot about a mile from the city, and there ordered to dismount one of his hands was then strongly fastened to the end of a turban between twenty and thirty feet long, and the other end committed to some Hallalcores, the lowest outcastes of the Hindoo tribes, who contaminate all other castes by their touch. It was then made known to the Telingu Brahmins that the Cutwal was delivered up entirely to their disposal, either as a sacrifice to their vengeance, or an object for their mercy, on which twelve Brahmins of that tribe, in the most savage manner, immediately attacked the fallen magistrate with large stones. The Hallalcores who held the turban, by straitening it, kept him at full length, by repeated blows on the head and breast, brought him to the ground; and there, with an eagerness disgraceful to humanity, though merciful to the prostrate object of their cruelty, these Brahminical murderers despatched him by a succession of large stones thrown violently on his head and breast."—*Forbes' Oriental Memoirs.* Vol. II. Page 135.

असे उद्गार काढिले आहेत कीं, "पुणें शहरचा पोलीस अधिकारी घांशीराम कोतवाल ह्याच्या कारकीर्दीपेक्षां राज्यकारभाराच्या अधिक अंदाधुंदीचें अथवा खालील अधिकाऱ्याच्या अधिक क्रूरतेचें उदाहरण कोणत्याही संस्थानच्या इतिहासांत नमूद नाहीं." हें खरें कीं काय, ह्याचा निर्णय अस्सल कागदपत्रांवांचून लागणार नाहीं.

## २०. मालेगांवचा किल्ला.*

गिरणा व मोसम अथवा मोक्षगंगा यांच्या संगमापासून वर सुमारें एक मैल अंतरावर मालेगांवचा भुईकोट किल्ला आहे. मोक्षगंगेच्या डाव्या बाजूच्या सपाट मैदानांत एक वेळ 'खानदेशची किल्ली' ह्मणून हा किल्ला प्रसिद्ध होता. ह्या किल्ल्याला तीन कोट होते. आंतील कोट अतिशय मजबूद असून हल्लींही तो कोट नव्यासारखाच दिसत आहे. त्याच्या बाहेरून खंदक असून नंतर पुन्हां एक परकोट आहे. ह्या परकोटाची भिंत तिच्यावरून एक मोठी गाडी जाईल एवढी रुंद आहे. हा परकोट नदीच्या बाजूनें मजबूत दगडी आहे, परंतु शहरच्या बाजूनें मातीचा कच्चा होता. त्याचा हल्लीं मागमूस फारसा दिसत नाहीं. सध्यां मातीचे बुरूज मात्र दिसतात. किल्ल्याला लागूनच शहर वसलेलें आहे.

नारो शंकर राजेबहाद्दर यांचें नांव इतिहासांत प्रसिद्ध असून त्यांनींच हा किल्ला इ. स. १७६५ त बांधिला व शहरही वसविलें. किल्ल्याच्या कामासाठीं दिल्लीहून मुद्दाम एक कारागीर आणिला होता. किल्ला पुरा होण्यास एकंदर दहा वर्षें लागलीं व पुष्कळ रुपये खर्च आला असें ह्मणतात.

नारो शंकरानें मालेगांवासुद्धां आठ गांवें स्वपराक्रमानें मिळविलीं. याबद्दल एक आख्यायिका अशी आहे कीं, एकदां नारो शंकर दिल्लीस गेले असतां, दिल्लीचा बादशाहा एकटाच शिकारीस जाणार अशी बातमी लागली. तेव्हां त्यांनींही शिकारीस जाण्याचा बेत केला. दुसरे दिवशीं बादशाहा शिकारीस निघाला असें ऐकून तेही निघाले, व बादशाहापासून सुमारें एका हांकेच्या अंतरानें स्वतःचा घोडा चालवूं लागले. तो असा कीं, बादशाहाला आपल्या बरोबर कोणी येत आहे हें कळूं नये. बादशाहाला एका भयंकर वाघाची शिंकार करावयाची होती. वाघ बंदुकीच्या टप्प्यांत येतांच बादशाहानें त्यावर गोळी झाडली; पण दुर्दैवानें नेम चुकून नुसता मोठा आवाज मात्र झाला. त्यासरशीं वाघ चिडून त्यानें मोठ्यानें डुरकणी फोडली,

* ही माहिती 'मोरेश्वर' लेखकानें लिहिली असून ती आमचे मित्र रा. रा. वासुदेव गोविंद आपटे ह्यांच्या मार्फत आली आहे. ह्यांतील आख्यायिका श्रीमंत गोपाळराव शिवदेवराव राजेबहादूर ह्यांनीं सांगितलेल्या जुन्या माहितीच्या आधारें लिहिलेली आहे.

आणि बादशाहाच्या हत्तीच्या गंडस्थळावर नेमकी उडी घेतली; व महाताला पंजाच्या एका चपेट्यानें ठार करून, बादशाहाला बंदूक वगैरे भरण्यास अवसर न देतां, तो वाघ बादशाहाच्या अंत करण्यास पुढें सरसावला. डोळ्याचें पातें लवतें न लवतें, तोंच नारो शंकरांनीं त्या चिडलेल्या वाघाचीं आपल्या यशस्वी तरवारीनें दोन खांडें केलीं, आणि बादशाहाला त्याच्या जबड्यांतून सोडविलें. या उपकारानें कृतज्ञ होऊन, बादशाहानें नारो शंकरांना इ. स. १७५७ सालीं एक सनद देऊन मालेगांवासुद्धां आठ गांवें वंशपरंपरेनें इनाम ह्मणून दिलीं. हा बादशाहा दुसरा अलमगीर होय. पुढें नारो शंकर दक्षिणेंत परत आले. त्यांनीं श्रीमंत पेशव्यांना बादशाहाचें फर्मान (सनद) दाखवून त्यांच्यापासून मालेगांव येथें घर बांधण्याची परवानगी घेतली. मालेगांवीं आल्यानंतर त्यांनीं विचार केला कीं, घर बांधलें तर तें फार दिवस टिकणारें नव्हे; तेव्हां पुष्कळ दिवस टिकणारें व नांव कायम ठेवणारें असें किल्ल्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. ह्मणून किल्ला बांधण्याचा निश्चय करून ते त्यासाठीं जागा शोधूं लागले. तेव्हां एके दिवशीं त्यांस ह्या ठिकाणीं कुत्र्याचा सशानें पराभव केल्याचें दिसून आलें.* ह्मणून त्यांनीं ही जागा यशस्वी आहे असें समजून तेथें लागलीच किल्ला बांधण्यास सुरुवात केली.

किल्ला पुरा झाला तेव्हां पुण्यास श्रीमंतांना बातमी कळली. तेव्हां त्यांना असें वाटलें कीं, राजेबहाद्दर हे मोंगलांना फितूर असावेत. कारण, त्यांनीं दिल्लीच्या बादशाहाच्या दरबारीं सूत्र बांधून आठ गांवें मिळविलीं; व मालेगांवीं घर बांधण्याची परवानगी घेतली असून किल्ला बांधिला; तेव्हां त्यांत कांहीं तरी काळेंबेरें असावें. तेव्हां श्रीमंतांनीं मालेगांवावर सैन्याची रवानगी करावी असा विचार करून दरबारच्या मंडळींची सल्ला विचारली. त्या समयीं अलिजाबहाद्दर महादजी शिंदे पुढें होऊन, त्यांनीं श्रीमंतांची खातरजमा केली कीं, "राजेबहाद्दर निमकहराम नाहींत. सरकारची मर्जी असल्यास त्यांनीं प्रत्यय पहावा. आतांच त्यांच्यावर सैन्य पाठवून विनाकारण खर्चांत येऊं नये. एक जासूद पाठवून किल्ला खालीं करण्याचा हुकूम दिला कीं पुरे. किल्ला खालीं झालाच. त्यांनीं किल्ला खालीं केला नाहीं तर त्यांचा समाचार घेण्यासाठीं आह्मी आहोंतच. आमच्यापुढें राजेबहाद्दर ह्मणजे काय होत?" हें ऐकून श्रीमंतांनीं एक जासुदांची जोडी किल्ला खालीं करण्याचा हुकूम देऊन रवाना केली. जासूद येऊन मालेगांवीं किल्ल्यांत पोहोंचतांच, त्यांनीं श्रीमंतांचा हुकूम दाखविला. त्याच दिवशीं किल्ल्याची वास्तुशांत

* अशीच गोष्ट पुण्याच्या पेशव्यांच्या शनिवारवाड्याची सांगतात.—गायकवाडकृत पुणें शहरवर्णन भाग १.

व्हावयाची होती. ती तशीच ठेवून नारो शंकरांनीं किल्ला खालीं करून जासुदाच्या हवालीं केला, व आपण मुलांमाणसांसुद्धां नदीच्या वाळवंटांत तंबू ठोकून राहिले. नंतर त्यांनीं एका जासुदाबरोबर श्रीमंतांस असें पत्र लिहून पाठविलें कीं, "सरकारच्या हुकुमाप्रमाणें किल्ला खालीं केला आहे. मात्र किल्ल्याची वास्तुशांत व्हावयाची आहे. ती करण्याची परवानगी मिळावी. व किल्ला बांधण्यांत सरकारच्या झालेल्या अवज्ञेबद्दल माफी व्हावी." अशा आशयाचें पत्र पाहतांच श्रीमंतांचा राग शांत झाला. नंतर श्रीमंतांनीं उलट जासूद पाठवून निरोप कळविला कीं, "किल्ला तुमच्याचकडे असूं द्यावा व वास्तुशांत करावी. तुमच्याबद्दल आमचें मन स्वच्छ आहे." याप्रमाणें नारो शंकरांच्या ताब्यांत किल्ला राहिला. त्याचा उपभोग त्यांनीं कांहीं वर्षें घेतल्यानंतर ते इ. स. १७७५ सालीं वारले. त्यांच्या मागें त्यांचे धाकटे दत्तक पुत्र रघुपतराव हे सरदार झाले. त्यांच्याकडे किल्ला होता. इ. स. १७७९ सालीं, नारो शंकरांचे पुतणे व वडील दत्तक पुत्र त्रिंबकराव ह्यांनीं पेशव्यांकडे संधान बांधून, रघुपतराव यांना परळीच्या किल्ल्यांत बंदींत टाकून, आपण किल्ला वगैरे आपल्या ताब्यांत घेतला. पुन्हां रघुपतरावांनीं, रघुनाथराव दादा भरारी यांच्या मरणानंतर, पुणें दरबारीं सूत्र बांधून सरदारी आपल्याकडे घेतली. त्या वेळीं मालेगांवचा किल्ला त्यांच्या ताब्यांत गेला. रघुपतरावांच्या मरणानंतर रंगराव आप्पाकडे व नंतर गोपाळराव त्रिंबक यांजकडे सरदारी आली. गोपाळराव हे खर्चाच्या पेंचांत आलें. सबब कर्ज वारण्यासाठीं त्यांनीं, इ. स. १८०१ पासून ९ वर्षांच्या करारानें मालेगांव संस्थान व परगणे निंबाईत येथील मामलत वगैरे विंचुरकरांमार्फत पुणें येथील सावकार गुणे यांजकडे कर्जादाखल लावून दिली. परंतु गुण्यांनीं रावबाजींना सामील होऊन, मालेगांव संस्थान व निंबाईत परगणा पेशव्यांचे स्वाधीन केला. पेशव्यांनीं गोपाळरावांना पुणें येथें बोलावून नेऊन कैदेंत ठेविलें.

इ. स. १८१८ सालीं बाजीराव पेशवे पुण्याहून पळून गेल्यानंतर सर्व महाराष्ट्रामध्यें इंग्रजी अंमल संस्थापित झाला, व मराठ्यांच्या ताब्यांतील बळकट किल्ले इंग्रजांनीं जिंकून घेतले. त्या वेळीं खानदेशचें नाक जो मालेगांवचा सुप्रसिद्ध किल्ला तो लेफ्टनंट-कर्नल म्याक्डोनेल ह्यांनीं ता. १३ जून इ. स. १८१८ रोजीं मोठी लढाई करून जिंकून घेतला. मालेगांवच्या किल्ल्यामध्यें कांहीं रणशूर आरब लोक होते, त्यांनींही आपल्या शौर्याची पराकाष्ठा केली. परंतु किल्ल्यांतील दारूगोळ्यास आग लागून तो नाहींसा झाल्यामुळें व इंग्रज सैन्याच्या निकराच्या हल्ल्यामुळें अखेर तो सर झाला. त्याचा वृत्तांत इंग्रजी ग्रंथांत प्रसिद्ध आहे.



## प्रकरण ३ रें.

# कलकत्तेकर इंग्रजांजवळील वकील.

## लाला सेवकराम.

मुंबईकर इंग्रजांजवळ ज्याप्रमाणें मराठ्यांचा वकील राहात असे, त्याप्रमाणें कलकत्ता व मद्रास येथील इंग्रजांजवळही मराठ्यांचे वकील राहात असल्याचें दिसून येतें. कलकत्तेकर इंग्रजांजवळ जो वकील राहात असे, त्याचें नांव लाला सेवकराम हें होतें. हा जातीचा कायस्थ ब्राह्मण असून, मोठा राजकारणदक्ष, चतुर आणि धोरणी असे. मराठ्यांची राजसत्ता उत्तर हिंदुस्थानांत जसजशी प्रसार पावूं लागली, तसतसे हिंदुधर्माभिमानी कायस्थ लोकही मराठ्यांच्या राजकारणांत सामील होऊन त्यांना साह्य करूं लागल्याचें दिसून येतें. थोरले बाजीराव पेशवे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानावर स्वारी करून तेथें आपला शौर्यप्रभाव व्यक्त केला आणि दिल्लीपतीकडून माळव्याची सुभेदारी मिळविली, त्या वेळेपासून कायस्थ मुत्सद्दी मराठ्यांच्या राजकारणांत प्रविष्ट झाल्याचे दाखले सांपडतात. जयपुरचा राजा सवाई जयसिंग हा दिल्लीदरबारांतला एक कर्तृत्ववान् व वजनदार सरदार होता. त्याचा व बाजीराव पेशव्यांचा स्नेह जुळल्यापासून हिंदुस्थानी कायस्थ मुत्सद्दी त्याच्या शिफारसीनें मराठी राजकारणें चालवूं लागले. सवाई जयसिंगाजवळ लाला कृपाराम ह्मणून एक फार शहाणा मुत्सद्दी होता. त्यानें बाजीराव पेशव्यांस चांगलें साह्य केलें होतें.* त्यावरून बाजीरावांनीं त्याजकडे सवाई जयसिंगाकडील राजकीय कामकाजें करण्याकरितां वकिलातीचा हुद्दा सांगितला होता. तो मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा तुळजाराम हा जयपुरास वकिलीवर होता. ह्या तुळजारामाचा मुलगा लाला सेवकराम हा होय. ह्यानें, तीन पिढ्या पेशव्यांची सेवा आपण करीत आहों, असे आपल्या पत्रांत उल्लेख काढलेले आहेत. ह्याशिवाय लाला मयाराम, लाला मनसाराम, लाला

* लाला कृपारामाचा पुत्र लाला तुळजाराम ह्याने आपल्या एका पत्रात आपल्या बापाच्या कामगिरीचें वर्णन केलें आहे. तें येणेंप्रमाणे:—"पूर्वीं बाजीरावसाहेब कैलासवासी हिंदुस्थानांत गेले होते. ते वेळेस, सेवकाचे वडिलाचे विद्यमाने, सवाई जयसिंग यांजकडील मामलतीची तोडमोड जाली, ती सेवकास ठाऊक आहे. खानदौरा मीरबक्षी व कमरुद्दीनखान वजीर हे उभयतां राव कैलासवासी यांजवर चालून गेले होते; त्या वेळेस सेवकाचे वडिलांनीं उभयतांचा कजिया होऊं न दिला. सवाई जयसिंग यांनीं आमचे वडिलाचे विद्यमानें इशारा करवून कालिकेचा मेळा भरला होता, तोच लुटविला. त्याजवर राव कैलासवासी दिल्लीहून निघून जयसिंगाचे मुलखास आले. ते वेळची जाबसालाची माहितगारी सेवकास आहे." इत्यादि.

खेमकर्ण वगैरे हिंदुस्थानी मुत्सद्दी पेशव्यांच्या वतीनें दिल्लीदरबारीं निरनिराळ्या वेळीं वकिलीवर असल्याची माहिती मिळते, व त्यांचीं नांवें जुन्या पत्रांतून वारंवार दृष्टीस पडतात. ह्यावरून महाराष्ट्रराजसत्तेचा प्रसार १८ व्या शतकामध्यें कसा होत चालला होता व तिला साम्राज्याचें भव्य स्वरूप कसें प्राप्त होऊं लागलें होतें, त्याची वाचकांस कल्पना करितां येईल. असो.

लाला सेवकराम ह्याची विशेष माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. आजपर्यंत त्याचें नांव देखील इतिहासांत प्रसिद्ध नाहीं, मग त्याचें चरित्र किंवा कुलवृत्तांत समजण्याची आशा करणें व्यर्थ होय. तथापि, लाला सेवकराम हा जयपूर येथेंच प्रसिद्धीस येऊन, तेथेंच मराठ्यांच्या वतीनें थोरल्या माधवराव साहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत वकिलीवर होता, असें दिसून येतें. ह्यास मराठी भाषा चांगली अवगत असून त्यानें लिहिलेलीं सर्व पत्रें मोडी लिपींत व मराठी भाषेंतच आहे. त्याची मराठी ही मातृभाषा नसल्यामुळें त्याच्या लिहिण्यांत अशुद्धें फार आहेत. तथापि त्याचें महाराष्ट्रापासून दूरांतर आणि हिंदुस्थानी भाषेशीं नित्यसहवास ह्या दोन गोष्टी लक्षांत घेतल्या ह्मणजे त्याचें महाराष्ट्रभाषाज्ञान प्रशंसनीय होतें, असें ह्मणणें भाग आहे. राजकारणप्रसंगानें त्याचें जाणें येणें पुण्यास वारंवार होत असे. त्या योगानें व तीन पिढ्या पेशव्यांशीं व त्यांच्या राजकारणांशीं त्याचा सतत परिचय असल्यामुळें त्यास महाराष्ट्रभाषा चांगल्या रीतीनें अवगत झाली होती, असें ह्मटलें तरी चालेल.

लाला सेवकराम हा इ. स. १७७०, इ. स. १७७१ व इ. स. १७७२ मध्यें जयनगरच्या पृथ्वीसिंग राजाजवळ मराठ्यांच्या तर्फेनें वकिलातीवर होता. पुढें थोरले माधवराव मृत्यु पावल्यानंतर श्रीमंत नारायणराव पेशवे गादीवर आले. त्यांचा इ. स. १७७३ मध्यें वध होऊन, श्रीमंत राघोबादादा ह्यांचें व सखारामबापू आणि नाना फडणवीस आदिकरून पुण्याचें कारभारीमंडळ ह्यांचें पेशवाईच्या राज्यकारभाराबद्दल भांडण लागलें. त्यांत कारभारीपक्षाची सरशी होऊन दादासाहेबांचा पक्ष उणा पडला. त्यामुळें राज्यलोभाच्या मोहानें व विरुद्ध पक्षाच्या स्वार्थपर व मत्सरयुक्त मंत्रोपदेशानें दादासाहेबांची बुद्धि बावरली जाऊन, ते पेशवाई मिळविण्याकरितां अनेक राजकारस्थानें करूं लागले. त्यांत त्यांनीं मुंबईकर इंग्रजांकडे सुरतेचे चीफ मि. रॉबर्ट ग्यांबीर ह्यांचे मार्फत संधान बांधिलें, आणि त्यांना साष्टी, वसई, वगैरे समुद्रकिनाऱ्याचीं स्थळें देऊन व त्यांच्याकडून सैन्याची मदत घेऊन, पुण्याची गादी मिळविण्याचा व्यूह रचिला. पुण्याचें मुत्सद्दीमंडळही राजकारणांत कमी नव्हतें. त्यांना हें राघोबादादांचें कारस्थान समजतांच, त्यांनींही त्यांस

सैन्यानिशीं पुण्यास येऊं न देण्याचा निश्चय केला. येणेंप्रमाणें उभय पक्ष आपापल्या बाजूनें लढाईची तयारी करून, परस्परांवर चढाई करूं लागले. ह्या हर्षामर्षामध्यें इंग्रज व मराठे ह्यांच्याही लहानलहान चकमकी घडल्या, आणि त्यांत मराठ्यांचीं कांहीं स्थळें इंग्रजांच्या ताब्यांत गेलीं. राघोबादादा व मुंबईकर इंग्रज ह्यांचा तह ता. ६ मार्च इ. १७७५ रोजीं झाला. त्याप्रमाणें इंग्रजी फौज दादासाहेबांस गुजराथेंतून पुण्यास घेऊन येण्यास सज्ज झाली. ह्याप्रमाणें इंग्रज व मराठे ह्यांचें दादासाहेबांच्या निमित्तानें उघड युद्ध सुरू झालें. हेंच इतिहासांत मराठ्यांचें पहिलें युद्ध ह्मणून प्रसिद्ध आहे.

ह्या समयास एक मोठी महत्त्वाची गोष्ट घडून आली. इंग्रज व पेशवे ह्यांचे, पूर्वीं इ. स. १७३९ व इ. स. १७५६ ह्या वर्षीं, दोस्तीचे तह ठरले होते. ते एकीकडे ठेवून, मुंबईकर इंग्रजांनीं पुणें दरबाराशीं विरुद्ध होऊन रघुनाथरावाचा पक्ष स्वीकारिला व नवीन युद्ध उपस्थित केलें. ही गोष्ट कलकत्त्याच्या सुप्रीम कौन्सिलास अमान्य झाली. इ. स. १७७३ पर्यंत कलकत्ता, मुंबई व मद्रास येथील इंग्रजी अधिकारी बरेच स्वतंत्र होते. परंतु ह्या वर्षीं ईस्ट इंडिया कंपनीचा हिंदुस्थानांतील राज्यकारभार कायद्यानें नियंत्रित होऊन, कलकत्ता येथील गव्हरनरास 'गव्हरनरजनरल' असा हुद्दा मिळाला, व मुंबई व मद्रास येथील गव्हरनर व त्यांचें कौन्सिल ह्यांनीं त्याच्या हुकमतीखालीं चालावें असें ठरलें. ह्याच कायद्यास 'रेग्युलेटिंग ॲक्ट' असें नांव आहे. ह्या आक्टाप्रमाणें मुंबईकर इंग्रजांनीं, कलकत्त्याच्या गव्हरनरजनरलास न विचारितां, दादासाहेबांचा पक्ष स्वीकारून पुणें दरबाराशीं वितुष्ट वाढविलें आणि युद्धप्रसंग उत्पन्न केला. ही गोष्ट गव्हरनरजनरल वॉरन हेस्टिंग्ज ह्यांस अन्यायाची व गैरशिस्त वाटून ती त्यांनीं अमान्य केली, व त्यांनीं मुंबईचे गव्हरनर हॉर्नबी ह्यांस रघुनाथरावाचा पक्ष सोडून मराठ्यांशीं लढाई तहकूब करण्याचा हुकूम पाठविला. मुंबईकर इंग्रजांनीं उरण, साष्टी वगैरे ठिकाणें मराठ्यांच्या ह्या द्वंद्वयुद्धांत जिंकून घेतलीं. त्यामुळें पुणें दरबारच्या मुत्सद्द्यांस अतिशय संताप उत्पन्न होऊन, त्यांनीं तीं परत घेण्याचा निश्चय केला. अशा समयांत वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं, पुणें दरबारचे मुत्सद्दी सखारामबापू व नाना फडणवीस ह्यांस पत्र पाठवून, स्वतंत्र तह करण्याकरितां कलकत्त्याहून कर्नेल अपटन ह्यांची रवानगी केली असें कळविलें. त्याप्रमाणें कर्नेल अपटन हे ता. २८ डिसेंबर इ. स. १७७५ रोजीं पुरंधरास येऊन दाखल झाले. तेथें त्यांचा व मराठ्यांचा ता. १ मार्च इ. स. १७७६ रोजीं तह झाला. हाच इतिहासप्रसिद्ध पुरंधरचा तह होय. वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं मुंबईकर इंग्रजांची मसलत रद्द करून

पुणें दरबाराशीं सख्य करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें मुंबईकर इंग्रजांचा फार अपमान झाला, व त्यांनीं व रघुनाथराव पेशव्यांनीं इंग्लंडमध्यें कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांच्या कडे पत्रव्यवहार करून कलकत्तेकर इंग्रजांचा हुकूम पुढें रद्द करविला. ह्या घडामोडीच्या विस्तृत वृत्तांताचें विवेचन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. मुख्य गोष्ट एवढीच कीं, इ. स. १७७६ पासून मराठ्यांच्या राजकारणांत कलकत्तेकर इंग्रजांचा संबंध उत्पन्न झाला, व तेव्हांपासून तेथें मराठ्यांच्या वतीनें राजकीय बोलणींचालणीं करण्याकरितां व तेथील राजकीय बातम्या पाठविण्याकरितां, नाना फडणविसांनीं लाला सेवकराम ह्या कायस्थ मुत्सद्द्याची कलकत्ता येथें मराठ्यांच्या वकिलीवर योजना केली.

पुरंधरचा तह झाला त्या वेळीं लाला सेवकराम हे पुण्यास होते. हा तह होऊन कर्नल अपटन ह्यांची पुण्याहून ता. ११ फेब्रुवारी इ. स. १७७७ रोजीं रवानगी झाली. त्या प्रसंगीं लाला सेवकराम ह्याचीही कलकत्त्याच्या वकिलीवर योजना होऊन त्याची तिकडे रवानगी झाली*. तेव्हांपासून ह्मणजे इ. स. १७७७ पासून तों इ. स. १७९३ पर्यंत, लाला सेवकराम कलकत्त्यास असल्याचें त्याच्याच पत्रावरून सिद्ध होतें. ह्या अवधीमध्यें कलकत्त्यास वॉरन हेस्टिंग्ज, म्याकफर्सन, लॉर्ड कार्नवालिस आणि सर जॉन शोअर असे निरनिराळे गव्हरनरजनरल होऊन गेले. ह्या सर्वांच्या दरबारांत जाऊन त्यांच्या मुलाखती घेणें, पुण्याहून आलेले खलिते त्यांस सादर करणें, त्यांच्याशीं राजकीय गोष्टी बोलणें, त्यांचे खलिते पुण्यास पाठविणें, व कलकत्तेकरांच्या हालचालींवर बारीक नजर ठेवून पुण्यास सर्व गुप्त राजकारणांचीं खुलासेवार पत्रें लिहिणें इत्यादि कामें लाला सेवकराम ह्याजकडे होतीं. त्यास ह्या कामाबद्दल वेतन किती मिळत असे, हें निश्चित समजत नाहीं. तथापि, त्याचा मुलगा चिमणलाल ह्याचें नानांस लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून लाला सेवकराम ह्यास दरमहा ३०० रुपये (अर्काटी) मिळत असत. त्यां-

* लाला सेवकराम ह्याची पुरंधराहून ता. १२ मार्च इ. स. १७७७ रोजी कलकत्त्यास रवानगी झाली व त्याचे बरोबर इंग्रज कलकत्तेकर ह्यास पोषाक वगैरे पाठविण्यांत आले, त्यांची याद्दी उपलब्ध झाली आहे. ती येणेप्रमाणेः—

१३०९ रुपये किंमतीचा पोषाक खांसा जनरल इमादुदौला हेष्टन जलादतजंग ह्मणजे वॉरन हेस्टिंग्ज यांस. २५६८॥ पोषाक कौन्सलदार तीन मानसेन, बारवेल आणि फरानसीस. ५०९० रुपये किंमतीचे जवाहीर सर्वांस मिळून. हत्ती एक (त्याचें नांव फत्तेलष्कर). घोडे तीन. ह्यांपैकीं हत्ती रस्त्यामध्यें मस्तीस आला व त्यामुळें तीनशें रुपये अधिक खर्च झाला, हा मजकूर लाला सेवकरामाच्या पत्रांत लेखांक १ मध्यें आहे.

पैकीं २५ रुपये बट्टा कापला जात असे. ५ रुपये दरबारखर्च व १७५ रुपये घरभाडें मिळून २०५ खर्च वजा जाऊन, बाकी ९५ रुपये स्वतःच्या खर्चास शिलक राहात. ते त्यास पुरत नसत.* मग पेशव्यांनीं त्यास कांहीं अधिक नेमणूक दिली काय तें समजत नाहीं. लाला सेवकराम ह्यास लाला चिमणलाल व लाला गुलाबराय असे दोन मुलगे होते. त्यांपैकीं गुलाबराय हा नाना फडणविसांजवळ पुण्यास राहात असे. लाला चिमणलाल हा राजकीय कामाकरितां पुण्यास जाऊन येऊन असे. कलकत्त्यास पुण्याहून पेशव्यांचे व नानांचे खलिते नेणें आणणें वगैरे कामें हे दोन्ही चिरंजीव करीत असत. कलकत्त्याहून आजुरदार कासिदाबरोबर पत्रें पाठविण्यास दोन कासिदांस ११५ रुपये खर्च येत असे. असो.

लाला सेवकराम ह्यानें इ. स. १७७७ पासून इ. स. १७९३ पर्यंत पुण्यास जीं पत्रें लिहिलीं असतील, तीं अनेक दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाचीं असलीं पाहिजेत. त्यांवरून कलकत्तेकर इंग्रजांच्या अनेक रंगांच्या राजकारणांचें सत्य स्वरूप दृग्गोचर होऊन, मराठ्यांचे व इंग्रजांचे डावपेंच त्या वेळीं कसे चालले होते व उभय राष्ट्रांची मुत्सद्देगिरी कोणत्या दर्जाची होती, त्याचें वास्तविक चित्र व्यक्त झालें असतें. परंतु

*लाला सेवकरामाचा मुलगा चिमणलाल ह्यानें नानांस लिहिलेलें पत्र येणेंप्रमाणें:—

"विज्ञप्ति चिमणलाल अर्ज ऐसीजे:—लाला सेवकराम यांसी सरकारांतून कलकत्त्यासी रवाना केलें, ते समयी पालखी व आबदागिरी व दिवट्या व जातीस एकसाला बेगमी रुपये तेवीसशें दिले. परंतु यादीवरी करार जाहलें नाही. माधवराव सदाशिव बोलिले की, तुह्मी लवकर सरकारकामासी जाणें, आह्मी तुमचे यादीवरी करार करून देववूं. मग कित्येक वेळां त्यांसी सांगितलें. परंतु त्यांनीं चित्त पुरवून करार करून दिलें नाहीं. उपरांतिक सेवकही आज्ञेप्रमाणें कलकत्त्यासी जाऊन आला. ते समयी पुन्हां विनंति केली. त्याजवरी आज्ञा जाहली कीं, तितकें होणार नाहीं. कांहीं कमजास्ती पाहून करून देऊं. राजेश्री बाबुरावजीनें दफ्तरची यादी पाहून सरकारांत विनंति केली. ते ह्मणतात की, तुह्मांसी पहिले आठशें रुपये पावत होते, त्याचप्रमाणें कराराविषयी आज्ञा जाहली आहे. याजकरितां अर्ज ऐसीजे:—तेथून तीनशें रुपये आर्काटी दरमहा मिळतो. त्याजपैकी पंचवीस रुपये बट्टा व पांच रुपये दरबारखर्च व पावणे दोनशे रुपये घरचें भाडें, दरमहा लागतो. बाकी पंचाण्णव रुपये राहातात. त्यासी तेथें घोडा एक व पालखी व दिवट्या व आबदागिऱ्या वगैरे माणसें व जातीचे खर्च व तेथील सरकारचे चोबदार खिजमतगार ऐसा खर्च आहे. याजमुळें बारा तेराशें रुपये अधिक लागतात. व येथें कुटुंबाचें माणसें आहेत. तीन पुस्तांपासून सेवा करितों. दुसरें घर पाहिलें नाहीं. सेवकाचें अंतःकरण हेंच कीं, चरणसेवा करावी. आणि आपलें दळिद्र स्वामीजवळ अर्ज करावें. त्यासी, स्वामींनीं कृपाळू होऊन, ज्यांत सेवकाची व कुटुंबाची संरक्षण होय ऐसे राजेश्री बाबुरावजीस मखलसीची आज्ञा करणार स्वामी धनी समर्थ आहेत. सेवकासी आज्ञा वंद्य आहे हे विज्ञापना."

दुर्दैवानें हा सर्व पत्रव्यवहार नष्ट झाला असून, त्यापैकीं अधलीं मधलीं काहीं त्रोटक पत्रें मात्र सांपडलीं आहेत. परंतु तीं पत्रें देखील अतिशय मनोरंजक असून तीं त्या वेळच्या राजकारणांचें अल्प पण सत्य स्वरूप व्यक्त केल्यावांचून राहात नाहींत. वॉरन हेस्टिंग्ज, म्याकफर्सन, लॉर्ड कॉर्नवालिस किंवा सर जॉन शोअर ह्यांची माहिती इंग्रजी ग्रंथांतून प्रसिद्ध आहे. परंतु लाला सेवकराम ह्यानें त्यांची लिहिलेली हकीकत 'चक्षुर्वै सत्यम्' अशी असून ती फारच मनोरंजक व महत्त्वाची आहे; व तिची मातबरी, समकालीन पुरुषाचें स्वतंत्र निरीक्षण ह्या दृष्टीनें, कांहीं अंशीं इंग्रजी ग्रंथांपेक्षांही अधिक आहे. हीं सर्व पत्रें उपलब्ध झालीं, तर मराठ्यांच्या इतिहासावर किती नवीन प्रकाश पडेल हें सांगावयास नकोच.

लाला सेवकराम ह्याचीं कांहीं पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं आहेत. तीं सुसंगत व क्रमवार नाहींत. तथापि तीं कालानुक्रमानें आह्मीं पुढें दिलीं आहेत.

## लेखांक १.

ह्यामध्यें लाला सेवकराम ह्याचें व बडेसाहेब ह्मणजे वॉरन हेस्टिंग्ज ह्यांचें झालेलें संभाषण दिलें आहे. तें महत्त्वाचें आहे. ह्या पत्रावरून लाला सेवकराम पुण्याहून कलकत्त्यास कांहीं दिवसांपूर्वीं नुकताच येऊन दाखल झाला होता, असें दिसतें. त्यास पुण्याहून कलकत्त्यास पोंचण्यास पांच महिने लागले. ह्या पत्रामध्यें रघुनाथरावदादांसंबंधानें व पुरंधरच्या तहाच्या कांहीं भानगडीच्या मुद्यांसंबंधानें मजकूर आहे.

**श्रीरामचंद्र.** दिसेंबर इ. स. १७७७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित लाला सेवकराम कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना ऐसीजेः—येथील कुशल तागाईत चंद्र माहे जिल्काद मुक्काम कलकत्ता जाणून स्वकीय निजानंदवैभव लेखकास आज्ञा केली पाहिजे. विशेषः—येथील बडेसाहेब मिस्तर ईष्टन[1] आह्मांस ह्मणूं लागले कीं, तीन लक्ष रुपये ज्या कामीलची[2] जागीर आह्मांस देऊं केली आहे, ते

१ इष्टन=वॉरन हेस्टिंग्ज ह्याची मराठी पत्रांत इंग्रजी नांवें इष्टन, हेष्टन, हेष्टिन अशी निरनिराळीं लिहिलेलीं आहेत. २ कामील जहागीर=पुरंधरच्या तहामध्यें तीन लाख रुपये कामील जहागीर इंग्रजांस द्यावी असें कलम होतें. त्यांत पुढें शंका निघाली. इंग्रज ह्मणूं लागले की, तीन लक्ष रुपये उत्पन्न दरसाल देणारी जहागीर ह्मणजे कामील जहागीर. पुणें दरबारचें ह्मणणें कीं तीन लक्ष कमील जहागीर ह्मणजे तीन लक्षांपर्यंत वसूल देणारी. ह्या वादाचा उल्लेख ग्रांटडफनेंही केला आहेः—"It was evident that 'a country of three complete lacks of rupees' as expressed in the treaty, meant territory, producing annually a revenue, amounting to three lacks of rupees complete; but the Persian word *Kumal* or *Kamil*, which was employed to express complete, is also a revenue term, which though variously explained, may be said to signify the highest assessment ever known to have been fixed; and to this interpretation the ministry adhered."

आद्याप दिधली नाहीं; व देतां ते हा प्रकारची कीं, चाळीस वर्षे तुमचा अंमल एका वर्षाचा वसूल दाखवितां! जर देणें असली तर दाहा पांच वर्षे तुह्मी वसूल घेत असाल तो दाखला दाखवून देणें. आह्मीं उत्तर केलें कीं, तेथील जमा कामील तीन लक्ष रुपयेच आहे. वसूल कितीक वेळां घेतला असेल, व कधीं आफत[1] असल्यानीं व सुलतानीकरितां कमज्यादाही घेतला असेल. ते ह्मणूं लागले कीं, आह्मांस जमिदारां-हातीं कबूल करून देणें, व आजपासून किती दिवसांत देतां हें लिहून देणें. आह्मीं उत्तर केलें कीं, ही गोष्ट हुजूर लिहिल्याखेरीज आह्मांकडून लिहून देववत नाहीं. दुसरें ह्मणूं लागले कीं, आह्मीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस बहुत प्रकारें समजावून सांगितलें कीं, 'तुह्मांस गंगथडीस जाहागीर देतात, ती घेऊन स्नानसंध्या करावी. श्रीमंत ह्मणतात कीं, आह्मांस एकंदर यांचें आमलांत राहणें नाहीं. आह्मांस श्री-काशीस घेऊन जाणें ह्मणजे स्वस्थ स्नानसंध्या करीत जाऊं.' त्यास जर जलमार्गें आणावें, तर त्यांचा ब्राह्मणत्वधर्म राहणार नाहीं. खुषकीचे मार्गें आपलीं एक दोन पलटणें सांगातें देऊन आणावें, तर मार्गांत तुमचे कितीक सरदार आहेत. त्यांनीं वाटेंत खलष[3] केल्यास आमचा धर्म राहाणार नाहीं. कदाचित् दाहावीस पलटणें सांगातें देऊन आणावें, तर सहजच कजिया उभा राहिला. मग तुमचें आमचें सौरहस्य राहणार नाहीं. यास्तव तुह्मीं आह्मांस लिहून देणें कीं, तुह्मी श्रीमंत राजश्री दादांस काशीस आणतां, त्यांत आह्मांकडील कोणाही सरदाराचा रतीमात्र उपसर्ग जाल्यास खुद्द निसबत जाब करूं. ह्मणजे आह्मी एकदोन पलटणें सांगातें देऊन, गुजरातीचे वाटेनें उज्जयनेवरून काशीस आणूं. आह्मीं उत्तर केलें कीं, श्रीमंतांस तुह्मीं काशीस आणावें हा करार तुमचे आमचे तहनाम्यांत नाहीं. त्यांनीं गंगथडीस राहावें. करारनाम्याप्रमाणें वर्तणूक करूं. तुह्मीं नूतनचे गोष्टी सांगि-तल्यास आह्मीं काय लिहून द्यावें? तिसरें ह्मणूं लागले कीं, तुह्मी सरकारांतून आह्मां-जवळ आले आहां, तर तुह्मीं आपले सरकारचा खासे मोहरेनसीं मुखत्यारनामा आह्मांस दाखविणें कीं, लाला सेवकराम आह्मीं आपणाकडून मुखत्यार करून पाठविले आहेत. हे जे करतील तें आह्मांस मान्य आहे. ह्मणजे आह्मांस आणीक कितीक जाबसाल करावयाचे आहेत, ते केले जातील. आह्मीं उत्तर केलें कीं, तुमचे आमचे जाबसाल जे होते ते अवघे हुजूरच जाले. नूतन कांहीं बोलावयाचें नव्हतें कीं, आह्मीं मुखत्यारनामा आणावा. ऐसे प्रकारचे यांचे आमचे जाबसाल जाले. आह्मांस तर सरकार-मर्जीचे अनुसंधानें जें करणें तें करावें लागतें. परंतु हे ऐशा नवीन गोष्टी सांगतात. त्याचीं उत्तरें आह्मीं काय द्यावीं? हेंच वर्तमान पूर्वी कासीदजोड्या पाठविल्या आहेत, त्यां-बरोबर लिहिलें आहे. सविस्तर सेवेसी विदित जालें असेल. पुढें जशी आज्ञा येईल तदनुरूप वर्तणूक केली जाईल. हाल्लीं सरकारांतून खलिते पांच, एक श्रीमंतांचे मोहरेनसीं यांचे

१ आफत=दुष्काळ, महर्गता. २ सुलतानी=जोरजुलूम, झोटिंगपादशाही. ३ खलष=कुरापत, तंटा, भांडण.

पातशाहाचे नांवाचा व दोन बडेसाहेबांस व दोन करनेल आपटनास रवाना चंद्र २५ जमादिलाखरचे चंद्र १२ मोहरम जानीस दोन कासीदजोड्यांबरोबर आह्मांजवळ कलकत्यास पावले. आज्ञेप्रमाणें बडेसाहेबांस व करनेलास पावते केले. बडेसाहेबही पत्रें पाहून पातशाहाचे पत्राची नकल आह्मांस मागितली. सरकारांतून तर नकल पाठविली नव्हती कीं आह्मीं द्यावी. त्याजवरून बडेसाहेब दिक होऊन ह्मणूं लागले कीं, आह्मां हातीं पातशाहास पत्र पाठवितां, व नकल पाठविली नाहीं. त्याजवरून आमचे चित्तांत कितेक प्रकारचे संदेह जातात. त्याजकरितां ही गोष्ट तुमचे आमचे स्नेहांतून दूर असावी, व आमचे बादशाहास तुह्मीं जो अलकाबा लिहिला, तो पातशाहाचे लिहावयाचें लायक नसतांही, आह्मी तुमचे स्नेहावर दृष्टी ठेवून, हें पत्र जाहजावर पाठवितों. आजपासून नकलेविना तुमचें पत्र आल्यास पाठविणार नाहीं, व पातशाहास जो अलकाबा लिहावयाचा आहे याजविषयीं आलाहिदा पत्रें लिहिलीं आहेत. पुढें जर पत्रें पाठवावयाचीं असतील, तर याप्रमाणें अलकाबा व पत्राची नकल आल्यास आह्मी पाठवीत जाऊं. व हल्लीं जीं पत्रें सरकारचीं बडेसाहेबांस आलीं होतीं, त्यांच्याही नकलेकरितां आह्मांस पुसूं लागले कीं, या पत्रांच्या नकला तुह्मांपाशीं आल्या आहेत किंवा नाहींत? सरकारांतून तर नकला आह्मांपाशीं आल्या नव्हत्या; यास्तव आह्मी उभेच राहिलों. त्यांनीं आपलीं पत्रें आह्मांस दाखविलीं, व ह्मणूं लागले कीं, आणिका मजकुराचीं उत्तरें पेशजीं आह्मीं लिहिलीं आहेत. हल्लीं जंबुसराचे शिबंदीविषयीं लिहिलें आहे. त्यास, आह्मांस बारा लक्ष रुपये देऊं केले आहेत. त्याची येथें साहुकारी निशा व तीन लक्ष रुपये कामील जागीर पावलियाची रसीद मुंबईकरांपासून आणून देणें, ह्मणजे आह्मांस जंबुसरासीं व तेथील सिबंदीसीं गरज नाहीं. आह्मीं उत्तरें केलीं कीं, शिबंदीचा मजकूर कांहीं करारनाम्यांत नाहीं. हे आपण नवीनच गोष्ट सांगतात. परंतु हें मानीत नाहींत. आपलीं पत्रे आलियाचें पूर्वींच यांस मुंबईकरांनीं लिहिलें होतें कीं, फरासीस[3] पुण्यास आला व त्यांनी मुंबईजवळच फरासीसास कोठीस जागा दिधली, व कौलकरारही करून घेतला. हें वर्तमान कळल्यापासून फार श्रमी आहेत, व सांप्रत आपणासही संकलित लिहिलें आहे. व हेंच अनुसंधान चित्तांत आणून जाहजाचे मालाविषयीं आपणास आलाहिदा पत्रें लिहिलीं आहेत. आह्मीं उत्तर केलें कीं, आह्मांकडील फिसादी लोक मालमत्ता घेऊन साष्टी व मुंबईंत आहेत, ते आमचे स्वाधीन करणें. जाहजाचे मालाविषयीं सरकारांत लिहून उत्तर आणवून सांगितलें जाईल. परंतु यांनीं न मानून पत्रें लिहिलीं आहेत.

---

१ पादशाहाचे नांवाचा खलिता=इंग्रजांच्या बादशाहाच्या नांवाचें पत्र. ह्या वेळीं इंग्रजांचा बादशाहा तिसरा जार्ज राजा हा होता. त्यास पेशव्यानी गव्हरनरजनरलचे मार्फत पत्र पाठविल्याचा हा उल्लेख आहे. ह्या पत्राचा मसुदा नाना फडणविसांचे दप्तरांत सांपडला आहे. तो ऐतिहासिक टिपणें नंबर २९ मध्यें छापला आहे. तोच हा खलिता असावा. २ अलकाबा=मायना. ३ फरासीस=फ्रेंच. ह्याचा वकील सेंट ल्युबिन हा पुण्यास आला होता.

दुसरें, सांप्रत एक महिना जाहला कीं, राजश्री गोपाळराव बरवे यांजकडील वकील शामराव येथें आले आहेत. जाबसाल दरबारांत करितात कीं, श्रीमंत राजश्री दादासाहेबांस कोकणांतच मुंबईजवळ जागीर देवावी. येविषयीं तीन लक्ष रुपये आह्मी तुह्मांला नजर देतों. याचें उत्तर बडेसाहेबांनीं काय दिलें, तें आह्मांस कळलें नाहीं. कळाल्यासारिखें सविस्तर लिहिलें जाईल. चिरंजीव गुलाबराय आपले चरणाजवळ आहे. त्याचा हरएक विषयीं सांभाळ करणार धनी समर्थ आहेत. सेवकांनीं लिहावें असा अर्थ नाहीं. आमचें वर्तमान असें कीं आह्मांस सरकारांतून एका वर्षाचे खर्चाची बेगमी करून दिधली व हत्ती व घोड्याचे खर्चास चौ महिन्यांचें दिधलें होतें. त्यास आह्मी येथें पांचा महिन्यांत पावलों. हत्ती सरकारांतून दिधला होता तो वाटेवर मस्तीस आला. रावताखेरीज समागमें न चाले, व वाटेंतच माहावत व गंडेकरी पळून गेले, सबब तीनशें रुपये खर्च अधिक जाला, व दरबारखर्चेही येथें शंभर रुपये चौघां साहेबांचा पडला. करनेल येथें आह्मांस ह्मणूं लागले कीं, येथें पातशाहाचे वजीराचे व भोंसल्यांचे वकील आहेत, त्यांजबरोबर प्यादे वगैरे कितीक सरंजाम आहे. तुह्मांस असें राहणें लाजम[1] नाहीं. त्यास तुह्मींही शिबंदी ठेवावी. त्यास आह्मीं वीस माणसें तीन महिने ठेविलीं. शेवटीं येथील रंग असा पाहिला कीं, कपर्दिकेचीही प्राप्ति नाहीं. सबब दूर केलें. या गोष्टीचा खर्च तीनशें रुपये पडला. येथें आह्मांस एक हवेली मात्र राहावयास दिधली आहे. आह्मीं कैपितानाचे[2] मारफतीनें साहुकारापासून सातशें रुपये घेऊन राजश्री माधवराव सदाशिव यांचे नांवें हुंडी लिहून दिधली आहे, ते तेथें पावली असेल. त्यांचे रुपये तेथें न मिळाल्यास येथें आह्मांस संकष्ट पडेल. धनी निर्वाण करणार समर्थ आहेत. पुढें आमचे राहावयाचे खर्चाची सोई येथें जाली पाहिजे, ह्मणजे योगक्षेमाचा निर्वाह होईल. येथें किमपीही प्राप्तांश नाहीं. सेवेसी विदित व्हावें ह्मणून विज्ञापना लिहिली असे. विशेष काय लिहावें हे विज्ञापना."

## लेखांक २.

ह्या पत्रामध्यें, बडेसाहेब ह्मणजे गव्हरनरजनरल वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं, पुणें दरबारनें सेंट ल्युबिन नांवाच्या फ्रेंच वकिलाशीं सख्य करून त्यास पुण्यास येण्यास परवानगी दिली, वगैरे बातमी समजल्यावरून, लाला सेवकराम ह्यांजजवळ "तुमचे सरदार आमची मस्करी करितात," ह्मणून रागानें उद्गार काढिले आहेत. हें संभाषण फार मनोरंजक आहे. फ्रेंच लोकांशीं मराठ्यांनीं सख्य केलें, ही गोष्ट तहाच्या विरुद्ध झाली; ह्मणून बडेसाहेबांस किती संताप आला, तें ह्या पत्रावरून चांगलें व्यक्त होतें.

१ लाजम=योग्य, लायक. २ कपितान=क्यापटन म्याकफर्सन हा पुण्यास कर्नेल अपटनबरोबर गेला होता. त्याची व सेवकरामाची चांगली दोस्ती होती. हा पुढें अॅक्टिंग गव्हरनरजनरल झालेल्या म्याकफर्सनचा भाऊ असावा.

**श्री रामचंद्र.** ता. ७ मार्च इ. स. १७७८..

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी–

आज्ञांकित लाला सेवकराम कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना ऐसीजे येथील कुशल तागाईत चंद्र ७ माहे सफर मुक्काम कलकत्ता जाणोन स्वकीय निजानंदवैभव लेखकास आज्ञा केली पाहिजे. विशेषः–पूर्वी येथील सविस्तर वर्तमान लिहून कासिद-जोड्यांबरोबर सेवेसी पाठविलें आहे, त्याजवरोन विदित जालें असेल. हल्लीं दोन खलिते बडेसाहेबांचे नांवाचे रवाना चंद्र १७ रमजानचे चंद्र ७ जिल्हेजीस पावले. आज्ञेप्रमाणें खलिते बडेसाहेबांस दिधले. बडेसाहेब सांगूं लागले कीं, 'हे तुमचे सरदार आमची मस्करी करितात.' आह्मी बोलिलों कीं, 'मस्करीचें प्रयोजन काय आहे?' त्यांनीं सांगितलें:—'तुमचे सरदारांनीं फरासिसास पुण्यांत ठेवून कौलकरार केला, व मुंबई-जवळ कोठी करावयासी जागा दिधली; व आह्मांस लिहितात कीं कराराप्रमाणें वर्तणूक करून मुंबईकरासी ताकिद करावी. ही मस्करी नाहीं तर काय आहे!' आह्मी बोलिलों कीं, 'आमचे सरदार करारनाम्याप्रमाणें वर्तणूक करितात; परंतु मुंबईकर नूतनच खलष काढून, आपणास चित्तास येईल त्याप्रमाणें खोटें वर्तमान लिहितात. यांजविषयीं सरदारांनीं वारंवार आपणास लिहिलें आहे. तर मुंबईकरांस आपण मागती ताकीद द्यावी.' त्याचें उत्तर दिधलें कीं, 'आह्मीं पूर्वी मुंबईकरांस व तुमचे सरदारांस पत्रे लिहिलीं आहेत. त्यांची काय उत्तरें येतात त्याजप्रमाणें पुढें वर्तणूक करूं.' तथापि फरासीस पुण्यांत आले, सबब यांचे चित्तांत संदेह जाला आहे. यास्तव येथून मुंबईस दाहा लक्ष रुपये हुंड्या करून पाठविले आहेत. आपले इकडील उत्तराची मार्गप्रतीक्षा करितात. पत्रें पावल्यानंतर मग काय उत्तर द्यावयाचें ते देतील. सेवकाचें वर्तमान तर पेशजीं सविस्तर लिहिलें आहे. त्यास येथे आह्मांस कर्जदारीही जाली आहे. त्यास कृपाळू होऊन खर्चाची बेगमी ऐसी केली पाहिजे कीं, कर्ज देऊन पुढें निश्चितेनें शुभ चिंतन करूं. चिरंजीव चरणाजवळ आहेत. त्याचाही परामर्ष केला पाहिजे. सेवकांनीं अधिकोत्तर काय लिहावें? सर्व निर्वाह करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना."

## लेखांक ३.

लेखांक ३ हें ता. १० आक्टोबर इ. स. १७८० सालचें पत्र आहे. इ. स. १७७८ व इ. स. १७७९ ह्या सालचीं पत्रें मुळींच सांपडत नाहींत. लेखांक तीन ह्यामध्यें दादासाहेबांच्या वकिलानें गव्हरनरजनरल ह्यांचें मन पुण्याच्या मुत्सद्दी मंडळीविरुद्ध कलुषित केलें, व त्यास नाना प्रकारचे फायदे दाखवून आपल्या पक्षास वळवून घेतलें, असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें मराठ्यांशीं विरोध करण्याचे बाबतींत वॉरन हेस्टिंग्ज व त्याचा कौन्सिलर मि० फ्रान्सिस ह्यांचा मतभेद पडून

उभयतां द्वंद्वयुद्धापर्यंत आले, असाही उल्लेख आहे. एकंदरींत हें पत्र अतिशय मनोरंजक व महत्त्वाचें आहे.

पै॥ छ २४ जिल्हेज इहिदे समानीन. **श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता. १० आक्टोबर इ.स.१७८०.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज लाला सेवकराम साष्टांग दंडवत विज्ञापना ऐसिजेः—येथील कुशल ता० छ ११ माहे शवाल अश्वीन शुद्ध १३ जाणोन स्वकीय निजानंदवैभव लेखकास आज्ञा केली पाहिजे. विशेषः—पूर्वी दोन तीन विनंतिपत्रें येथील सविस्तर वर्तमान लिहून सेवेसी पाठविलें, परंतु जाब एकही सादर जाहले नाहीं. सेवकास सर्वप्रकारें आपले चरणाचा भरंवसा आहे. येथील वर्तमान तरी, बेनीरामपंत भोंसलेकडील वकील व राजारामपंत दादासाहेबांकडील या उभयतांनीं बडेसाहेबांस दक्षणेची आशा बहुत प्रकारें दाखवून, श्रीमंतांची सरकारविरोधीवर आणिलें. व आंग्रेजांचें मानस हेंच कीं, कोन्ही प्रकारें दक्षण हस्तगत करावी. यांणीं हाच रीतीनें हळू हळू मुलक बंगाला व रोहेलखंड व पुन्हा ( कुरा ? ) वगैरे जागां अंमल केला. बडेसाहेबांनीं सरकारचे सरदारांची सुस्ती व विरोध पाहून, सालगुदस्तां दोन अडीच कोट रुपये नगद जहाजावर करनेल गाडर याजकडे पाठवून, बहुत ताकीद लिहिलें कीं, गुजरातेस जाऊन अंमल करावे. व करनेल पामर साहेबासही, सात आठ महिने जाहाले, बडेसाहेबांनीं गोहदचे राजाजवळ हत्ती, घोडे, जवाहीर व वस्त्रें देऊन पाठविलें, कीं उभयतांनीं मिळून श्रीमंतांचे मुलकांत हिंदुस्थानमध्यें हंगामा[१] करून हस्तगत करावें. हें वर्तमान पूर्वीच सेवेसी लिहिलें आहे. हल्ली बडेसाहेबांनीं करनेल कनक[२] मेजर यांस गोहदेकडे पलटनांची सरदारी देऊन छ ९ माहे रजबेस रवाना केलें. छ १० व २२ माहे मजकुरीं व छ. ४ व १३ माहे साबानीं, दादासाहेबांकडील चार कासीद चौकडे पैहाम (!) खलिते घेऊन कलकत्त्यास आले. राजारामपंतांनीं बडेसाहेबांस दिधले. लिहिले मजकूर हाच कीं, तुह्मीं हरेक प्रकारें आह्मांस पुण्यास पावतें करावें. सर्व मुलूक हस्तगत होईल. बडेसाहेबांनीं, दादासाहेबांचे पक्ष करितां आपला फायदा नफा जाणून, बहुतप्रकारें सरकारद्वेष साधिला आहे; व दादासाहेबांचे लिहिल्याप्रमाणें मुंबईकरांस ताकीद लिहिली कीं, तुह्मीं कोंकण प्रांतीं हंगामा करावा. मिस्तर फरानसीस[३]-

---

१ हंगामा=स्वारी, मोहीम. २ कनक मेजर= Major Camac. ३ मि० फरानसीस= फ्रान्सिस. ह्यानें मत पुणें दरबाराशीं विरुद्ध होऊन मराठ्यांशीं युद्ध सुरू करावें असें नव्हतें. वॉरन हेस्टिंग्ज व फ्रान्सिस ह्यांचा ह्या संबंधानें फार मतभेद झाला. फ्रान्सिस ह्याचें मत एतद्देशीय संस्थानिकांशीं केलेले तह बरोबर रीतीनें पाळून आपल्या राष्ट्राची इभ्रत कायम ठेवावी असें होतें. त्यानें ता. २५ जानेवारी इ. स. १७७९ च्या सिक्रेट कमिटी-मध्यें हें आपलें मत स्पष्टपणें नमूद केलें आहे. तें येणेंप्रमाणेः—

साहेब कौसली यांनीं दोनचार वार बडेसाहेबांस सांगितलें कीं, 'तुह्मीं श्रीमंत पेशवा' साहेबाशीं दुषमनी केली, आपला मुलूख खराब होईल, व विलायतेचे बादशाहाचा हुकूम नसतां, याचा परिणाम बरा नाहीं.' बडेसाहेबांनीं जाब दिधलें कीं, 'आह्मी दक्षिणप्रांतीं हमेश हंगामा करूं, ह्मणजे तेथील सरदारांस हे मुलकांत यावयाचा अवकाश होणार नाहीं.' यास्तव बडेसाहेबांचा व फरानसीससाहेबांचा विरोध वाढला. फरानसीस साहेब, दोन अडीच महिने जाहाले, कौसल करीत नाहीं; व हवा खाण्याचा बहाना करून मकसुदाबादेपलीकडे निघून गेले.* राजश्री चिमनाजी भोंसले ज्येष्ठमासीं सुभे कटकप्रांतीं आले. सुमागमें फौज पंचवीस तीस हजार आहे. हें खबर बडेसाहेबांनीं ऐकून बेनीरामपंतास बोलावून पुसलें कीं, तुह्मी ह्मणतां, 'भोंसले सर्व प्रकारें आपले स्नेही आहेत. फौज हे प्रांतीं आली. याची सबब काय?' बेनीरामांनीं जाब दिधलें कीं, श्रीमंत पेशवासाहेब व नानासाहेब यांची ताकीद पुन्याहून बहुत आहे. परंतु चिमनाजी भोंसले यांची मर्जी करितां आपले मुलकास आले. दसरा जाल्यावर दक्षणेस जा-

---

"I have no idea of national honour independent of justice. The projects of ambition are usually dangerous. If they are nothing but the projects of ambition, they are in every judgment, always dishonourable. To revert to that pacific system which the Company have uniformly prescribed to us, to endeavour to conciliate the friendship, which we have unjustly or unwisely departed from, and to return, if it be possible, to the terms of a treaty which we ourselves have wantonly violated, are not acts, that will ever, as I think and as I feel, bring dishonour on the British name. I am sure they are the best means of preserving our strength and our real influence in India, and I have no doubt that they will meet with the highest approbation from home. As long as I am trusted with any share in the office of guardian of the British interests and honour in this country, these shall be the principles on which I will invariably act."

—*The Administration of Warren Hastings by Prof. Forrest.* Page 169.

अर्थात् अशा प्रकारची विचारबुद्धि बाळगणाऱ्याचा व वॉरन हेस्टिंग्ज ह्याचा बेबनाव व्हावा हें अगदीं साहजिक आहे. फ्रान्सिसनें मराठ्यांशी युद्ध न करावें अशाबद्दल आपलें स्पष्ट मत अनेक वेळां प्रतिपादन केलें, व अखेर ता० १९ जून इ. स. १७८० च्या कौन्सिलच्या बैठकीमध्यें आणखी असें सांगितलें कीः—

"A peace was indispensably necessary to save the India Company, and every interest connected with theirs, from the greatest distress if not certain ruin."

ह्या प्रत्यंतरपुराव्यावरून लाला सेवकराम ह्याची बातमी साधार असल्याचें सिद्ध होतें.

* फ्रान्सिसचें व वारन हेस्टिंग्ज ह्याचे अगदीं पटेना. तेव्हां कांहीं दिवस आजारी असल्याचें निमित्त करून फ्रान्सिस सिक्रेट कमिटीच्या बैठकींत हजर नव्हता, हें खरें आहे. ता. २० जुलै इ. स. १७८०, ता. २१ आगष्ट इ. स. १७८०, ह्या तारखांच्या बैठकींत फ्रान्सिस आजारी (indisposed) असल्याचें इंग्रजी प्रोसीडिंग्जमध्यें नमूद आहे.

-तील. आपल्याशीं बिगाड करणार नाहीं. याउपरी बडेसाहेबांनीं खबरदारीमुळें करनेल जॉन आपटन व मेगफरसन कपतान जे पुण्यास आले होते, व आणीक दोन तीन करनेल यांजबरोबर सात पल्टनें देऊन परगणे मेदिनीपूर व जलेसर कलकत्त्यापासून चार पांच मजल आहे, तेथें राहाविलें, व भोंसल्यांची फौजही बलेसर बंदरपावेतों छावणी केली आहे. उभयतांची फौजांमध्यें तफावत ९।१० कोसांची आहे. बडेसाहेबांनीं करनेल बेलीसाहेब याजबरोबर एक कंपनी तेलंगे व जासूदजोड्या व तीन लक्ष रुपयांची हुंडी देऊन पाठविले. करनेल बेली साहेबांनीं जाबसाल बहुत केला, परंतु रा० चिमनाजीनें मान्य केलें नाहीं. बेनीरामपंतांनीं बडेसाहेबांचें व आपलें पत्र नागपुरास पाठवून, राजश्री मुधोजी भोंसलेचीं दोनचार ताकीदपत्रें चिमनाजीचे नांवें आणविलीं कीं, आमचे व बडेसाहेबांचे बहुत स्नेह आहे. तुह्मीं बंगाल्यांत उपद्रव न करणें. पत्रदर्शनीं आपले मुलकास येणें. सुभे बरद्वान व मकसुदाबाद प्रांतीं दक्षणची फौजेमुळें बहुत गडबड पडली आहे. वस्तीचे लोक पळतात. छ. १५ माहे साबानीं फरानसीस साहेब मकसुदाबादेकडून कलकत्त्यास आले. बडेसाहेबांनीं बोलले कीं, 'अडीच तीन महिने जाहाले, तुह्मी कौसल करीत नाहीं. दक्षणची फौज कटक प्रांतीं येऊन बलेसर बंदरपावेतों राहिली. मुलकाचा व आणीक तर्फोचा जाबसाल बंद आहे.' फरानसीससाहेबांनीं जाब दिधले कीं, 'आह्मीं कौसल काय करावी? विलायतचे बादशाहानें दोनचार वार तुह्मांस लिहिलें कीं, आह्मांस बडीसाहेबी देणें. व दक्षणचे सरदारांसीं बिगाड न करणें. परंतु तुह्मीं गरूरीमुळें ध्यानांत आणत नाहीं.' बडेसाहेबांनीं रागें भरून बोलिले कीं, 'आह्मी तुह्मी लढाई करूं.* ज्यांची जीत होईल त्यांनीं बडेसाहेबी करावी.' ऐसें परस्परें करार करून, छ १६ माहे साबान बडेसाहेबांनीं करनेल पियास[1] यांस व फरानसीससाहेबांनीं करनेल वाष्टीनै[2] यांस साक्षीमुळें कोणास न कळतां आपले आपले रथावर बसून एक बागांत जाऊन भांडिले. प्रथम फरानसीस साहेब यांणीं एक गोळी पस्तोलाची मारली. बडेसाहेब वांचले. परंतु शिरावरली टोपीस छेद पडिलें. मग बडेसाहेबांनीं एक गोळी मारिली. फरानसीससाहेबांच्या बगलेखालीं

* फ्रान्सिस व वारन हेस्टिंग्ज ह्यांचे हे द्वंद्वयुद्ध झाल्याचे इंग्रजी ग्रंथांत नमूद आहे. वॉरन हेस्टिंग्जच्या एका चरित्रकारानें ह्या युद्धाची पुढें लिहिल्याप्रमाणें हकीकत दिली आहे. तिच्यामध्यें व लाला सेवकराम ह्याच्या हकीकतीमध्यें किती सादृश्य आहे हें त्यावरून दिसून येतें:—

"On the morning of the 17th, at about 6 o'clock, Hastings accompanied by Colonel Pearse as his second, and Francis, accompanied by Colonel Watson, met on the ground near Belvedere, and were placed at a distance of fourteen paces from one another. Francis thus described what followed: "My pistol misssing fire, I changed it. We then fired together, and I was wounded and fell. I thought that my backbone was broken, and of course that I could not survive it.... ." —*Private Life of Warren Hastings by Lawson.*

१ करनेल पियास=कर्नल पियर्स. २ करनेल वाष्टीन=कर्नल वॉटसन.

लागून जखमी जाले, परंतु वांचले. आजपावेतों कौसल होत नाहीं. छ. २३ साबान भाद्रपद वद्य १० स खबर आली कीं, करनेल पामरसाहेब यांनीं व गोहदचे राजांनीं मिळून गढ गोआलेर (ग्वालेर) घेतलें. बडेसाहेबांस हे खबर कळतांच बहुत संतोष जाले. एकशेंएक आवाज तोफखान्याचे करविले. बेनीरामपंत व राजारामपंत यांणीं नजरा दिधल्या. नवाब निजाम अलीखान यांचे दोन खलिते छ २ रमजानीं आले. राजा गोविंदराम नवाब वजीरचा वकील यांनीं बडेसाहेबांस दिधलें. अद्याप बडेसाहेबांनीं जाब दिल्हे नाहीं. हाल्लीं खबर आली कीं, हैदरनाईक यांनीं अरकाटचे मुलकांत येऊन लुटून आंग्रेजांचे अंमल दूर केले, व फुलचरीचा[1] किल्ला हस्तगत करून चाळीस पन्नास लक्ष रुपैची मालमत्ता घेतली. व तेथून मंदराजचे ( मद्रासचे ) बंदरास येऊन, शहर लुटून किल्ल्यास मोरचे लाविले आहेत. मंदराजाकडील एक जनरेल व दोन करनेल व चार बिबी[2] कलकत्त्यास पळून आले. बडेसाहेबांनीं दहाबारा पलटन बंदर गंजाम व राजबंदरी ( राजमहेंद्री ) व सिकाकोल वगैरे ते प्रांतींच्या, मदराज बंदरावर पाठविल्या. परंतु एक रा. चिमनाजी भोंसले फौज घेऊन कटक प्रांतीं आले, व दुसरें हैदर नाईक यांणीं मोठा उपद्रव अरकाट प्रांतीं केला. यास्तव बडेसाहेब व आणीक आंग्रेज बहुत घाबरले. पुढें पहावें काय होतें. सरकारची फौज कोणी एक सरकार मातबर बरोबर हे प्रांतीं येऊन लूटमार केली, तरच उत्तम आहे. यास्तव कीं, बडेसाहेबांचे सरकारांत बंगाल्याची तहसील श्रीकाशीसुद्धां चाळीस लक्ष रुपये दरमहा नगद येतो. याशिवाय पुन्हा व रोहिलखंड व अंतरवेद वगैरे जागांची तहसील आहे. मुलूक खराब जाल्यानें बडेसाहेबांचें बळ बहुत कमी होईल, व श्रीमंतांची खातेरखा[3] सुलाह ( सलाह ) करून मामला देतील. नाहींतर दक्षण प्रांतीं दरसाल हंगामा करितात व आणिकही करतील. आह्मीं बडेसाहेबांशीं आपली बुद्धीप्रमाणें बहुत जाबसाल केले, परंतु त्यांनीं दादासाहेबांचे पक्षामुळें आपलें सार्थक जाणून रीतीचें एकही उत्तर दिधलें नाहीं. प्रस्तुत तर सरकारची दुशमनीमुळें कांहीं जाबसालच नाहीं. आह्मांस शत्रुसमान जाणतो. आह्मी महिन्याभरांत एक बार जाऊन रामराम मात्र करून येतों. यास्तव कीं यांचे जवळ आहों. स्वामींचें चरणाजवळ यावें तर मार्ग लांब सहस्र कोसांचा आहे. दुसरें, येथील कर्जदारीमुळें वाटेचे सरंजाम बारबारदारी वगैरे कांहीं राहिलें नाहीं. तरी स्वामींनीं कृपाळू होऊन खर्च पाठवायाची आज्ञा करावी कीं, येथील कर्जदारीपासून मुक्त होऊन चरणांजवळ येऊं. नाहींतर जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. चिरंजीव चिमणलाल आपले चरणाजवळ आहेत. त्याचें पालन स्वामी करीतच असतील. आज एक महिनापासोन बडेसाहेब व बेनीरामपंत रात्रंदिवस मसलत होती. राजश्री सेनाबहादूर यांचींही पत्रें बेनीरामाजवळ येतात. परंतु कांहीं जाबसालाचा बंदोबस्त होत नाहींसारिखें दिसतें. सेनाबहादूर यांनीं बेनीरामास दोन तीन पत्रांत बोलाविलें व बडेसाहेबांनींही सांगितलें कीं, जाऊन जाबसालाचा फडचा (फडशा) करून यावें.

---

१ फुलचरी=पांडेचरी. २ बिबी=मडमा, इंग्रजांच्या बायका. ३ खातरखा=खात्रीनें, निःसंशय.

परंतु बेनीरामपंत जात नाहीं. आज नव दिवस जाले, बेनीरामपंत यांनीं विश्वंभरपंत धाकटा बंधु यास कटक पाठवायाचा करार करून प्रस्थान करविला आहे. पुढें पहावें, जातो किंवा नाहीं. कासीदजोडी आह्मांपाशीं एकही नाहीं. कागद पाठवायाचा संकट पडतो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. लाचार! आजुरदार[1] कासीदजोडीबरोबर विनंतिपत्र पाठविलें."

## लेखांक ४.

हें पत्र ता. ३ जुलई इ. स. १७८१ सालचें आहे. हें पत्र पराकाष्ठेचें महत्वाचें आहे. इ. स. १७८१ मध्यें जनरल गॉडर्ड दक्षिणेंत येऊन इंग्रज व मराठे ह्यांचें युद्ध सुरू झालें असतां, नागपूरकर मुधोजी भोंसले ह्याच्याशीं वारन हेस्टिंग्ज ह्यानें राजकारण करून व त्यास भरपूर द्रव्य देऊन त्यास कसें वश करून घेतलें, त्याचें सकल वृत्त लाला सेवकरामानें नाना फडणविसांस सादर केलें आहे. ग्रांट डफसाहेबांनीं भोंसल्यांच्या ह्या राजकारणांचा गोषवारा दिला आहे; परंतु त्यांत व ह्यांत थोडी तफावत दिसून येते. लाला सेवकराम ह्याचें पत्र अस्सल असून त्यानें त्यांत श्रीमंतांस कच्चें वर्तमान कळविलें आहे. त्या अर्थी तें तथ्य व साधार असलें पाहिजे. हें पत्र फार मनोरंजक आहे. ह्या पत्रामध्यें मुधोजी भोंसल्यानें कटक प्रांतांत आपला मुलगा चिमणाजी ह्यास सैन्यासहवर्तमान पाठवून कलकत्तेकरास कशी भीति उत्पन्न केली व आपला फायदा साधून घेतला, हें विशेष चांगल्या रीतीनें समजून येतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

पैवस्ती चंद्र ५ रमजान सन समानीन भाद्रपद **श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता० ३ जुलई इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः–

आज्ञाधारक लाला सेवकराम साष्टांग दंडवत करून व चरणावर मस्तक ठेवून विज्ञापना ऐसीजे:–येथील कुशल तागाईत चंद्र १० रज्जब आषाढ शुद्ध १३ त्रयोदशी जाणून स्वकीय आनंदवैभव लेखकास आज्ञा केली पाहिजे. विशेष:–पूर्वी विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानाचें कासीदजोडी आजुरदाराबरोबर चंद्र १ रबिलावल फाल्गुन शुद्ध ३ तृतीया सेवेसी रवाना केलें. त्याजवरून विदित जालेंच असेल. सांप्रत वर्तमान हाच कीं, दोन जासूद खिजमतगार यांनीं चिमणाजी भोंसल्याकडील विश्वंभरपंताबरोबर पोशाक व जवाहीर व घोडे आणविले होते. त्यास, बडे साहेबांनीं चार कडीं ऐशी मोहरांचें व दोनशें रुपये व चार दुशाले इनाम देऊन, १७ लक्ष रुपये नगद व एक लक्ष रुपयांचें जवाहीर, मिस्तर बेगलसाहेब व मिस्तर इंदरसेन साहेब व विश्वंभरपंत या तिन्ही ( तिघां ) बरोबर भोंसल्याकडेस चंद्र ६ रबिलावल फाल्गुन शुद्ध ७ सप्त-

१ आजुरदार=भाड्याचे.

मीस रवाना केलें. खबर आली कीं, नवाब निजाम अलीखान यांजकडील कोणी सरदार, मातबर फौज घेऊन पुण्याकडे मदतेकरितां गेला. बडेसाहेबांनीं हें वर्तमान ऐकून राजा गोविंदराम नवाब वजिराचा वकील याचे मारफत खलिता लिहून, नवाबाकडे पाठविलें कीं, तुह्मीं श्रीमंतांकडे फौज रवाना केली, याजकरितां आमचे तुमचे स्नेहांत खलेल होईल. चंद्र ८ रबिलावलेस खबर आली कीं, करनेल पियास कटकपलिकडे तीन मजलांवर समुद्राची खाडी आहे, त्यास चिनकाल ह्मणतात, तेथें जाऊन पंधरा दिवसांमध्यें फौजानिशीं खाडी उतरून पार गेला. पुढें मजलदरमजल मदराजेस जातो. बडेसाहेबांस हें वर्तमान कळतांच बहुत समाधान जालें. चंद्र ११ माहे मजकुरी खबर आली कीं, राजश्री चिमणाजी भोंसले ढेकानाल व निलगिरीचे डोंगरांहून कूच करून बलेसर बंदरास आले. चार हजार स्वार लष्करचे कहीबरोबर येऊन, नव दाहा गांव परगणे जालसेर सर्व मेदनीपुरचे लुटून जाळून वैरान केले. सुबे (सुभे) बरद्वान व मकसुदाबादचे लोक पळूं लागले. कलकत्यांत बहुत गडबड जाली. नवाब मुबारकदौला व नवाब मुरफरजंग बंगाल्याचे कदीम सुभेदाराकडील वकील, जगत्शेट सावकार, व आणीक लहान थोर जमिदारांचे, भोंसल्याजवळ जाऊन सांगितलें की, तुह्मी एकबार या प्रांतीं यावें. आह्मी माहिती-मुळें आंग्रेजांचे अंमल सहज प्रकारें दूर करून देतो, व येथें एकंदर फौज नाहीं. बडे-साहेबांनीं करनेल पियास (पियर्स) बरोबर कलकत्त्याचे बेगारी माणसें बलात्कारें धरून पाठविलें. भोंसले मजकूर आगर मनावर धरून बंगाला लुटते, तर कोणी यांचे पुढें येणार नव्हतें. व बडेसाहेब बहुत लाचार व जेरदस्त[2] होऊन, मामलतचे रुपये देऊन सल्ला करते. परंतु भोंसल्याचें वर्तमान सेवकांनी, आज चार वर्षे जालीं, सेवेसी लिहिलें होतें कीं, बेनीरामपंतांनी आपल्याबरोबर करनेल गाडरास कालपीचा घाट उतरून छत्रपूरपावेतो घेऊन गेला; व बुरान (बऱ्हाण)पुराहून मुधोजी भोंसले यांनीं आपले जासूद व माणसें नेऊन सुरतेस पावतें केलें. त्याचा दाखला हा कीं, देवाजीपंतांनीं व मुधोजी भोंसले यांनीं भवानीपंत काळे दिवाण-जे चिमणाजी भोंसले जवळ आहेत— यांसी साफ लिहिलें कीं, तुह्मीं आंग्रेजांसीं बिघाड न करणें. याजमुळें भवानीपंतांच्या मार्फत दाहालक्ष पावेतो रिशवतें[3] घेऊन हंगामा होऊं दिधला नाहीं. लष्करांत दोन चार माणसांचे हात पांव (पाय) कापून, बहुत ताकीद केली कीं, कोणी आंग्रेजांचे मुलकांत हंगामा न करावा. बडेसाहेबांनीं आंग्रेजांशीं मसलहत करून आपला खलिता व बेनीरामाचें पत्र विश्वंभरपंतांजवळ पाठविलें. त्यांनीं भवानीपंतांस दिधलें. भवानीपंतांनीं पत्रदर्शनीं चिमणाजी भोंसल्यास समजावून, विश्वंभरपंत व मिस्तर बेगलसाहेब व मिस्तर इंद्रसेनसाहेब या तिघांबरोबर राजारामपंत कटकचे सुभेदार यांस रवाना केले. ते चंद्र २४ माहे रबिलावल चैत्र वद्य १२ कलकत्यासी आले. दुसरे दिवशीं बेनीरामपंत व विश्वंभरपंत व राजारामपंत हे तिन्ही मिळून बडे-

१ खलेल=अंतर, अडथळा. २ जेरदस्त=दीन, गरजू. ३ रिशवत=नजर, अंतस्थ देणगी.

**लेखांक ४१.** ता० १९ जानेवारी इ. स. १७८१.
मीा छ १ सफर सन इहिदे समानीन. **श्रीगजानन.** मि० पौष वद्य १० शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २३ मोहरमपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत व गंगाजलनिर्मल अहिल्याबाई होळकर यांणीं मेवे जात नासपातीं सुमार साहा हे पेशजीं डाकेबरोबर सेवेसी पाठविलीं आहेत. पावले असतील. प्रस्तुतही बाईनीं मेवा श्रीमंतांकारणें पाठविला आहे. आंगुरें पेटारी १, व दाळिंबें बेदाणा ५, व नासपाती २, व शेव १, एकूण सुमार ९ नऊ डालींत घालून सफेद गळेफानें मढून, लाखी मोहर करून, बाईनीं सेवकाकडे पाठविली कीं, डाकेबरोबर श्रीमंतांचे सेवेसी लवकर पावते करून उत्तर आणवणें. ह्मणून रुबरू सांगितलें. त्याप्रमाणें डाकेबरोबर डाली मेवेसी पाठविली आहे. सेवेसी पावलीयावर अहिल्याबाईच्या पत्राचें मेवा पावलीयाचें उत्तर लेखकास आज्ञा करणार धनी समर्थ. इकडील राजकी वर्तमानः–प्रस्तुत राजश्री त्रिंबकजी इंगळ्यांची रवानगी हिंदुस्थानाकडे जाली आहे. प्रस्तुत दोन अडीच हजार फौज तयार केली आहे व पांचशें पागा हरकुबाईची, एकूण तीन हजार फौजेनशीं रवानगी जाली. दोन कोस येथून त्यांचें कूच जालें. दरमजल पुढें जाणार. आणिकही फौजेची संचणी करून बाई मागाहून पाठवणार. काल तेरा रोजांचें वर्तमान, कासीद सुरतेहून आला, त्याणें वर्तमान सांगितलें जे, श्रीमंत राजश्री दादासाहेब अश्विनीकुमारावर आहेत. अमृतरावही तेथें श्रीमंतांजवळीच आहेत. खर्चावेंचाची आह्मांस गिराणी आहे. पूर्ववत्प्रमाणें इंग्रज खर्चास देत नाहींत. असें कासीद सांगत होता. केसो कृष्णही सुरतेस गेले होते. त्यांजबरोबर पुन्हां दोन पलटणें इंग्रजांनीं देऊन फिरून खानदेशप्रांतींच रवाना केले. ते ईश्वरवाडीजवळ आले आहेत ह्मणून वर्तमान ऐकिलें. सोनगडावरही तीन पलटणें, चार हजार फौज गाइकवाडांची, ऐसे आले आहेत ह्मणून बाजारी वदंता. खानदेशांत रयत वगैरे पळपट फार जाली आहे. हिंदुस्थानप्रांतींही पलटणाची गडबड फार आहे. याप्रमाणें इकडील वर्तमान. देशाकडील अनेक प्रकारचीं वर्तमानें इकडे उठतात. बाईही वारंवार वर्तमान पुसतात. अलीकडे आज्ञापत्रेंही फारशीं येत नाहींत. श्रीमंतांचा विजयप्रताप ऐकावा, हेच येथें सर्वांचीं लक्षें लागलीं आहेत. येथें ज्योतिषी गणक ब्राह्मणांनीं सिद्धांत केला आहे कीं, पौष वद्य त्रयोदशीपासून माघ वद्य त्रयोदशीपर्यंत तुंबळ युद्ध व्हावें. तदोत्तर इंग्रजांचा अपकर्ष होईल. श्रीमंतांचा

श्रीकृपेंकरून उत्कर्षच आहे. परंतु एक महिनापरीयंत समीप चौकी पाहऱ्याचा वगैरे रक्षकाचा बंदोबस्त चांगला असावा. श्रीमंतांच्या पुण्यप्रतापेंकरून जगत्कुटुंबी श्रीमंतांचें कल्याण आहे. अशीं ब्राह्मण आशीर्वादवचनें बोलतात. बाई आदिकरून सर्वांचीं लक्षें स्वामींकडे लागलीं आहेत. बाईसही पत्रें येत असल्यानें याचाही संतोष फार आहे. मेवा पावलीयाचीं उत्तरें स्वामी पाठवणार समर्थ. सेंदव्याहून संताजी होळकरांचीं दोन पत्रें बाईस आलीं, व थाळनेरच्या कमाविसदारानेंही बाईस पत्र लिहिलें होतें जे, सोनगडावर तीन पलटणें आलीं, हें खरें. राजश्री गणेशपंत बेहेरे भोंडगांवावर आहेत ह्मणून वदंता आहे. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ४२.** ता. ३ मार्च इ. स. १७८१.

पैवस्ती चंद्र १२ रविलावल. **श्रीगजानन.** मि० फाल्गुन शु॥ ८ शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन सा० नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ रविलावलपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशर्जी विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. प्रस्तुतचें वर्तमानः—श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेअलीकडे जेथें आहेत, तेथेंच आहेत. राजश्री पाटीलबाया सारंगपुरीहून कूच करून दरमजल पुढें गेले. परंतु भेलशास अद्याप गेले नाहींत, अलीकडेच आहेत. अंबोजी इंगळे व भाऊ बक्षी या उभयतां मिळून पांच सात हजार फौजेनिशीं पुढें इंग्रजांच्या तोंडावर आहेत. त्रिंबकजी इंगळेही पुढें त्या फौजेंतच आहेत. इंग्रजांसीं त्या फौजेशीं पांचा साता कोसांचा तफावत आहे. इंग्रज कांहीं नवसरींत आहेत, कांहीं सुरंजेंत आहेत. सुरंजेंत दहा पंधरा हजार रुपयेही घेतले व दाणा हरजिनसी फार भरणा केला. सुरंजेंत ठाणें बळावून आहेत. पाटीलबावांनींही वरचेवर पुढें फौजा रवाना करितात. राजेरजवाडे यांजकडील फौजा अद्याप जमा जाहल्या नाहींत. वरचेवर पत्रें जातात. येथून कांहीं बाई फौज पाठविणार होती. परंतु फौजेस देण्यास पैसा नाहीं. यास्तव स्तिंबित आहेत. त्रिंबकजी इंगळे यांजबरोबर हजार दोन हजार फौज गेली तितकीच मात्र. इंग्रजांस आणीक दोन पलटणें येऊन मिळालीं ह्मणून ऐकिल्यांत आलें. भोपाळवाल्याचें कांहीं सूत्र इंग्रजांकडेही आहे. केवळ एकनिष्ठेनें पाटीलबावांकडेच यावें असें नाहीं. दोही डगरींवर हात आहेत. खासा पाटीलबावांजवळ दहा हजार फौज चांगली आहे. याप्रमाणें वर्तमान येथें आलें. तें सेवेसी लिहिलें

असे. सोनगडावर तीन चार पलटणें आलीं आहेत ह्मणून खानदेशांतून माणसें आलीं त्यांनीं दरबारांत सांगितलें. राजश्री गणेशपंत बेहेरे नंदुरबारेपासून दोन कोसांवर पुढें आहेत. गुलजारखान कांहीं भिल्ल जमा करून बडवानीकडे आले आहेत. बडवानीच्या राज्यांत अस्ताव्यस्त जालें आहे. तेथील राजा मद्यपी आहे. यास्तव भिल्ल वगैरे ज्याच्या चित्तास येतें, ते जागां जागां गांवखेडीं मारून नेतात. लक्ष रुपयांचें राज्य तें आहे, आणि नामी जागा आहे. पहाडी किल्ला आहे. नाक्याची जागा आहे. चहूंकडे दाब पडे असें स्थळ आहे. ते राजे ह्मणतात जे, आमची खायाची खस्ता करून कोणीं द्यावी आणि बडवानीचें राज्य आटोपावें, असें तेथील बोलणें आहे. राजश्री तुकोजीबावांचा कांहीं पैगाम त्यासीं लागला आहे, परंतु आतां तिकडे मसलतीस तिकडे गेले आहेत यास्तव राहिलें. त्यास नर्मदेअलीकडे या प्रांतांत आपलें कोणीच नाहीं. हें स्थळ चांगलें आहे. मर्जी असली तर सरकारांत ठेवावयास योग्य जागा आहे. चारी नाकें आपले हातीं येतात. चहूंकडे दाबही आहे. मर्जी असली तर बाईस लिहावें कीं, सरकारांत तें संस्थान ठेवायाचें आहे, तेथील बंदोबस्त करणें. ह्मणजे तेथील राजाचा खायापियाचा बंदोबस्त कसा करणें तो बाई करितील, आणि ते प्रांताचा बंदोबस्त करतील. जागा चांगली बिकट आहे. चहूं नाक्यांवर दाब आहे. हें स्थळ सरकारांत असावें. इतक्यावर स्वामींची मर्जी. हें स्थळ सरकारांत असावें हें उत्तम आहे. सरकारचे मर्जीस आलें तर येथें बाईस पत्र लिहावें. अलीकडे सरकारचीं पत्रें इकडे कांहीं येत नाहींत. वर्तमानें तों अनेक प्रकारचीं येतात. बाई सेवकास विचारतात जे, डांक बसली असतां तुमचीं पत्रें येत नाहींत. नाना प्रकारचीं वर्तमानें येतात. श्रीमंत कोठें आहेत? इंग्रजांची व सरकारच्या फौजांची लढाई जाहली, पुणें अस्ताव्यस्त. अशीं कित्येक प्रकारचीं वर्तमानें येथें येतात. कासीदजोडीबरोबर अगर डाकेबरोबर सरकारचें पत्र येथें बाईस यावें. बाजारी वर्तमानें मात्र इकडे येतात. कागदींपत्रीं वर्तमान कांहींच येत नाहीं असें आहे. सेवकाकडेही कांहीं पत्र येत नाहीं. यास्तव विनंति. मर्जी असली तर बाईस पत्र आल्यानें यांचें समाधान आहे. हे विज्ञापना."

---

**लेखांक ४३.** ता. १९ मार्च इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन व॥ १० शके १७०२.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २३ रविलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें

वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमानें पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. राजश्री बाजीराव बर्वे यांस हुजूर पाठवून देणें म्हणून मातुश्री अहल्याबाईस व राजश्री लक्ष्मण बल्लाळ यांस सरकारचीं आज्ञापत्रें देऊन राजश्री विसाजी काशी व दोघे हुजरे व एक जासूदजोडी रवाना केली. ती तेथें पावेल. लक्ष्मणपंतांस पत्रें दाखविलीं. ते व राजश्री माधवराव गंगाधर हे मिळून पत्रें घेऊन दरबारास गेले. मीही समागमेंच होतों. मशारनिल्हेची भेट करून पत्रें दिलीं. वर्तमान मुखोद्गत सांगणें तें सांगितलें. तदोत्तर राजकीय, इंग्रज व हैदर नाईक यांजकडील, वर्तमान बाईनीं विचारलें. त्यानंतर मशारनिल्हेस विडे देऊन बिदा केलें. दोन घटका दिवस राहतां बाई एकीकडे बसून, मुकुंदराव हरी व माधवराव गंगाधर व लक्ष्मण बल्लाळ व मी ऐसे समीप होतों. सरकारचें व आपलें पत्र व दादाजी गंगाधर यांचें ऐसीं पत्रें माधवराव यांनीं बाईस वाचून दाखविली. पत्रें ऐकून बोलली जे, उदईक हुताशनी आहे. प्रतिपदा द्वितीया जाल्यावर बर्व्यांस बोलावून आणून त्यांस वर्तमान सांगावें. सरकारआज्ञेप्रमाणें त्यांची बिदागी करावी. इतकें भाषण जाहलें. तदोत्तर त्रितीयेचे दिवशीं चार पांच घटका दिवस राहतां, बर्व्यांस बाईनीं बोलावूं पाठविलें. ते व तिघे कारकून ऐसे दरबारास आले. मीही तेथें होतों. एक घटकानंतर मुकुंदराव व माधवराव यांस बाईनीं सांगून पाठविलें जें, बर्वे आले आहेत. यांसीं सरकारच्या पत्रान्वयें बोला. मुकुंदराव व माधवराव व विनायक बाजी व गोविंद रघुनाथ ऐसे एकांतास बसून बर्व्यांकडील कारकुनास त्यांनीं बोलाविलें. तेही एकांतास गेले. बाजीराव बाईजवळीच बसले होते. वरकड उठले. मीही उठून आलों. त्यावर ऐकिलें वर्तमान कीं, संध्याकाळपर्यंत मुत्सद्यांचा व त्या कारकुनाचा एकांत जाला. दोन घटका दिवस राहतां बाईनें बाजीरावांस विडे देऊन संध्याकर्मास उठली. बर्वेही त्या एकांतांतच गेले. संध्याकाळीं आपलाले स्थळास गेले. एकांतांतील वर्तमान शोध करितां ऐकिलें कीं, बर्वे म्हणतात जें, आम्हांस पुण्यास पाठवूं नका. येथेंच आपल्या सेवेंत राहूं. एक वर्षभर आमची एकनिष्ठा पाहून, तदोत्तर आपल्या विद्यमानें तेथील बंदोबस्त पक्केपणें करून आम्हांस बिदा करावें यांनीं उत्तर केलें जें, येथून जें करणें तें पक्केपणेंच केलें आहे. तेथें तुम्हांस कोणताही उपसर्ग लागणार नाहीं. तुम्हीं आपले एकनिष्ठतेनें त्यांसीं वर्तणूक केल्यास तेथूनही दुसरा विचार होणार नाहीं, असें बोलले. बर्व्यांचें बोलणें जें, पहिलें आम्हांजवळून अन्योन्य वर्तणुकी घडत आल्या आहेत, त्यामुळें कित्येक लहानमोठीं मनुष्यें मागील पुढील वर्तणुकीचे उच्चार करितील. श्रीमंत आहेत. न जाणों,

कोणे वेळीं काय त्यांच्या चित्तांत भास भासवितील. ते समयीं आपण कोठें समीप आहेत? अगर उगाच एकादा दुरारोप ठेऊन विषमस्थळीं ठेवलें, तर तेथें त्यास निवारण करणार कोण ? यांनीं उत्तर केलें जे, मागील जे तुह्मांकडून समविषम वर्तणुकी घडल्या आहेत, त्यांचा उल्लेख न काढितां, सरळपणें तुह्मांसीं राहतील. त्यांनीं लिहिलें आहे कीं, पांच हजार रुपये खर्चास देऊं, ते तुह्मांस देतील. मागील तुह्मांजवळून जें घडलें आहे त्याविषयीं अपाय न व्हावा हा जिमा आमचा. पुढें एकनिष्ठेनें वर्तणूक करून श्रीमंतांची कृपा संपादून घेणें हा जिमा तुमचा. याप्रमाणें भाषणें जालीं. बर्वे बोलले जे, एक वर्षभर आह्मीं येथें राहून आपले खातरजमेप्रमाणें वर्तणूक करावी, ह्मणजे परभारां आपणच त्यांची खातरजमा आह्मांविषयीं करितील. हे आपणही विनंति मातुश्रीस करावी. आह्मीही उदईक येऊन बाईशीं समक्ष विनंति करूं. याप्रमाणें बोलणीं होऊन उठले. त्यानंतर कारभारी यांनीं बाईच्या कानावर रात्रींच वर्तमान घातलें. बाई बोलली जे, त्यांनीं समक्ष काय बोलावयाचें आहे ? श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें त्यांनीं आह्मीं वर्तावें यांत उत्तम आहे. श्रीमंतही त्यांचे मागील वर्तणुकीचा उच्चार करणार नाहींत. त्यांनीं क्षेपनिक्षेप पुण्यास जावें. असें बाई बोलली. हे विनंति.

बर्व्यांनीं दुसरे दिवशीं येऊन बाईशीं समक्ष विनंति करावी, तों बाईस रात्रीं वांती होऊन ज्वरांश जाला. त्यामुळें दोन तीन दिवस कांहीं जाबसाल जाहला नाहीं. आतां आतां कांहीं आराम आहे. काय जाबसाल होणें तो एक दों दिवसांत होईल. परंतु येथील निश्चय हाच आहे कीं, सरकारचे आज्ञेप्रमाणें बर्व्यास कारकुनाबरोबर रवाना करावा. घडतां असेंच घडेल. राजश्री पाटीलबावा गोहजच्या व ग्वालेरीच्या दरम्यान आहेत. अलीकडे कांहीं वर्तमान आलें नाहीं. हिंदुस्थानाकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलेंच आहे. शिखांच्या पत्रांचीं उत्तरें अद्याप गेलीं नाहींत. मग, तो मजकूर कांहीं सरकारांत यांनीं लिहिला असेल; तेथून आज्ञा येईल; त्याप्रमाणें त्यांस उत्तरें लिहावीं, असें असलें तर न कळे. काशीचा राजा पाटीलबावांकडेच आहे. जो इंग्रज कलकत्त्याहून काशीस आला होता, तो कलकत्त्यास फिरून गेला ह्मणून ऐकिलें. सत्य मिथ्या देव जाणे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकानें खर्चाविषयीं दहा पांच विनंतिपत्रीं विनंति लिहिली. स्वामींनीं कृपा करून तीनशां रुपयांची वरात परगणे कसरावदावर वरात पाठविली होती. त्या वरातीवर आपण तारीख मात्र करून वरात पाठविली. त्यास येथें कमाविसदारांनीं वरात माघारी टाकली. सबब कीं, वरातीवर एक तारीख मात्र आहे. मुजुमदाराचें निशाण व मोर्तब नाहीं. तें करून आणा, मग ऐवज देऊं. असें ह्मणून

वरात माघारी टाकली. मी व लक्ष्मण बल्लाळ यांनीं कमाविसदारांस फार सांगितलें; परंतु ऐकेनात. वरात माघारी टाकली. ती वरात येथून कासीदजोडीबरोबर पुण्यास सेवेसी पाठविली. त्यास दीड पावणेदोन महिने जाले, अद्याप वरातही आली नाहीं. विनंतिपत्राचीं उत्तरेंही कधींही येत नाहींत. असो. धन्याची मर्जी. अगर स्मरणांत नसेल. परंतु सेवकास तों धन्याच्या पायाव्यतिरिक्त अहर्निशीं दुसरें काय आहे? तेथें सेवकाविषयीं विनंति कोण करणार? येथें देणेदारांचा उपद्रव व खर्चाची तसदी कितीक सोसावी. येथें मेलें तर कोणी समाचार घेणार नाहीं. तिकडून धन्यांनींही उपेक्षा केली तर येथें गत काय? ज्याचा वशिला कोणी नाहीं, त्यास धन्यांच्या पायांचाच आश्रय. येथें देण्याच्या व खर्चाच्या उपद्रवामुळें फार श्रमांत आहें. येथील उपेक्षा कशी आहे हें काय लिहूं? पांचशें रुपये लोकांचें देणें जालें आहे. पुढें नित्य खर्च लागलाच आहे. धनी विश्वकुटुंबी, कृपाळू, समर्थ. वारंवार लिहितों ह्मणून स्वामी रागें न भरावें. गरीबास धन्याच्या पायांव्यतिरिक्त कोणाचा आश्रय? सर्वापराधान् क्षमस्व, हे विज्ञप्ति.

"बिना आसरे चाकरी बैरीमोंका बास ।
नदिकिनारे रुखडा जब देखूं तब वसवास ॥"

---

पै॥ चंद्र १६ रविलाखर. **लेखांक ४४.** ता. २५ मार्च इ. स. १७८१.

दाखल ता. ११ एप्रिल इ.स. १७८१. **श्रीगजानन.** मि. चैत्र शु॥ १ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २९ रविलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून पत्रें चंद्र २३ मिनहूस डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान राजश्री बाजीराव बर्वे यांस बाईनीं कारकुनाबरोबर सांगून पाठविलें जे, श्रीमंतांचीं पत्रें व कारकून व हुजरे तुह्मांस बोलावूं आले आहेत. त्यास तुह्मीं जावें. कधीं निघतां? तुह्मांसमागमें लोक नेमले आहेत. तयारी करविली आहे. सुदिन पाहून लवकर निघावें. त्यांनीं उत्तर केलें जे, पुण्यास जाणें परिच्छिन्न आह्मांस नाहीं. आपण थोर. आपल्या आश्रयास आह्मी आलों कीं, वर्ष दोन वर्षें आपल्या जवळच राहून, एकनिष्ठतेनें चाकरी करून, आह्मांविषयीं आपली खातरजमा करावी. तदोत्तर आपणच परस्पर श्रीमंतांची खातरजमा करतील. मग आपले विद्यमानें पुण्यास जावें, असें आमचें बोलणें आहे. प्रस्तुतच आपण तिकडे जा ह्मणतील, तर आह्मी जाणार नाहीं. असें उत्तर पाठविलें. त्यावरून बाईनीं त्यांजकडील कारकुनास बोला-

धून, जे गृहस्थ पहिलें येथें बोलावयास येथें आले होते त्यांस सर्वांदेखत विचारिलें जे, तुह्मांसी आह्मी काय बोललों? त्यांनीं सांगितलें जे तुह्मी आह्मांकडेस येतां, सुखरूप या. परंतु तुह्मी येथें आल्यावर पुन्हां गडाखालीं तुह्मांला जाऊं देणार नाहीं. श्रीमंतांकडे लिहून पाठवूं. तेथील सफाई आह्मी आपले विद्यमानें करून तुह्मांस पुण्यास पाठवूं. जावें लागेल. तेथें मागील गुणदोष तुह्मीं जे केले आहेत, ते श्रीमंतांस विनंति करून माफ करवूं. पुढें तुह्मीं वर्तणूक तेथें एकनिष्ठेनें करावी. श्रीमंतही कृपा करितील. वर्ष दोन वर्षें तुमची निष्ठा पाहून कामकाजही कृपा करून सांगतील. मागील अन्योन्य वर्तणुकीचा उल्लेख काढून तुह्मांस उपद्रव केला, तर तो जिमा आमचा. त्याविषयीं श्रीमंतांस आह्मी विनंति करूं. प्रांजळपणें तुह्मांसी समाधानें ठेवितील. पुढें त्यांची मर्जी रक्षून आपलें ऊर्जित करून घेणें जिमा तुह्मांकडे असे. आपण बोलली, त्याप्रमाणेंच आपणही बाजीरायांस सांगितलें. मध्यें गोष्ट ठेवली नाहीं, असें त्या कारकुनातें सांगितलें. बाई बोलली जे, असें तुह्मीं सांगितलें असतां फेरपगडी यांनीं केली, हें काय? आह्मीं श्रीमंतांस तुह्मांविषयीं कित्येक प्रकारें ममतापुरस्कर लिहिलें. त्यांनीं मान्य केलें. पांच हजार रुपये खर्चास देऊं ह्मणून त्यांनीं पत्रीं लिहिलें आहे. असें असतां आतां तुह्मी फिरून गोष्ट सांगतां, यांत श्रीमंतांस आमचा बेइतबार भासेल. तुह्मी राज्यांतील राहणार माणसें. मातबरास हे गोष्टी योग्य नाहींत. तुह्मी त्यांस सांगा. आह्मीही आपला कारकून तुह्मांसमागमें देतों. तेही सांगतील. जायाची तरतूद लवकर करा. ह्मणून बाईनींही आपला कारकून समागमें देऊन बर्व्यांकडेस सांगून पाठविलें. त्यांनीं व यांच्या कारकुनांनीं बहुत प्रकारें सांगितलें. परंतु बर्वे आपल्या कारकुनावर रागें भरले. शिव्यागाळी केल्या. यांच्या कारकुनांनींही बहुत प्रकारें सांगितलें; परंतु ऐकेनात. साफ बोलले जे, आपण जिवंत जाणार नाहीं. प्रेत रेवेपार कराल. असें उत्तर केलें. त्यावर बाईनीं हें उत्तर ऐकून, राजश्री विसाजी शामराज लांबहाते यांस बाईनीं बोलाविलें. त्यांस हें वर्तमान सांगितलें. मशारनिल्हेनीं उत्तर केलें जे, इतके लवकर बदलून त्यांनीं गोष्ट सांगितली, तेव्हां बदमामली. बाई बोलली जें, पुढें काय करावें? विसाजीपंतांनीं सांगितलें जे, असे जे बदफैली आहेत त्यांचा बंदोबस्त करावा. नाहींतर श्रीमंतांचा शब्द तुह्मांकडे लागेल. असे जे एकनिष्ठ इमानी असते तर असे खराब कां फिरते? लवकर यांचा बंदोबस्त करावा. श्रीमंतांचे येथें नीति आहे. असें नीतीनें वागते तर यांस दूर कां करिते? असें बहुत प्रकारें दोन घटका बोलून गेले. ते वेळेस चंद्र २३ रोजीं संध्याकाळीं बाईनीं दोघे कारकून व पन्नास माणूस बारगीर वगैरे चौकीस पाठविले. कारकुनांनीं

पूर्व पश्चिम द्वारीं चौक्या बसवून, उभयतां कारकून मुख्यांचे जवळ बसले. ते वेळेस वक्तृत्व, सव्य अपसव्य, फार केलें. तितकेंही या कारकुनांनीं ऐकून घेतलें. सौम्य उपचारें बहुत प्रकारें सांगितलें. परंतु कोणतीही गोष्ट पुण्याकडे जायाची अनकूळ पडेना. हें वर्तमान बाईसही रात्रीं कळलें. तेच रात्रीं बाईसही संतापज्वर आला. तों दोन तीन दिवस पाचाळ्याचें दुखणें जालें. मध्यें ज्वरानें व्याकुळही फार जाली. अद्याप ज्वर उतरला नाहीं. फार श्रमांत आहेत. औषधी उपाय करीतच आहेत. औषध फारसें घेत नाहीं. कोणाशीं बोलणें नाहीं. या दुखण्याची रीतही एक प्रकारची आहे. बय्योंनीं दुसरे दिवशीं स्नानें न करितां उपोषण केलें. गोविंद रघुनाथ आदिकरून सर्वांनीं सांगितलें, परंतु ऐकेनात. सहा घटका रात्रीं मुकुंदराव हरी व माधवराव गंगाधर यांनीं, बापूजी आनंदराव मामलेदार मातबर मनुष्य आहे, त्यास पाठविलें. त्यांनीं बहुत प्रकारें चार गोष्टी बऱ्यावाईट निक्षून सांगितल्या. मग प्रहररात्रीं स्नान करून फराळ घातला. त्याजवर चार पांच दिवस अन्न फराळ मात्र करितात. त्यांचें बोलणें हेंही आहे कीं, बाईनीं मजला जातीनें मुदपाखांत जेऊं घालून, जातीनें तगी येथें आपल्याजवळ ठेवावें, तें कबूल आहे. परंतु पुण्यास जाणें कबूल नाहीं. अतः-पर बाईस मावकाश वाटल्यावर कोणता घाट घडेल तो पहावा. राजश्री पाटीलबा-वांकडील वर्तमान ऐकिलें कीं, गोहज व ग्वालेर या दोहींमध्यें सैन्यसुद्धां आहेत. कबिले उज्जनीकडेस रवाना केले. सबब कीं, पाटीलबावांस गुरुदर्शनास जाणें फार अगत्य आहे. एक दोन वेळां दृष्टांतही जाहला, व दोन चार वेळां पूजन करून पुढें मोहिमीस जाण्याविषयीं प्रसादही दिला नाहीं, यास्तव माघारे फिरणार. उज्ज-नीस येऊन देशास येणार, ह्मणून उज्जनीहून कोणी गृहस्थ आले त्यांनीं सांगितलें. प्रस्तुत येथें बाईच्या दुखण्याचा प्रकार लांबलासा दिसतो. आज दोन तीन दिवस कोणास—मुत्सद्दी, अगर भटभिक्षुक, मराठी माणसें, खिजमतगार यांस,—कोणास जवळ येऊं देत नाहींत. सबब कीं, कोणी औषध घ्या ह्मणतात, कोणी पथ्य घ्या ह्मणतात. या कटकटीकरितां कोणास फारसें येऊं देत नाहींत. प्रस्तुतचा असा प्रकार आहे. परंतु ज्वर थोडा थोडा शमला आहे. पाटीलबावा गोहजवाल्याच्या मुलुखांत गढ्या घेतात. चोंहीकडे फौज गुंतली आहे. गोहजवाल्याजवळ पलटणें आहेत. एखादे वेळेस रातबिरात करील, यास्तव कबिले उज्जनीकडे रवाना केले, अशीही वदंता आहे. बाजीराव बर्वे यांचा आग्रह बहुत करून हाच आहे कीं, पुण्यास न जावें. येथेंच असावें. बाईस आरोग्य जाल्यावर काय इत्यर्थ ठरेल तो पहावा. सेवकानें खर्चाविषयीं दहा पांच वेळां विनंतिपत्रीं विनंति लिहिली आहे.

मोर्तब शिक्का नाहीं. बरातीवर आपले हाताची तारीखच मात्र होती. यास्तव बरात कमाविसदारांनीं माघारी टाकली. तेही माघारीं पुण्यास पाठवून दोन महिने जाले. अद्याप कांहीं उत्तर येत नाहीं. कोठवर वारंवार दरपत्रीं तोच मजकूर लिहूं? स्वामी रागें भरतील. माझेविषयीं कोणी विनंति करावयास नाहीं. धनी विश्वकुटुंबी. सर्वांचा प्रतिपाळ करितात. सेवकाविषयींही कोणीं स्मरणार्थ विनंति केली तर, अगर येथून विनंतिपत्रें सेवेसी जातात तीं अवलोकनांत आल्यास, स्वामी कृपा करून खर्चास पाठवितील. दैवयोगेंकरून कोणीं स्मरण द्यावें अगर विनंतिपत्र अवलोकनांत यावें. येथें देणेदार फार उपद्रव करितात. नित्य खर्चासही पाहिजे. अशा श्रमांत आहे. धनी कृपाळू समर्थ. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. संवत्सर-प्रतिपदेस बर्वे यांस गोविंद रघुनाथ गानू यांनीं भोजनास बोलाविलें. ते वेळेस, बाजीराव बर्वे बोलले जे, आह्मांसही पुण्यास जाणें जरूर आहे. तेथें कुटुंब, मायबाप. तेथें गेल्याखेरीज परिणाम काय ? परंतु पक्केपणें बाईनीं बंदोबस्त करून आणवावा. त्यावरून सर्व मुत्सद्दी मंडळीनीं विचार केला जे, बाईस सांगून फिरून श्रीमंतांस पत्र पाठवावें. मागील गुणदोष चित्तांत कुन्हा न राहे (अशीं) श्रीमंतांचीं ममतापुरस्कर पत्रें आणवावीं नी मग रवानगी करावी, असें बोलले. बाईच्या कानावर घालून पुन्हां सरकारांत पत्रें लिहावीं असा निश्चय केला आहे. बाई काय ह्मणतील तें पहावें. श्रुत होय. हे विनंति."

---

**लेखांक ४५.** ता० ११ एप्रिल इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० चैत्र वा. ३ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १६ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबराबर व डाकेबरोबर पत्रें सेवेसी रवाना केलीं आहेत. पावलीं असतील. परंतु उत्तर कोणाही पत्राचें एकही आलें नाहीं. स्वामींची मर्जी. प्रस्तुतचें वर्तमानः—सौ.उदाबाई वाघमारी—सुभेदाराची लेक बाईचा निरोप घेऊन देशास गेली. निरोपसमयीं उदाबाईनीं बाईस विचारलें जे, आह्मी देशास जातों. तुकोजी होळ-करही तिकडेच आहेत. त्यासीं कांहीं विचाराच्या गोष्टी बोलाव्या कीं काय ? त्यास बाईनीं उत्तर केलें जे, 'तुकोजी होळकर व त्यांचे दिवाण आह्मांवर शस्त्र धरून उभे राहिले आहेत, त्यापक्षीं तुह्मी त्यांसीं काय बोलतां ? तुकोजी तुह्मांसी कित्येक मायाममतेच्या गोष्टी पहिलें बोलला, त्या काय प्रत्ययास आल्या, कीं आतां बोलण्याचें

काय आहे ? प्रस्तुत त्यांचेंच बोलणें श्रीमंतांस व मुत्सद्यांस पथ्य आहे. आपलें बोलणें व्यर्थ त्यांस भासलें आहे. त्या पक्षीं आपण कांहीं बोलूं नये. तुकोजीमध्यें ऐवज काय आहे ? असो. प्रस्तुत त्यांचेंच ऐकून श्रीमंत काय घाट घाटितात तो पुरतेपणें पाहूं. आमचाही ईश्वर आहे. शेवटली मसलत–तुकोजी कांहीं तेथेंच राहणार नाहीं; वर्षा दो वर्षानीं इकडे येईलच. तो इकडे आला ह्मणजे आह्मी येथून कूच करून पुण्यास जाऊं. श्रीमंतांची आज्ञा घेऊन महायात्रेस जाऊं. जसें ईश्वर घडवील तसें करूं. परंतु तुह्मी कांहीं त्याशीं बोलूं नका.' याप्रमाणें बाईनीं उदाबाईस एकांतीं सांगितलें. निरोप घेऊन देशास गेली. एकांतीचें ऐकिलें वर्तमान लिहिलें असे. प्रस्तुत राजश्री बाजीराव बर्वे यांचा जावसाल पडला आहे. नित्य एकांत खलबतें मुत्सद्दी करितात. बर्व्यांनींही उपासतापास फार केले. प्रस्तुत पुण्यास न जावें, पुढें दसरा जाल्यावर जावें, असें बर्व्यांचें बोलणें. बाईचें बोलणें की तुह्मांविषयीं पहिलेंच आह्मीं श्रीमंतांस खातरजमेचें लिहिलें आहे. त्यावरून त्यांनींही मनःपूर्वक लिहिलें आहे. कारकून पाठविले आहेत. त्यांजबरोबर तुह्मीं जाणें उचित आहे. आतां तुह्मीं येथें राहिल्यानें पेशजीं आमच्या लिहिण्यास बट्टा लागतो. असें बहुत प्रकारें बाईनीं सांगितलें. परंतु बर्व्यांचें उत्तर हेंच आहे कीं, आह्मी आपले मतलब सांगतों, ते लिहून पाठवून एक उत्तर येऊं द्यावें ह्मणजे दसऱ्यास जाऊं. यांनीं उत्तर केलें जें, तुमचे मतलब काय ? त्यास त्यांनीं मनास येईल ते पंचवीस मतलब लिहून दिले. यांचेही फारच आग्रह पाहून बाईही बोलली जे, सर्वांचीच रदबदली ऐकून चार महिने श्रावण अखेरपर्यंत असूं द्यावें. एक वेळ पुन्हां पत्रें पाठवावीं. यांचेही मतलब काय लिहून देतात तें पहा. त्यांतून छान करून तेथें पसंत पडतील ते लिहून पाठवा. त्याचीं उत्तरें येऊं द्या. तदोत्तर भाद्रपदमासीं शु॥ पंचमीस येथून निघून जावें, असा बर्व्यांशीं करार करा. बाजीरायाचे हातचें लिहून घ्या कीं, पुन्हां आह्मी रदबदली करणार नाहीं. तुमचे आज्ञेप्रमाणें भाद्रपदमासीं जसें तुह्मी पाठवाल, तसें पुण्यास श्रीमंतांकडेस जाऊं असें लिहून घ्या. ह्मणून बाईनीं सांगितलें. त्याप्रमाणें मुत्सद्यांनीं त्यांजजवळून लिहून घेतलें (फाटलें आहे.) उदंडच मतलब लिहिले होते, परंतु त्यांतून गाळून तीन चार मतलब आपले पत्रीं बाईनीं लिहिले आहेत. बाईच्या पत्राचीं उत्तरें येथें आल्यावर, येथून यांस रवाना करावें असा निश्चय जाहला आहे. भाद्रपद शु॥ पंचमी लिहिण्यांत आली आहे. ऐकिलें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. बाईनींही पत्रें लिहिलीं आहेत, व राजश्री लक्ष्मण बल्लाळ व विसाजी काशी यांनींही पत्रें लिहिलीं आहेत. त्यांनीं खलबताचा सविस्तर मजकूर लिहिला आहे. माझ्या

लिहिल्यास व त्यांच्या लिहिल्यास अंतर पडेल. स्वामी रागें भरतील. येविषयीं विनंति जे, सेवकाचा प्रवेश एकांतांत नाहीं. बारीकमोठे शोध करितां समजल्याप्रमाणें सेवेसी विनंति लिहिली आहे. दिसून येतें कीं, सरकारचीं आज्ञापत्रें आणीकही यांच्या लिहिण्यावरून येतील; परंतु पुढेंही पुण्यास येण्याविषयीं बर्वे पड घेतील. सुध्या मतें येतील असें दिसत नाहीं. येथें यांनीं फारच उपास, मरण्याच्या गोष्टी सांगूं लागले. ते वेळेस बाईनीं विचार केला होता जे, जबरदस्तीनेंच पाठवावें. परंतु त्यांचेही येथें सोयरे धायरे आहेत. ते येथें पेश आहेत. त्यांचीही भीड कितीकांनीं समजाविली जे, शिपाई आहे, प्राणत्यागच केला तर नाहक दुर्निमित्य येईल; यास्तव मोमदिलही जाली. ह्मणून, पर्याय ठरविला आहे कीं, एकदां पत्रें जाऊं द्यावीं. बाजीरायांनींही सरकारांत पत्र लिहिलें आहे. तें मोठ्या प्रयत्नेंकरून बाईनीं व मुत्सद्यांनीं लिहविलें आहे. हुजूर येण्याविषयीं बर्व्यांचें मन प्रसन्न नाहीं. पुढेंही काय खळखळ घडेल ती पहावी. दुसरें वर्तमान ऐकिल्यांत आलें आहे कीं, बर्व्यांचा कोणी आप्त राजश्री पाटीलबावांकडे मातबर मनुष्य आहे. त्याजकडेही बर्व्यांनीं एकांतीं पत्रें पाठविलीं आहेत कीं, पाटीलबावांनीं बाईस लिहावें कीं, यांस पुण्यास पाठवूं नये; आपल्या जवळीच असूं द्यावें. असें वर्तमान ऐकिलें. केवळ तथ्य असें नाहीं. बर्व्यांनीं आपल्या मतलबांची याद लिहून दिली आहे. त्या यादीची नक्कलही पाठविली आहे. बाईच्या पत्रांबरोबर पावेल. दिल्लीकडील वकिलांचीं पत्रें चंद्र १३ मिनहूस येथें आलीं. त्यांतील ऐकिला मजकूरः--जयसिंहाची व पादशाहाची स्पर्धा लागली आहे. दहा हजार फौज नजाबतखानांनीं शिखांवर रवाना केली आहे. दोन चार वेळां फौजा पाठविल्या होत्या. त्या शिकस्त होऊन आल्या. आतांही फौज पाठविली आहे. हरी दामोदराचे पुत्र लक्ष्मण हरी हे दोनशें लोकांनिशीं नजिबखानास जाऊन भेटले ह्मणून वर्तमान होतें. खर्चाविषयीं दर विनंतिपत्रीं सेवेसीं विनंति लिहितों. वरात तीनशां रुपयांची पाठविली. कसरावदावर पाठविली होती. वरातीवर तारीख आपल्या हातची होती. मुजुमदाराचें निशाण व मोर्तब नाहीं, ह्मणून कमाविसदारांनीं वरात माघारी टाकली. ती वरात फिरून पुण्यास कासीदजोडीबरोबर पाठविली. त्यास दोन अडीच महिने जाले. कांहीं दाद लागत नाहीं. कोणी विनंति करावयासही नाहीं. धनीही पत्रें वाचतात कीं नाहीं हें न कळे. गरीबाचें स्मरण कोण देतो? मुख्य धनी सर्वांचा प्रतिपाळ करणार. पुढें सेवकाची गत काय? येथें तों मेलें तर, अगर सावकारांनीं बसविलें तर, कोणी त्राता नाहीं. परिछिन्न गरिबाविशीं धनी निर्दय जाहले! समर्थांची भीडही खरी. समर्थांविषयीं विनंति करणारही उदंड. पत्रीं लिहितां भागलों.

उठून यावें तर सावकार कसें येऊं देतात? धन्याचीही आज्ञा नाहीं. स्वामीही खर्चास पाठविनात. येथेंही कोणी कवडी देईना. आतां ईश्वर काय गत करील ती करो. ब्राह्मण प्रभू, धनी कृपाळू, समर्थ. राजश्री आबाजी नाईक बानवळे व नारो शिवदेव ऐसे येथें येणार ह्मणून ऐकिल्यांत आलें आहे. सत्य मिथ्या देव जाणे. नारो शिवदेव आशेरीस जाणार. नाईक देशीं जाणार. गोविंदराव गायकवाडाचा पुत्र लग्न करायास देशास गेला. इकडूनच आज बाईची भेट घेऊन दोन वर्खे बाईनीं देऊन रेवापार करून दिला. बर्व्यांकडून सरकारांत बाईनीं पत्र लिहविलें आहे. त्यांत बाईनीं सांगितलें आहे कीं, आज्ञापत्र आलें ह्मणजे आह्मी सेवेसी येतों असें लिहा. इतकीं अक्षरें बर्वे लिहीत नाहींत. बाईचें मानस आहे कीं, यांस दस्ताऐवजीं गोवावें. तें होईल तेव्हां पत्रें रवाना करितील. सेवकाची खर्चाची फार तसदी आहे. स्वामी कृपाळू समर्थ. हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र २७ रबिलाखर. **लेखांक ४६.** ता. १६ एप्रिल इ. स. १७८१.
दाखल ता. २२ एप्रिल इ.स.१७८१. **श्रीगजानन.** मि. चैत्र व॥ ८ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. इकडील वर्तमान राजश्री बाजीराव बर्वे यांचें वगैरे पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर चंद्र १६ मिनहूस पत्रें रवाना केलीं आहेत. स्वामींनीं कृपा करून आज्ञापत्रें चंद्र ५ मिनहूचें डांकेबरोबर तेथून रवाना केलीं. तेथें चंद्र ११ मिनहूस संध्याकाळीं येथें पावलीं. पत्रीं आज्ञा जें, राजश्री बाजीराव बर्वे यांस आणावयास कारकून पाठविले आहेत, ते तेथें पोंहचून बर्वे निघाले असतील. त्यास, फिरून बाईनीं व राजश्री लक्ष्मण बल्लाळ व विसाजी काशी व माधवराव गंगाधर यांस सर्वांनीं सरकारांत व बाबुरावजीस व दादाजी गंगाधर यांस पत्रें येथून गेलीं आहेत. त्यांचीं उत्तरें फिरून येथें येतील, तेव्हां काय घाट घडेल तो पहावा. परंतु हुजूर येण्याविषयीं बर्वे ते समयींही खळखळ करितीलसें दिसतें. शिखांस·उत्तरें बाईनीं काय लिहिलीं, तीं लिहिणें ह्मणून आज्ञा. त्यास येथून बाईनीं उत्तरें लिहिलीं जे, तुह्मीं मातबर मसलत लिहून पाठविली, त्यास श्रीमंत धनी आहेत. त्यांस हा मजकूर लिहिला पाहिजे. व तुकबास व महादजी शिंदे यांस लिहिलें पाहिजे. मसलत भारी. सर्वांचे मनसब्यानें एकवाक्यतेचीं उत्तरें येतील, त्या अन्वयें तुह्मांस लिहून पाठवूं. परंतु इतकें घडायास चार महिने पाहिजेत. बादबरसाद काय मसलत ठरून उत्तरें येतील, त्याप्रमाणें तुह्मांस लिहून पाठवूं. याप्रमाणें उत्तरें

गेलीं ह्मणून ऐकलें. वरात सेवकास खर्चाबद्दल पाठविली होती, ती कमाविसदारांनीं माघारी टाकली. तो मजकूर आज्ञापिला. त्यास कमाविसदारांस तों वाटलें असेल कीं, मीं सरकारांत नालीश केली. परंतु राजश्री लक्ष्मण बल्लाळ ये गोष्टीस साक्ष आहेत. त्यांनींही कमाविसदारांस फार सांगितलें. सेवकास खर्चास चारशें रुपये सबनिसाजवळ कृपा करून दिले ह्मणून आज्ञा. स्वामी कृपाळु समर्थ. येथें राजश्री गणपतराव विष्णु गजरे त्यांचें दुकान व गुमास्ते येथें आहेत. त्यांचे तेथें पुण्यांत ऐवज दिला ह्मणजे येथें पावेल. सवा पांचशें त्यांचें देणें आहे. व्याजबट्टाही घेतील. बरें. प्रस्तुत धन्यांनीं जी कृपा केली, ती फार आहे. पुढें परिहार करणार धनी समर्थ. ऐवज चांगला दिल्यानें येथें बट्टा पडणार नाहीं. सरकार-आज्ञेनें इतकें होईल. पाटीलबावांकडील वर्तमानः—गोहजप्रांतीं कोणी मातबर गढी आहे, तेथें मोर्चे लाविले आहेत. परंतु छावणीस उज्जनीस येणार अशी वदंता आहे. नारो शिवदेव व आबाजी नाईक वानवळे हे उभयतां येथें दो चौ दिवसां येणार. राजश्री लक्ष्मण बल्लाळ व बाजी विठ्ठल, माधवराव गंगाधर यांचे मामा, हे उभयतां ब्रह्मावर्तास भागीरथीस्नानास जाणार. जातां येतां पाटीलबावांचीही भेट घेऊन येणार. लक्ष्मणपंतांनीं राजश्री बाबुरावजीस पत्र लिहिलें आहे. त्यांची आज्ञा आली ह्मणजे जातील असें बोलतात. प्रस्तुत देखलें ऐकलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. तेथें हुंडावळ व पट्टा न पडतां ऐवज येथें पावे, असें करणार स्वामी समर्थ. येथेंही व्याजबट्टा लागेल. ही विनंति."

---

**लेखांक ४७.** ता० १४ मे इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० वैशाख वा ७ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ जमादिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनतिपत्रीं लिहून डांकेबरोबर व कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान आयुद्धेहून पत्रें बाईस आलीं. त्यांत मजकूर जे, बंगाल्यांत भोसल्यांची फौज होती, त्यांशीं व इंग्रजांशीं मातबर लढाई जाली. भोंसल्यांची फौज शिकस्त जाली. भोंसल्यांकडील राजाराम मुकुंद मातबर गृहस्थ फौजेंत सरदार होता, तो गरदीस मिळाला. कोठें ठिकाण लागत नाहीं ह्मणून वर्तमान. सुजाउद्दवलाचा फरजंद ठिकाणींच आहे. त्याचाही वकील इंग्रजांच्या वकिलाबरोबर पाटीलबावांजवळ आहे ह्मणून लिहिलें होतें. व दिल्लीहून पंधरा दिवसांचीं पत्रें आलीं. त्यांत वर्तमान कीं, नजबखानास

राजयक्ष्मा रोग होऊन, चवदावे रविलाखरीं हक जाला व पुरुषोत्तमपंत हिंगणे वारले. उज्जनींत देवराव होते, ते दिल्लीस गेले. ह्मणून राजश्री बापूजी महादेव बाईजवळ सांगत होते. नजिबखानाचे जागा पादशाहांनीं कोणी एक मातबर मनुष्य चेल्यांत होता, त्यास शहांनीं सर्फराज करून फौज त्याचे स्वाधीन केली. शीख बारा पंधरा हजार जमा होऊन दिल्लीपासून वीस कोसांवर आले आहेत. आणखीही शीख जमा होऊन येणार. यास्तव कांहीं फौजा शिखांच्या तोंडावर पाठवावयाची तरतूद करितात ह्मणून वर्तमान होतें. राजश्री पाटीलबावा ग्वालेर व गोहजच्या दरम्यान आहेत. बादशाहाकडील व इंग्रजांकडील व पठाणाकडील राजेरजवाड्यांकडील जयपुरवाले आदिकरून सर्वांचे वकील पाटीलबावांजवळ आहेत. पाटीलबावांची छावणी ते प्रांतीं होईलसें दिसतें. पाटीलबावांनीं बाईस पत्रें पेशजीं व हल्लीं लिहिलीं आहेत जे, देशीं सरकार तुकोजी होळकर आहेत, सरकारावर मसलत आहे. यास्तव माळव्यांतील महालोमहालचा पैका वसूल लवकर करून, श्रीमंतांचे विद्यमानें तुकोजीबावांकडे ऐवज पाठवून देणें. कोठें जोरतलबी महाल असतील, त्याकरितां पाटीलबावांनीं आपले मामलेदारांस पत्रें बाईजवळीच पाठविलीं आहेत कीं, बाई जेथें आज्ञा करितील, तेथें जमियत सुद्धां जाऊन, हरामखोरांस तंबी पोंहचावून, पैका वसूल करून देणें. बाईचे आज्ञेंत राहाणें. याप्रमाणें पत्रें आलीं होतीं. तें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें होतें. सांप्रतही या अन्वयेंच आलीं आहेत. प्रस्तुत सरकारचीं पत्रें राजश्री लक्ष्मण बल्लाळ यांस हुजूर येण्याविषयीं व बाईस पत्र जें, लक्ष्मणपंत ज्या कार्यास आपल्या जवळ ठेवले, तो मजकूर कांहींच आपल्या ध्यानास न ये. तेव्हां त्यांचें तेथें राहणें विशेष काय? रवाना करणें. हुजूर येतील. तीं पत्रें चंद्र २७ रविलाखरीचीं तीं येथें चंद्र १२ मिनहूस पावलीं. मशारनिल्हेनीं आपलें पत्र वाचून दाखविलें. मीही तेथेंच होतों. मींही पत्र पाहिलें. तें पत्र व बाईचा लखोटा राजश्री माधवराव गंगाधर यांजकडेस पाठविलें. त्यांनीं पत्रें पाहून बाईकडे पत्रें घेऊन गेले. एकांतीं बाईस वाचून दाखविलीं. पत्रें ऐकून मर्जी दिक्क जाली. मध्यें एक दोन दिवस बोलावयास फावलें नाहीं. तदोत्तर चंद्र १६ रोजीं लक्ष्मणपंत व माधवराव उभयतां वाड्यांत जाऊन बाईशीं एकांतींच भाषणें केलीं. बाईनींही आपले पूर्वत्र कांहीं नम्र, कांहीं दाबाचीं, भाषणें केलीं. तदोत्तर मशारनिल्हेनीं उत्तर केलें जे, आह्मांस सरकारची आज्ञा जाली, त्यापक्षीं येथें राहणें युक्त नाहीं. बाई बोलली जे, काय करून जातां? त्यांनीं उत्तर केलें जे, वर्षभर राहून तुह्मांशीं हेंच बोलत गेलों कीं, महालचा पैका जमा करून श्रीमंतांचे विद्यमानें तुकोजीबावांकडेस पाठवा अगर श्रीमंतांकडे पाठवा.

याच अन्वयें पाटीलबावाही लिहीत गेले. परंतु आपल्या विचारास कोणतीही गोष्ट न आली. तेव्हां येथें राहून उपयोग काय? एक श्रीमंतांच्या कल्याणांत सर्वांचें कल्याण. तत्रापि श्रीमंतांनीं हा वेळपर्यंत तुमच्या बहुमानांत कांहीं कमी केलें नाहीं. पुढेंही जें होणें तें बाईचें वडीलपण मर्यादा राखूनच करणें तें करूं. असें लिहित असतां आपले मर्जीस न आलें. त्यांचे आज्ञेप्रमाणेंच येथून घडलें असतें तर आज फार सरकारांत उपयोग होता. हे पेशआंदेशी व सरकारआज्ञा मान्य केली हें पाहून, श्रीमंत जें करणें तें तुमच्या मनोदयानुरूपच करते. परंतु आपल्यास धैर्य न पुरे. त्यास आह्मीं काय करावें? या प्रकारें फार बोलणीं जालीं. अतःपर आह्मांस निरोप द्या, आह्मी जाऊं. त्यास बाई बोलली जे, आमचेंही तापत्रय तुह्मी पहातच आहां. यांणीं उत्तर केलें जे, तुमचें तापत्रय अधिक कीं पाटिलबावांचें अधिक? पुढें दो दो वर्षांच्या महालांच्या खंडण्या घेऊन मामलेदारांस महाल तीन वर्षें विकले. परंतु मसलत सोडली नाहीं. अशी मसलत तुह्मांवर काय पडली आहे, असें आह्मीं ह्मटल्यावर तुह्मांस राग येईल. सरकार उपयोगी व तुमचें बरें याअन्वयें आह्मीं तुह्मांस जितकें सांगणें तितकें सांगितलें. परंतु आपल्या ध्यानास कोणतीही (गोष्ट) न ये. त्यास आमचा उपाय काय? ज्यापक्षीं आपली खुद्द पसंती पाहिली, तेथें आह्मीं आतां काय सांगावयाचें आहे? ऐशीं स्पष्ट उत्तरें ऐकून बाईनींही करार केला जे, कमाविसदारांजवळून ऐवज घेतों आणि सरकारउपयोग जी मसलत पडे तसेंच घडे, याप्रमाणें आह्मी करितों. तोंवर तुह्मीं उज्जनीस जाऊन, श्रीमहाकाळेश्वराचें दर्शन घेऊन, दहा बारा दिवसांत यावें. असा करार करून उठले. बाईनींही असा करार केला. परंतु खचितपणें असेंच अमलांत येईल असा भरंवसा पुरत नाहीं. क्षणभंगुर कारभार दिसतो. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें, तें सेवेसी श्रुत होय. स्वामींनीं पेशजीं आज्ञापत्रीं आज्ञापिलें आहे जे, तुमचे खर्चास चारशें रुपये सबनिसाजवळ दिले. तुह्मांस पावतील. त्यास येथून सबनिसांसही दोन चार पत्रें व स्वामींसही चार पांच विनंतिपत्रें लिहून पाठविलीं. राजश्री गणपतराव विष्णु गद्रे यांचे येथें ऐवज देऊन, त्यांचें पत्र त्यांच्या गुमास्त्यास येथें पत्र पाठवावें, ह्मणजे येथें आह्मांस ऐवज. पावेल ह्मणून सरकारांतही लिहिलें, व सबनिसांसही लिहिलें. परंतु उभय उत्तरेंही कांहीं येत नाहींत. येथें सेवकाची काय विपत्य आहे, नी देणेदारांची काय सक्ती आहे, हें तापत्रय कोठवर लिहूं? सहाशें रुपये येथें देणें जालें आहे. येथें कोणी त्राता नाहीं. धन्यांनीं उपेक्षा केली तर सेवकास त्राता कोण? मजविषयीं तेथें कोणी स्मरण देण्यास नाहीं. धनी कृपाळू समर्थ. वारंवार पोटाचा मजकूर लिहितों ह्मणून स्वामी रागास येतील.

त्यास, स्वामीव्यतिरिक्त गरिबांचा त्राता कोण? स्वामी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति. आज चंद्र १९ मजकुरीं लक्ष्मणपंत बाईचा निरोप घेऊन उज्जनीस गेले. बाईनीं समागमें पांच स्वार देऊन बिदा केले. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ४८.** ता० २४ मे इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० ज्येष्ठ शु॥ १ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २९ जमादिलावलपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनें-करून वर्तमान यथास्थित असो विशेष. इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर रवाना केलीं आहेत. राजेश्री नारो शिवदेव उज्जनीस होते. त्यास पुण्याहून बाईशीं बोलावयास राजश्री बाबुराव विश्वनाथ श्रीमंतांनीं पाठविले आहेत. हें वर्तमान राजश्री पाटीलबावांस विदित जालें. त्यावरून पाटीलबावांनीं आपल्या तर्फेनें नारो शिवदेव येथें पाठविले. ते छ २२ मिनहूस दों प्रहरां पावले. येतांच बाईची भेट जाहली. बाबुरावजीसमीपच श्रीराममंदिरीं राहण्यास स्थळ दिलें आहे, तेथें आहेत. सरकारचें व राजश्री तात्यांचें पत्रें दोन रावजींस छ १८ मिनहूचीं डाकेबरोबर आलीं, तें येथें छ २४ मिनहूस दाखल जालीं. ते दिवशीं बाईस एकादशी होती. दुसरे दिवशीं प्रदोष. छ २६ रोजीं पत्रें घेऊन बाबुरावजी व नारो शिवदेव उभयतांही दरबारास गेले. एकांतींच बाईस पत्रें वाचून दाखविलीं. सरकारच्या व तात्यांच्या पत्रांचा अन्वय एकच होता. ते पत्रें ऐकून बाई रोषयुक्त कितीक गोष्टी बोलली. आज्ञापत्रीं होतें जे, बाईच्या खर्चाचा अजमास लिहून पाठवावा. त्या अर्थी बाई बोलली जे, मजला कोणासही जातीस खर्चास मागावयाचें नाहीं. नेमणूक करून घेणें नाहीं. असें अन्वय बोलली. मध्यें नारो शिवदेव यांसीं व रावजीशीं बाईचें रूबरू बरींच भाषणें जालीं. चार घटका बसले होते. तदोत्तर बाबुराव यांणीं बाईस विचारलें जे, या पत्रांचीं उत्तरें श्रीमंतांस लिहिलीं पाहिजेत. बाई बोलली जे, विचारून देऊं. रावजी आज्ञा घेऊन आपल्या स्थळास आले. मागें नारोपंतांचे व बाईचे चार घटका एकांत होऊन, तेही निरोप घेऊन आपल्या स्थळास आले. याप्रमाणें रावजींनीं वर्तमान सांगितलें, तें सेवेसी लिहिलें असे. पाटीलबावांच्या लष्करांतून आज दहा दिवसांचें वर्तमान आलें जे, तीन पलटणें नवीं इंग्रजांचे कुमकेस आलीं आहेत. त्याजवर पाटीलबावांनीं फौज पाठविली होती. ते फौजेसीं व ती पलटणांसीं लढाई बरीच जाली. इंग्रज शिकस्त होऊन माघारी गेले. चाळीस पन्नास माणसें इंग्रजांचीं ठार जखमी जालीं. काल्पीकडे इंग्रजांचा एक कंपू आला होता,

## ३९. पेशव्यांचें इंग्रजांच्या बादशाहास पत्र.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. हें अस्सल पत्राचा मसुदा असून त्यांत जागोजाग नानांच्या हातचे शोध आहेत. हें पत्र इ. स. १७७७ च्या सुमारास लिहिलें असावें. रघुनाथराव पेशव्यांसीं मुंबईकर इंग्रजांनीं तह करून साष्टी केलें, सबब मराठ्यांशीं लढाई उपस्थित झाली. ही गोष्ट कलकत्त्याच्या गव्हरनरजनरलच्या संमतीशिवाय केली असल्यामुळें ती त्यांनीं नामंजूर करून, त्यांनीं पेशव्यांशीं तह करण्याकरितां कर्नल अपटन ह्यास पुण्यास पाठविलें, व पुरंधर येथें इंग्रजांचा व पेशव्यांचा दोस्तीचा तह झाला. परंतु मुंबईकर इंग्रजांनीं घेतलेलीं मराठ्यांचीं साष्टी वगैरे ठिकाणें त्यांस परत मिळालीं नाहींत. तेव्हां नाना फडनविसांनीं विलायतचा बादशाहा–सर्व 'इंग्रजांचा खावंद' यांस सवाईमाधवरावाच्या नांवानें हें पत्र पाठविलें आहे. हें पत्र मनोरंजक असून त्यांत मराठ्यांच्या बाजूचें काय ह्मणणें होतें तें नमूद केलें आहे. अर्थात् ही एक बाजू आहे. दुसऱ्या बाजूचा पत्रव्यवहार प्रो० फारेस्ट साहेबांच्या 'सिलेक्शन्स' मध्यें प्रसिद्ध झालेला आहे. दोन्ही बाजूंचे कागदपत्र पाहिले, ह्मणजे ह्या ऐतिहासिक प्रकरणाचें सत्यस्वरूप मार्मिक इतिहासवाचकांस चांगल्या रीतीनें मनन करितां येईल. नानांचा पत्रव्यवहार इंग्रजांच्या बादशाहांशीं होता हें ह्यावरून सिद्ध होतें, व नानांचा कलकत्त्याचा वकील लाला सेवकराम ह्याच्या पत्रावरूनही दिसून येतें. इंग्रजांच्या बादशाहाविषयीं नानांच्या पत्रांत "इंग्रेज बादशाहाचे येथें इनसाफ आहे व करारांत तफावत कधीं होत नाहीं" ह्मणून जें वाक्य आहे, तें अति महत्त्वाचें आहे. ह्या वाक्यावरून, इंग्रज बादशाहाच्या न्यायबुद्धीची व सत्यनिष्ठेची कीर्ति नानांच्या वेळेपासून प्रसिद्ध आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

श्री.

"बंदर बंबई पूर्वी कोठी लहान होती, आणि तमाम या प्रांतांत वलंदेज व परतकेज (पोर्तुगीज) यांचा उदीम फार होता. तेव्हां बंबईकर गवरनर यांनीं आह्मांसीं पैगाम लावून, तीर्थरूप बाजीराव यांचे कारकीर्दीस कौल घेऊन, एखलासाचे करार करून, नेकराह चाल दाखवून, आमच्या राज्याचा आसरा पुरता केला. त्यावरून आह्मीं वलंदेजांचा उदीम या प्रांतांत फार होता, तो बंद करून इंग्रेजांचा उदीम जारी केला; व परतकेज (पोर्तुगीज) यांजला तंबी पोंहचावून सरकारच्या मुलकास लगतीं बंदरें सरकारांत घेतलीं. त्यावरी जे गवरनर व कौंसल बंबईस येत गेले, ते आह्मांसीं रुजू राहून स्नेहच राखीत गेले. तीन कारकीर्दीचे तीन दफे एखलासाचे करारनामे तरफेन लिहून दिधले. मध्यें मध्यें कितेक लोकांसीं व इंग्रजांसीं विघाड

येऊन बंदरावरी लढाया जाल्या. त्यांनीं आह्मांस कुमक मागितली. परंतु इंग्रेजांचे दुशमन जाणून कुमक न दिल्ही. नफे होते ते कबूल न केले. ऐसा एखलास फार दिवस चालला. अलीकडे चार सालें जालीं, किबलेगाह रघुनाथराव यांनीं आमचे पैदर किबलेगाह नारायणराव यांसी दगा केला. यांजमुळे घरांत फितुर पडला. आमच्या फौजा कांहीं हिंदुस्थानांत, कांहीं कर्नाटक प्रांतीं, कांहीं रघुनाथराव यांच्या तैाकुबावरी वजीरअमीरसुद्धां गेल्या होत्या. ते समयीं काबू पाहून, गवरनर बंबई यांनीं सरंजाम जमा करून, बेवजूद टॉमस मोष्टीन, त्यांचा वकील, पुण्यांत आला असतां एकाएकीं जाऊन, गवरनर मजकूर यांनीं आमचा आब व आनश पाहून, वतनाची जागा साष्टीस मोर्चे लाविले. वीस पंचवीस दिवस किल्लेवाल्यांनीं मकान राखिलें. इंग्रजांचा कौलकरार दुरुस्त, याखातर कुमक न पोहोंचली. याजमुळें साष्टीस साष्टी व तीन जंजिरे धाकटे येशवतगड वगैरे घेतले. त्याउपरी रघुनाथराव यांनीं गव्हरनर कौंसल बबई यांसीं सौख्त करून, त्यांस आपल्या मकानास बोलावून, त्यांची कुमक करून आमचे फौजेशीं दोन वर्षे लढाई सुरू केली. एक दोन लढाया लहानशा जाल्या. त्या तुह्मीं ऐकिल्याच असतील. त्यानंतर गव्हरनर कौंसल कलकत्ते यांनीं दूर आंदेशीवरी नजर देऊन, आह्मांकडे सलहाचीं पत्रें पाठवून, मागून कर्नल जॉन इपटेन यांसी मुखत्यारनामा देऊन आह्मांकडे पाठविलें. आह्मीं पुरातन स्नेह जाणून, स्नेहाचे जाबसाल केले कीं, तुह्मीं साष्टी वगैरे जंजिरे सोडून देणें; रघुनाथराव यांची कुमक न करणें; व बसबब रघुनाथराव यांची कुमक करून पन्नास हजार फौजेचा खर्च तीन करोड रुपये आह्मांवरी पाडिला तो देणें. व गुजराथ मुलूख तमाम इंग्रेजांनीं लुटून मुबलक पैका घेतला तो, व साष्टींत मालमालियत, गल्ला, तोफा, दारूगोळा, सरकारचा व रयतेचा माल मालियत, गल्ला वगैरे देणें. ह्मणजे तुमचा आमचा सलाह होईल. त्यास कर्नेल इपटेन यांनीं साष्टी वगैरे जंजिरे यांचा जाबसाल कौंसल कलकत्ते यांजवरी ठेविला. आह्मींही, ते जागा सल्याच्या हालांत, एकाक दग्यानें घेतले जंजिरे देवितील, ह्मणून त्याजवरीच मुनसफी ठेविली. त्यास त्यांनीं बंबईवाले यांची पास करून साष्टी वगैरे जजिरे तसेच ठेविले. उफराटे तीन लक्ष रुपयांचा मुलूक व बारा लक्ष रुपये खर्च, रघुनाथराव यांची कुमक करून इंग्रेज झुंजले, याजबद्दल आह्मांसच मागूं लागले. आह्मीं इंग्रेजांचा स्नेह बहुत दिवसांचा व आमचीं स्थळें आह्मांस

१ किबॅलेगाह=वडील, तीर्थस्वरूप, तीर्थरूप. २ पदर=इंग्रजी father ह्या शब्दाचा चुकीचा उच्चार दिसतो. सवाई माधवरावांचें हें पत्र आहे, त्या अर्थी नारायणराव हे त्यांचे फादर (वडील) होत, हें उघड आहे. 'पादर,' 'कौंसल' वगैरे इंग्रजी शब्द मराठी भाषेमध्यें ह्या वेळेपासून कसे शिरूं लागले ते लक्षांत घेण्यासारखें आहे. ३ ताकूब=पाठलाग. ४ काबू=संधि, समय. ५ बवजूद=शिवाय. ६ आनश=उन्स=मित्रत्व, स्नेह. ७ साख्त=सख्य, दोस्ती. ८ हाल=स्थिति, समय. ९ मुनसफी=न्याय. १० पास=दुजोरा, पाठबळ.

देवितीलच; व कलकत्तेकर यांणीं मातबर माणूस पाठविला याजवर नजर देऊन, करोडोचे खर्च व खराबी मुलकाची व साष्टी वगैरे जंजिरे यांचीं ठाणीं व तेथील मालियत एकीकडे ठेवून, जे कौंसल कलकत्ते यांनीं व कर्नेल इपटेन यांनीं सांगितलें, त्याजवरून एकलासावर नजर देऊन, कौंसल कैमन कलकत्ते यांचे मारफतीनें जैमियेकौम इंग्रज व पादशाहा व कंपनी इंग्रेज यांसीं सलाह करून, परस्परें करारनामे ठरले. करारनाम्याचे तारिखेपासून तीन महिने वीस रोज, इंग्रेज रघुनाथराव यांजबरोबर होते. त्यांनीं, करारनाम्यांत फिलफौरें रघुनाथराव यांजपासून करून जावें, ऐसें असतां फिरोन चार महिने फौजेचा खर्च आह्मांवरी पाडिला. सुरतेंत रघुनाथराव यांच्या फौजेस आसरा दिल्हा. आखेर आमची फौज भारी होती, रघुनाथराव यांची फौज लाइलाज होऊन कौल घेऊन निघाली. रघुनाथराव यांस सुरतेजवळ ठेविलें, दोस्ती जाली, ह्मणून सरकारच्या फौजा हुजूर आल्या. त्यानंतर रघुनाथराव यांसीं बाहेर दोन महिने काढिले. फिरोन जाहाज पाठवून नेऊन त्यांस बंबईत आसरा दिल्हा. दुसरें एक फिसादी कोंकण मुलकांत पैदा होऊन, कांहीं लोक जमा करून, तमाम मुलूक कोंकणांत ताराज करून, सरकारचे कितेक किल्ले त्यानें घेतले. तेव्हां सरकारची फौज त्याजवरी रवाना केली. त्यांनीं फिसादी यासीं शिकस्त दिली. त्याची जमियत तमाम गारत केली. फिसादी साहा हजार लोकांनिशीं पळोन गेला. त्यामागें सरकारची फौज लागली असतां खुद्द फिसादी यासी सरकारचे सरदार राघोजी आंगरे यांनीं धरून हुजूर पाठविलें. हजार लोक त्याचे, सरकारची मालियत, हत्तीघोडे घेऊन साष्टीपासीं गेले. त्यांस साष्टीवाले यांनीं आसरा दिल्हा. आह्मीं गव्हरनर बंबई यांसी खतें लिहून पाठविलीं कीं, हल्लीं करारनामा जाला, त्यास तुह्मीं रघुनाथराव यांसी किस्त्या पाठवून बंबईस घेऊन जाऊन आसरा दिला; व फिसादीच्या लोकांनीं सरकारचा लाखोंचा खिसारा केला असतां व सरकारची मालियत त्यांजवळ असतां तुह्मीं आसरा दिल्हा; यांत रास्तकौली इंग्रेजांची कोठून राहिली? त्याचा दरजबाब गव्हरनर मजकूर यांनीं आह्मांस साफच लिहून पाठविला, त्याची नक्कल पाठविली असे. अजोन रघुनाथराव व फिसादीचे लोक बंबईत आहेत. याजवरून आमचे मातबर सरदार इंग्रेजांच्या सह्यास राखून ठेवितात. दुनियेंत रास्तगोई परमेश्वरानें किमिया दिली आहे. जो वचनास अंतर करितो, त्यास या लोकीं परलोकीं जागा नाहीं. ईश्वरकृपेनें या राज्याची दुशमनी दर्यावश परतकेज (पोर्तुगीज) वगैरे यांनीं केली, ते खराबच जाले. खुशकींतील बादशाहा अवरंगजेब अलमगीर वगैरेनींही दुशमनी केली, त्याची सजा पावले. अखेर कितेक मतलब कबूल करून सल्ला केली. आह्मांसीं

१ कमन=कमीन (?)=राहणारे. २ जमियेकौम=एतद्देशीय (हिंदुस्थानांतील). ३ फिलफौर =जलदीनें, एकदम. ४ लाइलाज=नाइलाज, निरुपाय. ५ फिसादी=बंडखोर. (तोतया सदाशिवराव भाऊ.) ६ खिसारा=नाश. खराबा. ७ रास्तकौली=सत्यवचनता. ८ रास्तगोई= खरें भाषण.

जो साहेबमुल्क असेल, तो दुशमनी करूं शकत नाहीं. कारण कीं आमच्या फौजेपुढें त्यांच्यानें मुल्क रक्षण होणें नाहीं. गव्हरनर कौंसल कलकत्ते यांनीं आह्मांस लिहिलें कीं इंग्रेज कोणाचा मुल्क मागत नाहींत. अखेर नव लक्षांचा मुल्क, चार जंजिरे साष्टी वगैरे, बंबईवाले यांच्या हातांखालीं ठेविलेच आहेत! व सरकारचे बागी यांसी आमचे हातीं द्यावें, कोणेही सबबें कुमक न करावी, ह्मणून पेशजीं करारनामे व हालचे (त्याची नक्कल पाठविली असे) असतां, गनिमास आसरा देऊन, फितूर आमच्या मुलकांत व सरदारांसीं करीतच आहेत. कौंसल कलकत्ते यांनीं त्यास आसरा न द्यावा म्हणून वरचेवरी लिहीत असतां व कर्नल इपटेन हुजूर हाजीर असतां, दुशमनास आसरा देऊन फितुर करीतच आहेत. या गोष्टी उमदे सरदारांपासून दूर असेत. आह्मीं या गोष्टीचा बदला करावा, तरी बहुतां दिवसांचा इंग्रेजांचा दोस्तीचा सिलसिला आणि त्यांचे करार व लिहिलीं प्रमाण, तमाम आलमांत जाहीर होती. ह्मणून आपल्या कडून तफावत येऊं दिल्ही नाहीं आपण तमाम इंग्रेजांचे खावंद. त्यास ताकीद असावी कीं ऐसी बदकौली न करीत. तुमचा मुल्क जवळ नाहीं कीं, हे हकीगत पै दरपै तुह्मांस पोंहचावावी. इंग्रेज लोकांनीं या प्रांतांत कांहीं ... ... ... ठेविली नाहीं. आपण दुरंदेश, उमदे, आणि पुरातन आमचे स्नेहित जाणून, इतिल्ला केली असे कीं, गवरनर कौंसल बंबई यांसी ऐसी ताकीदमय सजावलें पाठवावी जे, घेतला मुलूख व साष्टी वगैरे जंजिरे आमचे आह्मांस देत, व आमची मालियत साष्टी वगैरेची नेली ते व गुजराथचा पैसा वसूल घेतात व मुल्क पायमाल केला तो ऐवज व त्याजमुळें आह्मांस शिबंदीचा खिसारा जाला, तो भरून देत ऐसें केलें पाहिजे. एक मातबर माणूस हुजूरचा पाठवून सद्दहू लिहिल्याप्रमाणें अमलांत आणवी तें करावें. दुतर्फे एखलास चालत असतां व आह्मांकडून कांहीं करारांत नसतां ऐसी खराबी केली. सबब आह्मीं तुह्मांसीं मुलकाची व जंजिऱ्यांची व पैक्याची दरखास्त करितों, हे वाजवीची राह आहे. आलमाच्या जबानीनें ऐकतों कीं, इंग्रेज बादशाहाचे येथें इनसाफ आहे, व करारांत तफावत कधीं होत नाहीं. जरी हे गोष्टी खरी आहे, तरी मुंबईकरांस सजा पोंहचावून, सदरीं लिहिल्याप्रमाणें अमलांत आणवावें. आमचे गनीम आमचे सपूर्द करवावें. पुढें आमच्या दुशमनास जागा न द्यावी. त्याची कुमक कोणेही तऱ्हेनें न करावी. जरी तुह्मी हे गोष्टी चर्ष्मपोशी करून दरगुंजर कराल, तरी जिकडे वाजवी तिकडे परमेश्वर आहे. आह्मी तों दिलोजानानिसीं दोस्ती व एखलासी चाहतों. इंग्रेज आह्मी एक असलिया, इंग्रेजांचा उदीम व् सरकारचा बंदोबस्त राहील. हिंदुस्थान दक्षण कर्नाटक प्रांतांत कोणाची ताकद नाहीं कीं, बेदनजर दोहींकडे करील.”

❋ ❋ ❋

१ बागी=बंडखोर. २ आलम=जग, लोक. ३ बदकौली=अप्रामाणिकपणा, वचनभ्रष्टता. ४ इतिल्ला=जाहीर, विदित. ५ सजावल=शिक्षा, सक्त हुकूम. ६ चष्मपोशी=डोळेझांक, कानाडोळा. ७ दरगुजर=चालढकल. ८ दिलोजानानिसीं=अंतःकरणपूर्वक. ९ बदनजर=वांकडी दृष्टि.

# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः–दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] एप्रिल १९०९. [अंक ९ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



नादिरशाहा.

# ४. नादिरशाहाची दिल्लीवरील स्वारी.

हिंदुस्थानावर उत्तरेकडून ज्या परराष्ट्रांच्या स्वाऱ्या झाल्या, त्यांत नादिरशाहाची स्वारी ही इतिहासांत विशेष प्रसिद्ध आहे. ही स्वारी इ. स. १७३९ मध्यें झाली. त्या वेळीं दिल्लीच्या तक्तावर महमदशाहा हा बादशाहा होता, व दिल्लीच्या राजकारणांत सवाई जयसिंगाचें विशेष प्राबल्य होतें. दक्षिणेंत शाहू महाराज हे मराठ्यांच्या सिंहासनाचे अधिपति असून, त्यांचे मुख्य प्रधान बाजीराव बल्लाळ पेशवे ह्यांनीं, आपल्या पराक्रमाच्या जोरावर, दिल्लीपर्यंत आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें होतें. नादिरशाहा हा एक लोकोत्तर साहसी व शूर पुरुष असून, त्यानें मोंगल बादशाही रसातळास पोहोंचवून दक्षिणेवरही स्वारी करण्याची महत्त्वाकांक्षा मनांत आणिली होती. दिल्लीच्या मोंगली बादशाहीमध्यें कांहीं सत्व न राहून ती अंतःकलहानें व परस्परमत्सरानें अगदीं जर्जर झाली होती. त्यामुळें, दिल्ली पादाक्रांत करून मराठी राज्यावरही नादिरशाहाचा मोहरा वळेल कीं काय, अशी मराठ्यांस फार भीति उत्पन्न झाली होती. ह्या प्रसंगांच्या सर्व राजकारणांचीं व हालचालींचीं बातमीपत्रें मराठ्यांचे वकील उत्तर हिंदुस्थानांतून पाठवीत असत. तीं समग्र पत्रें प्रसिद्ध झालीं, तर हिंदुस्थानाच्या इतिहासांतील ह्या एका महत्त्वाच्या राजकारणाचा चांगला खुलासा होईल. ह्या प्रसंगाचीं पत्रें फार महत्त्वाचीं असून, तीं त्या राजकारणांचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या व त्यांत प्रत्यक्ष संबंध असणाऱ्या माणसांनीं लिहिलेलीं आहेत. त्यांमध्यें सवाई जयसिंगाजवळील वकील व्यंकाजीराम, विश्वासराव दादाजी, गोविंद नारायण, सदाशिव बल्लाळ, बाबूराव मल्हार वगैरेंचीं पत्रें पराकाष्ठेच्या महत्त्वाचीं आहेत. ह्या पत्रांच्या नकला श्रीमंत बाजीराव पेशवे हे छत्रपति शाहू महाराज व ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर ह्यांच्या अवलोकनासाठीं पाठवीत असत. त्यांपैकीं कांहीं नकला आह्मांस सातारच्या व धावडशीच्या जुन्या कागदपत्रांत सांपडल्या आहेत. त्यांवरून नादिरशाहाच्या स्वारीची हकीकत व त्या प्रसंगाच्या राजकारणांची माहिती, मराठ्यांच्या वकिलांनीं कशा तऱ्हेची लिहिली आहे, त्याची चांगली कल्पना येते. नादिरशाहाच्या स्वारीची हकीकत इंग्रजीमध्यें फ्रेजर ह्यांनीं लिहिलेल्या नादिरशाहाच्या चरित्रांत दिलेली आहे. त्याचप्रमाणें सर जॉन मालकम ह्यांनीं आपल्या इराणच्या इतिहासामध्यें नादिरशाहानें खुद्द आपल्या मुलास लिहिलेलें ह्या स्वारीचें वर्णनात्मक पत्र छापलें आहे. त्या सर्वांचें अध्ययन करणारास मराठ्यांच्या हितदृष्टीनें लिहिलेलीं पुढील पत्रें अनेक प्रकारें मनोरंजक वाटतील. ह्या पत्रांवरून, नादिरशाहानें दिल्लीची गादी व हिंदुस्थानांतलीं दुसरीं हिंदु राज्यें रसातळास नेण्याचा

संकल्प केला असता, तर अशा आणीबाणीच्या प्रसंगीं सवाई जयसिंग व बाजीराव पेशवे ह्यांनीं आपल्या संयुक्त बाहुबलानें व बुद्धिबलानें त्यास हताश केलें असतें, ह्यांत शंका नाहीं. आणि, पुष्कळ अंशीं ह्याच कारणास्तव, नादिरशाहा दिल्लीची अगणित संपत्ति घेऊन व दिल्लीपतीशीं सख्य करून निघून गेला, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. धोंडो गोविंदाच्या पत्रामध्यें असें स्पष्ट वाक्य आहे कीं, 'तहमासकुलीखान कांहीं देव नाहीं, जे पृथ्वीस कापून काढील. तोही शहाणा आहे. जबरदस्तांसीं सलूक करील.' ह्यावरून मराठ्यांचें बाहुबल ह्या वेळीं चांगलें महशूर होतें हें उघड आहे. हीं पत्रें संगतवार नाहींत ही दुःखाची गोष्ट होय. तथापि, त्यांचें महत्त्व इतिहासवाचकांस अधिक वाटेल.

## लेखांक १.

श्री. ता. १९ फेब्रुवारी इ. स. १७३९.

"श्रीमंत सदायशवंत धर्मपरायण राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

सेवक व्यंकाजीराम सां॥ नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० माघ वद्य ७ सप्तमी यथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तरी, माघ वद्य षष्ठीस प्रहर दिवसां दिल्लीहून भिकारीदास नाखणी याचा गुमास्ता रूपराम यानें वर्तमान लिहिलें जेः—जाटाचे स्वार पळून आले. त्यांनीं वर्तमान सांगितलें कीं, प्रहररात्र माघील असतां, तहमास्तकुलीखानाच्या फौजेनें छापा घातला. खानदवरांचे मोरच्यावरून फौजेंत शिरला. खानदवरा, सादतखान मारला, ह्मणून वार्ता (आली). पातशाहा मारला की पळाला, नेमस्त[1] नाहीं. तहमास्तकुलीची फत्ते जाहाली. ऐसे साहुकारी वार्ता आली. अद्याप तहकीक[2] नाहीं. मागें वर्तमान आलें होतें जे, तहमास्तकुली साता स्वारांनमीं धरला गेला. ते लटकें जालें. आतां हें निश्चितार्थ वर्तमान येईल तें लेहून पाठवूं. सांप्रत ऐकिलें वर्तमानः— राजेंद्रास अर्ज जाहाली. त्यांनीं आज्ञा केली की लिहिणें. त्यावरून लिहिलें. येथें राजश्री आनंदराव सुमंत व शेख महमद सफी माघ शुद्ध त्रयोदशी आले. राजेंद्रानिसीं विचार केला. तुरा, वस्त्रें पांच, जवाहिर रकम, जिगा, दोघां लेकांस वस्त्रें, दोघी स्त्रियांस वस्त्रें, आणखी सुमंतास कडी, पांचशें रुपये नगद, दिले. राजेंद्र उठोन भेटले. शेवटीं विरस होऊन गेले. समागमें स्वार पंचवीस, बरकंदाज पन्नास देऊन, उदेपुरास पावविले गेले. शेखजी येथें आहेत. राजश्री धोंडोपंत माघ वद्य चवथीस दोन प्रहर रात्रीस राजेंद्राचे लष्करांत आले. पंचमीस प्रहर दिवसां राजेंद्राची भेट घेतली. स्वामींचे

---

१ नेमस्त=निश्चित, खास. २ तहकीक=पक्की बातमी, हकीकत.

आज्ञेप्रमाणें वर्तमान श्रुत केलें. लष्करांत राजश्री बाबाकडे जातात. परंतु वर्तमान या प्रकारींचें येतें जातें. राणाजीचा वकील शोभाराम दिल्लीहून जात होता. लष्कर पातशाहाचे साहा कोस राहिलें होतें. मध्यें तह्मास्तकुलीचे लोकांनीं मारला. या कुरुक्षेत्रींचे जमीदारांनीं लुटून घेतला. हत्ती व घोडे घेतले. माणसें मारलीं. मोठी धुंद जाहाली. राजेंद्र बोलिले जे, विचारें मार्गस्त करूं. रा० धोंडोपंत मार्ग पाहून पुढें जातील.

ताजाकलमः—माघ वद्य सप्तमीस पत्र कृपारामाचें आलें कीं, माघ वद्य प्रतिपदेस सादतखान लष्करास आला. पातशाहाची आज्ञा जाहाली खानदवरास कीं, तुह्मीं जाऊन सादतखानास घेऊन येणें. आज्ञेप्रमाणें घेऊन येऊन पातशाहाची मुलाजमत जाहाली. दरबारांत अवघेच आहेत, तों तह्मास्तकुलीखानाचे फौजेनें सादतखानाची बहीर[1] घेतली, लूट जाहाली, ह्मणून वर्तमान दरबारांत आलें. सादतखानांनीं पातशाहाची आज्ञा घेऊन, स्वार होऊन फौजेकडे गेले. लढाई बहुत जाहाली. सादतखानाची कुली[2] फौज वीस हजार होती. ते पावली नाही. दरबारांत समागमें आले होते. तेच फौज होती. युद्ध बहुत जाहालें. खानदवरांनी कृपाराम नि॥ राजश्री सवाईजी पांच हजार फौज मदत पाठविली. मुजफरखान पाठविले. आजमखान व अलीआमजेदखान कोका असे पाठविले. लढाई एकाची एकानें मदत करून केली. त्यास सादतखानाचा हत्ती फिरला. सादतखानास गोळी लागली. मेले. सवेंच मुजफरखान वगैरे यांसही गोळी लागून मारले गेले. तों खानदवरा जाऊन पोहोंचले. यांसींही लढाई बहुत जाहाली. खानदवरांसही गोळी लागली. तेही मेले. दोघे पुत्र मारले गेले. फौजेस पळ सुटला, तों फौजा पातशाही लष्करांत पोहोंचल्या. कोणी तोंडावर उभा राहिला नाहीं. कुली पळ सुटला. महमदशाहा धरला गेला, आगर मारला गेला, हें अद्याप ठीक (वर्तमान) नाहीं. कृपाराम लढाईतून पातशाही लष्करांत आला. तो लूट होती तेव्हां चाळीस स्वारांनसीं निघाले. फत्तेराम व कृपाराम दोघे भाऊ पस्तीस कोस पळाले. ते कुरुक्षेत्राअलीकडे आले. कुरुक्षेत्रीं अलीकडे साता कोसांवर लढाई जाहाली. कृपारामांनींही वर्तमान लिहिलें. आण हें लिहिलें जे, पातशाहाचा व निजाम कमरदीखान वगैरे तहकीक वर्तमान येतांच लिहून पाठवितों. वार्ता की महमदशाहा धरला गेला. ठीक नाहीं. मागून वर्तमान आलियावर लिहून पाठवितों. राजाधिराजांनीं करोलीचा राजा गोपालसिंगाची बहीण आपण पर्णिली. लग्न माघ वद्य सप्तमीस जाहालें. राजठाणा जागा सवाईजयपुरीहून चार मजला आहे, तेथें लग्नास फौज समेत आले. लग्न जाहालें. तेथें माघ वद्य ७ मीस वर्तमान लिहिलें आलें. कृपाराम

१ बहीर=अघाडीचें सैन्य, बिनी. २ कुली=सर्व मिळून, एकंदर.

दरबारांतूनच लढाईस गेला होता. तो परस्पर पळाला. रा. बाबूराव यांचें वर्तमान लिहिलें नाहीं. आलियावर वर्तमान आलियावर लेहून पाठवूं. पातशाहांनीं व खानदवरांनीं राजेंद्रास बोलाविलें. तेव्हां हे अवघे राजे गेले नाहींत. यांची फत्ते होईल ह्मणून दुश्चित्त होते. ईश्वरें यांचे मनोदयानुरूप जाहलें. हे फौज, पातशाहा मारिले. आतां हे तहमास्तकुली आपण एक होणार, ह्मणून चित्तांत संतोष मानिला. ऐसियास शेख महमद सफी येथें होते. रा. धोंडाजीपंतही आले. एकत्र होऊन राजेंद्रासन्निध आहेत. विचार तो ऐसा जाहला तरी स्वामीनें हे गोष्टीचा विचार करून ल्याहावें. त्याप्रमाणें उभयतां विचार करणें तो करतील. विशेष काय लिहिणें ? कृपा निरंतर असों दिली पाहिजे हे विनंति."

**लेखांक २.** ता. २० फेब्रुवारी इ. स. १७३९.

"पुरवणी. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति. येथील कुशल तागाईत चंद्र २१ जिलकादपर्यंत मुक्काम करनाल लष्कर सार्वभौम स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः–तोहमासकुली फौजेसमेत नमूद होऊन युद्धप्रसंग जालियावर एक जोडी रवाना केली आहे. त्याउपर एक पत्र लिहून जोडी चंद्र १८ जिलकादीं रवाना केली. ते मार्ग न चाले ह्मणून फिरून आली. काल चंद्र २० जिलकादी प्रातःकाळीं पत्रें लिहून जोडी रवाना केली. तेही मार्ग न चाले ह्मणून फिरून आली. त्यास दों दिवशीं पत्रें लिहिलीं. त्यांत सर्व वर्तमान आहे. त्याउपर चंद्र २० जिलकादीं, पातशाहा फौजसुद्धां तयार होऊन, लष्करांतून बाहेर निघून तमाम फौज आपले लष्करासमीप ठेविली. नवाब असफजाहा व नवाब येतमातदौला यांसही फौजेंत ठेविलें; आणि आपण जरोर तख्तावर[1] स्वार जाले. समागमें नवाब गाजदीखां व अजमुल्लाखां वगैरे पांच सात जण मातबर व तीनशें स्वार असें घेऊन तोहमासच्या लष्करास गेले. अगोदर तोहमासचा वजीर पुढें दिढा कोसावर सामोरा येऊन, तसलिमात करून, एक कुराण नजर गुजरानिलें, आणि लष्करासमीप गेले. तेथें तोहमासचा पुत्र समोरा आला. त्याजला भेटून, त्याजला समागमें घेऊन, तोहमासाच्या डेरियास गेले. तेथें उभयतांच्या भेटी जाल्या. परस्परें भाषण जालें. बहुमान जाला. मेजमानी घेतली; आणि स्वार जाले. ते सायंकाळीं लष्करास दाखल जाले. येतमातदौला व असफज्याहा पुढें समोरे जाऊन नजर गुजरानली; डेरादाखल जाले. आजि एकविसावे तेरखेस (तारखेस) तोहमासकुली यांच्या डेरियास

१ तख्त=येथें अंबारी किंवा हौदा असा अर्थ.

येतील. पुढें होईल वर्तमान तें सेवेसी विनंति करूं. प्रस्तुत या प्रकारें रफेदर्फे[1] जाहलें आहे. या प्रसंगांत नवाब असफजाहा सर्व कर्ते आहेत. स्वामींनीं याउपर असफजाहा व येतमातदौला वजीर यांस आमचेविषयीं पत्रें पाठवावीं व गाजदीखानासही पाठवावीं. असफज्याहा यांस आपण हल्लीं पत्रें लिहितील. त्यांत आपले कामकाजाविषयीं ज्या प्रकारें नवाब अमीरलउमराव यांस लिहित होता, त्याप्रमाणें लिहावे. आतां येथें यावांचून दुसरा कोणी नाहीं. असफज्याहा यांस पत्र लिहिजेल त्यांत साखर घालून लिहावें कीं, या हंगामीयांत पातशाहत राहिली नव्हती. आमां सार्वभौमचें नशीब थोर कीं, नवाब या प्रसंगीं होते. पातशाहत राखिली. शुक्र बज्याआणिला[2]. ऐसें कित्येक प्रकारें संतोष वाटेसें लिहावें. कामाकाजाविषयीं बहुत (गोड) भाषेने लिहावे. सेवेसी विदित होय. याउपर इकडे येणें मसलत नाहीं. माळव्यांत राहावें. सेवेसी विदित होय हे विनंति.''

## लेखांक ३.

**श्री.** ता. २३ फेब्रुवारी इ. स. १७१९.

''श्रीमंत सदायशवंत राजश्री पंतप्रधान स्वामीः—

सेवक वेंकाजीराम साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता॥ माघ वद्य एकादशी यथास्थित असे. यानंतर पूर्वीं तह्मास्तकुली सातांस्वारानसीं धरला गेला. ते गोष्ट लटकी जाहली. मागून दुसरें वर्तमान आलें की लाहूर घेतलें. जिकरियाखान धरला गेला. तेव्हां राजेंद्राचे आज्ञेनें लिहिलें. सांप्रत दोन वर्तमानें आलीं. कृपाराम पळोन आला. त्याणें लिहिलें जे, अवघें बुडालें. तेव्हां आज्ञेप्रमाणें लिहिलें. माघ वद्य नवमीस आणखी दिल्लीहून कितीकां लोकांचीं लिहिलीं आलीं. त्यावरून राजेंद्रांनीं शेख महमद शफी व रा० घोंडाजीपंतांस व आह्मांस बोलावून सांगितलें जे, सांप्रत पातशाहाची फत्ते जाली. शाहाजानिया वाजवून डेरियास आले. सादतखान माघ वद्य प्रतिपदा तारीख १४ जिलकादी आला. पातशाहांनीं नवाब खानदवरा आणायासी पाठविलें. येऊन मुलाजमत केली. पातशाहा बहुत मेहेरबान होऊन भाषण करितात, तों समाचार आला कीं बहीर सादतखानाची येत होती, ते तह्मास्तकुलीखानाच्या लोकांनीं लुटी केली. त्यावरून सादतखान, आज्ञेवरून जे फौज समीप दरबारांत होती, तेच घेऊन गेला. तो लढाई पडली. नवाब खानदवरास वर्तमान कळलें. त्यांनी मुजफरखान भाऊ व अली अहमदखान व अजमखान

१ रफेदर्फे=शातता, स्वस्थता, २ शुक्र बज्याआणिला=इमान, नेकी राखिली. (शुक्र ह्मणजे आभार असाही अर्थ आहे.)

व मीरकवडी ऐसे पाठविले. बरोबर कृपाराम समेत फौज पाठविले. सादतखानावर लढाई होती, तों हेही फौज पोंहचतांच लढाई बरी जाली. तों नवाब खानदवरा जाऊन पोंहचले. पहिले फौजेस फार तंग केलें होतें. यांच्या गेलियानें फार लढाई जाली. फौज बहुत मारली गेली. खानदवरानें बहुत शिपाईगिरीची शर्त केली. कुली मोंगलीयांत नामोर्स[1] बहुत जाला. तहमास्तकुलीची फौज मारून काढिली. सात कजलबाश जिवंत धरिले; आणि तहमास्तकुलीची फौज मारिली. तों पातशाहांनीं तयारी करून घोडियावरी स्वार जाले. खानदवरा सादतखानाची मदत केली. आपण चालले. बंहुत तोफखाना व बाणांचा वर्षाव केला. तहमास्तकुलीची फौज पळाली. पातशाहांनीं शाहाजानें वाजविलीं. फत्ते जाली. परंतु सादतखानांची बहीर, डेरे, खजाना लुटला गेला. किरकोळ लोक अलीअहमदखान कोका, अजमखान व मीरकवडी ऐसे मारले गेले. मुजफरखान व खानदवराच्या लेकाची सुवार्ता आहे. सादतखानास कुशीम गोळी लागली. परंतु पोट वांचविलें. वांचला. खानदवराच्या पायास गोळी लागली. तोही वांचला. बहुत खुशवख्ती जाली. सादतखानास पातशाहांनीं आपल्या डेरियांत जागा दिल्ही. जखमा बांधविल्या, आणि डेरे खजाना दिल्हा. तूर्त अवघीयांची खैर जाली. नादरशाहास गोळी लागली; पुत्र मारला गेला; हे वार्ता आहे. त्यांची फौज बहुत मारिली. हें वर्तमान राजेंद्रास लिहिलें आलें, आणि जागाजागां साहुकार वगैरे लिहिलीं आलीं. त्यावरून राजेंद्राचे आज्ञेवरून सेवेसी विनंति लिहिली. अगर हें न जालें असतां त्यांची फत्ते जाली असती, तरी दिल्लीस येऊन पोहोंचलें असतें. चाळीस पन्नासां कोसांची वाट होती. तो प्रसंग तों नाहीं. दिल्लीच्या लोकांची गडबड नाहीं. आणि खबरही दिल्लीहून मातबराची लिहिली असे. यथास्थित आहे. त्यावरून कळों येतें कीं, पातशाहाची फत्ते जाली. तहमास्तकुली माघारा मोड खाऊन गेला. प्रस्तुत तों गेला. इतकियावर जें वर्तमान होईल, तें सिद्धांतच होईल. सेवेसी लिहून पाठवूं. राजेंद्रांनीं करोलीच्या गोपाळसिंगासीं शरीरसंबंध करून, राजठाणियांत आपलें लग्न सप्तमीस करून खंदारगड येथें मुक्काम केला आहे. ऊंटगड पाहून जैपुरास जाणार. राजेंद्र साहित्यास गेले नाहींत. यामुळें चित्तांत शरमिंदगी आहे. तहमास्तकुलीखानाची फत्ते ऐकून चित्त प्रसन्न होतें. मागतीं महमदशाहाची फत्ते जाली. त्यावरून मागतीं चित्त दुस्थित असे. पाहावें कोणास यशश्री देईल. फार करून महमदशाहाची फत्ते आहे. आज्ञेवर लिहिलें वर्तमान येतांच पाठवितों. विशेष काय लिहिणें? कृपा निरंतर असों दिल्ही पाहिजे. जोड्या स्वामीपासीं आलिया आज्ञापत्र दिल्हें पाहिजे, हे विनंति."

१ नामोस=कीर्ति, लौकिक.

## लेखांक ४.

श्री. ता. २८ फेब्रुवारी इ. स. १७३९.

"नक्कल बमोजीब असल पारशी दिल्लीहून काशीरामाचें, महमदसफीचे नांवें पत्र आलें, त्याचा मतालीबः— छ १५ व छ १६ जिलकादीचे जुंजाचें वर्तमान दिल्लीस छ १७ जिलकादीं आलें कीं, सादतखान यांणीं कर्नालचे मुक्कामीं पातशाहाची मुलाजमत केली. त्या वेळेस खबर आली कीं, कजलबाश यांनीं खजाना व बहीर मागाहून येत होती, ती लुटून व बक्षी सादतखानाचा मारिला. त्याजवरी सादतखान यांनीं सार्वभौमाची आज्ञा घेऊन लढाईस चालिले. ते समयीं असफजा यांणीं मना केलें कीं, आजी प्रसंग लढाईचा नाहीं. असें असतां सादतखान यांणीं ते गोष्टी नायकोन लढाईस गेले. पातशाहांनीं आणखी अमीर.......पाठविले. त्यास कजलबाश यांशीं व सादतखान व खानदौरा यांशीं युद्ध तुंबल जालें. कजलबाशांनीं तीन टोळ्या करून यांचे फौजेस जेर केलें. सात आठ हजार माणूस दुतर्फा रणास आलें. त्यास सादतखान जखमी होऊन त्यांनीं हत्तीसमेत पाडाव करून नेले. त्याउपरी ते समयीं हसनखान कोका व मीरदुदी व अल्ली हामीतखानकोका, व राव किरपाराम वकील सवाईजीचा, व खानजमाखान, व निसारमहमदखान-सादतखानाचा पुतण्या, व मीर लालू मीर—मुश्रीफाचा लेक, व मुजफरखान खानदौराचा भाऊ, व बाळकृष्ण अहीर रेवांडीकर व असल अल्लीखान व शहादादखां खेसगी व आकीलबेग कमलपोश व यादगारखा व रतनराय खुशालचंदाचा पुत्र व सीताबराय दुर्गादासाचा पुत्र व जगत्‌सिंग कुवर व खुद खानदौरा बमय दोघे पुत्र, व अल्लीअसकरखां कोका हे सारे युद्धांत कामास आले. दुसरें वर्तमान छ० १८ जिलकादीं दिल्लीस वर्तमान आलें. कमरुदीखानाचें पत्र सांडणीस्वाराबरोबर मजलीसराय दिवाण याचे नांवें आलें कीं, खानदौरा व हसनखान कोका, अली असकरखान कोका प्रहर रात्रीस, जखमी पातशाही लष्करांत येऊन पोहोंचले. याच प्रकारें साहुकारीं लिहिलीं आलीं. राव किरपाराम सवाईचा वकील सत्तावीस राउतांनशीं जयनगराकडे पळोन गेला. महानंद याचे जबानीं वर्तमान कळलें कीं, राधाकृष्ण वकील राणाजीचा व बाबूराव मल्हार हे निजामनमुल्क याचे मिसळींत राहिले आहेत. सादतखान, खानदौरा लढाईस गेले, ते समयीं पातशाहा खुद्द स्वार होत होते. परंतु निजामनमुल्क यांनीं मना केलें कीं, या उभयतांनीं जलदी करून लढाई बिघाडली. आजि खाशांनीं लढाईस स्वार व्हावें

ऐसें नाहीं. ईश्वरइच्छेनें चंद्र २१ जिलकादीं सोमवारीं लढाईस स्वार होऊन फत्ते करूं. त्यावरून स्वारी महकूब केली. कजलबाश[1] यांनीं जुंज मात्र केलें. उभयतांची फौज मोडून घोडीयांस वगैरे लुटीस हात लाविला नाहीं. चंद्र मजकूर २८ वीस रात्रीस कमुरुदिखानाचे घरीं हातरोखा स्त्रीचे नांवें आला कीं, पातशाहाची कांहीं बाकी राहिली नाहीं. पुढें ईश्वरइच्छा! ह्मणून. रुक्क्यांतील[2] वर्तमान रुपयाचा एक शेर अन्न मिळत नाहीं, रसद बंद जाली. काशीद लष्करांतून बाहेर निघों पावत नाहीं, व पाणीही कमीच आहे. लहान थोर वीस हजार माणूस सादतखानचे लष्करचे वगैरे उमरायांचीं पळोन दिल्लीस आलीं. दुसरें वर्तमान, जखमी सादतखानाकडील दिल्लीस आले. ते सांगतात कीं, सादतखानास हत्तीसमेत धरून घेऊन गेले. दों चूं जखमा आहे. त्याचा इलाज करतात, व दहा पंधरा सरदार सांगातें धरले गेले होते, ते त्यांनीं सादतखान याचे ह्मटलीयावरून सोडून दिले. आणि त्यांस ताकिद केली कीं, पादशाही लष्करांत अथवा दिल्लीस न जाणें. हें सांगून राऊत समागमें देऊन बाहेर काढून दिलें. खानजमाखानाचें वर्तमान कीं साहरानपूर प्रांत........ सैदांचे तिकडे पळोन गेला. सैद हसन सैफखान फरुकशर पातशाहाचा मेहुणा लढाईत मेला."

## लेखांक ५.

पै॥ छ० २२ जिल्हेज. **श्री.** ता. ४ मार्च इ. स. १७३९.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक धोंडो गोविंद साष्टांग नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल तागाईत छ० ४ माहे जिल्हेज मुक्काम लष्कर सवाई यथास्थित असे. विशेष:— अंधपुत्रानें अंधपुत्रासारखी समस्त मंडळी बुडविली. येथील आबालवृद्ध विश्वतोमुखीं खानदौरास धन्यधन्य ह्मणताती. आतां नवी सृष्टी जाहाली. तहमासकुली पन्नास साठी—त्यांत त्याचे देशचे—तीस पठाण वगैरे निजामाचे नामर्दीनें त्यांसी मोठें यश आलें. आतां राहिले राजे; त्यांत मातबर सवाईजी; यांचा विचार स्वामींस विदित आहे. यांनीं मुबारकीची अर्जदास्त[3] लिहिली. आपले सलुखाचे विचारांत आहेत. इकडे स्वामींसही बोलाविताती. जैसें बनेल तैसा प्रसंग संपादून घेतील. स्वामींचा प्रताप सर्वांस विदित आहे. तहमासकुलीखानास आपले प्रता-

---

१ कजलबाश=नादिरशाहाचे खास लढाऊ सरदार. २ रुक्का=पत्र. ३ मुबारकीची अर्जदास्त=खुशालीची यादी, आनंदाचें पत्र, अभिनंदनपत्र.

याच्या गोष्टी विदित जाल्या असतील. रोकडी सलाबत तरी त्याची उमदी पडली. स्वामींस माळवीयांत यावें हे मसलतीनिमित्य. मोहरा प्रथम माळवा आहे. यावें [असें] आहे. तहमास भारी आहे. न यावें हेही मसलत आहे. परंतु न येतां पुढें फार जड मसलत होईल. आतां मागतीं तवकल करावी ऐसें प्राप्त जालें. यावें तेव्हां बहुत खबरदारीनें मातबर फौजेनें यावें. तहमासकुलीखान कांहीं देव नाहीं, जे पृथ्वीस कापून काढील. तोही शहाणा आहे. जबरदस्तांसीं सलूक करतील. * * * * * परंतु स्वामीनें पैरवी करून यावें. मागें स्वामींनीं मेहनत करून जें साधलें होतें त्याप्रमाणें मागतीं मेहनत जाली. आतां हा कालपावेतों पैस[1] फार आहे. जो पोक्त विचार करावयाचा तो करून आज्ञापत्र लिहिलें पाहिजे. इकडे आपणही पहातों. कोणी लाग लावाया योग्य असलिया लावूं. राजश्री बाबूराऊजी हुजूर आहेत. तेही चुकणार नाहींत. दिल्लीम दाखल जालियावर त्यांचेंही वर्तमान कळेल. आधीं जबरदस्ती, मग सलूख. येथें चौघेजण आहेत ते आपणांस वाचायानिमित्य आमचा बभ्रा करून दाखवितील. आतां पोक्त विचार करून सर्व साहित्य करावें हे विनंति. पहिले भीडभाड उत्तम आहे. भ्रमाभ्रमीमध्यें काम होऊन येतें. आतां सारे रजपूत व स्वामी एका जागां जालिया कांहीं निकाल पडेल. समस्तांस बुंधेले वगैरे एका जागां करून मोठा भाव दाखविला पाहिजे. फलदाता श्री आहे. ही विनंति."

### लेखांक ६.

**श्री.** ता. ९ मार्च इ. स. १७३९.

"श्रीमंत पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक विश्वासराव दादाजी व गोविंद नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना ऐसीजेः–ता. छ ९ जिल्हेज स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर माघ वद्य द्वितीयेस सावकारीयांत चिठी आली होती कीं, दिलीपती व कुली अमीर करनालेस मोर्चे बांधून बसले असतां, सादतखान याची बहीर येऊन नादरकुलीखान याणें नेली. ते समयीं नवाब सादतखान व खानदौरा यांनीं सडे फौजेनसीं युद्ध मांडिलें. दिल्लीपती, नवाब निजामनमुल्क व कमरदीखान हे एकीकडे उभे राहून पाहत होते. युद्ध तुंबल जाहालें. त्रितीय

१ पैस=मोकळी जागा, मोकळें अंतर असा मूलार्थ येथें अवकाश असा अर्थ.

प्रहरापासून प्रहर रात्रपर्यंत युद्ध जाहालें. निदान सादतखान हस्तगत जाला, वं खानदौरा जखमी होऊन लष्करांत आला. माणसें पांच हजार कामास आलीं. खानदवरेयाचा पुत्र एक मेला. एक पुत्र धरून नेला. भाऊ मेला. ऐसा सत्यानास जाहाला. तदोपर निजामनमुलूक यांनीं जाऊन सलूख केला. दुसरी चिठी मुरारजी........पंडे याची दिल्लीहून दहा दिवसांची आली. .......कमरदीखान यास कैद केलें. ते दिवशीं माघ वद्य १३ त्रयोदशी होती. सादतखान धरून नेला होता, त्यास मीरबक्षगिरी दिली; आण (आणि) पंचवीस हजार स्वारांसमेत दिल्लीस आला. व नादरकुलीखान सालेभारबाग येथें येऊन मुक्काम असे. तृतीयेस दिल्लीस दाखल जाले. दिल्लीहून दोही (द्वाही) नादरशाहाची फिरली. शिक्का व गज व दोही नादरशाची जाहाली. खानदवरा जहर खाऊन मृत्यु पावला. त्याचे पुत्रास नादरशाहांनीं शिरपाव दिला. राजाधिराज स्वामींचा मार्ग लक्षीत आहेत. पुढें इकडे काय वर्तेल पाहावें. लोकांची नजर आणखी प्रकारची होईल. मागून जें वर्तमान येत जाईल तें सेवेसी विनंतिपत्र पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ७.

छ० १२ सफर **श्री.** मार्च इ. स. १७३९.

"श्रीमंत राजेश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति. सांपडले ते धरून आणिले. सवाईनें पुशिलें कीं तुह्मी कोणाचे चाकर आहां. त्यांनीं सांगितलें कीं, निजामाचे बातमीचाकर आहों. तेव्हां कित्येक मारिले. कित्येकांचे नाककान कापून सोडिले. यावरून दिसोन येतें जे, सर्व खेळ निजामाचे आहेत. तर निजामाचा फितूर आहे. तर नादिरशाहा माघारा जात नाहीं. हिंदुराज्यांवर निघेल. जर नादिरशाहानें माघारा कूच करून गेला, तर त्यानें निजामासही फजीत पाडिलेंसें जाहालें. निजामानें खानानें मिळून, नादिरशाहा खानदौरा मारायास आणिला होता. खानदौरा मरतांच महमदशाहा आणून भेटविला. सादतखान द्वाही फिरविण्यास दिल्लीस गेले. परंतु कपट सिद्धीस जात नाहीं. सादतखान तर खानेजंगींत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यु पावले. निजाम वांचले. पण मृत्यूहून विशेष जालें. खेचरावर बसून दरबारास जावें. दक्षणेंत अमल उठला. स्वामींसच यश आलें. ऐसें चहूंकडून निजाम फजीत पावला. आतां विपत्तीनें मरणही पावेल. आणि ऐवजाची पातशाही दिसत नाहीं. गुमानसिंग आले. त्यांनीं जबानीं सांगितलें कीं, रायांचे मनीं राणाजीस दिल्लींत तख्तीं बैसवावें. सबब जे बरकड राजे थोर असल्यासही राऊंस सलाम करणार नाहींत, आणि राणाजी व राजश्री स्वामी



**महमदशाहा.**

( दिल्लीचा बादशाहा. )

एकच आहेत. बद्दल राणाजीस बसवूं. ऐसें गुमानसिंगांनीं जबानीं सांगितलें. त्यावरून राणाजीनें सांगितलें कीं, धनसंपदा जे असे, ते रायाची; आणि सवाई व महाराऊ तरी राणाजीचे खरे खुरे लगामीं लागले. व अभयसिंगाकडेही काल भला माणूस पाठविला. सोभाराम मुनशी दिल्लीपलीकडे गेला. बद्दल त्याचा भाऊ गोकलचंद् अभयसिंगजीकडे रवाना केला. धुंधेले वगैरे तिकडील सरदार स्वामींचे आज्ञेनें येतील. परंतु, मुख्य गोष्ट स्वामींचे आगमनावरी आहे. नर्मदेवरी थोडक्याच दिवसांत वीसपंचवीस हजारांनिशीं स्वामी आले, तरी आवाई लक्षाची पडेल. या प्रांतींची जागोजागचीं ठाणीं बोलाविल्यानें उदंड जमाव होईल. सेवक नित्यनित्य राणाजीस सांगतो कीं, राजश्री राऊ कूच दरकूच येतात. परंतु ऐसें सांगतां सांगतां दोन मास जाले, व हिंदु राजे सर्वत्र सवाई आदीकरून स्वामींचे स्वारीची प्रतीक्षा करितात. स्वामींचें पुष्टिबलें होतांच, जाट वगैरे फौज दिल्लीवरी पाठवून सवाईजी आपणही जाणार, ऐशी तजवीज आहे. परंतु स्वामींची स्वारी रेवातीरीं आल्यावांचून कांहीं होत नाहीं. स्वामींस तों दक्षिणेचा बंदोबस्त पुर्ता जाल्यावांचून येतां नये, ऐसें संकट आहे. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना."

## लेखांक ८.

### श्री

"पुरवणी. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति. तोहमास गारुडाचे खेळ आला आहे. सार्वभौमाची अक्कल ठिकाणीं नाहीं. नवी सृष्टीचा प्रकार दिसतो. ईश्वरइच्छा न कळे. स्वामींहीं याउपरी इकडील यावयाचा प्रसंग न करावा. लक्ष प्रकारें माळवीयांत राहावें. तेंही बहुत सावध बसरंजाम फौज राहावें. प्रसंग येथील मंडळीचा विलक्षण आहे. दृष्टोत्पत्तीस येईल तसे विनंति करूं. हरगीज हरगीजें. याउपरी इकडे येणें जाल्या नेक नाहीं. अमिरलउमराउ प्रस्तुत जखमी. गोष्ट बोलावयाची ताकद् नाहीं; व हलकें पारडें पडलें आहे. आह्मी अन्न राखोन जीव जतन करितों. काजाकामाची गोष्ट आतां बोलणें सलाह नाहीं. अमिरलउमराव वांचतो वा मरतो हें पाहावें! मंडळीचें खेळ कसे होतात हे दृष्टीस पडतील, तशी वर्तणूक करणें लागेल. धोंडोपंतासही चार दिवस निबळ होय तोंपावेतों जयपुरीं राहावें, ह्मणून आह्मीं लिहून पाठविलें आहे. याउपरीही हरगीज हरगीज शफतपूर्वक इकडे यावयाचा प्रसंग न करावा. तिकडे सावधपणें राहावें. नवीन सृष्टी जाहाली. उत्पातास कारण आहे. सेवेसी विदित व्हावें."

---

१ पुष्टिबल=पाठबळ. २ हरगीज हरगीज=अवश्य, अवश्य; निःसंशय, निःसंशय.

## लेखांक ९.

सैवस्ती चंद्र १२ सफर                श्री.           ता. ३० एप्रील इ. स. १७३९.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक सदाशिव बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल वैशाख शुद्ध चतुर्थी मुक्काम उदेपूर स्वामींचे कृपादृष्टीकरून यथास्थित असे. विशेषः-काल रविवारीं वर्तमान लिहिल्यावर, आज दिलीहून राणाजीचे वकिलाचें पत्र आलें. चैत्र वद्य ८ शुक्रवारचें. त्यामध्यें मजकूरः कित्येक खजाना अगोदर गेला. त्याबराबरी बाजारबुणगे गेले. राहिले लोक दिल्लीचे किल्ल्यांतील, नादरशाहाच्या समागमेचे, सादतखानाचे हवेलींत येऊन राहिले. सिलेमगडांत खजाना जुना कितेक युगांचा राहिला होता. सोनें व सोन्याच्या मूर्ति व मोहरा अनंत निघाल्या. त्यास, त्यांची जाती घडून, एका एका खेचरावर दोन दोन जाती घालून खजाना रवाना केला. उर्द बाजारांत दोन तीन हवेली खोदल्या. त्यास, एका हवेलींत मोहरा निघाल्या. बद्दल तमाम हवेली पाडून खणितात. निजाम कमरुद्दिखानांस कांहीं फर्म नाहीं. आजिमुल्लाखान, सरबुलंदखान कार्य करीतात. पहाडगंज वगैरे कोठीबाहेरील तहसीलें[1] अजिमुल्लाखान तहसील करितो. जुनी दिल्ली वगैरे सरबुलदखान तहसील करितो. यमुनापार शहरचे लोकांवर पंचवीस करोड पट्टी केली होती. त्यास, लोक फार मेले आणि मरतात. परंतु तेथें खजाना जमा न जाला; आणि नादरशाहाचें कूच चंद्र २७ मोहरमचें मुकरर जालें. त्यास महमदशाहास सांगितलें की, तुह्मीं पातशाही करणें. महमदशाहांनीं उत्तर दिलें की, निजाम कमरुद्दिन येथें राहिले तर माझ्यानें पातशाही होणार नाहीं. त्यास नादिरशाहानें समागमे न्यावयाचा निश्चय केला कीं, समागमें घेऊन जाईन. राजाधिराज सवाईचे वकील मुलुकचंद याचे कागदपत्र सांपडलेबद्दल त्यास जयसिंगपुरीयांत धरावयास माणसें पाठविलीं. तो पळून गेला. चार घोडे व साजसामान कुल लुटून नेलें. दतिया वोडसें वगैरे वकील कैदेंतच आहेत. चैत्र वद्य ४ चे दिवशीं यमुनापारची चौकी नादरशाहाची उठून आली. आतां जावयाची सक्त बहुत आहे. सफरचा महिना रबिलावलचा बारा व तेरा रोजी मुहूर्त नाहीं. बद्दल चंद्र २७ चें कूच आहे. दाहा रोजांचें वर्तमान आलें तें सेवेसी श्रुत व्हावें, बद्दल आजुर(दार) जोडी पाठविली असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."



१ तहसील=मामलत; अमलदारी.

# ५. दुसरा सत्याश्रय पुलिकेशिन्

याचा

## शक ५३२ ला एक ताम्रपट.

१ हा ताम्रपट श्रीमंत मिरजकरांच्या मोडलिंब गांवी एका घराच्या जमीनींत तेथील मामलेदार यांस सांपडला.

२ त्याचे तीन पत्रे आहेत. ते कडीत बसविले असून, कडीवर **चलुक्यांची** वराहाची मोहर आहे. प्रत्येक पत्र्याची लांबी ६ इंच, रुंदी ३। ईंच व जाडी $\frac{१}{१६}$ इंच आहे.

३ अक्षरें **चलुक्यांच्या** इतर ताम्रपटांप्रमाणें आहेत.

४ ताम्रपटांत **चालुक्य** अशी अक्षरवटी न येतां, **चलुक्य** अशी अक्षरवटी आलेली आहे.

५ तीन पत्र्यांच्या एकंदर सहा बाजूंपैकी पहिल्या व तिसऱ्या पत्र्याच्या पाटी कोऱ्या आहेत. बाकी राहिलेल्या चार बाजूंवर लेख कोरलेला आहे अक्षरें स्पष्ट व खोल कोरलेली असून, दोन तीन स्थली फुटून व कपरे निघून गेल्यामुळें अस्पष्ट झालीं आहेत. प्रत्येक बाजूवर चार प्रमाणे एकंदर ओळी सोळा आहेत.

६ भाषा संस्कृत आहे व पुष्कळ ठिकाणी अशुद्ध आहे.

७ क्वचित् प्राकृत उच्चार आले आहेत. आकाराचे कान्हे पुष्कळ स्थली कोरावयाचे आहेत.

८ लेख **दुसरा सत्याश्रय पुलिकेशिन् चलुक्य** याच्या वेळचा आहे. लेखांत वर्षोल्लेख केलेला नाही; नुसत्या महिन्याचा व तिथीचा उल्लेख केला आहे. महिना वैशाख व तीथ पौर्णिमा दिली आहे. **दुसऱ्या सत्याश्रय पुलिकेशिन्** याच्या नांवाचाहि उल्लेख केलेला नाही व त्याची बिरुदावलीहि दिलेली नाही. फक्त "**कीर्तिवर्मणः पुत्रः**" व "**हिरण्यगर्भस्याश्वमेधयाजिनपौत्रः**" असा निर्देश आहे. **हिरण्यगर्भ** व **अश्वमेध** यज्ञ करणारा राजा असा निर्देश **पहिला सत्याश्रय रणविक्रमपुलिकेशिन्** याचा आहे, हें उघड आहे. **पहिला पुलिकेशिन्** याचा मुलगा **कीर्त्तिवर्मन्**. तेव्हां, **हिरण्यगर्भ** व **अश्वमेध** यज्ञ करणाऱ्या **पहिल्या पुलिकेशिन्**चा नातू व **कीर्त्तिवर्मन्**चा मुलगा **दुसरा सत्याश्रय पुलिकेशिन्** होय, हें स्पष्ट आहे. ह्या **दुसऱ्या सत्याश्रय पुलिकेशिन्नें** वैशाख पूर्णिमेला हें ताम्रपट दिलें. कोणत्या वर्षाच्या वैशाख पूर्णिमेला दानपात्र दिलें त्याचा उल्लेख नाहीं. **दुसरा सत्याश्रय पुलिकेशन्** शक ५३२ पासून सरासरी शक ५६४ पर्यंत राज्य करीत होता. ह्या बत्तीस वर्षांतल्या कोणत्या तरी वैशाख पूर्णिमेला हे दानपत्र दिलेलें आहे. दानपत्रें प्रायः कोणत्या तरी पर्वणीला—ग्रहण वगैरे—दि-

लेलीं असतात. तेव्हा शक ५३२ पासून शक ५६४ पर्यंतच्या कोणकोणत्या तरी वर्षाच्या वैशाख पूर्णिमेला ग्रहणादि कांहीं पर्व असतां, हें दानपत्र दिलेलें असावें. पैकीं नक्की वर्ष कोणतें असेल तें ठरविण्याला एक साधन आहे. दान देणाऱ्या राजानें आपलें नांव न देतां, अमक्याचा नातू व अमक्याचा मुलगा अशा पद्धतीनें आपला उल्लेख केला आहे. आपण सिंहासनाधिष्ठित महाराजा आहों, असेंहि ह्मटलें नाहीं. तेव्हां **सत्याश्रय पुलिकेशिन् महाराज** ही पदवी राज्याभिषेक होऊन घेण्याच्या पूर्वी हें ताम्रपत्र तयार झालेलें आहे, हें उघड आहे. तसेंच, "**स्वबाहुबलविक्रमोपात्तराज्यः**" ह्या पदावरून प्रस्तुत ताम्रपत्र देण्याच्या पूर्वी दान देणाऱ्याला राज्य प्राप्त झालें होतें, परंतु राज्याभिषेक होऊन 'महाराज' व 'सत्याश्रय' वगैरे बिरुदें मिळावयाचीं राहिलीं होतीं. **दुसरा सत्याश्रय पुलिकेशिन्** याचा राज्याभिषेक शक ५३२ च्या भाद्रपदानंतर थोड्याच महिन्यांनीं झाला. तेव्हां, प्रस्तुत ताम्रपत्र शक ५३२ च्या भाद्रपदापूर्वीचें आहे. तसेंच प्रस्तुत ताम्रपटांत "**अनेकनृपतिपरमेश्वरः**" हें विशेषण **दुसऱ्या सत्याश्रय** पुलिकेशन् याला लावलें आहे. **मंगलेश चलुक्य** सुमारें शक ५३० त वारला. तदनंतर **दुसऱ्या सत्याश्रय पुलिकेशिननें** उत्तरहिंदुस्थानांतील सम्राट् जो **हर्षवर्धन** त्याचा पराभव करून **परमेश्वर** ही पदवी मिळविली. सबब, ही पदवी मिळविल्यानंतर प्रस्तुत ताम्रपट कोरलेला असल्यामुळें, प्रस्तुत ताम्रपटांतील वैशाख पूर्णिमा शक ५३२ तील किंवा शक ५३१ तील असेल, असें ह्मणणें प्राप्त होतें. पैकीं शक ५३१ तील वैशाख पौर्णिमेला कोणतेंहि ग्रहणादि पर्व नाहीं. परंतु शक ५३२ तील वैशाख पौर्णिमेला प्रातःकालीं चंद्रग्रहण आहे. अर्थात्, प्रस्तुत ताम्रपट शक ५३२ च्या वैशाख शुद्ध १५ ला काढलें, ह्यांत संशय नाहीं. त्या वेळीं **दुसरा सत्याश्रय पुलिकेशन्** ह्याचा राज्याभिषेक झाला नव्हता.

९ कडीवरील मुद्रेंत रीतीप्रमाणें जो वराह कोरला आहे तो स्पष्ट आहे. एक दाढ पुढें आलेली नामी दिसते.

**वि. का. राजवाडे.**

## ताम्रपट.

### पत्रा १ बाजू २

पंक्ति.

१ स्वस्ति जयति जलदवृ[1]न्दश्यामनि[2]लोत्पलाभः स्फु[3]-

२ रदुरुमणिरत्नस्रक्समाविद्धकण्ठः जलधर इ-

३ व विद्युद्भ्रन्तमध्यैकदेशो धरणिधरनिरोधास्खिन्न-

४ वक्त्रो वराहः[4] ॥ श्रीस्वमिमर्हसेनपादनुध्यातानां मैनव्य-

१ वृ २ नी ३ स्फु ४ ? ५ स्खि ६ ह: ७ स्वा ८ हा ९ दा १० मा

## पत्रा २ बाजू १

५ स[1]गोत्रणां [2]ह[3]रीतीपुत्राणां अग्निष्टोमाग्निचयनर्वे–
६ जपेयपौण्ड[4]रिकबहुसुवर्ण्णाश्वमेधावभृथस्नां–
७ नपवित्रीकृतशिरसां चलु[6]क्यानां [7]वंशं संभूतः च–
८ [8]लुक्यव्वं[9]शांबरपूर्ण्णचन्द्रं[10] अपरिमितविक्रमोपात्तविपु–

## पत्रा २ बाजू २

९ [11]लैयशो[12]वंतः तस्य कीर्त्तिवर्मणः पुत्रः हिरण्यगर्भस्याश्वमे–
१० [13]धौयाजिनः पौत्रः स्वबाहुबलविक्रमोपात्तराज्य अने–
११ कनृपतिपरमेश्वरः वै[14]षांखपौर्ण्णमास्यां[15] तथा कै[16]थमने
१२ देवगण[17]स्वमिणे[18] काश्यपसगोत्री[19]णांः तियरे[20]ग्रैमे
१३ ([21]वा) सिणां [22]तथो उदक[23]पूर्व्वसंभोगः बहु[24]भिर्व्वसुधा भुक्ता रा–
१४ [25]जन्नै [26]सगरादिभि यस्य यस्य यदा भूमिः तस्य त–

---

१ त्रा. २।३ इतर ताम्रपटांत व शिलालेखांत **हारिती** अशी अक्षरवटिका येते; परंतु, येथें **हरीती** अशी वटिका आहे. ४ वा. ५ इतरत्र **री** येते; येथें ऱ्हस्व रि आहे. ६ येथें व पुढें **चलुक्य** असा ऱ्हस्व चकारी पाठ आहे व शक ५३२ तील लेखांत तोच युक्त आहे ( fleet ). ७ 'व' वरचा अनुस्वार 'श' वर काढला आहे. ८ व्व द्वित्त निरर्थक काढला आहे. 'व्व' वरच अनुस्वार आहे. ९ 'शा' वरील अनुस्वार 'ब' वर कोरला आहे. १० द्र. ११ **ल** नवव्या व दहाव्या ओळीच्या मध्यें कोरला आहे. १२ संस्कृत 'यशस्विनः' बद्दल प्राकृत किंवा मराठी 'यशोवंत' असें रूप योजिलें आहे, व त्याला संस्कृत षष्ठीचा अस् प्रत्यय लावला आहे. 'व' वरचा अनुस्वार 'त' बर कोरला आहे. हा 'व' वरचा अनुस्वार वस्तुतः न् असल्यामुळें ता' वर ह्मणजे 'त' च्या अगोदर अनुस्वाराचें टिंब काढावें, अशी भावना कोरणाऱ्याला झाली. परंतु, इतरत्र ह्याच ताम्रपटांत हा कोरणारा नूकाराचें टिंब अलीकडल्या अक्षरावर कोरतो. १३ ध. १४ 'शा' बद्दल 'षा' कोरला आहे. १५ स्यां. १६ 'कैथमन्' शब्दाचें चतुर्थीचें एकवचन. कैथमन् चा अर्थ काय? १७ स्वा. स्वामिन् शब्द सहाव्या शतकांत ब्राह्मणाच्या नांवापुढें हमेश येतो ( भांडारकर ). १८ 'ने' बद्दल 'णे' देवगण, शंकरगण, असे गणयुक्त व्यक्तिनामवाचक शब्दहि ह्या काळाचे द्योतक आहेत. १९ 'स्वामिणे' ह्या एकवचनाशीं °गोत्राणां' व °वासिणां हीं अनेकवचनें जोडिलीं आहेत. २० ग्रा तियरे ह्मणजे तिवरे घाटावरील तिवरें गांव तर नसेल? परंतु, इतर द्योतकांच्या अभावीं निश्चय कोणताच होत नाहीं. २१ हें अक्षर कोरावयाचें राहिलें आहे. नां बद्दल णां. २२ 'थो' कोरावयाचा होता. परंतु ओकाराचें चिन्ह करून आकाराचा फांटा कोरावयाचा सोडला आहे. २३ द्वित्त व. २४ द्वित्त व. २५ न्यैः. २६ भिः.

१५ स्य तदा फलं स्वदत्तां पारदत्तां[3] वां यो हरेतें[3] वसुन्धरां[4]
१६ शष्टिवरिर्षसाहस्त्रांणि[5][6] विष्टार्या जायते क्रिमि ॥ ....[10]

## ६. वांई क्षेत्रांतील देवळें.

कृष्णातीरीं वांई क्षेत्रांत जाऊन जो कोणी पाहील, त्याच्या मनांत प्रथमदर्शनीं तेथील देवळें ठळकपणें भरल्यावांचून राहणार नाहींत. हीं देवळें वांईचे जहागीरदार रास्ते यांच्या वंशांतील पुरुषांनीं बांधिलीं आहेत. तीं कोणीं बांधिलीं व कधीं बांधिलीं आणि त्यांस खर्च किती लागला, ह्याबद्दलची माहिती मिळाली ती खालीं दिली आहेः–

| कोणत्या देवाचें देऊळ. | बांधणाराचें नांव. | कधीं बांधिलें तो शक. | खर्च किती लागला ते रु. |
|---|---|---|---|
| १ श्रीकाशीविश्वेश्वर. | गणपतराव भिकाजी रास्ते. | १६८३ | १५०००० |
| २ श्रीगणपती. | ,, | १६८४ | १५०००० |
| ३ श्रीगंगारामेश्वर. | गंगाधरराव भिकाजी रास्ते. | १६८७ | ४००३७ |
| ४ श्रीभवानी. | आनंदराव भिकाजी. | १६९० | ८६० |
| ५ श्रीमहाविष्णु. | आनंदराव भिकाजी रास्ते. | १६९४ | २१६२१५ |
| ६ श्रीमहालक्ष्मी. | आनंदराव भिकाजी रास्ते. | १६९६ | २७५६३० |
| ७ श्रीरामचंद्रजी. | रामचंद्रराव भिकाजी रास्ते. | १६९८ | १०२४५ |
| ८ श्रीउमामहेश्वरपंचायतन. | गंगाधरराव भिकाजी रास्ते. | १७०४ | ६०००० |
| ९ श्रीबहिरवदेव. | ,, | १७०५ | १००० |
| १० श्रीसटवाई. | ,, | १७०६ | ३६० |
| | | | ९०४३४७ |

**कृ. वि. आचार्य.**

१ प. २ 'त्ता' वरचा अनुस्वार 'वा' वर कोरला आहे. ३ हरेतबद्दल हरेते. ४ न्ध. ५ 'रि' कोरल्यावर, 'वरिष' रूप प्राकृत आहे, असें लक्ष्यांत येऊन, 'ष' वर रेफ काढला. परंतु 'रि' खोडून काढिली नाहीं. संस्कृत 'वर्ष' रूप योजिलें काय किंवा प्राकृत 'वरिष' रूप योजिलें काय, अर्थ एकच, असें कोरणारानें समाधान करून घेतलें, व आपण प्राकृत भाषा बोलणारे आहों, हें भावी शोधकांना समजण्याचा मार्ग करून दिला. ६ स. ७ त्रा. ८ अनुस्वार कोरावयाचा राहिला. ९ प्राकृत रूप. विसर्ग कोरायाचा राहिला. १० ह्या चार टिंबांच्या पुढें दोन तीन अक्षरें संख्यावाचक कोरलीं होतीं. परंतु, कपरे निघून तीं गहाळ झालेलीं दिसतात.

साहेबांजवळ गेले. राजारामपंतांनीं खलिता, व जवाहीर, व पोषाक, व पांच घोडे भोंसल्यांकडून, व भवानीपंताचें पत्र, व आपण पांच मोहरा बडेसाहेबांस नजर दिधली. बडेसाहेब त्यांस भेटून अत्तरपान देऊन एकांत केली. राजारामपंतांनीं करारनामा क्रियापूर्वक जे आणिले होते व बडेसाहेबांनीं आपलेकडून करारनामा दस्तखत करून, परस्परें देऊन, पक्की दोस्ती केली. पांच दिवसांनंतर बडेसाहेबांनीं वीस लक्ष रुपये नगद व दोन हजार बेगारी कहार व पांचशें तैलंग शिपाई देविले. बेनीराम व राजारामपंतांनीं आपलें पत्र व दोनशें माणसें देऊन भोंसल्यांजवळ चंद्र ४ रबिलाखरेस रवाना केलें. दाहा बारा दिवसपावेतों बडेसाहेबांची व राजारामपंत व बेनीराम यांची बहुत दोस्ती व गोडी जाली. कोणी कोणी ह्मणतात कीं, राजारामपंतांनीं भोंसल्यांकडून पांच हजार स्वारांची बोली केली. बडेसाहेबांनीं समय जाणून, पांच हजार स्वारांचा दोन लक्ष रुपये दरमाहा करार करून, पंजेमाहा[1] पेशगी देविला; व ताकीद केली कीं, तुह्मीं करनेल पियासची मदतेस लौकर जावें. चंद्र १५ रबिलाखर बैशाख वद्य २ द्वितीया बडेसाहेबांनीं सरपेंच व जेगा जवाहर व मोत्यांचा कंठा व चौकडा व पोषाक व हत्ती येकून ऐवज पंचवीस हजार रुपयांचा ऐवज व नगद वीस हजार रुपये राजारामपंतांस देऊन रवाना केलें; व विश्वंभरपंतांसही बरोबर दिधलें कीं, सत्वर लष्करास जाऊन भोंसल्यांचें कूच दक्षिणेस होय तें करणें. बडेसाहेबांनीं आजपावेतों भोंसल्यांस सरकारची दुशमानीमुळें आपली जागा बहुत लाचार व पेशैमान[2] होऊन, चाळीस लक्ष रुपये नगद व दाहा लक्ष रुपये जवाहीर, व हत्ती, वगैरे तोफा विलायती, एकूण पन्नास लक्ष रुपयांचा ऐवज दिधलें. आगर सरकारची फौज हे प्रांतीं येऊन हंगामा (करती), तर बडेसाहेब खातरखाह मामला होऊन सलाह करते. चिमणाजी भोंसले बलेसर बंदराहून कूच करून कटकास गेले. पुढें पाहावें दक्षिणेस जातात कीं नाहीं? चंद्र ३ जमादिलावलेस खबर आली कीं, राजश्री महादजीराव शिंदे यांनीं करनेल कमकमेजर—जो गोहदेहून सिरोंज भेलसेपावेतों सरकारचे मुलकांत अमल केला होता—त्याचें पारिपत्य केलें. करनेल मजकूर चाळीस कोस मागें पळाले. सिपरी कोलारसवर संगर करून आहे. शिंदे यांनीं चहूंकडून घेरून रसद बंद केली. तोफखान्याची लढाई दररोज होती. त्याजउपरीं चंद्र २० माहे मजकुरीं खबर आली कीं, महादजीराव शिंदे यांजवळ लक्ष स्वार, तोफखाना बहुत जबदरस्त आहे. दाऊद बेगमखान नवाब नजफखानाकडील सरदार जो ... आला, त्यांनीं ... करनेलमजकुराशीं लढाई केली. दाहा तोफा व आकरा आंग्रेज हस्तगत करून चार पांच पलटणें गारत केल्या. करनेल नरवर प्रांतीं पळून आला. महादजीराव शिंदे खानमुशारनलेस साहा पारचेचा[3] खिलात व सरपेंच व जवाहीर व मोत्यांचा कंठा व एक हत्ती इनाम दिधले. बडेसाहेबांनीं ही खबर ऐकून बहुत फिकीरमंद[4] जाले. पंधरा दिवसपावेतों दरबार केला नाहीं. बेनीरामपंतांनीं भोंसल्यांचा खलिता व भवानीपंताचें पत्र

१ पंजमाहा=पांच महिन्यांचा आकार. २ पेशमान=कष्टी, दिलगीर. ३ पारचा=परचा=वस्त्र. ४ फिकीरमंद=चिंताक्रांत.

बडेसाहेबांस देऊन सांगितलें कीं, भोंसल्यांनीं एक सरदार पांच हजार स्वारांनिशीं करनेल पियासच्या मदतीस मदराजाकडे रवाना केले. मदराजाकडील खबर आली कीं, हैदरनाईक यांजकडील सरदार मातबर फौजांनसीं मछलीबंदर प्रांतीं येऊन करनेलमजकुरास पुढें जाऊं दिधलें नाहीं. करनेलचे लष्करांत मरी[1] पडली. दोन चार हजार माणसें सहजच मेले; व दाण्याची महर्गता याजमुळें बहुत पैरेशानींत[2] आहे. भोंसल्यांचे लष्करांतही मरी पडली. वैशाखमासीं कलकत्त्यांत मरीचा जोर बहुतच जाला. पंधरा वीस हजार माणसें सहज प्रकारें मेले. परंतु आतां स्वस्थ आहे. बडे-साहेबांनीं बहुत विचार करून, आपण हिंदुस्तानाकडे जावें व राजे चेतसिंग व नवाब वजीर, आणिक लहान थोर सरदार हे बरोबर घेऊन, शिंदे यांस बहुत भीड दाखवावी. [ह्मणून] तीनशें नांव किरोयेची[3] केली. आषाढचे शेवटीं निघावें, नेम केले आहेत. पुढें जैसें होईल तैसी विनंति करूं. सेवकाबरोबर स्वामींनीं दोन हजार रुपये वर्षाचा खर्च नेमून दिधला, त्यास चार वर्षांमध्यें दोन हजार रुपये सरकारांतून पावले! खर्चाची तसदी बहुत. या परदेशांत सेवक, व चिरंजीव चिमणलाल चरणाजवळ. या उभयतांचें पालन करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ५.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. वॉरन हेस्टिंग्ज कलकत्त्याहून बनारस येथें ता. १३ आगष्ट इ. स. १७८१ रोजीं आला. तेथें त्याची व काशीच्या चेतसिंग राजाची लढाई होऊन त्यास चुनारगडास पळून जावें लागलें. तो सर्व वृत्तांत व त्यापुढील राजकीय गोष्टींचा उल्लेख ह्या पत्रांत आहे.

पै॥ चंद्र २७ सफर इसन्ने समा० **श्रीरामचंद्रो जयति.** तारीख ६ जानेवारी १७८२.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज लाला सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत माघ कृष्ण सप्तमी ७ रविवार चंद्र २१ मोहरम जाणून स्वकुशलार्थ लिहून सेवकास सरफराज करीत असावें. विशेषः—पूर्वीं विनंतिपत्र कलकत्त्याहून आषाढ वद्य पंचमी चंद्र १७ रजबेस सेवेसी पाठविलें होतें, त्याजवरून विदित जालेंच असेल. चंद्र २० रजबेस बडेसाहेबांनीं आह्मांस बोलिलें कीं, 'तुह्मीं कांहीं सालजाब करीत नाहीं, उगेच बसावें, सार्थक काय?' आह्मी बोलिलों कीं, 'श्रीमंतांनीं, पांच सहा वर्षें जालीं, आह्मांस सालजाबामुळें आपल्या जवळ पाठविलें व पत्रेंही बारंवार लिहिलीं, परंतु आपण दोन्हीं करारनामे व श्रीमंतांचे लिहिण्यावर नजर देऊन आजपावेतों फडचा केला नाहीं व उलटी वर्तणूक जाली. आह्मीं काय सालजाब करावा?' एक घडी-पावेतों स्तब्ध राहून बोलिलें कीं, 'आमचे पांच सा करोर रुपये खर्च जाले, हें तुह्मांस

१ मरी=मरकी (Epidemic disease). २ परेशानी=संकट, विपत्ति. ३ किराया=भाडें.

मालूम आहे कीं नाहीं?' आह्मी बोलिलों कीं, 'आमचे पंचवीस करोर रुपये खर्च व पन्नास करोर रुपये मुलकाची नुकसान जाली!' हें ऐकून कांहीं न बोलतां, तेच दिवशीं स्वार नावेवर होऊन काशीस चालले. चंद्र २३ माहे साबान श्रावण वद्य १० दशमीस पहुचून (पोहोंचून) राजे चेतसिंग यांसीं बेमानी केली. ईश्वरइच्छेनें तात्काल बहुत दुर्देशा पाहून, चिनाडगडास सात कोसपावेतों रात्रींचे समयीं पायांनीं पळून गेले. बेनीरामपंत भोंसल्यांचे वकील व विश्वंभरपंत बरोबर होते.* हें वर्तमान राजश्री बाजीपंत कातरडे व गणपतराव बल्लाळ यांनीं सविस्तर सेवेसी लिहिलेंच आहेत. राजे चेतसिंगांनीं तीन शत गोरे आंग्रेज व एक पलटण तैलंगी मारून बडेसाहेबांस चिनाडगडांत बहुत तंग केले, व सारे मुलकांत फितुर झाले. परंतु नवाब वजीर–जो याची रीत सारे मुलखांत व्यख्यात आहे–यांनीं पांच हजार स्वार व सात पलटणें घेऊन बडेसाहेबांची मदतेस येऊन जीव वांचविले. चेतसिंग आपली जागां घाबरे होऊन, पन्नास हत्ती, दोन शत उष्ट्र, मोहरा व रुपये, भरून निघून गेले. पांच हजार स्वार व पियादे बरोबर आहेत. एक वकील श्रीमंतांचे सेवेसी व दोन वकील महादजी शिंदे व अहिल्याबाईजवळ पाठविले आहेत. मिरजा खलिल-नवाब नजफखानाचे वकील येऊन बडेसाहेबांसी भेटले. दोन शत स्वार व पांच शत पियादे बरोबर आहेत. बडेसाहेबांस पोषाक व जवाहीर व पांच रास घोडे व खलिता देऊन बोलिले कीं, 'आपण पातशाहास तीस लक्ष रुपये सालीयाना देत होते. आज अकरा वर्षें जालीं, देत नाहीं. याजमुळें पातशाहा बहुत खप्पा आहेत.' बडेसाहेब बोलले, 'आह्मांस दक्षिणची मोहीम सात वर्षें लागलीं. आह्मी पांच करोर रुपयेंचे कर्जदार जालों. रुपये कोठें [आहेत?] नवाबास खलिता लिहितो कीं आपण अकबराबादेस यावें. आह्मी इटावास येतों. भेट जाल्यानंतर जें बोलावयाचें आहे तें बोललें जाईल.' तात्पर्य हाच कीं, पंचवीस तीस लक्ष रुपये देऊन नवाबास आपला रफीक करून सरकारचे मुलकांत दंगा करावा. वकिलास हाच जाबसालाकरितां ठेविले आहेत. मिस्तर इंद्रसेनसाहेब मातबर आंग्रेज यांस बडेसाहेबांनीं आपला हत्ती व पालखी स्वारीची व पांचशें तैलंग देऊन इटाव्यास रवाना केलें. खबर आली कीं, चंद्र २७ जिल्हेज पौष कृष्ण त्रयोदशीस राजे चेत-

* बेनीरामपंत व विश्वंभरपंत हें नागपूरकर भोंसल्यांकडील वकीलद्वय बडेसाहेबांच्या फार मेहेरबानींत होतें. हे त्यांच्या बरोबरच काशीस आले होते. त्यांनीं काशीच्या दंगलींत वॉरन हेस्टिंग्ज ह्यांजबरोबर हजर राहून त्यांस मदत केली होती. ह्याचा उल्लेख इंग्रजी ग्रंथांतून आढळतो:—

"With him went also Beniram Pundit, the Vakil or diplomatic agent of the Berar Rajah, who had accompanied him from Calcutta for the purposes of the expected interview with the Dewan Dewagar Pundit. Beniram and his brother, Bissumber Pundit, leaving their family in Benares to the mercy of Chaitsing insisted on sharing the Governor-General's flight attended only by a single servant."—*Letters of Warren Hastings.* Page 130.

सिंग महादजी शिंदे जवळ गेले. शियांनीं आपला दिवाण तीन कोस पुढें पाठवून बहुत सन्मानें करून भेटविलें; व कुशलार्थ पुसून हत्ती व घोडे व पोशाक व जवाहीर देऊन लष्कराजवळ राहविलें व बहुत दिलसाव तसलीम केली. बडेसाहेबांनीं हे खबर ऐकून इंद्रसेनसाहेबांस लिहिलें कीं, तुह्मीं शिंदे यांसी भेटावें. त्याजवरून चंद्र १४ माहे मोहरमेस खबर आली की, साहेबमजकूर इटावाहून कूच करून चंद्र ७ मोहरमेस महादजी शिंदे यांस जाऊन भेटले. बडेसाहेबांनीं बेनीरामपंतास एक लक्ष रुपये इनाम देऊन पंचवीस हजार रुपयांची जागीर दिधली;* व विश्वंभरपंत-बेनीरामचे बंधू यांस पन्नास हजार रुपये खर्च देऊन नागपुरास भोंसल्याजवळ रवाना केलें की, भोंसल्यांची मारफत श्रीमंतांसीं सल्ला करावें. अगर खातरखाह झाली तर उत्तम. नाहीं तर भोंसल्यास आपले शरीक करून हंगामा करावा. परतु आंग्रेजांचे कौलकरार सर्व......आहे. वरद्वानचा राजा व राणी भवानी मकसुदाबादची-जे बावन्न लक्ष रुपये हरएक आंग्रेजास देतात, आणिक पटन्याकडील जमीदार सरकारची फौजांची वाट पाहातात. आह्मांसीं बहुतानें अनुसंधान लाविलें होतें, परंतु कांहीं दृष्टीं पडलें नाहीं. बेनीरामामुळें बडेसाहेबांनीं इतके अभिमान धरिले. मशारनिल्हेंनीं आह्मांविषयीं बडेसाहेबांस लबाडी बहुत सांगितली, याजमुळें कांहीं बोलत नाहीं. हैदरनाईकाकडील बहुत तान (ण) बसले. मदराजचा किल्ला हैदरनाईकांनी घेतला असे लोक बोलतात. विश्वंभरपंताबरोबर करनेल चापमान नागपुरासी पाठविले आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ६.

हें पत्र लेखांक ५ ची पुरवणी आहे. लाला सेवकराम हा, बडेसाहेब ह्मणजे वॉरन हेस्टिंग्ज हे कलकत्त्याहून काशीस जाण्याकरितां निघाल्यानंतर, त्यांच्या मागोमाग ता. १९ जुलई इ. स. १७८१ रोजीं नावेंतून निघाला. त्या वेळचें त्यानें स्वतःच्या प्रवासाचें वगैरे वृत्त ह्या पत्रांत दिलें आहे. त्यानें काशी येथें ता. १९ दिसेंबर इ. स. १७८१ रोजीं बडेसाहेबांची भेट घेतली. त्यानंतर काशी येथें स्वस्थता होऊन लवकरच बडेसाहेब कलकत्त्यास गेले. ह्या पत्रामध्यें नागपुरकर

---

* वॉरन हेस्टिंग्ज ह्यानें बेनीरामपंतास जहागीर दिल्याची गोष्ट खरी आहे. त्याने ता. १५ सप्टेंबर इ. स. १७८१ च्या पत्रांत आपल्या बायकोस लिहिलें आहे कीः—

"Beneram Pundit and his brother have shown an uncommon attachment to me. You will like them for it."

ह्या कृपेंतल्या वकीलांस त्यांजकडून गाझीपूर परगण्यांतील बन्हियाबाद हा गाव जहागीर मिळाला होता. विश्वंभर पंडिताच्या बायकोचा व वॉरन हेस्टिंग्जच्या बायकोचाही परिचय होता. इ. स. १८२० मध्ये तिने, वॉरन हेस्टिंग्जच्या बायकोच्या मार्फत, हा जप्त झालेला गाव परत मिळविण्याची इंग्लंडांत खटपट केल्याचें दिसून येते.

मुधोजी भोंसले यांचे दिवाण दिवाकर पंडित यांची व वॅारन हेस्टिंग्ज यांची ता. २९ दिसेंबर इ.स. १७८१ रोजीं काशी येथें, नावेमध्यें भेट झाल्याचा उल्लेख आहे. ग्रांटडफसाहेबांनीं, दिवाकर पंडितांची व वॅारन हेस्टिंग्ज यांची काशी येथें भेट होऊन भोंसल्याचे करारमदार नमुदांत यावे, असा ठराव झाल्याचा उल्लेख आपल्या इतिहासांत केला आहे. परंतु त्यांनीं, दिवाकर पंडित मध्यंतरीं मृत्यु पावल्यामुळें त्यांची व गव्हर्नर जनरलची बनारस येथें भेट झाली नाहीं, असें स्पष्ट लिहिलें आहे. ती हकीकत ह्या पत्रावरून चुकीची आहे असें दिसतें.

**श्री पुरवणी.** ता. ७ जानेवारी इ. स. १७८२.

"सेवेसी विज्ञापना ऐसीजेः—आह्मी बडेसाहेब कलकत्त्याहून निघाल्यानंतर चंद्र २६ माहे रज्जबेस दोन नावा तिनशें रुपयांची किराया करून पटन्यास आलों. तेथें बडेसाहेबाचें वर्तमान कळलें कीं चिनाडगढांत घेन्यामध्यें आहेत. वाट बंद याजमुळें स्वामींचे चरणप्रतापेकरून श्रीगयेस जाऊन पितराचे ऋणांतून मुक्तीस पावलों. चार शत रुपये खर्च जाले. पटणाहून चाळीस कोस दक्षिणेस आहे. एक महिना लागला. पटणास आल्यानंतर दीड महिनापावेतों शरिरास समाधान नव्हतें. याजमुळें अडीच महिनें तेथे राहिलों. राजा गेला. वाट साफ जाल्यानंतर शंभर रुपयांची नाव किराया करून श्रीकाशीस येऊन, प्रथम मणिकर्णिकाचें स्नान करून, श्रीविश्वेश्वर व श्रीअन्नपूर्णाचे चरणावर मस्तक ठेवून, ब्राह्मणांस आमान्न व दक्षणा दिधली. चंद्र ३ मोहरमेस बडेसाहेबांस भेटलो. बहुत दिलगर. मला पुसलें की, कांहीं बोलायाचें आहे ? इतके दिवस कोठें होतां? आह्मी बोललों, येथील हंगामा ऐकून पटनांत राहिलों. आतां आपल्या जवळ आलों. जें बोलावयाचें आहे तें आपणांस विदितच आहे. मग कांहीं न बोलतां, अत्तर व पान देऊन रुकसत केलें. तेच दिवशीं आह्मीं पाहिलें कीं, बिबीची व बडेसाहेबांची वस्तभाव नावेवर जाती. दोन प्रहरास बिबी व आपण नावेवर स्वार जाले. मुनसी वगैरे लोक बोलिले कीं, दो चौ दिवसांनीं कलकत्त्यास जाणार आहेत. चंद्र ११ मोहरमेस नवाब वजीरांनीं दोन पलंग रुप्याचे, सरंजामसुद्धां, व दोन हत्ती रुप्याची आंबारीचे, व एक पालखी, व पांच घोडे, एकून सव्वालक्ष रुपयांचा ऐवज बडेसाहेबांस पाठविले. ते राजा गोविंदराम वकील यांनी दिधले. बडेसाहेब व बिबी रात्रंदिवस नावेंत श्रीगंगेचे मध्यभागीं राहतात., दुसरे तिसरे दिवशीं बागेत येऊन दरबार करीत आहेत. विजेगढ हस्तगत जालें. तेथे तीस लक्ष रुपये नगद व वीस लक्ष रुपयांचें कापड व गल्ला, बारुत व गोळे हातीं लागले. राजाची मातुश्री व बायको वगैरे माणसें यांस दहावे भागचे पांच लक्ष रुपये देऊन काशीमध्ये राजवाड्यांत राहविलें. दुर्विजयसिंग राजा—बलवंताचा जांवाई याचे लेंकास राज्यावर नांवास बसविले आहेत. देवाजीपंत ह्मणून कारकून नागपुराहून सत्रा दिवसांत काशीस आले. चंद्र १३ मोहरमेस बेनीरामपंतांनीं बडेसाहेबांस नावेवर भेटविले. एक पोषाक व मोत्यांचा कंठा, सरपेंच

जवाहीर व खलिता देऊन दोन घडीपावेतों खलबत केली. लोक ह्मणतात कीं मुधाजी भोंसले यांनीं बेनीरामास दूर करून यांस पाठविले आहेत. पुढें जें होईल तें विनंति करूं. आह्मी स्वामींची आज्ञेप्रमाणें बडेसाहेबांजवळ आहूं (आहों) हें सालजाबेवर. यांनीं खर्चास घ्यावें तर विदितच आहे. पांच वर्षांत सरकारांतून सातशें व एक हजार व पांचशें एकूण दोनहजार व दोनशें रुपये पाठविले. त्यांत एक हजार व साडेसातशें रुपये आह्मांस पावले. बाकी हुंडावळ व बट्यांत गेले. लाला कादिमरीमलचे दुकानचे तीन हजार रुपये कर्ज आहेत. परदेशांत स्वामीचे चरणाशिवाय दुसरा आसरा नाहीं. चिरंजीव लाला चिमणलाल सेवेसी हजर आहे. याचे व आमची परवर्ष करणार धनी समर्थ आहेत. थाना व सितल सरकारची काशीदजोडी नाबर मीरधाच जेथेंची आह्मांजवळ तैनातीस होती. त्यासही पांच वर्षांत एक पैसा पावला नाहीं. आह्मांजवळ यांनीं मेहनत बहुत केली. बडेसाहेबांचे दरबारांत खबरास सावध होते. त्यास हें विनंतिपत्र देऊन सेवेसी पाठविले आहेत. येथील कच्चे वर्तमान अर्ज करतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ७.

हें पत्र ता. ९ जानेवारी इ. स. १७८२ चें आहे. ह्यामध्यें वॉरन हेस्टिंग्ज काशीहून सर्व राजेरजवाड्यांच्या वकिलांच्या मुलाखती घेऊन ता. ८ जानेवारी इ. स. १७८२ रोजीं नावेंत बसून कलकत्त्यास रवाना झाल्याचा उल्लेख आहे.

श्री. ता. ९ जानेवारी १७८२.

"सेवेसी विज्ञापना जेः–हें विनंतिपत्र लिहिल्यावर बडेसाहेबांचें वर्तमान कळलें कीं, दोन तीन दिवसांनंतर निश्चयें जातात. यास्तव थाना कासीद यास ठेवून घेतलें. चंद्र२२ मोहरमेस बडेसाहेबांनी दरबार केलें. नवाब सादतअली लखनौकर नवाबचे बंधु यास बडेसाहेबांनीं पंचवीस हजार रुपये दरमहा देऊन काशीजीमध्यें ठेविले आहेत. भेटीस आले. बडेसाहेब व ते दोन घडी खलबत करून निरोप दिधले. बेनीरामांनीं देवाजीपंतांस बडेसाहेबांजवळ आणून तीन पारचे कारचोबी पोशाख व शिरपेंच, जवाहीर व हजार रुपये खर्चास, व भोंसल्यास एक हत्ती व पोशाख व मोत्यांचा कंठा व शिरपेंच व जिगा देऊन रवाना केलें. मिरजा सलिल–नवाब नजबखानचे वकील यांस पंचवीस हजार रुपये नगद व पोशाख व शिरपेंच देऊन रुखसत केलें. फरुकाबादचे नवाब मुजफरजंगाचे वकील व रामपूरचे नवाब फैजुलाखान रोहिले यांचे वकील यांस दहा पोशाख देऊन रवाना केलें. आह्मीं पुसिलें कीं आह्मांस काय आज्ञा करितां ? बोलिलें कीं आह्मीं तुह्माविसीं मिस्तर पामरसाहेबांस सांगितलें आहे. आह्मीं मशारनिलेस पुसिलें. त्यांनीं सांगितलें कीं तुह्मांस निरोप देत नाहीं. पांचशत रुपये नावचे खर्चास देविले आहेत. गोपालदास साहुकार बिमेवाले याचे मार्फत. करनेल...हुंडी सुरतेस जाते. यांनीं बहुत आग्रह करून बडेसाहेबांस घरीं घेऊन गेले. दाहा पोशाख व जवाहीर वीस हजार रुपयांचें

ऐवज बडेसाहेबांस दिधलें. चंद्र २१ मोहरम माघ कृष्ण अष्टमी दोन घडी रात्र गेल्यानंतर बडेसाहेबांनीं कूच केलें. एक पलटण तिलंगे श्रीगंगेचे हे कांठीं व एक ते कांठीं व मधीं बिबीची व आपली, आणिक लोकांची नावा ऐसी तजवीज करून गेले. आह्मी मकरसंक्रमणाचे संक्रातीमुळें पांच सात दिवस राहिलों. वसंतपंचमीस. बडेसाहेबांजवळ जाऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ८.

हें पत्र फार महत्त्वाचें आहे. ता. ९ जानेवारी इ. स. १७८२ पासून ता. ११ नोव्हेंबर इ. स. १७८४ पर्यंत मध्यंतरींचीं पत्रें मुळींच सांपडत नाहींत. ह्यावरून वॉरन हेस्टिंग्ज ह्यांचीं त्या मुदतींतलीं जीं राजकारणें लाला सेवकरामाकडून पुण्यास लिहून गेलीं असतील तीं समजण्यास मार्ग नाहीं. लेखांक ८ ह्यामध्यें वॉरन हेस्टिंग्ज हे कलकत्त्याहून लखनौस येऊन, तेथें त्यांनीं नवाब वजीर ह्यास अनुकूल करून घेतलें. तिकडे महादजी शिंदे ह्यांनीं आग्रा येथें शाहाआलम बादशाहास अंकित करून घेतलें. ह्मणून वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं शाहाजादा जवानबख्त ह्याची भेट घेऊन व काशी येथें त्याचा आदरसत्कार करून त्याजबरोबर मोठें राजकारण चालविलें. परंतु दिल्लीची सर्व सत्ता अफरासियाबखान ह्याच्या हातीं असल्यामुळें व महादजी शिंदे ह्यांचा व त्याचा स्नेह जुळल्यामुळें वॉरन हेस्टिंग्ज ह्यांस भीति उत्पन्न होऊन, त्यानीं शाहाजाद्यास महादजी शिंद्यांच्या स्वाधीन केलें. ह्या शाहाजादाप्रकरणाचा वृत्तांत फार लांबलचक आहे. त्याचा बराच उलगडा लाला सेवकरामाच्या पत्रावरून होईल.

पै॥ चंद्र ३ सफर सन खमस समानीन **श्री.** ता. ११ नोवेंबर इ. स. १७८४.
पौष मास.

श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज लाला सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत चंद्र २७ जिल्हेज मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशी जाणून स्वकुशल आनंदवैभव लेखकास आज्ञा करीत असावें. विशेषः—पूर्वी विनंतिपत्र येथील वर्तमानचें, कासीदजोडी आजुरदार बरोबर चंद्र ५ माहे जिलकाद अश्विन शुद्ध ७ रवाना केलें; सेवेसी विदित होईल. हल्लीं वर्तमान ऐसें जेः— बडेसाहेब जे मनसुबा करून कलकत्त्याहून लखनौस आले, त्यापैकीं करोड दीड करोड रुपै (रुपये) नवाब वजीरापासून हातीं लागले. परंतु दिल्लीस जाऊन पातशाहाती करावे, तें राजश्री माहादजी शिंदे वाटेंत आडवे याजमुळें तें काम झालें नाहीं. हरएक प्रकारें शाहजादा जवांबखत आपले कबज्यांत आणिले. पातशाहा आकबराबादेस शिंद्याकडे आले ह्मणून रोहिले व नवाब वजीर

व आणीक लहानथोरांसीं बहुत स्नेह व दारसदार करून शाहाजाद्यास बरोबर आणिलें. चंद्र ७ जिलकादी बडेसाहेब शाहाजादेजवळ येऊन, एक प्रहर खलबत करून, नवाब सादतअलीखान वजीराचे भाऊ यांस बोलावून भेटविले. नवाबांनीं शाहाजाद्यास पन्नास व एक मोहर नजर केली. बडेसाहेबांनीं पोशाक व सरपेंच व जिगा व मोत्यांचा कंठा व हत्ती व घोडा व तलवार शाहाजाद्यापासून देविले; व आणिक लोक नवाबाचे यांहीं पोशाक व घोडे दिधले. तेच दिवशीं बडेसाहेबांनीं शाहाजादेची स्वारी तयार करवून नवाबास खवासींत बसविलें. ग्यानवापी–शहरांत आदिस्थान श्रीविश्वेश्वरचें तेथें पूर्वी अलमगीर पातशाहानें मशीद केली, त्यांत आणून निमाज करविली. दुसरे दिवशीं विजयादशमीचा तमाशा पाहावयास बडेसाहेबांनीं शाहाजादा, नवाब सादत अलीखान व अलीखान व अकबरअलीखान शाहाजादेचा मामू व आणिक दाहा बारा आंग्रेज हत्तीची स्वारीवर बरोबर घेऊन चित्रकुटचे मैदानांत आले. तेथें श्रीरामचंद्रची लीला बहुत अपूर्व होत आहे. भाऊ बक्षी दोन चार वार दरबारांस आले, परंतु सालजाब साफ होत नाहीं. रुपयांची तलबी बहुत आहे. बडेसाहेब होय होय ह्मणतात. दुंदा भगतराजा चेतसिंगाचा दिवाण त्याची हवेली व बायको व मुलें माणसें येथें आहेत. कोणी लबाडी करून बडेसाहेबांस सांगितलें कीं, दिवाणची हवेलीमधें दोन करोड रुपये नगद आहेत. बडेसाहेबांनीं सात दिवसपावेतो चौकी बसवून हवेली खोदविली, व श्रीगोवर्धन पर्वताजवळ सदाशिवाचें पुरातन स्थान आहे, तेथेंही दाहाबारा दिवस खाणविलें. परंतु दोन्ही जागां कांहीं निघालें नाहीं. बडेसाहेब आपली जागा बहुत पेशमान झाले. व सारे लाला शहरचे घाबरे आहेत. साफ याची सरकारांत कर्जदारीमुळें रुपये ओढ बहुत आहे. सारे मुलखांत आंग्रेजांचे काशीपावत दोन कंपूंची पंधरावीस हजार फौज तिलंगे आहेत. त्यांसही सातआठ महिनेपर्यंत तलब पावत नाही. चंद्र २२ जिलकादीं पातशाहा आफरासियाबखान व माहादजी शिंदे यांचें पत्र बडेसाहेबांस आलें की, तुह्मी शाहाजाद्यास बोलावून फसाद करावयाचें मानस आहे. तरी पत्रदर्शनी शाहाजाद्यास सत्वर हुजूर रवाना करणें. नाहीं तर साफ बिघाड होईल! बडेसाहेबांनी तेच दिवशीं शाहाजादेस चिनाडगड (चुनारगड) दाखवावे ह्मणून बरोबर घेऊन गेले. तेथें एक दिवस राहून, बारीकमोठे कारभाराचे बंदोबस्त सांगून, दुसरे दिवशीं आले; व भाऊ बक्षीस बोलावून आपण व शाहाजादा व इंद्रसेनसाहेब व भाऊ दोन प्रहरपावेतों खलबत केली. असें कळलें कीं, शाहाजादेबरोबर करनेल पालीसाहेब व पांच पलटण, तैलंग, व तोफखाना देऊन नवाब वजीराजवळ पाठवावें. वजीरास मिस्तर पालरसाहेब लखनौचे अधिकारी यांस लिहिलें कीं, शाहाजादेचे खर्चाचा बंदोबस्त करून व फौज व सरंजाम देऊन करनेल रणसाहेब कान्हपुरांत कंपूचे सरदार आहेत त्यांजवळ पाठवावें. व भाऊचे अनुमते शिंदेस लिहिलें कीं, शाहाजादा तुह्मांपाशीं पाठविलें आहे. यांस अकबराबादेचा सुबा (सुभा) पातशाहापासून देववून शाहाजादाचा बंदोबस्त करून द्यावा

तर पंचवीस लक्ष रुपये तुह्मांस देऊं, असा निश्चय झाला. चंद्र २ माहे जिल्हेजेस कलकत्त्याहून खबर आली कीं, मिस्तर होल्यरसाहेब बडेसाहेबांचा नायब मृत पावले. बडेसाहेब हें वर्तमान ऐकून बहुत घाबरे जाले. दोन दिवस भाऊ बक्षींची खलबत दाट राहिली. चंद्र ६ जिल्हेजीं कार्तिक शुद्ध अष्टमीस शाहाजादा व भाऊ व आणिक लहान थोर बडेसाहेबांजवळ गेले. बडेसाहेब व शाहाजादा व भाऊ व इंदरसन साहेब एक प्रहर खलबत करून शाहाजाद्यास निरोप दिधले. एक हजार रुपये शाहाजाद्यास खासगत खर्चास रोज देतात. हल्लीं पन्नास हजार रुपये लाला काश्मिरीमलपासून देविले. भाऊ तीन प्रहर राहून सालजाब व कागदपत्र सरकारमामलेचे साफ घेतले. परंतु त्याचा मजकूर कांहीं कळत नाहीं. पाहतां दृष्टीं बडेसाहेबांनीं अंतरवेदीचा बंदोबस्त वगैरे आपलें हातीं ठेवून, भाऊची मार्फत महादजी शिंदेची दिलजमाई केली. भाऊस निरोपाचे समयीं पन्नास हजार रुपये दिधले, व आणिक लोकांसही रुखसत केलें. आह्मांस पाहून बोलिलें कीं, 'तुमचे धनीनें आह्मांपाशीं कोणती मसलतीवर ठेविलें? चार पांच वर्षांपासून कागदपत्र येत नाहींत. तर तुह्मीं पुण्यास जावें. आह्मांबरोबर कलकत्त्यास येऊं नये.' आह्मीं जाब दिधले कीं, 'आपण सालजाबची वाट ठेविली नाहीं!' हें ऐकून एक पान न देतां रागानें उठून गेले, व नाववाल्यांस बोलावून सांगितलें कीं, आम्हांस सहा दिवसांत कलकत्त्यास पावतें करावें. हजार रुपये इनाम देऊं. रात्रीं भाऊस बोलावून चार घडी खलबत केली. अर्धी रात्रीं बडेसाहेबांनीं चार माणसें बरोबर घेऊन नावेवर स्वार होऊन कलकत्त्यास गेले. चंद्र ७ इंदरसेन साहेब डांकेवर गेले. चंद्र १० शाहाजाद्यांनीं ईदची नमाज करून, आकबर अलीखान आपला मामू यास पुढें रुखसत केलें; व आपण चंद्र १४ कूच करून ७ कोसांवर गेले. राजा महिपनारायण काशीचे व आजाईसिंग दिवाण व इब्राहिम अलीखान व इसकॉटसाहेब शाहाजाद्याबरोबर दोन मजल गेले. शाहाजाद्यांनीं यांपासून वीस हजार रुपये घेऊन रुखसत केलें. भाऊ बक्षी येथेंच राहिले. सालजाबाचा अर्थ, बहुत तलासानें दोन चार दरबारी लोक व मातबर सावकाराचे जुबानीं असें कळलें कीं, एक करोड रुपये बडेसाहेबांनीं अंतरवेद व रोहिलखंड वगैरे मामलेपैकीं देऊं केले. त्यांजमध्यें चाळीस लक्ष रुपये दिधले. बाकी रुपयांकरितां भाऊला काशीस आणिलें. येथें रुपयांचा बंदोबस्त जाला नाहीं. याजकरितां चारशें रुपये रोज भाऊस मुकरर करून येथें ठेविलें, व आपण कलकत्त्यास गेले. तेथून रुपयांची वांट करून पाठवितील ऐसा करार केला. करोड रुपये मध्यें साठ लक्ष रुपये श्रीमंतची सरकारांत व तीस लक्ष रुपये माहादजी शिंदे व दहालक्ष रुपये दरबारखर्च देऊं केले, व कोणी ह्मणतात दीड करोड रुपयेवर मामला जाला, याप्रमाणें बोलतात. हें वर्तमान साफ कळत नाहीं. माहादजी शिंदे सविस्तर सेवेसी लिहितील, त्यावरून स्पष्ट विदित होईल. आह्मीं पूर्वीं बडेसाहेबांची नजर पाहून चार पांच वार सेवेशी लिहिलें कीं, हुजूर बोलावून चरणदर्शनाचा लाभ घ्यावा. परंतु धनी समर्थाचे मर्जीस न आलें. शेवटीं, बडेसाहेबांनीं आपण होऊन जाब दिधले.

आतां लक्षप्रकारें सेवेसी विनंति हेंच कीं, एक दस्तक राहादारीची व वाटखर्च–जेणें करून येथील कर्जदारीपासून मुक्त होऊन सेवेसीं पाऊं– कृपा करून पाठवावें. धनी समर्थ मायबाप. ईश्वरसमान आहेत. थाना व शीतल काशीदजोडी तैनाती सरकारची यांनीं आह्मांपाशीं आठ वर्षांत सरकारचाकरी बहुत केली. यांचा रोजमुरा व सालझाडा देविणार धनी समर्थच आहेत. बहुत काय लिहिणें? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ९.

वॉरन हेस्टिंग्ज ह्यांचा व त्यांच्या कौन्सिलर्सचा बेबनाव होऊन त्यांनीं आपल्या गव्हरनरजनरलच्या जागेचा राजीनामा दिला; व ते ता. १ फेब्रुवारी इ. स. १७८५ रोजीं जहाजांत बसून विलायतेस रवाना झाले. त्यानंतरच्या हकीकतीचें हें पत्र आहे.

पै॥ छ ६ जमादिलावर सन. **श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता. ६ मार्च इ. स. १७८५. खमस समानीन चैत्रमास.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः— आज्ञांकित चरणरज लाला सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत चैत्र वदी दशमी १० मुकाम कलकत्ता जाणून स्वकुशल आनंदवैभव लेखकास आज्ञा करीत असावें. विशेषः—

आह्मी श्रीकाशीहून सरकारचा खलिता व दोन रुद्री गंगाजल हरद्वारचा व पांच रुद्री तीर्थराज प्रयागची बरोबर घेऊन फाल्गुन वदी चतुर्दशीस श्रीवैजनाथास आलों. शिवरात्रीस सरकारतर्फेनें अभिषेक व दुसरे दिवशीं ब्राह्मणभोज(न) करून एक महिना सात दिवसांत कलकत्त्यास आलों. येथे कळलें कीं, बडेसाहेब हेष्टीन यांनीं मेगफरसन साहेब व ईष्टवील साहेब कौसली यांचा विरोध व सया बारीक (?) पाहून छ २० माहे रबिलावल फाल्गुन वद्य सप्तमीस जहाजावर स्वार होऊन विलायतेस गेले. मेगफरसन साहेब कौसली कलकत्त्याचे बडेसाहेब जाले. व कपतान मेगफरसन—जे करनेल जान आपटनसाहेब बरोबर पुन्यास आले होते ते–करनेल होऊन बडेसाहेबांचे कारभारी आहेत. त्याची मार्फत आह्मीं, बडेसाहेबांचे कारबारी आहेत त्याची मार्फत, आह्मीं बडेसाहेबांची भेट केली. बहुत मेहेरबानी व दिल गर्मी करून श्रीमंत व स्वामींचें कुशल वर्तमान पुसलें, व बोलिले कीं आह्मी तुमची वाट पाहत होतों. श्रीमंत रावसाहेब व नानासाहेबांचें नांवें खलिते तयार केले आहेत. तुह्मीं सत्वर पुन्यास रवाना करून जाब आनावे. मग आह्मी कोन्ही मातबर मणुश्य तुह्मांबरोबर देऊन श्रीमंतांजवळ पाठवूं. त्याजवर आह्मीं दोन्ही खलिते कासीदजोडी आजुरदार बरोबर सेवेसी रवाना केले. आपण धनी समर्थ आहेत. जाब देऊन कासीदास रवानगीची आज्ञा करावी. चिरंजीव लाला चिमणलाल हुजुरांत आहे. त्याची परवरश धनी समर्थ करनार आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."*

* ह्या पत्राचे शेवटीं 'सेवकानें येथील प्रकार ऐसा पाहून सरकारखलिता दिधला नाहीं' असा शेरा मारिला आहे. ह्यावरून वॉरन हेस्टिंग्जच्या जाण्याच्या गर्दींत पुण्याचा खलिता एक दिला गेला नाहीं असें दिसतें.

## लेखांक १०.

वॉरन हेस्टिंग्ज विलायतेस निघून गेल्यानंतर मि० म्याकफर्सन यांच्याकडे कांहीं दिवस गव्हरनरजनरलचे जागेचा चार्ज होता. याबद्दल म्याकफर्सनसाहेबांनीं पेशव्यांस स्नेहभावयुक्त फारशी भाषेंत खलिता लिहिला होता. त्याचें पुढील भाषांतर लाला सेवकरामानें नानांस पाठविलें आहे. तें येणेंप्रमाणेः—

**श्रीरामचंद्र.** जानेवारी इ. स. १७८५.

नकल तरजुमा खलित्याचा.

"ईश्वरास शरन्य आहू कीं स्नेह सरकारस्वामी व सरकार कंपनीचा याप्रमाणें मजबूत जाला. कोण्हीविषयीं तफावत होणार नाहीं. ईश्वरकृपेकरून अहोरात्र स्नेहाची वृद्धि आहे. पाया स्नेहाचा ऐसा मजबूत जाला कीं परस्पर एक कारभार आहे. जुदाई राहिली नाहीं. ईश्वर हे स्नेहास ज्यादा करो. हे कृपाळू मोझे (?) हे दिवसांत या मुलकाची आबहवामुळें कांहीं आजार नवाब अमिरुलममालीक इमादुद्दवला गव्हरनर हेष्टिन-साहेब बहादूर जलदतजग यास जाले, व कितेक कारणाकरितां विलायतेस जावें ह्मणून गवरनरमजकूरचा कूच छ २० माहे रबिलावलेस मुकरर जाला. हे गेल्यावर दोस्तदार येथील बडासाहेब होईल. ईश्वराचे इच्छेकरून कौलकरार सरकार कंपनी बहादूर व स्वामींचा मजबूत जाला. ईश्वर हमेशा ज्यादा करो. दोस्तदार आपली कृपेंकरून ज्यादा होय तेंच करील. आपण कृपाळू होऊन ज्याप्रमाणें दोस्ती नवाब-मजकुरासीं होती, त्याप्रमाणें दोस्तदारासीं करीत असावें. ईश्वरइच्छेकरून दोस्ती दोन्ही सरकारमधें नफा बहुत व रयत सुखी होईल. हमेशा आपला कुशलवृत्तांत लिहून संतोषवीत असावें."

## लेखांक ११.

हें पत्र लाला सेवकरामाचा मुलगा लाला चिमणलाल याचें आहे. लाला चिमण-लाल हा पुण्याहून जवाहीर, पोषाक वगैरे घेऊन मुद्दाम कलकत्त्यास गेला होता. तो तेथें ता. ३१ आक्टोबर इ. स. १७८५ रोजीं पोहोंचला.

**श्रीशंकर.** आक्टोबर इ. स. १७८५.

सेवेसी चरणरज चिमणलाल दोन्ही कर जोडून चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग दंडवत विज्ञापना ऐसीजेः—महाराजांची आज्ञा घेऊन निघालों, ते हुकुमाप्रमाणें नागपु-रासी आलों. राजेश्री राघोजी भोंसलेची भेट घेतली. तेथून वाटेचा बंदोबस्त करून पुढें चाललों. ते प्रजन्यकाळचे दिवसांमुळें फार संकटानें वाट कंठून श्रीवाराणसीस आलों. तेथवरी पोहोंचतां जे वाटेंत बारबारदराचे तट्टू दोन होते व बसावयाची घोडी पांढरी होती, ऐसे तिन्ही मेले. मग एक बैल घेतला. तोही मेला. सरकारचे कासीद व माणसें बरोबरचे तेही फार प्रजन्याकरितां दुखण्यानें मरणतुल्य जाहालें. शेवटीं भाडा करून

वाराणसीस आलों. तेथून एक किस्ती भाड्यानें साठ रुपये करार करून निघालों, ते महाराजांचे कृपेंकरून कलकत्यासी सुखरूप चंद्र २७ जिल्हेजीं पोहोंचलों. बडेसाहेबांची भेट केली. जवाहीर व पोशाख व खलिते सरकारचे इनायेत जाहाले होते, ते दिले. त्यांनीं उत्तर केलें कीं खलिते वाचून मग तुह्मांसीं बोलूं. इंग्रेज आजुरदार होऊन विलायतेसी जातात, याजकरितां फार चिंताक्रांत आहेत. ह्मणून खलिते वाचून सेवकाशीं बोलणें जाहालें नाहीं. बोलणें जाहाल्यावरी सविस्तर अर्ज केला जाईल. बाकी येथील वर्तमान तीर्थरूप राजेश्री लाला सेवकरामजीचे पत्रावरून सेवेसी विदित होईल. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर केली पाहिजे, हे विज्ञापना.

हे जोडी लवकर रवाना करावी. कौसल होऊन उत्तर मिळेल त्याप्रमाणें अर्ज करूं, याजकरितां ठेविली होती; परंतु अद्यापि कौसल होऊन उत्तर मिळालें नाहीं. बडा दिन जाल्याखेरीज जाबसाल होत नाहीं, ऐसें समजल्यावरी जोडी रवाना केली हे विज्ञापना.

## लेखांक १२.

लेखांक ११ मध्यें ज्या पत्राचा उल्लेख केला आहे तें हें पत्र आहे. ह्या पत्रामध्यें पुण्याहून पेशवेसरकारांकडून जे जवाहीर व पोषाक वगैरे जिन्नस मि. म्याकफर्सन ह्यांच्यासाठीं रवाना झाले होते, ते त्यांस अर्पण केल्याची हकीकत आहे. हें पत्र फार मनोरंजक आहे. वॉरन हेस्टिंग्ज ह्यांच्या कारकीर्दींत कंपनीस कर्ज फार झाल्यामुळें कलकत्त्याच्या इंग्रज लोकांचा पगार कमी करण्याचा हुकूम आला. त्यामुळें सर्व लोकांनीं 'बडा दिन' झाल्यावर विलायतेस जाण्याचा विचार केला. त्यामुळें बडेसाहेब व कौंसल ह्यांस मोठी काळजी उत्पन्न झाली, वगैरे हकीकत आहे. वॉरन हेस्टिंग्ज विलायतेंत कंपनीजवळ दाखल झाले, परंतु इतराजीमध्यें आहेत, असाही उल्लेख ह्या पत्रांत आहे.

चंद्र १६ जमादिलावल सीत. **श्रीशंकर.** ता. ८ दिसेंबर इ. स. १७८५.
पुण्याहून पत्रें पाठविली त्याचे जाब.

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत मार्गशीर्ष शुद्ध ७ पर्यंत जाणून स्वानंदाची लेखनआज्ञा जाली पाहिजे. विशेषः—पूर्वी चंद्र २७ माहे रविलाखरीं दोन खलिते बडेसाहेब मेगफरसनचे कासिदजोडी आजुरदार बरोबरी सेवेसी रवाना केले होते. त्याजवरून येथील वर्तमान विदित जालें असेल. करनेल मेगफरसन व बडेसाहेब यांनीं दोन चार वेळां खलितेचे जाबाकरितां पुसलें. आह्मी बोलिलों कीं मार्ग लांब व सरकार थोर, याजमुळें देरी जाहाली. कितेक दिवसांनंतर चंद्र २५ साबानीं चिरंजीव चिमणलालचें पत्र कासिदजोडी आजुरदार येथून गेली होती त्यांजबरोबरी आलें, तें पत्रावरून समजलें. सरकारांतून खलितेचे जाब तयार जाहाले आणि

पोशाख व जवाहीर बडेसाहेबांकरितां इनायेत जाहले, तें आह्मीच घेऊन येतों. असें समजल्यावरी करनेलासी सांगितलें कीं तुमचे खलितेचें उत्तर व तोफा सरकारांतून इनायेत जाहालें आहे. हें ऐकोन फार आनंदरूप जाहाले. चंद्र २७ जिल्हेजीं चिरंजीव चिमणलाल महाराजांचे कृपेंकरून येथें कलकत्त्यासी सुखरूप पावले. चंद्र २ मोहरमीं बडेसाहेबांची भेट जाहाली. खलिते सरकारचे व पोशाख व जवाहीर दिलें. तें घेऊन फार खुश जाहाले. जवाहीरची दोन रकमा होती. ते दोन चार वेळां हातांत घेऊन पाहिले. श्रीमंत रावसाहेब व स्वामींची व हरिपंत तात्यांची कुशलतेचें वर्तमान विचारिलें. पोशाख व खलिते व जवाहीर माघारें सेवकाचे हवाला केलें, आणि बोलिले कीं आह्मी कौसलघरांत जाऊन तुह्मांसी बोलावितों; तेथें घेवूं. मग एक घटकानंतर बडे-साहेबानें ईस्टबील साहेब व इष्टुर साहेब व जनरेल सुलभ ऐसे तिन्ही कौंसली बोलावून कौसलघरांत गेले; आणि सेवकासी बोलावून खलिते व पोशाख व जवाहीर घेऊन पुसलें कीं, 'तुमचे धनी आह्मांवरी कृपाळू व कंपनीची दोस्तीसी रजावंद आहेत कीं काय ?' सेवकानें उत्तर केलें कीं, 'आमचे धनीची मर्जी हेंच कीं पूर्वीपासून दोस्तीच चालत आली आहे, त्याचप्रमाणें चालल्यासी उत्तम आहे.' मग एक दुशाला चिरंजीवासी देऊन निरोप दिले, आणि सांगितलें कीं खलिते वाचून पाहतों, मग तुह्मासीं बोलूं. येथील मजकूर ऐसें कीं, चंद्र २० माहे जिल्कादीं जनरेल सुलभसाहेब सारी इंग्रेजी फौजेचा मालिक व कोसली चौथे दर्जेचा व आमीन ऐसे तीन खिजमत घेऊन विलायतेहून येथें आले. बडेसाहेब व इस्टबीलसाहेब व आणखी मातबर इंग्रेज पुढें जहाजापावेतों जाऊन भेटले. बहुत सन्मानेंकरून आणिलें. तेही कोसली तिसरा जाहला. मिस्तर हिस्टिन विलायतेस जातासमयीं बोलून गेले कीं, कंपनीवरी कर्ज बहुत जाहलें ह्मणून सुभे बंगाला येथून रुपये एक करोड व अर्काटेपैकीं पन्नास लक्ष व नवाब वजीरकडून पन्नास लक्ष, एकूण दोन करोड रुपये दरसालीं सावकारांसी देत जाणें. याजकरितां मिस्तर मेगफरसन बडेसाहेब यांनीं एक कंपू फौज व कितेक चाकर लोक दूर केले; व जनरेल मजकूर येथें आल्यावर विलायतेहून लिहिलें आलें कीं, सारे इंग्रेज लोक यांचा दरमहा कमी करावा. जनरेलसाहेबांनीं बडेसाहेबांचे आज्ञेप्रमाणें सारे मातबर इंग्रेज आपले घरासीं बोलावून विलायतेचे लिहिलें दाखविलें, व बोलिले कीं, आह्मी हेविशीं लाचार आहों. त्यांनीं जाब दिलें कीं, आह्मां लोकांची याप्रमाणें गुजराण होणार नाहीं. आह्मी विलायतेसी जावूं. याउपरी सारे इंग्रेज व इंग्रेजी लिहिणार एकमत होऊन निश्चय केले कीं, 'बडा दिन' करून जावें. वर्षप्रतिपदा आपले येथें होती, त्याप्रमाणें इंग्रेजी महिन्यांत धनसंक्रातेपासून तेरावे दिवशीं वर्षाचा दिवस करितात. त्यासी 'बडा दिन' ऐसें ह्मणतात. ते करून जाणार. याजकरितां बडेसाहेब वगैरे कौसली फार चिंताक्रांत आहेत कीं, इंग्रेज गेलियानें ठीक दिसत नाहीं. आणि विलायतेच्या हुकुमासी उजूर करितां नये. ऐसें संकट येऊन पडलें आहे. पुढें पाहावें कीं यांची काय मसलत, ठरती. मिस्तर हिस्टीनसाहेब विलायतेसी

गेले. त्यांची रसीद आली कीं, कंपनीजवळ जाऊन पोहोंचलें. बादशाहाची भेट जाहली नाहीं. इतराजींत आहेत. आणि मिस्तर पामरसाहेब–हिस्टिनचे फार मुसाहेब–होते. ते सांप्रतकाळीं लखनौहून विलायतेसी जावयासी येथें आले आहेत. तें त्यांचें जबानीं पक्कें वर्तमान समजलें कीं, हिस्टीन पुन्हां येथे येत नाहींत. परंतु हिस्टिनांनीं राजेश्री माहादजीराव शिंदे यांसी सर्व प्रकारें आपलें केलें. ते प्रत्यक्षच आहे कीं रोहिलखंडाची व अंतरवेदीची खंडणी सरकारांत येत नाहीं, आणि भगवंतराव वकील भाऊ बक्षींनीं वाराणशीहून हिस्टीनबरोबर पाठविलें होतें, ह्मणून हिस्टीन विलायतेस जातासमयीं बडेसाहेबांसी सांगून गेले कीं, यांची मिरजीदारी करीत जाणें. याजकरितां बडेसाहेबांनीं भगवंतराव यांसी सांगितलें कीं, तुह्मी माहादजीरावकडून आहांत, तरी आमचे नावें एक पत्र आणवा. याजकरितां मशारनिलेनी भाऊ बक्षीचे विद्यमानें खलिता आणून गुजराणिलें. याजकरितां बडेसाहेबांनी एक घोडा व पोशाख व शिरपेंच एक देऊन बहुत सन्मानें ठेविले आहे. चंद्र १० माहे मोहरमी नवाब निजाम अलीखानकडून बडेसाहेबांकरितां बादली पोशाख एक, सात पारचेची व शिरपेंच एक व मोतियाची माळ पदकसहित व जेगा एक व खलिता येणेप्रमाणें मिस्तर जानसेनचे मार्फतेनें आले. मग दोन चार दिवसानंतर बडेसाहेबांनी सेवकासी पुसलें कीं, बंदगानअलीचे पत्रावरून ऐसें समजलें कीं, तुमचे धनी आह्मांपासून कांहीं फौज मागतात. मग सेवकानें उत्तर केलें कीं, स्नेहाची रीत हेच कीं मोहिमाचे समयीं परस्परें इतला देऊन फौज गेलियासी चिंता नाहीं. ऐकोन उगेच राहिलें. बादशाहासीं माहादजीराव शिंदेची मुलाजिमत मथुरेवरी जाहाली. आकबराबादेसी येणार आहेत, ऐसी खबर आली. ह्मणून त्यांनी जर्नरेलबरोबरी पांच सातशें गोरे इंग्रेज शिपायी आले होते ते व येथून चार हजार तेलंगे व पन्नास तोफा व बारूत व गोळेचे छकडे बरोबर देऊन व चार पलटण करून कानपुराकडे रवाना केलें. येथून अडीचशें आंग्रेज मातबर बेदिल होऊन विलायतेसी जातात, याजमुळें बडेसाहेब व कौंसली मिळून हेंच कौसल करितात. बडा दिन जाल्यावर आंग्रेज जातील. तेव्हां सालजाब करून सविस्तर सेवेसी अर्ज करितो. सेवेसी श्रुत होय विज्ञापना.''

## लेखांक १३.

हें ता. २१ मार्च इ. स. १७८६ चें पत्र आहे. हे अक्टिंग गव्हरनरजनरल म्याकफर्सन ह्यांच्याकडून पेशव्यांस आलेल्या खलित्याची हिंदवी नक्कल आहे. ह्या पत्रामध्यें म्याकफर्सन ह्यांनीं मराठ्यांच्या व इंग्रजांच्या दोस्तीबद्दल व एकदिलीबद्दल नवीन येणारे गवरनरजनरल अर्ल कॉर्नवालिस ह्यांचे जवळ सर्व वर्तमान कळविलें आहे; आणि आपण स्वतः प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें समुद्राची हवा खाण्यास जात आहों ह्मणून लिहिलें आहे.

**श्रीशंकर.** ता. २१ मार्च इ. स. १७८६.

"नक्कल खलिते श्रीमंत रावसाहेबांसी व नानासाहेबांसी मेगफरसन साहेबांनीं लिहिलें त्याची नक्कल हिंदवी. रवाना चंद्र २० जमादिलावल चैत्र कृष्ण पंचमीः— आं- मेहरबानची नजर इंजानिबाची दोस्ती व दोस्तीवर मंजूर आहे. आणि दरवाजे 'खत मेहरबानगीचे जोंपावेतों राहाणें इंजानिबाची हुकमत या मुलकाची होती तोंपर्यंत उघडे होते. याजकरितां खिजमतीस तसदी या दिधली जाती कीं, इंजानिबांसी येथील आब हवा तबियतेसी रास नाहीं. ह्मणून ऐसा इरादा केला कीं, कितेक महिने सेर समुद्राची करावी. याकरितां सर्व वर्तमान दोस्ती व एकदिलीचें जें परस्परें आंमेहरबान व साहेबान आंगरेजचें तहकीक आहे; व दवलतख्वाई सरकारची आंमेहरबानकडून जे जाहली आहे, ते तपसीलवार नवाब गवर्नरजनरल अर्ल कॉरनवालीस साहेबांसी समजाविलें आहे; आणि ईश्वरकृपेनें हे दोस्ती व दोस्ती दिवसानदिवस जास्ती जास्ती होईल; आणि हे साहेब मजकूरही मजबुती व मजबुती हे गोष्टीमध्यें चित्तापासून हाजीर आहेत. आणि थोरले लोक जे आहेत, ते परस्परे पत्रे खुशवखती व खुशवखती व मेहरबानगी एक रंगीचे पाठवितात. बहुत उत्तम काम सर्व सृष्टींत मशहूर आहे. याजप्रमाणें खुशवखत व खुशवखत जाहलीयासी ऐसें काम दुसरें खुशीचे नाहीं. ह्मणून कजीमदास्तीस आहे कीं इजानिबासी वर्तमान खैराफियात मिजाजेची लिहीत राहावें; आणि पत्रे दोस्तीचे इजानिबाचे नावें अरलसाहेबाजवळ पाठवीत जावें. इंजानिब जेव्हां सेर समुद्रांतून फिरून येईल, तेव्हा ते पत्र आलेले पाहून खुशवख्त होईल. ज्यादा काय लिहिणे ?"

## लेखांक १४.

हें पत्र अपूर्ण आहे. ह्यामध्यें बंगालच्या सुभ्याचा दिवाण गंगा गोविंदसिंग ह्यास कामावरून दूर करण्याचे बाबतीत कलकत्ता कौन्सिलमध्यें बेबनाव झाल्याचा मजकूर आहे.

पवस्ती चंद्र १८ जिल्हेज सबा सन **श्रीशंकर.** ता. १८ जुलई इ. स. १७८६.
समानीन ह ॥ अजूरदार.

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी—

आज्ञांकित चरणरज सेवकराम मुक्काम कलकत्ते साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत श्रावण वद्य ७ पावेतो महाराजांचे कृपेंकरून असे. साहेबानें स्वानंदाची लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः— पूर्वी चंद्र १५ माहे रजबीं कासिदजोडी आजुरदार करून सेवेसी पाठविली, ते पोहोंचून सविस्तर वर्तमान निवेदन जाहालें असेल. त्यांत हे मजकूर लिहिले होते कीं, येथील बंगालचे सुभेचे दिवाण, गंगागोविंदसिंग नामें एक बंगाली फार मातबर माणूस व हिस्टीनसाहेबाचे ममतेचा होता,

त्यासी कामांतून दूर करणेंविसीं येथील तिन्ही कौसलांचें बहुत मानस होतें. एक बडे. साहेबांचे चित्तांत होतें कीं, मशारनिलेसी कोणे प्रकारें दूर करूं नये. याजकरितां येथील चारी साहेबांमधें परस्परें चित्तशुद्धता नव्हती. याजकरितां मागेंच चौघांनीं वेगळीं वेगळीं पत्रें विलायतेसी लिहिलीं होतीं. शेवटीं चौघे चहूंकडे, दहा दहा कोसांचे तफावतीनें, गरमीचें मीस करून जाऊन बैसले होते. इतक्यांत विलायतेचें पत्रें आलीं कीं मेगफरसन साहेब बडेसाहेबीवर आहेत. त्यांनीं दक्षण व हिंदुस्थानचे राजे व मातबर सरदार आहेत, त्यांसीं कंपनीकडून जे जाबसाल होईल तितकें करणें, आणि इस्टबीलसोहब दुसरे कौसली यांजपासून दुसरे दर्जेवरी आहेत, त्यांनीं खालसि. याचें व मुलकी कामकाज करावें. (अपूर्ण.)"

## लेखांक १५.

हें पत्रही मि० म्याकफर्सन ह्यांनीं नानांस लिहिलेल्या खलित्याचें भाषांतर आहे. ह्यामध्यें पार्लमेंटच्या नवीन आक्टाची माहिती देऊन लॉर्ड कार्नवालिस ह्यांस गव्हरनरजनरल व कमांडर-इन्-चीफ नेमल्याचें व ते ता. १२ सप्टेंबर इ. स. १७८६ रोजीं कामावर रुजू झाल्याचें वगैरे वर्तमान दिलें आहे. हें पत्र अनेक दृष्टींनीं मनोरंजक आहे.

**श्रीशंकर.** ता. १२ सपटंबर इ. स. १७८६.

श्रीमंतसाहेब व नानासाहेबांचे खिजमतेसी मेघफरसन साहेबानें खलिते पाठविले त्याची नक्कल हिंदवीः— '

हे दिवसांत प्रभारें कळलें असेल कीं, सांप्रतकाळीं हुजूर बादशाहा वालाजाह इंग्रेजस्थान व दिरेगतरान कंपनीकडून एक साहेब गव्हरनर नवा मुखतार कुल बंदरांचा व मुल्क हिंदुस्थान व येथील सारे इंग्रजांचा करार जाहाला हाई. स्नेही साहेबांसी दोस्तदार कदीम व दोस्त एकदिल कंपनी इंग्रेजांचा समजतो. हे गोष्टीवर नजर देऊन लिहिणें इखबरचे मरातिबे खिजमत मुबारकेमधे वाजीब जाणून लिहिन्यांत आनितो. तें वर्तमान ऐसें आहे कीं, सन १७८३ मसिहामध्यें विलायतेचे कारबारी यांसी समजन्यांत याप्रमाणें आले कीं, राहने तीन गवरनर व तीन कौंसल वेगळी वेगळी तीन जागा, बंगाल्यांत व मदिराजेत (मद्रास) व मुंबई ऐसे, कोन्ही परस्परें इलाका ठेवीत नाहींत. परंतु एक कपनीचे हुकमाशिवाय हे तिन्ही जाग्यांवरी दुसरेचे हुकूम जारी नाहीं. हे तिन्ही जाग्यांवरी कौलकरार वेगळे वेगळे करितात. व अवघे शरीक होऊन कौलकरारेची निघेवानी जैसी पाहिजे तैसी होत नाहीं. याजकरितां तेच समयों बादशाह वालाजाह परलमिंट (पार्लमेंट)चे हुजुरेहून हुकूम ऐसें जाहालें होतें कीं, तिन्ही जाग्यांचे कौसलियांवरी व सारे बंदरांवर व मुलकावर व फौजेवर एक मुखतार गव्हरनर जनरेल करार होवावा। आतांही बादशाहा वालाजाह परलमिंटचे

त्यांणीं कालपीस आपला अंमल जारी करून माघारी फिरून गेले. ह्मणून या दहा दिवसांच्या पत्रांतच हेंही वर्तमान होतें. श्रीमंत राजश्री दादासाहेब जेथें आहेत तेथेंच आहेत, व वे॥ राजश्री कृपाभट शास्त्रीबावांनीं आपल्यास आशीर्वाद फार फार सांगितले आहेत. आशीर्वादपत्र द्यावें ह्मणून मीं विनंति केली. त्यांनीं उत्तर केलें जे, एक दोन पत्रें पूर्वी लिहिलीं होतीं, त्यांचें उत्तर कांहीं आलें नाहीं. आमच्या आशीर्वादें त्यांचें कल्याण असो. ब्राह्मणराजाच्या कल्याणांत सर्वांचें कल्याण आहे. त्यांस स्मरणार्थ आमचा आशीर्वाद तुह्मीच ल्याहा ह्मणून बोलले. त्यांनीं येथें चाळीस दिवस दोघे ब्राह्मण व आपण अनुष्ठान केलें. आणि बोलले जे, येथून (शत्रूचा ?) पराजय. त्याप्रमाणें निदर्शनासही आलें. शास्त्रीबावांस पत्र येत असावें. ब्रह्मचारीबावा येथें आहेत. त्यांणींही पत्रें लिहिलीं आहेत. तें सेवेसी पाठविलीं आहेत. त्यास काय उत्तर येणें तें यावें. नित्य विचारीत असतात. सेवकाची खर्चाची फार तसदी आहे. वारंवार विनंतिपत्रीं लिहितों यास्तव धनी रागें भरतील. परंतु मी गरीब सेवकानें स्वामीवितरिक्त कोणास ल्याहावें ? येथें लोकांचें देणें जालें आहे. स्वामी कृपाळ समर्थ. हे विज्ञप्ति."

---

पे॥ चंद्र १५ जमादिलाखर. **लेखांक ४९.** ता. २८ मे इ. स. १७८१.
समन्ने समानीन. **श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शु॥ ५ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील वर्तमान पेशजीं डाकेबरोबर व कासीदजोडीबरोबर विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. प्रस्तुत सरकारचें आज्ञापत्र सेवकास चंद्र २७ रविलाखरचें, तें चंद्र २७ जमादिलावलीं संध्याकाळीं येथें पावलें. राजश्री बाजीराव बर्वे यांचा मजकूर आज्ञापिला, तो मनन करून पत्र एकांतीं बाईस वाचून दाखविलें. ऐकून बाई बोलली जे; बर्व्यांचा मजकूर आह्मींही श्रीमंतांस पत्रीं लिहिला आहे. ते पत्रेंही पावलीं असतील. तेथून उत्तर काय येतें तें पहावें. सरकारच्या पत्रान्वयें मीही थोडें थोडें बोललों. ऐकून उगीच राहिली. सांप्रत येथील प्रकार पाहतां, बुद्धीची स्थिरता थोडी. सबब कीं, श्रवण फार जालें आहे. ईश्वरपर पुराणें सदोदित ऐकतच आहेत, व राजकारणी मसलती सुभेदार कैलासवासी जाल्यापासून हा वेळपर्यंत स्वतःच एक आज्ञेनें कारभार करीत आली. ते सरकार उपयोग वगैरे कामेंकाजें एकनिष्ठ घडत आलीं. प्रस्तुत द्वामोशाग्न जालें. तें न व्हावें, पूर्ववत्प्रमाणें चालावें,

त्यामध्यें सरकारकामें व आपले घरचा श्रम राहून, यथास्थित चालत आल्याप्रमाणे पुढेंही वागणूक घडावी, या अर्थी वारंवार मध्यस्थासीं व कागदपत्रीं शिलशिला चाललाच आहे. परंतु उभयपक्षीं अनुमान दूर होत नाहीं. यास्तव आश्चर्य वाटतें. कीं धन्याची गादी श्रेष्ठ व कारभारी सर्वज्ञ, तेथें खरीखोटीयाचे निवाडे फार होत आले आहेत, आणि येथील सुधे चलनास विपर्यास कां पडतो, हेंच नवल वाटतें. घरांत कोठेंही दोन जाल्यानें त्या घरची काय अवस्था होती, हें इत्यादिक जाणतात. तेथें सर्वज्ञास न कळेसें काय आहे ? या अर्थी येथेंही कायम मिजाजी क्षणक्षणा राहत नाहीं. सबब कीं, जवळील ममलतगार आपलाले ओढीनें मसलत सांगतात. त्यामुळें बुद्धीची कायमता ठीक राहत नाहीं. सांप्रत मसलतशीर सरकार, यामुळें येथून बाईनीं सरकारआज्ञेप्रमाणें फौज वगैरे कोणतेही विषयीं सरकार उपयोगी पडावें, श्रीमतांचीं संकटें निवारण होऊन पुढें मातबर कामें काजें घडून यावीं, याअर्थी राजश्री माधवगव गंगाधर एकांतीं, सरकार उपयोगी व पुढें उभयपक्षीं कल्याण या भावीं, मातुश्रीस बगाय मसलत सांगून, कोणताही एक निश्चय दृढतर करून येतात. रात्रौ दुसऱ्यांनी जाऊन एकांतीं बाईस अनेक रीतीचे प्रस्तुत व पुढील मसलतीचे पैं दरपैं समजावून, केलेली मसलत मोडून, दुसराच विपर्यास समजावून बुद्धिभ्रंश करितात. दुसरे दिवशीं यांनीं जाऊन केले मसलतीचे अन्वय पाहतां, ते मर्जी बाईची नाही; आणीकच गोष्टी बोलितात. याप्रमाणें घडीघडीचे विचार सांगणार सांगतात. तेंच पसंत पडतें. यास्तव कायमतेची गोष्ट कोणतीही येथील लिहितां येत नाहीं. राजश्री राघो रावजी, पारनेरीं अगर पुण्यांत असतील. त्यांस सरकारची आज्ञा बोलावून व्हावी कीं, तुम्हांकडील कारकून बाळाजी कृष्ण बाईजवळ आहेत, ते बोलावून घेऊन दुसरा गरिबसा कारकून तेथें पाठवावा, अशी ताकीद बरेपणें व्हावी. येथून मीं असें लिहिलें ह्मणून कोणास न समजावें. येथील मुख्यान्या उक्ती व मुत्सद्यांनीं वगैरे देखलें ऐकलें लपेट व वर्तमान विनंतिपत्रीं लिहिलें आहे. निराळे निराळे पर्याय समजून तपशीलवार आज्ञापत्र पाठवणार धनी समर्थ. हरकुबाईचे गांवाविषयीं बहुत दिवस विनंति लिहितों. कृपा करून सोडणार धनी समर्थ. कासीदजोडीची रवानगी लवकर होय हे विज्ञप्ति. राजश्री पाटीलबावांकडील पत्र चंद्र १६ जमादिलावलचें राजश्री माधवराव गंगाधर यांस आलें. तें चंद्र २७ मिनहूस येथें पावलें. त्यांत मजकूर जे, नजबखान मयत जाला. पातशाहाजवळ कारभारी कोणी मातबर दाबाचा माणूस नाहीं. चेले आहेत. ते आपल्यांत आपण कज्या करितात. शिखांची दाटी आहे व चहूंकडील मुलकी बंदोबस्तही जाला पाहिजे. यास्तव पातशाहांनीं फार अगत्य धरून बोलाविलें आहे.

यास्तव जरूर जाणें लागतें. तिकडे गेल्यानें सरकारकामें फार आहेत, यास्तव गेलें पाहिजे. राजश्री आबाजी नाईक वानवळे हे निरोप घेऊन देशास जातों ह्मणून गेले, ते महेश्वरीं मातुश्रीची भेट घेऊन पुढें गेले. ते प्रस्तुत बऱ्हाणपुरीं आहेत. येथें लष्करांत सावकार कोणी मातबर नाहीं. यास्तव तुह्मीं कोणी मातबर मनुष्य पाठवून, नाईकमजकुरास महेश्वरीं बोलावून, मातुश्री व तुह्मी त्यांचें समाधान करून आह्मांकडे जरूर पाठवणें ह्मणून पत्र आलें. यांनीं बाईस दाखविलें. हे विचार करीत होती. तों तिसरे दिवशीं पाटीलबावांचीं दोन पत्रें एक बाईस व एक माधवरावजींस ऐशीं फार जलद पत्रें आलीं. यांही दोहीं पत्रांत हार्च अन्वय कीं, आबाजी नाईकांकडे कोणी मातबर मनुष्य पाठवून, त्यांस बोलावून आणून, त्यांची खातरजमा करून, चाळीस पन्नास लाखांचे सरंजामानिशीं येथें येत, असें लवकर करा. तें पत्र पाहून, बाईनीं व माधवरावांनीं विचार करून, राजश्री बाजी विठ्ठल यांची रवानगी नाईकांकडेस केली. येथून चंद्र १ मिनहूस स्वार होऊन बऱ्हाणपुरास गेले. बाईनींही आबाजी नाईकांस येण्याविषयीं पत्रें लिहिलीं आहेत व पाटीलबावांचींही वरचेवर डाकेबरोबर पत्रें नाईकांस जातच आहेत. हिंदुस्थानांत राजेरजवाडे यांचे हर्षामर्ष आपसांत फार लागले आहेत. परस्परें सर्वांचे वकील पाटीलबावांकडेस आले आहेत, ह्मणून वर्तमान ऐकिलें. राजश्री लक्ष्मण बल्लाळ उज्जनीस देवदर्शनास गेले आहेत. त्यांस जाऊन अकरा दिवस जाहले. दो चौं दिवसांत येतील. पाटीलबावांची स्त्री संगमनेरकरांची, कांहीं व्यथेमुळें उज्जनींत येऊन कांहीं दिवसां मयत जाली. बाजीराव बर्वे यांनीं पाटीलबावांस खासगत पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर आलें जे, बाईकडे तुह्मी आलां, उत्तम आहे. मातुश्री व आह्मी दुसरा विचार नाहीं. बाई श्रीमंतांकडे तुह्मांस पाठवितील तर पक्केपणें श्रीमंतांचें अभय घेऊन पाठवितील. तुह्मीं तेथें जायास अनमान कदापि करूं नये. असें पत्र आलें ह्मणून वर्तमान ऐकलें. सुरतेहून सावकारी वर्तमान आलें जे, ते प्रांतीं वारा व पाऊस व गारा पडल्या. समुद्रानेंही मर्यादा उलंघन करून वाढला. त्यामुळें दहा हजार घरहवेल्या पडल्या. सुरतेजवळ पांच जहाजें इंग्रजांची बुडालीं. त्यांत पांच हजार माणूस व पंचवीस लक्षांचा माल बुडाला; व.सुरतेपलीकडेही कोणी बंदर इंग्रजांचें आहे, तेथेंही पांच जहाजें बुडालीं. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. गोहदवाल्याकडीलही कोणी भला माणूस बाईकडेस आला आहे म्हणून वर्तमान ऐकिलें. पुरतेपणें शोध करून लिहीन. इकडे सेंधवें, नागलवाडी व थालनेर या मैदानांत संताजी होळकर व वाघ व बुळे व काशी रंगनाथ असे हजार बाराशें फौज जमली आहे. कांहीं पायदळही आहे. भिल्लांचें पारिपत्य

( करूं ) ह्मणतात. परंतु यांस कांहीं विपर्याससा भासला आहे. कांहीं येथीलही बंदोबस्ती करावी, असें योजनेंत आलें. न कळेशा आहेत. परंतु यांच्या चित्तांत कीं, ज्या पक्षीं श्रीमंतांशीं बोलणें लागलें आहे, श्रीमंत बोलतात; त्यापक्षीं यांच्यानें काय होणें आहे ? थोडे तरतुदींतही आहेत. श्रुत होय हे विज्ञप्ति. नवीन वर्तमानः–गोहजवाल्याचा वकील वीरेश्वरपंत नामें चंद्र २९ रविलाखरीं येथें आले आहेत. मातुश्रीस एक पत्र व माधवराव गंगाधर यांस एक पत्र ऐशीं दोन पत्रें घेऊन आले आहेत. बाईनीं त्यांस भेटीस बोलावून, चंद्र १ मिनहूस भेट होऊन, एकांतीं बाई व माधवराव व तो गृहस्थ ऐसे बसून, पत्रें यांनी दाखविलीं. जबानीही कित्येक मजकूर बोलले. बाईनीं माधवराव यांस सांगितले जे, तपशीलवार यांचें वर्तमान ऐकून मजला समजावणें. यांनीं आपल्या घरास त्यांस बोलावून तपशीलवार वर्तमान विचारिलें. त्यांनीं सांगितलें जे, शेषईवर इंग्रजांचे मसलतीवर राजश्री पाटीलबावा होते, ते समयीं मसलत कोणेही प्रकारें विल्हे लागेना. तदोत्तर गोहजवाले राणाजीस पाटीलबावांनीं बोलावून, इमानप्रमाण बेल-भंडार होऊन, उभयतां एकदील होऊन, इंग्रजांस राणाजींनीं भय प्रीत दाखवून इंग्रजांस तेथून उखळलें. ते मसलत एकीकडे जाल्यानंतर पाटीलबावांनी आमचेंच मूळ खणूं लागले. बहुत प्रकारें आह्मीं त्यांस सांगितलें, परंतु न समजेत. यास्तव पाटीलबावांनीं इमान बेलभंडार दिला आहे, तो श्रीमंतांकडे न्यावा तर दूर पंथ. पाटीलबावांनीं निकट केली आहे, यास्तव आपण वडील. वचनाचे साचे. कैलास-वासी सुभेदारांनीं ज्यास वचनें बेलभंडार दिले, ते निभावून हिंदुस्थान हस्तगत केलें. ती वहिवाट पाहून राजांनी आपल्याकडे पाठविलें आहे. आह्मांस हाती घेऊन पुढील कामेंकाजें आमचे हातें घ्या. असें बहुत प्रकारें वर्तमान सांगितलें. माधवरावजींनीं सविस्तर बाईस समजाविलें. बाईनी उत्तर केलें जे, पाटीलबावांस पत्र लिहा कीं, सर्वांशींच आपण वाईट जाल्यानें पुढें कोणी आपले बेलभंडारास पातेजून हिंदुस्थान हस्तगत कसें होईल? यास्तव, यांसीं सलूख प्रस्तुत राखून पुढील कामें करा. पुढें प्रसंगोपात हे आपले टाफेखालींच आहेत. आतांच यांसी बिघडूं नये. इंग्रजांचेंही पारिपत्य पुरतेपणें जालें नाहीं. यास्तव, प्रस्तुत राणाजीसी सलूख राखून पुढील कामें करा. राणाजीचा वकील येथें आला आहे. त्यास आह्मी आपल्याजवळ ठेऊन घेतलें आहे. तुमचें उत्तर आल्यावर वकिलाबरोबर येथून कोणी भला माणूस देऊन तुह्मांकडे पाठवूं. असें पत्र लिहिणें ह्मणून सांगितलें, व आबाजी नाईक बानवळे यांस आणायास बाजी विठ्ठल पाठविले ह्मणून पत्रें पाटीलबावांकडेस लिहिलीं पाठविलीं. उत्तरें आल्यावर वकिलाबरोबर भला माणूस देऊन रवाना करितील.

बाजीराव बर्वे यांस आणावयास विसाजी काशी व दोघे हुजरे येथें आले आहेत. त्यास बर्व्यांचे येण्याचा प्रकार लांबला. तेथून आज्ञापत्र येईल त्याअन्वयें त्यांचें येणें. हुजरे येथें फार श्रमांत आहेत. यास्तव आज्ञा आली तर हुजूर येऊं ह्मणतात. येविषयीं काय ती आज्ञा आणवा ह्मणून त्यांनीं सांगितलें आहे. सेवकाची खर्चाची फार तसदी. स्वामींची तों दर आज्ञापत्रीं आज्ञा येती जे, चारशें रुपये तुह्मांस खर्चास देविले आहेत. सबनिसाजवळ दिले आहेत. या गोष्टीस पांच महिने जाले. एक कवडी इकडे आली नाहीं. सबनीसही पत्र देखील लिहीत नाहींत. येथें आज अठरा महिने जाले, कर्ज खातों. सहाशें रुपये लोकांचें देणें जालें आहे. त्या देणेदारांचा व नित्यकृत्याचा उपद्रव श्रम कोठवर वारंवार पत्रीं विनंति लिहूं ? येथें मेलें तर कोणी समाचार घेणार नाहींत. सबनिसांची कांहीं देवघेव मजकडे आहे. त्यास दोन तीनशें रुपये त्यांस व्याजबट्यांत पावलेही आहेत. थोड्या बहुतानें वरचेवर पावतच आहे. असें असतां अशा श्रमांत त्यांनीं ऐवज अटकावून ठेवावा असें नाहीं. येथील देण्यापासून मुक्तता होय असें करणार धनी समर्थ. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ५०.** ता० ३१ मे इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० ज्येष्ठ शु॥ ९ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेषः— इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र २१ मिनहूस डांकेबरोबर पत्रें रवाना केलींच आहेत. सेवेसी पावतील. सांप्रतचें वर्तमान राजश्री नारो शिवदेव व राजश्री आबाजी नाईक बानवळे हे उभयतां उज्जनीहून येथें चंद्र २० रोजीं आले. पांच सहा दिवस येथें होते. बाईचें त्यांचें बोलणें होऊन, चंद्र २६ रोजीं त्रितीय प्रहरीं मातुश्रीचा निरोप घेऊन उभयतां रवाणार जाले. चंद्र २७ रोजीं प्रातःकालींच कूच करून स्वार होऊन गेले. ऐकिल्यांत आलें जे, नारोपंत आसेरचे मध्यस्थींत जातात. आबाजी नाईक तों आपले घरास जातात. इतकें वर्तमान ऐकिलें. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान येथें दरबारांत ऐकिलें. पाटीलबावांनीं आपले कबिले दरोबस्त उज्जनीकडे रवाना केले. सडेच आठ दहा हजार फौज व दहा हजार गोसावी, कांहीं तोफखाना, इतक्या सरंजामानिशीं गोहज व ग्वालेरच्या दरम्यान आहेत. गोहजवाल्याच्या पांच सात गढ्या घेतल्या. आणीकही मातबर गढ्या घेणार. दीड हजार फौज कोणी अविंध

सरदार बाबांकडील होता, त्याजबरोबर फौज देऊन कच्छवाघर प्रांतीं पाठविलें होते. त्यास, गोहजवाल्यानें दोन पलटणें गुप्तरूपें पाठवून त्या फौजेवर छापा घातला. फौज शिकस्त जाहली. दहा पंधरा स्वारांनिशीं तो आविंध निघून पाटीलबावांकडेस आला ह्मणून ऐकिलें. राजश्री बाजीराव बर्वे यांचा मजकूर तरः—येथें त्यांचे तोडमोडीचे जाबसाल होऊन, येथून बाईनीं व राजश्री लक्ष्मण बल्लाळ व राजश्री माधवराव गंगाधर यांनीं सरकारांत पत्रे लिहिलीं आहेत. सरकारची आज्ञा जशी येईल तशी वर्तणूक करितील. पाटीलबावांकडून चंद्र २७ रोजीं डांकेबरोबर पत्रें नारो शिवदेव यांजकडें आलीं. तीं रेवा दक्षिणतीरीं त्यांजकडेस गेलीं. त्यांनीं वाचून पाहून बाईकडेस पत्रें पाठविलीं, नी नारोपंत पुढें बऱ्हाणपुरास गेले. ती पत्रें बाई व माधवराव गंगाधर व राजश्री लक्ष्मण बल्लाळ त्रिवर्ग एकांतीं बसून वाचून पाहिलीं. तीं पत्रें पाटीलबावांनीं सरकारांत स्वामींस लिहिलीं आहेत. त्यांत मजकूर जे, बाईच्या व राजेश्री तुकोजी होळकर यांच्या गृहकृत्यांमुळें चित्तशुद्धता नाहीं. येविषयीं सरकारांतून राजश्री बाबुराव वैद्य येथें आले होते. इकडून नारो शिवदेवही आले होते. उभयतां चार पांच महिने महेश्वरीं राहून, तोडमोडीचीं भाषणें चिकित्सायुक्त होऊन, वरचेवर सरकारांत व आह्मांकडे लिहीत गेले. त्या पत्रांचीं उत्तरें सरकारांत व बाबुरावजीस व नारोपंतांस आह्मी लिहीत गेलों. शेवटीं ठरलें जे, कैलासवासी सुभेदार गेल्यापासून बाईकडे मुलकी वगैरे दौलतीचा कारभार चालत आला. तुकोजीबावा चाकरी करीत आले आहेत. त्यास प्रस्तुत तुकोजीबावा व नारो गणेश यांनीं वेगळें ( फाटलें.... ) आहे. दोन वर्षेपर्यंत राडा पडला आहे. शेवटीं, बाबुराव वैद्य इकडील सर्व मंडळी आदिकरून आह्मी सर्वांचे संमतें ठरावून गेले जे, बाईंनी पूर्ववत्प्रमाणें सरदारीचे डौल चालवावे. तुकोजीबावांनीं फक्त चाकरी करून असावें. याप्रमाणें येथें निश्चय होऊन हुजूर विनंति करावयास गेले. त्यासही आठ नऊ महिने जाले. परंतु अद्याप कोणताही ठराव होऊन निश्चयपत्रें आलीं नाहींत. रुबरू माझे संमतेंकरून निश्चय व्हावा अशी सरकारची मर्जी असल्यास, आपणासही देशीं गुरुदर्शनास येणें आहेच. आज्ञापत्र आलें तर याप्रमाणेंही घडेल. नाहीं, या पक्षीं मर्जी उदासच असली, तर बाईस काशीस जावयाचीं पत्रें व दस्तकें आलीं ह्मणजे मातुश्रीस आह्मीच महायात्रेस घेऊन जाऊं. याप्रमाणें पत्रें पाटीलबावांचीं सरकारांत पाठवायास आलीं आहेत. येथें पत्रें वाचून पाहिलीं, त्याअन्वयें लक्ष्मण बल्लाळ यांचें पत्र सरकारांत व रावजीस व माधवराव गंगाधर यांचें पत्र राजश्री दादाजीस व बाईचीं पत्रें सरकारांत अगर रावजीस अगर दादाजीस कोणकोणास लिहितील तीं लिहोत. यांचीं व पाटीलबावांचीं

पत्रें सरकारांत पाठविणार ह्मणून वर्तमान ऐकिलें. पाटीलबावांकडून दुसरीं पत्रें आल्यावर हें पत्र पाठविणार म्हणून वर्तमान ऐकिलें. चिमाजी बुळे यांनीं कांहीं जमाव जमा केला आहे, व सेंदवेकर संताजी होळकर यांचे दोनशें स्वार व कांहीं पेंढारी ऐसे व कांहीं पायदळ जमा करून, खरगोण वगैरे प्रांतांत धामधूम करावी, महेश्वराभोंवतींही गडबड करावी, असे योजनेंत आहेत. हें वर्तमान बाईस कळलें. त्यास बाईनीं येथून एक पागा नागलवाडीस पाठविली आहे, कीं चिमाजी बुळ्याजवळ उतरा. त्यांचें चेष्टित काय तें ध्यानांत धरून वरचेवर लिहून पाठवीत जाणें. ह्मणून त्या पाग्यास बाईनीं सांगितलें आहे. बुळ्यांनीं आवई टाकिली आहे कीं, भिल्लाभावरांचें पारिपत्य केलें पाहिजे, यास्तव जमाव करितों. आपणही कांहीं सरंजाम पाठवावा. ह्मणून बाईकडे कारकून पाठविला होता. बाईनीं सांगितलें जे, आह्मींही पागा पाठविली आहे. उभयपक्षींही असे घावडाव चालत आहेत. असें वर्तमान ऐकिलें. दादासाहेबांकडील वर्तमानः— श्रीमंत सुरतेसच आहेत. त्यांजकडील दोन पलटणें खडक्याव्याऱ्यावर आहेत. राजश्री गणेशपंत बेहेरे चार पांच हजार फौजेनिशीं दहीवलीवर आहेत. हें वर्तमान नंदुरबारेहून कोणी भले माणूस आले त्यांनीं सांगितलें. लालजीदास सावकाराचा मूल येथें बाईजवळ आहे. खर्चाच्या ऐवजाकरितां बाईनीं येथें अटकावून ठेविला आहे. त्यास हुजूर पाठवावा ह्मणून पेशजीं जासूदजोडी आली होती. सांप्रत हुजरेजोडी सरकारचीं पत्रें घेऊन आले, ते अक्षतत्रितीयेस दों प्रहरां येथें आले. दरवाज्याची परवानगी देऊन किल्यांत घेतले. बाईनीं रुबरू बोलावून वर्तमान विचारलें. यांनीं पत्रें देऊन जबानींही सांगितलें. सावकाराचा मजकूर ऐकिला. संध्याकाळीं बाईनीं हुजऱ्यास वाड्यांत जेऊं घालून, विसाजी काशी त्यांजवळ उतरावयास पाठविलें. हुजऱ्यांजवळील पत्र पाहून बाईस वैषम्य फार वाटलें जे, सावकाराचा प्रकार कसा, तो तपशीलवार पेशजीं श्रीमंतांस आह्मीं लिहून पाठविला असतां, फिरून श्रीमंतांनीं त्याच मजकुराकरितां पत्रें देऊन हुजरे पाठविले. तस्मात् तुकोजीबावा व नारो गणेश व लालजीदास यांनीं जे जे बनावून गोष्टी सांगतात, त्याच गोष्टी श्रीमंतांस सत्य भासल्या. आह्मीं जें तपशीलवार पत्र लिहिलें तें मिथ्या भासलें. किंवा, आतांची रीत अशीही जाली असेल कीं, ज्यांनीं जो गैरवांका समजावून सांगितला, तोच मनन होऊन पत्रें व हुजरे व जासूद देवितात. छान करण्याची रीत ज्यांची त्यांजमागें गेलीशी दिसती. असो. आह्मांस तों वाजवीचे रीतीनें सावकाराजवळून पैका घेतला पाहिजे. हुजऱ्यांस उत्तरें देऊन बिदा करा. आजच बिदा करा. एकंदर येथें हुजरे राहूं देऊं नका. फार रागें भरली. तेव्हां मुकुंदराव हरी व लक्ष्मण बल्लाळ यांनीं बहुत प्रकारें बाईस सम-

जावून सांगितलें. पत्रांचीं उत्तरें लिहावयास तों आज्ञा जाहली. तिसरे दिवशीं, लक्ष्मण बल्लाळ व माधवराव व मुकुंदराव यांस बाईनीं सांगितलें जे, हुजऱ्यांशीं व त्या सावकाराच्या मुलांशीं तुह्मी बसून रुबरू करा. आह्मी येथें तसदी त्यास काय करितों व गैरवाजवी आह्मी काय करितों, हेंही त्यास समजूं द्या. उत्तरें देऊन हुजऱ्यांस वाटे लावा. कदाचित् त्यांनीं आड केली तर परिछिन्न हुजऱ्यांस नावेंत घालून पार करून द्या. गैरवाजवीच आह्मी करूं, तेव्हां अपराधही पदरीं घेऊं. ज्यापक्षीं आह्मांसच गैरवाजवी करणें नाहीं, तेव्हां आमचे येथील जाबसाल आह्मी वहिवाटल्यास श्रीमंत कोणावर रागें भरतील? आह्मी आपले येथील कारभार हा वेळपर्यंत हुजूर पाठविला नाहीं, आणि अशा कामास सरकारचे हुजरे येण्याचाही सांप्रदाय नाहीं. हुजऱ्यांनीं पत्राचीं उत्तरें घेऊन जावीं. असें रागें भरून बाई बोलली. यांनीं त्रिवर्गांनीं सावकाराची व हुजऱ्यांची रुबरू केली. पत्राचीं उत्तरें घेऊन जा ह्मणतात. हुजरे ह्मणतात जे, आह्मांस सरकाराची आज्ञा येईल तेव्हां जाऊं. अद्याप बाईच्या कानां घातलें नाहीं. पुढें काय जाबसाल होईल तो पहावा. ह्याप्रमाणें लक्ष्मण बल्लाळ बोलत होते. तें ऐकिलें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. स्वामी ह्मणतील कीं, ऐकिलें वर्तमानच लिहितां; तुह्मांस तेथें कशास ठेविलें आहे? तेविषयीं विनंतिः--प्रस्तुत जाबसालचें कामकाज जिकडे आहे, त्यांसींच बोलणें चालणें एकांतीं दुकांतीचे बोलत आहेत. त्या बोलण्यांत त्यांनीं न बोलावितां जाणें युक्त दिसत नाहीं. तत्रापि दोन चार वेळां तसेंही जाऊन पाहिलें. परंतु त्यांस व खलबतच्या मुत्सद्यांस संशय पडूं लागला. यास्तव मातुश्रीस नित्य एक वेळां दरबारचे समयीं मुजरा करून, दोन घटका बसून, दरबार बरखास जाहला, ह्मणजे लक्ष्मणपंतांकडे जाऊन त्यांस नमस्कार करितों. ते वर्तमान सांगतात तें व कांहीं कोठें ऐकिलें वर्तमान सेवेसी लिहीत आहें. दुसरें वर्तमानः–राजश्री पाटीलबावांचे कबिले वैशाख शु॥ द्वितीयेस उज्जनीस दाखल जाले. राजश्री बाजीराव बर्वे यांचीं घोडीं धर्मपुरीस ठेविलीं होतीं. त्यास वैशाख शु॥ ४ बुधवारीं, जे पागेंत घोडीं होतीं, ते पागेस अग्नीचा उपद्रव जाहलाः तेथेंच हजार दोन हजार बाणही गांववाल्यांचे होते, त्या बाणांसही आग लागली. गवताच्या गंजांसही आग लागली. घोडीं सारीं आगीच्या व बाणांच्या उपद्रवानें मेलीं. एकशें त्रेचाळीस घोड्यांत पंचवीस घोडीं वांचलीं आहेत. त्यांतही दहा बारा मरतील. जळालीं आहेत. कांहीं कापडही जळालें. रावजीचें कांहीं जवाहीरही लक्षपरियंत होतें तेंही जळालें. याप्रमाणें पंचमीस प्रातःकाळीं गुरुवारीं येथें वर्तमान आलें. दिलीहून पंधरा दिवसांचीं

# ४०. घांशीराम कोतवाल.*

खालील पत्र सातारा येथील बारामतीकर जोशांच्या दप्तरांतील आहे. त्यांत घांशीरामानें ब्रह्महत्या केल्याबद्दल त्यास झालेल्या शासनाची इत्थंभूत हकीकत दिली आहे. त्यावरून नाना फडणवीस घांशीरामाचा कितपत पक्षपाती होता, तें दिसून येईल. 'श्रीमंत' हें विशेषण नाना फडणविसाला लावलें आहे, 'रावसाहेब' या शब्दानें सवाई माधवरावाला संबोधिलें आहे. घांशीराम हा पुणें शहरचा कोतवाल ह्मणजे पोलिस अधिकारी होता. त्याची बूज राखणें हें मुख्य सत्तेचें काम होतें. पोलिसाला नाना प्रकारचीं खुळें उघडकीस आणावयाची कामगिरी दिली असल्यामुळे, तें लोकनिंदेस प्रायः सर्व राजवटींत पात्र होतें, व त्यांच्या निंदेबरोबर मुख्य सत्तेचीहि निंदा लोक करीत. तोच प्रकार घांशीरामासंबंधानें झालेला दिसतो. तत्रापि, घांशीरामाचा अपराध दिसून आल्याबरोबर नानांनीं त्याचें पारिपत्य केलें, हें स्पष्ट आहे. धर्मशास्त्राप्रमाणें बहुब्राह्मणवधाला जी शिक्षा सांगितली आहे, तीच शिक्षा घांशीरामाला दिली. ब्राह्मणहत्येची प्रथम बातमी मानाजी फांकडे यानें दिली, हीहि बाब लक्ष्यांत घेतली पाहिजे. मानाजी फांकडे कोणत्या पक्षाचा होता व नानांवर त्याचें कितपत प्रेम होतें, तें प्रसिद्धच आहे.

ग्रांटडफनें घांशीरामाच्या वधाची हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें दिलेली आहेः—

"At last it being suspected that Gassee Ram was starving a respectable Brahmin to death, Mannajee Phakray headed a party of the people, broke open the prison, and rescued the unfortunate Brahmin, which led to the detection of the monster's crimes; and he fell a victim to the vengeance of the exasperated populace by whom he was stoned to death." (—*History of the Mahrattas. P. 550* ).

ह्या हकीकतीमध्यें व अस्सल पत्रांत दिलेल्या माहितीमध्यें किती तफावत आहे, हें वाचकांस दिसून येईलच.

घांशीरामानें एकवीस ब्राह्मण मरूं दिले कसे, त्याची वास्तविक कथा अशी आहेः—त्या काळीं तैलंगणांतून आलेले कोमटी, ब्राह्मण वगैरे लोक पुण्यांत चोऱ्या

* इतिहाससंग्रहाच्या ८ व्या अंकामध्यें ऐतिहासिक गोष्टी ह्या सदराखालीं घांशीराम कोतवालाची माहिती दिली आहे. तींत त्याच्या वधाची सर चार्लस मालेट ह्यांनीं लिहिलेली हकीकत दिली आहे. रा. राजवाडे ह्यांनीं बारामतीकर जोशांच्या दप्तरांतील घांसीरामाच्या वधाच्या हकिकतीचें मनोरंजक व महत्त्वाचें पत्र पाठविलें आहे, तें ह्या टिपणामध्यें दिलें आहे. ह्या पत्रामध्यें घांशीरामाच्या वधासंबंधाचा चांगला खुलासा आहे.

करीत. कित्येक तेलंगे परराज्यांतून भिक्षा मागण्याच्या मिषानें हेर येत. त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम घांशीरामाचें होतें. तशांत, स्वतः घांशीराम तुरुंगाच्या कोठडींत सदाच जात नसे. हाताखालील शिपाईप्याद्यांच्या कडून तपासणीचें काम पोलिस सुपरिंटेंडंट या नात्यानें तो करीत असे. शिवाय, अफू खाऊन त्यांनीं प्राण दिला, अशी त्याची जबानी आहे. सारांश, घांशीराम पोलिसकाम करीत असतां, हा अनन्वित प्रकार घडून आला. त्यानें ब्राह्मण मुद्दाम मारले नाहींत. भटजी-तात्यांनीं जी चवकशी केली, त्यांत ब्राह्मण **मरावयाचें** कारण काय, असा प्रश्न केलेला आहे; **मारावयाचें** हा शब्द योजलेला नाहीं.

[ जोशांचें दप्तर, सातारा.] **श्री.** शक १७१३ भाद्रपद शुद्ध ४.

"वडिलांचे सेवेसीं सां नमस्कार–

विज्ञापना ऐसीजे:—पुण्याहून पस्तीस असामी तैलंग ब्राह्मण आपले देशास जाण्याकरितां निघोन घांसीराम कोतवाल याचे तळ्यावर गेले, आणि सायंकाळचे चार घटका दिवसास स्वयंपाक करावयास लागून अस्तमान दोन घटका रात्रीस भोजन केलें. नंतर चार घटका आटपाआटप करावयास लागली. तों इतकियांत कोतवालाचे प्यादे त्यांचे पेठेतून पाचसात प्यादे जाऊन, तितक्या ब्राह्मणांस भवानीपेठेंतील चावडीस आणून, एका खणाचें भुयार आहे त्यांत पस्तीस असामी कोंडिल्या. त्यांत वारा जाण्यास जागा नाहीं. सबब, ब्राह्मण आंत कोंडमारा होऊन एकवीस असामी मृत्य पावले. घातल्यापासोन तिसरे रोजीं, रा० मानाजी फांकडे चावडीजवळ राहातात, त्यांस त्या भुयारांत गलबा होऊं लागला हा कशाचा ह्मणोन, आपण खुद त्या भुयाराजवळ जाऊन कुलूप तोडवून पाहिलें, आणि श्रीमंतांस ब्राह्मण मेल्याचें वर्तमान सांगून पाठविलें. नंतर श्रीमंतांनी चार प्यादे व एक कारकून चौकशीस पाठविला. तों इतकियांत घांसीराम याणें वाड्यांत येऊन विनंति केली जे, कोमटी पंचवीस तीस असामी माझे तळ्यावर येऊन राहात आणि शहरांत चोऱ्या करीत होते, त्यांस धरून आणून ठेविलें. त्याणीं आफू खाल्ली; तेणेंकडून मृत्यु पावले. आज्ञा जाहाल्यास मूठमाती देतों. उत्तर जाहालें जे, चौकशीस कारकून गेला आहे; तो आल्यानंतर सांगणें तें सांगूं. असें बोलून, चिचवडचे देवांस पुलापलीकडे सामोरे गेले. तेथून स्वारी फिरोन बेलबागेंत आल्यावर घांसीरामानें गांठ घालून गैरवाका समजावून मूठमातीची परवानगी घेतली आणि आपले घरास गेला. इतक्यांत श्रीमंत राजश्री रावसाहेब यांनीं श्रीमंतांस बोलावू पाठविलें. वाड्यांत गेले. तेव्हां रावसाहेब याणी विचारिलें जे, घांसीरामानें ब्राह्मण मारिले, त्यास त्याची चौकशी होऊन घांसीरामाचे पारपत्याचें काय ठरविलें ? उपरांत, आज्ञा होईल तसें करूं ह्मणोन बोलून, घांसीरामास बोलावूं पाठविलें. तो आला. तों श्रीमंतहि सरकारवाड्यांतून आपले घरास आले, आणि वे॥ भटजीतात्यांस

चौकशी सांगितली. त्यांणीं कोतवालमजकूर यास, ब्राह्मण कशाकरितां कोंडिले व मरावयाचें कारण काय? जें खरें असेल तें सांग. असा प्रश्न केला. तेव्हां त्याणें उत्तर केलें जे, चोर ह्मणोन कोंडिले. ते अफू खाऊन मेले. यांत माझें कांहीं कृत्रिम नाहीं. असें ह्मणत आहे तों रावसाहेब यांचा निरोप आला जे, •त्याचें पारपत्य चांगलें करावयाचें. याचें ह्मणणें तों या प्रकारचें, व श्रीमंत राजश्री नानाचे वाड्यापासीं हजारपंधरासे ब्राह्मण मिळोन नाना प्रकारच्या वल्गना करूं लागले. तेव्हां सर्व मजकूर भटजींनीं श्रीमंतांचे कानावर घालून, कोतवालाच्या मुसक्या बांधून गाड्यांचे पहाऱ्यांत ठेविला. तरी तेलिंग ब्राह्मण अतित्यायीपणास न चुकत! हत्तीचे पायास बांधल्याशिवाय आह्मांस आपले बिऱ्हाडीं जावयाचें नाहीं. नंतर वे॥ राजश्री अय्याशास्त्री यांस ब्राह्मणांचे मध्यस्तीस घातलें जे, उदईक तुमचे ह्मटल्याप्रमाणें याचें पारपत्य करितों. तरी ब्राह्मण न ऐकत. शास्त्री यांचे आंगावरील वस्त्रें, धोत्र नेसावयाचें सुद्धां, झोंबून फाडिलें; व श्रीमंतांचाहि निग्रह पाहून, प्रथम प्रहर रात्रीस हत्ती आणवून वर्ता त्यास घालून बांधिला, आणि सर्व शहर फिरवून पर्वतीजवळील रमण्यांत नेऊन पायांत बेडी घालून ठेविला. शहरांतून फिरते वेळेस ब्राह्मणांनीं कोतवालास पांचसात दगड मारिले. तेणेंकरून कांहीं डोकीं फुटलीं होतीं, व शंभर गाडदी चौकीस होते. नंतर दुसरे रोजीं, भाद्रपद शुद्ध द्वितीया बुधवार प्रातःकालीं, ब्राह्मण मागतीं दोन हजारपावेतों अजमासें जमा होऊन, श्रीमंतांचे वाड्यापुढें बहुतच गरगशा करूं लागले; आणि बोलत जे, त्यास जिवें मारल्याशिवाय आह्मी ऐकत नाहीं, व श्रीमंतांचेंहि ह्मणणें, त्यास जिवें मारावयाचा. त्याजवरून राजश्री बाळाजीपंत केळकर नि॥ राघोपंत गोडबोले यांस रमण्यांत पाठवून, त्याची बेडी तोडवून, उंटावर उंटाचे + डीकडे तोंड करून बांधून, कोतवाल चावडीस आणिला. आणि पांच पाट काढून, शेंदूर डोकींत घालून, पुन्हां उंटावर पूर्ववत्प्रमाणें घालून आठी पेठा फिरविला, आणि गारपिरावर नेऊन सोडिला. आणि ब्राह्मणांस सांगितलें जे, तुह्मांस पाहिजे तर सोडा किंवा मारा. असें सांगून हवालीं केला. त्याजवर दोन घटका दिवसास सायंकाळच्या राहातां, ब्राह्मणांनीं धोंडे घालून मारिला. त्यास दहन करावयाची देखील परवानगी नाहीं, व कोतवालमजकूर याचा दिवाण बापूजीपंत व गोपाळपंत व केसोपंत भावे यांचे घरीं चौक्या बसवून बेड्या घालून ठेविले आहेत. त्यांचेंहि पारपत्य यथास्थित चांगलें करणार, व प्यादे व माणसें ब्राह्मणांस धरून आणावयास व कोंडून ठेवावयास जे होते, त्यांचीं पारपत्यें शिरच्छेदाचीं करावीं, असा श्रीमंतांचा मनोदय आहे. पुढें काय घडेल तें पाहावें, व कोतवालमजकूर याचे घरची जप्ती मुलांमाणसांसुद्धां करून चौक्या बसविल्या आहेत, व दोघां लोकांस बेड्या घातल्या. याप्रमाणें येथें जाहालें तें स्वामींस कळावयाकरितां लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना."

* * *

# ४१. घांशीराम कोतवालाचा वध.

घांशीराम कोतवालाचा ता. ३१ आगस्ट इ. स. १७९१ रोजीं पुणें येथें वध झाला. तो नाना फडणविसांच्या फार कृपेंतला होता, हें लोकप्रसिद्धच आहे. अर्थात् नानांच्या मेहरबानींतल्या एवढ्या मोठ्या अधिकाऱ्यास आकस्मिक रीतीनें ज्या वेळीं देहान्त प्रायश्चित्त मिळालें, त्या वेळीं पुण्यांत फार चळवळ व्हावी व नानाप्रकारच्या कंड्या उठाव्या, हें अगदीं साहजिकच आहे. त्याप्रमाणें नानाप्रकारच्या बातम्या चोहोंकडे पसरल्या. साताऱ्यास नानांनीं आपल्या विश्वासांतले बाबूराव कृष्ण आपटे ह्मणून एक इसम तेथील बंदिवासांतल्या राजांची व्यवस्था पाहाण्याकरितां ठेविले होते, त्यांना हें घांशीरामाच्या मृत्यूचें वर्तमान व इतर भयंकर बातम्या समजल्या. तेव्हां त्यांनीं भयभीत होऊन नानांस कच्चें वर्तमान विचारिलें. त्यांनीं त्यांस जें थोडक्यांत उत्तर लिहिलें आहे, तें फार महत्त्वाचें आहे. त्यांत "कोतवालाच्या अपराध पातकांची पराकाष्ठा झाली, सबब पारिपत्य केलें" असें एक स्पष्ट वाक्य आहे. त्यावरून घांशीरामाचे अपराध नानांस माहित होते व त्यास शिक्षा करण्यास त्यांची संमति होती, हें व्यक्त होतें. ह्यावरून नानांस न विचारतां श्रीमंतांनीं स्वतः कोतवालास कैद करण्याचा हुकूम दिला व नानांनीं त्यास लपवून ठेविलें वगैरे जो लोकप्रवाद आहे, त्यांत तथ्यांश दिसत नाहीं. ह्याच पत्रांत नानांनीं, "लबाड व द्वेषी आहेत, ते मनस्वी गोष्टी उठवितात. ही पुण्यांतील लोकांची रीत चाललीच आहे." ह्मणून एक वाक्य लिहिलें आहे. त्यावरून, हे सर्व लोकप्रवाद झूट आहेत असें मानावें लागतें.

[ मेणवलीदप्तर. ] **श्री.** ता. ११ आक्टोबर इ. स. १७९१.

"राजश्री बाबूराव स्वामींचे सेवेसीः—

विनंति उपरीः—तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तुह्मीं आपला यावयाचा मजकूर लिहिल्यांत. त्यास, श्रीमंतांची स्वारी सातारियास यावयाचें ठरल्यास मग येण्याचें कारण नाहीं. तेथेंच भेट होईल. तेथें यावयाचें न ठरल्यास मग लेहून पाठवूं. *वरकड कोतवालाचे पारपत्याचा वगैरे मजकूर विस्तारें लिहिला, त्यास कोतवालाच्या अपराध पातकांची पराकाष्ठा जाली, सबब पारपत्य केलें. वरकड मजकूर लिहिले ते सर्व लटके! लबाड व द्वेषी आहेत, ते मनस्वी गोष्टी उठवितात. ही पुण्यांतील लोकांची रीत चाललीच आहे. रवाना छ १२ सफर हे विनंति."

* * *

* येथून नानांचें स्वतःचें हस्ताक्षर आहे.

## ४२. शाहू महाराजांचा मृत्यु व रामराजाचें सिंहासनारोहण.

शाहू महाराज सातारा येथें ता. १५ दिसेंबर इ. स. १७४९ रोजीं मृत्यु पावले. त्या समयीं बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे साताऱ्यास हजर होते. त्या प्रसंगीं त्यांनीं जो बंदोबस्त केला, त्याचें वर्तमान त्यांनीं ठिकठिकाणच्या मराठे सरदारांस लिहिलें. त्यांपैकीं अमृतराव शंकर दिनकरराव ह्या मराठे सरदाराकडून पेशव्यांच्या पत्रास आलेलें पुढील उत्तर आहे. अमृतराव हा शूर सरदार असून तो पूर्वदिशेस ह्मणजे बंगाल्यांतील मोहिमेंत गुंतलेला होता. हें पत्र फार मनोरंजक व महत्त्वाचें आहे. त्यावरून शाहूच्या मृत्यूनंतरच्या राजकीय बंदोबस्ताची व बाळाजी बाजीरावाच्या धूर्तपणाची व वजनाची कल्पना येते.

[ सातारादप्तर. ] श्री. ता. ८ मे इ. स. १७५०.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक अमृतराव शंकर दिनकरराव साष्टांग दंडवत प्र॥ विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता॥ छ १२ जमादिलाखर महाराजांचे कृपावलोकनेंकरून यस्थास्थित असे. विनंतिः— सेवकावरी कृपा करून आज्ञापत्र छ ६ सफरीचें सादर जाहालें, तें छ १३ रबिलाखरीं पावलें. मस्तकीं वंदून सनाथ जाहालों. 'श्रीमंत कैलासवासी महाराजांस अधिकमासांत अनारोग्यता प्राप्त जाहाली. उपाय बहुत जाहाले. तथापि, होणारानुरूप छ १५ मोहरमीं राजश्री स्वामींनीं कैलासवास केला. सौ॥ बाईसाहेबीं सहगमन केलें. मोठी अनुचित गोष्ट जाहाली. ईश्वरइच्छेस उपाय नाहीं. कैलासवासी महाराजासारिखा गरीबनवाज[१] राजा होणें नाहीं. परंतु भावी पदार्थ ऐसाच होता. कैलासवासी महाराज वर्तमान असतां, आह्मांस समीप बोलावून, स्वकीय सार्थकाविसीं व सलतनतेच्या[२] बंदोबस्ताविसीं कित्येक प्रकारें सांगितलें. त्यावरून आगाव पंचवीस तीस हजार फौज जमा करून सातारा राहिलों. राजश्रींनीं परलोकसाधन करितांच, तमाम पुरेजात[३] व कारखाने व राजमंदिरीं चौक्या ठेवून बंदोबस्त केला. राजश्रींस माहुलीसंगमीं नेऊन यथोचित सार्थक केलें. राजश्री राजारामसाहेब पानगांवी होते. त्यांस आणावयाच्या विचारात कैलासवासी महाराज होते. तेव्हां प्रसंग जाहालियावरी आणावयास फौज पाठविली. छ २६ मोहोरमीं आले. तमाम राज्यांतील सरदार, सरकारकून, अरकानी[४]-दौलतानी, समस्त लहानथोरीं तसलीमात[५] बज्याआणिली[६]. श्रीनें राज्यपदारुढ केलें. छ ६ सफरीं सिंहासनारुढ जाहाले. मोठा जलूस[७] जाहाला. उमर बेवीस तेवीस वर्षांची.

---

१ गरीबनवाज=सौजन्याविषयी प्रसिद्ध, भोळेपणाविषयी प्रसिद्ध. २ सलतनत=गादी, राज्य. ३ पुरेजात=सर्व पेठा. ४ अरकानी दौलतानी=दौलतीचे खांब, राज्याचे आधारस्तंभ, मुख्य मुत्सद्दी. ५ तसलीमात=वंदन, प्रणाम. ६ बज्याआणिली=बजाणिली=बजाविली. (?) ७ जलूस=उत्सव, समारंभ.

तारुण्य राजतेजयुक्त, प्राक्रमवान आहेत. तदनुरूप किमपि व्यंग न पडतां, राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें जाहाला. उभयतां सरदार माळवा प्रांतें रवाना जाहाले.'* ह्मणून लिहिलें तें कळलें. कैलासवासी महाराज केवळ अवतारी, पुण्यवान् होते. दिग्विजय संपादून तमाम राजप्रजा स्वामींस निरवून परंधामास गेले. स्वामींनीं यथोचित सार्थकता करून, त्यांच्याच मनोभिष्टानरूप राजश्री छत्रपति स्वामींस पदारूढ केलें. राज्यभाराचा बंदोबस्त उत्तम रीतीनें केला. या गोष्टीचा कीर्तिघोष या दिशेस आगाऊ पंधरा दिवस प्रविष्ट जाहाला. मित्रशत्रूंस आल्हादखेद प्राप्त जाहाला. राजश्री छत्रपति स्वामींचे व स्वामींचे पदरीं अगाध पुण्य, तन्मुळें किमपि व्यंगपदार्थ न पडला. पूर्वीं श्रीमंत कैलासवासी रावसाहेब व श्रीमंत आपासाहेब वर्तमान असतां, सेवकासमक्ष चर्चा केली कीं, राज्यांतील सेना व खावंदाचे चितवाती असते तरी, एक वेळ प्रजापाळण करून दाखवितों. त्यास उभयतांचे मनोभिष्ट पूर्वपुण्यें स्वामीच्या पदरीं आलें. उत्तर, दक्षण, पश्चम, तीन दिशेंचा बंदोबस्त महाराजांच्या तेजप्रतापे सहजगतीनें जाहालाच आहे. राहिली पूर्वदिशा. येथील बंदोबस्त सेनासाहिल्ये अथवा सामदामदंडभेदेंकरून सेवकांस शत्रुमित्रादेखता यशस्वी करून चरणाजवळ नेणें हेही सबळ कीर्ति महाराजांची आहे. नवाब माहाबतजंग यास थैला आला, तो त्याजकडे कासीद घेऊन मेदनीपुरास गेले आहेत. उत्तरें जाहालियावरी सेवेसी येतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

❦ ❦ ❦

## ४३. यशवंतराव होळकराची जेजुरीची यात्रा
## व
## रावबाजीचा भित्रेपणा.

शेवटचे रावबाजी किती भित्रे होते हें इतिहासांत प्रसिद्ध आहेच. ह्यांच्या भित्रेपणाच्या मासल्याचें एक पत्र येथें देण्यासारखें आहे. इंदूरचे यशवंतराव होळकर ह्यांची प्रकृति बिघडल्यामुळें त्यांणीं देवदर्शनासाठीं जेजुरीस येण्याचा विचार चालविला. हें पाहून रावबाजीच्या अंगावर कांटे उभे राहिले. तेव्हां त्यांनीं साताऱ्च्या छत्रपतीस पत्र लिहिलें कीं, यशवंतराव होळकर दक्षिणेंत आले तर मी विजयदुर्गास पळून जातों, व तुह्मीं रायगडास जावें; ह्मणजे उभयतांचें संरक्षण होईल. ही पळपुटेपणाची युक्ति रावबाजीच्या दिवाणासही पसंत पडली! हें पत्र वाचण्यासारखें आहेः—

[ सातारादप्तर. ] श्री. ता. १७ फेब्रुवारी इ. स. १८११.

श्रीमंत क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान कृतानेक विज्ञापना ता।। छ २२ मोहरम सन

* येथपर्यंत पेशव्यांच्या पत्रांतील मजकूर आहे.

इह्दिदे अशर मयातैनपावेतों स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असों विशेषः—राव यशवंतराव होळकर यांचे बोलणें कीं माझे प्रकृतीस समाधान नाहीं; याजकरितां मजला जेजुरीस येऊन देवदर्शन घ्यावयाचें. देवदर्शनावांचून माझा प्राण जातो. त्यापक्षीं मजला आज्ञा जाहाली असतां जेजुरीस यावयाचें; अथवा आज्ञा न जाली तरी जेजुरीस येऊन देवदर्शन घ्यावयाचें. देवदर्शनावांचून येथें माझा प्राण जातो. त्यापक्षीं मजला जेजुरीस येणें प्राप्त. मग प्राण जावो अथवा राहो. परंतु मजला जेजुरीस यावयाचें. ह्मणोन होळकराकडील वकील सरकारांत बोलतात. त्यास होळकरास येण्याविषयीं सरकारांतून आज्ञा न जाली तरी जबरदस्तीनें दक्षणेंत यावयाचा इरादा त्याचा आहे. तेव्हां होळकर याचे वास्तविक प्रकृतीस ठीक नाहीं ह्मणोन जेजुरीस देवदर्शनाकरितां येणार, किंवा देवदर्शनाचे निमित्यानें इकडे जबरदस्तीनें कोणत्या मतलबाकरितां येतो याचा निश्चय नाहीं. त्यास, होळकर याचें आमचें वांकडें कसें व त्याणें प्रांताची दशा कशी केली या सविस्तर मजकुराची समक्ष विनंति केलीच आहे. ...... मजकूर जगप्रसिद्ध आहे. यास्तव होळकराचें इकडे येणें जाहलें असतां मीं पुण्यास राहावें हें मसलतीस येत नाहीं. याजकरितां होळकराचा दक्षिणेंत येण्याचा प्रकार दिसला ह्मणजे मी विजयदुर्गास जाऊन राहावयाचा बेत केला आहे. होळकर इकडे आलियावर प्रसंग कसा पडतो याचा नियम आज समजत नाहीं. महाराजांची स्वारी सातारियास [असतां] पेशजीं परशरामभाऊ पटवर्धन यांणीं व चिरंजीव रा० चिमणाजी रघुनाथ यांस यशोदाबाईचे मांडीवर बसवून चिमणाजी माधवराव असे शिक्के व पेशवाईचीं वस्त्रें आणून दिल्हीं. तसेंच यशवंतराव होळकर यांणीं चिरंजीव रा० विनायक अमृतराव यांस पेशवाईचीं वस्त्रें आणिलीं. पूर्वीं असे बखेडे जाले. कारण, सातारा जागा नाजूक. बांकी नव्हे. बलकुबलीस[1] राहावयाचे उपयोगी नाहीं. सबब पूर्वी शिवाजी महाराज यांनीं रायगडासारख्या जागा वसवून दौलती केल्या. प्रसंगाच्या दिवसांत खासा स्वारी सातारा राहाणें हें माझे व रा० सदाशिव माणकेश्वर यांचे विचारास येत नाहीं. रायगड जागा चांगली मजबूत. कोणी ह्मणेल कीं, तेथें फौज पाठवून वस्त्रें आणूं किंवा बंडबखेडा करूं, तर होणार नाहीं. असें माझे व मशारनिल्हेचे विचारांत येतें. स्वामींचे मर्जीमुबारकेंत[2] आल्यास, यशवंतराव होळकर दक्षिणेंत येऊन कोठें लढाईचा प्रसंग न करितां कराराप्रमाणें नर्मदापार माघारा गेल्यास, मी विजयदुर्गाहून पुण्यास येईन. ते समयीं स्वामींची स्वारी सातान्यास जावी. कदाचित् यशवंतराव होळकर लढाईच्या इराद्यावर येऊन बखेडा करूं लागल्यास, ते मसलत शेवटास जाय तोंपावेतों रायगडास महाराजांनीं कुटुंबमुद्धां आनंदांत असावें. मसलत शेवटास गेल्यावर मग सातान्यास यावें. याचें मनन करून हे मसलत बाहेर कोठें न फोडतां आज्ञोत्तर यावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

* * *

१ बलकुबल=संकटप्रसंग, युद्धप्रसंग. २ मर्जीमुबारकी=दिलपसंती.

## ४४. तुळ्या पवाराची जबानी.

रघुनाथराव पेशव्यांचा खिजमतगार तुळ्या ऊर्फ तुळाजी पवार हा नारायणराव पेशव्यांच्या मारेकऱ्यांपैकीं एक साथीदार होता. त्याची जबानी उपलब्ध झाली आहे. ह्या जबानीची तारीख दिलेली नाहीं. परंतु हें पत्र अदमासें इ. स. १७८०।८१ सालचें आहे. ह्या जबानीमध्यें नारायणराव पेशव्यांस कैद करून, दादासाहेबांस बंदमुक्त करण्याची जी मसलत झाली, त्यांत सामील असणारांचीं नांवें दिलीं आहेत. ही जबानी फार महत्त्वाची आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"जबानी तुळाजी पवार सु॥ इहिदे समानीन मया व अलफ. कारणें जबानी लिहून दिली ऐसीजे:-आपण महमद इसफ याचे घरीं हमेशा बसावयास जात होतों. त्यास महमद इसफ यानें मजपासून वचन घेतलें कीं, आम्ही श्रीमत राजश्री दादासाहेब यांस मिळोन, रायांस कैद करून, दादासाहेबांस बाहेर काढावयाची मसलत केली आहे म्हणोन बोलला. मग मी बोललों कीं, त्यांचे नांव घेऊन मुलखावर पोट भरावयास बहुत जागा आहे; आम्ही या कामांत पडत नाहीं. म्हणोन बोललों. त्याजवरून बहुतच गळा पडोन बोलला कीं, हाही बाजीराव यांचा लेक आहे; आण या मसलतीत बहुत जण आहेत. तेव्हां आपण पुसिले कीं, कोण कोण ते मसलतींत आहेत, त्यांचीं नांवें सांगणें. त्याजवरून त्यांचीं नांवें सांगितलीं. ते बितपशील:—

१ आबाजी महादेव.
१ शिवाजी कान्हो.
१ नूर महमद.
१ सदाशिव रामचंद्र.
१ भवानराव प्रतिनिधी.
१ छट्ट फरास.
१ नरसिंगराव देशमुख.
१ तोफखाना आपणाकडेस आहे म्हणोन सांगितलें याचे नांव मोघम.
० प्याद्यामध्यें कोण होते हे आपणास ठाऊक नाहीं.
० मोरो बाबूराव हे फितुरांत मुळीं नव्हते व आपणास कोणी सांगितलें नाहीं.
१ हुसेन बेग.
१ खरगसिंग.
१ गोविंद गणेश निसबत माहादाजी नीलकंठ.
१ सखाराम हरी.
१ सखाराम भगवत यांचेच सूत्रानें होते. त्याचा चोपदार आणून रुजू करून देऊ
१ गोविंदराव गायकवाड.
१ नीळकंठराव रामचंद्र यांजकडील लोव त्या वेळेस वाड्यास चौकीस होते. ते फि तुरीच होते. त्यास दर रावतीं शंभ १०० रुपये दिले.
१ महमद इसफ.
१ सुमेरसिंग.

सदरहू सतरा असाम्या ते समयीं होते. हें खरे. थेवरापासून राजकारण चाललें आपण पुण्यांतील कामांत होतों.

* * *

# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः-दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] मे १९०९. [अंक १० वा.

विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



महादजी शिंदे.

## ७. जावलीकर मोरे यांची छोटी बखर.*

" * * * भोइटे, सुरवे, जाधवराव, कदम, शिंदे, रविराव, भाडवलकर, मोरे, घाटगे, झुंजारराव, नलवडे, सालोंखी, पाटणकर, माने ह्मसवडकर, दहीगांव (कर), येलाहूरकर, ऐसे घरंदाज मऱ्हाटे कृष्णदेवरायाची चाकरी वि-द्यानगरीं करून, जहागीर मनसब खाऊन, राजाज्ञेंत चालत असतां, पुढें होणार इब्राहिम व आलि येदिलशाहा व बहिरीनिजाम हे पहिले राजियांचे नोकर यांचे होते. यांहीं राजापासीं चाकरी सरस केली. राजा मेहेरबान होऊन इब्राहीम यास नवाजीस करून तेलंगणप्रांताचा सुभा दिधला. याचे हामराहा लोक देऊन यांस तेलंगणांत रवाना केलें. त्यांहीं त्या प्रांतांत अंमल केला. इब्राहीम एके दिसीं शिकारीस निघाला. जेथें भागानगर वसलें तेथें मुसी नदीचे तीरीं शिकार खेळत पाहाडावर गेले. तेथें खरगोस निघाला. त्याचे पाठीं कुत्रें लागलें. कुतरीयानें खरगोसाचा पाठलाग केला. जेथें किल्ला आहे, तेथें खरगोस कुतरीयावर उतरला. तेव्हां इब्राहीम यांहीं (व) याचे लोकांहीं आचंबा केला जे, खरगोस यानें कुतरीयास हटवून दिधलें. तेव्हां, एक हापीज दिलदार, बहुत उमदा आदमी, व एक ब्राह्मण ज्योतिषी यांस बोलावून विचारलें जे, हें काय आचेर्य (आश्चर्य ?) आहे ? तेव्हां त्यांहीं सांगितलें जे, हे जागा मर्दानगिरीची आहे. येथें किल्ला बांधवाल ह्मणजे बलकुट (?) बसेल. जुमस खाणार नाहीं. त्याजवरून इब्राहीम त्यास ह्मणूं लागला जे, शायत कोणसी ? तेव्हां त्यांनीं फल पाहून सांगि-तलें जे, उदईक शायत सरस आहे. आरंभ करावा. तेव्हां त्या स्थळीं एक धनगर आपलें एक लहानसें झोंपडें बांधून बायका, मुलेंलेंकरें व बकरीं घेऊन नांदणूक

* ही चंद्रराव मोऱ्यांची छोटी बखर आमचे मित्र रा. रा. यशवंत राजाराम गुप्ते बी. ए. ह्यांनीं रा. रा. नरहर मल्हार चिटणवीस ह्यांचे मार्फत मिळवून आमचेकडे पाठविली आहे. ही बखर अस्सल प्रतीच्या नक्कलेची नक्कल आहे, त्यामुळें तींत पुष्कळ अशुद्धें व इतर दोष दृष्टीस पडतात. तथापि, चंद्रराव मोऱ्यासंबंधाची कांहीं नवीन माहिती तींत असल्यामुळें ती येथें प्रसिद्ध केली आहे. ह्या बखरीची शुद्ध प्रत कोणास उपलब्ध झाल्यास ती त्यांनीं कृपा करून आमच्याकडे पाठवावी. रा. यशवंतराव गुप्ते ह्यांचा इतिहाससंशोधनाचा व्यासंग स्तुत्य असून, त्यांच्या सारखे आस्थेवाईक गृहस्थ ह्या कामीं अधिक लक्ष्य घालतील अशी आह्मांस उमेद आहे. प्रभुमंडळीमध्यें शिवकालीन ऐतिहासिक कागदपत्रांचा भरणा अधिक असून दिवसेंदिवस त्याची उपेक्षा फार होत चालली आहे. त्यांनीं आपले जवळील मूल्यवान् ठेवा, इतिहासप्रकाशनाच्या स्तुत्य उद्देशानें जगापुढें लवकर आणावा, अशी आमची त्यांस प्रेमभावाची सूचना आहे. आजपर्यंतच्या उपेक्षेनें पुष्कळ इतिहास नष्ट झाला आहे व कालांतरानें फार नुकसान होईल.

करीत होता. तेथें पाणियाची एक विहीर सरस, गोड पाणीयाची, हवासीर पाहून, एक घरानसीं नांदणूक करीत असतां, इब्राहीम यांहीं धनगरास बोलावून आणिलें जे, 'अरे सुनो धनगर, येव्हढी जागा तुजला आह्मी मागतों. आपले खुशयखत्यारीनें द्यावी. कांहीं जुलूमजाजती करीत नाहीं.' याजवर धनगर बोलला जे, 'सुभेसाहेब, जागा माझी दादे पडदादियापासून कदीम आहे. तर तुह्मी बख्तदार आहां. आह्मांस विचारणा करितां, तर उत्तम. या जागीयावर मुदती किती एकांची धरत्री वसलीया नांदणूक जाहाली असेल. कदीम एक आकताला आहे. आकतालाच्या हुकुमानें कितीएक पैदास होती, व गारतही होती. तर तुह्मी साहेब लोक, येथें किल्ला बांधूं ह्मणोन विरादा करितां. तर माझें नांव या किल्लीयाचें ठेवणें.' तेलंगणामधें धनगरास गोलावाडु ऐसें ह्मणताती. तर या किल्लियाचें विसम गोल-कुंडा व बालेहासार ऐसें ठेवणें. तुह्मांस जागा आपण खुश रजावंदीनें दिधली. तेव्हां इब्राहिम यानें तेथें किल्ला बांधून गोलगुंडा ऐसें नांव ठेविलें. एक ब्राह्म-णाची कन्या देवभक्त होती आणि परम शुचित्ववती. तिचें नांव भागम्मा. ते यात्रोद्देशें मार्गीं जात असतां, इब्राहिम शिकार खेळत चालला. तों भागम्मा एके ठायीं उतरून आपले पोटास्तव पाकनिष्पत करीत होती. पाकनिष्पत जाहली. पात्रें दोन वाढलीं. एक पात्र वाढून इब्राहिम यांस त्याचे खिजमतगारापासीं देऊन पाठविलें. इब्राहिमही भुकेला होता. त्यानें तें अन्न भक्षिलें. भक्षिल्यानंतर आराम जाहला. मग खिजमतगारास बोलावून सांगितलें जे, 'तें आमांस घेऊन यावें. कांही आंदेसा न धरणें. तूं आमची धर्मबेटी आहेस.' तेव्हां भागम्मास बोलावून तिजला पांचशें रुपये व वस्त्रें सरस देऊन, यात्रेस वाटें लाविलें. आणखी तिजकारणें इब्राहिम बोलिला जे, 'सुन, भागम्मा, आणखी काय विरादा असेल तो मागणें.' तेव्हां भागम्मा ह्मणों लागली जे, 'आणखी कांहीं माझा विरादा नाहीं. तुह्मीं गोल-गुंडा किल्ला बांधला. पुढें शहर वसवावें ह्मणोन मनुसुबा केला, तर त्या शहराचें नांव भागानगर ह्मणोन ठेविलें पाहिजे. माझें नांव पुढें चाले तें करावें हा विरादा आहे.' त्याजवर इब्राहिम बोलिला जे, 'सुन, भागम्मा, या शहराचें (नांव) विसम भागानगर ऐसें चालवीन.' मग भागानगर शहर वसविलें. रामराजासीं बेबदल जाहला. आपणावर छत्र उभारलें. पादशाहा ह्मणों लागला. पुढें आलि-येदलशाहास डोणप्रांतीं जहागीर दिधली. पिकेल डोण तर खाईल कोण? न पिकेल डोण तर राहील कोण? त्यानें चनहली मोडून विजापूर वसविलें. तेथेंही खरगोसानें कुतरीयास हटवून दिधलें. तोही मुलूख दबाऊन आपणावर छत्र उभारून, बेबदल होऊन, पादशाहा ह्मणों लागला. निजाम बहिरी यांस उभय बालेघाट व बीडदेश वगैरे तहत खानदेश व बागलाण तपतीपावेतों मुलुकाची सुबेदारी दिधली.

यानें देवगरी किल्ला कदम, कांहीं जदीद नव्हे, तेथें बेबदल होऊन पादशाहा ह्मणोन तो मुलूक बळावून राहिला. ऐसे तिघे एकत्र होऊन विद्यानगरावर निमकहराम होऊन चढाई केली. तुंगभद्रातीरीं राक्षसतागडीवर रामराजा याचें जुंज जाहालें. तिघां जणांहीं राजा यास मारून मुलूक वांटून घेतला. ती मुलकीं तिघे पादशाहा तहत नरमदेपासून रामेश्वरपावेतों जाहले. रामराजा निवर्तलियावर तमाम मऱ्हाटे, ज्याचा जोर पडला त्याची चाकरी करून, आपला सरंजाम खाऊं लागले. कोणी विजापुरीं मनसबदार जाहले. कोणी भागानगरीं मनसबदार जाहले. कोणी देवगिरी दौलताबादेस मनसबदार जाहले. चंद्रराव मोरे विजापुरीं पादशाहापासीं चाकरी करीत असतां, तेथवां पादशाहापासीं बहुत शिपारस चंद्ररायाची जाहली कीं, बडे मर्द आदमी आहेत आणि जोरावर. ऐसें असतां विजापूर डोणप्रांतीं जबर झाडी मातली होती. तेथें वाघ जबर. त्या जंगलांत आदमी व गुरें व बकरीं यांचा तसनस करूं लागला. रहादारी चालेनासी जाहली. पादशाहापावेतों बोभाट जाहला. पादशाहा खुद्द वाघाचे शिकारीस निघाले. बरोबर स्वार, पावहासम मातबर, जेजाइला व बरकंदाज, जबर दारुखाना घेऊन, वाघाचा जंगल घेरला. तमाम धरसे बांधले. पादशाहा एका झाडाखालीं चांदनी देऊन बैठक केली. जवळ थोर थोर मनसबदार बैसले. तमाम दारुदखाना एकदाच झडला. धुराडी गर्द जाहली. हांका आरोळ्या देऊन वाघ झाडीचे मैदानांत पादशाहासन्मुख काहाडला. पादशाहाची नजर वाघावर जाहली. तेव्हां पादशाहा बोलिले जे, वाघ जाऊं न पावे. झाडींत न जातां चौफेर मैदानांत धरसेबंदी करणें. जर करतां ज्याजकडून वाघ जाईल, त्याचा मुलाहिजा न धरतां गर्दन मारली जाईल. ऐसें स्पष्ट समजोन आपले आपले जागां काईम होऊन, वाघ जाऊं न पावे तें करणें. तेव्हां वरचेवर दारुदखाना सुटूं लागला. थोर गर्दी जाहली. परंतु एकही बार वाघावर न होय. आडहत्यारी यांहींही मार केला. परंतु वाघास न लागे. तेव्हां पादशाहा बोलिले जे, जर करतां एकांग वीर समशेरेंकडून वाघास मारील, तरं त्यावर पादशाहा मेहेरबान होतील. ह्मणोन पानाची पट्टी ठेविली. तेव्हां कोणी पानाचे पट्टीस हात न घालीत. मग चंद्रराव पादशाहाचे हुजूरीं उभे होते. तमाम लोक चंद्ररायाचे धरसीयास चौघांबराबर चाकरी धरसेबंदीस कायम जाहले. एकवचनी चंद्रराव हुजूर. तेव्हां चंद्रराव आडेल शिपाई, आजदादेघरचा राऊत मर्दाना. मग पादशाहाजीस चंद्ररायें कुर्णीसात करून अर्ज केला जे, 'तमाम लोकांचा धरसा एक तरफ करावा. वाघ मोकळे मैदानांत सोडावा. मी तुमचे आज निमक इतके दिवस खादली, याची झडती देईन. जर करतां वाघ म्यां जर मारला,

तर उत्तम. पादशाहाची चाकरी रुजू जाहली. जर करतां मज वाघानें मारलें, त्याचे हातें माझा मृत्यु जाहला, तर आमचें सर्वांचें मुलेंलेंकरांचें चालवावयास अंतर न करावें. माझे हातें वाघाचा मृत्यु असला, तर मी यास मारीन.' ऐसा अर्ज चंद्ररायें केला. मग पानाची पट्टी उचलून घेतली. वाघाभोंवता लोकांहीं घरसा धरला होता, तो सोडला. वाघ मोकळे जागीं मैदानांत पडला. नीट रोहंक देऊन, पुढील पायें कोल्हेटेंकणीं बैसून शेंपूट झाडूं लागला. रागें चूर. तेव्हां चंद्ररायें पादशाहास कुरणीशात करून मुढाळीस ढाल दिधली. चोलिणीयावर काच्या बांधला. शिरीं पगडीस एक झाडाचे फांदियाचा तुरा लाविला. अंगीं विभूतीचें भूषण. मुंढ्यास ढाल देऊन पटीयाचें मेण झाडून टाकलें. मग तेथून चंद्ररायें नीट वाघावर चालून घेतलें. 'उठ कुतऱ्या. काय बसलास? तूं आमचे एक कुतरें आहेस!' ऐसें बोलून वाघाजवळ गेले. मग वाघ दणाणून उठून चालून आला. वाघाची झडप येतांच, चंद्ररायें पोटीं ढाल देऊन बैठक केली. वाघें नीट झडप टाकतांच, त्याचा लाग चुकून चंद्ररायें माथा खालें करून बसल्या बसल्या आंग लवविलें. वाघाची झडप त्याम वोलांडून पुढें गेली. तों इतकीयामध्यें चंद्ररायें हुशार होऊन त्याजकडे तोंड फिरविलें. ईश्वरास करणें. वाघ झडप टाकतांच, पुढें खूट वाघास लागतां, चांचरून पुढें पडतांच, गुडगे चालीं चंद्ररायें चालून, वाघ ऊट खाऊन माघारा फिरतां मुंढावर ढालचे वोढीयावर त्याचा मार सांभाळून पटीयाची सीग वाघाचे पोटांत चालविली. वाघ जाया जाहला. त्याच लगांत चंद्रराव उठून, घायांत घाय दुसरा हात पटीयाचा चालवून, दुधड वाघ करून मारला. मग पादशाहास येऊन मुजरा केला. पादशाहा मेहेरबान जाहले. 'भला शिपाई, दिवाणासा दिसतो. परंतु काय वाघावर मतम केलें.'* आतां दिवाणा म्हटलें म्हणोन येडे म्हणून अडनांव मोरीयांत पडलें आहे. मग पादशाहा म्हणों लागले जे, 'सुन चंद्रराव, तुझा काय विरादा असेल तो मागावा.' तेव्हां चंद्रराव अर्ज करून तसलीमात

* मोऱ्यास जहागिरी मिळण्याचे व चंद्रराव असें नांव पडण्याचें कारण डफसाहेब खालीं लिहिल्याप्रमाणें देतातः—

"In regard to the chiefs under Beejapoor, a person named Moray originally a Naik in the Carnatic, was appointed in the reign of Eusoof Adil Shah to the command of a body of 12,000 Hindu infantry, sent for the purpose of reducing that strong tract which is situated between the Neera and the Warna rivers. In this enterprize Moray was successful; he dispossessed the decendants of the Raja Sirkay and completely suppressed the depredations of their abettors; the principal of whom were families named Goojar, Mamulkar, Mohitey and Maharik. Moray, for this service was dignified with the title of Chandrarao."

करून बोलिले जे, 'पादशाहा सलामत, म्यां वाघ मारला. तर आमचे मुन्हे प्रांतीं आटेगांव जावली माहाल थोर, वाघाची जाळी आहे. तेथील राज्य मजकारमें देऊन, राजा हा किताब द्यावा.' पातशाहा खुदावंत होऊन आटेगांव माहाल जावली आठरा माहाल, मुन्हे तळकोंकणपावेतों, जेथवर हात फावेल तेथवर जबरदस्ती करावी. परंतु पादशाही हुकुमांत राहावें. चाकरी माणूस समयशीर लोक पाठवीत जावें. ऐसें बोलून पादशाहानें हत्ती व घोडा, सिंहासन? बादली पोषाख व कडी व मोतीयांची जोडी बक्षीस दिधली. चंद्ररायें विजापुरीं जमीयेत ठेवून पादशाहास अर्ज केला जे, 'पादशाहा सलामत, मज राजा म्हणोन किताब दिधला, तर आह्मीं राजे लोकांहीं सगाई कोणासीं करावी? तर, आमचे जे सगे आहेत त्यांस थोर मरातब द्यावे. म्हणजे सरतोल आह्मांबरोबर होतील. तेव्हां बारा राव पडेमकर, व कुंभारखानी सुर्वे, सडेकर शिंदे, पाकडेराव, महामुलकरराव, गणसांवतराव, खोपकरराव, हालमकर हंबीरराव, दलवीराव, हंबीरराव, येरूणकर, घासेराव चव्हाणराव, ऐसे बारा राव पादशाहामीं मुलाजमत करून त्यांस 'राव' ऐसे किताब पादशाहाकडून देविले. आपले बिगदर भाऊ राजीयाचे म्हणोन यांसही राव किताब खास, राजे चंद्रराव मोरे, देशकरराव, मुदोसकरराव, कलाकराव, हातकेटकर, विरमणकरराव, बिरवाडकरराव, आस्तनकरराव, मुधगांवकरराव, हे भाऊबंध. मोरेराव खास चंद्ररावाचे वडील पुत्र जावलीचे राज्यासंनीध चयाजीराव. शिवतरकर यसवंतराव, ज्यांहीं गडबड दरडीं धावणें, पादशाहापासीं केले. (त्यास) हिरवें* निशान पादशाहानें बक्षिसी दिधली. पादशाही निशान हारा. मरातबी पादशाहीचे बक्षिसीस वादांत......प्रतापराव जोरामध्यें, हणमंतराव जावलीमधें, गोविंदराव महिपतगडीं. दौलतराव ऐसे चंद्ररावाचे पुत्र सहाजण. चंद्रराव विजापुरींहून चालून बारा हजार पायेहासम घेऊन जावलीवर चालून आले. जावली सर करून, अम्मल बैसवून राज्य कायम केलें. पहिले जावलीस गुजर, महामुलकर, शिरके व मोहिते यांचीही चंदरोज जावलीवर नांदणूक जाहली. मुस्तकीम राजपद नव्हतें. राजगादी नांवास जावली, चंद्ररायाचे मुळें लौकिकांत जाहाली. लहान थोर जावलीचे चंद्रराव मोरे राजे ऐसें म्हणताती. नांव अद्यापवर चंद्ररावाचें

* हें यशवंतरावानें निजामशाहाबरोबर झालेल्या लढाईंत मिळविलेलें. यशवंतरावाविषयीं क्याप्टन डफसाहेब लिहितात:—

"His ( Chandrarao's ) son Yeshwant Rao, having distinguished himself in a battle fought near Purinda with troops of Boorahan Nizam Shah, in which he captured a green flag, was confirmed in succession to his father as Raja of Jowlee and had permission to use the standard he had won."

चालतें. त्यांचीं कोणी नांवें घेत नाहीं. ज्यास ठाऊक त्यासच ठाऊक. नाहीं त्यास नाहीं. अवल चंद्रराव राजे मोरे, त्यांचे पुत्र चयाजी राजे, व भिकाजी राजे, शोदाजी राजे, येसाजी राजे, गोंदाजी राजे, बाळाजी चंद्रराव राजे, दौलतराव राजे. ऐसे आठ पुरुष. चयाजीराजे यांचा विस्तार दौलतरायापावेतों सात पुरुष जावलीवर राज्य चालले. दौलतरायापासून चयाजी राजीयाचें वंशाचें नक्कल जाहलें. पुढें शिवतरकर यशवंतरायाचे वंसीक कृष्णाजी बाजी राजे चंद्रराव जावलीवर, राजगादीस दौलतरायाचे मार्ये—माणकाई आईनें—कृष्णाजी बाजीस दतओटीस घेऊन, जावलीस स्थापून राज्य चालविलें. कृष्णाजी बाजी(नें) तीन वर्षें जावलीस राज्य केलें. पुढें शिवाजीराजे भोंसले यांस शंभूचा वर जाहला. ते जबरदस्त. तमाम मावळे पायेहासम मेळवून तमाम गड किले घेतले. नदींत गड निर्माण केले. तमाम मुलकांत आपला अंमल केला. तळकोंकण, बारामावळें व मुन्हीं मोडविलीं. चंद्रराव कृष्णाजीराजे मोरे यांस शिवाजी महाराजें सांगून पाठविलें जे, 'तुह्मीं मुस्तफद राजे ह्मणवितां. राजे आह्मी. आह्मां श्रीशंभूनें राज्य दिधलें आहे. तर तुह्मीं राजे न ह्मणावें. आमचे नौकर होऊन आपला मुलूक खाऊन, हामराहा चाकरी करावी. नाहींतर बदफैल करून फंद कराल, तर जावली मारून तुह्मांस कैद करून ठेवूं.' ऐशी पक्की इशारत लिहिली. त्याजवरून, रावराजे मोरे कृष्णाजी बाजींही, शिवाजी राजे यांस लेहून पाठविलें जे, 'तुह्मी काल राजे जाहलां. तुह्मांस राज्य कोणें दिधलें? मुस्तफद राजा आपले घरीं ह्मटलीयावर कोण मानितो? येतां जावली, जातां गोवली. पुढें एक मनुष्य जीवंत जाणार नाहीं. तुह्मांमध्यें पुरुषार्थ असला, तर उदईक याल तर आजच यावें. आह्मी कोंकणचे राजे असून, आमचा राजा श्रीमहाबलेश्वर. त्याचे कृपेनें राज्य करितों. आह्मां श्रीचे कृपेनें पादशाहानें राजे किताब, मोरचेल, सिंहासन मेहेरबान होऊन दिधलें. आह्मीं दाईमदारीं दरपिढी राज्य जावलीचें करितों. तुह्मी आह्मांसीं खटखट कराल, तर पष्ट समजून करणें. आणखी वरकड मुलूख तुह्मांस आहे. येथें उपाय कराल तर तो अपाय होईल. यश न घेतां अपयशास पात्र होऊन जाल.' ऐसें कृष्णाजीराजे मोरे यांहीं शिवाजी महाराजांस लेहून पाठविलें. त्यांचीं पत्रें शिवाजी महाराजें एकून परम संतप्त जाहले. आणखी प्रतिउत्तर पाठविलें जे. 'जावली खालीं करून, राजे न ह्मणोन, मोरचेल दूर करून, हात रुमालें बांधून, भेटीस येऊन हुजूरची कांहीं चाकरी करणें. इतकीयावर बदफैली केलीया मारले जाल.' ऐसें पत्र चंद्रराव मोरे यांणीं ऐकून परम राग आला. मग करडा जबाब शिवाजी राजियांस लिहिला कीं, 'दारुगोळी महझूद आहे. कांहीं बेजबाबास खुतें

घालून लिहिलें, तें कासियास ल्याहाविलें? थोर समर्थ असों.' याउपर चंद्ररायाचा व शिवाजी महाराजांचा थोर आकस पडला. मग शिवाजी महाराजें सुरराव कांकडे दोन हजार हासम जावलीवर रवाना केले. महाबळेश्वरचा निसणीचा घाट, दरीयाचा उतरून, जावलीस वेढा घातला. जावली अवघड वाट, जाळ्या कळकीच्या दाट. तेथें एक महिनाभर झुंज जाहलें. महिन्या एका, कृष्णाजी बाजी मोरे राजे, जावली सोडून, आपले हासमसुद्धां रायगडास गेले. रायगड बळावून राहिले. तेथें शिवाजी महाराजें चढाई करून गेले. रायगड तीन महिने चंद्ररायांहीं भांडविला. मग सल्ला जाहला. कृष्णाजी राजे मोरे व शिवाजी महाराज यांच्या भेटी जाहल्या. जावलींत ठाणें शिवाजी महाराजांचें बैसलें. रायगडही महाराज शिवाजी राजे यांसीं सर जाहला. कृष्णाजी राजे मोरे यांचा शिवाजी राजियांहीं बहुत मान केला. घोडा व सिरपाव दिधला. रुमाल दिधला.* कृष्णाजी चंद्ररायांहीं

*ही हकीकत डफसाहेबांच्या ग्रंथांतील व उपलब्ध असलेल्या मराठी बखरींतील हकीकतीहून भिन्न आहे. क्याप्टन डफसाहेब मोघम चंद्रराव मोरे असें ह्मणतात. चंद्रराव हा किताब होता. तो बऱ्याच पिढ्या चालत आला होता. डफसाहेब ह्मणतात, चंद्रराव मोरे मारला गेला, व त्याचीं मुलें शिवाजीनें कैद केलीं.

"Under these circumstances Shiwaji who had held his troops in a state of preparation for some time, sent two agents, a Brahmin and a Mahratha, the former named Ragoo Ballal, the latter Sumbhaji Cowji for the purpose of gaining correct intelligence of the situation and strength of the principal places, but ostensibly with a design of contracting a marriage between Shiwaji and the daughter of Chanderrao. Ragoo Ballal with his companion proceeded to Jowlee, attended by 25 Mawalas. They were courteously received and had several interviews with Chanderrao, the particulars of which are not mentioned; but Ragoo Ballal, seeing the Raja totally off his guard, formed the detestible plan of assassinating him and his brother, to which Sumbhaji Cowji readily acceded. He wrote to Shiwaji communicating his intention, which was approved, and in order to support it, troops were secretly sent up the Ghauts; whilst Shiwaji pretending to be otherwise engaged, proceeded from Rajgurh to Purandhar. From the latter place he made a night march to Mahbyllisur, at the source of the Kristna, when he joined his troops assembled in the neighbouring jungles. Ragoo Ballal, on finding that the preparations were completed, took an opportunity of demanding a private conference with the Raja and his brother, when he stabbed the former to the heart, and the latter was despatched by Sumbhaji Cowji. Their attendants being previously ready, the assassins instantly fled, and darting into the thick jungles, which everywhere surrounded the place, they soon met Shiwaji, who according to appointment, was advancing to their support.

रायरीच्या बखरींतही हाच मजकूर आहे. किंबहुना डफसाहेबांनीं रायरीच्या बखरीचे

रुमाल न घेतला. रुमाल कोण चीज? आम्हांवर मोरचेल होतें तें पद थोर. तें टाकून लहानपद घ्यावें? जरकरतां आम्हांवर रुमाल न जाहला, तर आम्हीं जावलीकर राजे मोरे कांहीं छपलों नाहीं. शिवाजी राजीयांहीं घोडा, सिरपाव, चंद्ररायास दिधला. तितकाच राजे चंद्ररायांहीं घेतला. रुमाल माघारा फिरविला. शिवाजी राजियांहीं चंद्ररायाचा मोरचेल दूर करविला. ऐसेंच हत्यारबंद, कृष्णाजी चंद्रराव (यांनीं) मनीं विचार करून मनसबा केला जे, आमचें राज्य सलतनत कोठें जाईल? सांप्रत तों यांचे कैदेंत सांपडलों. पुढें श्रीशंभू जे बुद्धि देईल, ते केली जाईल. शिवाजी राजियांजवळ असतां, शिवाजी राजियांचें मानस होतें जे, जुजबी शिबंदी चंद्ररायांपासीं ठेवून यांची जावली यांस द्यावी. आपले नौकर ह्मणोन स्थापावें. यांचा देश यांस द्यावा. भारी जमीयेत ठेवूं न द्यावी. जेव्हां हुजूर बोलावूं, तेव्हां आमचे धागियांत राहे ऐसें करून, यांची जावली यांस द्यावी. ऐसा निश्चय [करून] शिवाजी महाराजें केला. कृष्णाजी राजे मोरे यांस समागमें घेऊन

---

बाबनीत शब्दशः भाषांतर केले आहे, असें ह्मटलें तरी चालेल. यास्तव रायरीच्या बखरींतील उतारा देत नाहीं. सभासदांच्या बखरीतही कांहीशी रायरीच्या बखरीत दिल्याप्रमाणेच हकीकत आहे. परंतु तींत थोडी तफावत आहे. ती हकीकत येणेप्रमाणे:—

"कोंकणांत चंद्रराव मोरे ह्मणून राज्य करीत होते......त्यांजकडे रघुनाथ बल्लाळ सबनीस बोलावूं पाठविले. विचार करितां 'चंद्रराव मोरे यास मारल्याविरहित राज्य साधत नाहीं. त्यास तुह्मांवांचून हें कर्म कोणास न होय. तुह्मी त्यांजकडे हेजबीस जाणे.' ऐसें सांगितलें. बराबर निवडक धारकरी शे सवाशे माणूस निवडून दिले. ते स्वार होऊन जावलीनजीक जाऊन पुढें चंद्ररायास सांगून पाठविलें कीं 'आपण राजे याकडून आलों आहों, कित्येक बोलणे चालणे तह रह कर्तव्य आहे.' असें सांगून पाठविले. उपरी त्यांनी त्यास आपणाजवळ बोलावून भेट घेतली. कित्येक बाह्यात्कारी बोलणे जालें. बिराड दिलें तेथे जाऊन राहिले. दुसरे दिवशी मागती गेले. एकांती भेट घेतली. बोलणे जहाले. प्रसंग पाहून चंद्रराव व सूर्याजीराव दोघा भावांस कटारीचे वार चालविले. जमातीसी निघून चालिले. खांसाच पडलियावरि लोक काय चालून येतात? असें कर्म करून परतोन राजियाकडे भेटीस आले. तेच खांसा राजा चालोन जाऊन जावली सर केली......हणमंतराव ह्मणून चंद्ररायाचा भाऊ चतुर्बेट ह्मणून जागा जावलीचा होता, तेथे बळ धरून राहिला. त्यास मारल्याविना जावलीचें शैल्य तुटत नाहीं असें जाणून. संभाजी कावजी ह्मणून महालदार राजियाचा होता, त्यास हणमंतराव याजकडे राजकारणास पाठवून सोयरिकीचें नातें लावून, एकांती बोलीचालीस जाऊन संभाजी कावजी याने हणमंतरायासी कटारीचे वार चालवून जिवे मारिले, जावली काबीज केली."

द्र्याफ्तेमध्यें ऐसें आलें कीं, आगर बंगाल्यांतच मुखत्यार गव्हरनर जनरेल पहिल्यापासून अधिक राहिल्यासी फार उत्तम आहे; आणि बादशाह वालाजाह परलमिंटचे चित्तांत ऐसें होतें कीं, बिलकूल एखत्यारी व मुखत्यारी, मजकूर एक साहेब जनरेलावरी आसावी. ते साहेब बहुत दिलावर व मर्दाना व उमदा व सरदार व सरदारीयोग्य ऐसा कीं, याप्रमाणें कोन्ही उमदा हिंदुस्थानांत गेला नसेल, ते गेल्यासी उत्तम आहे. याजकरितां दिरगतरान कंपनीनें बादशाह वालाजाहचे हुकमाप्रमाणें करीट (ग्रेट) आनरबील (आनरेबल) अर्ले करनवालीस (कार्नवालीस) बादशाही फौजेमध्यें जनरेल होते, त्यांसी दरखास्त ऐसी केली कीं तुह्मांवरी खिजमत गव्हरनरी व जनरेली व सरदारी फौज व मुखत्यारी कुल याप्रमाणें मोकरर होत आहे, कीं सारे बंदर तालुके इंग्रेजीमध्यें कोन्ही साहेब इंग्रजासी जाहाली नाहीं. हे गोष्ट कबूल करा. अर्लेसाहेब मजकुरानें हे हुकूम कबूल करून, आज छ १२ माहे सितंबरी सन १७८६ *मसीहा छ १८ माहे जिलकादेस सन २८ जलूसवाला ते दिवशीं दाखल कलकत्तेसी होऊन मसनदर्सान खिजमत गवरनरी व सरदारी फौजेची, व मुखत्यार जो सदरीं लिहिलें आहे त्याप्रमाणें जाहाले, व हाही त्रेही दुसरे दरजेवरी सरफराज जाहाला. आणि समस्त वर्तमान दोस्ती व एकपणेचें-जे कंपनीसीं व आं साहेबासीं तरदूद व मेहनत मुसलिसाचें जें पहिल्यापासून अधिक आहे-तें अर्लसाहेबाचे हुजुरेसी जाहीर केलें.

* ह्या पत्रासोबत खालील माहिती दिलेली आहे. त्यावरून 'दिरगतरान' (डायरेक्टर्स) व परलमिट (पार्लमेंट) ह्या शब्दाचे अर्थ व इंग्रजी महिन्यांची व सनाची माहिती ठाला सेवकरामाने पेशव्यांस पाठविल्याचे दिसून येते.

**श्रीशंकर.**

"दिरगतरान ह्मणजे कंपनीचे बडेसाहेबास ह्मणतात.

परलमिट ह्मणजे बादशाहाचे आलकाब आहे.

सन मसीहा ह्मणजे हजरत इसा नामे एक पैगंबर होता. त्याचे मजबईमधे इंग्रेज आहेत. याचा सन धनसंक्रांतीचे तेरावे दिवशी चंद्र २५ दिजंबरी याचे बडादिन होतो. ते दिवस हजरत इसाचा जन्मदिवस आहे. ते दिवसापासून सन फिरतो आणि या सनाचे बारा महिने आहेत. त्यांचा तपसील:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ माहे दिजंबर | दिवस ३१ | १ माहे जून | दिवस ३० |
| १ माहे जानेवारी | दिवस ३१ | १ माहे जुलई | दिवस ३१ |
| १ माहे फेब्रुवारी | दिवस २८ | १ माहे आगस्त | दिवस ३१ |
| १ माहे मार्च | दिवस ३१ | १ माहे सिपटंबर | दिवस ३० |
| १ माहे एप्रिल | दिवस ३० | १ माहे आक्टोबर | दिवस ३१ |
| १ माहे माई (मे) | दिवस ३१ | १ माहे नोव्हेंबर | दिवस ३० |
| ६ | १८२ | ६ | १८३ |

एकूण महिने बारा व दिवस तिनशे पासष्ट होतात. येणेंप्रमाणें आहे. हे विज्ञापना."

व अलेसाहेब मजकूरही इरादा मजबूत हेच ठेवितात कीं, आपले मारफतीनें बाग दोस्ती व दोस्ती एकपणेचा आहे, त्यासी निघेबानीचा पानी रात्रंदिवस शिंपून हिरवा व ताजा राखावा. हे कामाकरितां बिलकूल एखत्यार यांजवरच करार जाहाले. आणि, अलेसाहेब मजकूर आपले तर्फेनें हेच मरातिबे याचप्रमाणें आं साहेबासीं लिहितील. आं साहेबासीं निश्चय असावा कीं अलेसाहेब मजकूरचे वचनांत केसाप्रमाणें अंतर होणार नाहीं. यांचे दोस्ती व दोस्तीहिलीमध्यें मजबुती व मजबुती कमाल सेवटापावेतों राहील. उमेद, दोस्ती दिली पासून ऐसी आहे कीं, इंजानिबासीं दोस्त एकरंग आपले ध्यानासी आणून, हमेशा कुशलतेचें पत्रे तेथील वर्तमानसहित लिहून खुशाल करीत गेलें पाहिजे. ज्यादा काय लिहिणें ?

## लेखांक १६.

हें पत्र फार महत्त्वाचें व मनोरंजक आहे. ह्या पत्रामध्यें कलकत्त्याच्या कौंसिलची स्थिति, लॉर्ड कार्नवालिससाहेबांचें कलकत्त्यास आगमन (ता. १२ सपटंबर इ. स. १७८६), त्यांचा सत्कार, त्यांची वर्तनपद्धति, त्यांचा स्वभाव वगैरेंची माहिती दिली आहे. हें पत्र फार मूल्यवान् असून त्यांत लार्ड कार्नवालिस ह्यांच्या आगमनाच्या वेळच्या कलकत्त्याच्या स्थितीचें अत्युत्तम चित्र काढलेलें आहे.

पै॥ चंद्र २२ रालावल सन **श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता. २ अकटोबर इ. स. १७८६.
सबा समानीन पौष वद्य १० मंदवार.
बराबर चौकडा काशीद सरकार.

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसी—

आज्ञांकित चरणरज सेवकराम व चिमणलाल साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत आश्विन शुद्ध १० चंद्र ७ जिल्हेज पावेतों आसे. माहाराजांनीं कृपा करून आपली कुशल आनंदवैभवलेखन आज्ञा केली पाहिजे. सांप्रतकाळीं सरकारचा चौकडा खलितेचा जाब व इनायतनामा घेऊन बदामीचे मुक्कामेंहून रवाना जाहाला, ते उत्तम समयीं पोहोंचून सेवकासी सरफराज केलें. त्याजवरून सर्व वर्तमान तेथील कळों आलें. ते खलिते बडेसाहेबांसीं गुजरानिले. तेव्हां बडेसाहेबांनीं ...... बोलावून तिकडील फौजेचें व लढाईचें वर्तमान पुसलें. मग सेवकानीं सांगितलें कीं, टिपू मिया कांहीं सरकारचे फौजेसमोर येऊन युद्धासी सिद्ध होत नाहीं. सरकारतर्फेनें श्रीमंत नानासाहेब व हरिपंततात्या साहेब आहेत. यांजबरोबर हुजरात वगैरे मिळून ऐशीं नव्वद हजार स्वार आहे, व तोफखान्याची पन्नास साठ जरब थोरली आणि पौनसेंपर्यंत लाहान जरब आहेत. याशिवाय तुकोजीराव होळकर व मुधोजी भोंसले व नवाब निजाम अलीखान बाहादूर आपले फौजेनिसीं हाजर आहेत. फौज भारी आहे. याजकरितां टिपू मिया पुढें येऊन युद्धांशीं उभे राहत नाहीं.

आणि येथून लिहिलें गेलें होतें कीं आह्मांसीं दोस्ती राहणें. श्रीमंत साहेबांचे सरकारेसीं व कंपनीचे सरकारेसीं फार मनजूर आहे. याजकरितां हिंदुस्तानप्रांतीं कोणाचा उपद्रव होऊं देणार नाहीं. माहादजीराव शिंदे दक्षिणेसीं सरकारकामावर गेल्यासी कांहीं चिंता नाहीं. याचे उत्तरीं असें आलें कीं, माहादजीराव शिंदे हिदुस्थानांत आहेत, हेही सरकारकामावरीच आहेत; आणि येथें कांहीं फौजेची कमी नाहीं. कंपनीची दोस्ती करितां नवाब निजाम अलीखानचे विद्यमानें पांच पलटणा आणविल्या आहेत. असे सालजाब जाले. याजपूर्वी काशिदजोडी एक आजुरदार बरोबर येथील सविस्तर वर्तमान व चिरंजीव चिमनलालचें निरोपाचें वर्तमान लिहून व खलिते बडेसाहेबांचे हिंदवी नकलेसहीत चंद्र ४ सवालीं माहाराजांचे सेवेसी पाठविले, ते पोहोंचून येथील सविस्तर वर्तमान निवेदन जालें असेल. त्यांत हे मजकूर लिहिले होते कीं, येथें चार साहेब मिळून कारभार करीत आहेत. या चौघांमध्यें परस्परें चित्त शुद्ध नाहीं. हें वर्तमान त्यांत तपसीलवार लिहिलें, आणि कर्नेलसाहेबांचे सांगितल्याप्रमाणें आर्ज केली कीं लार्ड कार्नवालीससाहेब येथील गव्हर्नर होऊन विलायतेहून येतात आणि वरकड कची बातमी लिहून सेवेसी पाठविले, ते पोहोंचले असेल. प्रस्तुत येथील वर्तमान असें आहे कीं, लार्ड कार्नवालीससाहेब येथील गव्हर्नर होऊन येतात, ते मदिराजेसी येऊन पोहोंचले. येथें लवकरच येतील. याजकरितां येथील सर्व कामकाज दरबारचे बंद आहेत आणि दरबारही बंद आहे. मदिराजेहून कार्नवालीससाहेबांनी येथील कारभारी यासी लिहून पाठविलें कीं, जनरेल मुलबारसाहेब फौजेचे कारभार करितात, त्यांनीं करूं नये, आणि कौसिलांत बसूं नये. ह्मणून येथील जितके इंग्रज मातबर मुलकी माली कामावरीं होते, ते भयाभीत जाले आहेत. अद्यापि कलकत्त्यासी आले नाहींत. पूर्वींच एक कौसली तगीर केले. यांनीं बादशाहाचे हुजुरेहून काय हुकूम आणिले आहे हें कळत नाहीं. कोणाकोणाशीं ठेवील अथवा न ठेवील ह्मणून फार दुश्चित्त आहेत. चंद्र १० माहे जिलकादीं खबर आली कीं, लार्ड कार्नवालीससाहेब मदराजेहून आल्लीकडे आले; लवकरच येतात. याजकरितां येथून मिस्तर इष्टबिलसाहेब व इस्टरसाहेब असे दोन कौसली व कर्नेल मेगफरसनसाहेब व पामरसाहेब वगैरे येथील मातबर आंग्रेज पुढें नावांवर बसून आणावयासी समुद्रापर्यंत गेले. येथील बंगाली लोकांची रीत आहे कीं, जे कोणी इंग्रज विलायतेहून मातबर माणूस आले तरी, त्यासी आणावयासी येथून कांहीं जेवायाचे वगैरे सरंजाम घेऊन पुढें जातात. मग ते इंग्रज ज्यापासून कांहीं जेवायाचें अथवा आणखी कांहीं घेतलें ह्मणजे तेच बंगाली त्याची दिवाणी करितो, असा सिरस्ता आहे. याजकरितां येथून बहुत बंगाली लोकांनीं पांचशें नावांपर्यंत घेऊन गेले. त्यांजपैकीं कांहीं नावांत माणसें बसून गेले, आणि कांहीं नावांत येथील मेवा तरवखुलशक व कांहीं अन्न पदार्थ व कांहीं नावांत केळीचीं झाडें, व नारंगी व लिंबूचीं झाडें वगैरे बारदार झाडें लावून, बाग सिद्ध करून घेऊन गेले होते. ते समुद्रापर्यंत गेले. परंतु लार्ड कार्नवालीससाहेबानें सारे लोकांची भेट न घेतां, व वर्तमान

न कळवितां, फार त्वरेनें, चंद्र १८ माहे जिलकादीं मंगळवारीं येऊन, कलकत्त्याचे किल्ल्यांत दाखल जहाले. आणि तोफा सलामीच्या जाल्या. ते समयीं येथील मेगफरसन बडेसाहेबासी वर्तमान कळलें कीं, कार्नवालीससाहेब किल्ल्यांत दाखल जाले. मग आपण व इस्टबिलसाहेब व इस्टूरसाहेब व येथील सर्व मातबर आंग्रेज व हिंदुस्तानी व बंगाली लोक मिळून भेटीस गेले. कार्नवालीससाहेबांनीं कोणाची भेट घेतली नाहीं. एक मेगफरसनसाहेब दोन्ही कौंसलीसी किल्ल्यांत भेटले, आणि स्वार होऊन शहराची हवेलीमध्यें येऊन दाखल जाले. दाहा पांच असामी मातबर इंग्रजांसी भेटले. आणि मेगफरसनसाहेबानें राजा गोविंदराम वजीराकडील वकील व सेवकासी व चिरंजीव व चिमनलाल व विश्वंभरपंत भोंसलेकडील, भगवंतराव माहादजीराव शिंदेकडील वकील असे पांच आसामी यांसी बोलावून, वरचेवरी भेट करून देविली. कांहीं बोलणें जालें नाहीं. बाकी समस्त लोकांसी जाब दिले कीं, आज कोणाची भेट होणार नाहीं. मग सारे लोक न भेटतांच फिरून गेले. येथून जे इंग्रज व बंगाली लोक पुढें आणावयासी गेले होते, ते मागून दोन दोन चार चार दिवसांत आपले घरासी आले. मग लार्ड कार्नवालीससाहेबानें जे आवघे इग्रज व सारे मातबर लोकांसी सांगून पाठविलें कीं, दरबारेसी बोलाविलेवांचून कोणीं येऊं नये. याजबरोबरी विलायतेहून करनेल रास नामें एक आंग्रेज फार मुसाहेब होऊन आले आहे. आणि याशिवाय चार पांच आंग्रेज आणखी आहेत. यांजपैकीं एक करनेल रासच सारे इग्रजांशी जाबसाल करितो, आणि आवघ्यांचीं उत्तरें बडेसाहेबांसी करितो. आणि ...... साहेब आंग्रेज पहिलेपासून मुनशीगिरीचे कामावर आहेत; त्याचे बापाशीं व बडेसाहेबांसी विलायतेमध्ये फार हेत आहे. याजकरितां आतां त्याजवर बहुत ममता आहे. सारे हिंदुस्तानी वकीलांची भेट व जाबसाल त्याचेच विद्यमानें ठहरलें. चंद्र २१ जिलकादीं इष्टबिलसाहेबाचे विद्यमानें, जितके आंग्रेज शिपाई होते त्यांची भेट जाली. चंद्र २२ रोजीं आमलतदार व समस्त आंग्रजांची भेट मेगफरसनसाहेबाचे मार्फतीनें जाली. चंद्र २४ रोजी आवघे वकीलांची भेट...........साहेब मुनशीचे विद्यमानें जाली. भेटीचे समयीं ऐसी युक्त केली कीं, कोणाचे भेटीचें वर्तमान कोणासी कळलें नाहीं. परंतु परस्परें वर्तमान कळलें कीं, राजा गोविंदराम धजीराकडील वकील व सेवकासी व चिरंजीव चिमनलाल व विश्वभरपंत भोंसलेकडील व भगवंतराव माहादजीराव शिंदेकडील, यांसी उभे राहून भेटले; आणि कोणाशीं उभे राहून भेटले नाहीं. बसूनच भेटले. सेवकास भेटीचे समयीं दोन पावलें पुढें येऊन भेटले व जवळ चौकीवर बसविलें. आणि श्रीमंत ... साहेबांचे व स्वामीचे कुशलतेचें वर्तमान पुसलें, आणि बोलिलें कीं तुह्मांकडील सरदारी हिंदुस्तानांत व दक्षिणेंत फार मातबर व कंपनीसीं दोस्ती बहुत. आह्मांसी हेंच मंजुर आहे कीं, तुमचे सरकारेसीं व कंपनीसीं पूर्ण चित्तापासून दोस्ती असल्यासी बहुत उत्तम आहे. आणि तुह्मांकडील जितके मजकूर दोस्तीचे आहेत, ते मेगफरसनसाहेबानें आह्मांसी समस्त

•गमजाऊन सांगितले. तुह्मीं आपले धनीयासी आमचे दोस्तीचे मजकूर लिहून पाठविणें. मग सेवकांनीं सांगितलें कीं आमचे धनीची हेच मर्जी आहे कीं, परस्परें दोस्ती राहिल्यानें फार उत्तम आहे. दोस्ती न राहिल्यासी बहुत खलेल उभे राहतील. हिस्टनसाहेबानें आमचे सरकारेसीं निष्कारण बिघाड केले. यांत कंपनीचा खजाना बहुत खर्च जाले व आमचे सरकारांतही खर्च बहुत पडले. शेवटीं जें वर्तमान जालें तें आपल्याशीं विलायतेमध्यें ऐकण्यांत आलेंच असेल. मग बडेसाहेबानें उत्तर केलें कीं, आह्मांसी हुजुरेहून याजकरितांच पाठविलें आहे कीं, दक्षण व हिंदुस्तानेमध्यें पेशवासाहेबांची सरकार व नवाब निजाम अल्लीखान हे दोन्ही सरकार मातबर आहेत. यांसीं व कंपनीसीं पूर्ण दोस्ती राखून, जें कामकाज करणें तें समजून करावें. अशीच आज्ञा आहे. मग सेवकांसी अत्तरपान देऊन रवाना केलें. त्या दिवसापासून कांहीं दरबार जालें नाहीं. येथें आदालत घर आहे, तेथें बडेसाहेबानें एका कागदावर इश्तहारनामा लिहून लावून दिले. त्यांत हे मजकूर लिहिले होते कीं, लार्ड कार्नवालीससाहेब बंगालचा गव्हर्नर चंद्र १८ माहे जिलकादेपासून जाले, आणि मेगफरसनसाहेब दुसरे दरजेवरी, व इस्टबीलसाहेब तिसरे दरजेवर, व इष्टुरसाहेब चौथे दरजेवर करार जाले आहेत. ऐसें लिहून चंद्र १९ जिलकादीं लाविलें. मग चंद्र २१ पासून लोकांची भेट घेऊं लागले. चंद्र २५ पासून दरबार बंद आहे. सारा दिवसभर बसून येथील माली व मुलकी कागदपत्र पाहतात. जवळ मेगफरसनसाहेब व करनेल रास व आणखी एकदोन आंग्रेज कारभाऱ्यांपैकींच जवळ राहतात. दुसरे कोणी जाऊ सकत नाहीं. आणि रात्रीं आपण व करनेल रास व एक दोन आंग्रेज मिळून पायींच, मशाल न घेतां, येथून किल्ला दोन कोसपर्यंत आहे, तेथवर जातात. अथवा शहरांत अर्ध रात्रीं पावेतों फिरतात. याचा भै (भय) येथील समस्त आंग्रेज व बंगाली यांजवर फार पडलें आहे, व माणूस मातबर. याचें कुल वर्तमान मेगफरसनसाहेबांचे खलितेची हिंदवी नक्कल करून खिजमतेसी पाठविली आहे, त्याजवरून सेवेसी विदित होईल. आणि विलायतेमध्यें याचे पांच करोड रुपये कंपनीमध्यें सौदागिरींत आहेत असें वर्तमान समजलें. वय पन्नास वर्षांपर्यंत आहे, आणि उजवीकडील नेत्र वांकडा व शरीर ठेंगणें व सुरत उग्र व बोलणें फार नम्रतीचें व प्रकृति तामसी आहे. प्राकरम (पराक्रम) कसा आहे देव जाणे. समजल्याशी अर्ज केला जाईल. आणि याचे नांवाचा कांहीं पुरता शोध लागत नाहीं. कर्नेल मेगफरसनसाहेबानें लिहून दिलें कीं याचें नांव लार्ड कार्नवालीससाहेब आहे. आणि मेगफरसनसाहेबाचें पत्रांत लारिट आनरबिल आरल कार्नवालीस असें नांव लिहिलें आहे. आणि शिक्यामध्यें कांहीं भिन्नच नांव आहे. तहकीक करून अर्ज केली जाईल. करनेल मेगफरसनसाहेब कामांतून निघाले. करनेली मात्र आहे. मागें ऐकण्यांत आलें होतें कीं, याजबरोबर इंग्रज गोरे हजार असामीपर्यंत येतात. त्याशीं यांचे बरोबर कांहीं इंग्रेज आले नाहींत. आतांही वार्ता आहे कीं, माघे पांच साहा जहाज येतात. त्याचें-

ही वर्तमान समजून अर्ज केला जाईल. सरकारचे आज्ञापत्रामध्यें लिहिलें होतें कीं, तुह्मी तेथेंच राहणें आणि चिमणलालासी पाठवून देणें. त्यासी, मागें मेगफरसनसाहेबानें सांगितलें कीं, पेशवासाहेबाकरितां हात्तीचे बच्चे व घोडे लहान टांगण पाठवावयाचे आहेत. त्यांजपैकीं टांगण आले आहेत. हात्तीचे बच्चे यावयाचे आहेत. आले ह्मणजे रुखसत करितों. ते आजपावेतों हात्तीचे बच्चे आले नाहींत. ऐसे पूर्वी सेवेसी अर्ज केली होती. इतक्यात खबर आली कीं, दुसरा गव्हर्नर होऊन येतो. मग बोलूं लागले कीं, गव्हर्नर आल्यावर त्याची भेट घेऊन जाणें. त्यासही आल्यापासून दरबार होत नाहीं. मेगफरसनसाहेब ह्मणतात, दरबारचे बंदोबस्त जाले ह्मणजे रुखसत करून देवितों; कांहीं चिंता न करणें. चिरंजीव गुलाबराय माहाराजांचे चरणाजवळ आहे. स्वामी धनी समर्थ. ईश्वरतुल्य मायबाप आहांत. बहुत काय लिहिणें हे विनंति व विज्ञापना."

## लेखांक १७.

हेंही पत्र महत्त्वाचें आहे. ह्याजवर तारीख दिलेली नाहीं. परंतु तें इ. स. १७८६ सालचें असावें. वॉरन हेस्टिंग्ज विलायतेस गेल्यावर त्याजवर 'फार संकट' आल्याचा उल्लेख त्यांत आहे. त्याचेसाठीं मि. शोर तिसरे दर्जाचे कौन्सली ह्यांच्या सांगण्यावरून तफजुल महंमदखान नवाब-वजीराचे वकील ह्यांनीं, सर्व सरदार व राजे लोक ह्यांच्याकडून, वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं सर्वांसीं स्नेहभावाचें व दोस्तीचें वर्तन केलें, असा एक कागद तयार करून घेण्याचा प्रयत्न केला; परंतु लाला सेवकरामानें त्याजवर सही केली नाहीं, ह्मणून मजकूर आहे. तो इतिहासवाचकांस फार मनोरंजक वाटेल. ह्यास इंग्रजी ग्रंथांतून प्रत्यंतर पुरावा सांपडतो.

**श्रीशंकर.** इ. स. १७८६.

"सेवकाचे पत्रामधे ऐसें लिहिलें आहे की तफजुल महंमदखान नवाब वजीराचे वकील यांनीं मिस्तर शोर साहेब तिसरे दर्जाचे कौसली यांचे सांगितल्याप्रमाणें एक महजर तयार केले कीं, मिस्तर हिस्टीनसाहेब यांनीं सारे सरदार व जमीदार लहान थोर सुभे बंगाल व काशी व लखनौ व इतर मुलुखाचे सरदार व राजे यांची बहुत दोस्ती व एकलास व सलूख केले. ऐसे महजर करून त्याजवरी समस्त सरदार व जमीनदार कलकत्ते व बंगाले व लखनौ व काशी व सावकार बंगाली व हिंदुस्थानी व बेणीरामपंत व विश्वंभरपंत भोंसलेकडील वकील व भगवंतराव-राजेश्री शिंदे कडील वकील व शंकरराव-शिवाजी विठ्ठलकडील वगैरे हे समस्तांनीं शपतपूर्वक आपल्या मोहरा करून दिल्या. तो महजर आह्मांकडे पाठविला कीं तुह्मींही आपली मोहोर करून देणें. आह्मीं उत्तर केलें कीं, हिस्टीनसाहेबानें जैसी आह्मांसीं दोस्ती केली, ते विलायतेपर्यंत मशहूर आहे. त्यासी श्रीमंत पेशवासाहेबांचे हुकुमाशिवाय मोहोर करणार नाहीं. याजकरितां मिस्तर शोरसाहेबांसी फार वाईट लागलें. जैसी आज्ञा होईल

त्याप्रमाणें बर्तणूक होईल. विलायतेमधीं हिस्टीनावरी फार संकट आहे. ह्मणून महजर येथून करून पाठविणार. पूर्वी मिस्तर मेगफरसनसाहेबानें जानसेनसाहेबाचे विद्यमानें मौलवी महंमद कासीम यासी पांचशें रुपयेचा दरमाहा करून कांहीं तोफे विलायती देऊन, नवाब निजाम अल्लीखान याजकडे पाठविलें होतें. हल्ली बडेसाहेबानें मिस्तर किनवी-साहेबासी नवाबाजवळ पाठविलें. त्यांनीं तेथें जाऊन बहुत प्रकारें एकपणा दांखवून बिगनूर प्रांतीं कांहीं जागा मागून घेतली. तेथील वसूल नऊ दाहा लक्ष रुपयेपर्यंत आहे. ते जागा कंपनीचे नांवें करून घेतली. तेथें कोठी करावे ऐसे निश्चय करून माणसें झाडें कापावयासी लाविलें आणि बडेसाहेबांसीं लिहून पाठविलें. बडेसाहेब हे गोष्टीनें बहुत खुषवक्त होऊन चारशें गोरे इंग्रेज शिपायी व पन्नास तोफा व पांच हजार मण बारूत व गोळे जलमार्गे जहाजावरी तिकडे पाठविलें; व एक पलटण तेलंगे व दोन हजार मजूर कटकेवरून खुषकीचे वाटेनें पाठविले. नवाबासीं व बडेसाहेबासीं मिस्तर मजकूरचे विद्यमानें कौलकरार शपतपूर्वक जाहले. आणि मौलवी मजकूर आपले अर्ज बेगीबरोबरी हत्ती व घोडे व पोशाख व जवाहीर नवाबांनीं इकडे रवाना केले आहेत. येणेंप्रमाणें सेवकाचे पत्रीं लिहिलें आहे. हे विज्ञापना."

## लेखांक १८. ता. २ आक्टोबर इ. स. १७८६.

### श्रीशंकर.

"श्रीमंत राजेश्री बाबासाहेब स्वामींचे सेवेसीः—

सेवक लाला सेवकराम व चिमणलाल मुक्काम कलकत्ते. येथील कुशल तगाईत चंद्र ९ जिल्हेजपावेतों साहेबांचे कृपेकरून असे. स्वामींनीं कृपा करून हरघडीं पत्रद्वारें सेवकांचा परामर्ष करीत असलें पाहिजे. विशेषः—माहाराजांनीं मेहरबानी करून सरकारचे चौकव्या बरोबरी पत्र पाठविलें, तें उत्तम समयीं पोहोंचून, सर्फराज केलें. ऐसेंच सदैव ममता करून सांभाळ करीत गेलें पाहिजे. विशेषः—येथें विलायतेहून लॉर्ड कार्नवालीससाहेब गवरनर होऊन चंद्र १८ जिल्कादीं येऊन कलकत्त्यासी दाखल जाहले. याचें वर्तमान तपसीलवार सरकारचे पत्रांत लिहिलें आहे, त्याजवरून सेवेसी निवेदन होईल. चिरंजीव गुलाबराय तेथें पायाजवळ आहे. त्याचा परामर्ष करणें साहेबासच आहे. तेथें कोणी आमचा आश्रय नाहीं. चिरंजीवानें लिहिलें आणि माहाराजांचे पत्रावरून दर्याफ्त जाहालें कीं मखमल ऊंच व घडी लहान व वस्त्र याचा गंज फरासिसी पाठवून देणें. त्यासी फरासीसाचे कोठींत खबर घेतली. कोठीकरानें सांगितलें कीं, महिने पंधरा दिवसांत आमचे जहाज येतील. त्यांजमध्यें मखमल वगैरे सरंजाम येईल. त्यांतून तुह्मांसी जें जें पाहिजे तें देवूं. परंतु मखमल फार उंच चाळिस रुपये गजाशिवाय अधिक किंमतीची मिळणार नाहीं. तीही बुट्टेदार मिळेल. साधी इतके किंमतीची होत नाहीं, याजकरितां अर्ज ऐसा जे चिमणलालाची रुख-

सत लवकरच होईल. याजबराबरी लिहिल्याप्रमाणें फरमाविस सेवेसी पावती होईल.. सर्व प्रकारें स्वामींचे पायाचेच आश्रय आहे. बहुत काय लिहिणें. कृपालोभ असों दीजे हे विज्ञापना."

## लेखांक १९.

लॉर्ड कार्नवालीससाहेब कलकत्त्यास आल्यानंतर सुमारें ६ महिन्यांनीं हें पत्र लिहिलें आहे. ह्यामध्यें त्यांची वर्तनपद्धति, स्वभावाचा रागरंग, ह्यांचें वर्णन लिहिलें आहे. तें मनोरंजक आहे. वारन हेस्टिंग्जसाहेबांच्या कारकीर्दीमध्यें नजरनजराणे घेण्याचा परिपाठ पडला होता, परंतु तो लॉर्ड कार्नवालिस ह्यांस आवडला नाहीं. त्यांनीं नजरनजराण्याचा स्वीकार करण्याचा क्रम बंद केला, असें लाला सेवकरामाच्या पत्रावरून दिसून येतें.

### श्रीरामचंद्र प्रसन्न.

ता. ३ मार्च इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत फालगुन शुद्ध, १३ चंद्र १२ माहे जमादिलावल जाणून स्वानदाची लेखनआज्ञा जाली पाहिजे. विशेषः—पूर्वी येथील सविस्तर वर्तमान आरल कॉर्नवालीससाहेब विलायतेहून नवे गव्हरनर होऊन आले, त्यांचे खलिते व खलितेची नक्कल हिंदवी करून माहाराजांचे सेवेसी कासिदजोडी आजुरदार बरोबरी चंद्र १३ मोहरमीं पाठविले आहे; ते पोहोंचून सर्व वर्तमान खिजमतेसी कळलें असेल. सांप्रत काळीं येथील वर्तमान असें आहे कीं, नवाब मुबारकदवला सुभेदार बंगाल—जाफर अल्लीखानचे लेक मुरशिदाबादेहून कूच करून चंद्र २५ माहे मोहरमीं कलकत्त्यासी दोन कोसांवर डेऱ्यांत दाखल जाले. बडेसाहेबांनीं मिस्तर सूरसाहेबासी पांच सात कोसांवर पुढें आणावयासी पाठविलें होतें. चंद्र २७ मोहरमीं नवाब सादत अल्लीखान,—नवाब वजीराचे भाऊ, दोन महिने पुढें मेगफरसनसाहेबाची आज्ञाप्रमाणें, श्रीकाशीजीहून कूच करून ढाका जहानगीरनगर प्रांतीं सेर करावयासी गेले होते. येथें गव्हरनर नवा विलायतेहून आरल कॉर्नवालीससाहेब आले हें वर्तमान ऐकून यांची भेटीकरितां कलकत्त्यासी आले. चंद्र २७ मोहरमीं नवाब मुबारकदवलानें आपले स्वारीचे सरंजाम फार दुरुस्त करून, दाहा बारा हात्ती, व पन्नास साठ स्वार, व चारपांचशें पायदळ व पंचवीस घोडे कोतवाल, व दहाबारा पालख्या, व नालकी जरदोजी, व शंभर खासबारदार जलेबेमध्यें होते.: असें सरंजामानिशीं बडेसाहेबांचे घरासी गेले.

बडेसाहेब कार्नवालीस, व मेगफरसनसाहेब, व इष्टबिलसाहेब, व इष्टुरसाहेब दरवाज्यापर्यंत पुढें येऊन नवाबमजकुरासी भेटले, व बरोबर घेऊन माडीवर जाऊन बसविलें. खैराफियतचें वर्तमान परस्परें पुसून अत्तरपान देऊन रुखसत केलें. चंद्र ५ सफरीं बडेसाहेब व तिन्ही कौसली नवाबाचे डेऱ्यासी गेले. नवाबांनीं १५ खान पोशाकी, व चार खान जवाहर, व एक हत्ती व दोन घोडे पुढें आणविले. बडेसाहेबांनें साफ बोलले कीं, आह्मी कोणापासून कांहीं घेणार नाहीं, आणि कोणासी आपलेपासून कांहीं देणार नाहीं. अत्तरपान घेऊन आपले घरासी आले. याजप्रमाणें नवाब सादतअलिखानासीं चंद्र ७ रोजीं भेट जाली. खैराफियतचें वर्तमान पुसून परस्परें खुशीनें अत्तरपान देऊन रुखसत केलें. दुसरे रोजीं बडेसाहेब व मेगफरसनसाहेब व दोन्ही कौसली व करनेल रास नवाबाचे डेऱ्यास गेले. नवाबांनीं पांच खान पोशाकी व दोन खान जवाहर व एक घोडा पुडे आणविला. बडेसाहेबानीं कांहीं न घेतां अत्तरपान घेऊन घरासी आले. चंद्र ७ रोजीं बडेसाहेबानें नवाब मुबारकदौला, व सादतअलीखान, व नवाब मुजफरजंग यांची मेजमानी केली. चंद्र ११ रोजी मुबारकदौलानें बडेसाहेबांची मेजमानी केली. बडेसाहेब व मेगफरसनसाहेब दोन्ही कौसली व करनेल रास व सूरसाहेब वगैरे मातबर आंग्रेज त्यांचे घरासी गेले. जेवण जाहालियानंतर पांच सात तायफे मातबर व पंचवीस हजार रुपयांची आतशबाजी बरोबर आणिले होते. त्यांचा तमाशा अर्धरात्रीपावेतों दाखवून रुखसत केलें. चंद्र १७ सफरीं बडेसाहेब व करनेल रास व आणिक कौसली मुबारकदौलाचे डेऱ्यासी गेले व तेथेंच त्याची रुखसत करून आले; आणि नवाब सादतअलीखानचेही घरासी जाऊन रुखसत केली. नवाबाचे मालजाबमध्यें कवलबुरग (?) साहेब मुनसी यांचे पेशकार अहमद जमाखान यानीं चाळीस पन्नास हजार रुपये घेतले, असें वर्तमान बडेसाहेबांसी कळलें. याजकरितां कवलबुरग मुनसीस दरबार मना जालें, आणि पेशकारासी कंपनीची चाकरीहून दूर केलं. आतां मिस्तर चेरीसाहेब—मुनसीखान्याचे दुसरे साहेब—हे कामावर करार केले. यांचें विद्यमानें सारे हिंदुस्थानी लोकांचा मालजाब होतो. चंद्र २५ सफरीं जेनरेल सुलबरसाहेब बडेसाहेबांसी निरोप घेऊन जहाजावर स्वार जाले. दोनचार दिवसानंतर विलायतेस गेले. चंद्र ३ रबिलावलीं पौष शुद्ध पंचमीस इंग्रजांचे 'बडादिन' जाले. येथील लोकांनीं सुदामतप्रमाणें चार पांचशें डाल्या तर मेवे यांच्या वगैरे तोफे आणि 'बडेदिन'ची नजर आशरफी रुपै नगद घेऊन आले. परंतु बडेसाहेबांनीं कांहीं न घेतलें. सारे लोकांसी अत्तरपान देऊन रुखसत केलें. चंद्र १७ माहे रबिलावलीं मिस्तर इष्टबिलसाहेब तिसरे दरजेचे कौसली होते. बडेसाहेबांची आज्ञा घेऊन, आंग्रेजी बिबियाचा नाच पाहून, जहाजावर स्वार जाले. सात आठ दिवस राहून विलायतेसी गेले. चंद्र २५ रोजीं कळलें कीं, मेगफरसनसाहेब, दुसरे दरजेचे कौसली, यांनीं बडेसाहेबासी सांगितलें कीं, आमची तबियतेसी बेआरामी राहती; याजकरितां आह्मी तीन महिन्यांची रुखसत घेऊन हवा खायासी समुद्राचे वाटेनें मदराजेसी जातों. बडेसाहे

बांनीं उत्तर केलें कीं, बरें आहे. चंद्र ५ माहे रबिलाखरीं करनेल मेगफरसन–जे पूर्वी स्वामींचे सेवेसी पुण्यासी आले होते–यांनींही बडेसाहेबांपासून निरोप घेऊन, कुटुंबासहित जहाजावर स्वार होऊन विलायतेसी गेले. आह्मांसीं जातेसमयीं सांगितलें कीं, आमची बहुत प्रकारें श्रीमंत नानासाहेबांचे सेवेसी सलाम लिहिणें, व आमचे नांवें जें पत्र श्रीमंत साहेब कृपा करून लिहितील, तें मेगफरसनसाहेबांस देणें. बडेसाहेबांसी न कळावें. असें सांगून स्वार जाले, व तेच दिवशीं मेगफरसनसाहेबांनीं आह्मांसी बोलिलें कीं, आह्मी जे मरातीब, दोस्ती व एकदिली श्रीमंत रावसाहेब व कंपनीची सरकारचे होते, ते सर्व प्रकारें बडेसाहेबांसी समजाविले; व दोन खलिते श्रीमंत रावसाहेब व नानासाहेबांचे नांवें लिहून बडेसाहेबांचे हवाला केले. चिमणलालचे रुखसत समयीं तुह्मांसी देतील, व रात्रीं जहाजावर स्वार होऊन मदराजेसी गेले. चंद्र १० रबिलाखरीं नवाब हदरबेगखान, नवाबवजिराचे कारभारी, बहुत मातबर, अडीच महिन्यांत लखनौहून कलकत्त्यासी दाखल जाले. बडेसाहेबांसी भेटून नजर दाखविली, परंतु बडेसाहेबांनी घेतली नाहीं. खैराफियत पुसून अत्तरपान देऊन रुखसत केलें. तिसरे रोजी बडेसाहेब खानमजकुरचे डेऱ्यासी गेले. करनेल राससाहेब, इष्टुरसाहेब, व सूरसाहेब व आणीक सात आठ आंग्रेज मातबर बरोबर होते. हैदरबेगखान यांनी दोन तीन हजार रुपयांचा खाना तयार केले होते. हरएक साहेबापुढें पानदान व अत्तरदान, गुलाबपाश व चौफुले चांदीचे, असेच सारे साहेबांपुढें सरंजाम सोन्याचे, व बडेसाहेब व करनेल रास यांचे पुढें जवाहरचे, व खानपोश जरदोजी, जवाहरजडित मोत्यांची झालरचे आणून ठेविले. आणि पन्नास खान पारचे पोशाकी, व आकरा घोडे तुरकी, व ताजी व दोन हत्ती. व एक पालखी चाळीस पन्नास हजार रुपयांचे सरंजामाची, सारे मिळवून चार पांच लक्ष रुपये सरंजाम नजर केले. बडेसाहेबांनीं सारी नजर पाहून बहुत तारीफ केली, परंतु कांहीं न घेतलें. अत्तरपान घेऊन घरासी आले. हैदरबगखान हे रंग पाहून स्तब्ध राहिले. राजा बछराज नवाब वजीरचे खजानची व राजा गोविदराम वकील यांजबरोबर शंभर बहंगी सरंजामाची बडेसाहेबांचे घरासी पाठविले. येथेंही कांहीं न घेतलें. पुढें खानमजकुरासीं काय सलूक करतात हें सविस्तर सेवेसी लिहिलें जाईल. इष्टबिलसाहेब विलायतेसी गेले ह्मणून सूरसाहेबासी तिसरे दरजेचे कासली केले. सेवकाचें वर्तमान ऐसें कीं, बडेसाहेबांनीं दोन चार बार, श्रीमंत रावसाहेब व स्वामींचे खैरिआत व लष्करचें वर्तमान पुसलें. आह्मीं जे साहुकारी आखबार कळली होती ते सांगितली. त्याजवर आपण बोललें कीं सरकारची फौज व टिपूसुलतानसीं दोन चार लढाई जाली, परंतु बरोबर राहिले. सरकारची फौजेचा भरणा बहुत भारी आहे. पूर्वी मेगफरसनसाहेबांनीं दाहा तसबिरा श्रीमंत साहेबांची नजर करितां घेतल्या होत्या, ते बडेसाहेबांनीं पाहून पसंद केली नाहीं. आपणच चेरीसाहेबाचे मारफत तलाश करून, चार तसबीर जे विलायती ताटवर आंग्रेज लोक काढितात, ते दोन हजार रुपयांची किंमत करून घेतल्या. एक

समर्बीर मिस्तर हिष्टीनसाहेबाची व एक जनरेल कूटसाहेबाची–जे मदराजची लढाईमधे मारले गेले–व एक हिंदुस्तानी बिबी व एक सुभेदारची अशी चार तसबिरा आह्मांसी दिधल्या, व एक हत्तीचा बच्या व पांच टांगन, व सात पारचे बादली पोशाकी, व एक मोत्यांची माळा, व एक सरपेच, व जिगा, जवाहर श्रीमंत रावसाहेबांची नजर करितां आमचे स्वाधीन केलें. चंद्र २० माहे रबिलाखरी बडेसाहेबानें सेवकासी व चिरंजीव चिमणलालासी बोलावून पहिले दोन खरिते मेगफरसनसाहेबाचे हवाला केले, व बहुत प्रकारें श्रीमंत रावसाहेब व स्वामीचे सेवेसी आपला सलाम सांगून व दोस्तीची रीत बहुत दाखवून, आपली तरफेनें दोन खलिते व सरंजामची याद दिधली; व पांच पारचे कारचोबी, व एक सरपेंच, जवाहर चिरंजिवासी देऊन रुखसत केलें, व दोन हत्ती थोरले मातबर लखनौचे साहेबांपासून श्रीमंतांचे नजर करितां आणविले होते. आह्मी बोलिलों की हत्ती येथे येतील व आपण पुण्यासी पाठवितील, याजला सात आठ महिने पाहिजे. ह्मणून श्रीकाशीचे साहेबासी कागद दिधले कीं, हत्ती लखनौहून येतात, आपल्या जवळ ठेवून लाला चिमणलालचे हवाला करणें. नगद खर्चाविषयीं बडेसाहेबानीं बहुत ओढ केली. याचें सविस्तर वर्तमान चिरंजीव सेवेसी अर्ज करतील. चिरंजीव येथें आल्यापासून एक वर्ष चार महिन्यांमधे एक दुशाला व पांच पारचे कारचोबी व सरपेच जवाहिर मेगफरसनसाहेब व कार्नवालिससाहेब यांजपासून पावलें. याशिवाय एक पैसा नगद पावले नाहीं. रुखसत जाल्यानंतर दाहा दिवसाने तीन हत्ती व पांच टांगण व बारबारदारी, चार तसबीर, याची खुराकी, दाणा व चारा, व मसाला, व हत्तीवान व साईस व सारबान, या लोकांची तलबा वगैरे हिशेब करून, तीन हजार रुपये आरकाटी त्याचे दोन हजार सातशें पन्नास रुपये शिक्का देविले. सेवेसी कळावें ह्मणून अर्ज केले. त्याजवर चिरंजिवाची रुखसत चंद्र १ माहे जमादिलावल फाल्गुन शुद्ध २ कलकत्त्याहून केली. व चिरंजीव गुलाबराय स्वामींचे चरणाजवळ आहे. त्याचा सांभाळ हरएक प्रकारें निग्रापूर्वक जाणतों कीं तेच चरण करतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक २०.

ह्यामध्यें लाला सेवकरामानें लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्या हालचालींचें वर्तमान लिहिलें आहे, तें मनोरंजक आहे. लॉर्ड कार्नवालिस ह्यांची दरबारी दिनचर्या लाला सेवकराम किती बारकाईनें निरीक्षण करून श्रीमंतांस लिहीत असे, तें ह्या पत्रावरून चांगलें ध्यानांत येतें.

**श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता. ११ आगस्ट इ. स. १७८७.

''श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत अधिक श्रावण वद्य त्रयोदशी चंद्र २६ माहे सवाल शनिवासरे जाणून आपलें स्वकुशल आनंदवैभव लेखकास आज्ञा जाहाली पाहिजे. विशेषः—पूर्वी दोन खलिते

मेगफरसनसाहेबाचे व विनंतिपत्र, सविस्तर वर्तमान, गवरनर कार्नवालिस साहेब व आणिक साहेबांचा व नवाब मुबारकदौला व नवाब सादतअलीखान, व नवाब खिरदमंदखान, नवाब फरुकाबादवालेचे भाऊ येथें आले, व बडेसाहेबांपासून रुखसत होऊन गेले. व हैदरबेगखान कलकत्त्यासी आल्यावर मेगफरसनसाहेब हवा खाण्यास मदराजेतर्फे समुद्राचे वाटें गेले, ऐसें लिहून कासिदजोडी आजुरदारबरोबर चंद्र १५ माहे जमादिलावलेस रवाना केले. त्याजवरून सेवेसी विदित जाहालें असेल. सांप्रत काली हैदरबेगखान याचा सालजाब ऐसें कळलें कीं......बडेसाहेब वजिरापासून सात लक्ष रुपये दरमहा, दोन कंपू फौजेची चाकरी, व अडीच लक्ष रुपये दरमाहा आपले कर्जाचे व्याजमध्यें माफ, दरमाहा घेतात, व याशिवाय, पांच लक्ष रुपये साल शाहाजादे जवांबखत व तीन लक्ष रुपये साल नवाब सादतअलीखान यास द्यावे लागले. मिस्तर हिस्टीनसाहेब यांनीं, विलायतेस जातां समयीं, नवाबवजिराचे दोस्तीवर नजर करून वीस लक्ष रुपये माफ केले होते. मेगफरसनसाहेब आपले अंमलांत कंपनीची कर्जदारी मुलतगा करीत होते. बडेसाहेब कार्नवालिससाहेब येथें आले. लाला मनोहरदास गोपाळदास साहूकार विमेवालेचे लेक—यांनीं बडेसाहेबांजवळ लाला काश्मिरीमलची नालीश करून काशीजीमधे दारावर चौकी बसविले होते. हैदरबेगखान यांनीं बडेसाहेबांसी सांगून, लालामजकुरास कलकत्त्यासी बोलावून भेट करविली, व आपले सालजाब रुपयेची माफीचे व तकफीफ पुढले खर्चाची दरपेश केले, व काश्मिरीमलविशीं बहुत सांगितलें. बडेसाहेबांनीं तीन चार महिनेपावेतों, त्याची मर्जीप्रमाणें सालजाब करून, शेवटीं बोलले कीं, आह्मी नवाबवजिराची भेट करून व कंपनीची कर्जदारीचा मजकूर समजाऊन सांगूं, व हिंदुस्थानचे मामलेचा बंदोबस्त करून देवूं. चंद्र २७ माहे जमादिलाखरेस बडेसाहेबांनीं हैदरबेगखानास बोलावून, चार घडीपावेतों खलबत करून बोलले कीं, वीस लक्ष रुपये सालप्रमाणे दोन सालचे चाळीस लक्ष रुपये लौकर पाठवावे, व एक हत्ती व दोन घोडे व जवाहिर व मोत्यांचा कंठा व पोशाख कारचोबी व एक तलवार वगैरे सरंजाम देऊन रुखसत केलें. खानमजकुरांनीं काश्मिरीमलविसीं बहुत सांगितलें. बडेसाहेबांनीं कबूल न करून एक पानही दिधलें नाहीं. याजकरितां रजब चंद्र २ नवाबवजिराचे खजानची यांनीं पोशाक बडेसाहेबाचा घेतली नाहीं. चंद्र ४ माहे रजबेस हैदरखान कूच करून लखनौस गेले. राजेश्री महादाजीराव शिंदे व बडेसाहेबाचे परस्परें खलिते दोस्ती व सालजाबचे, हमेशा भगवंतराव बलवंत वकिलचे मार्फत येतात. मेगफरसनसाहेब आजपावेतों आले नाहीं. मातबर आंग्रेज लोक बोलतात कीं, विलायतेसी गेले, येणार नाहींत. मिस्तर किलक पाद्रीसाहेब बडेसाहेबांनीं वकील करून महादजी शिंदे जवळ पाठविले होते. त्यांचा व राव मशारनिलेचा परस्परें बनाव न पडला. यास्तव, साहेबमजकूर उठून कानपुरास आले. बडे साहेबांनीं महादजी शिंदे यांस एक हत्ती व दोन टांगन व जिगा शिरपेंच व मोत्यांचा कंठा, पोशाक व चार आईने विलायती, कानपुराचे साहेबाचे मार्फत पाठविले; व खलिता बहुत दोस्ती व दोस्तीचे लिहिले. भाऊ बक्षी यांनीं भगवंतराव वकिलास लिहिलें कीं, आह्मांस एक घडी लहान आंग्रेजी बडेसाहेबांस सांगून पाठवावे.

बडेसाहेबांनीं सातशें रुपयांची घडी खरेदी करून रावमजकूरची मार्फत पाठविले. नवाब निजामअलीखान व टिपू सुलतान या उभयतांस दोन पोषाक व जवाहीर व कस्तुरीचे नाफे व विलाईतचे तोफे पाठविले. राजेश्री फत्तेसिंग गायकवाड याजकडून सरूपमल नागर वकील कलकत्त्यास येऊन, मिस्तर चेरीसाहेब मुनसीचे मार्फत बडेसाहेबांसी भेटून, नजर दाखवून खलिते दिधले. मजकूर ऐसे कळले कीं, गायकवाडचे रुपये मागले मामलेपैकीं कंपनीकडे आहेत, त्याजविसीं लिहिलं. परंतु बडेसाहेबांनीं तीन महिनेपावेतों जाब दिधले नाहीं. राजेश्री मुधोजी भोंसले यांस बडेसाहेबांनीं, दाहा थान डाक्याची मलमल, व चार ताके मलमलचे, व दोन आयने विलायती थोरले व एक बंदूक बारा आवजची, व एक घडी थोरली पांच हजार रुपयेची, व दोन हत्ती व जिगा व शिरपेंच जवाहीर विश्वंभरपंत वकिलाचे मार्फत पाठविलें. खबर आली कीं हैदरबेगखान अर्डीच महिनेमध्यें लखनौस दाखल होऊन नवाबवजिरांसी भेटले. वजिरांनीं बहुत मेहरबानी करून, दोन हत्ती व पांच घोडे व पोषाक बादली व माहीम-रातीब खानमजकुरासी, व दोन पोशाक व दोन घोडे व दोन शिरपेंच जवाहीर राजा चंद्रराज व काश्मिरीमल यास दिलजमाई करून इनाम दिले, व हैदरबेगखानची मसलत-प्रमाणें दोन हुंडी वीस लक्ष रुपये दुसालाचे ऐवजीं राजा चंद्रराज व काश्मिरीमल यांचे दुकानीं बडेसाहेबांचे नांवें पाठविले. बडेसाहेब खुष होऊन आपले कुचाचा तयारीचा हुकूम केला. श्रीमंत रावसाहेब स्वामींचे सेवेसी दोन खलिते तयार करवून सेवकाचे हवाला केले; आणि बोलले कीं, 'आह्मी बडेसाहेबांचे जागावर, मिस्तर इष्टुर-साहेब, तिसरे दर्जेचे कौसिली, यांस मुखत्यार करून, मुलखाची सैर करावयास जातों. सारे सरदारांचे कागदपत्र जे येतील, त्यांचा जाबसाल कलकत्त्याचे कौसलीखेरीज होणार नाहीं, व मिस्तर मालटसाहेब पुण्याहून कागद कलकत्त्यासी लिहितील. तुह्मी येथंच राहणें. सारे लोकांस आह्मी बरोबर घेणार नाहीं.' ऐसे दोन तीन बार बोलले. आह्मी जाब दिले कीं, आह्मी बडेसाहेबांशिवाय दुसरे जवळ राहिलों नाहीं. बडेसाहेबांनीं कबूल न करून पहिलेंच बोलणें बोलले. विश्वंभरपंत व भगवंतराव बळवंत व राजा गोविंदराम हे लोकांचे घरदार श्रीवाराणसींत आहे. तीन चार वर्षेपासून घरास गेले नाहींत. यास्तव बडेसाहेबांस हे लोकांनीं बहुत आग्रह केलं. बडेसाहेबांनीं बोलले कीं, 'तुह्मी मुखत्यार आहां. आमचे हुकूम नाहीं. रा. महादाजी शिंदे व मुधोजी भोंसले व नवाब निजामअलीखान व टिपूसुलतान व नवाबवजीर, राजा जयनगरवाले व आणिक मातबर सरदारांसी खलिते आपले कुचेचे पाठविले, व पांचशें गोरे आंग्रेज- शिपाई व शंभर तोफा व दीडशें नाव, बारुत व गोळेची पुढें रवाना करून, चंद्र ९ माहे सवाल बडे-साहेबांनीं दरबार करून, व इष्टुरसाहेब दुसरे दर्जेचे कौसली यांस बडेसाहेबांची मुख-त्यारी देऊन, सारे दरबारचे लोकांची भेट करविले व चंद्र ११ रोजीं बडेसाहेबांनीं सारे मातबर आंग्रेजांस बोलावून मिस्तर इष्टुरसाहेबाचे सपुर्द केलें, व मिस्तर पामर साहेब बहुत मातबर आंग्रेज यांस आखेर बोलावून सांगितलें कीं, तुह्मी महादाजीराव

शिंदे जवळ वकालतेस जावें, ऐसे कौसलचा हुकूम आहे. सेवकानें एक कारकून चाळीस रुपये दरमहाचा करून, चेरीसाहेबाचे मार्फत बडेसाहेबांबरोबर करून दिले. चंद्र १२ माहे सवाल अधिक श्रावण शुद्ध त्रयोदशी शनिवासरेस, एक घडी दिवस आल्यावर, बडेसाहेब आपण व मिस्तर करनेल रास व हार्डिनसाहेब व करनेल कनकसाहेब व चेरीसाहेब ऐसे चार पांच आंग्रेज मुसाहेब बरोबर घेऊन स्वार होऊन गेले. कलकत्त्याहून...सात कोस पश्चिम दिशेतर्फे, तेथें दोन चार पलटण, दाहा पांच करनेल व कपतान सरकारछावणीमध्यें राहतात. बडेसाहेब चार दिवसपावेतों तेथें जाऊन राहिले. इष्टुरसाहेब व शोरसाहेब व कुफरसाहेब व आणिक मातबर आंग्रज व हिंदुस्थानी लोक बडेसाहेबजवळ राहिले. बडेसाहेबांनीं बादशाहा शाहाअलम यांस लिहिलें कीं गुलामास स्वामींचे चरण पाहावयासी बहुत लालसा आहे. बादशाहांनीं जाब लिहिले कीं, तुमचें येणें आह्मांजवळ बरें दिसत नाहीं. परंतु येथें बहुत लोक बोलतात कीं, बडेसाहेब अगत्यरूप बादशाहाजवळ जातील. बडेसाहेबांनीं दोन चार वार पुसलें कीं, श्रीमंत रावसाहेब व नानासाहेबांचे खलिते आजपावेतों आमचे नांवें आले नाहीं. आह्मांस दोन्ही साहेबांची खबरखुशी हमेषा कळली पाहिजे. आह्मी बोललों कीं पुणें येथून हजार कोस आहे; परंतु सरकारचे जाब लौकर येतील. चंद्र १७ माहे सवालेस, सारे लोकांस रुखसत करून, नावेवर स्वार होऊन पुढें गेले. आह्मीं दोन्ही खलितेची नक्कल तर्जुमा हिंदवी करून सेवेसी पाठविले. सरकारचा अलकाब पहिल्यापासून हालचे खलितेमध्यें बहुत विशेष लिहिलें. सरकार मुनशीस हुकूम जाहाले पाहिजे कीं, समजून अलकाब लिहिणें. चिरंजीव चिमणलाल सेवेसी जाहीर करतील. चिरंजीव गुलाबराय चरणाजवळ आहे. आपण धनी, मायबाप, समर्थ. सर्व प्रकारें सांभाळ करतील. बहुत काय लिहिणें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक २१. ता. २६ मार्च इ. स. १७८८.

### श्रीरामचंद्रोजयति.

''श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति ऐसीजे येथें स्वामींचे कृपावलोकनेंकरून कुशल असे. स्वकुशल आनंदवैभव लेखकास लिहावयाची आज्ञा जाहली पाहिजे. विशेषः— पूर्वी विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानचें कासिदजोडीबरोबर चंद्र १६ माहे सफरेस पाठविलें, त्याजवरून हुजूर विदित जाहलें असेल. हल्ली वर्तमान ऐसीजेः— बडेसाहेब आजपावेतों आंग्रेजी बोलीशिवाय दुसरी कांहीं जाणत नाहीं. दरबारीं बुधवारचे दिवशीं हिंदुस्थानी लोक आपलाले कामाचा सवाल करितात. चेरीसाहेब बडेसाहेबांस समजावून जाब देतात. याजमधें काय बोलतात तें ईश्वर जाणे! आह्मांस दोन चार वार, चेरीसाहेबानें बडेसाहेबांचे जबानीं सांगितलें कीं, आमची डाक आंगरेजी पुण्यापासून कलकत्त्यापावेतों आहे. तुह्मीं आपले कागदपत्र आमचे मार्फत पाठवीत जाणें. त्याचे जाब लवकर पावते करीत जावूं. मग आह्मी बोललो

र्की श्रीमंतांची सरकारचे कासिदजोड्या आमचे तैनातींत आहेत. त्यांचे हातीं सरकारचे कागदपत्र येतात जातात. यास्तव सेवेसी विनंति ऐसीजे, डाक बसविल्यानें यांस बातमी पोहोंचावयाची फार सवलत जाहाली. आणिकही कितेक मनसुबे चित्तांत करितात. ते पुरते समजल्यावर सेवेसी अर्ज केला जाईल. बडेसाहेबानें आंग्रेजांची अंमलदारीपासून आजपावेतों जे कांहीं करारनामे, हरेक सरदार, व राजे, व जमीदार, बंगाले व लखनौ व हिंदुस्थान व दक्षिणचे सरदारांसीं जाहाले होते, त्या सर्वांच्या नकला करवून व आपण समजून विलायतेचे बादशाहाजवळ पाठविले. हिस्टिनसाहेबानें आपले अंमलदारीभर पाठविले नव्हते. हरेक करारनामेविसीं बादशाहाचें जें लिहिलें येईल, त्याप्रमाणें वर्तणूक करतील. पहिले विलायतेची खबर एक वर्ष अथवा दीड वर्षमधे समुद्राचे वाटेनें येत होती. आतां मुंबईबंदरची नूतन डाक बसल्यावर दोन महिन्यांमध्ये खुषकीचे वाटेनें येत आहे. याजमधे विलायतची खबरची यांस बहुत सुभेता जाहला, व बडेसाहेबानें आह्मांपासून नवी डाकविसी आपली शुक्रगुजारी व यहसानमदीचें विनंतिपत्र याजकरितांच लिहिविलें. मिस्तर मालटनें सेवेसी दिधलेंच असेल. पूर्वी दोन वर्षांपासून राजेश्री तुकोजी होळकर यांनी राव नंदराम नागर गुजराथी—राजा गोविंदरायचे बंधू याजबरोबर खलिता बडेसाहेबांचे नांवें पाठविला होता, व मध्ये एक दोन खलिते आणिकही आले. परंतु बडेसाहेब आर्कुज, यास्तव चेरीसाहेबानें खलिते लबाड बडेसाहेबांस समजावून, जाब एकाचाही दिधला नाहीं. शेवटी, वकीलमजकूर लाचार होऊन रुखसत मागितलें. बडेसाहेबानें अत्तरपान मात्र देऊन रुखसत केलें. खर्चाचे नांवें एक पैसाही दिधला नाहीं. आतां होळकर व शिंदे भेटल्यावर शिंदेनें पामरसाहेबांची भेट करविली, व होळकर व आपण व पामरनें. अहिल्याबाई काशी व गयाची यात्रेस येणार याची माफीविसीं बडेसाहेबास लिहिलें. बडेसाहेबानें तीन हजार माणसांची माफी लिहून नवाबवजिराजवळ पाठविले. त्याचे विद्यमानें शिंदेजवळ जाईल. बडेसाहेबानें पंचवीस हजार रुपयेची आतषबाजी आपले बंधू मेगडुर कार्नवालिससाहेब याचे पहावयास करविली होती. अकस्मात मंदाराजेकडील कांहीं खबर आली. कोणी ह्मणतात कीं, फरासिसाचा गलबा जाहला, व कोणी ह्मणतात कीं, नवाब निजामअलीखान यांनीं बोलाविलें. त्यावर बडेसाहेबानें, जनरल कीट (कूट) आंग्रेजी फौजेचे बक्षी यांस आपले भावाबरोबर देऊन, चंद्र ११ माहे रबिलावलेस जहाजावर रवाना केलें. व चंद्र २१ माहे मजकुरीं मिस्तर शोरसाहेब कौसली हेही बडेसाहेबांसीं रुखसत होऊन विलायतेस जावयासी जहाजावर स्वार जहाले. बहुत लोक बोलतात कीं बडेसाहेबांसीं नाखुष होऊन गेले. चंद्र २३ माहे मजकुरीं बडेसाहेबानें सारे आंग्रेज व आर्मन (अर्मेनियन) व पारशी व बंगाली वगैरे मातबर लोकांस खबर दिधली कीं आतषबाजीचा तमाशा पहावयास यावें, व आतषबाजीची जागावर लकड कोटाचे मकान, शामियाने, व रोषणीमुद्दां बांधवून, शंभर रुपयेची बैठकेपासून दोन रुपये पावेतों बैठका तयार करविल्याः .व तेच दिवशीं सोडावयाचा हुकूम दिधला.

चाळीस हजार रुपये बैठकेचे जमा जाहले. परंतु आतषबाजीचा तमाशा बहुत अपूर्व. त्याजमध्यें आंग्रेजी हवेली, व सभांचे लोक, व बगीचें फूल फळसहित, व आंग्रेजी लढाई तोफ बंदुक मुद्धां, सदृश्य नजरीं येत होती. जुने लोक मुलुखाचे फिरणार, त्यांनीं ऐसा तमाशा पाहिला नाहीं. राजा प्रतापसिंग जयनगरवाले यांनीं पांच घोडे व चार बैल नागोरी व पंचवीस ठाण चीट व दाहा पागोटें बिकानेरी व अकरा दुशाले व पांच रजई व पांच रुमाल शालेचे व पांच किनखाप गुजराथी व शिरपेंच व जिगा व मोत्यांचा कंठा व दोन मुरके तसबीर हिंदुस्थानी, व तलवार व कट्यार व पांच कमान लाहोरी व दहा दस्ते तीर गुजराथी बडेसाहेबांस, व एक घोडा दोन बैल व अकरा वस्त्रांची पोशाख व शिरपेंच व जिगा जवाहीर चेरीसाहेबास, व ऐसेच सरंजाम मिस्तर तामगिरामसाहेब खालसेवाले यास, लाला रामसिंग सरावगिवानी (?)—हे पहिले मेगफरसनसाहेबाचे अंमलापासून येथें जयनगरवालेचे वकिलीवर आहेत,—यांचे धाकटे बंधू धनसिंग ह्मणून, यांजबरोबर व राजा बिजेसिंग मारवाडवाले त्यांनींही खलिता स्नेहभावाचा, बहुत आर्जव करून, चेरीसाहेबास खत दोस्तीचा त्यांनींही त्याजबरोबर पाठविले. ते चंद्र १ माहे रबिलावलेस कलकत्यास आले. रामसिंग वकील यांनीं वीस खान वस्त्रांचे वगैरे जिनसांचे करून, चेरीसाहेबांचे मार्फत बडेसाहेबांस गुजराणिलें; व आपले भावाची भेट करविली; व राजा बिजेसिंगाचे खलितेही दिधले. बडेसाहेब बहुत खुष होऊन, पांच वस्त्रांचा पोशाक व शिरपेंच व जवाहिर व दोन प्यादे मारवाडी यांस दोन फरद शालेची देऊन रुखसत केलें. चेरी व रामसिंगाची खलबत बहुत राहते. याजमुळें दरबारचे लोक बोलतात कीं, यांचे करारनामे परस्परें जाहले आहेत, व गायकवाडाचेही संदर्भ आहे. याजकरितां चेरीनें बडेसाहेबांस सांगून धनसिंगाचा दरमाहा तीनशें रुपये मुकर करून दिधला. चंद्र ५ माहे रबिलावलेस सरकारचे दोन खलिते बडेसाहेबांचे नांवें, जे परस्परें येथून तेथें व हुजरून येथें मालटची मार्फत गेले व आले, व आज्ञापत्र सेवकाचे नांवें कीं हिस्टीनचे महजरावर सेवकानें दस्तखत व मोहोर केली नाहीं ह्मणून; धनी समर्थ खुष जाहाले: व मालेटचें पत्र बडेसाहेबांचे नांवें कीं सरकारची हवेलीकरितां काशीकरास ताकिद करावी; कासिदजोडी आजुरदार जी सेवकानें रवाना केली होती, त्याजबरोबर पाठवून सर्फराज केलें. आह्मीं बडेसाहेबांस दिधलें. बडेसाहेब आपली जागा नजर नीची करून घेतलें. कांहीं बोलले नाहीं. आह्मीं खलितेचे मजकूर सांगून चेरीस जाब मागितले. चेरीनें बडेसाहेबांस पुसून बोलले कीं, सरकारचें वस्त्रें जहाजावरी येतात, आल्यावर जाब देऊं. परंतु हे खलिते मुसना आहेत. एक मजकुराचे दोन कागद त्यास 'मुसना' ह्मणतात. चंद्र १७ माहे मजकुरीं सरकारचे वस्त्रें व दोन खलिते, व बहिरोपंत मेहेंदळे यांचें पत्र व वस्त्रें, व मालटचें पत्र बडेसाहेबांजवळ आलें. बडेसाहेबानें पाहून चेरीसाहेबाचे हवाला केलें. व बोलले कीं जयनगर व पुण्याचे तोफे आले, त्या सर्वांची विक्री करावी. एके दिवशीं चेरीनें आह्मांस पुसलें कीं बहिरोपत कोण आहेत? आह्मी बोललों कीं, सरकारचे मातबर लोकांत आहेत.

पत्रें येथें आलीं. त्यांत वर्तमान कीं, नजबखान पादशाही दिवाण चैत्र वद्य ८ हक जाहले. त्याचे आधीं आठ चार दिवस पुरुषोत्तमपंत हिंगणे तेही मार्गस्थ जाले. दिल्लीभंवतां शिखांचा गवगवा फार आहे म्हणून वर्तमान होतें. नवाबाकडेस यांचा वकील आहे, त्याचीं पत्रें येथें आलीं. त्यांत वर्तमान जे, मुधोजी भोंसल्यांचे पुत्र चिमणाजी भोंसले त्यांस नवाबांनीं पांच लक्षांची जहागीर दिली. भोंसले व नवाब एकचित्तें आहेत. उभयतांही इंग्रजांच्या पत्त्यावर आहेत. बाजीराव बर्वे यांजवर येथें चौकी बाईनीं बसविली आहे. ती उठवावी म्हणून बाजीराव उपोषणें करितात. कोणी रदबदलीही करितात. बाई ऐकत नाहींत. पुढें काय होईल तें पहावें. सावकाराचा मूल आणावयास हुजरे आले होते. त्यांस बाईनीं साफ सांगितलें जे, ऐवज घेतल्याशिवाय सावकारास सोडीत नाहीं. पत्रांचीं उत्तरें देऊन हुजरे काल चंद्र ६ जमादिलावलीं बिदा केले. हरघडीं सावकाराविषयीं स्वामी तरी कशास त्यांस लिहितात? बाई ऐवज घेतल्याशिवाय सावकार सोडीत नाहीं. आपण पत्रें लिहिणें तर विचार करून लिहावीं. पाटीलबावांकडील पत्रें, यांनीं आपले कासीदजोडीबरोबर पुण्यास पाठविलीं, म्हणून वर्तमान ऐकिलें. सेवकास खर्चास वरात चंद्र १० मोहरमची पाठविली, ती कमाविसदारांनीं फिरून दिली. ती पुण्यास पाठविली. पुण्यांत स्वामींनीं सहाशें रुपये कमाविसदारांजवळून घेतले. मजला आशीर्वादपर आज्ञा आली जे, चारशें रुपये तुम्हांस सबनिसाजवळ दिले आहेत. त्यांतून एक कवडी येथें पावली नाहीं. चार महिने जाले वरातीस, धनी सामर्थ्यवान् असतां सेवकास येथें खर्चास पोंहचत नाहीं! सबनीस श्रीमंत थोर. त्यास माझें गरीबाचें अगत्य काय? धनी सांगून सुटले. आम्ही येथें रडत हाका मारीतच आहों!! स्वामींस तरी गरीबागुरिबाचें स्मरण कशास? कोण सांगतो? पांच सहाशें रुपये व्याजबट्यासुद्धां येथें देणें. नित्य खायास पाहिजे.' असे श्रम आहेत. लिहितां भागलों! स्वामीही ऐकतां कंटाळले!! फार दिवस येथें जाले. दर्शन होय तर बरें आहे. हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती चंद्र १२ जा॥खर इसन्ने समानीन. **लेखांक ५१.** ता० ३१ मे इ.स. १७८१. **श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शुद्ध ९ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन सां॥ नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ जमादिलाखरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमानें पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर व काशीदजोडीबरोबर सेवेसी पाठविलीं आहेत. पेशजीं स्वामींनीं

राजश्री बाबुरावजींस पत्रें पाठविलीं तीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, गंगाजलनिर्मळ मातुश्री अहिल्याबाईस बहुत प्रकारें सांगून, तुकोजीबावांनीं त्यांनीं एकचित्तें चालावें यांत फार उत्तम आहे. घरांत फूट जाहल्यानें बाहेर उपहास होऊन स्वरूप राहत नाहीं. या अन्वयें बहुत प्रकारें पत्रीं आज्ञा. त्याप्रमाणेंच रावजींनीं व राजश्री नारो शिवदेव उभयतांनीं फार प्रकारें बाईस समजाऊन सांगितलें. परतु त्यांचें प्रथम पदीं जें बोलणें आहे तेंच आजपर्यंत आहे. प्रस्तुत चंद्र २७ जमादिलावलचीं सरकारचीं पत्रें डाकेबरोबर आज आलीं आहेत. ती दाखवायाचीं आहेत. याजवर उत्तर काय करितात तें पहावें. राजश्री बाबुरावजींनीं विनंतिपत्रीं सविस्तर वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. श्रुत होय. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः– पूर्ववत्प्रमाणें इंग्रजांचे शहावर आहेत, तसे आहेत. काल डाकेबरोबर तिकडीलही पत्रें आलीं आहेत. तीही राजश्री नारो शिवदेव यांनी सेवेसी पाठविलीं आहेत. श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेजवळ जेथें आहेत तेथेंच आहेत. सौ. उदाबाई सुभेदाराची कन्या यांचे विद्यमानें तुकोजीबावांकडील जाबसाल फार नम्रतेचे बाईकडे लागले आहेत. यास्तव बाईंनीं येथून आपाजी गीते व उदाबाईचा कारकून ऐसे येथून चंद्र ४ मिनहूस रवाना केले. तुकोजीबावांकडेस आले आहेत. सरकारचीं पत्रें आज चंद्र ६ मिनहूस त्रितीय प्रहरीं डाकेबरोबर आलीं. तीं वाचून पाहून रात्रीं बाबुरावजी व नारो शिवदेव पत्रें घेऊन बाईकडे वाड्यांत गेले. मीही समागमें होतों. बाईस पत्रें वाचून दाखविलीं. बाईचे पत्र बाईस दिलें. तदोत्तर तिघें एकांतास बसलीं. सहा घटकांपर्यंत एकांत जाहला. तदोत्तर आपलाले बिऱ्हाडास आले. पुर्तेपणें जाबसाल जाहलेवर सेवेसीं विनंतिपत्रीं लिहिण्यांत येईल. जाहलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. परंतु तुकोजीबावांचे अंतस्थ जाबसाल बाईकडे येत असतात. हे विज्ञप्ति. सुरतेकडे गणेशपंत बेहेरे फौजेसुद्धां जाऊन मुलखांत धूम केली आहे ह्मणून येथें बाजारी वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय."

---

## लेखांक ५२. ता० ४ जून इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० ज्येष्ठ शुद्ध १३ शके १७०३.

"सेवेसी' विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबराबर पत्रें रवाना केलीं आहेत. प्रस्तुतचें वृत्त सरकारचीं पत्रें राजश्री बाबुराव विश्वनाथ व राजश्री नारो शिवदेव यांस व बाईस चंद्र २७ जमादिलावलचीं पत्रें

.तीं येथें चंद्र ६ मिनहूस पावलीं. पत्रें पाहून संध्याकाळीं बाबुरावजी व नारो शिवदेव पत्रें घेऊन दरबारास गेले. मीही समागमेंच होतों. बाईचें पत्र बाईस वाचून दाखविलें. तदोत्तर बाई व रावजी व नारोपंत ऐसे एकांतीं बसून, उभयतांस व पाटीलबावांस सरकारचीं पत्रें होतीं, त्यांतील अन्वय सविस्तर बाईस समजाविलें. बहुत युक्तीच्या वाटेनें बाईस समजाऊन सांगितलें. सरकारच्या आज्ञापत्रीं दोन मजकूर होते जे, तुकोजीबावांनीं चाकरी करावी. फौजेच्या देण्याच्या तोडी बाईनीं संभाळाव्या. प्रस्तुत मसलत लांबली आहे. सांप्रत फौजसुद्धां तुकोजीबावांना छावणी करावी लागेल. प्रस्तुतच्या मसलतीचे फौजेचें देणें व छावणीस खर्च लागेल तो व बादबरसात मसलतीवर हमराहा जालें पाहिजे, त्या खर्चाची तरतूदही सारी बाईनीं सरबराई करावी; आणि सारे दौलतीच्या सरंजामाच्या तालुक्यांचाही बंदोबस्त करावा. सारेंच बाईनीं आटोपावें हें कलम एक. व दुसरें कलम, बाईजवळ दौलतीचा लवाजमा काय असेल तो व खासगत खर्च काय असेल त्याचा अजमास करून लिहून पाठवावा. त्याचा बंदोबस्त खर्चाप्रमाणें करून देऊं. वरकड सारा बंदोबस्त तुकोजीबावांनीं करावा. कमाविसदार येथें महालोंमहालचे नेमून पाठविले आहेत. त्यांसीं दिक्कत न करितां बाईनीं यांचे कमाविसदार महालोमहालीं बसवून द्यावे. तुकोजीबावांनीं सरकारचाकरी करून तुमचें मानमहत्त्व, वडिलपण राखावें. बाईशी वडिलपणाचे मर्यादेनें यांनीं वर्तावें. हे सरकारची आज्ञा बाईस समजवावी. कोणतें अनकूळ पडतें तें पुसून लिहून पाठवा ह्मणून आज्ञा आली आहे. या दोहींतून कोणते गोष्टीवर आपली मर्जी प्रसन्न ती आज्ञा करावी. त्याप्रमाणें श्रीमंतांस लिहून पाठवूं. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, खासगत खर्चाची नेमणूक श्रीमंतांजवळून अगर तुकोजीबावांजवळून करून घेणेंच नाहीं. तुकोजीबावांनींच महालचा बंदोबस्त करावा असेच श्रीमंतांचें मानस आहे, तर त्यांनीच आपला बंदोबस्त करावा. मजला जे खर्चास लागेल तें महालांतून घेईन. केवळ तेच दौलतीचे धनी, आमचा वारसा कांहींच नाहीं, अशी श्रीमंतांची मर्जी आहे कीं काय? तेव्हां रावजींनीं उत्तर केलें जें, हे प्रकार कांहीं श्रीमंतांच्या चित्तांत नाहींत. परंतु मसलतीचें काम भारी येऊन पडलें आहे. कामावर मनुष्यांची समजूत कशी करावी लागती, हें आपणास विदितच आहे. या सरदारींतही हमेश कामेंकाजें पडतच गेलीं आहेत. लोकांच्या व सरदारांच्या समजुत्या करून कामावर हमवार कोणें रीतीनें करावें, या युक्तिप्रयुक्ती सर्व आपल्या ध्यानांत आहेत. प्रस्तुत उभयपक्षींही ओढीचा कारभार आणि मसलत भारी पडली आहे. यास्तव, इतक्या घालमिलीचे जाबसाल करणें प्राप्त. नाहींतर इतके दिवस या जाबसालाचीं कामें पडलीं नाहींत. कांहींही जाबसाल

निमित्यावर उपस्थित होतात. असें बहुत प्रकारें युक्तीच्या वाटेनें भाषणें जालीं: दुसरा मजकूर बाई बोलली जे, तुकोजीबावांनीं फक्त चाकरी करून असावें, आणि महालांचा बंदोबस्त करून खर्चाची सरबराई आह्मीं करावी, ह्मणून श्रीमंतांनीं लिहिलें. त्यास फार उत्तम आहे. तुह्मींच नवा कारभार करणें नी तो कसा होईल ये गोष्टीचें संकट नाहीं. सुभेदारांमागें इतके दिवस हाच कारभार करीत आलों आहों. प्रस्तुत मात्र कारभारी यांनीं उपहास मांडला आहे. श्रीमंतांचे मर्जीचाही कल तसाच दिसून आला. अस्तु. इतकेंही होईल. परंतु जी फौज ठेवणें त्याची हजरगणती व लोकांच्या बोल्याचाल्या करणें त्या, व कोणास काय देणे व तगीरीबहाली लोकांची करणें येविषयीं हुकूम आमचा. माझा कारकून आपल्या हातें कवडीपासून लक्षावर खर्च करणें तो करील. हिशेब आह्मांस दाखवील. जें करणें तें आमचा कारकून करील. तुकोजीबावांनी चाकरी करावी. पैसा खर्च ठायाठाय लागेल तो आमच्या कारकुनांनीं चौकशी करून खर्चावा. आपल्या (मर्जी) शिवाय खर्चवेंच भलताच त्यांनीं करूं नये. हेंही आह्मांस कबूल आहे. असें बोलली. मध्येमध्ये रावजी व नारोपंत उभयतांहीं फार भाषणें केलीं. कित्येक प्रकारचे दृष्टांतावह बोलणीं उदंड जालीं. ते दिवशी इतकेंच भाषण जालें. रात्रही फार जाली. निरोप घेऊन आपलाल्या स्थळास आले. त्यावर चंद्र ८ रोजीं, पांच घटका रात्र गेल्यावर बाईनी बाबुरावजींस बोलावूं पाठविलें. बारा घटका रात्रपर्यंत उभयतांचेच भाषण जालें. त्या भाषणाचा भाव रावजी बोलत होते जे:– बाई ह्मणाली जे, श्रीमंत वारंवार लिहितात, 'धन्याचें न ऐकिल्यास त्यांच्या चित्तांत विपर्यास जाईल या अर्थी.' नेमणूक तों मी कोणाचीही करून घेणार नाहीं. प्रस्तुत श्रीमंतांची मर्जी अशीच आहे. फार उत्तम आहे. त्यांचे मर्जीप्रमाणेंच सांप्रत करोत. परंतु हे इतकेही तुमचे आमचे जाबसाल श्रीमंतांचे पत्रान्वयें जाले, ते सारे राजश्री पाटीलबावांस आह्मी लिहितों. त्यांचें उत्तर आल्यावर पुरतेपणें तुह्मांशी बोलूं. जोंवर श्रीमंतांवर हे इंग्रजांची मसलत आहे, तोंवर आह्मीं आपले कजेवाम करून कालक्षेप करावा. मसलत [जाल्यावर] आमचा जाबसाल श्रीमंतांनीं करून द्यावा असें भाषण जालें. बाईचे कारभारी व बाबुराव व नारोपंत ऐसे बसून पाटीलबावांस कागद लिहितात. तिकडून काय उत्तरें येतील तें पहावें. पाटीलबावांकडील पत्राचे मसुदे आज चंद्र १० रोजी करितात. ते मसुदे बाईस दाखवून न्यूनाधिक्य काय तें सांगतील त्याप्रमाणें पत्रे तयार करून पाठवितील. पाटीलबावांकडे पत्रें गेल्यावर बाबुरावजीही जालें वर्तमान सेवेसी लिहितील. मीं ऐकिलें तें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. पाटीलबावांकडील वर्तमान तों जेथें आहे तेथेंच आहेत. इंग्रजांवर दाब ह्मटलें तर असेंच आहे.

छाप्याचा त्यांचा दाब यांजवर रात्रीं सावधतेचा आहे. राजश्री गणेशपंत बेहेरे कोंडाईबारी उतरून सुरत प्रांतीं गेले. यांनीं मुलखांत धुमधाम करतांच दोन तीन पलटणें सुरेतजवळ होतीं तें यांजवर आलीं, ह्मणून वदंता येथें आहे. नवापूर पायथ्यापावतर पलटणें आलीं ह्मणून बाजारी वर्तमान आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेजवळ फुलबोर आहे तेथेंच आहेत. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. खर्चाची विपत्य फार आहे. धनी कृपाळ समर्थ. हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती चंद्र २७ जमादिलाखर इसन्ने समानीन. **लेखांक ५३.** ता० १० जून इ. स. १७८१. ज्येष्ठ व॥ ४ शके १७०३.

**श्रीगजानन.**

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ जमादिलाखरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं. सांप्रतचा मजकूर, सरकारचे पत्रान्वयें मातुश्री अहल्याबाईशीं व राजश्री बाबुराव व नारो शिवदेव यांशीं भाषणें जाहलीं. तो मजकूर सविस्तर बाईनीं राजश्री पाटीलबावांस लिहिला आहे, व या उभयतांनींही पत्रें लिहिलीं आहेत. पत्रें गेल्यास चार पांच दिवस जाहले. तेथून पाटीलबावा उत्तरें पाठवितील तीं पाहून, येथें बाईच्या बोलण्याचा उभयतांशीं निश्चय जो होईल तो सेवसी लिहून विनंतिपत्रें येतील. नारो शिवदेव उज्जनीस जायाची तांतड करीत होते. त्यांस बाईनीं सांगितलें जे, पाटीलबावांस पत्रें लिहिलीं आहेत, त्यांचीं उत्तरें येतील, तीं पाहून निश्चय ठरल्यावर मग जाणें ह्मणून राहविल. राजश्री आबाजी नाईक वानवळे आले होते. त्यांस पाटीलबावांचीं पत्रें आलीं कीं, तुह्मीं लवकर येणें. यास्तव ते उज्जनीस गेले. तेथून पाटीलबावांकडेस जाणार. पाटीलबावांकडील वर्तमान अद्याप जेथें आहेत तेथेंच आहेत. इंग्रजही सिप्री कुलारसावर आहेत. अद्याप लढाई कांहीं जाहली नाहीं. पाटीलबावांजवळ रांगड्यांच्या फौजा कांहीं जमा जाहल्या होत्या. ते एक एक निघून आपलाल्या स्थळास जाऊं लागले. खेची आहेत, व पाटीलबावांकडे पांच सहा हजार नागे गोसावी नवे आले, तेही ठेविले आहेत. पहिलेही दोनचार हजार आहेत. सारे मिळून एकदां इंग्रजांशीं मातबर लढाई करणार आहेत. पातशाहाकडील फौज आणावयास होळकराकडील गृहस्थ पाठविले होते, ते जयपुरीं आहेत. त्यांनीं पाटीलबावांचीं पत्रें नजीबखानाकडे पाठविलीं होतीं. त्यांनीं उत्तरें पाठविलीं जे, शिखांची मसलत भारी इकडे आहे; त्यांचें पारिपत्य जाहलेवर बादबरसात फौजा पाठवूं. याप्रमाणें

त्याजकडील उत्तर आलें. दिलीहून नजीबखानानें आपला चेला आंबरशाह त्याजबरोबर मातबर सरदार चाळीस हजार फौजसुद्धां व तोफखाना ऐशा सरंजामानिशीं शिखांवर पाठविले होते. यांनीं सरदेवर जाऊन शिखांशीं गांठ घातली. तेथें लढाई उभयतांची जाहली. शिखांनीं पादशाहाचे फौजेचा मोड केला. तोफा सार्‍या घेऊन गेले. दहा पंधरा हजार लोक यांचे शिखानीं ठार करून पानपतापावतर यांची फौज पळून आली. आणीख फौजेची तरतूद करून जंगी सरंजामसुद्धां शिखांवर पाठवावयाच्या तरतुदींत नजीबखान आहेत. याप्रमाणें तिकडील वर्तमान आलें. ग्वालेरचा किल्ला इंग्रेजांनीं गोहजवाला राणास दिला. सात लक्ष रुपये गोहजवाल्यानें इंग्रजांस दिले. गोहजवाले व नरवरवाले हे इंग्रजांच्या सलुखांत आहेत. रस्त पोहोंचावितात. पलटणें येतात. कुमक त्यांस येऊं देतात. त्यांचा त्यांचा सलुखा आहे. कालपीस इंग्रजांचा एक कंपू आला ह्मणून काल बाईस पत्र कालपीवाल्याचें सवा महिन्याचें पत्र आलें. गोहजवाल्याचें ठाणें ग्वालेरीस येऊन बसलें असें अद्याप नाहीं. परंतु करारमदार जाहला आहे ग्वालेरीच्या व गोहजेच्या दरम्यान कोण नदी आहे, तेथें इंग्रजाची छावणी होणार ह्मणून साहुकारी वर्तमान आहे. ग्वालेरीच्या व नरवरीच्या दरम्यान मातबर नद्या आहेत. जागा अडचणीची आहे. तेथें इंग्रज छावणी करणार ह्मणूनही बोलवा आहे. ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति."

**लेखांक ५४.** ता० ७ जुलई इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० आषाढ व॥ २ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ रजबपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं सरकारचीं पत्रें राजश्री पाटीलबावांस डाकेबरोबर इकडूनच गेलीं होतीं. त्यांचीं उत्तरें पाटीलबावांचीं डाकेबरोबर काल येथें आलीं. तें राजश्री नारो शिवदेव व बाबुरावजींनीं डाकेबरोबर आपल्याकडेस पाठविलीं आहेत. नवीन वर्तमानः– श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून राजश्री व्यंकटरमणशास्त्री निरोप घेऊन येथें आपल्या घरास आले. छ ६ मिनहूस येथें दाखल जाले. तेच दिवशीं आधीं बाईची भेट घेऊन मग आपल्या वाड्यांत गेले. नित्य पुराणसमयीं बाईच्या दर्शनास जात असतात. त्यांचे मुखेंच परस्परें वर्तमान ऐकिल्यांत आलें जे, राजश्री गणेशपंत बेहेरे यांच्या विद्यमानें पुण्याकडील जाबसाल दादासाहेबांकडेस लागले आहेत;. परंतु दादासाहेबांची मर्जी नाखूष आहे.

मबब कीं, पेशजीं बोलण्याचालण्याचे करारमदार अमलांत कांहींच आले नाहींत. यास्तव हेंही बोलणें तद्वतच. या अर्थीं इंग्रजांसीं जाबसाल लागले आहेत. गुदस्तां इंग्रज कोंकणपट्टींतून बोरघाटावर आले. ते समयीं दादासाहेब अगर अमृतराव कोणीही स्वारीस समागमें नवते. यास्तव इंग्रजांनींही जितकी साधणूक जाली तितकी करून माघारा गेले. सांप्रत बादबरसातचे मोहिमेस दादासाहेबांस स्वारीस घेऊन चलावें या अर्थीं इंग्रजांचें बोलणें दादासाहेबांशीं लागलें आहे. दादासाहेबांचें मानस कीं, पुरतेपणें पुण्याकडील जाबसाल खचित जाल्यास इंग्रेजांचा पक्ष सोडावा. मबब कीं, साष्टी वसई सारखीं स्थळें मातबर कशा श्रमें करून साधलीं, तें स्थळें महजांत इंग्रजांनीं घेतलीं. पुन्हां तें स्थळें हस्तगत होणें कठीण. असेंच देशांतही इंग्रजांचा प्रवेश जाला तर पुढें कोणासही ठिकाण राहाणार नाहीं. सर्वांचें दुर्निमित्य आपल्याकडे. यास्तव इंग्रेजांशीं पक्केपणें बोलत नाहींत. इंग्रजांचा प्रकार ह्मटलें तर विलायतेंत पातशाहाचा खमीर पक्केपणें आहे कीं, दादासाहेबांस अभिमानपुरस्कर राज्यावर नेऊन बसवावें, आणि यांत आपलाही मतलब करावा. कोणता? येवढी स्वारी करणें. तेव्हां पैका मुबलक खर्च होईल. त्याऐवजीं मातबर किल्लेजात व आपल्यास अनुकूल तो मुलूख तोडून घ्यावा. पैसा वसूल होय तोंवर मुलूख व किल्लेजात खचित आपल्याकडे स्थळें कायम करावीं. मग त्यांजवळून निघणें कठीणच असे. इंग्रज याप्रमाणें आपला मतलब योजून आहेत. इतकेही अर्थ दादासाहेब समजून त्यांचे मसलतीस नाखूष आहेत. पुढील मसलतीचे अर्थी इंग्रजांची सरंजामी प्रस्तुत गिग्री कोल्हारसावर चवदा पलटणें सरंजामसुद्धां जमलीं आहेत. काल्पी प्रांतींही कंपू आला आहे ह्मणतात. परंतु कांहीं पलटणें आलीं आहेत. वगैरे जागां जागां सरंजाम होत आहेत. दादासाहेबांनीं अहिल्याबाईचें वर्तमान ऐकिलें कीं, तुकोजीबावांनीं व नारो गणेश यांनीं तिकडे श्रीमंतांची कृपा संपादून बाईचा उपमर्द करावा, बाईनें एकीकडे बसून तुकोजीबावांनीं नारो गणेश या उभयतांनींच दौलत करावी. असें ऐकून फार श्रमी जाले. बोलले जे, अहिल्याबाई ह्मातारी, केलेली मनुष्य. तिजला एकीकडे बसवून उभयतांनीं दौलतीचा बंदोबस्त करणें अगर एखादी मातबर मसलतीस तह देणें इतका ऐवज उभयतांचा नाहीं. ऐकिणार काय समजून ऐकितात हें न कळे. कालमाहात्म्य प्रस्तुत असेंच आहे असें ह्मणाले. पुण्याकडील व आपली कांहींएक घरसमजूत पडावी. यास मध्यस्थ विश्वासूक व मातबर दुतर्फा दबवून सांगे असा दरम्यान असल्याशिवाय ताळा पडणार नाहीं, असें तेथील बोलणें. याप्रमाणें दो चौ जागां ऐकिलें तें वर्तमान सेवेसी लिहिलें असे. सत्य मिथ्या देव जाणे. श्रुत होय हे विज्ञप्ति."

**लेखांक ५५.** ता० ७ जुलई इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० आषाढ वा॥ २ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १४ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर सेवेसी पाठविलीं आहेत. प्रस्तुतचें वर्तमान अहल्याबाईनीं राजश्री पाटीलबावां-कडे पत्रें पाठविलीं आहेत, त्यांचीं उत्तरें अद्याप आलीं नाहींत. तें आलीयावर काय निश्चय ठरेल तो पाहावा. पाटीलबावा बुढापाहाडानजीक छावणी इंग्रजांच्या तोंडावर करणार. दुसरें वर्तमान ऐकिलें कीं, पाटीलबावांचे दिवाण राघो मल्हार व आबा चिटणीस या उभयतांजवळ फौज ठेवून, छावणीस येऊन पाटीलबावा उज्जनीस येणार ह्मणून वदंतेचें वर्तमान आहे. वेदमूर्ति राजश्री व्यंकटरमणशास्त्री श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून येथे आले. ते सांगत होते जे, श्रीमंतांकडून सूत्र राजश्री गणेशपंत बेहेरे यांजकडेस लागलें आहे. राजश्री बाजीपंतआणाही ते प्रांतीं आले आहेत. त्यांजकडेही जाबसाल लागला आहे. ह्मणून बाजारी वर्तमानही असेंच आहे. हिंदुस्थानाकडील वर्तमान तर दिल्लीपलीकडे शीख तीस चाळीस हजार आले आहेत. दिल्लीवाल्याशीं व शिखाशीं हर्षामर्ष लागला आहे. असें वर्तमान आहे. वरकड बाईकडीऊ जाबसाली वर्तमान वरचेवर राजश्री बाबुराव वैद्य मेत्रेमी लिहीतच आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ५६.** ता. ९ जुलई इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० आषाढ वा॥ ४ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १६ रजबपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींचे कृपाअवलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनतिपत्रीं लिहून डाकेबरोबर व काशीदजोडीबरोबर पत्रें देऊन छ १४ मिनहूस रवाना केलीं आहेत. प्रस्तुतचें वृत्त पेशजीं मातुश्री अहिल्याबाईविसीं निक्षून दो मजकुराविसीं पत्रें आलीं. त्याजवरून राजश्री बाबुरावजी व राजश्री नारो शिवदेव हे उभयतांनीं बाईशीं सरकारपत्रान्वयें भवति न भवति केली. तेव्हां सिद्धांत ठरला जे, या कामांत पूर्वीपासून राजश्री पाटीलबावा आहेत, त्यांस हें सविस्तर लिहून पाठवावें. ते जसा निश्चय करून पाठवितील त्याअन्वयें तुह्मांशीं बोलूं. असें बाईनीं या उभय-तांसीं उत्तर करून पत्रें पाटीलबावांकडेस बाईनीं पाठविलीं. त्यावर या मजकुरा-

विषयींच सरकारचीं पत्रें पाटीलबावांसही आलीं. तेंही पत्रें उभयतांनीं बावांकडेस पाठविलीं. त्यास, सरकारच्या पत्रांचीं उत्तरें पाटीलबावांनीं पाठविलीं. ते छ १३ मिनहूस येथें आलीं. ते दुसरे दिवशीं डाकेबरोबर स्वामींकडे रवाना केलीं. त्याच अन्वयें बाईसही पाटीलबावांचीं पत्रें आज प्रातःकाळीं आलीं. बाईनीं वाचून पाहून दो प्रहरांनंतर उभयतांस दरबारास बोलाविलें. बाई व माधवराव गंगाधर व गोविंद रघुनाथ गानू हे उभयतां ऐसे पांच जण बसून एकांत प्रहर सव्वाप्रहर जाला. त्यांतील मजकूर जाल्याअन्वयें उभय मेवेसी लिहितील. त्याजवरून ध्यानास येईल. ऐकिल्यांत आलें आहे जे, बाईनीं पूर्ववत्प्रमाणें दौलतीचा धनीपणा करितात तसा करावा. सरकारचाकरी राजश्री तुकोजीबावांनीं करावी. याप्रमाणें ऐकिलें तें सेवेसी श्रुत होय. पाटीलबावांकडील वर्तमानः इंग्रजाभंवताले फौज सुद्धां आहेत. राजेरजवाडे कुमकीस आले होते, ते पाटीलबुवांचा निरोप घेऊन आपलाले स्थळास गेले. इंग्रेजांकडेस गोहजवाला राणा तीन हजार फौज व तीन पलटणें जंगी सरंजामानशीं येऊन सामील जाला. त्याच्या मुलखांतून रसद इंग्रजांकडे येत होती, त्याची बातमी ठेऊन पाटीलबावांनीं फौज रवाना केली. इंग्रेजांशीं व या फौजेशीं गांठ पडून लढाई बरीच जाली. पाटीलबावांकडील दाहा पांच खाशे पडले व गोसावी यांचा महंत लढाईत कामास आला. त्यास खेतांतून काहाडतां दाहा वीस माणसें जखमी ठार जालीं. याशिवाय फौजेंतील शेंदीडशें माणूस जखमी ठार जालीं. इंग्रेजांकडीलही गोरे तुरकस्वार दाहा पांच पडले. शे दीडशें माणूस त्यांचेंही जखमी ठार जालें. लढाई बरीच जाली. चाळीस पन्नास बैल रसदेचे यांनीं पाडाव करून आणिले. पाटीलबावांजवळ देशचीच बाग पंधरा हजार फौज कुल जमाव इतका आहे. त्रिंबकजी इंगळे, होळकरांचें पथक पाटीलबावांजवळ आहे. बाईनीं तिकडे पाठविले आहेत. सबब, देशीं इंगळेमजकुराचा गांव माहाळुंगें आहे, तें तुकोजीबावांनीं खराब केलें. तोफखाना वगैरे कारखाने तेथें छावणीस ठेविला आहे. तेथील खराबी फार केली. पुढें जप्त करणार. हा बोभाट त्रिंबकजी इंगळे यांनीं बाईस लिहिला. त्याजवरून बाई रावजींसीं बोलत होती जे, सरकारचाकरीवर माणसें असतां, त्यांजवर अशी आदावत चालवावी आणि धन्यांनीं कांहींच ध्यानांत न आणावें हें अपूर्व आहे. या अर्थीं बाईनीं व रावजींनीं सेवेसी पत्रें लिहिलीं आहेत. राजश्री बाजीपंत आणा फौजसुद्धां पुण्यास गेले व गणेशपंत बेहेरे बहाळ भडगांवाकडे छावणीस आले ह्मणून बाई बोलत होती. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक ५७.** ता० ११ जुलई इ. स. १७८१.
**श्रीगजानन.** मि० आषाढ व॥ ६ शके १७०३.

" सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १८ रजबपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष: इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें सेवेसी रवाना केलीं आहेत. प्रस्तुतचें वर्तमान राजश्री पाटीलबावांकडून काल प्रातःकाळीं पत्रें आलीं. त्यांचें बोलणें बाईशीं कालच तृतीय प्रहरीं राजश्री बाबुरावजी व नारो शिवदेव यांसीं जालें. त्यावर आज छ १७ रोजीं बाईंनीं गोविंद रघुनाथ या उभयतांकडे संध्याकाळीं पाठविले. माधवरायाकडील बाजी विठ्ठलही होते. चार पांच घटका एकांत होऊन ठरलें जे, जालें वर्तमान श्रीमंतांस लिहून पाठऊन उत्तरें आणवावीं. तेथील काय मर्जी, कशीं उत्तरें येतात, त्यासारखी पुढें मसलत. या अर्थीं जालें बोलणें तें उभयतांनीं सेवेसी लिहिलें आहे. श्रवण होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ५८.** ता० १५ जुलई इ. स. १७८१.
**श्रीगजानन.** मि. आषाढ व॥ ९ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें सेवेसी पाठविलीं आहेत. प्रस्तुत पाटीलबावांकडील वर्तमान, बुढापाहाडांनजीक छावणीचा डौल केला आहे. बाईकडील वर्तमान तर, राजश्री बाबुराव विश्वनाथ व नारो शिवदेव यांनीं लिहिलें आहे, त्यावरून श्रवण होईल. सेवकास येथें येऊन अडीच वर्षें जालीं. धन्यांच्या पायाचाही वियोग, व मुलामनुष्यांचेंही वर्तमान फार दिवस कळलें नाहीं. जशी आज्ञा येईल तसी वर्तणूक करीन. खर्चाचीही तारांबळ फार आहे. स्वामी कृपाळ, सर्वजाण आहेत. प्रस्तुत पाटीलबावांकडील वर्तमान पंचावलीवर हे आहेत व इंग्रज शेषईवर आहेत. गोहजवाल्यासुद्धां बारा तेरा पलटणें आहेत. पाटीलबावांची छावणी रणोदावर होणार. मध्यें कालीसिंद महानदी थोर आहे. रणोदावर छावणी जाल्यास इंग्रजांस व यांस बारा कोसांचा तफावत पडतो. पलीकडे गोहजवाल्याच्या मुलखांत धामधूम करायास पांच सहा हजार फौज सडी पाटीलबावांनीं पाठविली आहे. राणा इंग्रजांस सामील

जाला आहे व नरवरवाल्याचेंही सूत्र इंग्रजांकडेस आहे. अद्याप सामील जाला नाहीं. पाटीलबावांजवळ दक्षणी फौजेचा भरणा दहा हजार आहे, व राजेरजवाडे कुमकेस आले आहेत, त्यांची फौज दहाबारा हजार आहे. गोसावी बैरागी मिळून सात आठ हजार आहेत. हेही आपले ठायीं मजबुतीनें आहेत. इंग्रजही मजबुतीनें आहेत. नारो शिवदेवही बाईचा निरोप घेऊन उज्जनीस जाणार. बाई ह्मणतात जे, श्रीमंतांकडे पत्रें गेलीं आहेत, त्यांजकडील जाबसाल काय येतो तो पाहून मग तुह्मांस निरोप देऊं. सरकारचीं यांच्या पत्राचीं उत्तरें आलियावर कोणते एके गोष्टीचा ठराव जाला ह्मणजे बाबुरावजी लक्ष्मणपंतास आपणाकडेस येथून पाठविणार. इंग्रजांची व पाटीलबावांची लढाई छ ८ मिनहूस जाली. तें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलेंच आहे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति."

---

पे॥. चंद्र ११ साबान **लेखांक ५९.** ता० २७ जुलई इ. स. १७८१.

ध्मन्ने समानीन. हस्तें टांक. **श्रीगजानन.** मि. श्रावण शु॥ ७ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज सां्टांग नमस्कार तागाईत चंद्र ५ साबान विज्ञापना. हिंदुस्थानाकडील वर्तमान कोणी गृहस्थांनीं लिहिलें होतें, तें राजकीय मजकूर कीं, नजबखान पादशाही फौज घेऊन जयनगर प्रांतीं गुदस्तां आले होते. ते वेळेस जयनगरचा मुलूख तमाम जप्त करून राजास हस्तगत करावें आणि राज्याचा बंदोबस्त करावा अशी मसलत नजबखानानें केली. ती पाहून जयनगरवाल्यांनीं नजबखानाशीं जाबसाल लाविला कीं, हें राज्य बहुत दिवसांचें, हें राखावें. तेव्हां प्रतिवर्षी सात लक्ष रुपये पादशाहास देत जावें असा करार ठरवून, त्या रुपयांचे वसुलास नजबखानांनीं अनुपगीर गोसावी—त्यांस किताब राजे हिंमतबहादर—त्या गोसाव्याबरोबर पांच हजार फौज ठेवून सात लक्षांचे वसुलास जयनगरीं ठेवून नजबखान दिलीस गेले. त्यास, राजश्री पाटीलबावांनीं इंग्रजांचें पारिपत्य पातशाही फौज सामील करून करावें, या अर्थी राजश्री राजाराम रणगोड होळकराकडील येथून बाईनीं फौज देऊन पाटीलबावांबरोबर पाठविले होते. ते त्यांचा व नजबखानाचा दंडक बराच, यास्तव त्याजबरोबर पांचशें फौज देऊन नजबखानास कुमकेस फौजसुद्धां घेऊन यावें ह्मणून पाठविलें. ते जयनगरास गेले. तेथें हिंमतबहादर गोसायी नजबखानाकडील खंडणीच्या वसुलास आहेत. त्यांचा व पाटीलबावांचा स्नेह व मशारनिल्हेचाही दंडक फार. यास्तव त्यांची भेट घेऊन दिल्लीकडे जावें, या अर्थी त्यांची भेट घेतली. तेथें गोसावीबावा बोलले जे,

तुह्मी ज्या कार्यास दिलीस जातां, तें कार्य येथूनच करूं. ह्मणून ठेवून घेतलें. तदो- त्तर हिंमतबहादर गोसावी यांनीं व राजाराम रणसोड यांनीं नवाब नजबखानास पत्रें लिहिलीं, व पाटीलबावांच्या थैल्या होत्या त्याही नवाबाकडेस पाठविल्या. नवाबास उभयतांनीं पत्रें लिहिलीं जें, दक्षिणीयांचा व तुमचा स्नेह आहे. त्यास जळचरांनीं पाटीलबावांशीं फार आगळीक केली आहे. पाटीलबावा शहास गुंतले आहेत. यास्तव पाटीलबावांनीं अमके मातबर माणूस तुह्मांस पाचारूं पाठविले आहेत. त्यास, स्नेहाचें सार्थक हेंच कीं, या वेळेस फौजसुद्धां तुह्मीं पाटीलबावांशीं मिळून इंग्रजांचें पारिपत्य करावें, हें अतिउत्तम आहे. अशीं पत्रें पाठविलीं. नवाबांनीं पत्राचीं उत्तरें पाठविलीं जें, आह्मी या कार्यास आधीं सामील होऊं. परंतु आमचे चार मुद्दे पाटीलबावांनीं कबूल करावे. तपशील:— मुख्य जठवाडा आह्मीं दरोबस्त घेतला आहे, यांत वांटा त्यांनीं न मागावा. व जयनगरची खंडणी सात लक्ष रुपये आह्मीं जोर पोंहचावून सालाबाद ठरावली आहे, ती आमची आह्मी घेत जावी. तिसरें, आजपासून नवा मुलूख सुटेल तो निमेनिम आह्मीं व त्यांनी वांटून घेत जावा. चवथें, फौज त्यांची मातबर इकडे आल्यास आह्मांस उपद्रव न द्यावा. अगर आमची फौज फार, त्यांची थोडी आली तर आह्मीं त्यास उपद्रव न द्यावा. ऐसे मुद्दे नवाबांनीं लिहून पाठविले. या मुद्यांवर सरदारांच्या मोहरा करून पाठवणें, ह्मणजे आह्मी फौजसुद्धां येतों. त्यास हीं पत्रें पाटीलबावांकडेस पाठविलीं. तशांत पुण्याकडे श्रीमंतांनीं इंग्रजांचें पारिपत्य करून फत्ते जालीयाचें वर्तमान इकडे आलें. त्यास नवाबाच्या पत्राचें उत्तर पाटीलबावांनीं लिहिलें जे, फिरंगी आमच्या मुलखांत आले ह्मणून नवाबांनीं हे मुद्दे नवे लिहिले, हें योग्य नाहीं. ज्या वेळेस पादशाहास प्रयागाहून आणिलें, ते वेळेस सर्व तहरह जाले आहेत. मागाहून दिलीचे मुक्कामीं लढाई जाल्यानंतर नवाबास वजीर केले. ते वेळेस तह ठरवून, आण शपथा होऊन, लिहिली पुसलीं, तहनामे जाले आहेत. तें सर्व एकीकडे राहून व्यर्थ जालें कीं काय? नवें होणार नाहीं. फिरंग्याचें पारिपत्य श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून आह्मी करीतच आहोंत. नवाबास उत्तम दिसेल तें करावें. आह्मीं व होळकर व विसाजी कृष्ण मिळून जो तह पूर्वी केला आहे, त्यादिवाय एक बिघा जमीन अगर एक पैसा नवाब मागतील तर मिळणार नाहीं. आणि फिरंगी जबरदस्त पडल्यास नवाबास जागा राहील कीं काय, हे पुरतेपणीं विचार करणें तें करावें. आणिकही कित्येक मजकूर लिहिले. त्याजवरून फिरून नवाबासही हिंमतबाहदर यांनीं पत्रें लिहिलीं कीं, दक्षिण्यांशीं आपला स्नेह

व त्यांचा कृतोपकार आपल्यावर किती आहे हें आपण जाणत असतां, त्यास नवे मुद्दे लिहावे हें उचित कीं काय ? फिरंगी दक्षिण्यांनींच जेर केले आहेत. हैदर नाईकांशीं व दक्षिण्यांशीं हमेश बिघाडा होता; परंतु या प्रसंगीं हैदर नाईकाशीं त्यांनीं स्नेह करून, त्याजकडून इंग्रजांचें पारिपत्य करविलें. आणि तुमचा त्यांचा पूर्वस्नेह असतां नवें वैर करावें, हें कामाचें नाहीं. पूर्वीं जो तह ठरला आहे तोच कायम ठेवावा आणि आपण फौजसुद्धां सामील व्हावें, यांत उत्तम आहे. अशीं नवाबास पत्रें लिहिलीं व त्यांचे दिवाण शिवरामपंत काश्मिरी त्यांनेंही बहुत प्रकारें लिहिलें. त्यावरून नवाबांचीं पत्रें हिंमतबहाद्दर गोसांवी यांस आलीं कीं, तुह्मीं लिहिलें हें आह्मांस कबूल आहे. दक्षिण्यांशीं आह्मांशीं बिघाड करणें सर्वथैव नाहीं. प्रस्तुत बरसातीचे दिवस आहेत. बादबरसाद आह्मी पादशाहास घेऊन आगऱ्यास येतों. दहा हजार फौज दक्षिण्यांची आगऱ्यास पाठवून द्यावी. अंतरवेदचा बंदोबस्त करून पटण्यापावेतों इंग्रजांचा मुलूख सोडवून घेऊं. इंग्रज सहजच शिकस्त खातील. याप्रमाणें गोसावी यास नवाबाचीं पत्रें आलीं. त्यांनीं राजाराम रणसोड यांस दाखवून त्यांनींही पत्रें लिहून, तें व तीं पत्रें पाटीलबावांकडेस पाठविलीं. याप्रमाणें कोणी गृहस्थानें हें वर्तमान आषाढ शुद्ध त्रयोदशीचीं पत्रें लिहून इकडे पाठविलीं. होळकराकडीलच गृहस्थ आहे. आपलाही स्नेही ह्मणून पत्र लिहिलें. त्यांतच वर्तमान कीं, राजाराम रणसोड जयनगरींच हिंमतबहाद्दर गोसाव्याजवळ आहेत. जयनगर प्रांतीं होळकरांचीं. ठाणीं होतीं, तीं गुदस्तां राजांनीं उठविलीं होतीं. तीं प्रस्तुत ठाणीं कायम करवितात. टोंकेंत ठाणें यांचें बसलें. रामपुऱ्यांतही ठाणें बसणार. प्रस्तुत जयनगरांत मोठी लढाई होणार आहे. सबब, किलंगधीर, वगैरे रजपूत मातबर सरदार दहा बारा असाम्या राजांनीं धरून कैद केल्या आहेत. खुशालीराम बेहरा दिवाण तोही फितुरांत होता. पळून जात होता. तोही धरून कैद केला आहे. दहा वीस लक्ष रुपये त्या दिवाणाजवळून घेणार. जयनगरचें राज्य तूर्त बहुनायकी फार जाहली आहे. सरकारच्या फौजा हिंदुस्थानप्रांतीं असत्या, तर कित्येक कामकाजें बनून येतीं. याप्रमाणें पत्रीं वर्तमान लिहिलें होतें. अलीकडे सागर वगैरे ते प्रांतीं दक्षणी ब्राह्मणांचे कबिले आहेत, ते तमाम उज्जनीस येतात. इंग्रजांचे भयास्तव प्रांत तो चलबिचल जाला आहे ह्मणून ऐकिलें. उज्जनीवालेही कित्येक महेश्वरास येणार असें बोलतात. बाजारी वर्तमान हें होय. येथील वर्तमान तर अहल्याबाई राजश्री बाबुरावजींस ह्मणतात जे, 'तुह्मांस पुण्यास श्रीमंतापावतर जावें लागेल.

तुह्मी गेल्याशिवाय आमचा बंदोबस्त यथास्थित होणार नाहीं.' त्यास रावजींनींही पेशजीं सरकारांत पत्रें लिहिलीं आहेत. तेथून आज्ञा आली ह्मणजे येथें राजश्री लक्ष्मणपंतास ठेवून रावजी हुजूर येणार. मीही पेशजीं विनंतिपत्र सेवेसी लिहिलें आहे. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. कांहीं काम नसतां येथें काय ह्मणून असावें? स्वामींचे आज्ञेप्रमाणें इकडील सविस्तर रावजींनीं व राजश्री नारो शिवदेव यांनीं विनंतिपत्रें लिहिलीं आहेत. राजश्री पाटीलबावांकडील बातमीपत्रें डाकेबरोबर आलीं आहेत. तीं बजिन्नस सेवेसी रवाना केलीं आहेत. येथें बाईचे श्रावणमासचा उत्साह होत आहे. तीन चार हजार ब्राह्मण मिळाले आहेत. नित्य संतर्पण होत आहे. श्रावण एक मासपर्यंत [उत्साह] होईल. तदोत्तर ब्राह्मणांच्या संभावना करून बिदा करितील. याप्रमाणें येथील वर्तमान. तिकडे इंग्रजांस गोहजवाला मिळून इंग्रजांजवळ भरणा भारी जाला आहे, ह्मणून वदंता आहे. डाकेच्या पत्रीं काय वर्तमान असेल तें सेवेसी विदित होईल. देखलें ऐकलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. खर्चाची फार विपत्य आहे. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ६०.** ता. २ आगस्ट इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० श्रावण शु॥ १३ शके १७०३.

"श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित सेवक विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ साबानपर्यंत स्वामींचे कृपावलोकनें करून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो विशेषः— इकडील वर्तमान कळल्याप्रमाणें श्रीमंतांस विनंतिपत्री लिहिलें आहे; त्यावरून सविस्तर विदित होईल. राजश्री बाबुराव वैद्य सरकारआज्ञेप्रमाणें येथें बाईशीं बोलून निरोप घेऊन हुजूर येतात. छ ११ मिनहूस बाईचा निरोप घेऊन, बारावे रोजीं रेवापार होऊन, पार मुकाम करतील. दुसरे दिवशीं श्रावणी करून, भोजनोत्तर स्वार होऊन दरमजल पुण्यास येणार. मीही यांजबरोबरच येणार होतों; परंतु सरकारची आज्ञा आली नाहीं. यास्तव राहिलों. अडीच वर्षें येथें येऊन जालीं. धन्याचे चरण पहावें, घरीं मातुश्रीचें वार्धिक्य त्यांचेंही दर्शन घ्यावें, असें मानस आहे. इतक्यावर श्रीमंतांची आज्ञा जसी येईल तसी वर्तणूक करीन. खर्चावांचून फार श्रम आहेत. येथें चारशें रुपये लोकांचें देणें. तात्या, घरीं मुलें मनुष्यें फार श्रमांत आहेत. चिरंजीव दोन वर्षें पायाजवळ आहे. उदंडांस अन्नास लावितां, परंतु मुलाची सोय अद्याप कोठें न केली! आमचें दैव!! आपण काय करतील? तात्या, इतके दिवस

चाकरी करून एक मुलास आसामी कोठें द्यानांत ! आह्मां गरिबाविसीं वारंवार विनंति करणार कोण? स्वामीच श्रीमंतांस विनंति करतील तर कोठें याचना करतील? वतनाचें देणें व संसाराचें कर्ज देणें यानें फार श्रमांत आहे. काय उपाय करूं? इकडे कान्हापूर परगणा लहान आहे, तेथें मजमूची आसामी खालीं आहे. श्रीमंतांस विनंति करून तेवढी असामी चिरंजिवास करून दिली, तर बरें आहे. श्रीमंतांची मर्जी पाहून एकदां विनंति करून पाहावें. राजश्री बाबुरावजींसही विनंति करावयास मीं सांगितली आहे. तीस बत्तीस वर्षें जालीं. सेवा करीत आहे. परंतु मुलास कोठें आसामी एक द्यानांत ! आह्मांविषयीं कोण विनंति करील? आपणास ईश्वर श्रीगणपति स्मरणदेता आहे. तात्या, कर्जाच्या व गृहकृत्याच्या पेचांत फार आहे. आतां उत्तर वयांत आपण उपेक्षा केली, तर कोण आमचें आहे? इतका विस्तार लिहिला ह्मणून रागास न यावें. कृपा करून येवढी कान्हापुरची मजमूची आसामी विनंति करून करून द्यावी. देविणार स्वामी समर्थ. हे विज्ञप्ति. स्वामी ह्मणतील कीं, तुह्मी कामावर आहां; सरकारची आज्ञा नसतां येण्याची तांतड कां करितां ? त्यास, रावजी येथें आलीयावर महिना दीड महिन्यांनीं बाईनीं मुकुंदराव दिवाण यांजकडून मजला सांगितलें जे, 'येथें बाबुराव आहेतच. तुह्मांस बहुत दिवस जाले. दोघांचें येथें असें काय काम आहे ? तुह्मीं आपल्या धन्यास लिहून पाठवून तुह्मी जाणें.' याप्रमाणें त्यांनीं सांगितलें. आणखीही एकदोघांजवळ सांगितलें. बोलली जे, यांणीं आपल्या धन्याकडेस जावें. येथें काय कारण आहे? असेंही बोलली. असें यांणीं बोलली असतां येथें कशास राहावें ? धनी विश्वकुटुंबी आहेत. हा वेळपर्यंत ज्यांनीं प्रतिपाल केला आहे, ते आतांही उपेक्षा करणार नाहींत. श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

**लेखांक ६१.** ता० २ आगस्ट इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि. श्रावण शु॥ १३ शके १७०३.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष इकडील पेशजीं विनंतिपत्रीं लिहून सेवेसी पाठविलीं आहेत. येथील वर्तमान तर राजश्री बाबुराव वैद्य यांस सरकारचीं आज्ञापत्रें व बाईसही सरकारचें पत्र होतें. तें पत्र बाईस प्रविष्ट करून, यांस पत्र होतें त्याअन्वयें बाबुरावजी व राजश्री नारो शिवदेव उभयतां बाईशीं बोलून, बाबुरावजी बाईचा निरोप घेऊन दरमजल पुण्यास येतात. छ ११ रोजीं निरोप घेऊन, छ १२ रोजीं रेवापार मुक्काम होईल.

तेरावे रोजीं श्रावणी करून स्वार होणार. सेवेसी येऊन सविस्तर विदित करतील. येथें लक्ष्मणपंत रावजींनीं ठेवले आहेत. मीही रावजीबरोबर येत होतों, परंतु पेशजीं विनंति मीं लिहिली आहे. आज्ञापत्र आद्याप आलें नाहीं. सरकारची आज्ञा आली नसतां यावें, तर स्वामी रागें भरतील. या भयास्तव राहिलों. रावजीही ह्मणाले जे, आज्ञेवांचून येऊं नका. ह्मणून राहिलों. अडीच वर्षें येथें जालीं. धन्याचें चरणदर्शन व्हावें व घरीं मातुश्रीचें वार्धक्य, त्यांचेंही दर्शन व्हावें या अर्थीं विनंति. धन्याची मर्जी. जसी आज्ञा येईल तदनुसार वर्तणूक करीन. खर्चाचेही श्रम फार आहेत. स्वामी कृपाळू समर्थ. सुरतेकडील वर्तमानः गांडर इंग्रज सुरतेस आला. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस ह्मणतो कीं, तुह्मी स्वारीस निघा. दादासाहेब ह्मणतात जे, 'तुह्मांबरोबर सारें पायदळ. फौजेशिवाय आह्मी बाहेर निघणार नाहीं. फौजेची तरतूद करा. आह्मी स्वारीस निघतों.' त्यावरून राजश्री फत्तेसिंग गाईकवाडास दादासाहेबांनीं व इंग्रजांनीं बोलावूं पाठविलें आहे, व दाहा बारा हजार फौज तुह्मी ठेवा, पैका देतों, ह्मणून इंग्रज दादासाहेबांस ह्मणतात. यांणींही कबूल केलें. पैका द्या, आह्मी फौज ठेवितों. इंग्रज ऐवजाची तरतूद करितात. फत्तेसिंग गाईकवाडास दाहा लक्ष रुपये इंग्रज मागतात. दादासाहेबांनीं मना केलें जे, फौज ठेवायास त्यास सांगतां, तेव्हां पैका मागूं नये. मना केलें. इंग्रज पांच हजार तुरक स्वार जमा करणार. असी तरतूद फौजेची करितात. इतकी वीस पंचवीस हजार फौज व पंधरा पलटणें इतक्या सरंजामानसीं दादासाहेबांस स्वारीस काढावें असी मसलत करितात. ह्मणून साहुकारांत हें वर्तमान ऐकिलें. सत्य मिथ्या देव जाणे. आणीक कोठें कागदींपत्रीं हें वर्तमान नाहीं. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान तर, बुढापाहाडनजीक शाहाबागावर छावणी पाटीलबावांची जाली. इंग्रजही सिप्री कुलारस वगैरे जागांजागां गढी किल्यांचे आश्रयांनीं छावणी करून आहेत. गोहजवाला राणा इंग्रजांसी मिळाला आहे. वरचेवर डाकेबरोबर तिकडील पत्रेंही येतात. तीं नागेपंतनाना सरकारांत रवाना करीतच आहेत. बाबुराव येथून गेलियावर एका दो दिवसां नारोपंतनाना उज्जनीस जाणार. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ६२.** ता. ६ आगस्ट इ. स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० श्रावण व॥ २ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें

## ४५. सवाई माधवरावांचें शिक्षण.

श्री० सवाई माधवराव पेशव्यांस नानांनीं चांगलें शिक्षण देण्याचा प्रयत्न केला होता. त्या वेळीं पुण्याचे रेसिडेंट सर चार्लस मालेट हे होते. त्यांचे बरोबर डा० क्रुसो व डा० फिंडलें हे दोन विद्वान् युरोपियन गृहस्थ पुण्यास येऊन राहिले होते. ते पेशव्यांस निरनिराळ्या विषयांचें शिक्षण देत असत. त्या संबंधाचे उल्लेख सवाई माधवरावांच्या दिनचर्येच्या पत्रांत पुष्कळ सांपडतात. त्यांपैकीं एक मासला येथें देतों:—

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"विज्ञापना. डाक्तर[1] यांस हवेची पेटी घेऊन दोनप्रहरीं येण्याविषयीं बहिरोपंतांची[2] चिठी गेली. त्याजवरून डाक्तर व खानाचा[3] लेक व घड्याळाचा कारीगार ऐसे तीन असामी बारा घटका दिवसां वाड्यांत दाखल जाले. परंतु हवेची पेटी आणली नाहीं. त्यास विचारिलें, तों पेटी तयार नाहीं ह्मणोन त्यांनीं उत्तर केलें. श्रीमंत आरसेमहालांत अर्धघटकापर्यंत भूगोलप्रकरण पहात होते. तदुत्तर डाक्तर व बाबाजी व भास्कर दीक्षित व बाबू जोशी वज्रजोगणीकर व अन्याबा मेहेंदळे व खानाचा लेक ऐशी मंडळी आरसेमहालांत बसले आहेत. बाबाजी (हे), डाक्तर याजपासून भूगोलाचा विषय समजून घेऊन, कागदावर बयान[4] लिहीत आहेत. श्रीमंत उठोन मेघडंबरीच्या बंगल्यांत बुद्धिबळें खेळत आहेत. स्वामींस श्रुत व्हावें ह्याजकरितां विनंति लिहिली आहे. हे विज्ञापना."

❀ ❀ ❀

## ४६. कुलाब्याची आग.

कुलाब्याचे राघोजी आंग्रे ह्यांच्या कारकीर्दींत (इ. स. १७५७-१७९३) ता. १९ जानेवारी इ. स. १७८१ रोजीं कुलाबा येथें मोठी आग लागून, आंग्र्यांचा पुरातन वाडा व त्यांतील सर्व चीजवस्ता जळून गेल्या. ह्या आगीसंबंधानें खुद्द राघोजी आंग्रे व वसईचे सरसुभेदार विसाजी केशव ह्यांनीं नानांस लिहिलेलीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. तीं पुढें दिलीं आहेत. त्यांवरून, महाराष्ट्रांतील कित्येक इतिहासप्रसिद्ध ठिकाणीं, अग्निनारायणानें आपल्या प्रतापानें जुने कागदपत्र कसे नाहींसे केले, त्याचें एक उदाहरण दृष्टीस पडतें. आंग्र्यांचें जुनें दप्तर इतिहासदृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें असलें पाहिजे. तें उपलब्ध न होण्यास हा अग्निप्रताप कारण असावा असा अदमास आहे.

१ डाक्टर=डाक्तर फिंडले. २ बहिरोपंत=मेहेंदळे. ३ खानाचा लेक=इंग्रज रेसिडेंट सर चार्लस मालेट ह्याचा मुनशी नुरुद्दीन हुसेनखान नांवाचा मुसलमान होता, त्याचा मुलगा. ४ बयान=सविस्तर हकीकत, माहिती.

## लेखांक १.

पो छ. १५ सफर इहिदे. **श्री.** ता. १ फेब्रुवारी इ. स. १७८१.

[ मेणवलीदप्तर. ] "राजश्री नाना फडणिवीस गोसावी यांसः—

छं सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ राघोजी आंग्रे वजारतमाहा सरखेल रामराम विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेषः—छ २३ मोहरमीं नागोजी आंग्रे यांचे लग्नाकरितां बाहेर अलिबागीं कुटुंबासहवर्तमान आलों होतों. तेच दिवशीं दहा घटिका रात्रीं कुलाबेयास अग्न लागली. कोठ्या, जामदारखाना, पागा, खासा हवेली, चार बुरूज ऐसें जळालें. वस्तभाव कांहीं राहिली नाहीं. एका वस्त्रानशीं बाहेर आलों होतों, तितकें मात्र राहिलें. अग्न लागलेयावर किल्यांत जाऊन पोहचलों. खासा हवेली जामदारखाना येथें लगट केला. अग्न प्रदीप्त फार जाहली. निरुपाय गोष्टीस समयानरूप उपाय करावयाचा प्रकार योजिला; परंतु ईश्वरी इच्छेनुरूप न चालिला. दहा बारा माणूस आह्मांजवळच होतें, तें कामास आलें; व आठ दहा दुखवलें. श्रीकृपेनें आह्मी बाहेर निघालों. कांहींसी शरिरास पीडा जाहली. हल्लीं आरोग्य होत आहे. जंजिरे महास्थलाचा विचार, दौलतीचें कचें पक्कें हरद्र, आपणास अवगत आहेच. कर्जवाम करून संसार चालऊन, राज्यांतील जंजिरे महास्थळाचें संरक्षण करून, स्वामिसेवेवर जीवजानानशीं हजर आहोंच. आगोटीचा समय, कर्जवाम करून लोकांचे समजाविसीस कापड वगैरे सरंजाम केला होता. सर्वांची समजावीस व्हावी इतकीयांत यज्ञनारायणाची कृपा जाहाली. भात व नक्त व कापड व इमारतीस लांकडें ऐसा पोख्ता सरंजाम असिला पाहिजे. जागे जंजिरे यास शत्रूही सान्निध मातबर. वख्तांत वख्त गुदरला. त्याचें निराकरण होऊन शत्रूवर सलाबत राहे तें करणार आपण आहेत. आह्मांजवळ सरंजाम धण्याची कृपा आहे. येविशींचें सविस्तर राजश्री विसाजीपंत बावांनीं लि॥ आहे, त्याजवरून अवगत होईल श्रीमंतांचे जागां आपण आह्मांस आहेत. कापड, नख्त, गल्ला व सोटे यांची बेगमी पोख्ती होऊन येई तें करावें. जागे जंजिरे याची बेगमी होऊन आमचें स्वरूप राहे, तें करणार आपण आहेत. पर्जन्यकालाचे समयीं पक्षी देखील आश्रम करितात. असें असोन वख्त तों गुदरला आहे. तो पराङ्मुख करणार आपण आहेत. येविशींचें सविस्तर राजश्री रघोजी तान्हाजी यांस सांगोन पाठविले आहेत. सांगतां कळों येईल. रा छ ७ माहे सफर. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंति."

## लेखांक २.

**श्री.** ता. २७ जानेवारी इ. स. १७८१.

[ मेणवलीदप्तर. ] "श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

पे॥ विसाजी केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल छ २ सफर जाणोन स्वकीय कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेषः—

छ २३ मोहरमीं राजेश्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल भावाचे लग्नाकरितां सहकुटुंब बाहेर अलिबागास आले होते. मागें कुलाबियांत दाहा घटका रात्रीस अकस्मात् अग्न लागोन, खासा राहावयाचा वाडा व जामदारखाना व कोठी आदि सर्व सरंजाम जळाला. कुटुंबसहवर्तमान एका वस्त्रानिसीं बाहेर पडिले होते. तेवढ्यासीं गांठ पडली. ऐशास मशारनिल्हेचे पदरीं महास्थळें, मातबर जागे, यांचा सरंजाम स्वामीवितरिक्त कैसा होतो? अखेरीही समीप आली. यास्तव विनंति लिहिली आहे. तरी स्वामींनीं कृपाळू होऊन, नख्त व कापड व गल्ला व लांकडें पोख्त सरंजाम केला पाहिजे. त्यामध्यें भात व लांकडें घर बांधावयासी यांची आज्ञा सेवकाकडे करितील, त्याप्रमाणें येथून बेगमी करीन. थोडक्याचा विचार असता तरी येथूनच सेवकानें सरंजाम केला असता. तशानें परिणाम न लागे. यास्तव सेवेसी विनंति लिहिली आहे. खासा दुखावले आहेत. सरंजामांत बाकी कांहीं राहिली नाहीं. सर्व वस्तभाव किल्यांत होती. काडी मात्र निघाली नाहीं. काढावयाचा प्रेत्न खाशांनिशीं फार केला याजमुळें दहा पंधरा माणूस मेले. मोठा घात जाहाला. या समयीं त्यांस त्राता स्वामीखेरीज कोण जागे? स्वामींचे रा. राघोजीबावा एकनिष्ठ सेवक. येथें सेवकानें विस्तारें काय लिहावें? बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंति."

✻ ✻ ✻

## ४७. सुमेरसिंगाचा मृत्यु.

नारायणरावाचा मारेकरी सुमेरसिंग हा पुढें इंदूर येथें पळून गेला होता. तेथें तो मृत्यु पावला. त्याबद्दलचें बातमीपत्र उपलब्ध झालें आहे. श्रीमंत दादासाहेब इंदुरास गेले त्या सालचें हें पत्र आहे. ह्या पत्रामध्यें सुमेरसिंग 'किडे पडून मेला' व 'कर्मासारखें फळ झालें' असे उद्गार आहेत. ह्यावरून नारायणरावाचा वध करणारा खरा इसम सुमेरसिंग असावा, असें मानण्यास अधिक पुष्टि येते. हें पत्र इंदूर दरबारांतल्या बातमीदाराचें आहे असें दिसतें. हें येणेंप्रमाणें:

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"पुरवणी विज्ञापना:– राजश्री तुकोजी होळकर नर्मदा उतरोन दक्षणतीरास गेले. श्रीमंतांचा, काल एकादशीचा, उतरावयाचा मुहूर्त केला. ढाला व बाजार कांहीं उतरला. श्रीमंत वद्य त्रयोदशीस उतरणार असें करारांत आलें आहे. श्रीमंत उतरले म्हणजे शिंदे उतरतील. नदीस पाणी फार आलें आहे. कनिष्ठ पक्ष दाहाबारा दिवस लागतील. गाड्यांचा फडशा येथेंच होईल. सुमेरसिंगास बरें वाटत नवतें. यामुळें काशीस जावयाचा श्रीमंतांचा निरोप घेतला. तो जाऊन इंदुरांत आपले सोयऱ्याचे घरीं राहिला होता. त्याचे बातमीवर कृष्णाजी यादव खिजमतगार ठेविला होता. कांहीं दिवस तेथें होता. अखेर कृमी पडोन मेला. त्या गोष्टीस दीड महिना होत आला. कर्मासारखें फळ जालें. बहुतच हाल जाले. दोघे लेक त्याजवळ होते. ते तो मेल्यावर गाड्यांत आले आहेत. विदित व्हावें हे विज्ञापना."

## ४८. नानांची काशीयात्रा.

नाना फडनवीस ह्यांचें व श्री० सवाई माधवराव पेशवे ह्यांचें पटेना, तेव्हां ते काशीस जाण्याची त्यांस भीति घालीत, असा एक लोकप्रवाद ऐकूं येतो; परंतु त्यास कागदपत्रीं आधार नाहीं. नानांच्या दप्तरांत एक त्यांच्या हातचें टिपण सांपडलें आहे. त्यामध्यें पुढील मजकूर आढळतोः—

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

" बहुत दिवस मनांतून हेत होता कीं काशीयात्रा घडावी. परंतु तसा समय दृष्टीस पडेना. ईश्वरी कृपेंकडून दक्षिण हिंदुस्थानचा बंदोबस्त व सवासी तह सरकारचे ( होऊन ) व राजश्री पाटीलबावांचें येणे याच समयी होतें व राजश्री भाऊंचेंही येणें. सर्व आपली मडळी, एक तुह्मांखेरीज, एके ठिकाणीं श्रीमंतांजवळ होणें, आणि यांच्या संमतानें श्रीमंतांचा संतोषेकरून निरोप होणें. यास प्रथम अनुकूलता व हें मला घडणें व मागें संभाळावयास राजश्री हरिपंत तात्या, यांची अंतःकरणपूर्वक ( खात्री ) करून घेऊन जावयाचा विचार केला आहे. तुह्मास कळावें ह्मणोन लिहिलें आहे."

हें पत्र कोणास लिहिलें आहे तें समजत नाहीं. ह्या हेतूप्रमाणें नानांचें काशी यात्रेस जाणें अखेर घडलें नाहीं. तथापि, त्यांनीं श्रीकाशीक्षेत्राचें नित्यशः दर्शन घडावें ह्मणून एक काशीक्षेत्रांतील सर्व देवालयांचा रेशमी नकाशा तयार करून आणिला होता. त्याचें ते नित्य दर्शन घेत असत.*

❋ ❋ ❋

## ४९. दादासाहेबांचें माळव्यांतील कारस्थान.

पुण्यांतील कारभारीमंडळीनें सवाई माधवरावांच्या नांवानें राज्याची द्वाही फिरवून राघोबादादांस हताश केलें, त्या वेळीं शिंदेहोळकरांकडे जाऊन व त्यांची मदत घेऊन पुण्यास चालून येण्याचा प्रयत्न करण्यासाठीं, दादासाहेबांची स्वारी नर्मदा उतरून इंदुरास जाऊन दाखल झाली. त्या प्रसंगीं शिंदेहोळकरांनीं मध्यस्ती करून समेट करण्याचा घांट घातला. त्या संबंधाची सविस्तर हकीकत पुढील पत्रांत दिलेली आहे. ती अतिशय महत्त्वाची आहे. शिंदेहोळकरांचें ह्या वेळचें दुटप्पी वर्तन कसें होतें त्याचा ह्या पत्रांत चांगला उल्लेख आहे.

---

*हा काशीक्षेत्राचा रेशमी नकाशा अद्यापि अस्तित्वांत असून ती एक पाहण्यालायक अपूर्व चीज आहे. हा नकाशा मुंबईचे प्रसिद्ध इतिहासभक्त रा. रा. पुरुषोत्तम विश्राम मावजी जे. पी. ह्यांच्या 'ऐतिहासिक संग्रहालया'मध्ये मोठ्या काळजीनें संग्रहीत केलेला आहे.

[ मेणवलीदप्तर. ] **श्री.** ता. १३ जून इ. स. १७७४.

पैवस्ती चंद्र ३ रबिलाखर.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री ताल्या स्वामींचे सेवेसीः—

पौष्य मोरो गिरमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र २ रविलाखर मुक्काम नजीक बडवा रेवा दक्षिणतीर जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः—आपण बऱ्हाणपूरचे मुक्कामींहून नवाब, भोंसले, आदीकरून फौजांस निरोप दिल्याचे मजकुराचीं पत्रें राजश्री गुरुजीस व उभयतां सरदारांस पाठविलीं, तें इंदुरचे मुक्कामीं पाऊन सविस्तर अर्थ कळला. इकडून आपणास दोन पत्रें विस्तारें-करून मजकूर लिहून पाठविलीं, त्यांजवरून सविस्तर अर्थ कळलाच असेल. श्रीमंतांशीं जाबसाल उभयतां सरदारांचे वियमानें लागलाच होताः परंतु मध्यें मध्यें हिसके फार वमत गेले. बोध करणार बहुत; विश्वास कोणाचाच नाहीं. उभयतां सरदारांपैकीं एकाचा भरंवसा, एकाचा संशय! त्या अर्थी कोणतीही गोष्ट घडोन येईना. उभयतां सरदारांत परस्परें संशय! तेव्हां युक्तीचे वाटेनें, उभयतांचा परस्परें संशय दूर करून, एकविचार केलें. बाईकडून पुस्तपन्हा होती. त्यास त्यांचे हितकर्ते गृहस्थ ममतेचे होते, त्यांजपासून विचारांच्या मनसच्याच्या गोष्टी सांगोन, त्यास याच पळयावर आणून, उभयतां सरदारांस निक्षून सांगितलें कीं, देशास श्रीमंतांस घेऊन जावें. त्याजवरून तेही श्रीमंतांशीं बहुत प्रकारें बोलले. परंतु खातरजमा होईना. तेव्हां शिंद्यांनीं जाबसाल केला कीं, ज्यापक्षीं आमचा विश्वास स्वामींस नाहीं, आमचें सांगणें ऐकणें नाहीं, तेव्हां राहून उपयोग काय? त्यास आह्मांबरोबर हजार, दोन हजार, चार हजार जे सोबतीस येतील, ते घेऊन आह्मी घांट उतरून जातों; फौजेशीं एक लढाई करतों. आह्मी थोडे आहों, ते फार. त्यास खावंदांचे कार्यास आलों तरी उत्तम. जगलों तरी निघोन बंगाल्यास जाऊं. मग आपले विचारास येईल तें आपण करावें. त्यास करणें ते करतील. येविषयीं बहुत आजुर्दगीनें बोलले. ते दिवशीं श्रीमंत उठोन आपले डेऱ्यास गेले. दुसरे दिवशीं दोनप्रहरां शिंद्यांचे डेऱ्यास येऊन होळकरासही तेथें बोलावून आणिलें. बहुत प्रकारें मोह उत्पन्न होई असें भाषण केलें. शेवटीं चार गोष्टी सांगितल्याः—

एक प्रकारः—नर्मदातीरीं स्नानसंध्या करून राहूं. शिबदीची तलब देऊन दूर करावें. पुढें खर्चाचा बंदोबस्त चार महिने करून द्यावा. दोन हजार फौज आपले जवळ ठेवावी.

दुसरा प्रकारः—पुण्यास घेऊन जावें. कारभारी यांचा प्रकार आहे. त्यांचें आमचें रहस्य करून द्यावें. सर्व यख्तियार कारभारीं यांवर पडे. आह्मांस पुसून करीत जावें. आमचें तेज राखावें. शिबंदीचा फडशा करून द्यावा.

तिसरा प्रकारः—श्रीमंत कैलासवासी रावसाहेब यांनीं जहागीर किल्लेसुद्धां पेशजी आह्मांस करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें द्यावी. सर्व बंदोबस्त आमचा असावा. पुढें फितूर करणार नाहीं. येविषयीं जिमा तुह्मीं आपला करून द्यावा, दोन हजार फौज आपले जवळ ठेवावी.

तिन्ही प्रकार न घडेत, तरी आम्हांस निरोप द्यावा. ईश्वर आम्हांस वाट देईल तिकडे जाऊं. दैवीं असेल तिकडे जाऊं. अथवा श्रीकाशीस पोहोंचवून द्यावें. तेथें जाऊन स्नानसंध्या करून राहू.

याप्रमाणें चार मजकूर सांगितले. यांत जो तुमचे खातरेस येईल तो मान्य करावा. हें नच घडे तरी पायांत बेड्या घालाव्या; अथवा तरवार पुढें ठेविली, जें करणें तें करावें. तेव्हां त्यांसही संकट पडलें. श्रीमंतांस निरोप दिला. राजश्री गुरुजीस व आम्हांस बोलावून सांगों लागले कीं, यांतून कोणती गोष्ट तुम्हांस पुरवेल ते करावी. चारी गोष्टी तुमचे खातरेस न येत, तरी श्रीमंतांनीं शेवटचा विचार सांगितला आहे. त्याची परवानगी सांगा, तें करूं. त्यास, शेवटचा प्रकार केल्यानें कोणाचें बरें जाहलें आहे? याचा उच्चार करूं नये. वरकड गोष्टींचा जाबसाल केला:—

नर्मदातीरीं राहणार, त्यास प्रकृति तुम्हांस माहीतच आहे. शंभर राजकारणें करतील तुमचें राहणें चार महिने येथें जाहलें, पुढें श्रीमंतांस घेऊन देशीं जाल. हा जाबसाल उरकावयास व तुम्हांस देवास जावयास वगैरे चार महिने देशीं लागतील. पुढें माळव्यांत याल, तेव्हां अखेर सालचे दिवस आले; त्यामुळें एक साल हिंदुस्थानची मसलत राहील. त्यानें सरकारची नुकसानी आणि तुमचीही नुकसानी. त्या अर्थी हा प्रकार उपयोगी नाहीं.

दुसरा प्रकार रहस्य करून द्यावयाचा. त्यास परस्परें चित्तांत किंतू फार वाढले. संशयनिवृत्ति व्हावयाचीच नाहीं. त्या अर्थी एक विचार होऊन कारभार कसा चालतो? कारभारी यास इतबार कसा पुरतो? हे गोष्ट घडावयाची नाहीं. तेव्हां त्यांनी उत्तर केलें कीं, श्रीमंतांस आह्मी निखालसपणें चालवितों. शिंदे ह्मणाले आह्मी जवळ राहतों. बोलण्यांत अंतर पडलें तरी जिमा आमचा. त्यास उत्तर केलें कीं, हिंदुस्थानची मसलत सोडून रखवालीकरितां आपणास ठेवावें आणि रहस्य करावें, ही गोष्ट कशी बनेल? हा प्रकार घडावयाचाच नाहीं.

तिसरा प्रकार आनंदवल्लीस राहून श्रीमंत रावसाहेबांनी जहागीर किल्ले दिले त्याप्रमाणें द्यावयाचा. त्यास कारभारी त्यांचे, हुकूमहकम त्यांचा, जुनें मंडळ त्यांचें, विचारास येतील त्यास ठेवावें, त्या पक्षीं फितुर राजकारण करावयास चुकतील कीं काय? दोन हजार फौज आपली ठेऊं. कारभारी फार जाहले तरी आह्मी आपले तर्फेचा ठेऊं. तुमचा कबूल करीत नाहींत, असें ह्मणों लागले. त्यास आह्मीं उत्तर केलें कीं मिळे इतकें देणें. कारभारीलोक त्यांचे नाहींत. त्यापक्षीं ही गोष्ट कशी कबूल करितात? तेव्हां निदान निमे तरी किल्ले द्यावे लागतील. निमे फार किल्ले होतात, हे द्यावयास न बने, तरी त्रिंबक, माल्हेर, आशेर, तीन किल्ले द्यावे. फार बखेडा नको. त्यास हीं तिन्हीं स्थळें कशीं आहेत? द्यावयाचे आपले विचारास येतें कीं काय? याचा विचार आपणच करावा. याप्रमाणें मजकुराचा जाबसाल जाहला.

चौथा प्रकार निरोप देऊन लावावें अथवा काशीस पोहोंचतें करावें. ही गोष्ट कोणाचेही ध्यानास यावयाची नाहीं. तेव्हां या गोष्टीची सल्ला आह्मीं काय सांगावी?

से गोष्ट राज्यास उपयोग, सर्वांस चैन पडे, केलें कर्म सिद्धीस जाई, तोच प्रकार आपण करतील. दौलतीची काळजी आह्मांसच आहे, आणि आपआपणांस नाहीं असें नाहीं. आपण दौलतीचे खांब. आपल्यावर मदार आहे. या अर्थे सर्व ओझें त्यांचेच मस्तकीं देऊन, त्यांशींच युक्तिप्रयुक्तीनें बोलणें तें बोललों. त्यास ही गोष्ट कोणाचे विचारास यावयाची नाहीं. यास्तव तो प्रकार राहिला.

येणेंप्रमाणें चारी कलमांचा जबाब केला. सरदार आह्मांसीं बोलूं लागले कीं, तुह्मीं पाऊण लाख फौज मिळविली, आणि पन्नास लाख रुपये खर्च करून काय केलें? शेवटीं आह्मांवर दुर्निमित्य घालावयास आणिलें. जरी आह्मी फौजेंत असतों तरी कसें इतके लांब येते, तेंही दाखवितों. ऐसें कित्येक प्रकारें बोलत गेले. आह्मी दरजबाब प्रसंगानुरूप युक्तीचे व सरकारचे दाबाचे करावयाचे ते केले. त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा? राजश्री गुरुजी, विष्णुपंत बाबा, मी एकत्र बसोन विचार केला कीं, श्रीमत येथें राहिल्यानें कोणतीही गोष्ट उपयोगी नाहीं. तेव्हां कळेल त्या रीतीनें तोडजोड काढून न्यावयाचा विचार करावा. त्यावरून प्रसंगसाधनार्थ चार गोष्टी अधिक उण्या बोलून, हल्लीं निश्चयांत आणून, कूच करावयाचा सिद्धांत केला. सरदारांचें बोलणें कीं श्रीमंत कैलासवासी रावसाहेबांप्रमाणें किल्ले जहागीर द्यावे ह्मणतात. त्यास निदान निमे किल्ले व पहिल्याप्रमाणें जहागीर याप्रमाणें निश्चयांत आणावें. त्यास उत्तर केलें कीं किल्ले फार, हे द्यावयाची सोय कशी पडेल? त्यास तेही बोलले कीं आमचे चित्तांत खामखा किल्ले द्यावेच द्यावें असें नाहीं, परंतु आग्रहासच पडले तरी कसें करावें? तेव्हां तोड काढली कीं एखादा दुसरा किल्ला द्यावा. हें आपण श्रीमंतांशीं बोलतच आहेत. आह्मांस तों परवानगी नाहीं. परंतु आपण सरदार, आपली भीड भारी. आपले न ऐकत अशी गोष्ट नाहीं. आह्मीही रदबदल करावयास चुकणार नाहीं. तेथें गेल्यानंतर राजश्री बापू व नाना यांचे व आपले विचारें करून किल्ल्याचें ठरेल त्याप्रमाणें करावें. जहागिरीचा प्रकार कैलासवासी श्रीमंतानीं दिल्याप्रमाणें द्यावी लागेल हें बोलणें त्यांचें आहे. खेरीज शिबंदी दहा लक्ष रुपये श्रीमंतांस पावेत अशी जहागीर पहिली होती, त्याप्रमाणेंच करावें लागेल. त्यास उभयतां मुत्सद्दी व आपले विचारें देशीं गेल्यावर कर्तव्य तें करावें. दोन गोष्टी विचाराचे वाटेच्या आपल्या ते ऐकतील; त्यांच्या आपण ऐकाव्या. याप्रमाणें बोलून आनंदवल्लीस राहावयाचा विचार सिद्ध जाहला.

तूर्त श्रीमंतांस खर्चास पन्नास हजार रुपये द्यावे, रेवातीरपर्यंत यावें, तेथें गारद्यांचा फडशा करावा, पुढें जहागिरीची नेमणूक होई तों खाजगी खर्च व कारखान्यास लागेल तो खर्च द्यावा, व लोकांस रोजमुरा द्यावा. याप्रमाणें जाबसाल ठरोन ज्येष्ठ शुद्ध तृतीया रविवारीं इंदुराहून कूच करून, नालशाचे घाटें उतरोन, अकबारपुरचे घाटास रेवा दक्षिणतीरास यावें, याप्रमाणें ठराव जाहला.

कारभारी लोक सर्व आपले असावे हें आमचें बोलणें चाललेंच आहे. त्यास सरदार ह्मणतात कीं श्रीमंतांस इतबार पुरत नाहीं. कारभारी लोक त्यांचे जाहले तेव्हां आह्मी कैदेंतच राहिलों. त्यास तुमचा कारभारी व कांहीं लोक ठेऊं. परंतु त्यांचे पुरवेनात. तेव्हां सरदार ह्मणों लागले कीं, आह्मी आपला कारभारी व कांहीं लोक ठेऊ. श्रीमंतां-

पासून वावगी वर्तणूक होऊं देणार नाहीं, याप्रमाणें बोलतात. त्यास, देशीं गेल्यावरी राजश्री बापूनीं गंगातीरास यावें. उभयतां सरदारांची भेटी व्हावी. उपरांत त्यांचे यांचे विचारें कर्तव्य तें करावें. याप्रमाणें जाबसाल ठरला आहे.

गारदी दूर करावयाचे त्याची तलब द्यावी. त्यास, तेथें पैका दिला आणि फिरोन लबाडी जाहली तर काय करावें? यास्तव रेवातीरास येऊन गारद्यांचे तलबेचा फडशा करून निरोप द्यावा. याप्रमाणें तलब द्यावयाचा ठराव जाहला. श्रीमंतांनीं कांहीं जहागीर त्यांस देऊं केली आहे. ती हिंदुस्थानांत लावून द्यावी. चार लक्षांची ह्मणतात. त्यास येविषयीं जाबसाल आचरणाचा करावयाचा तो केला. परंतु सरदार ह्मणतात कीं, या प्रसंगीं ही गोष्ट केली पाहिजे; पुढें आह्मी समजोन घेऊं. पारपत्य करावयाचा विचार आहे त्याप्रमाणें आह्मी करूं. परंतु तूर्त श्रीमंतांस मोकळें केलें पाहिजे. त्यांचे हातचे सुटले पाहिजेत. निदान दोन अडीच लाखपर्यंत हिंदुस्थानांत द्यावी लागेल ह्मणतात. त्यास रेवातीरीं फडशा होईल तेव्हां जाबसाल ठरेल त्याप्रमाणें लिहून पाठवूं.

फौज श्रीमंतांसमागमें आहे. त्यास आपले सारे फौजेचा फडशा होईल त्याप्रमाणें यांचा करावा. त्यास रेवातीरींच पैका फौजेचा द्यावा. देशीं गेल्यावरी देऊं असा जाबसाल केला. त्यास जसें ह्मटलें तशी सोय पडेल. करावी लागेल.

येणेंप्रमाणें निश्चयांत आणून कूच करावें असा सिद्धांत केला. इतक्यांत आपलीं पत्रें बऱ्हाणपूरचे मुक्कामाचीं, नवाब, भोंसले व सर्व फौजेस निरोप द्यावयाचे मजकुराचीं पत्रे सरदारांस व गुरुजीस आलीं व श्रीमंतांसही परभारा बातमी आली. त्यास सरदार ह्मणों लागले कीं, ही गोष्ट इतक्यांत कशी उघड केली? वर्तमान ऐकून श्रीमंत पाय पसरतील. त्यास पर्याय सांगितला कीं, त्या फौजेचें कूच करावें हें श्रीमंतांचें बोलणेंच आहे. त्यास आह्मींच कूच करविलें. याप्रमाणें बोलावें ह्मणजे गुंता पडणार नाहीं. तेव्हां ते बोलले कीं, रेवातीराचे फौजेचा मुक्काम तरी येथून कूच होई तोंपर्यंत करवावा. याजकरितां व राजश्री आपा आण्णा यांस वर्तमान सांगावें व आपणास लिहावें या अर्थेकरून इंदुराहून निघोन येथें चंद्र १ रविलाखरीं आलों. यांचा मुक्काम येथें करविला आहे. श्रीमंतांचें कूच इंदुराहून नालशाचे घाटाकडे जाहलें, हें वर्तमान उदईक येथें येईल. आल्यानंतर या फौजेचें कूच होईल. श्रीमंत राजश्री रावसाहेब यांचे पुण्येंकरून आपण केल्या मेहनतीचें सार्थक श्रीइच्छेकरून सत्वरच घडोन, सर्व बंदोबस्त घडून येईल. चंद्र २७ रविलावलचें पत्र बऱ्हाणपुरचे मुक्कामाहून आपण पाठविलें, ते येथेंच पावून सर्व अर्थ कळले. राजश्री गुरुजीकडे पत्र रवाना केलें. आपण लिहिलें कीं कार्याचे अर्थी चार गोष्टी अधिक उण्या बोलल्यास चिंता नाहीं. त्यास येविषयीं बऱ्हाणपुरीं मीं आपली आज्ञाच घेतली होती. त्यास कार्यसाधनार्थ जसा प्रसंग आढळला तसा जाबसाल करावा लागला. हा सर्व अर्थ दर्शनांतीं निवेदन होईल. मजला गुरुजींनीं फिरोन बोलाविलें आहे. त्यास श्रीमंत अकबरपूरचे घाटास आले ह्मणजे मी जातों. तेथील गारदी यांचा वगैरे गुंता उरकूनच देशीं यावयाची तजवीज करितों. राजश्री गुरुजी, विष्णुपंत बाबा फार दिवस मेहनत करीतच आहेत. मला रवाना केल्यापासून मीहि त्यांजपाशीं हजर राहिलों. बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंति."

✻ ✻ ✻

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः-दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] जून १९०९. [अंक ११ वा.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह सह ६ आणे.

चाकणास आले. *कृष्णाजी राजीयांहीं मुधोळकर वेंकाजी राजे घोरपडे पादशाही मनसबदार यांस चोरून पत्रें लिहिलीं कीं, तुह्मी पादशाही मनसबदार. आह्मी पादशाहाजीचे नवाजीसीचे राजे. हुजूर पादशाहाची चाकरी माफ. परंतु हुकूम पादशाहाचा मानावा. तुह्मी आह्मी सोयरे धायरे. शिवाजी राजे भोंसले मुफसद. हे पादशाहासीं धुंद माजविली आहे. तर हरयत्न करून तुह्मांस ज्या प्रकारें योजेल त्या प्रकारें आमची येथून सुटका करून, आपणांकडे मुधोळास घेऊन जावें. हरप्रयत्न तुह्मांपासीं आपण आलीयावर केला जाईल. आधीं एक, मग दोन. हे कागद शिवाजी महाराजांच्या डाकवर सांपडले. त्यांहीं शिवाजी महाराजांस दिधले. शिवाजी महाराजें वाचून पाहतां फितूरसा कळला. मग कृष्णाजी राजे मोरे यांस शिवाजी महाराजें विचारलें जे, तुमच्या आमच्या भेटी राजगडावर जाहल्या. तेव्हां इमानप्रमाणें तुह्मीं आह्मांस दिधलेंत जे, तुह्मांसीं अतःपर दुराव होणार नाहीं. ऐसें असतां फितुराचे कागद वेंकाजी घोरपड्यास पाठविले. तर तुह्मी मोरे बेइमान आहां! ऐसे शब्द ठेवून कृष्णाजी राजे मोरे यांची गर्दन शिवाजी महाराजें चाकणावर मारली. तधीपासून जावलीवरून मोरीयाचें राज्यस्थान भ्रष्ट जाहलें. भाऊबंद चंद्ररायाचे वंमीक आहेत. परंतु जावलीवर राज्य नाहीं. चंद्ररायाचें राज्य धर्मात्मा जावलीवर राज्य करीत असतां, राजीयांतील हिस्से एक हिसीयाची शिबंदी पायेहासम, एक हिसीयाचीं अन्नछत्रें व धर्म खैरात, एक हिसीयाचा खासगी खर्च, तोसीखाना, पागा, सुरतखाना, अदिलखाना, वगैरे; एक हिसा देवस्थलीं देव, शिवालयें, माहाबलेश्वरीं पंचगंगा चंद्ररायांहीं बांधल्या. ऐशा सात शिवपुऱ्या चंद्ररायांहीं आपले वंशपरंपरा जेथून जावलीचें राज्य जालें, तेथून संपेल तेथवर, देवस्थलीं बाकी चालविली. ऐसे धर्मराजे मोरे जाहले. शिवाजी महाराजें, जावलीस वर डोंगर होता, तेथें प्रतापगड बांधिला. तेथें श्रीतुळजापुरचे अंबेची स्थापना केली. परंतु चंद्ररायाची कीर्ति जग चहात आहे. हकीकतनामा चंद्रराव राजे मोरे यांचा."

"यशवंत."



*रायरीचे बखरीत चंद्रराव आणि बाजीराव कृष्ण अशी नांवें दिली आहेत. तीतील उतारा खाली देतों:—"दोनप्रहर लढाई झाली. हल्ला करून जावली हस्तगत केली. बाजीराव कृष्ण राजे सांपडले. त्यास स्त्रियांसुद्धां कैद केलें....चंदरराव व बाजीराव मोरे बायकांसुधां घेऊन पुण्यास आले. बाजीराव यास अभ्यंग भोजन करवून पुण्याचे दक्षणभागीं शिरच्छेद करविला. त्याच्या कन्या होत्या, त्या आपण मोहरीक केली नाहीं."

## ८. शिवकालीन रोजनिशींतील सरदार बाजी प्रभु यांजबद्दलचा उल्लेख.

एका जुन्या शिवकालीन रोजनिशींत सरदार बाजी देशपांडे यांचेबद्दल उल्लेख आहे, तो फार महत्त्वाचा आहे. कांहीं दिवसांपूर्वी बाजी प्रभु लढत असतां कोठें पडले, याबद्दल कडाक्याचा वाद चालला होता. ह्या संबंधानें एका आंग्ल विद्वानानें "Times of India" पत्रामध्यें विशाळगडच्या वर्णनांत जो उल्लेख केला आहे, त्यास जुन्या माहितीनें पुष्टि येते. हा उतारा येणेंप्रमाणेः—

"शके १५७२ विक्रमनाम संवत्सर, सन १०६०, सन इह्दिे खमसेन व अलफ. आबदलाखानाचे लोक फकीर होऊन गेले होते. त्यांणीं पातशाहापासून आणीक फौज मोठी घेऊन, राजे पन्हाळा असतां, येऊन वेढा घातला. राजे वरून येऊन मोर्चे मारून किल्यावर जात. तेव्हां सर्वांचे विचारें ठरलें कीं, महाराज येथून गेल्यास किल्याचा शह उठेल. तेव्हां राजश्रीनीं, पंचवीस हजार मावळे, बराबर बाजी परभु घेऊन, विशाळगडाचे खिंडीनीं जातां, बाजी परभु मावळे घेऊन त्याचे तोंडावर खिंडींत उभा राहिला. लढाई होतच आहे. तों राजे निघोन विशाळगडास दाखल जाले. तोफा सोडल्या. बाजी परभु लढाई करीत असतां, जखमा लागोन ठार जाहला. राजयाची (राजाची) फत्ते जाली. विजापुरची फौज माघारी गेली."

"यशवंत."

* * *

## ९. संभाजीचा वध.

मनुची ह्या नांवाचा एक इटालियन प्रवासी हिंदुस्थानांत इ. स. १६५६ मध्यें आला होता. त्यानें सुमारें अर्धशतकपर्यंत हिंदुस्थानांत राहून आपल्या प्रवासाचें विस्तृत वर्णन लिहिलें आहे. त्यामध्यें सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील मराठ्यांच्या व मुसलमानांच्या राजकीय घडमोडींची उत्कृष्ट माहिती दिली आहे. शहाजहान बादशाहाच्या कारकीर्दीचा शेवट व औरंगजेबाची संपूर्ण कारकीर्द, मनुचीनें स्वनेत्रांनीं पाहिली असल्यामुळें, व पुष्कळ राजकीय गोष्टींत त्यानें स्वतः कांहीं भाग घेतला असल्यामुळें, त्याच्या प्रवासवर्णनास इतिहासदृष्टीनें कांहीं विशेष महत्त्व आलें आहे. त्याचा संपूर्ण ग्रंथ मि० आयर्व्हिन्‌नामक एका आंग्लपंडितांनीं भाषांतररूपानें नुकताच प्रसिद्ध केला आहे. ह्या ग्रंथाचें नांव "Storia do Mogor" असें आहे. ह्यामध्यें राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे सर्व विषयांचें ह्या इटालियन प्रवाशास जेवढें ज्ञान प्राप्त करून घेतां आलें, तेवढें मोठ्या चिकित्सक बुद्धीनें




**मनुची.**

( संभाजीच्या वधाची हकीकत लिहिणारा इटालियन प्रवासी )

त्यानें संगृहीत केलें आहे. ह्या ग्रंथांतील कित्येक महत्त्वाचे उतारे आह्मी सवडी-प्रमाणें देणार आहोंत. आजच्या उताऱ्यांत मनुचीनें संभाजीच्या वधाबद्दल जी माहिती दिली आहे, ती सारांशरूपानें आह्मी येथें देतों. ती वाचण्यासारखी आहे, हें सांगावयास नकोच.

"औरंगजेबाचें एवढें प्रचंड सैन्य होतें तरी, त्याची अशी खात्री झाली कीं, सैन्यांच्या जोरावर आपला ( हिंदुपदपादशाहीचा अधिपति जो संभाजी त्यास जिंकण्याचा ) हेतु सिद्धीस नेणें शक्य नाहीं. कारण, संभाजीनें, मोंगल सैन्याबरोबर रणांगणामध्यें समोरासमोर लढाई करण्याचा एकही प्रसंग येऊं न देतां, गनिमी काव्यानें जागोजाग हल्ले करून, लूटमार करण्याचा क्रम चालविला होता. मराठ्यांचे घोडे, थोडें खाऊन लांबलांब मजली मारण्यांत तरबेज झाले असल्यामुळें, त्यांच्या चापल्यावर सर्वस्वीं भरंवसा ठेवून, त्यानें मोंगल सैन्यास व त्यांच्या सेनापतीस अगदीं दमवून टाकिलें, आणि त्यांस त्राहि त्राहि करावयास लाविलें. तेव्हां औरंगजेबास असें दिसून आलें कीं, ह्या मराठ्यांच्या मोहिमीमध्यें आतां नेहमींची कुटिल नीति स्वीकारल्यावांचून आपणास यश येण्याची बिलकूल आशा नाहीं. तेव्हां त्यानें त्या मार्गाचें अवलंबन करून आपला प्रयत्न चालविला. त्यानें संभाजीचा प्रधान मंत्री छांदोगामात्य कवि कलुश ह्याजबरोबर पत्रव्यवहार सुरू केला व त्यास द्रव्यद्वारें लांच देऊन व अनेक नजरनजराणे देऊन त्याला अनुकूल करून घेतलें. त्यानें औरंगजेबाच्या इच्छेप्रमाणें संभाजीस जिवंतपणें मोंगल सैन्याच्या ताब्यांत देण्याचें मान्य केलें.

अशी ह्मण आहे कीं, एकदा मनुष्याला कसलीही संवय लागली, ह्मणजे तो मग त्याचा स्वभाव बनून जातो. मग त्या मनुष्यास, त्या संवयीपासून किंवा व्यसनापासून पराङ्मुख होण्याची इच्छा झाली, तरी तें शक्य नसतें. तद्वत् संभाजीची गोष्ट झाली होती. त्यास परस्त्रीचा इतका नाद लागला होता कीं, आतां खुद्द त्याच्या स्वतःवर ह्या औरंगजेबाच्या कपटनाटकाचा नायक होण्याचा प्रसंग आला तरी, त्यास ह्या दुष्ट कामविकारापासून दूर होतां आलें नाहीं. हेंच त्याच्या स्वातंत्र्याच्या व आयुष्याच्या नाशाचें खरें कारण होय. कवि कलुशानें त्याच्या ह्या दुष्ट वासनेचा फायदा घेऊन त्यास औरंगजेबाच्या स्वाधीन करण्याचा संकल्प केला.

'त्यानें संभाजीस असें सांगितलें कीं, आपल्या लष्करापासून सुमारें तीन कोसांवर एक लहानसें गांव आहे. तेथें एक अति सुंदर व लावण्यवती ब्राह्मणस्त्री आहे. एवढी बातमी संभाजीस समजली मात्र, कीं लगेच त्यास मोह उत्पन्न होऊन, त्यानें त्या गांवीं जाऊन ती स्त्री हस्तगत करण्याचा निश्चय केला. इकडे कवि कलुश ह्यानें औरंगजेबास सूचना पाठवून, संभाजीस धरण्यासाठीं पांच हजार सैन्य त्या

गांवीं आणविलें. संभाजीस पकडण्यासाठीं औरंगजेब अतिशय उत्सुक झाला होता. त्यानें ताबडतोब त्या गांवीं सैन्य पाठविलें. तें गुप्त जागीं संभाजीस धरण्यासाठीं दबा धरून बसलें. संभाजी इकडे आपलें लष्कर सोडून देऊन, थोड्या लोकांनिशीं ह्या स्थळीं येण्यास निघाला. तो त्या गांवानजीक येतांच, मोंगल सैन्यानें त्याच्या भोंवतीं गराडा घातला, आणि त्यास कैद करून औरंगजेबाच्या लष्करांत पकडून नेलें.

औरंगजेबानें कवि कलुशास ह्या कामगिरीबद्दल काय बक्षीस दिलें, तें वाचकांनीं ऐकण्यासारखें आहे. संभाजीस पकडून देण्यांत प्रमुख जो कवि कलुश त्यास औरंगजेबानें भयंकर शिक्षा दिली. त्यानें ह्या स्वामिद्रोही कवि कलुशाची जिव्हा समूळ उपटून काढावी ह्मणून हुकूम फर्माविला. कां कीं, ह्या राजद्रोहाचें पातक करण्यास औरंगजेबानें मला प्रेरित केलें ह्मणून त्यानें आपल्या ह्या जिव्हेनें जगास सांगूं नये !

संभाजीच्या मुख्य प्रधानाची जेव्हां औरंगजेबानें ही दैन्यावस्था केली, तेव्हां आतां संभाजीस स्वतःच्या जिवाबद्दल आशा करण्याचें कारणच राहिलें नाहीं. त्याची पक्की खात्री झाली कीं, आपल्या सर्व दुष्कृतींबद्दल आपणास देहान्त प्रायश्चित्त येथें खास मिळणार. परंतु, मृत्यूपूर्वीं आपली अवहेलना, मानहानि किंवा छळ होईल ही त्यास कल्पना नव्हती. औरंगजेबानें त्याला उंटावर बांधवून, त्याच्या डोक्यास घुंगुरें आणि लहान घंटा लावलेली एक लांब टोपी घालण्याचा हुकूम केला. मुद्दाम हिंदु राजांची व ब्राह्मणांची चेष्टा करण्यासाठीं ही योजना केली होती. असो. ह्याप्रमाणें ह्या कामी राजपुरुषास उंटावर बसवून, त्याची सर्व लष्करांतून धिंड काढण्याचा हुकूम झाला. घंटानाद मोठ्यानें व्हावा व तो ऐकून तंबूंतल्या लोकांनीं मोठ्या उत्सुकतेनें बाहेर येऊन पहावें, ह्मणून उंटास जलदीनें पळावयास लाविलें. ह्याप्रमाणें ही स्वारी चालली असतां, मध्यें मध्यें संभाजीनें खालीं पडावें व भ्यावें ह्मणून एकदम उंटास वळवीत असत. परंतु दोऱ्या बांधल्यामुळें तो खालीं पडत नसे, पण त्यास हिसके बसून अधिक त्रास होत असे. ह्याप्रमाणें सर्व बादशाही लष्करांतून संभाजीचें प्रदर्शन झाल्यानंतर, ह्या जुलमी औरंगजेबानें त्यास आपल्या समोर ओढीत आणण्याचा हुकूम केला. नंतर त्यानें आपल्यासमोर, त्याच्या शरीराचा अर्धा भाग कुऱ्हाडीनें कापून, त्याचें हृदय बाहेर काढविलें ! ह्याप्रमाणें अत्यंत क्रूरपणानें त्याचा प्राणनाश केल्यानंतर, त्याच्या शरीराचा कोल्ह्याकुत्र्यांनीं समाचार घ्यावा ह्मणून तें एका उकिरड्यावर फेंकून दिलें !! ह्याप्रमाणें विषयलंपट संभाजीस दुसऱ्यांच्या बायकांवर नजर ठेविल्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागलें."

❀ ❀ ❀

## २१. संभाजीचें शिरःपूजन.

श्रीशिवछत्रपतीचा शूर व लहरी पुत्र संभाजी–ज्यानें १६८१ पासून १६८९ पर्यंत महाबळी औरंगजेबाच्या फौजेस दाद दिली नाहीं व व्यसनाधीनतेमुळेंच जो औरंगजेबाच्या हातीं लागला–त्यास औरंगजेब बादशाहानें क्रूरपणानें हाल हाल करून ठार मारलें, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. तुळापूर येथें संभाजीस ठार मारल्यावर त्याचें छिन्नविच्छिन्न केलेलें शरीर व मस्तक कोणीकडे तरी फेंकून देण्यांत आलें. हा जो महाराष्ट्रदेशाचा अपमान औरंगजेबानें केला, त्याचें प्रायश्चित्त त्यास मराठ्यांकडून कसें मिळालें, तें इतिहास सांगतच आहे. तथापि, ही गोष्ट येथें सांगणें अगत्य आहे कीं, औरंगजेबानें तोडून टाकलेलें संभाजीचें मस्तक तुळापुरच्या लोकांनीं नेऊन पुरलें, व त्यावर समाधि बांधून त्यांनीं शिवाजीच्या पुत्राचा सन्मान केला. त्या ठिकाणीं व आसपासच्या गांवीं त्याच्या मस्तकाच्या प्रतिमा देवळांत ठेवून लोक त्याची पूजा करितात. ह्यावरून त्या ऐन वधाच्या प्रसंगीं मराठ्यांच्या अंतःकरणवृत्ति कशा झाल्या असतील, ह्याबद्दल अनुमान करितां येतें.*

❀ ❀ ❀

## २२. उंडतरुमाल.

पूर्वीं मराठी राज्यांत, हिंमतबहाद्दर, हंबीरराव, हुकमतपन्हा, विश्वासराव वगैरे किताब होते; तसाच 'उडतरुमाल' हा एक किताब होता. परंतु हा किताब वरिष्ठ जातींच्या लोकांकरितां योजिलेला नसून, महार, मांग वगैरे हलक्या जातींच्या लोकांकरितां योजिलेला होता. शिदनाक महार वगैरेसारखे जे हलक्या जातींचे लोक बहादुरी करून दाखवीत, त्यांस हा किताब असे. हा किताब ज्याला असे, तो बाहेर निघाला असतां, त्याच्या दोहींकडे त्याचे दोन नोकर, स्वच्छ पांढरे हातरुमाल हातांत घेऊन, चौरीप्रमाणें त्याजवर उडवीत चालत असत. ह्या अधिकाराबरोबर त्यास कांहीं नेमणूकही सरकारांतून मिळे. अशा सरदारास 'उडतरुमाल' असें ह्मणतात.

❀ ❀ ❀

* संभाजीबद्दल पेशव्यांचे वेळींही आदरबुद्धि असल्याचा दाखला सांपडतो. कसबे संगमेश्वर तालुके रत्नागिरी येथें संभाजी ज्या राजवाड्यांत राज्य करीत होता, त्याच्या चौथऱ्यावर सदाशिव दादाजी नामक एका इसमानें घर बांधिलें. त्याबद्दल संगमेश्वरकर जोशी मंडळीनें हरकत घेतली व पेशव्यांच्या कानापर्यंत तक्रार नेली. तेव्हां पेशव्यांनीं महिपतराव कृष्ण सरसुभेदार यांस आज्ञापत्र पाठवून, संभाजीच्या राजवाड्याच्या चौथऱ्यावरील घर पाडून टाकविलें, व राजवाडा व त्याजवळील बाग सरकारांत घेतली. ही गोष्ट इ. स. १७९० सालीं घडली. (सवाई माधवराव पेशव्यांच्या रोजनिशींतील उतारे, पृष्ठ ४१.)

## २३. त्र्यंबकराव रेटरेकर यांचा इमानी बाणा.

बाळाजी विश्वनाथ पेशवे प्रथम कोंकणांतून हबशांच्या त्रासामुळें देशावर पळून आले. ते प्रथम रामचंद्रपंत आमात्य—त्या वेळचे मराठी राज्याचे कुलमुखत्यार—यांजकडे शागीर्दमंडळींत नौकरीस राहिले. तेथें आपलें बस्तान चांगलें बसत नाहीं असें पाहून, ते दाभाडे सेनापति यांच्या नौकरींत शिरले. त्या वेळीं दाभाडे यांचे कारभारी भिवराव—भिमराव—रेटरेकर हे होते. त्यांची मर्जी दिवसेंदिवस बाळाजी विश्वनाथांवर अधिक अधिक बसत चालली. पुढें पुढें तर यजमान व नोकर हा भेद नाहींसा होऊन, दोघे परम मित्र बनले, व दाभाड्यांच्या पदरच्या मंडळींत बाळाजी विश्वनाथांचें प्रस्थ वाढत चाललें. पुढें त्यांजवर कांहीं संकट आलें, त्यांतून भिवरावांनीं त्यांचे प्राण वांचविले. पुढें बाळाजी विश्वनाथ धनाजी जाधवराव यांच्या आश्रयानें वाढून छत्रपतींचे मुख्य प्रधान झाले. त्या वेळीं भिवराव रेटरेकर मरण पावले. त्यांस *बाजीराव व चिमणाजी असे दोन मुलगे होते. त्यांस त्यांनीं मरणसमयीं बाळाजी विश्वनाथ यांच्या स्वाधीन केलें. पेशव्यांच्या राज्याची अखेर होईपर्यंत, ह्या घराण्यांतील पुरुष पेशव्यांच्या हुजूरपागेंत सरदारी करीत असत. ज्याप्रमाणें पुरंदऱ्यांच्या घराण्याशीं पेशव्यांच्या घराण्याचा घरोबा होता, त्याप्रमाणेंच रेटरेकर मंडळी पेशव्यांच्या कुटुंबांतील समजली जात असे. पेशवाईच्या अखेरीच्या सुमारास एलफिन्स्टन साहेबांनीं जाहीरनामा लाविला कीं, "अमुक मुदतीच्या आंत बाजीराव यांस सोडून जे सरदार आपापल्या ठिकाणीं परत येतील, त्यांच्या जहागिरी त्यांजकडे चालविल्या जातील. न येतील त्यांच्या जहागिरी खालसा होतील." हा जाहीरनामा लागतांच, अष्टप्रधानांतील प्रतिनिधि आदिकरून पेशव्यांच्या बरोबरीचे ह्मणविणारे व पटवर्धनादिकरून पेशव्यांच्या आश्रयानें वैभवास चढलेले बहुतेक सरदार, आपल्या धन्यास सोडून आपापल्या जागीं आले व आपली दौलत सांभाळून राहिले.

त्या वेळीं भिवराव रेटरेकर यांच्या वंशजांपैकीं त्र्यंबकराव रेटरेकर बाजीरावाबरोबर भटकत फिरत होते. त्यांस एलफिन्स्टनसाहेबांचे गुप्त बातमीदार व साह्यकारी बाळाजीपंत नातु यांनीं समजावून सांगितलें कीं, तुमच्या सारख्यांनीं आतां किती जरी खटपट केली, तरी पेशवाई टिकत नाहीं. मग साहेबांच्या मनाप्रमाणें वागून आपली जहागीर कां राखीत नाहीं? उगीच कां दवडतां? त्यावर त्र्यंबकरावांनीं उत्तर केलें कीं, "ही नेकीची गोष्ट नव्हे. कांहीं झालें तरी आमची कुळकर्णाची

* बाळाजी विश्वनाथांच्याच मुलांचीं नांवें भिवराव यांनीं आपल्या मुलांस ठेविलीं होतीं.

खर्डेघाशी व ज्योतिषाची पडशी कोणी नेत नाहीं. ती कायमचीच आहे. आह्मी आपल्या धन्याबरोबर झाडाचा पाला खात हिंडूं व येईल तो हालाझोला सोसूं; परंतु धन्याशीं बेइमान कधींही होणार नाहीं!" अखेरीस पेशवाई बुडाली. रेटरेकरांची जहागीर सर्व गेली. तथापि, त्यांची नेकीची व बाणेदार वर्तणूक मनांत आणून, इंग्रज सरकारानें कांहीं गांवांची जहागीर रेटरेकरांकडे कृपाळु होऊन चालविली आहे व तिसऱ्या प्रतीच्या सरदारांत त्यांची गणना केली आहे. एलफिन्स्टन साहेबांच्या थोरपणाबद्दल जी जुने लोक प्रशंसा करीत, ती अगदीं रास्त असे, ह्यांत शंका नाहीं.

❀ ❀ ❀

## २४. तुकाविप्र.

तुकाविप्र हे सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूर गांवचे जोशी कुळकर्णी. जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. हे लहानपणापासूनच अगदीं विरक्त असत. वासोटा किल्ल्यावर विप्रनाथस्वामी नांवाचे सिद्ध पुरुष राहत असत, ते तुकाविप्रांचे गुरु. विप्रनाथांचें नांव आपल्या नांवापुढें पित्याच्या नांवाप्रमाणें लावून, हे आपल्या नांवाचा उल्लेख करीत. ह्यांचा गुरुबंधु तम्मण्णा ह्मणून एक कर्नाटकी वैष्णव ब्राह्मण होता. त्यानें गुरूच्या आज्ञेवरून जरंड्याच्या डोंगरावर श्रीमारुतीची आराधना केली. तेव्हांपासून जरंड्याचें मारुतीचें स्थान प्रसिद्धीस आलें. गुरूची कृपा झाल्यावर त्यांच्या आज्ञेनें तुकाविप्र हे आपल्या गांवीं रहिमतपूर येथें आले. तथापि प्रपंचांत त्यांचें मन नव्हतें. त्यांचीं बायकोमुलें वगैरे परिवार होता. त्यांचा निर्वाह घरच्या थोड्या शेतीभातीवर होत असे. हे अयाचितवृत्तीनें रांहात. नित्य सुप्रभातीं उठून, कृष्णास्नानास जाऊन, तेथें कृष्णातीरीं दोन प्रहरीं माध्यान्ह-कालची स्नानसंध्या उरकून घरीं यावयाचें, व भोजन झाल्यावर भागवताचें पुराण सांगावयाचें, असा त्यांचा क्रम असे. पुढें कृष्णातीरीं स्नानसंध्येच्या ठिकाणींच हे राहूं लागले. त्यामुळें तेथें त्यांस राहण्यास शिष्यमंडळींनीं मठ बांधून दिला. तेथें आपला परिवार व शिष्यमंडळी ह्यांसह ते राहत असत. त्या वसाहतीस पुढें 'ब्रह्मपुरी' असें नांव पडलें, तें अझून चालू आहे. ह्या ठिकाणीं लोकांचा उपसर्ग फार होऊं लागल्यामुळें ह्यांनीं तारगांवच्या रानांत एके ठिकाणीं बोरीच्या झाडांचें वन होतें, तेथें स्नानसंध्येची जागा केली, व तेथें एकटेच राहूं लागले. त्यास 'बोरवन' असें नांव पडलें.

ह्यांनीं समग्र भागवतावर अभंगरूप टीका केली आहे असें ह्मणतात. ह्यांच्या वंशांत ह्यांचे पुत्रपौत्रादि मोठमोठे नामांकित वेदांतवक्ते, उपदेशक, विद्वान् पुरुष होऊन गेले. त्यांच्या हकीकती रघुनाथ भास्कर गोडबोले ह्यांच्या अर्वाचीन ऐतिहासिक कोशांत दिल्या आहेत. बोरबन येथें तुकाविप्र राहूं लागल्यामुळें त्यांच्या वंशजांस बोरबनकर हें नांव पडलें. ह्यांच्या कुळांतील शेवटचे प्रसिद्ध पुरुष केशवबोवा बोरबनकर हे होत. ह्यांच्या मागें हल्लीं कोणी तसा पुरुष झाला नाहीं. ह्या वंशाकडे अंजनवती नांवाचा एक इनामगांव मोंगलाईंत चालतो व किरकोळ इनामें व नेमणुकाही पुष्कळ आहेत. गृहकलहामुळें ह्या प्रसिद्ध कुळाचें पुष्कळ नुकसान अलीकडे झालें आहे.

तुकाविप्रस्वामींच्या शिष्यमंडळांत होळकरांचा प्रसिद्ध सरदार फत्तेसिंग माने हा होता. हा रहिमतपुरच्या पाटील घराण्यांतील होता. हा आपला यजमान जो यशवंतराव होळकर त्याच्याप्रमाणेंच शूर, कहरी व लुटालूट करणारा होता. दुसऱ्या बाजीराव पेशव्यानें यशवंतराव होळकराचा भाऊ विठोजी ह्यास हत्तीच्या पायाशीं बांधून ठार मारला. ही गोष्ट शिंद्याच्या मसलतीनें घडली होती. त्या वेळीं 'होळकरी दंगा' ह्मणून जो प्रसिद्ध दंगा महाराष्ट्रांत झाला, त्या वेळीं ह्या फत्तेसिंग मान्यानें साताराप्रांतीं अतिशय कहर केला. तेव्हां लोकांनीं तुकाविप्रांची प्रार्थना केली कीं, ह्या त्रासांतून आमचें रक्षण करा. तुकाविप्रांनीं फत्तेसिंग मान्यास बोलावून आज्ञा केली कीं, ह्या प्रांतांतून तुह्मीं निघून दुसरीकडे जावें. त्याबरोबर तो कोल्हापूरप्रांतीं निघून गेला. ह्याप्रमाणें सत्पुरुषाच्या आज्ञेनें लोकांवरचें संकट टळलें.

दुसरा एक भिवजी वीर नामें मराठा पुंड मोंगलाईंत होता. तो ह्यांचा शिष्य झाला. ह्यांच्या उपदेशानें तो पुढें उत्तम सत्पुरुष झाला असें ह्मणतात.

तुकाविप्रांचे कित्येक अभंग तुकारामबोवांच्या अभंगांत मिसळून गेले आहेत. वारकरी लोक ह्या अभंगांस मानीत नाहींत. सुमारें साडेचार हजार अभंगांची जी प्रसिद्ध गाथा आहे, तेवढेच तुकारामाचे अभंग उपलब्ध आहेत, असें वारकरी समजतात. तुकाविप्रांचे अभंगांचे अखेरीस " तुकाविप्र ह्मणे" असें असतें. ह्यांचा ग्रंथसंग्रह त्यांचे वंशजांपाशीं बोरबन व अंजनवती येथें आहे.

* * *

श्रीमंत नानासाहेबांचे सेवेसी त्यांचे मार्फत मालट जाबसाल करितात. चेरीनें चंद्र २२ माहे मजकुरीं सारी जिनसांचा लिलाव केला. तेथें दोन अडीचशें आंग्रेज व पन्नास बाराशें हिंदुस्थानी दरबार व बाजारचे मातबर लोक जमा होऊन खरीद केले. दाहा पंधरा दिवस जाहल्यानंतर सरकारचे दोन्ही खलित्यांचा जाब व मालेटचे पत्राचा जाब व काशीचे साहेबास सरकारचे इमारतीविसीं ताकीदपत्र चेरीसाहेबांनीं आह्मांसी दिधलें. मिस्तर शोरसाहेब गेल्यावर कळलें कीं, बडेसाहेबानें बारा लक्ष रुपयांचा मोहरा नगद याजबरोबर मद्रासेस पाठविले, व ताकिद केली कीं नवाबकडील व तेथील बंदोबस्त करारनामाही करून पुढें विलायतेस जाणें; आणि नवाब-वजिरानें पांच लक्ष रुपयांची हुंडी तफजुल हुसेनखान वकील याचे नांवें, दाहा हजार बंदुका चकमकी, व शंभर तोफा आंग्रेजी, व पांच हजार गोळे, व सात हजार मण बारुत, खरिद करावयास बडेसाहेबांस खलिता पाठविले. त्यावर बडेसाहेबानें नवे गडांतून बंदुका तोफा व गोळे व बारुत खुष खरेदी करून देविले. खान मजकुरानें दोन अडीचशें नाव किराया करून, बडेसाहेबांपासून शंभर तिलंगे व दोनशें खलाशी लोक खबरदारी करितां, व दस्तक राहदारीची घेऊन चंद्र १२ माहे रबिलावलेस रवाना केले. पूर्वी सेवकानें आपले व चिरंजीव गुलाबरायाचें सविस्तर वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. हुजूर विदित जाहलेंच असेल. हल्ली लाचारीमुळें वाटखर्च व सवारी व पोशाक वगैरे सरंजाम कर्जवाम करून तयार केले. चंद्र २६ माहे सफरेस माहाराजांचे सेवेसी रवाना केले, व मागून सरकारचे दोन्ही खलितेचे जाब व मालटचे पत्राचा जाब व काशीवाल्यास ताकिदपत्र चिरंजीवाजवळ पाठविलें; व राजेश्री माहादाजीपंत कुंटे दिवाणजी यांसही पत्र लिहिलें आहे. चिरंजिवानें दिवाणजीची भेट घेऊन पत्रें दिलीं असतील, व चिरंजीव चरणदर्शन जाहल्यावर बडेसाहेबांचें वर्तमान तपसीलवार अर्ज करतील. मद्रासेकडून वर्तमान आलें होतें. तें एका आंग्रेजाची जबानीं मोघम समजलें कीं, टिपू नाईकाचा व यांचा बिघाड जाला. मागून हें वर्तमान तहकीक करून सेवेसी अर्ज केला जाईल. परंतु बडेसाहेब वगैरे लोक बहुत चिंताक्रांत आहेत. सेवक बापदादेपासून पुरातन, खानाजाद व चाकर सरकारचा आहे. वडिलांचा कालक्षेप सालियानेशिवाय चालिला नाहीं. सेवेसी वारंवार वेतनाविसीं विनंति केली. परंतु शेवटीं आपणच धनी समर्थ. मायबाप, करुणाकर, ईश्वरतुल्य आहेत. बहुत काय अर्ज करावी ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. रवाना चंद्र १७ माहे जमादिलाखर."

## लेखांक. २२.

ह्या पत्रामध्यें पुणें मुक्कामीं पेशवे, इंग्रज व निजाम ह्या त्रिवर्गांचा, टिपूच्या विरुद्ध मोहीम करण्याकरितां जो तह झाला, त्याचा उल्लेख आहे. हा तहनामा मंजूर झाल्याचें वृत्त पुण्याचे रेसिडेंट मि. म्यालेट ह्यांनीं ज्या वेळीं कलकत्त्यास कळविलें, त्या वेळीं गव्हरनरजनरलसाहेबांची स्वारी बहुत प्रसन्न होऊन, त्यांनीं लाला सेवकराम ह्यास पोषाख बक्षीस दिला. त्याची किंमत हजार बाराशें रुपये होती.

**श्रीरामचंद्र प्रसन्न.** ता० १० जुलई इ. स. १७९०.

"श्रीमंत पेशवासाहेबः—

सेवेसी विनंति व अर्ज ऐसीजेः– बडेसाहेबानें दोन महिनेपासून मशहूर केलें होतें कीं, नवा करारनामा करून मदतेकरितां पन्नास हजार फौज आह्मांसी राजश्री परशरामभाऊबरोबर देनार आहेत, व आह्मांसी दोनचार वार दरबारांत हेच मजकूर सांगितले. याजवर सारे दरबार व साहूकार व मातबर बंगाली लोक बोलूं लागले कीं, पेशवासाहेब आंग्रेजांपासून फौजेची मदतपैकीं चाळीस पन्नास लक्ष रुपये घेतील, व कंपनीमध्यें रुपये नाहींत. यास्तव सारे शहरांत हेच निश्चय होता कीं, श्रीकाशीजी घेऊन मदत करतील. छ २२ माहे सवालेस चेरीसाहेबानें आह्मांस बोलावून बडेसाहेबांचे जुबानीं सांगितलें कीं, मालटसाहेबानें श्रीमंत नानासाहेबांची मार्फत पेशवासाहेबांचा करारनामा दस्तखत व मोहरेनिसीं घेऊन, आपले नांवें करार सरकारांत लिहून दिधला कीं, पंचाहत्तर दिवसांत बडेसाहेब व कौसली लोकांचे दस्तखतसहित करारनामा कलकत्त्याहून आणावून देऊं, व आपले नांवाचा करारनामा माघारे घेऊं ऐसे बोलले; व सरकारचे करारनामेची नक्कल जे आली होती ती आह्मांसी दाखविली; व बडेसाहेब तुह्मांस खुशीचा पोशाक देतील हेंही सांगितलें. छ २५ चेरीसाहेबानें आह्मांसी बोलावून बडेसाहेबांजवळ घेऊन गेले. बडेसाहेबानें बोलले कीं, तुह्मीं नवा करारनामा वाचून पाहिला. याजमुळें पेशवासाहेबांचा सरकारचा मुलूक टिपूकडोन खलास होईल. आह्मी बोललों कीं, सध्यां आपले मुलकांत टिपूमुळें बहुत हंगामा आहे. श्रीमंत पेशवासाहेबांचे सरकारची फौज व नवाब निजामअल्लीखान यांची फौज एक जहाल्यावर टिपू आपला मुकाबिला करणार नाहीं. चिनापट्टण व बंगालचे मुलकांत बहुत दिलजमाई होईल. आजपावेतों दक्षणची फौज व कंपनीची फौज एकत्र होऊन दोन्ही मुलकावर गेले नाहीं. ईश्वरकृपेनें दोन्ही सरकारची दोस्तीची वृद्धि सारे मुलकांत रौशन जहाली. याजवर बहुत खुश होऊन, सात वस्त्रांचा पोशाक कारचोबी व सरपेंच व जिगा जवाहिर व मोत्यांचा कंठा आह्मांस दिधला. आह्मी बोललों कीं, हिंदुस्थानचे मुलकांत सारे सरदार लोकांची हेच रीत आहे. परंतु आपण मालटसाहेबांचे विसीं सरकारचा आज्ञापत्र आमचे नांवें आला होता. त्याजवरही आपण कांहीं सांगितलें नाहीं. हंसून बोलले कीं, विलाईतचा जाब आल्यावर तुह्मांसीं सांगूं, व हे खुशीचा वर्तमान श्रीमंतसाहेबांचे सेवेसी लिहून आमचे हवालें कराल तर उत्तम; नाहींतर आपले काशीदजोड्यांबरोबर लौकर पाठवावें, व अत्तरपान देऊन रुखसत केलें. साष्टीचे किल्ल्याचा वर्तमान यांनीं कांहीं सांगितलें नाहीं, व करारनामेमधीं कांहीं लिहिलें नव्हतें. परंतु साहुकारेमध्यें ऐसें कळलें कीं, पहिले मालटसाहेबानें साष्टीचा किल्ला सरकारांत खालीं करून दिधला. मागून करारनामा घेतला. बडेसाहेबानें पोशाख व जवाहीर दिधला. हजार बाराशें रुपयांचा माल आहे. या लोकांत महाराजांचे चरणारविंदाचा अहोरात्र स्मरण करून राहतों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २३.

ह्या पत्रामध्यें इ. स. १७९० सालच्या राजकीय घडामोडींचा वृत्तांत आहे. ह्या वर्षी मद्रास इलाख्यांत टिपूशीं लढाई चालू झाली होती. त्यासंबंधाच्या कलकत्त्यास आलेल्या बातम्या दिल्या आहेत. त्यामध्यें पुढील एक मौज़ेची गोष्ट दिली आहे. 'चिनापट्टणच्या लढाईची जो कोणी वार्ता बोलेल, त्यास मातबर असल्यास पन्नास रुपये दंड व गरीब असल्यास पंचवीस वेत मारावे.' अशी गव्हर्नरजनरल साहेबांनीं कलकत्त्यास दंवडी पिटविली होती!

**श्री रामचंद्रो जयति.** ता. १४ जुलई इ. स. १७९०.

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी—

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति ऐसीजे, आपले कृपेंकरून येथें कुशल असे व स्वकुशल आनंदवैभव लेखकास लिहावयाची आज्ञा जहाली पाहिजे. विशेष:—पूर्वी दोन खलिते व विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानाचें कासीदजोडी आजुरदाराबरोबर चंद्र १७ माहे जमादिलाखर चैत्र वद्य ४ चतुर्थीस सेवेसी रवाना केलें. हुजूर विदित होईल. हल्लीं वर्तमान ऐसें जें, बडेसाहेबानें चंद्र १७ माहे मजकुरीं करनेल कॉकरेलसाहेबास डांकेवर मेदनीपुरास रवाना करून, बहुत ताकिद केली कीं, कटकच्या वाटेनें कोणी गांवास उपद्रव न देणें. खबरदारीनिशीं जावें, व मिस्तर फास्तरसाहेब व मिलेटीसाहेब या उभयतांस चार हत्ती व दाहा उंटें व पंचवीस घोडे व पांच डेरे व पन्नास हजार रुपये नगद खर्चास व दोन कंपनी तिलंगे; व राजेश्री रघोजी भोंसले यांस खलिता व शिरपेंच व जिगा व मोत्यांचा कंठा व पंचवीस ठाण मलमल व पंधरा ठाण जामदानी बुट्टेदार व किमखाब व दुशाले व रुमाल शालाचे व विलायत व चीनचे तोफे, ऐशा पांच पेट्या व वीस पंचवीस हजार रुपयेंचा ऐवज बरोबर देऊन, चंद्र २० माहे मजकुरीं कटकचे वाटेनें नागपुरास रवाना केलें, व परभारें कळलें कीं, बडेसाहेबानें सात लक्ष मोहरा मिस्तर मशारनिलेबरोबर मोघम देऊन ताकिद केली कीं हे गोष्टी तेथें कोणास न कळावी. सालजाबाचा रंग पाहून आह्मांस लिहिणें. आह्मी कोसल करून जें लिहूं त्याप्रमाणें वर्तणूक करणें. फरुकाबादची दोन पलटण त्यांजमध्यें पांचशें गोरे आंग्रेज शिपायी व दीड हजार तिलंगे चंद्र २४ आचानकास आले. चंद्र २६ रोजीं बडेसाहेब व करनेल राससाहेब स्वार होऊन हजरी पाहावयासी गेले. तेथें अडिचसें तिलंगे व पन्नास गोरे गणतीमध्यें कमी जाहले. पलटणाचे करनलानें सांगितलें कीं, चिनापटनची लढाई ऐकून पळून गेले. बडेसाहेबानें एक तिलंगे पुरातन चाकर निवडून व दरमहा अधिक करून बहुत दिलजमई केली; व मेदनीपुरास पाठविले. राजारामपंताचे पुत्रानें बडेसाहेबांचे पत्राचा जाब लिहिला कीं, काकरेलसाहेबास ताकिद करणें. जो वाटेमधें कोणी गांवास उपद्रव

न लावून आमचा जमादार कृष्णाजी नामें तीन हजार प्यादेनिशीं बलेसर बंदरावर आहे; जे वाट दाखवील ते मार्गानें जावें. जनरल मेडससाहेब–जे मुंबईहून चिनापट्टनचे बडेसाहेब होऊन आले, त्यांनीं लिहिलें कीं टिपूनाईकानें फौजेची तयारी बहुत केली. आह्मी आपले जागां फौजेनिशीं सावध आहों. परंतु पोटगी व खुराक व बारूत व गोळे व खर्चाची बेगमी व फौजेची मदत वरचेवर करीत जावें. त्याजवर बडेसाहेबानें पांचशें गोरे फरुकाबादचे व आणिक जागाचे एकूण दीड हजार गोरे जमा करून, व दोनशें मण गल्ला वगैरे सरंजाम जहाजावर गोरेसहित भरून, चंद्र ८ माहे रजबेस चिनापट्टनासी रवाना केलें. तेथें चार सेर आणविला. तों एक दिवशीं बडेसाहेबानें आह्मांस पुशिलें कीं पुण्याची खबर कोणते महिनेपावेतों कळली? आह्मी बोललों कीं दोन महिने जहाले; श्रीमंत पेशवासाहेब व नानासाहेब सुखरूप व खुशाल आहेत ह्मणून खबर आली होती. त्याजवर बडेसाहेब बोलले कीं, श्रीमंत पेशवासाहेब व नानासाहेब मेहरबानी करून मालेटसाहेबाचे घरासी आले होते. आह्मी बोललों कीं आपले लिहिल्याप्रमाणें श्रीमंतांसी बोलाविलें असेल. बडेसाहेब बोलले कीं मालेटसाहेब आह्मांकडून मुखत्यार आहेत व मरहट्ट (मराठी) बोली साफ बोलतात. ऐसे कामास काय पुसतील? बडेसाहेबानें सारे शहरांत दंवडी फिरावयाचे हुकूम केले. जो कोणी चिनापट्टनची वार्ता बोलेल, अगर मातबर असला तर पन्नास रुपये गुन्हेगारी घेणें. नाहींतर पंचवीस कैद मारावे. चिनापट्टनची पक्की खबर बडेसाहेबास येती; आणिक लोकांस कळत नाहीं. आंग्रेजानें आपली जागा बहुत प्रकारें बारूत व गोळे व फौजेची तयारी केली आहे. बडेसाहेबानें दोन जोडी हरकारेची टिपूनाईकाचे लष्करांत खबर आणावयासी पाठविली होती. त्यांनीं येऊन तेथील तयारीचें वर्तमान सविस्तर सांगितलें कीं, दहा हजार पलटन फरासिसी व याचप्रमाणें आरब व हबशी व रूमी व रोहिले व हिंदुस्थानी व करनाटकी वगैरे पलटणें व तोफखाना व चाळीस पन्नास हजार स्वार ऐसे दोन लक्ष स्वार व प्यादेची जमीयेत टिपूबरोबर आहे. याजवर बडेसाहेब, कौंसल लोक, व आणिक मातबर आंग्रेज व बंगाली आपली जागां बहुत विस्मित होऊन, अहोरात्र हेंच मनसुबा व विचार करितात. राजेश्री रघोजी भोंसले नागपूरवाले यांनीं ताकिदपत्र आंग्रेजी फौजेची रवानगीविशीं व राहादारीची दस्तक व खलित्याचे जाब बेणीरामपंताचे मार्फत चंद्र १५ माहे रजबेस बडेसाहेबांजवळ पाठविले. बडेसाहेबानें तेच समयीं दस्तक राहादारीची व ताकिदपत्र करनेल काकरेलजवळ रवाना करून लिहिलें कीं, पत्रदर्शनीं कूच करून सत्वर जाणें. करनेल मजकूर दीड महिनेपावेतों ताकिदपत्र व दस्तकची वाट पहात होते. खलितेचा मजकूर ऐसे कळला कीं, आह्मांकडील वकील तुह्मांजवळ हजर असतां, खलिते परभारें पाठवितां ही गोष्ट बरी दिसत नाहीं, व लोकांमध्यें सुबकी बहुत आहे. परंतु हें काम त्वरेचें. यास्तव तुमची दोस्ती व इखलासवर नजर करून, खलितेचा जाब व दस्तक राहादारीची व ताकिदपत्र बेणीरामपंताचे मार्फत पाठविलें. बडेसाहेबानें पत्रदर्शनीं बेणीरामास

बहुत ताकिदेनें लिहून बोलाविलें, व डंकिनसाहेबास लिहिलें कीं सत्वर रवाना करणें. बेणीरामपंतानें सात आठ वर्षेंपासून दरबार सोडून काशीवास केला आहे. परंतु विश्वंभरपंत, लहान बंधु मशारनलेचे, श्रीगंगाजीस नवें पाणी आल्यावर कलकत्त्यासी येतील. बडेसाहेबानें चेरीसाहेबाचे जबानीं आह्मांस पुसिलें कीं, 'तुह्मीं श्रीमंत पेशवासाहेबांचे सेवेसी येथील अदालतीविसीं काय लिहिलें? श्रीमंत नानासाहेबानें मि. मालटसाहेबास बहुत ताकिद केली. आह्मांसी कां सांगितलें नाहीं?' आह्मी बोलिलों कीं चेरीसाहेबास पांच सात बार आह्मीं सांगितलें जे, अदालतचा रंग बहुत बारीक. यास्तव हिस्टीनसाहेबानें आह्मां लोकांविसीं अदालतीचा बंदोबस्त केला होता, तो राहिला नाहीं. आपण बडेसाहेबांस सांगून त्याचप्रमाणें करून देणें. चेरीसाहेबानें सांगितलें नाहीं व जाबही देत नव्हते. यास्तव आह्मीं लाचार होऊन, श्रीमंतसाहेबाचे सेवेसी लिहिलें. चेरीसाहेबाचें सालजाबमध्यें तोंड उतरून गेलें; व खफीफ बहुत जाहाले. बडेसाहेबानें नवाबवजिरास लिहिलें होतें कीं, आह्मांस ये समयीं खर्चाची ओढ बहुत आहे. यास्तव पंचवीस लक्ष रुपये मदतखर्च व दाहा हजार स्वार व पांच पलटणें तिलंगे सत्वर पाठवावे. नवाबवजिरानें जाब लिहिले कीं, ये प्रांतीं दक्षिणचे सरदार बहुत फौजेनिशीं जमा जाहले आहेत, व हरेकचा मनसुभा वेगळा, व आपण एक कंपू तिलंगे व आंग्रेज लोकांचा कलकत्त्यासी बोलाविला., यास्तव, आह्मीं मागें पुढेचा विचार मनास आणून व फौज पाठवावयाची मसलत न जाणून फौज पाठविली नाहीं. सध्यां हरेक प्रकारें हुंडी वीस लक्ष रुपयांची पाठविली आहे.. तर आपण मेहेरबानी करून रुपये देऊन पावल्याची रसीद लिहिणें. चेरीसाहेबानें बोलिलें कीं, श्रीमंत पेशवासाहेबानें कासिदाची डांक चिनापट्टनपावेतों राजेश्री गोविंदपंतकाकाचे मार्फत बसविली आहे. तुह्मांजवळही पाठवितील. आह्मी बोलिलों कीं, श्रीमंत पेशवासाहेबांची सरकारासी व महंमदअल्लीखानची दोस्ती व इखलास कदीम आहे. हल्लीं टिपूनाईकाचे हंगामेकरितां डांक बसावयाचा हुकूम दिला असेल, अगर येथेंही पाठवितील. तर धनी समर्थच आहेत. चंद्र १ माहे रमजानेस बडेसाहेबानें सांगितलें कीं, मालटसाहेबानें श्रीमंत नानासाहेबांचे सेवेसी इखलास व आर्जव करून बहुत सुखवक्त व रजामंद राखतात. नवा करारनामाही होईल. परंतु हे दिवसांत मालटसाहेब बहुत आजारी आहेत. आराम जाल्यावर नवे करारनामेचा जाबसाल दरपेश करतील, व दुसरे दरबारांत सांगितलें कीं, श्रीमंतानें कृपा करून राजेश्री परशरामभाऊ यांस आमचे मदतीकरितां हुकूम दिधला. आमचीं दोन पलटण फौज मशारनिलेबरोबर टिपूचे मुलुखास येतील. आह्मी बोललों कीं ईश्वर करो, जो उभयतां सरकारची दोस्ती व इखलास रोज बरोज वाढो. परंतु चिनापट्टनची खबर कांहीं कळत नाहीं. सांगूं लागले कीं, जनरल मेंडससाहेब, आपणच तीन कंपू फौज जमा करून, टिपूचे पारपत्याकरितां बाहेर निघाले. मजल दरमजल पुढें जातात, व टिपूनें राजाचे मुलखाचा बंदोबस्त करून पुढें चालला आहे, व आह्मांकडूनही मेंडससाहेब त्रिचना-

पल्लीपावेतों गेले आहेत. टिपूनाईकाची आंग्रेज लोक दहशत बहुत मानतात. पैसा यांजवळ नाहीं. यास्तव बंगालेचे मुलुखांत जुलूम बहुत मांडिला आहे. नवाब मुबारकदौला व मुजफरजंग व मनीबेगम व आणिक जमीदार लोकांनीं गंज व बाजार व हाट वस्ती करून त्याचा नफा पहिलेपासून खात होते, ते सारे बंद करून एक करोड रुपये नफा नवा पैदा केला, व आंग्रेज लोक सारे मुलुखांत तहसील करितात. अगर कांहीं बाकी राहिली तर जमिदारची जमिदारी विक्री करून रुपये घेतात. डंकिनसाहेबानें श्रीकाशीजीमध्यें ब्रह्मोत्तर व रोजआलतमगा व खैरात वगैरे बंद करून पंचवीस लक्ष रुपयेची जमा बडेसाहेबांस लिहून पाठविले. बडेसाहेबानें हे गोष्टीची कौसल करून जाब लिहिलें कीं, पांच लक्ष रुपयेची दामाशाही करून त्या लोकांसीं देणें; व बाकी वीस लक्ष रुपये सरकारांत पाठवावे, व कलकत्त्याचे मातबर बंगालीयांपासून एक करोड रुपये मागतात. शहरची घरगणती करतात. पुढें काय करतील ते सेवेसी निवेदन करूं. चिरंजीव गुलाबराय सात महिने जाहले, सेवकासी रुखसत होऊन गेले. चरणदर्शनाचा लाभ घेतलाच असेल. येथील सविस्तर वर्तमान दरबारचा अर्ज करतील. महाराजांनीं मायबापप्रमाणें कृपाळू होऊन व सेवकाचे वृद्धावस्थेवर नजर देऊन चिरंजिवास रवाना केलें; परंतु दैवगतीनें त्याचें राहणें जाहलें नाहीं. हल्लीं विनंति ऐसीजे, चिरंजिवासी कांहीं फरमायशचा हुकूम देऊन सेवकाजवळ रुखसत करावें. धनी समर्थ ईश्वरतुल्य जाणून हे विनंति केली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. रवाना चंद्र १ माहे जिल्काद आषाढ शुद्ध तृतीया."

## लेखांक २४.

ह्या पत्रामध्येंही टिपूच्या युद्धासंबंधाच्याच बातम्या मुख्यत्वेंकरून आहेत. चिनापट्टणच्या युद्धाच्या बातम्या कलकत्त्याहून लाला सेवकराम किती चौकसपणानें पाठवीत असे, हें चांगलें दिसून येतें.

श्रीरामचंद्रो जयति. ता. ११ नोवेंबर १७९०.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत करून व चरणकमल वंदून विनंति ऐसीजेः—येथील कुशल असे व स्वकुशल आनंदवैभव लेखकास लिहावयाची आज्ञा जाहली पाहिजे. विशेषः—बहुतां दिवसांनंतर आज्ञापत्रीं विनंतिपत्राचे जाब चिरंजीव चिमणलालचे मारफत पावले. सेवकाची सरफराजी जाहली. पूर्वीं चंद्र १ माहे जिलकादेस विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानचें व सरकारचा नवा करारनामा जाहला तो येथें आला. याजमुळें बडेसाहेबानें महाराजांची खुशी खातर करितां एक पोशाक व जवाहीर सेवकास दिधलें. काशीदजोडी आजुरदारबरोबर खिजमतींत रवाना केले, ते हुजुरांत विदित जाहलेंच असेल. हल्लीं वर्तमान ऐसीजेः—पहिलेंपासून श्रीगंगाजीचे पार कंपनीचा बाग वीस बिघे नवे गढाचे मुकाबिले होता. तेथें दुसरा गढ

मुकाबिल्यावर नवे तयार करावे म्हणून बडेसाहेबानें बाग कापावयाचा हुकूम दिधला. झाडें कापून शहरांत विक्री होतात. चंद्र २० माहे मजकुरीं विलायतचा जहाज आला. त्याजमध्यें सात सात संदूक कागदाचे होते. त्यास आंग्रेज लोक 'पाखट' असें बोलतात. जहाजचा करनेल बडेसाहेबांजवळ येऊन भेटला. जुबानीं विलायतचें सविस्तर वर्तमान बोलून निरोप घेऊन जहाजावर गेला. मग बडेसाहेबानें ते संदुका कौसलघरांत दाखल केले. हे जहाजांत पंचवीस किराणी लोक व चाळीस करनेल व कपतान व सौदागरी माल आहे. चेरीसाहेब व आणिक लोकांची जुबानीं ऐसें कळलें कीं, याजप्रमाणें सात जाहाजांवर मातबर आंग्रेज लोक वगैरे माल सौदागरी आहे. ते एकामागें एक येतात. त्यांजपैकीं एक जहाज जवळच आला आहे त्याजमध्यें सातशें गोरे आंग्रेज शिपाई येणार म्हणून बडेसाहेबानें पुढें लिहून पाठविलें, कीं गोरे लोक व आणिक सरंजाम लढाईचा चिनापट्टणेस उतरून सौदागरी माल वगैरे कलकत्त्यास···· जावें. जनरेल मेडससाहेब चिनापट्टणाहून पांच···मजल पुढें टिपूनाईकाचे मुकाबिलेकरितां गेले. त्यास लिहिलें आलें कीं दाहा हजार फावडें, व सात हजार दाव झाड कापावयाचे, व बारुत व गोळे व खुशकीचा गल्ला व मदतखर्च वरचेवर पाठवावे. चंद्र २२ माहे मजकुरीं मिस्तर कमेडोर कार्नवालीस—बडेसाहेबांचे लहान बंधु—चिनापट्टणाहून कलकत्त्यासी आले. बारा जहाज जंगी कंपनीकडून समुद्राची वाटेची खबरदारीकरितां यांचे स्वाधीन आहेत. बडेसाहेबांसी भेटून जहाजाचें वर्तमान सविस्तर सांगितलें. त्याजवरून बोललें कीं, टिपूनाईकाचेही पंधरा जहाज जंगी समुद्रांत आहेत. परंतु त्यांनीं आंग्रेजी निशाण उभें करून दोन तीन जहाज आंग्रेजांचे मारले. कमेडोरसाहेब आपली जागा खबरदार होऊन टिपूनाईकाचे तीन जहाज मारून एक जहाज कलकत्त्यासी आणिलें. बडेसाहेबानें चेरीसाहेबाचे जुबानीं आह्मासीं बोललें कीं, राजश्री परशरामभाऊ कृष्णानदी पार उतरले. आह्मीं पुण्याची खबर पुसली. त्याजवर बोलले कीं, श्रीमंत नानासाहेब श्रीगंगागोदावरीचे स्नानाकरितां टोक्यास गेले. टिपूचा वकील राजश्री हरिपंततात्या व राव रास्ते व आप्पा बळवंतराव यांनीं श्रीमंत पेशवासाहेबांची मुलाजमत करवून कागदपत्र गुजरानविले. एक प्रहरपावेतों खिलवत केली. आह्मी बोललों कीं, श्रीमंतांचे दरबारप्रमाणें दक्षिण व हिंदुस्थानांत कोणी दुसरा नाहीं. तेथें दोस्त व दुशमनचे वकील बहुत येतात; परंतु हरेकचा सालजाब त्याचप्रमाणें होतो. नवे कारारनामेशिवाय दुसरें कांहींएक होणार नाहीं. श्रीमंत नानासाहेब एकवचनी आहेत. पहिले कोणासी दोस्ती करणार नाहींत. परंतु दोस्ती जाल्यावर अंतर देणार नाहींत. राजश्री हरिपंततात्यांसही दुसरें न बळखावें. शरीर दोन परंतु चित्त एक. यांत कांहीं दुसरा विचार नाहीं, व रावरास्ते वगैरे सरदारांस मर्जीशिवाय दुसरें कांहींएक बोलावयास सामर्थ्य नाहीं. हे गोष्टीविषयीं आपण पुरतेपणें खातरजमा असूं द्यावी. तिसरें दरबारांत बडेसाहेबांसी आह्मीं पुसलें कीं, टिपूनाईक व जनरेल मेडससाहेबाची खबर काय आहे? त्याजवर बडेसाहेब

बोलले कीं, मेडससाहेब टिपूचे सरहद्देवर जाऊन एक गंज नवे वस्ती केली, व तेथें एक पलटण फौज तिलंगे वगैरेंची तैनात केली, व पंधरा दिवस मुक्काम करून पुढें गेले. दाहा पंधरा गढी व कंतूरचा किल्ला व पन्नास लक्ष रुपयांचा मुलूक टिपूपासून घेऊन अंमल केला. टिपू श्रीरंगपट्टणांत आहे कीं कोठें आहे, हें कळत नाहीं. शहरचे अरमनी व पारसी सौदागर लोक व साहुकार व बंगाली आपली जागां असें बोलतात कीं, टिपूनें बलात्कारें आंग्रेजाची फौज आपले मुलकांत बोलाविली व पंचवीस हजार स्वार आरकाटांत लूट करावयास पाठविले. करनेल काकरेलसाहेब—जो कलकत्त्याहून बडेसाहेबानें आठ पलटण देऊन मेडससाहेबाची मदत करितां व आणिक सरंजाम जंगी बरोबर देऊन रवाना केले होते,—यांची व टिपूचे फौजेची वाटेंत गांठ पडली. लढाई मातबर जाली. शेवटीं कॉकरेलसाहेबानें ह्याची लढाई भारी जाणून दोन पलटणांनिशीं चिनापट्टणासी आले, व टिपूचे लेंकानें पंचवीस कोसांची छावणी करून, मेडससाहेबाचे लष्करावर छापा घातला. साहेबमजकूर तीन मजल माघारे येऊन नवे गंजाजवळ छावणी केली. बडेसाहेबानें सात हजार फावडे, व तीन हजार दाव झाडें कापावयाची, व कुदाळ, व चारशें गोरे आंग्रेज शिपाई, व दाहा लक्ष रुपये नगद व दोन लक्ष मण गल्ला, खुराकी, दोन हजारांवर तयार करून, चंद्र २५ माहे जिल्हेजीस मिस्तर कमेडोर कार्नवालीस-साहेब याजबरोबर देऊन चिनापट्टणासी रवाना केले. परंतु टिपूची मर्दानगी व दिलेरी पाहून हे आपलें चित्तांत फार भय मानून आहेत. नवाबवजिरापासून पूर्वी यानें खर्चास व फौज मदतेसी मागितली होती. त्यासी त्यानें खर्चास मात्र दिलें व फौजेक-रितां मागें घेतलें. याजकरितां आतां मदत मागावयासी संकोच करतात, व आपले जागा फार चिन्ताक्रांत आहेत. बालाघाट व पाइनघाट टिपूचे मुलकांत आहे. टिपूनें पूर्वी पाइनघाटाची वस्ती सारी वैरान केली, व आपण बालाघाटावर तमाम फौजेनिशीं तयार आहे. त्यानें बाणांचा संग्रह फार केला आहे, आणि मरायासी सिद्ध जाहला आहे. याजकरितां त्यासी हे फार भयाभीत आहेत. परंतु सरकारचा नवा करार-नामा ज्ञाला, याजवर बहुत दिलजमई जाली. सारांश, सरकारची मदतीशिवाय याचेनें टिपूनाईक सर होणार नाहीं असें कळतें. पुढें कार्तिकमासीं लढाईचा आरंभ होणार. शेवटीं, बडेसाहेबांचे चित्तांत आहे कीं, फारच अडचण जाली तरी आपणही जहाजावर बैसून चिनापटणासी जावें. ऐसा निश्चय आहे. राजश्री सदाशिवपंत, राजा चेतसिंगाचे वकील, राज्यभ्रष्ट जाल्यापासून कलकत्त्यांत आहे. सारे कौसली लोक व सारे आंग्रेज मातबर यांची बहुत खुशामद केली व करितो, व तीस चाळीस हजार रुपयेही खर्च केले; परंतु कांहीं ठिकाण लागत नाहीं. हल्लीं आंग्रेज लोकांनीं बहुत आर्जव करून सरकारचा नवा करारनामा करविला व मदत मागितली. ही खबर राजा चेतसिंग श्रीकाशीवालेस कळतांच, आपले वकिलास लिहिलें कीं, आम्हां-कडून लाला सेवकरामची मार्फत श्रीमंत पेशवासाहेब व नानासाहेबांचे सेवेसी बहुत कर जोडून विनंति लिहावी कीं, आमचें राज्य गेलें; श्रीमंतांचे कृपेंकरून प्राप्त

होईल. श्रीमंतसाहेबांशिवाय दुसरा आसरा नाहीं, व हे वक्त आंग्रेज लोक सरकारचे बहुत काबूमध्यें आहेत. सेवकानें राजेमजकूरचे लिहिलेप्रमाणें सेवेसीं अर्ज लिहिली. जर धनीची मर्जी या कामावर असली, तर आज्ञा जाल्यास वकील-मजकुरासीं बोलून याचा बंदोबस्त होईल. चंद्र १० माहे सफरेस खबर आली कीं, जनरेल मेडससाहेब यांनीं टिपूनाईकाचे मुलकांत,-त्यास पाईनघाट बोलतात-तेथवर जाऊन अंमल केला; व टिपू आपली सारी फौजेनिशीं बालाघाटावर आहे. मुकाबिला पंचवीस कोसांचा राहिला त्याजवर टिपूनें सात हजार तिलंगे व पांच हजार स्वार जनरेलचे पुढें पाठविले. जनरेलनें पांच हजार तिलंगे व पांचशें गोरे त्याचपुढें रवाना केले. दोन्हीकडून लढाई सक्त जाली. टिपूचा एक सरदार व सातशें तिलंगे मारले गेले. आंग्रेजाकडील दोन करनेल व आठ सारजन व अडीचशें गोरे व एक हजार तिलंगे मारले गेले. चार तोफा, आणिक सरंजाम लढाईचा, टिपूचे हातीं लागले, व बाकी लोक पळून आंग्रेजाचे जनरलचे लष्करांत दाखल जाले. मग जनरेल आपणच सारी फौज घेऊन पुढें गेले. टिपूही आपले फौजेनिशीं बालाघाट उतरून आला. लढाईचा तोंड लागला. चंद्र १४ माहे मजकुरीं बडे-साहेबानें दरबारचे दिवशीं आह्मांस पुसलें कीं, तुह्मांकडे पुण्याहून कांहीं खबर अथवा एकही खलिता दोस्तीचा आगर मुसना येत नाहीं, हें काय? आह्मी बोललों कीं, आपल्याकडील वकील मिस्तर मालटसाहेब तेथें आहेत. त्यांचेच विद्यमानें आपण खलितेही पाठवितात; व जाबसालही करितां. आह्मांकडे एकही खलिता देत नाहींत. मग आह्मांकडील सरकारचा खलिता कसा येईल? पहिलें रीत अशी होती कीं, एक मतलबाचे दोन खलिते होत होते. एक आपले वकिलाकडे जात होता, व एक आह्मांकडून सरकारांत पोहोंचत होता. ते रीत आपणच मोडली! मग उगेच राहिले. परंतु असें सालजाब बोलणें दरबारांत बरें दिसत नाहीं. महाराज धनी समर्थ आहेत. याचा कांहीं बंदोबस्त केला पाहिजे. तेच दिवशीं बडेसाहेब बोलले कीं राजश्री परशरामभाऊ धारवाडचे किल्ल्यास लागले आहेत, व आमचे जनरेल्याही मुकाबिला जाला; पुढें ईश्वर काय करील तें खरें? राजश्री महादजीराव शिंदे यांचे खलिते, दुसरीया तिसरीया महिन्यांत, एक दोन बार, भाऊ बक्षीची मारफत पामरसाहेब यांजकडून तेथें असतां भगवंतराव वकील जवळ येतात. यास्तव सेव-काची अर्ज ऐसीजे, कृपा करून एकदा खलिता दोस्तीचा अथवा मुसना जाबसालाचा, चिरंजीव चिमणलालचे विद्यमानें पाठवावयाचा हुकूम करून, सरफराज करणार धनी ईश्वरतुल्य आहेत. पूर्वी बडेसाहेबानें विलायतेस लिहिलें होतें कीं, हें मुलकाची आबहवा आह्मांस रास्त नाहीं. आगर हुकूम होईल तर विलायतेस येऊं. याजमध्यें टिपूचे नवे हंगामेची खबर ऐकून बडेसाहेबानें आपणच निघणें मुकरर केलें. हे खबर-ही विलायतेचे सरदारानें समजून, एकच साहेबावर बडेसाहेबी व जनरेली नसावी म्हणून, बडेसाहेबास लिहिलें आलें कीं, आह्मी मिस्तर जनरेल मेडससाहेब यांस जनरेली

देऊन चिनापट्टणास पाठविलें आहे. जर तुह्मांस तेथील आबहवा बहुत करून रास्त ना आली, तर तुह्मी चार पांच महिने राहून, टिपूची लढाईचा इनफिसाल जाल्यावर, जनरेल मेडससाहेब टिपूची लढाईवर आहेत, त्यास बोलावून कलकत्तेची बडेसाहेबी देऊन विलायतेस येणें. बडेसाहेबांची जनरेली गेली, याजमुळें जरूर जातील. परंतु पुस ( पौष ) मासीं हे गोष्टीची वार्ता जाहीर होईल. अर्जे ऐसीजे, हे वार्ता मिस्तर मालटचे श्रवणीं न पडावी. चिरंजीव चिमणलाल व गुलाबराय चरणावरविंदाजवळ आहेत. सेवकाची व त्यांची परवशी धनीशिवाय दुसरा कोण करणार आहे? पुरातन सेवक, नमक खात आहूं. चिरंजीव गुलाबरायाची रवानगी सेवकाकडे करावयाची आज्ञा केली पाहिजे. सेवकाचें वृद्धपण, याजकरितां अर्जे केली असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. रवाना चंद्र ३ माहे रबिलावल कार्तिक शुद्ध पंचमी."

## लेखांक २५.

हें पत्र नाना फडणविसांनीं लाला सेवकरामास लिहिलेल्या पत्राची नक्कल आहे. लाला सेवकरामास पुण्याहून गेलेलीं सर्व पत्रें उपलब्ध होतील तर फार चांगलें होईल.

श्री. इ. स. १७९०.

"राजेश्री लाला सेवकराम गोसावी यांसीः—

स्नेहांकित बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेषः—तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. बडेसाहेब यांस वस्त्रें पाठविलीं होतीं, तीं गुजरलीं. त्याची व इंग्रजांनीं डांक बसविली याची बहुत खुषी बडेसाहेब यांस जाली ह्मणोन, व राजेश्री तुकोजी होळकर यांजकडील वकील तेथें आला होता, त्यास निरोप दिला ह्मणोन, वगैरे बातमीचा मजकूर लिहिला; तो सर्व कळला. त्यास, डांक बसविल्याचा मजकूर पूर्वीं तुह्मांस लिहिलाच आहे. सरकारांतून डांक बसवावयाची परवानगी दिली नाहीं. सरकारदाखल्याच्या जोड्या भागानगराकडे डांकेस मागितल्यावरून मालिटास दिल्या. सालमजकुरीं टिपूची मसलत, सरकार व नवाब व इंग्रेज त्रिवर्ग मिळोन, करावयाचा ठराव होऊन, परस्परें तहनामे जाले. नवाब फौजसुद्धां कृष्णातीरास छावणीस गेले. मोहबतजंग यांजबरोबर फौज देऊन पार जाण्याकरितां रवाना केलें. सरकारांतून राजेश्री परशरामपंतभाऊ यांजबरोबर पंचवीस हजार फौज व दहा हजार गाडद व तोफखान्याचा सरंजाम देऊन रवानगी केली. तेही कृष्णातीरास जाऊन दाखल जाले. लौकरच पार होतील. तुह्मांस कळावें ह्मणोन लिहिलें असे. होळकराकडील वकील तेथें आला होता. तो कशाकरितां, बोलणें काय जालें, हें तुह्मीं कांहींच लिहिलें नाहीं. तरी लिहून पाठविणें. वरचेवर होईल तें लिहून पाठविणें."

येथपर्यंत लाला सेवकारामाचीं पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं तीं सादर केलीं

आहेत. नोव्हेंबर इ. स. १७९० नंतर लाला सेवकरामाचें पत्र सांपडत नाहीं. ता. ५ दिसेंबर इ. स. १७९३ चें लाला गुलाबराय ह्याचें एक पत्र सांपडलें आहे. ह्या पत्रावरून इ. स. १७९३ च्या आंत लाला सेवकराम मृत्यु पावला असून त्याचा मुलगा कलकत्याच्या वकिलीचें कामकाज करूं लागला असावा असें स्पष्ट दिसतें. इ. स. १७९३ च्या पुढील माहिती मुळींच उपलब्ध होत नाहीं. ह्यावरून, स्थूलमानानें, इ. स. १७७७ पासून इ. स. १७९३ पर्यंत, लाला सेवकराम हा पेशव्यांच्या वतीनें कलकत्ता येथें २५ वर्षें वकिलीवर होता, असें ह्मटलें असतां चुकीचें होणार नाहीं. लाला सेवकरामाचीं जीं थोडीशीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत तीं येथें आह्मीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांवरून अनेक नव्या गोष्टींचा मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश पडतो, हें इतिहासवाचकांच्या लक्ष्यांत येईलच. लाला सेवकारामाचीं आणखी पत्रें उपलब्ध झालीं, तर तीं मोठ्या आनंदानें आह्मी प्रसिद्ध करूं.

लाला सेवकराम ह्यास लाला चिमणलाल व गुलाबराय असे दोन मुलगे होते. चिमणलाल बहुतकरून पेशव्यांचे सन्निध पुण्यास राहत असे. लाला गुलाबराय जाऊन येऊन कलकत्त्यास असे. चिमणलाल केव्हां मृत्यु पावला, तें समजत नाहीं. लाला गुलाबराय आपल्या बापाच्या पश्चात् इ. स. १७९३ मध्यें कलकत्याच्या वकिलीवर होता, असें त्याच्या उपलब्ध झालेल्या एका पत्रावरून दिसून येतें.

## लेखांक २६.

ह्या पत्रामध्यें सर जान शोअर ह्यांची गव्हरनरजनरलच्या जागेवर नेमणूक होऊन, त्यांनीं तो अधिकार स्वीकारल्याची व त्या वेळेस घडलेल्या इतर राजकीय गोष्टींची विस्तृत माहिति आहे. लाला सेवकरामाप्रमाणेंच लाला गुलाबराय ह्याचें पत्रही विस्तृत व तपशीलवार आहे. इ. स. १७९३ नंतर ह्या कायस्थ मुत्सद्याची कांहींच माहिती मिळत नाहीं. कलकत्ता येथील कोणी जिज्ञासू गृहस्थांनीं ह्या पेशव्यांच्या वकिलाच्या घराण्याचा शोध लावल्यास, इतिहासदृष्ट्या महत्त्वाची माहिती त्या घराण्यांत सांपडण्याचा फार संभव आहे.

श्री. ता. ५ दिसेंबर. इ. स. १७९३.

"श्रीमंत महाराज राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित चरणरज सेवक गुलाबराय साष्टांग दंडवत करून व दोन्ही कर जोडून विनंति ऐसीजेः—येथील वर्तमान महाराजांचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे,

व हमेशा खकुशल आनंदवैभव लिहावयाची आज्ञा जाली पाहिजे. विशेषः—पूर्वी विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानचें व सहा खलिते—लाटसाहेब व शोरसाहेब दरबाब आमदन शोरसाहेब व एक खलिता दरबाब मुबारकबादी असे—सात खलिते महाराजांचे खिदमतेंत चंद्र २४ माहे मोहरम सन १२०८ हिजरीस आजुरदार. जोडीबरोबर रवाना केले होते. ते स्वामींचे नजरमुबारकेहून गुजरलेच असतील. त्यास बहुत दिवस जाले. अद्याप विनंतिपत्र व खलितेचे जाब येऊन फिदवीस सर्फराजी जाली नाहीं. चेरीसाहेब मुनशी व शोरसाहेब यानें दोन चारदां खलितेचे जाबाविशीं पुसलें. सेवकानें सांगितलें कीं, आज सबब दुरीराह जाबताहाल आलें नाहीं व लौकरच येतील. आजीबायेस अर्ज ऐसी जे, साहेबानें फैजबकशी करून लवकर जाब पाठवावयाविशीं अहालकारास आज्ञा सादर जाली पाहिजे. दरीविला वर्तमान ऐसीजे, नवाब हसनरजाखान रुबरू एकटे साहेब शोरसाहेबाच्या भेटीस गेले नवते. सबब एक चिठी दरबाब मुलाजिमत आपले कुफरसाहेब व तामसगिरामसाहेब व हेसाहेब शिरस्तेदार कौसली यांस लिहिली. कुफरसाहेबानें आजबायेस आंके खानमोसुफ रुबरू एकटे साहेब भेटीस आले नाहीं. याजकरितां दरजबाब चिठी आजराह उत्तर लिहून पाठविलें कीं, नजलेचे आजारचे बहुत जोर आहे; यास्तव ताकद बसावयाची नाहीं. अगर आपण येतील तर तसदी होईल. जें कांहीं सांगून पाठवाल, त्यास हरएक प्रकारें हजर आहों, व तामसगिरामसाहेब व हेसाहेबानें लिहून पाठविलें कीं, जे समयीं मर्जीस येईल तेव्हां येणें. घर आपलें आहे. चंद्र २५ माहे मोहरम, हसनरजाखान व टिकेतराय तामसगिरामसाहेबाचे घरास जाऊन, एक घटिका खलबत करून, हेसाहेबाचे घरीं गेले. तेथेंही एक घटिका खलबत करून आपले घरास गेले. ऐसें कळलें कीं नवाब मोसुफानें नवाबवजिराकडून लाटसाहेबांस सांगितलें होतें कीं, बनारस आह्मांस इजारेनें द्यावी; व पंचेचाळिस लक्ष रुपये सालीना बाबत दरमाहे कंपू सरकारांत चालत आहे, त्यांत पंधरा लक्ष रुपयें कमी करावे; व मुलुखांत कांहीं ताकत नाहीं. हा ऐवज बेदिकत पोहोंचेल. लाटसाहेबानें बनारसेविशीं जाब दिले कीं, हें काम विलायतेचे हुकुमाशिवाय करतां येत नाहीं. बराय खातरदास्त नवाबवजीर कंपूचे दरमाहेपैकीं दाहा लक्ष रुपये कमी केले, ऐसें सांगून हे गोष्ट इसपकसाहेब व शोरसाहेबांस समजावून कूच करून गेले होते. आजिबायेस नवाब मजकूर बिनारपुख्तगी सालजाब व बडेसाहेब ... शोरसाहेब कलकत्त्यांत आहेत. चंद्र २७ माहे सदर, गुलाम अल्लीखान आजतर्फ नबाबवजीर, बाबत बकरीद, खिलत सात पारचेचा, व शिरपेंच व कलगी व जिगा व मालायेमरवारीद व एक घोडा व एक ढाल व एक तरवार व पालखी झालरदार; बराये हसनरजाखान व खिलत सात पारचेचा व शिरपेंच व जिगा व कलगी व मालायेमरवारीद व पालखी झालरदार; बराये टिकेतराय आणून चितपुरास येऊन उतरले. याजकरितां नवाब मोसुफानें तेथें फरमानबाडी उभी करून

आपण व टिकेतराय तेथें जाऊन खिलत पेहरले, व एक खिलत पांच पारचेचा व शिरपेंच व जिगा व पांचपांचशें रुपये उभयतांनीं खानमजकुरास दिले; व तेथून येतां-समयीं वाटेंत पांचशें रुपये खैरात केले. चंद्र २८ माहे सदर. तीन जहाज फरासीसचे, एक वर्ष जालें कीं आपले विलायतेहून बराय तिजारत गेले होते. ईश्वरइच्छेनें न पुसतां कलकत्त्याहून तीन मजलींवर हिजली बंदराजवळ येऊन लंगर घालून उभे केले. तेथें इंग्रेज बाहादुराकडून तीन जहाज जंगी बिनार चौकी मुद्दाम राहतात. त्यानें ते सौदागिरी जहाज धरून कलकत्त्यासी पाठवून दिले. जहाजावरील गोरे फरासीस उतरून नवे गढांत कैद केले व जहाजावर चौकी अद्याप तैसीच आहे. तेच दिवशीं हसनरजाखान व टिकेतराय नवा गढ पाहावयास गेले. किल्ला पाहून करनेल डेयरचे घरीं येऊन, हजरी जेऊन बैसले होते. ते समयीं टिकेतराय चौकीवरून खालीं पडले व बेहोष जाले. हसनरजाखान जलदीनें जवळ येऊन उठविलें. आपले हातानें वारा करूं लागले. दोन घटका घरीं येत बेहोष होते. मग कांहीं समाधान जाल्यावर पालखींत घालून घरास पाठविलें; व आपणही स्वार होऊन घरास गेले. शोरसाहेब आले, ते समयीं मोचीखोल्यांत उतरले. राहावयाकरितां कलकत्त्यांत आले नाहीं. आणि लाटसाहेब असतां तेथेंच सारे लोक जाऊन भेट करून आले. पूर्वीं सेवकानेंही चेरीसाहेबाचे विद्यमानें, लाटसाहेबांसी पुसलें होतें कीं, सारे वकील वगैरे शोर-साहेबांस भेटून येतात. आह्मांस काय हुकूम आहे? त्यांनीं सांगितलें कीं शोर-साहेब अद्याप आपले कामावर नाहींत. तुह्मीं भेट न घ्यावी. जातांसमयीं आह्मी भेट करून देवूं. लाटसाहेब गेले, तेव्हांही इसपकसाहेबास आपल्याकडून मुतालकी देऊन गेले. मग सेवकानें, चंद्र २९ माहे सदर, एक चिठी जान शोर-साहेबास दरबाब मुलाजिमत आपली लिहून पाठविली. दर जवाब चिठीसाहेब मोसु-फानें सलाम सांगून पाठविले, व सांगितलें कीं उदईक मंगळवारीं जान बस्टूरसाहे-बाचे घरास येऊं. तेथेंच भेट होईल. चंद्र ३० माहे सदर. सेवक स्वार होऊन, जान बस्टूरसाहेबाचे घरीं गेला. तेथें शोरसाहेबांस वर्तमान कळतांच बोलाविलें व चार कदम पुढें येऊन भेटले. फिदवीनें शिरस्तेप्रमाणें नजर दाखविली. साहेब मोसुफानें नजर माफ करून व हातीं धरून जवळ चौकीवर बसविलें. खैरआफियत श्रीमंत साहेब खुदावंत न्यामत व माहाराजांची विचारून, एक घटिका मजकूर दोस्तीचा करून, रुखसत केलें. लाटसाहेब गेल्यापासून इसपकसाहेबानें दरबार केला नवता. चंद्र १ माहे सफर, लालहवेलींत दरबारची जागा आहे, तेथें इसपकसाहेब स्वार होऊन आले. इडमनिष्टीन नायब मिस्तर चेरीसाहेब यानें एक दिवस पुढें याद इसमनविसींची लिहून, साहेब मोसुफास दाखवून सर्वांचे घरीं पाठविली होती. ह्मणून सेवक व विश्वंभरपंत भोंसल्याकडील व भगवंतराव शिंदेकडील व बापु भट सुभेदा-राकडील, व गोकुळचंद चोबे व दीनानाथ उपाध्ये नेपाळवालेकडील, व उत्तमचंद राम-पुरेवालेकडील, रायशिंग जयनगरवालेकडील, व मीर अबदुल लतीफ नवाब बंदेगान

अलीकडील, व सलामुलाखां नवाब वजीराकडील, वगैरे वकील बत्तीस असामी दरबारचे जागा जाऊन हजर जाहले. इसपकसाहेबानें नवाबवजिराकडील व इंफिदवी व भोंसल्याकडील व माहादजी शिंदेकडील व बंदेगान अलीकडील व सुभेदाराकडील असे साहा असामी यांस बोलाविलें. अवघ्यांनीं नजर दाखविली. परंतु साहेब मोसुफानें नजर माफ केली. पुढें चार कदम येऊन भेटले. जवळ बसविलें. सेवकाकडे व भगवंतरावकडे पाहून पुसूं लागले कीं, कांहीं ताजें वर्तमान पुण्याकडील आहे काय? व महादजीराव शिंदे केव्हां तेथून रुखसत होतील? सेवकानें जाब दिलें कीं, दरीविला कांहीं ताजें वर्तमान आलें नाहीं. थोडे दिवसांत सरकार खुदावंत न्यामतकडील पत्र येणार आहे, व महादजीराव शिंदे तांहाल रुखसत जाले नाहींत. बहुत दिवसानें हिंदुस्थानांतून हुजुरांत आले आहेत. याजकरितां आणखी चंदरोज राहतील. खावंदाचे मर्जीस येईल तेव्हां रुखसत करतील. हे गोष्ट ऐकून भगवंतरावाकडे पाहून सांगितलें कीं, ऐसें कळत आहे कीं विजयादशमी तेथेंच होईल. मशारनिलेनें उत्तर दिलें कीं, हिंदुस्थानची रीत आपल्यास ठाऊकच आहे. ऐसें बोलणें जाल्यावर अत्तरपान देऊन रुखसत केलें, व अवघ्यांस सांगितलें कीं, आज मुलाकात होणार नाहीं, व शंकरराव एक खलिता बाळाजी गोविंदचा घेऊन बैसले होते. व दोन चार वेळ महंमद हसन मुनशीस सांगितलें कीं, बाळाजी गोविंदकडील खलिता गुजरावयाचा आहे. जरूर जरूर अर्ज करून आह्मांस बोलाविणें. मशारनिलेनें जाब दिलें कीं आज कांहीं भेट होत नाहीं. जे दिवशीं दरबार होईल, तेव्हां गुजरावा. चंद्र दोन माहे सदर. खबर पोहोंचली कीं, नवाब मुबारकदौला नाजीम बंगाले चंद्र २८ माहे मोहरमेस आजबायेस बिमारी मृत्य पावले. चंद्र ४ माहे सदर नवाब हसनरजाखान जान बस्टुरसाहेबासीं व चंद्र ५ शोरसाहेबासीं रुखसत जाले. खबर होती कीं, चंद्र ७ माहे सदर इसपकसाहेबांसीं रुखसत होऊन चंद्र ९ स जाणार; परंतु चंद्र ८ माहे मजकुरीं विलायतेहून पाकट (पत्र) आला. शोरसाहेबाचे घरचा वर्तमान असा लिहिला होता कीं, एक पुत्र पांचा वर्षांचा, व एक कन्या आजरुबाब आजार मृत्य पावले. शोरसाहेबानें हे खबर ऐकून बहुत खेद केला; व ताकीद केली कीं कोणीं हिंदुस्थानी व इंग्रेजास येऊं न देणें. नवाब हसनरजाखानानें सांगून पाठविलें कीं, आह्मी येतों. शोरसाहेबांचे जमादारानें जाब दिला कीं, दरी रोजांत मगदूर अर्ज करणेचा कोणास नाहीं, व बराय मातमपुरसी कोणी यावें, ऐसी रीत इंग्रजाची नाहीं. चंद्र १० माहे सदरेस, इसपकसाहेबानें बराय रुखसत करणें. हसनरजाखान व टिकेतराय व बचराज व कासिमरीमल, लालहवेलींत दरबारचा जागा येऊन इडमनिस्टीनसाहेब मुनशी यांस नवाब मोसुफाकडे पाठविलें. यानें जाऊन नवाबासीं बोलले कीं, लाटसाहेब जातां समयीं आपल्याकरितां सांगून गेले कीं, आह्मी गेल्यावर यांसी खिलत देऊन रुखसत करणें. अजि बायेस इसपकसाहेब दरबारचे जागां आले आहेत. आपण व टिकेतराय व बचराज व कासिमरीमल चलावें व

खिलत घेऊन रुखसत व्हावें. नवाब मजकुरानें जाब दिलें कीं, शोरसाहेबास गमीची खबर आली आहे. ऐशामध्यें आह्मीं रुखसत व्हावें हें ठीक दिसत नाहीं. चंद्र १५ माहे सदर, इसपकसाहेब मोचीखोल्यास जाऊन, शोरसाहेबांची भेट करून आले. चंद्र १७ माहे सदर, खबर आली कीं मुबारकदौला नाजीम बंगाले मृत्यु पावले होते, त्यांचे पुत्र बाबरजंग त्याच कामावर कायम जाले, आणि आबरग्रेंबीसाहेब मुंबईत होते. दरीविला फुलचरीचे लढाईमध्यें बहुत श्रम केले. यांस जनरेली तमामी फौजेची माफक हुकूम विलायत मुक्रर जाली आहे. मंद्राजेहून कलकत्त्यास येणार. आजीबायेस चंद्र १९ माहे करनेल डेयर व कपतान कालकीराय या समयीं सरंजाम ज्याफत बिजार इस्तकबल जनरल मजकूर पाठविले, आणि मजकूर समजलें कीं फुलचरीचा किल्ला पहावयास लाटसाहेब गेले होते. पाहून सांगितलें कीं किल्ल्याचे जवळ जितकी इमारत आहे, ते सारी तोडून मैदान करून देणें. तेथून लाटसाहेबही दाहा पंधरा दिवसांत विलायतेस जातील. चंद्र २७ माहे सदर, चार घटका रात्र जाल्यावर, मशारनिले व जनरल आबरग्रेंबी व मेजर मंङ्गस व मेजर एकमुटी व कपतान हालकी मुसाहेब जनरेल आहेत, व मेजर इस्काट कीं हमराह लाटसाहेब गेले होते, कलकत्त्यास येऊन पोहोंचले. जनरल वगैरे जहाजावरून उतरून दर हवेली रास लंपट नायब करनेल रास जाऊन उतरले. चंद्र २८ माहे सदर, जनरेल मय मुसाहेबान आपले बराये मुलाकात इसपकसाहेब आले. •इसपकसाहेब मयेकालकिराय वकील क्यादरी पुढें जाऊन घेऊन आले.. दोन घटका मजकूर खैरआफियत वगैरे करून रुखसत केलें. सबब सतरा आवाज तोफेचे नवे गडांतून जाले. तेच दिवशीं शोरसाहेब व जान बष्टुरसाहेब व कुफरसाहेब व तामसगिरामसाहेब व हेसाहेब वगैरे दहा इंग्रेज जाऊन, जनरेल आबरग्रेंबीची भेट करून आले. चंद्र २९ माहे सदर, जनरेल मजकूर स्वार होऊन, शोरसाहेब व जान बष्टुरसाहेब व कुफरसाहेबाची भेट करून आपले घरास आले. नवाब हसनरजाखान व टिकेतराय जनरलचे घरास जाऊन भेटले. चंद्र १ माहे रबिलावल, इसपकसाहेबही जनरलचे घरास जाऊन आले. चंद्र २ करनेल फालबर व करनेल कामरेल व करनेल इष्टुर व करनेल जान मारी व कपतान कलन व कपतान तरनल व मेजर कीट व बकशी फारकिस वगैरे दीडशें इंग्रेज सरदारान फौज जनरेलास जाऊन भेटले. खैरआफियत विचारून रुखसत होऊन गेले. चंद्र १९ माहे सदर चार घटिका रात्र जाल्यानंतर, लाट साहेबाचें पत्र, बनाम इसपकसाहेब व कुफरसाहेब व मिस्तर हेसाहेब व शोरसाहेब व जनरेल आंबरग्रेंबी साहेब, . दरबाब मदार बडेसाहेबी बशोरसाहेब व मदार जनरेली बजनरेल आबरग्रेंबी पोहोंचले. चंद्र २२ माहे सदर, सकाळचे प्रहरीं शोरसाहेब मय कपतान कलन मु साहेब व मिस्तर कारनीदर लालहवेलींत दरबारची जागा आले. इसपकसाहेब व कीलक पादरी व कालकिराप व मिस्तर जान बेब व इडमनिष्टीन नायब मिस्तर चेरीसाहेब व मिस्तर बिलाइंकी दरिविला आज तर्फ हिष्टीन दिनाबर वसुल

करनेलान पूर्वी आले आहेत. लाल हवेलींत आले व अवघे मिळोन तेथें जेवले. बाद आजा कुफरसाहेब व हेसाहेब व तामसगिरामसाहेब व बद्रूसाहेब व कालीकाट येऊन चार घटिका खिलवत केलें. मग इसपकसाहेब व कुफरसाहेब व तामसगिरामसाहेब कौसलघरांत गेले. बादआजा शोरसाहेब व जनरेलही कौसलघरांत गेले, व मिस्तर हेसाहेब शिरस्तेदार कौसल यांनीं शोरसाहेबास माफक रसम विलायते बरकुरसी बडेसाहेबी व जनरल आबरग्रेंबी यांस बरकुरसी जनरेली माफक मरातब बैसविलें, व एक कागद हुकुमनामा विलायेतचा वाचून सांगितलें कीं, इलहाल ईश्वरनें आपल्यास बरकुरसी बडेसाहेबी बैसविलें आहे. लाजिम आहे कीं इनसाफ करावे व जुल्म कोणावर न होय, इतकें केलें पाहिजे. शोरसाहेबानें जाब दिलें कीं, हे गोष्टीस ईश्वर साक्षी आहे. मग हेसाहेबानें सिकसिपेल नायब आपल्यास हमराह, इसमोलसाहेब शिरस्तेदार आदालत, एक हुकुमनामा आजतर्फ आदालत आणले होते. मग हुकुमनामे कौसल रवाना केले. मशारनिले, बाहेर लालहवेलींत जाऊन, मजमून हुकुमनामेचा कपतान जनरल व कपतान मिसर मय तुरक स्वारांन, व पलटण गोरे व तिलंगे येऊन उभे राहिले होते. जाहिर करून सांगितलें कीं, तुह्मींही हे हुकुमनामेवर अमल करून कवाईद सलामी करावे. बमुजीब सांगणें. कपतानमजकुरानें मय पलटण व तुरक स्वारान कवाईद सलामी करून रुखसत होऊन गेले, व एकवीस आवाज तोफेचे बबात सलामी शोरसाहेब व सतरा आवाज सलामी जनरेलचे, नवे गढांतून जाले. चंद्र २४ माहे सदर नवाब हसनरजाखान व टिकेतराय व काश्मिरीमल व बछराज व तफझुल हुसेनखान बबख्त दोन प्रहर बमुजीब इतल्ला विनाबार मुलाजिमत शोरसाहेब आले. साहेब मोसुफ खबर ऐकून, जिनेपावेतर पुढें जाऊन घेऊन आले. हसनरजाखान व टिकेतरायनें शंभर शंभर आशरफी नजर दाखविले. शोरसाहेबानें माफ केले व घटिका एक मजकूर दोस्तीचे करून अत्तरपान देऊन रुखसत केलें. बादआजा नवाब दिलावरजंग भेटीस आले. यांसही पुढें जाऊन घेऊन आले. दिलावरजंगनेंही एकवीस आशरफी नजर दाखविली. शोरसाहेबानें माफ करून व एक घटिका मजकूर दोस्तीचे करून, अत्तरपान देऊन रुखसत केलें. चंद्र २६ माहे सदर, शोरसाहेब व कपतान कलन व मिस्तर इडमनिष्टिन हसनरजाखानचे घरीं गेले. खान मोसुफ पुढें जाऊन घेऊन आले. बाद दोन घटका बावीस खाने पारचे मय सरपेंच व जिगे कलगी व मोतीची माला, बराय शोरसाहेब; व सतरा खाने पारचे मयजवाहिर बिनाबर मिस्तर इडमनिष्टिन कपतान कलन आणविले. शोरसाहेब व मशारनिलेंनीं अत्तरपान मात्र घेऊन रुखसत जाले; व तेथून स्वार होऊन टिकेतरायचे घरीं गेले. मशारनिलेही पुढें जाऊन घेऊन आले, व बाद घटिका एक एकवीस, खाने पारचे मयजवाहिर बराय शोरसाहेब व तेरा तेरा खाने पारचे मयजवाहिर बराय एक कपतान व मिस्तर इडमनिष्टिन रुबरू आणविले. तेथेंही शोरसाहेब व हमराही यानें अत्तरपान घेऊन रुखसत जाले. चंद्र २८ माहे सदर चेरीसाहेब मुनशी हमराह लाटसाहेब गेले होते, ते रात्रीं मंदराजेहून कलकत्तेस पोहोंचले, चंद्र २९ माहे सदर मंगळवारीं, शोर-

वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें तर, राजश्री बाबुराव वैद्य येथून बाईचा निरोप घेऊन रेवेपार दोन मुक्काम जाले. बाईकडून कोणी गृहस्थ बोलायास गेले होते. त्यामुळें दोन मुक्काम जाले. छ १४ रोजीं रेवापासून कूच करून गेले. दरमजल पुण्यास येतील. राजश्री पाटीलबावांची छावणी बुढापाहाडाआसपास जाली. होणार. सुरतेकडील वर्तमानः–इंग्रजांनीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस उत्तेजन देऊन फौज ठेवावयाचा उपक्रम करितात. राजश्री फत्तेसिंग गायकवाडासही बोलावूं गेलें आहे ह्मणून साहुकाऱ्यांत बोलतात. येथें बाई विचारीत होती जे, बाजारी बोलवा आहे कीं, फिरून इंग्रेजांनीं कोंकणांत गडबड केली आहे, हें खरें कीं काय? मीं उत्तर केलें जे, हें मिथ्या वर्तमान. आह्मांकडे कांहीं बातमी आली नाहीं. राजश्री नारो शिवदेवही उदईक छ १५ रोजीं निरोप घेऊन उज्जनीकडे जाणार असें बोलतात. हरकुबाईकडील गांव आपण कृपा करून सोडलें ह्मणून येथें वर्तमान आलें होतें. परंतु यांजकडे कांहीं सनदापत्रा आल्या नाहींत. येविषयीं मावशीबाई पुसत होती कीं, गांव सोडून श्रीमंतांनीं कोणाच्या हवाला केलें? या बाईचें बोलणें आहे कीं कृपा करून गांव सोडले तर आह्मांकडे सनदा पाठवाव्या. नाहींतर सरकारांतच असावें. ज्यांचे त्यांनीं फिरून घेतल्यास आमचा उपाय काय? दुसरें, हरकुबाईच्या बहिणीस फार बरें वाटत नाहीं. तिजला भेटायास जाणें फार जरूर आहे, व कनाशीस मानभावांचा देव आहे, त्याच्या दर्शनासही जायाचें आहे. सरकारची आज्ञा आली ह्मणजे जातील. येविषयीं आज्ञापत्राची अपेक्षा फार आहे. मर्जी असली तर, आज्ञापत्र जसें येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं, असें बोलली. सेवेसी श्रुत होय. मीं पेशजीं विनंतिपत्रीं विनंति लिहिली होती. इकडे बहुत दिवस जाले, आज्ञा आली तर चरणदर्शनास येईन. धन्याची मर्जी. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ६३. ता० ८ नोव्हेंबर इ.स. १७८१.

**श्रीगजानन.** मि० कार्तिक व॥ ७ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति तागाईत छ २१ जिल्कादपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबराबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः—राजश्री केसो भिकाजी यांचे व बाईचें भाषण होऊन, सरकारच्या पत्रांचीं उत्तरें व हिशेबाच्या यादी महालांसंबंधीं

त्यांनीं दिल्या आहेत. ते व मशारनिल्हेंनीं पत्र लिहिलें आहे तें, सेवेसीं जासूद-जोडीबराबर पाठविलीं आहेत. अवलोकनीं अवगत होईल. राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून साहुकारी वर्तमान आलें जे, दिल्लींत कोणी मीर आबसी ह्मणून मातबर माणूस दहा पांच हजार फौजेचा सरदार होता. नजीबखानाचे चेले आपसांत भांडूं लागले, यास्तव मीर आबस यानें त्यांचे लोकांत फोडफाड करून, हजार फौज जमा करून, दिल्लींतच मातबर लढाई केली. तें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. प्रस्तुत सावकारी वर्तमान ऐकिलें जे, मीर आबस यानें, चेले दोन-चार होते ते, धरुन कैद केले. वीस पंचवीस हजार फौज जमावून पातशाहास कांहीं खजिना मागूं लागला. शाहानें उत्तर केलें जे, आह्मांजवळ खजाना नाहीं. यानें चढाई करून पातशाहाच्या महालावर आर्क किल्ल्यावर गेला. त्यांनीं दरवाजे मामूर करून तोफा सुरू केल्या. दिल्लींत असा गवगवा जाला. पातशाहांनीं पाटील-बावांस पत्रें लिहिलीं. ऐंशी लाख रुपये व आगऱ्याचा किल्ला देऊं केला, नी फार जलद येऊन पोहचा, ह्मणून दोन चार पत्रें दिल्लीहून आलीं. आगऱ्यास दाखल जाले ह्मणजे किल्ला व वीस लक्ष रुपये द्यावे. बाकी साठ लक्ष दिल्लीस गेल्यावर कांहीं द्यावे. सारा भरणा त्याचें–मीर आबसचें–पारपत्य जाल्यावर द्यावे असा करार. त्यावरून पाटीलबावांनीं जैपूरवालें व जाट वगैरे रजवाडी वीस हजार फौज जमा करून, व नजीबखानाचा चेला आमदानी याजवळ दहा पंधरा हजार फौज होती, तेही सारी मिळून चाळीस हजार फौजेचा जथ करून, दरमजल आगऱ्याच्या रोखें चंबल नदीवर गेले. ते मुक्कामचें साहुकारी वर्तमानः–पाटीलबावांनींही उज्जन वगैरेकडून दहा लक्ष रुपये आणिक आणविले. हुंड्या आगऱ्याच्या करविल्या. याप्रमाणें सावकारी वर्तमान ऐकिलें, तें लिहिलें असे. गोहजवाल्याचा मुलूख खराब जाला, व पातशाहांनीं राण्यांस लिहिलें जे, ग्वालेरीचा किल्ला पाटीलबावांचे स्वाधीन करणें. आधींही गोहजवाल्याकडे सूत्र होतेंच. त्यावर पातशाही हुकूम जाला. त्यावरून ग्वालेरी-वरील जकिरा राणाजी उतरीत आहे ह्मणून हेंही बाजारीच वर्तमान ऐकिलें. दिल्लीस बाईचा वकील आहे. त्याचें पत्र येथें आलें नाहीं. काशीवाले................ वकील पेशजीं पुण्यास आला होता · तेथून................काशीस गेला होता. इकडूनच गेला................काशीहून येथें आला. पांच सात रोज येथें होता. ................बाईचा निरोप घेऊन रेवापार दक्षिणतीरास गेला. हुजूर येत आहे. दुसरें वर्तमान सेंदव्यांत संताजी होळकर आहेत. त्यांनीं खरगोणच्या खेड्याकडे कांहीं चोरीचा अपराध ठेवून, चढाई करून, त्यांवर दोनहजार पेंढारी व पांचसातशें फौज ऐसे संताजी होळकर व चिमाजी बुळे उभयतां सरंजामानसीं

जाऊन दोन गांव खरगोणचे मारले. तें वर्तमान बाईस कळलें. बाईनीं येथून दोन पागा रामजी आघाड्याची व आणिक एक ऐसे रवाना केले. दोनशें लोक राजश्री कृष्णाजी तानदेव खरगोणीं त्याजवळ आहेत. इकडून दोन पागा दोनशें लोक गेले. खरगोणीं एक जागा होऊन बाहेर निघाले. संताजी होळकर व चिमाजी बुळे हे उभयतां व कृष्णाजीपंत यांसीं त्यांसीं लढाई जाली. पहिले लढाईस कृष्णाजी तानदेवांनीं त्या उभयतांचा व पेंढाऱ्यांचा मोड केला. पांचसात उंट, दहापांच घोडीं घेऊन आले. दुसरे लढाईस त्यांनीं यांचे हत्तीवरील निशाण व दहापांच घोडीं नेलीं. याप्रमाणें दोन लढाया जाल्या. ऐसें वर्तमान ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें. पुर्तेपणेंही शोध करून मागाहून लिहीन. राजश्री पाटीलबावांकडे राजश्री माधवराव गंगाधर गेले आहेत. त्या तागाईत आद्याप पत्रें आलीं नाहींत. परंतु अंतस्थ बाईस पत्रें पाटीलबावांचीं येत जात असतात ह्मणून ऐकिलें आहे. तथ्य असें लिहवत नाहीं. परंतु पक्केपणें बाईची खातरजमा पाटीलबावांनीं केली आहे, असेंही ऐकिलें आहे. वर्तमान देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. धनी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ६४.** ता०२९ नोव्हेंबर इ.स.१७८१.

**श्रीगजानन.** मि. मार्गशीर्ष शु॥ १४ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १२ जिल्हेजपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. राजश्री केसो भिकाजी येथें आले. बाईची भेट घेऊन सरकारचीं पत्रें देऊन, आज्ञेप्रमाणें बाईस बोलून, उत्तरें घेऊन सेवेसीं पेशजीं पाठविलीं आहेत. तेथून सरकारची आज्ञा जसी येईल, त्याप्रमाणें येथें बाईसीं बोलतील. सांप्रत राजश्री सदाशिवपंत दाजी व रामजी पाटील हे उभयतां छ २८ जिल्कादीं येथें आले. दुसरे दिवसीं बाईची भेट जाली. ते दिवसीं येथें गोवर्धनउत्साह होता. ब्राह्मणसंतर्पण जालें. त्या गडबडीमुळें कांहीं बोलणें जालें नाहीं. छ १ मिनहूस..................रामजी पाटिलांचें व बाईचें आधीं दोन तीन घटका बोलणें जालें. तदोत्तर सदाशिवपंतांस बोलविलें. त्रिवर्गांचें दोन घटका खलबत जालें. अर्धी घटका दिवस राहतां उठलीं. बाईनीं उभयतांस सांगितलें जे, रात्रीं निजावयास या. तदोत्तर तीन घटका रात्रीं बाईची देवपुजा जाली. यावर त्यांणीं यावें, तर फार लांब राहिले होते.

दुसरे दिवशीं भोजनोत्तर उभयतां येऊन, दोन घटका एकांतीं बोलून उभयतांस बाईनीं वस्त्रें देऊन बिदा केलें. दोन प्रहरांनंतर स्वार होऊन गेले. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः–कोतवालगढीस लागले होते. ते सर करून, दुसरे कोणी गढी आहे, त्यास मोर्चे लाविले आहेत. दिल्लीकडे जाणार होते, परंतु अद्याप गेले नाहींत. राजश्री माधवराव गंगाधर आश्विन शु॥ ८ मीस लष्करांत पावले. त्यांस पाटीलबावांचीं दिवाणगिरीचीं वस्त्रें होणार ह्मणून घाटत आहे. अद्यापि वस्त्रें जालीं नाहींत ह्मणून ऐकिलें. त्यांजकडीलही पत्रें येथें बाईस आलीं. छ ३ मिनहूस रात्रीं आलीं आहेत ह्मणोन ऐकिलें. तपसील समजल्यांत आला नाहीं. शोध करून मागाहून लिहीन. केसो भिकाजींनींही सेवेसी विनंतिपत्र लिहिलें आहे, त्यावरून विदित होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. येथें विकताशिवाय गवताची काडी देखील मिळत नाहीं. कर्ज जालें आहे. पुढें नित्य कृत्य चालायाचें संकट जालें आहे. धनी कृपाळू समर्थ. छ ११ मिनहूस उज्जनीहून येथें पत्र आलें. त्यांत वर्तमान होतें जे, आश्विन वद्य त्रयोदशीस माधवराव गंगाधर यांस पाटीलबावांनीं आपले दिवाणगिरीचीं वस्त्रें दिल्हीं. दुसरें त्या पत्रांतच वर्तमान होतें जे, पायागडीहून वर्तमान आलें जे, कलकत्त्याहून इंग्रजांनीं नवा सुभा मुंबईस पाठविला. त्यानें मुंबईस पहिला सुभा होता त्यास फांशी देऊन मारला. नव्या सुभ्यानें मुंबई व सुरत वगैरे बंदोबस्त केला; व बडोद्याकडे कांहीं पलटणें पाठविलीं. याप्रमाणें वर्तमान होतें. देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाचे खर्चाचें फार विपत्य आहे. कांहीं उपाय नाहीं. धनी कृपा करतील, तर येथील देण्यापासून मुक्तता व पुढें नित्य कृत्य चालेल. नाहीं तर येथें कोणी त्राता नाहीं. धनी सर्वज्ञ समर्थ. हे विज्ञप्ति.”

---

**लेखांक ६५.** ता० २९ नोव्हेंबर इ. स. १७८१.

***श्रीगजानन.*** मि० मार्गशीर्ष शु॥ १४ शके १७०३.

“श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामींचे सेवेसीः–

सेवक बिठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १२ जिल्हेजपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान श्रीमंतांस पेशजीं विनंतिपत्रीं लिहून काशीदजोड्यांबरोबर व डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. त्यांवरून आपल्यासही श्रवण जालेंच असेल. अलीकडे अधिकोत्तर कांहीं नाहीं. येथील अनुसंधान पाटीलबावांच्या पत्रावर आहे.

देखलें ऐकलें वर्तमान सरकारच्या पत्रांवरून विदित होईल. सेवकाचें वर्तमान.... येथें दोन...........चार वर्षें जालीं. सरकारचाकरीच आहे................आहे. परंतु येथें असल्यानें यांस सुख असावें................माझेविषयीं बाईस कोणीं काय भासविलें आहे न कळे. राजश्री बाबुराव वैद्य येथें आले, त्यास दोन तीन महिने जाले. तेव्हांपासून मजविषयीं उपेक्षेच्या गोष्टी बोलूं लागली. त्यावर बाबुराव येथून बिदा जाले. ते समयीं त्याजबरोबर मीही येत होतों. परंतु सरकारची आज्ञा नाहीं; श्रीमंत रागें भरतील; यास्तव रावजीसही सांगितलें जे, श्रीमंतांस विनंति करून मजला बोलावून घ्यावें. तदोत्तर बाबुराव येथून गेल्यावर, महिन्या पंधरा दिवसां, राजश्री मुकुंदराव दिवाण यांज हातीं मजला सांगविलें जे, "तुमचें आतां येथें काय काम आहे? सरकारचा जाबसाल बाबुरावांकडे लागला. त्यांचे कारकून लक्ष्मण बल्लाळ येथें आहेत. मग तुमचें येथें बसायाचें काम काय? तुह्मीं आपल्या धन्याकडेस जावें." असें त्यांनीं एक दोन वेळां मजला सांगितलें. तो तपशील पेशजीं श्रीमंतांस विनंतिपत्रीं लिहिला. सरकारची आज्ञा आली जे, तुह्मी तेथेंच असां. येथून तुमची खर्चाची नेमणूक करून पाठवूं. श्रीमंतांनीं खासदस्तूर चार ओळी लिहिल्यानें, सरकारचें मनुष्य तेथें कोणी नसावें असें बाईचें मानस असल्यास, तुह्मांस कसरावद अगर मंडळेश्वर अगर उज्जनी येथें आज्ञा करूं तेथें रहा. तें पत्र बाईस दाखवलें. ते वेळेस बोलली जे, "आमचें काय खातात? त्यांचे धनी त्यांस खर्चास पाठवितात. मग राहिनात कां? रहा ह्मणावें. परंतु आह्मांजवळ खर्चास मागाल तर आह्मांजवळ कांहीं नाहीं. आह्मीं कोणाकोणास द्यावें? रावजीकडील कारकून आहेत, त्यांजकडे जाबसालच आहे. यांजकडे काय? हे आमचें बारीक मोठें लिहिणार!" असें कोणां कोणांजवळ बोलली. ते समयीं भासविणारांनींही चार गोष्टी अधिकोत्तर भासविल्यानें, बाबुराव व लक्ष्मण बल्लाळ हे सरकारचे मातबर, आणि विठ्ठल शामराज, हरिपंततात्यांचे विद्यमानें. बारीक मोठें जें लिहिणें तें यांनीं तात्यांस लिहावें, असें बाईस समजाविलें. सांप्रत येथील समज तुकोजीबावांचे पक्ष................तात्या. श्रीमंतांची ममता इकडील या समजेच्या पोटांत बारीक बारीक फार आहे. असो. प्रस्तुत बाई येथें कोणाच्याजवळ बोलली कीं, आमचे येथील गृहकृत्याच्या बारीक मोठ्या गोष्टी तेथें हरिपंत आपले घरीं बोलतात. इत................मोठ्या गोष्टी कोण त्यांस लिहितें? जवळील बोलले................त्यांचे खासगत कारकूनच आहेत. चार वर्षें................आहेत. ते अधिक वेगळे लिहीत असतील................भासलें. ते वेळेसही समविषम बोलली कीं, "आह्मीच काय करितों. उगेच वरचेवर कारकून कां पाठवितात? आमचें येथें कधीं श्रीमंतांचे कारकून बसत नव्हते. नवें नवेंच होऊं लागलें." असें बोलली ह्मणून ऐकिलें.

मी येथून यांची नालीश सरकारांत लिहितों, असें यांस भासविणारांनीं भासविलें आहे. मजविषयीं यांची चित्तशुद्धि नाहीं. त्यापक्षीं धन्याच्या पायांजवळ असणें बरें. आज छत्तीस वर्षेपर्यंत धन्यांनीं प्रतिपाळ केला. आतां उतारवयांत धनी उपेक्षा करणार नाहींत. आपण कृपा करून श्रीमंतांस विनंति करून आज्ञापत्र पाठविलें तर येईन. येथील प्राप्तीचा प्रकार, रावजी नवते आले त्या दो वर्षांत, चार पांचदा मिळून सहाशें रुपये यांजकडील मजला पावले आहेत. पेशजींही सेवेसी लिहिलेंच आहे. अलीकडे एक कवडी यांजकडील पावली नाहीं. येथें बाहेरील खर्च पैशाव्यतिरिक्त कांहीं चालत नाहीं. येथें सहाशें रुपये देण्याच्या पेंचांत आहें. पुढें नित्य कृत्य चालणें संकट जालें आहे. फार श्रमांत आहें. माझेविषयीं कोण श्रीमंतांस विनंति करितो? स्मरण कोणास? यास्तव, आपण कृपा करून विनंति श्रीमंतांस केली तर, येथील देण्याच्या पेंचांतून निघून धन्याचे दर्शनास येणें होय, अशी कृपा कराल तर बरें आहे. अलीकडे पांच महिने सरकारचें व आपलें कधींही पत्र येत नाहीं. कासीदजोड्या येतात, त्यांजबरोबर देखील उत्तरें येत नाहींत. असो. सरकारची मर्जी. हें पत्र एकांतींच वाचावें. उत्तर यावें. अपराध क्षमा करावा. हे विनंति."

---

**लेखांक ६६.** ता० १२ दिसेंबर इ. स. १७८१.
**श्रीगजानन.** मि० मार्गशीर्ष व॥ १२ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ जिल्हेजपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान राजश्री माधवराव गंगाधर यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. सबब शिष्टाचाराचीं पत्रें राजश्री पाटीलबावांचीं पत्रें बाईस आलीं होतीं जे, हे दौलत नी ते दौलत दोन नाहींत. पूर्वीपासून कैलासवासी सुभेदार सांभाळ करीतच आले आहेत. त्याप्रमाणें आपणही प्रतिपाळ करीतच आहांत. माधवराव येथें असल्यानें घरीं आहेत. अशीं ममतापुरस्सर पत्रें आलीं. यांनींहीं त्याप्रमाणेंच यांचीं उत्तरें पाठविलीं. बाजारी वर्तमान ऐकिलें कीं,................पाटील इकडून गेले. ते पाटीलबावा................ ........भाषणें होऊन मसलत ठरली. माधवरावजी फौजसुद्धां त्या शहरावर ठेवून खांसा आपण सडे कांहीं लोकांनिशीं उज्जनीस यावें; तेथून येथें बाईची भेट घेऊन श्रीमंतांच्या दर्शनास जावें; अशी मसलत जाली आहे. ह्मणून वदंतेचें वर्तमान.

राजश्री तुकोजी होळकर तेथें आहेत. त्यांचे ममतेस्तव इकडील होळकरसंमंधीं महाल जे आहेत, त्याविषयीं सरकारची उत्कंठा फार आहे. हमेश कागदपत्र व कारकून येतात; व त्यांस कांहीं खर्चास पाठवावें ह्मणून वरचेवर ताकीदपत्रें व महसल येतात. आज तीन वर्षांत एक कोंकणप्रांतीं इंग्रजांची मसलत पडली. ते वेळसही त्यांजवळ फौज किती होती, ती आतां दोन वर्षें फौजेचा खर्च काय आहे? कामकाज तरी कोठें पडलें आहे? तत्रापि देशीं सरंजामी महाल आहेत, ते निरुपद्रव. इकडील जोर तलबी महाल त्या देशच्या महालचा पैका कोठें खर्च होतो? हा विचार श्रीमंतांनीं त्यांसी कांहीं न करितां, इकडील महालांचीच ताकीद वरचेवर येती. तस्मात्, राजश्री नारो गणेश जो पर्याय श्रीमंतांस समजावून सांगितात, तें मान्य होतें. कारण कीं, मशारनिल्हे, मुत्सद्यांस दरबारखर्च मनास येईल तसा करून, सर्व एकवाक्यतेनें समजावितात, तेंच मुख्यस्थानीं मान्य होतें. येथून आज दोन वर्षें हमेशा इकडील हिशेबाचे आजमास व महालमहालची जमा व येथील खर्च व शिबंदीखर्च व त्यांनींच रद्दकर्जी महाल दिले आहेत, हें सविस्तर लिहून पाठवीत असतां, श्रीमंतही दौलत करितात, त्यांसही सर्व खर्च ठाऊक आहेत. असें असतांही ते जें एकवाक्यतेनें समजावितात, तें मान्य पडतें. आह्मांकडील जाबसालास पर्याय अनेक प्रकारचे लागतात. तस्मात् शिंद्यांच्या बायकांप्रमाणें आह्मीही एकीकडे बसावें असें नारो गणेशाच्या सांगितल्याअन्वयें मान्य पडावें. इकडील तापत्रय कांहींच चित्तांत येऊं नये. अतएव विवेकस्थानीं अविवेक याचा प्रवेश जाल्यास सहजच विपर्यास पडतात. असें अनेक प्रकारें बोलणें वेळेस बोलत असतात. परंतु पाहतां टाकून गोष्ट सांगायाचा रंग नाहीं असें दिसून येतें. पाटीलबावांची दिवाणगिरी माधवरायांनीं केली आहे. ते विषयींही बाईचें संमत...... ......बाईही बोलत होती जे, निभणें कठीण आहे. पाटीलबावा .......... पोतनिशी व बक्षीगिरी व (फाटलें आहे.)............व फडणिशी हे चारी दरख पाटीलबावांस संभाळावे लागतात. पाटीलबावा ह्मणतात जे, हे माझीं ग़रीबें पदरचीं आहेत. त्यांस कोणीकडे जा ह्मणावें? हे चौघेही तुमचे आज्ञेंत राहातील. त्यांस माधवराव यांचें मानस आहे कीं, पोतनिशी आबाजी नाईकांस द्यावी व बक्षीगिरी राजश्री नारो शिवदेव यांस व फडणिसी आपल्याकडेच ठेवावी अशी रदबदली आहे. याप्रमाणें करून घेतील. येथवर आलें आहे ह्मणून दरबारांत ऐकिलें. अद्याप कागदींपत्रीं कोठें वर्तमान लिहिलें आलें नाहीं. माधवराव यांजवळून कारकून आला आहे. तोही कोठें कोणांजवळ बोलला कीं; पैक्याचें अगत्य पाटीलबावांस आहे. करून देतील. राघो मल्हार यांस पाटीलबावांनीं विसा हजारांचीं

खेडीं देऊन, सांगूं काम तें करावें असे रीतीनें ठेवलें आहेत, ह्मणून ऐकिलें. बानव-ल्याच्या पैक्यास पाय सुटले ह्मणून असेंही कित्येक बोलतात. तुकोजीबावांकडेस येथून बाईचे खिसमतगार अंतरंगें हमेशा जात येत असतात. तें सूत्र एकच आहेसें दिसतें. आग्रह विप्रांविषयींचा येथें फार आहे. मंडळेश्वरीहून फडणीस मुजुमदारांनीं राजश्री तात्यांस पत्र लिहिलें आहे, त्यावरून विदित होईल. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. पांच सहाशें रुपये कर्जही जालें आहे. येथें कांहीं उपाय नाहीं. धनी कृपाळु समर्थ. हे विज्ञप्ति."

---

## इ. स. १७८२.

[ ह्या सालचीं अवघीं ११ पत्रें उपलब्ध झालीं आहेत. हें साल अतिशय महत्त्वाचें असल्यामुळें ह्या वर्षाचीं पत्रें इतिहासदृष्टीनें फार उपयोगी आहेत. तीं उपलब्ध झाल्यास मागाहून छापण्यांत येतील. ]

**लेखांक ६७.** ता. २३ जानेवारी इ. स. १७८२.

पौ। छ २३ सफर. **श्रीगजानन.** मि० माघ शुद्ध ९ शके १७०३.

"सेवेसी विठ्ठल शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापनाः–छ ८ रोजीं रात्रीं दरबा-रास गेलों होतों. त्यास खरगोणची मामलत येथें बाईनीं राजश्री कृष्णाजी तानदेव यांस दिली आहे. त्यांजवळून रस्त वगैरे वहिवाट चालत आहे, हें तेथेंही ठाऊक आहे. असें असतां, तेथें राजश्री तुकोजी होळकर यांणीं कासी रंगनाथ यांस खरगोणची मामलत सांगितली. येथें बाईनीं कृष्णाजीपंतास दिली. हें त्यांस विदित असतां, मशारनिलेंनीं रस्त देऊन सनदा करून घेतल्या. तुकोजीबावांचें पत्र बाईस घेतलें कीं, खरगोणची मामलत कासी रंगनाथ यांजवळून रस्त घेऊन सांगितली आहे; तर सुरळीतपणें यांजकडेस चालूं द्यावी. असें पत्र घेऊन कासी रंगनाथ सेंदव्यास आले. तेथून त्यांनीं आपले भाऊ, विसाजी रंगनाथ, येथें पत्रें देऊन बाईकडे पाठविले. त्यांनीं बाईची भेट घेऊन तुकोजीबावाचें पत्र दिलें. पत्र ऐकून ते समयींच बाईनीं पत्र टाकून दिलें कीं, आह्मीं कृष्णाजीपंतास मामलत सांगितली आहे, हें तुह्मांस ठाऊक असतां तुह्मीं मामलत कां केली? इतका जाबसाल ओंकारजीच्या यात्रेंत जाला. त्यावर येथें आली. मधें मधें जाबसाल करीतच होते. बाई झाडून टाकीतच होती. त्यास, काल रात्रीं जाबसाल जाला. विसाजी रंगनाथ यांणीं बाईस विचारलें जे, आमचे घरीं देणेदारांचीं धरणीं बसलीं

आहेत. आह्मांस काय आज्ञा? त्यास बाईनीं साफ उत्तर केलें जे, आह्मीं कृष्णाजी तानदेव यांजवळून रस्त घेऊन मामलत त्यांस सांगितली आहे. हें त्यांस व तुह्मांस माहीत असतां, तुह्मी आह्मांस न पुसतां, त्यांस रस्त देऊन मामलत करून आला, हें कां? यांणीं उत्तर केलें जे, ते धनी. बाई बोलली कीं, तुह्मांजवळ रुपया फार आहे, ह्मणून तुह्मीं त्यांस दिले. आह्मांस कोणी देईना? असो. आणीक इतके दिवस बसला तरी आह्मांस मामलत तुह्मांस देणें नाहीं. परिछिन्न येथें राहूं नये. यांणीं उत्तर केलें जे, आह्मी बुडालों! बाईनीं उत्तर केलें जे, तुह्मी आपले गांडखाजीनें बुडाला. मेले फितुरी पागा घेऊन आले आहेत. सेंदव्यांत जमीयत करून खरगोणावर वगैरे महालावर आवाडाव करावी, या विचारांत आहां. बरें, काय चिंता आहे? विसाजीपंतानें शफत वाहिली कीं, आह्मी उभयपक्षीं चाकर. आमची इतकी ताकद काय कीं, आह्मी धन्याशीं निमकहरामी करणार नाहीं. करून फसलों, तेथेंही अधिकोत्तर बोलवत नाहीं. आह्मीं काय करावें? तेव्हां बाईनीं निक्षून सांगितलें कीं, परिछिन्न मी हे मामलत तुह्मांस देत नाहीं. बसूं नका. ते बोलले जे, आमचे गळे फसले आहेत; ते कसे उगवतील? त्यास बाई बोलली कीं, ते व आह्मी एकत्र होऊं, तेव्हां जें होणें तें होईल. जेव्हां बोलाल तेव्हां हाच जाबसाल. तुमचे भाऊ सेंदव्यांत पागा घेऊन बसले आहेत. त्यांस ह्मणावें कीं, काय करणें तें करा. पराक्रमी पुरुष आहेत! विसाजी रंगनाथ बोलला कीं, आह्मी धन्याचे चाकर. आह्मांजवळून असें होणार नाहीं. बाई बोलली कीं, चाकर खरे; परंतु फितुरी चाकर! असो. मामलत तुह्मांस देणें नाहीं, असें साफ उत्तर केलें. याप्रमाणें येथें उत्तरें जालीं. कदाचित् तेथें खरगोणाविशीं साहित्यपत्र सरकारचें तुकोजीबावा बाईस मागतील. जाबसाल असा निक्षून जाला आहे. धन्यास विदित होय ह्मणून विज्ञापना. सेवकास आज्ञापत्र येऊन दोन महिने जाले, परंतु देण्याच्या आटकावाकरितां राहिलों आहें. वारंवार लिहितों ह्मणून धनी रागे भरतील. सेवकाचें तों तेथें स्मरण देण्यास कोणी नाहीं. नित्य येथें कर्ज खात बसलों आहें. धनी कृपाळू सर्वजाण आहेत. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ६८.** ता. १३ जुलई इ.स. १७८२.

**श्रीगजानन.** मि. आषाढ शु॥ ३ शके १७०४.

"विज्ञापना.—लखनौस बाईचे वकील खंडेराव ह्मणून आहेत. त्यांनीं येथें तिकडील वर्तमानचें पत्र लिहिलें आहे. एक महिना ती रोजांचें पत्र येथें छ १ साबानीं आलें. त्यांत मजकूर त्यांनीं लिहिला होता जे, कलकत्याहून इंग्रज

सात जण सरदार निघून दिल्लीस पातशाहाचे भेटीस आले. त्या सातांतून दोघे सरदार माष्टीनल व कर्नेल किलीच हे उभयतां पुढें लखनौस आले. सुजाउद्दवल्याचा लेक मिरजा आमानीची भेट घेतली. परस्परें आगतस्वागत जालें. त्रिवर्गांची मसलत जाली जे, दिल्लीस जाऊन पातशाहाची भेट घ्यावी. ती करोड रुपये पातशाहास नजर देऊन वजारत करावी. पातशाही फौज व आपली सलतनत घेऊन दक्षिणेस यावें. अशी मसलत उभयतां बोलले. सुजाउद्दवल्याच्या लेकानें आपले मातुश्रीपासून साठ लक्ष रुपये गुदस्तां घेतले आहेत. आतां सुजाउद्दवल्याचे आईजवळून काय जडीपुंजी असेल ते घेऊन, उभयतां बेगमा–आई व आजी–उभयतांस काशीजवळ कोणी किल्ला आहे तेथें नेवून ठेवाव्या, अशी मसलत केली आहे. ते मागाहून इंग्रज आले ह्मणजे हे मसलत करून दिल्लीस येणार. दिल्लीकडील वर्तमान या पत्रांतच होतें जे, पातशाहांनीं साहेबजादा बाहेर काहडला होता जे, आग्र्यास जाऊन बंदोबस्त करा. त्यास नजीबखानास देवाज्ञा जालियावर फौजेस कोणी धनी पाहिजे, ह्मणून नजीबखानाच्या बहिणीनें त्याचा चेला आफराशा देरीणा (?) मनुष्य होता, त्यास वस्त्रें देऊन फौजेस सरदार केला. साहेबजाद्यांनीं त्यांनीं फौज सुद्धां आग्र्यास जाणार होते, परंतु अफराशास पातशाही वस्त्रें जालीं नाहींत. पातशाहाच्या चित्तांत कांहीं किलाफ आला, यास्तव आग्र्याची मसलत राहिली. शाहाजादा फिरून दिल्लींत गेला. पातशाहाही दक्षिणी फौजेची मार्गप्रतीक्षा फार करितात. या पत्रांतच पाटीलबावांकडीलही वर्तमान होतें जे, गोहदवाल्याकडून गंगाधर गोविंद बोलायास आले होते जे, कांहीं खंडणीचा जाबसाल बोलाल तो ऐकूं; परंतु ग्वाल्हेर खालीं करून देत नाहीं. पाटीलबावाही ह्मणतात जे, ग्वाल्हेरच घेऊं. याप्रमाणें वर्तमान होतें. श्रीमंत राजश्री दादासाहेब मुंबईस गेले, व तिकडे पनवेलीकडे दहा पलटणें इंग्रज जमा जाले आहेत. पुण्याकडे जाणार ह्मणून हें बाजारी वर्तमान ऐकिलें, व तैलंग ब्राह्मणाचे मुखाचें वर्तमान ऐकिलें जे, दादासाहेब सुरतेसच आहेत. परंतु मुख्यांनीं अग्निहोत्र घेतलें व अमृतरायासही अग्निहोत्र दिलें. उभयतांही सुरतेजवळ अश्विनीकुमारावर तापीतीरीं आहेत. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. सत्य मिथ्य देव जाणे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. जाटांनीं जमियत करून डिगेस मोर्चे लाविले आहेत. किल्ल्यांतील शिबंदीचे लोक ह्मणतात जे, तीस हजार रुपये आमची शिबंदी चढली आहे. ते द्या, नी किल्ला घ्या; व आग्र्याच्या किल्ल्यांतही शिबंदीचे लोक आहेत. ते ह्मणतात जे, साठ हजार रुपये शिबंदीचे चढले आहेत, ते कोणीही देऊन किल्ला घेणें. हें कागदीं पत्रीं वर्तमान नव्हे. बाजारी ऐकिलें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.''

## लेखांक ६९. ता. २८ जुलई इ. स. १७८२.

पै॥ छ २५ साबान. **श्रीगजानन.** मि. आषाढ व॥ ४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १६ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत, पावलीं असतील. सांप्रत मातुश्री अहिल्याबाई श्रावणमासचे गडबडींत आहेत. राजश्री पाटीलबावांकडील पत्रें बाईस हमेश येत असतात. सांप्रतच्या पत्रांत मजकूर जे, राजश्री शिवाजी विठ्ठल यांचा प्रांत राजेरजवाड्यांनीं व गोहजवाल्यांनीं दाबला होता, तो बहुतेक सोडविला. एक स्थळ राहिलें. तेंही चौ रोजांनीं सुटेल. तें जालें ह्मणजे हिंमतगडास जाणार. ते जागा बांकी आहे. ते सुटली ह्मणजे पंचमहाल सारा सुटला. तदोत्तर वर्षाकाळची छावणी चाऱ्यापाण्याची सोय पाहून करूं. गोहजवाल्याकडून राजश्री गंगाधर गोविंद बोलावयास येणार ह्मणून लिहिलें होतें. तर्कानें दिसतें कीं, कांहीं खंडणीचा मजकूर बोलतील. ग्वाल्हेर खालीं करायाचा मजकूर त्यांच्या चित्तांत नाहीं. यांचा तो निश्चय कीं, ग्वाल्हेर सुटल्याशिवाय त्यांच्या प्रांतांतून निघूं नये. राजश्री आबाजी नाईक वानवळे व राजश्री माधवराव गंगाधर यांस लवकर पाठवून द्यावें, असें वर्तमान होतें. हें पत्र वाचून पाहून, बऱ्हाणपुरास राजश्री नारो शिवदेव व बाजी विठ्ठल व आबाजी नाईक यांजकडे रवाना केलीं ह्मणून ऐकिलें. बऱ्हाणपुरीं नाइकाचे मातुश्रीस सावकाश वाटत नाहीं. ज्वराचा उपद्रव जाला आहे. ते स्वस्थ जाली ह्मणजे नारोपंत नाना व बाजीपंत नाइकास घेऊन इकडे येतील. येथें बाईची भेट घेऊन पुढें माधवराव यांसह पाटीलबावांकडेस जातील. असें ऐकिलें. राजश्री लक्ष्मण बल्लाळ यांस सरकारचें पत्र हुजूर येण्याविषयीं आलें होतें. त्यावरून बाईची आज्ञा घेऊन छ १३ मिनहूस ते पार जाले. पर्जन्यामुळें एक दिवस पार मुक्काम करून छ १५ मिनहूस प्रातःकाळींच कूच करून गेले. दरमजल पुण्यास येतील. त्यांचे भेटीनंतर येथील वर्तमान सविस्तर सेवेसी निवेदन करतील. मृगापासून दीड महिना इकडे पर्जन्य नव्हता. आतां पुष्य नक्षत्राचा पाऊस चांगला जाला. पेरण्या लागल्या आहेत. राजश्री बाजीराव बर्वे यांसीं व लक्ष्मण बल्लाळ यांसीं भाषणें पुष्कळ जालीं आहेत. सेवेसी निवेदन करतील. सारांश, त्यांच्या बोलण्यांत बारंवार हेंच आहे कीं, आपल्यास पुण्यास जाणें नाहीं. जिवंत रेवापारीं दक्षिणतीरास जाणार नाहीं. येथेंच बाईजवळ वर्ष दोन वर्ष राहून, पुर्तेपणें बाईची खातरजमा एकनिष्ठतेची जाल्यावर, पुढें

कोठें बाई पाठवितील तेथें जाऊं. अगर श्रीमंतांचीं ममतापुरस्सर पत्रें आलीं तर जाणें होईल. या वेळेस येण्याचें मानस नाहीं. अशीं स्पष्ट भाषणें जालीं. हैदरनाईकाकडील वकील बाळमुकुंददास दिल्लीस आहे. त्यांनीं पातशाहासीं संदर्भ लाविला होता जे, दोन करोड रुपये नजर देतों; सा सुभे दक्षिणची सुभेदारी आपल्यास द्यावी. त्यास, पातशाहांनीं यांचें खानदान विचारलें जे, हे कोठील? पहिलें यांचे दादे परदादे काय करीत आले आहेत? त्यांच्या वकिलांनीं तो अरकाटचे सुभे ह्मणून सांगितलें. तेव्हां पातशाहांनीं सा सुभे दक्षिणचे सुभ्यांचा नांवनिनामा काढविला. तेथें यांचा दाखला कोठें न मिळाला. तेव्हां बारीक शोध केला. तेव्हां कर्नाटकांत कोल्हार परगणा आहे, तेथील नाईकवाडी हें समजल्यांत आलें. त्यावरून ती गोष्ट महकूफ राहिली. त्यावर दिल्लीचे तवायफ लोक व कांहीं मातबर यवनांच्या पोरी खरेदी केल्या. पाऊणशेंपर्यंत बायका खरेदी व कांहीं फुसलावून, अशा जमा करून, त्याजबरोबर रथ व गाड्या व दोनशें बरकंदाज वगैरे काफला जमावून, पातशाहाचीं हुकुमी पत्रें राजेरजवाडे व तहद औरंगाबादपर्यंत मातबर संस्थानिकांस, पातशाहाचीं साहित्यपत्रें कीं मार्गीं कोणी मुजाहीम न होतां आपलालीं हद्दपार करून देणें ह्मणून, सार्वभौमाचीं पत्रें देऊन, दिल्लींतून रवाना केलीं. त्यांस सहा महिने जाले. पिंढाव्यास दाखल जालीं. तेथवर येई तों सहाजणी कीं सात इतक्या राहिल्या. बाकी साऱ्या निघून गेल्या. जागां जागांच राजेरजवाड्यांस सांगत कीं आह्मांस जोरावारी न नेतां, ते हिरून घेत. कोणीं काढून दिल्या असें होत. पिंढाव्यापर्यंत आले. तेथें मुक्काम करून बाईसही पातशाहाचा इनाईतनामा होता जे, यांस समागमें लहबार (?) देऊन आपली हद्दपार करून देणें. तें पत्र घेऊन एक भला मनुष्य मुसलमान, समागमें त्याचीं पांच सात माणसें, तो काल छ १५ मिनहूस त्रितीय प्रहरीं आला. वाड्यांत बाईस समाचारास पाठविला. यांनीं बोलविला. पातशाही पत्र उभे राहून पुढें जाऊन घेतलें पाहिजे, तो भला माणूस ह्मणाला. बाई ह्मणाली जे, "ज्या श्रीमंतांच्या लोकांनीं पातशाहाची तगीरी बहाली केली आहे, त्यांच्या पत्रास इतकी आडस पत्रीं नाहीं. यांस कोण पुसतो?" लोक ह्मणाले जे, "पातशाही कैदकानू आहे. आपण मान्य न करीत, तर आणीख कोण करील?" मग मुकुंदराव दिवाणास सांगितलें जे, उभे राहून पत्र घ्या. मग मुकुंदराव उभे राहून, दोन पावलें पुढें होऊन पत्रें घेतलीं. तें मुनशींनीं वाचून दाखविलीं. त्यांत हाच मजकूर होता जे, हैदर अलीखां बहादर यांचा अटक येथून मुकुंददास वकील त्यांचे त्यांनीं रवाना केला आहे. खानबहादराकडे लहबार जात आहे.

त्यास आपली हद्दपार करून देणें. देवराव हिंगणे यांचेंही पत्र याच साहित्यावि-षयीं होतें. तें पाहून या अविंधास बाईनीं सांगितलें जे, चौमाशाची छावणी कोठें करितां? यानें सांगितलें जे, येथें येऊं. बाईनीं सांगितलें जे, उज्जयनीस अगर पिंढाव्यास छावणी करा. बादबरसातींत या. आह्मी आपली हद्द पार करून देऊं. इतकें सांगून त्यास विडे देविले. एक घोडें व आठ माणसें त्यांस समागमें होतीं. त्यांस शिधासामुग्री देविली. पातशाहाच्या पत्राचें उत्तर देणें ह्मणून मुनशीस सांगितलें. त्यांस निरोप दिला. दिल्लीचें वर्तमान हिंगण्यांनीं लिहिलें होतें जे, नजीबखानाचे चेले व त्याचे फर्जंद या उभयतांत कज्या लागला आहे. पातशाही साहेबजादा आग्र्यास जाणार ह्मणून डेरादाखल जाला होता. तो यांच्या कलहामुळें फिरून दिल्लींत गेला. शिकांचीही गडबड फार आहे ह्मणून हिंगण्यांनीं लिहिलें होतें. श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ७०.** ता. ३१ जुलई इ. स. १७८२.
**श्रीगजानन.** मि. आषाढ व॥ ७ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १९ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. तें सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमान बारीक ऐकिल्यांत आलें जें, कोणी आपले आप्ताजवळ बाई बोलत होती जे, "राज्याचा प्रकार एक रीतीचा जाला आहे. धनी प्रबुद्ध नाहीं. दरबारांत कोणी समविषम गोष्ट सांगतो. तेंच प्रभूस सत्य भासतें. खऱ्या लटक्याची छान नाहीं. तेही काय करतील? युगधर्म असाच आला आहे. दोन तीन वर्षें पाहिलीं; परंतु कोणतेही गोष्टीचा ठिकाण लागत नाहीं. आदिपश्चादीचा विचारही महान स्थळीं राहिला नाहीं. अब्रूच्या मनुष्याची अब्रू राहणें कठीण आहे. असत्य सत्य, नी सत्य असत्य, भासूं लागलें. खऱ्या मनुष्यानें आपलें सुखदुःख कोणाजवळ सांगावें? कांहीं ताळ राहिला नाहीं. याउपर महायात्रेस उठून जावें, हें उत्तम दिसतें. अतःपर येथें राहण्याचें युक्त नाहीं. महायात्रेस जाणें हेंच उचित आहे. दिवसंदिवस शरीरही जेर जेर जालें. काय ह्याती बाकी असेल ते, ते स्थळीं अखेर होय तर उत्तम आहे." जवळ कोणी एक दोन भले मनुष्य होते. यांनीं उत्तर केलें जे:—"आपण विचार केला, हा बराच आहे. श्रीमंत कैलासवासी नानासाहेब भाऊसाहेबापासून कैलासवासी श्रीमंत रावसाहेब अखेरपर्यंत, दुनिया

यथास्थित पर्यंत नांदली. प्रस्तुत पुण्याच्या खबरी ऐकितों. आपल्याही कानावर आल्याच आहेत. कोणाची घरलूट, बाव्यास खाणत्या लावितात. अनेक रीतींच्या जुन्या खपल्या काढून लोकांजवळून दंडद्रोह करितात. जेथें गाऱ्हाणें सांगायास जावें, तेथें अशी रीत जाली, होऊं लागली. तिकडे हैदरनाईकानें ब्राह्मणांचीं (अग्रहारें) लुटलीं. एकूण काळ कठीण आला." बाई बोलली जे, काशीस जावें, हें उत्तम आहे. जवळील गृहस्थ बोलले जे, "आपण काशीस जाऊं ह्मणतां, परंतु चौ देशांत तुमचीं जागां जागां छत्रें, कोठें तळीं, बावड्या व देवळें, धर्मशाळा असे जागां जागां धर्मकीर्ति फैलली आहे. सांप्रत तुह्मांजवळ कांहीं नाहीं. परंतु लौकिक लोपणार नाहीं. महायात्रेस जातां, हजार पांचशें मनुष्य तुह्मी समागमें घ्याल. परंतु या कीर्तीमुळें काशीप्रांतीं, राजेरजवाडे, भुके बंगाली हजार पांचशांस तोंडांत टाकीत असे, बहुत ताप आहेत. अशा एखाद्या खंद्याशीं गांठ पडल्यास लाख पन्नास हजार मागेल. ते कोठून द्याल ? तुह्मांसारख्यास सुखाचे काशीवास कोणी करूं देणार नाहीं. तुमच्या जाण्याचा प्रकार असा आहे." बाई बोलली जे, कसें जाणें होय ? त्या गृहस्थांनीं उत्तर केलें जे, तुमच्या जाण्यास मागें फौजेचा पिच्छा भारी असावा, आपण पुढें निघून जावें, तेव्हां यात्रा होईल. फौज ते प्रांतीं आहे, तों यात्रा करून निघून यावें. याप्रमाणें भाषणें जालीं. पाहतां बाईची मर्जी सदा अजुर्दा असती. राजश्री माधवराव गंगाधर यांस पाटीलबावांकडेस पाठवायाची फार निकड आहे. मुहूर्त काढून प्रस्थान ठेविलें. राजश्री बाजी विठ्ठल व आबाजी नाईक यानवळे यांची येण्याची मार्गप्रतीक्षा करितात. बाजीपंतासही तेथें सावकाश वाटत नाहीं. तीन दिवसपर्यंत एक धडसू (?) जालें होतें. आतां कांहींसें बरें आहे. यांनीं येथून औषधेंही पाठविलीं आहेत. तेही तेथून लवकरींच येणार. आले ह्मणजे हे, ते, मिळून पाटीलबावांकडेस जातील. याप्रमाणें येथील वर्तमान. सेवकाचें वर्तमान तर, आज वरीस सव्वा वरीसपर्यंत, —काय यांच्या चित्तांत कोणीं विकल्प घातला आहे हा नकळे,—त्यामुळें बोलण्याविषयीं संकोच करितात. प्रस्तुत कामही मजकडे काय आहे ? बाहेर बारीक मोठें वर्तमान कळतें, तें सेवेसीं लिहितों. न जाणूं, येथें एखादें एकांतीं वर्तमान जालें, सेवकास न कळलें, धन्याच्या ऐकिण्यांत आलें, (व) सेवकाच्या लिहिण्यांत न आलें, ह्मणून स्वामी रागें भरतील. यास्तव सूचनार्थ विनंति. हें पत्र एकांतींच पाहून, फिरून तात्या पेंडश्याच्या हवाला करावें हे विनंति. अलीकडे सरकारचे कांहीं कागदपत्र येत नाहींत. धन्याची मर्जी! हे विज्ञप्ति."

## लेखांक ७१. ता. ३१ जुलई इ. स. १७८२.

**श्रीगजानन.** मि. आषाढ वद्य ७ शके १७०४.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः—

सेवक विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत छ १९ साबानपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे.

[विशेषः—बहुत दिवस जाले, पत्र येऊन वर्तमान कांहीं कळत नाहीं. हरघडी येणार मनुष्याबरोबर पत्रद्वारें परामर्ष करीत असावें. विशेष इकडील वर्तमान बारीक मोठें कळल्याप्रमाणें श्रीमंतांस लिहिलें आहे. पत्राचा लाखोटा करून तुमच्या लाखोट्यांत घातला आहे. तुह्मीं आपलें पत्र वाचून, श्रीमंतांचा लाखोटा, एकांतीं एकले बसले असतील ते समयीं नेऊन, आपणच द्यावा. पत्र वाचून काय आज्ञा करितात ते ऐकून घेऊन, समयोचित विनंति करावी. मजला येथें वर्तमानास ठेविलें आहे. समयोचित यांनीं कांहीं सांगितलें तें धण्यास लिहावें, धन्याची आज्ञा येईल तशी यांस विनंति करावी, असें चालतही होतें. अलीकडे राजश्री बाबूराव वैद्य आल्यापासून कामकाजाचा जाबसाल त्यांजकडे पडला. यांस काय सरकारचें काम आहे ? ते आपल्या घरच्या कामास नाहीं आले. काम मिळून सरकारचें. मजलाही येथें धन्यांनीं पाठविलें आहे तें सरकारकामासच. माझें घरचें काम कांहीं नाहीं. आह्मांस कांहीं वर्तमान कळतें, तें जाबसालांत असल्याशिवाय बारीक मोठें वर्तमान कसें कळतें ? तथापि, मातबरांनीं गरीब ह्मणून पतच उठवून द्यावी. साऱ्या गोष्टीस आमचा बेइतबार आणि वरकडांचा इतबार ! असें आह्मांजवळून कोणतें सरकारकाम खोट जालें होतें ? आह्मीं कांहीं यांस मातबर कामांत जाऊन खोट केली नाहीं. अगर कोठें हरएक कामाचेही ( फाटलें आहे ) आले नाहींत. असो. समर्थास काय ह्मणावें ? ते थोरच. असो. मजलाही येथें साडेतीन वर्षें जालीं. पुढें राहावें तर यांणीं येथें केवळच आमचा बेइतबार केला आहे. बारीक मोठें वर्तमान कळलें पाहिजे. दरबारांत, जाबसालांत, कामकाजांत, असल्यास कितीक वर्तमान कळतें. ते विषयीं तों येथें किलाफ घालणारांनीं घातला. ह्यावरून हेही संकोच करितात. तेव्हां आह्मांस वर्तमान कोणीकडून कळावें ? येथें एक असेल आणि मीं भलतेंच वर्तमान ऐकून लिहिलें, तिकडूनही फजिती. तेथें श्रीमंतांची नाजूक मर्जी. रागें भरले तर मजविषयीं सांत्वन करायास कोण ? यास्तव व जितकें जालें तितकेंच पुरें. धण्याची कृपा आहे तों पायांजवळ यावें. या उतारवयांत एखादी फजिती न व्हावी. मी गरीब. कोणी माझा वशिला नाहीं. यास्तव स्वामींस विनंति जे, बहुत दिवस जाले, धन्याचे पाय पाहावे. आपली ओळख न विसरावी.

फिरून जिकडे पाठवितील तिकडे जावें. येथें कवडीची प्राप्ति नाहीं. साडे चौ वर्षांत साहाशें रुपये पावलों आहें. कोठवर येथें कर्ज खाऊं? आणि धन्यास खर्चाचा रत्नाकर कोठवर लिहूं? चारशें रुपये सरकारचे आले, ते देणेंदारास देऊन, अडीचशें रुपये लोकांचें देणें आतां आहे. फिरून रोजखर्च चालला पाहिजे. अधिक अधिक कर्जच होतें. घरची अवस्था ह्मटलें तर असे सवंगाईत माझीं मुलें मनुष्यें अन्नवस्त्रावांचून हैराण आहेत. पांच सात हजार रुपये लोकांचें देणें. दोन वर्षें चिरंजिवानें कर्ज खाऊन तुह्मां लोकांची उपार्जना केली. धन्याची ओळख केली. पसतीस वर्षें चाकरी मी करून एक असामी मुलास न मिळाली! शेवटीं घरास गेला!! आमचा गरिबाचा प्रतिपाळ धन्याव्यतिरिक्त कोणीं करावा? मातबराविषयीं हरकोणी विनंति करील. आमचे कोण? श्रीसर्वोत्तमास आमचे श्रम विदित आहेत. सारांश, कदाचित् सरकारचें पत्र एकांतीं द्याल, ते समयीं कांहीं श्रीमंतांनीं विचारलें तर, या पत्रान्वयें ईश्वर जे आपल्यास स्फूर्ति देईल तें बोलावें. ]

............गुजराथ वगैरे प्रांतचे ब्राह्मण येथें श्रावणमासास आले आहेत. त्यांनीं वर्तमान सांगितलें जे, तमाम गुजराथ प्रांत फार खराब आहे. जागा जागा इंग्रजांचीं ठाणीं मातबर स्थळीं आहेत. ते जुंज आहेत. सुरतेंत एक पलटण व दाहा गोरे; भडोचेंत तीनशें लोकं व चौघे गोरे; व जंबुसरांत तीनशें लोक व तिघे गोरे; व डभाईत चारशें लोक व दोघे गोरे; व बडोद्यांत राजश्री फत्तेसिंग गाईकवाडाजवळ शंभर गोरे व एक पलटण; असे आहेत. गाईकवाड त्यांचे काबूंत आहे. आमदाबादेंतही पंचवीस गोरे व एक पलटण भद्रांत आहे, व दोन पलटणें बाहेर आहेत. ते प्रांतीं दक्षिणी फौज चांगली आली, तर बडोदें व अमदाबाद वेगळीं करून, सारीं स्थळें हस्तगत होतील. श्रीमंत राजश्री दादासाहेब अश्विनीकुमारावर राहिले आहेत. अग्निहोत्र घेतलें आहे. इंग्रज दहा हजार रुपये दरमहा देतात. स्वस्थ स्नानसंध्या करून आहेत. पुण्याकडूनही कांहीं जाबसाल दादासाहेबांकडे लागला आहे. केवळ इंग्रजांचे अटकेंत नाहींत. याप्रमाणें वर्तमान ब्राह्मण तद्देशी सांगत होते. सत्य मिथ्या देव जाणे. लखनऊस बाईचा वकील खंडोपंत आहे. त्याचें पत्र अठरा दिवसांचें छ ७ मिनहूस येथें आलें. त्यांत वर्तमान होतें जे, सुज्यायतदौलाच्या लेकाजवळ इंग्रजांकडील सात सरदार आले आहेत. त्यास साहा महिने जाले. दोन करोड रुपये त्यास मागतात. त्यासाठीं सुज्यायतदौलाच्या लेकानें, आपली आई व सुज्यायतदौलाची आई—दोघींस कैद करून, दीड करोड रुपये नक्त घेतले, व करोडी रुपयांचें जवाहीर

## ५०. फ्रेंचांविरुद्ध पेशव्यांचा इंग्रजांशीं करार.

फ्रेंचांचा वकील सेंट ल्युबिन ह्यानें पुणें दरबारांत येऊन पेशव्यांशीं सख्य करण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं इंग्रजांनीं नानांकडे तक्रार करून पुढील करार लिहून घेतलाः–

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"हनराबल सरकार कोंपनी इंग्रेज यांची खातरजमा व्हावी याजबद्दल दरबारांतून सरकाराचे शिक्क्यानसीं लिहून सादर केलें ऐसें जेः–बिलफैल मुश्या ल्यूबान फरासीस यासीं व दरबारासीं कोण्हेक मजकुराविसीं करार मदार न जाहाला, व यापुढेंही होणार नाहीं. मशारनिल्हे फरासीस अगर त्याचे जातीसीं, एखलासी व दोस्ती हरएक बाबें न ठेवितां, फरासिसांचीं जहाजें श्रीमतांचे राज्यांत हरएक बंदरीं साहुकारीस वगैरे मजकुरास एकंदर येऊं देणार नाहीं. जंवपावेतों खुदायवंद न्यामत हनराबल कोंपनीसीं व एकबलपन्हा श्रीमंतासीं दोस्ती आहे, तंवपावेतों चालेल. श्रीमंतांकडून फरासिसाचे जातीसीं मतलब ठेवण्याचा दरकार नाहीं. याप्रमाणें करार. तारीख छ १ माहे जमादिलावल. ता० २९ मे इंग्रेजी सन १७७८."



## ५१. मुसा नारजाचें पत्र.

मुसा नारज ह्या नांवाचा एक फिरंगी गोलंदाज पेशव्यांच्या सैन्यामध्यें होता. ह्यानें बोरघाटच्या लढाईंत आपली कामगिरी व्यक्त केल्याचा उल्लेख जुन्या कागदपत्रांत सांपडतो. ह्यानें, इंग्रजांचा सेनापति इष्टुर फांकडा (क्याप्टन स्टुअर्ट) ज्या लढाईंत पडला, त्या लढाईचें दुसऱ्या टोळींतील वर्तमान 'केसो पंडत' ह्या इसमास लिहिलें आहे. इष्टुर फांकडा ता. ४ जानेवारी इ. स. १७७९ रोजीं कार्ली येथें मेला. त्यानंतर तीन दिवसांनीं ह्मणजे ता. ७ जानेवारी इ. स. १७७९ रोजीं लिहिलेलें हें पत्र आहे. ह्या पत्रावर मुसा नारज ह्याची इंग्रजी लिपींत सही आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्रीं. ता. ७ जानेवारी इ. स. १७७९.

"आजदिल कदर केसो पंडत सलामहूं आजज्याहा मुसा नारज कपितान बादजदुवा सलामांकी येथील खैरसल्ला जाणोन आपली खबर लिहीत जावी. दिगर आजचें वर्तमानः–रा० भीवराव यांचे बरोबर पुढें गेलों होतों. सरकारच्या तोफांचे अगोदर दोनचार गोळे त्यांचेच गोलंदाजांनीं टाकले. मग आह्मांस सांगितलें कीं, तुमचे गोलंदाजांहातीं गोळे टाकावे. त्याजवरून आपले गोलंदाज यांजहातीं सबसीमन तोफ सरकारची आहे, तिचे वीस गोळे टाकविले. आपला गोळा त्यांचे गोटांत जाऊन पडत होता. याप्रमाणें टाकिले. त्यांचे लोक डेऱ्याबाहेर निघून, गोळ्यांचे मार वांचवून उभे राहिले. त्यांजकडील दोन आसामी पेंढारी यांनीं धरून आणिले. एक

मुसलमान व एक धनगर आहे. त्यांणीं वर्तमान सांगितलें कीं चार पलटणें व तोफा १५ आहेत. परवांचे दिवसीं त्यांजकडील इष्टोल फांकडा सरदार होता तो पडला. ऐसें त्यांणीं सांगितलें. यांजकडील वर्तमान तरी, आज कूच करून लढाईस गेले. मागें लष्करांत हुल्लड पडून कूच होऊन तळेगांवीं मुक्काम केला. घोडेस्वार तरी एक पुढें होत नाहींत. अवघे एके ठिकाणीं जमा होतात. तोफांचे बार मांत्र करितात. लागू जाले तर उत्तम. नाहीं तरी उत्तम. त्यांचा तिकडे मुक्काम जाला ह्मणजे यांणीं कूच करून मागतीं मुकामास यावें, याप्रमाणें यांची तऱ्हा आहे. आज कूच करावयाचें कांहींच कारण नव्हतें. त्यांसीं आपल्यासीं साहा कोसांचें अंतर आतां आहे. याचा आंतील अर्थ सर्व समजला. त्याहावें ऐसा अर्थ नाहीं, व त्यांजकडील करनेल सरदार होता त्यास जखम लागून मुंबईस गेला. फांकडा पडला. याप्रमाणें वर्तमान आज धरून आणिलें त्यांनीं सांगितलें. त्याचेही ठिकाणीं, आणखी सरदार होते त्यांस बसवून, त्याचें नांव चालवितात. ऐसें मुष्टीण आहे त्यांणीं केलें, व आज गोळे टाकिले. त्यास त्यांजकडील एक डेरा पडला. आपली पुण्यांतील रवानगी करण्याविषयीं आह्मी बेफिकीर आहों. आपला भरंवसा आहे. आबरू तुमचीच आहे. रा। छ १८ जिल्हेज."



श्री.

## ५२. मराठ्यांचा दिल्लींत अंमल.

[मेणवलीदप्तर.] इ. स. १७७२.

"राजश्रीया विराजित राजमान्य राजेश्री हरिपंत स्वामींचे सेवेसी—

पोष्य रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेषः-तुह्मीं दोन पत्रें पाठविलीं, तीं पावलीं. आपण श्रीवाराणशीहून कलकत्त्यास गेलों. लाटियलसाहेब फिरंगी यास भेटलों. सरकारचे पोशाख व रकम नेली होती, ती गुजराणिली. तेथील सर्व भाव पाहून बिदा घेतली. फिरंगियाकडील हत्ती, टांकण वगैरे तोफे दिल्हे, ते घेऊन आलों. मागाहून जनरेल फिरंगी आला. त्यास भेटावयास नवाब सुजाआतदौले व पातशाहाचे दिवाण मुनिरुदौले आले आहेत. यांची मसलत काय होते, तो भावगर्भ मनास आणून भेटीस येतो. ह्मणून विस्तारें लिहिलें, तें कळलें. उत्तम आहे. इकडील मजकूर तरीः— आह्मी फरकाबादेहून कूच करून दिल्लीस आलों. दिल्ली शहर व किल्ला हस्तगत करून सरकारचा अंमल बसविला. किल्ल्यांत ठाणें सरकारचें ठेविलें. द्वाही पातशाहा अलीगोहर यांची फिरविली. याउपरी पातशाहातीचा बंदोबस्त करावा; फौजेचे खर्चास पैका मेळवावा; इरादा आहे. ऐशास मुनिरुदौले व फिरंगी जनरेल व नवाब सुजाआतदौले यांची भेटी तुह्मीं घेऊन, आह्मीं सदरहू कार्य अवलंबिलें आहे, यास अनुकूल होतात किंवा काय मनसबा आहे, हा भावगर्भ पुर्ता मनास आणून, फिरंगियाकडील हत्ती वगैरे तुह्मांबरोबर आहेत ते घेऊन, आह्मांकडे यावयाचें करणें. वाराणशीहून

•कलकत्त्यास जातेवेळेस बळवंतसिंग राजा याचे भेटीबद्दल वगैरे सरंजामास जास्ती साडेचारशें रुपये लागले; ते राजेश्री सदाशिव नाईक बांकडे यांचे कर्ज घेतले आहेत. ते द्यावे लागतात, तरी पाठवावे ह्मणून लिहिलें. त्यास तुह्मीं येथें आलियावरी येविसींचा जाबसाल होणें तो होईल."



श्री.

[ सातारादप्तर. ] **५३. दमाजी गायकवाडाचें पत्र.** ता. ७ जून इ. स. १७६१.

"श्रीमंत राजेश्री दादासाहेबांचे सेवेसीः—

आज्ञांकित दमाजी गायेकवाड समशेरबाहादर दंडवत विज्ञापना ऐसीजेः– येथील क्षेम जेष्ठ शुद्ध पंचमी भानुवासरपर्यंत साहेबांचे कृपावलोकनेंकरून खस्त क्षेम जाणोन, साहेबीं आपले खानंदाभिवृद्धी सदैव लेखनाज्ञा करून पत्रीं सांभाळीत गेलें पाहिजे. विशेषः– आह्मीं या प्रांतीं आलियावर इकडील साकल्यवृत्त लिहिलें होतें; त्यावरून विदित जालेंच असेल. हिंदुस्तानाचे गर्दीमुळें इकडील अविंध व कैवर्तक व मवासी सर्व बहकून गेले. खंबाइतकर मोंगल यानें तों अतिशय लोक गांवें मारिलीं. राजेश्री आपाजी गणेश खंबाइतेस येऊन त्याचें पारपत्य करावें, किंवा सलूख करून मामलत चुकवावी या उद्देशें, महिना पंधरा दिवस धामधूम केली; परंतु त्यानें थाक लागों दिला नाहीं, व जरी फर्मान आणून त्याजवर लांब लांब गोष्टी सांगूं लागला व फौज शिबंदीही ठेवून शहरास दंगा करावा हें मानस. त्याउपरीं पंतमशारनिल्हे अमदाबादेस शहरचे बंदोबस्तास गेले. आह्मी वैशाख शुद्ध २ दाखल बडोदियास जालों. चिरंजीव राजेश्री खंडेराव गायेकवाड हिमतबाहादरही आले. त्यांच्या भेटी जालियावर त्यासही पेटलाद व नडियाद वगैरे माहालांचे बंदोबस्तास रवाना केलें. तों आपाजीपंत यांनीं कमालुधीखान यांजकडे कारकून पाठविला. आपल्यास कुमकेस बोलावून घ्यावें या अनुसंधानास लागले. त्याजवर त्यानें मुद्दे घातले जे, दरमांहा तीस पस्तीस हजार रुपये द्याल तर येऊं. त्यास हे कार्यामुळें मान्यही करिते, परंतु परस्परें आह्मांस वर्तमान कळलें. त्याजवर आह्मीं आपाजी गणेश यांस निषेध करून लिहिलें कीं, ऐसी मसलत भारी तुह्मांस कोणती पडली; आणि तुह्मी याचा इतबार धरितां! हे तो केवळ खंबाइतकरापेक्षां विशेष दंगल करावयास एक क्षण लाविणार नाहींत. त्याजवरून त्यांनीं ते मसलत टाकिली. उपरांत भगवान ताकपीर यांस खंबायतेस रवाना केलें. आह्मींही चिरंजीव राजेश्री गोविंदराव गायेकवाड यांस पागा व शिबंदी समागमें देऊन रवाना केलें. ते तारापुरावर जाऊन मुक्काम करून गांव मारिला. त्याजमुळें त्यास दहशत पडली. त्याउपर बाहेर निघाला नाहीं. गावांत ठाणें त्याचें होतें. तीनशें आरब व दीडशें राऊत एक दिवस भांडले, परंतु चिरंजीव व पागेच्या लोकांनीं नेट देऊन ठाणें घेतलें. आरब कांहीं मारले. कांहीं तोंडीं तृण धरून राहिले, ते

सोडिले. साहेबांचे प्रतापें नक्ष जाला. तेव्हां या कामावर मोंगल तहावर आला आहे. एका दो दिवसांनीं सलूख ठहरोन राजेश्री आपाजीपंताचा कमाविसदार खंबायतेंत जातील. यंदा पर्जन्य गुजरात प्रांतीं बहुत जाला. त्यामुळें रयतीनें खेडें केलीं; तें सर्व सडून गेलीं. खरीफ गेलें ह्मणोन रबी मेहनत करून लोकांनीं केली. तों तांबरा पडला, त्यामुळें सर्व गहूं बुडाले. येणेंकरून तोटे बेमबलग आले. त्यामुळें पुण्याचा वोढा राहिला. तोही आतां इकडे आलों आहो. सर्व बंदोबस्त करून पुढें रसदा घेऊन, कर्जाचा वोढा वारल्यांत आणूं. साहेबीं कृपावंत होऊन सावकाराचें समाधान करावें. कमालुद्दीखान व खंबायेतकर मोंगल उगेंच सरकारचें माहाल खाऊन गुलगलब्याचे वेळेस हे शैल्य होतात. याकरितां चित्तांत आहे कीं दसरा जालियावर फौजा पाठवून सर्वांस निर्मूळ करावें, आणि प्रांत सोडवावे. कमालुद्दीखानास श्रीमंत राजश्री भाऊसाहेब व रावसाहेब यांनीं उदंड पत्रें लिहिलीं कीं, तुह्मीं आपली फौज घेऊन येणें. सरकारची जागीर खातां, तुह्मीं चाकरीस यावें. परंतु त्याचें येणें न जालें. प्रतिउत्तरें देखिल सुधी न लिहिलीं. अंमळ विशम होतांच फौजा ठेवून, मुलुकाची खराबी करून दंगा करावयास पाहतात. याकरितां पारपत्य केलिया, दाहा पंधरा लाखांचा मुलूख सुटतो ऐसें आहे. यावर जे मर्जी ते प्रमाण. वरकड त्याचें पारपत्य आपलें विजयप्रतापें व्हावयास उशीर नाहीं. याचे आज मुद्दे बहुत कळले आहे. भडोचकरानेंही दंगा बहुत उभा केला होता. जंबुसर वगैरे मारावें ऐसें कळतांच, चिरंजीव राजश्री गोविंदराव गायेकवाड यांनीं बडोदियाहून फौज पाठविली. तेव्हां मोंगल भडोचेस माघारा नेऊन घातला. ते वेळेस राजश्री गोविंद गोपाळही जंबुसरीं होते. त्यांनीं सर्व निवेदन केलेंच असेल. निरंतर कृपापत्रीं आनंदवृद्धि करावयास लेखकास आज्ञा करावी. चरणदर्शन होईल तो सुदिन असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."



## ५४. दादासाहेबांचें स्वकृतिमंडन.

श्रीमंत दादासाहेब पेशवे ह्यांनीं नारायण पेशव्यांचा वध केल्यानंतर पेशवाईची गादी मिळविण्याचा मोठा जोराचा प्रयत्न केला. त्या वेळीं त्यांनीं महादजी शिंदे ह्यांस आपल्या स्वतःच्या कृतीचें मंडन करून जें गोड पत्र लिहिलें आहे, तें फार मौजेचें आहे. ह्या पत्राच्या योगानें दादासाहेबांची बाजू चांगली व्यक्त होतेः—

[ मेणवलीदप्तर. ]　　श्री.　　ता. २१ मार्च इ. स. १७७४.

"राजश्री माहादजी शिंदे गोसावी यांसः—

७ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ रघुनाथ बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. बिशेषः— सखाराम भगवंत व त्रिंबकराव व फडणीस या कारभारींयांवर सर्व भार येऊन, खांसा स्वारी करनाटकांस गेली. मागें त्यांणीं मन माने तैसा फितूर केला. मोंगलांनीं

मागितलें तें द्यावयास कबूल होऊन, सामील करून घेतलें. हें वर्तमान कर्नाटकांत हैदरखानाचे शेहावर गेलों त्या समयांत कळलें. तेव्हां त्याजकडील फडशा जाहला तैसा करून फिरलों. तो मजकूर पेशजीं एक दोन पत्रीं तुह्मांस लिहिलाच आहे. त्यास फितुरी व मोंगल एकत्र जाहाले, याजमुळें मनसुबा भारी पडला. त्याचे विचारांत या दौलतीस जक द्यावी ऐसें आहे. त्रिंबकराव यांणीं एक वेळ सडे फौजेनसीं .क्षेत्र पंढरपूरचे मुक्कामीं जुंझास येऊन नमूद जाहाले. तेव्हां सरकारच्या फौजा तयार करून लढाई केली. त्यांचा मोड होऊन त्रिंबकराव धरले गेले. दोन तीन जखमा भारी होत्या, त्यामुळें मृत्यु पावले. परंतु मागती सारे फितुरी व मोंगल जमा जाहाले आहेत. नाना प्रकारचे फितवे करितात. तुह्मांकडेही माहादाजी बल्लाळ पाठविले आहेत. लोभ दाखवून फितुरास बल पाडावें ऐसा त्यांचा विचार आहे. परंतु तुह्मीं त्यांसी साफ उत्तर केलेंच असेल. मुख्य गोष्ट, मोंगलांचे व फितुरी यांचें पारपत्य जाहल्याविना बंदोबस्त होत नाहीं. याजकरितां सर्व तिकडील कामें मसलती सोडून, फौजसुद्धां तुह्मीं व राजश्री तुकोजी होळकर यांसही फौजेसहवर्तमान घेऊन येऊन पोंहचावें. ये समई दौलत राखावी. भरंवसा तुमचाच आहे. आगोदर घर राखावें. मग साऱ्या गोष्टी घडून येतील. मागें तुमच्या वडिलांनीं या दौलतीच्या उपयोगी बहुत श्रमसाहास केलें, त्याप्रमाणें तुह्मींही हाल्लीं करून दौलत राखावी. यांत तुमचाही उपयोग व एकनिष्ठतेस उचित आहे. येविशीं फार ल्याहावें तरी तुह्मी सर्व समजतां. याउपर विलंबावर घालावयाचें नसे. या दौलतीचा भार तुह्मांवर आहे. सविस्तर वे॥ राजश्री व्यंकटराम शास्त्री लिहितील. त्यावरून कळेल. जाणिजे. छ २८ मोहरम सु॥ अर्बा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

## ५५. दादासाहेबांचा विरुद्ध पक्ष.

दादासाहेबांनीं मुत्सद्दी मंडळीच्या विरुद्ध वरील पत्र लिहिलें व आपला उद्देश किती चांगला होता हें उजळून दाखविलें. परंतु त्यांच्या विरुद्ध महादजी शिंदे व सखाराम बापू ह्यांचा जाहलेला पत्रव्यवहार पाहिला, ह्मणजे दोन्ही पक्षांचें खरें स्वरूप व्यक्त होतें.

### लेखांक १.

[ मेणवलीदप्तर. ]

पै॥ छ २ रोबल आर्बा. श्री. ता. २७ एप्रिल इ. स. १७७४.

"राजश्री सखारामपंतबापू गोसावी यांसः—

७ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेषः—आपण पत्रें पाठविलीं दोन छ १७ व छ २७ मोहरम असीं पाठविलीं. तीं छ ७ सफरीं पावलीं. श्रीमंतांनीं दगा करून त्रिंबकरावमामांस धरलें. मोंगल भोंसले सरकारची फौज कूच करून श्रीमंतांवर गेले. त्यांस वर्तमान कळतांच, कूच करून निघाले. सरकारची फौज व नवाब

भोंसले मागें आहेत. कदाचित् श्रीमंत पळत पळत खांदेशांतून नर्मदापार जाहले, तरी होऊं न द्यावें. तुह्मीं व होळकर एक होऊन आडवें व्हावें. श्रीमंतांस हस्तगत करावें. बलाबल पाहतां हें न बने, तरी तुह्मीं त्यांस न मिळावें. त्यांचा रस्ता चुकाऊन एकीकडे व्हावें. तुमची निष्ठा सरकारकामावर सदृढ. कधीं अंतर पडलें नाहीं. मोठीं मोठीं कामें तुह्मीं केलीं असतां, आतां येण्याचा प्रकार कांहींच दिसत नाहीं. राजश्री माहादाजीपंत गुरुजी तुह्मांस आणावयाकरितां पाठविले असतां, दिरंगावर पडलें. अतःपर दिवसगतीवर न घालतां जलद् येऊन पोहचावें. ईश्वरकृपेनें हे दिवस जातील. चिंता नाहीं. तुह्मांस उचित तें कराल ह्मणोन लिहिलें, तें कळलें. ऐसीयास त्रिंबकरावमामा मुनहेचा सरदार. समागमींच्या सर्वत्रांस त्याचा भरवसा असतां, सडे निघोन गेले. भोंसले व मोंगल कसे राहिले, याची पैरवी आपण कशी न केली ? आस्तु. होणाराप्रमाणें मामांची बुद्धि जाहली ! उपाय नाहीं. मामा धरले गेल्यानें बाजी थोडी कमी पडली. तत्रापि मोंगल व भोंसले व सरकारची हुजरात मागें आहे. त्यांत कोणी नामी सरदार आळा घालणाराविना आळा बसणार नाहीं. याची पैरवी लवकर करावी. फौजेस आळा घालून पाठलाग करावा. लांबणीवर मनसबा गेल्यास वर्षाकाल जवळ येतो, हें आपल्यास तपशिलें ल्याहावें असें नाहीं. सर्व आपणास समजतें. श्रीमंत नर्मदापार येणार. खांदेशांत स्वारी आली. तप्तीचांगदेववर मुकाम आला. पाठलाग लांब राहिला. यामुळें स्थिरतेनें येतात. इकडेही कारकून व पत्रें येतात. तीं बजिन्नस राजश्री गुरुजी पाहतात. आडवें व्हावें, नर्मदाअलीकडे येऊं न द्यावें, या अर्थी आह्मी छ १२ सफरीं मुहूर्तेंकरून डेरेदाखल जाहलों. राजश्री तुकोजी होळकरही डेरेदाखल जाहाले. श्रीमंतांकडे आह्मां उभयतांकडील कारकून गेले आहेत जे, इकडे न यावें. आल्यास ठीक नाहीं. आह्मी उभयतांही तूर्त लोकांचे समजाविसींत फसलों आहों. आजवर एकनिष्ठतेनें सेवा करून वडिलांनीं प्राणांच्या कुरवंडी केल्या. आह्मींही यंदा सरकारकामास प्राणाकडे पाहिलें न पाहिलें. साहा वर्षांचे मुलुकगिरींत मनसबा सुधरला कोणीं, व नासला कोणीं, हें सर्वत्र जगास ठावकें आहे. असें असोन मेहनत बरबाद जाहाली ! आपण शब्द लाऊन लिहितात, काय ह्मणावें ? लोकांच्या जाचणुकी परस्परें ऐकिल्यांत आल्याच असतील. कांहीं लोपल्या नाहींत. साहा वर्षांची समजाबीश लोकांची होणें. पैका नाहीं. कर्जही मिळेना. लोक निकड करून प्राणांशीं गांठ घालितात. लोकांचा गुंता निर्गम जाहल्याविना कोणीएक गोष्ट घडत नाहीं. तत्रापि बाहेर निघालों. नर्मदाअलीकडे येऊं देऊं, असें व्हावयाचें नाहीं. आमचें लक्ष आपणावेगळें नाहीं. जी गोष्ट अप्रण योजिली, ती सबळ पडावी या अर्थाची योजना होत आहे. याचा तपशील राजश्री गुरुजीबावा लिहितील, त्यावरून कळेलं. प्रस्तुत मोरो व्यंकटेश श्रीमंतांकडून आले आहेत. त्याजबा।र स्नेह व दाब दोन्ही प्रकार सांगून पाठविले आहेत. निश्चय कोणत्या अन्वयें त्याचा प्रत्यास येतो, तशासारखी पैरवी करण्यांत येईल. र॥ छ १५ सफर बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंति.'' मोर्तब.

## लेखांक २.

पै॥ छ १९ ज॥ खर खमस हा॥ प्यादे श्री. ता. २९ सप्तंबर इ. स. १७७४.

"राजश्री सखारामपंतबापू गोसावी यांसः-

५३ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—आपण पत्र पाठविलें तें पावलें. श्रीमंत इंदुरास गेल्यावर करार ठरविला त्याची यादी व पत्रें पाठविलीं, त्याचीं उत्तरें आपणावरच भार ठेवून पाठविलीं. त्याआलीकडे कांहीं जाजती खर्चास ऐवज लागेल अशीं बोलणीं होतात, व जाहगिरा व तैनातीचे व असाम्या सोडण्याचेही प्रकार कोण्ही बोलतात, असें परस्परें ऐकिल्यांत आलें. त्यास, आपण तरी अशी गोष्ट कोणाचीही ऐकिणार नाहींत. परंतु कोण्ही भीड घालील यास्तव सूचनार्थ लिहिलें आहे. येविशीं सविस्तर राजश्री महादाजीपंत गुरुजी यांस लिहिलें आहे. त्यावरून कळेल. दूरंदेशीनें सर्व अर्थ ध्यानांत आणून उचित दिसेल तें कराल ह्मणोन लिहिलें, तें व गुरुजींचे पत्रावरून सविस्तर कळलें. ऐसीयास श्रीमंत कैलासवासी यांसी दगा जाहला त्यापासून पाऊल वाकडें पडत गेलें. लाखों रुपये मसलतीस खर्च जाहले, परंतु उपयोग न पडला. श्रीमंत इकडे आल्यावर कोण घोळ जाहला, तो आपणासी कांहीं लोपला नाहीं. परभारा ऐकिलेंच असेल. आपण चित्तापासून मेहनतश्रम करितां, कीं श्रीमंतांचे राज्यांतील बखेडा तुटोन पूर्वानुसंधानाप्रमाणें सुरक्षित चालावें. त्यापक्षीं इकडील अन्य विचार नाहीं. परंतु श्रीमंत कर्नाटकांतून निघोन दर मजल इकडे आले. येथूनही पुढें जाऊं द्यावें, तरी घरकलहामुळें हिंदुस्थानी लोकांस फूस सांपडली. याच स्वारींत रोहिले व जाट वगैरे राजकारणें, मुलूक पैका हस्तगत व्हावा, तो पातशाहा व वजीर यांनीं घेतला आणि मजबूत जाहले. तमाम सुभे जाहगिरा वांटल्या. दोन लाख फौजेनिशीं वजीर बुंदेलखंडच्या रोखें व नजफखान लाख फौजेनिशीं मारवाड, आजमेर, जैपूर आदिकरून मुलखांत येणार. हें खूळ त्यांत जाऊन मिळतें, तरी भोसले इस्माइलखान व गाइकवाड हे अनकूलच आहेत. तेव्हां मोठा गाहाच होता. आह्मांवर याच प्रसंगीं दोन तीन वेळ कशी गुदरली, हें वर्तमान आपल्याही ऐकण्यांत आलें असेल. श्रीमंतांस कितेक प्रकारें बोध करून, मर्जी ठिकाणीं आणून, बऱ्हाणपुरानजीक घेऊन आलों. पुढेंही जसा प्रसंग पाहतों, त्याप्रमाणें राजश्री गुरुजी व आह्मी आपल्यास लिहितों. आपणही आह्मांवर भार ठेवून लिहित गेलां व लिहितां. त्यापक्षीं येथून लेहूं त्याप्रमाणें घडावें. म्हणजे येथें यांसीं बोलूं. तें प्रमाण पडून पुढें श्रीमंतांस विनंति करूं. तीस पेंच पडणार नाहीं. श्रीमंतांची मर्जी बहकिवणार बवघे आहेत. त्यांचीं मुलेंमाणसें सुटल्याचें वर्तमान येत नाहीं. तेव्हां तें मर्जींत अंतर पाडतात. याजकरितां वारंवार लिहितों. परंतु कोण्हा एकाचींही मुलेंमाणसें सुटल्याचें वर्तमान येत नाहीं. दुसरें, श्रीमंतांचे खर्चाची तंगचाई. श्रावणमासचा ऐवज देणें तो अद्यापि त्यांस पावत नाहीं. यामुळेंही हिसके बसतात. तरी समागमें मंडळी

आहे, त्यांचीं मुलेंमाणसें मोकळीं जाहल्याचीं पत्रें यावीं, व गुरुजी लिहितील त्याप्रमाणें ऐवजही आधीं आधीं पाठवावा. सर्व राज्याचा भार आपणावर आहे. तेव्हां मनसबा सुधरून यश आह्मांस ये, तेंच आपण करितील. ज्या गोष्टी उपयोगीं पडावयाच्या त्याच आह्मी व गुरुजी लिहितों. त्याप्रमाणें घडावें. वरकड कितेक साधकबाधक प्रकार गुरुजीशीं बोललों आहों. ते आपणास लिहितील. र॥ छ २१ जा॥खर.' बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंति."



## ५६. अबदालीकडून पेशव्यांस नजर.

इ. स. १७६३ सालच्या एका यादीमध्यें, अबदालीचा वकील गुलराज ह्याचे मार्फत, श्रीमंत राव व दादासाहेब ह्यांस पोषाख नजर आल्याचा उल्लेख आहे. ही यादी वाचण्यासारखी आहे. इ. स. १७६१ मध्यें पानिपतच्या लढाईंत मराठ्यांचा अपार नाश करणारा अबदाली, पेशव्यांस ता. ६ फेब्रुवारी इ. स. १७६३ रोजीं, पुनः बहुमानाचीं वस्त्रें पाठवितो, ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे.

[मेणवलीदप्तर.] श्री.

ब॥ अबदाली यांनीं गुलराज वकील याजबराबर पोषाक वगैरे पाठविले ते जमा सु॥ सलास सितैन मया व अलफ.

जमा जामदारखाना कापड सणगें एकूण ४८५ रुपयेः-राजश्री राव यांस चंद्र २२ रजब. २५ चिरा मुकसी १; ५० पटका कारचोबी १; ३० बालाबंदी १; ५० निमस्तनी कारचोबी १; १०० महमुदी १; २० गोषपेच १; १० काजलपेटी जरी १; २०० कुडता १. रु. ४८५. न. ८.

किताः—६२८ राजश्री दादांस. ६०० चंद्र २२ रजब. २५ चिरा मुकसी १; २० गोषपेच १; ६० पटका १; ३० बालाबंदी १; १५ काजलपेटी जरी १; १२५ महमदी जरी १; २०० कुडता १; १२५ कित्ता कुडता १; ६००.

२८ चंद्र ५ साबान; ३ टोपी सकलादी १; २५ पटका पस्मी १; २८ २; ६२८ १०; रु. १११३ न. १८.

जमा रत्नशाला चंद्र २२ रजब दागिनेः—.

२ राजश्री दादांस गुजारत भवानजी सुपेकर. १ शिरपेंच घाट मिनेगार; १ जेगा घाट मिनेगार. न. २.

२ राजश्री राव यांस गुजरात उदाजीं वाळूज खिजमतगार. १ शिरपेंच घाट मिनेगार; १ जेगा घाट मिनेगार; न. २.

जमा जिराईतखाना चंद्र १९ रजब. यांनीं गुलराज वकील याजबराबर पाठविली, ते जमा गुजारत सुलतानजी चव्हाण खिजमतगार. सुरया गोरी हिंदुस्थानी परज लाकडी मेण सांगली वाद्या बोईदारनामा सुमार. १ राजश्री दादांस. १ राजश्री राव यांस—२.



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः–दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक १ लें.] जुलै १९०९. [अंक १२ वा.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# आंगरे यांची हकीकत.*

"* * * कान्होजी आंगरे हे छत्रपति शाहू महाराज यांजकडे सातारियास जाऊन सरखेल असा मरातब घेऊन कुलाबियास आले. नंतर फिरोन शाहू महाराजांचे दर्शनास सातारियास गेले. त्या वेळेस बराबर मानाजी आंगरे होते. त्यांचें वय चौदा पंधरा वर्षांचें होतें. साताऱ्याबाहेर वाघ आला ह्मणोन महाराजांस बातमी आली. तेव्हां महाराजांची तमाम सरदारांस ताकीद होऊन खासी स्वारी निघाली. तमाम पथकें उभीं करून वाघ मधीं वेढिला; आणि ताकीद जाहाली कीं, ज्याचे अंगावरून वाघ जाईल त्याचें पारिपत्य होईल. कान्होजी आंगरे यांचें पथक पायदळ. बाकी पथकें स्वारांचीं. त्यांणीं वाघ हुसकाविला. तेव्हां आंगरे यांचे पथकाची फळी फोडून वाघ निघोन गेला. तेव्हां आंगरे यांजवर मर्जी नाखुष झाली. ते समयीं कान्होजीबावांनीं आपले सरदारास मनस्वी शिवीगाळ केली. त्या वेळेस मानाजीबावास राग येऊन, सरखेलीस अर्ज केला कीं वाघ मारून आणितों. त्याजवरही रागें भरले. तेव्हां तसेंच निघोन महाराजांस अर्ज केला कीं, वाघ जिवंत गेला; परंतु आज्ञा होईल तर मारून आणतों. लहान वय आणि उत्तर असें. ह्मणोन महाराजांनीं विनोदार्थ 'मारून आणा' ह्मणोन सांगितलें. तेव्हां ढाल तरवार घेऊन एकटेच बाहेर निघाले. महाराजांकडील तमाम सरदार कौतुक पहावयास पाठीमागें चालले. इतक्यांत वाघाची गांठ पडोन हटकून तरवारीनें वाघ मारिला. तेथून येऊन महाराजांस अर्ज केला कीं, आज्ञेप्रमाणें वाघ मारिला. त्या वेळेस महाराजांनीं शाबास ह्मणोन सर्फराजी केली. नंतर सरखेल कुलाबियास आले. आठ दहा वर्षांनीं लाडदीन (?) व विजरे (?) फिरंगी बारा पंधरा हजार मनुष्यें घेऊन कुलाबियाचे वेव्यास आला. अलिबागेंत उतरून हिराकोट घेतला. त्या वेळेस मानाजी आंगरे व उदाजी आंगरे दोघेच घोडीं फेरावयास ह्मणोन बाहेर निघाले. तसेच फिरंगी याचे गोटावर पडले. मोठी तरवार जाहली. अडीच तीनशें फिरंगी कापून काढिला.

---

* ही लहानशी बखर रा. रा. नारायण रघुनाथ देशपांडे मु० उरवडें ह्यांनीं आमच्याकडे पाठविली आहे. ही आंगऱ्यांचे वंशपरंपरेचे नौकर डबीर ह्यांनीं लिहिलेली असून, तिचा पहिला बंद गहाळ झाला आहे. ही बखर अनेक दृष्टींनीं बोधपर असल्यामुळें ती 'इतिहाससंग्रह'द्वारें प्रसिद्ध करण्यांत येत आहे. आमच्याकडे अस्सल बखरीची नकल आल्यामुळें तींत पुष्कळ हस्तदोष दिसून येतात.

ते समयीं मानाजीबावांस सोळा सतरा जखमा व उदाजी आंगरे यांस वीस-बेवीस जखमा लागल्या. मोठीच तरवार जाली. बारा पंधरा महिने वेढा होता. फिरंगी यास तोफेचे गोळ्यानें माडाचा नारळ उडोन कुशींत बसला. त्या धास्तीनें वेढा उठवून निघोन गेला. तो गोंव्याचे बाऱ्यावर जातांच मेला.

पुढें कान्होजीबावा वारल्यावर सखोजी आंगरे सरखेली करूं लागले. ते वारल्यानंतर संभाजी आंगरे धनीपणा करूं लागले. त्या वेळेस मानाजीबावाकडेस कुलाबियाची खबरदारी (होती). दरवाजाच्या किल्या याजवळ होत्या. दोन तीन महिन्यांनंतर मानाजीबावावर खासे राखेजवळ गेल्याचा आरोप आणोन धरावें असें केलें. हें यांस समजलें. तेव्हां चार पांच हजारांचा विषय जवळ होता. तो बांधून, पांच असामी माणसें हत्यारबंद तयार करून, आपण हत्यारें बांधून, घराचे ओटीवर बसले. इतक्यांत संभाजी आंगरे यांचें बोलावणें आलें. त्यांस सांगोन पाठविलें कीं, रात्रीस येत नाहीं, सकाळ येऊं. पहाट होतांच, पांच असामी घेऊन किल्याचा दरवाजा उघडोन, बाहेर पागर होती तेथील खासी नागीण ह्मणोन घोडी व सरसबोर ह्मणोन घोडा अशीं दोन घोडीं तयार करून घेऊन निघाले. आकसीसमोर भाटावर घोडीं फेरूं लागले. इतक्यांत संभाजी आंगरे यांस वर्तमान समजलें कीं, मानाजी आंगरे निघोन गेले. बुरुजावरून पाहूं लागले, तों आकसीसमोर घोडी फेरीत आहेत. तोफ भरावयास लागले. अशी चळवळ पाहून, घोडी हांकून, रेवदंड्यास फिरंगी याजकडेस आले. मागाहून त्यांची स्त्री भागीरथीबाईसाहेब यांहीं कोळणीचें सोंग घेऊन, बयासाहेब लहान होती त्यांस टोपल्यांत घालून रेवदंड्यास आली.

कान्होजीबावा यांची थोरली स्त्री लक्ष्मीबाई आईसाहेब यांचे पोटीं संतान कांहींच नव्हतें. त्यांची ममता मानाजीबावावर बहुत होती. सबब त्यांस संभाजी आंगरे यांहीं कुलाबियांतून घालविलें. ती निघून पुण्यास पेशव्यांकडे गेली. पेशवे यांहीं त्यांचा सन्मान बहुत केला. त्या वेळेस पेशवे यांहीं आईसाहेबांस कांदले गांव इनाम दिल्हा. ती पुण्यांतच होती.

संभाजी आंगरे यांहीं धोंडजी आंगरे यांस कुलाबेयास ठेवून आपण निघोन सुवर्णदुर्गास गेले. इकडे मानाजीबावांनीं दोन अडीचशें माणूस धरून, राजकोट व चेऊल मोंगलाजवळून आंगरे यांहीं पेशजीं घेतला होता, त्याचा भेद करून मानाजीबावांनीं घेतला. तेथें पांचशें माणसांचा जमाव ज्ाहला. तेव्हां फिरंगी याचा सलुखाच होता. नागावीयाहून साबाजी व तुकाजी येऊन भेटले.

नंतर मानाजीबावांनीं पालवाचे खाडींत महागिरीवर दाहिजा पाठवून, नागावीयाहून महादाजी राम व यांचे पुत्र विठ्ठल महादेव व त्रिंबक महादेव असे त्रिवर्ग कुटुंबसुद्धां रेवदंड्यास आणिले. पुढें मसलत करावी तर जवळ पैका नाहीं, व दारूगोळाही नाहीं. पेशव्यांकडून कुमक आणावी, तर लांबणीवर पडेल. तेव्हां सर्वांचा विचार ठरला कीं सध्यां इंग्रेजास सामील करावा. कारण, फिरंगी यांचें पाऊल कांहीं वांकडेंसें वाटलें. ह्मणोन महादाजी राम मुंबईस इंग्रजांकडेस गेले; आणि इंग्रजांस सांगितलें कीं, आमचें साहित्य करा. तेव्हां त्यांहीं सांगितलें कीं, आंगरे यांचा व आमचा दावा; त्यापक्षीं आह्मांस त्यांचें साहित्य करावयाचें नाहीं. महादाजी राम यांणीं उत्तर केलें कीं, 'आह्मी तुह्मांकडेस बोलावयास आलों, त्यापेक्षां तुह्मी अधिक काय मेळवणार आहां? या समयीं तुह्मी न ऐकाल, तर आह्मी विलायतेस पितसाव (?) करूं.' नंतर दुसरे दिवशीं त्यांहीं आपलें कौंसल भरिलें. त्यांत ठरलें कीं, या वेळेस यांचें साहित्य करावें. तेव्हां तह ठरावून, साहा हजार रुपये व पांच खंडी दारू व चार तोफा दिल्ह्या. फिरंगी कांहीं काबूवर होता. त्याणें सांगितलें कीं, सामान सरंजाम रेवदंडियांत उतरावा. तेव्हां यांहीं विचार केला कीं, काबूवर फिरंगी खरा. महागिऱ्या सामान आणावयास मुंबईस रवाना केल्या. त्यांस ताकीद केली कीं, रेवदंड्याचे बंदरीं महागिऱ्या येतांच, चौकशीकरितां महागिऱ्या खह्मास असें बोलतील. परंतु ऐकिलें न ऐकिलेंसें करून, भरघोसें राजकोटाखालीं जातांच, महागिऱ्या उपसून सामान जिकडील तिकडेस फारीख करणें. महागिऱ्या मुंबईस रवाना जाहल्या. महादाजी राम यांहीं सदर्हूप्रमाणें सामान घेऊन आले. बंदरांत चौकशी होत आहे, तों भरघोसें महागिऱ्या राजकोटाखालीं जातांच, सामान उतरून जिकडील तिकडे फारीख केलें. हें फिरंगी यांस समजलें. त्यांणीं मानाजीबावास सांगोन पाठविलें कीं, हें काय? सामान रेवदंड्यांत उतरावें, तें परभारें, चौकशी न होतां, राजकोटास गेलें! तेव्हां मानाजीबावा राजकोटाचे अंमलदारावर फिरंगी यांचे समाधानास्तव रागें भरले. यांजकडील लोकांचीं कुटुंबें रेवदंडियांतच होतीं. फिरंगी यांणीं मानाजीबावांस धरावें असें केलें. हें रात्रीस समजतांच, आपलेकडील लोक हुशार करून, शहरचे दरवाज्यामध्यें थोटा फिरंगी होता, त्याजजवळ दरवाजाच्या किल्या होत्या. मानाजीबावांनीं आपणच तरवार उपसून त्याजवळ उभे राहिले. आणि सांगितलें कीं, दरवाज्याच्या किल्या टाक; नाहींतर जीवें मेला जाशील. धास्तीनें त्यानें किल्या दिल्या. त्या घेऊन शहरचा दरवाजा उघडून, आपलेकडील लोकांचीं कुटुंबें घेऊन (काढून) चेऊलास फरमानबागांत राहिले. तेथें पांचसहाशें माणसांचा जमाव धरिला. नंतर कुमकेविसीं पेशव्यांकडेस राजकारण केलें. त्यांजकडून कुमक येई तों

फिरंगी यांणीं चेऊलची मशीद धरून, तेथें मोर्चा उभारून, राजकोटावर तोफांचा मार चालविला. तेथें एक लढाई मातबर जाहली. फिरंगी यांचा जमाव भारी. त्या लढाईत मानाजीबावांकडील लोक कचकरून घायाळ बहुत जाहले. पैका नाहीं व दारूगोळाही नाहीं. टिकाव कसा निघतो? तेव्हां मानाजीबावा वीतरागी होऊन कारभारी यांस बोलले कीं, 'आह्मी देशांतरास जातों!' तेव्हां साबाजी तुकाजीसुद्धां अवघ्यांचा विचार होऊन, त्रिंबक महादेव यांहीं उत्तर केलें कीं, 'साहेब असें बोलतात. तेव्हां आह्मी आपलीं कुटुंबें सुद्धां आपले बराबर निघालों. पुढें आमची वाट काय? तरी चार दिवस वाट पहावी. जे दिवशीं परिणाम नच लागे, ते दिवशीं आपलेजवळ अडीच तीनशें मनुष्य आहे. भलते ठिकाणीं जाऊन बचाव करूं. नाहींतरी आह्मी चार आसामी आहों. चौघेजण भिक्षा मागोन पोटास आपले घालूं. हा आमचा निश्चय आहे. आपण धीर सोडूं नये.' नंतर लोकांस दिलभरंवसा देऊन, चार दिवस तसेच ठाकून ठोकून राहिले. इतक्यांत पेशवे यांजकडून कांहीं दारूगोळा व पांचशें माणूस पुढें येऊन पोहोंचलें. मागाहून रामाजीपंत दुबाजीपंत पंधराशें माणूस घेऊन येऊन दाखल जाहले. एकूण अडीच हजार माणसांचा भरणा झाला. सारे लोकांची तयारी करून, फिरंगी मशिदींत होता त्यांजवर घातलें. मोठी लढाई जाली. फिरंगी याचा मोड होऊन पळोन रेवदंडियास आला. नंतर कुलाबेयांत भेदाचें राजकारण चाललें.

मल्हारजी कासार याजकडेस हवाल्याचें काम होतें. तो प्रथम भेदक. त्यास दहा हजार रुपये देऊं केले. नंतर कांहीं कांहीं सरदार भेदले. मल्हारजी कासार यांणीं कुलाबियाचे दरवाजे उघडे ठेवून, इशारा येतांच दोन हजार माणूस घेऊन मानाजीबावा कुलाबियांत शिरोन, धोंडजी आंगरे यांस कैद केलें. किल्ल्याचा बंदोबस्त करून, ज्या ज्या ठिकाणीं जे जे सरदार व दरकदार व कारकून कारखान्याबर होते, त्यांस दिलभरंवसा देऊन, त्या त्या ठिकाणीं कायम करून, बरोबरचें माणूस पांच सहाशें दरवाजाचे बंदोबस्तास ठेवून, बाकी लोक घेऊन, अलिबागेंत आले. इतक्यांत हिराकोटचे व सागरगडचे लोक येऊन भेटले. तेही दोनी किल्ले हस्तगत जाहले. पेशवे यांजकडील कुलाबेयांत पांच साहाशें माणूस शिरलें. तेव्हां रामाजीपंतांस व दुबाजीपंतांस कुबुद्धि जाहली कीं, आज यांचें ठिकाण हस्तगत जाहलें. त्यांहीं थोरले बाजीराव साहेबांस लिहिलें कीं, वेळ हीच आहे. तरी आपण त्वरा करून दिडा दिवसांत येऊन पोहोंचावें. हा मजकूर समजतांच, खांदेरीचें संधान आलें होतें, पेशवे सारे गुंडाळितात. तेव्हां रामाजीपंतांस व दुबाजीपंतांस

सांगितलें कीं, खांदेरीचें संधान आलें आहे; तरी खांदेरीस चलावें. खुब लढा हबसी यांजकडे होता. त्याचे वेळ्यास रामाजी सबनीस, संभाजी आंगरे याजकडून दीड हजार माणूस घेऊन तेथें होते. तेही लोकसुद्धां येऊन भेटले. कुलाबियाचे बंदोबस्तास त्रिंबक महादेव राहिले. त्यांजवळ आठशें माणूस कुलाब्याखेरीज आपले जिव्हाळ्याचे ठेऊन, बाकी सारा जमाव घेऊन खांदेरीस चालिले. गलबतें महागिरिया भरून निघाले. गलबताच्या नाळी बाहेर दिल्या. रामाजीपंतास व दुबाजीपंतास व देशचे लोक होते त्यांस दर्या लागोन ओकूं लागले. तेव्हां बोलों लागले कीं, आमचा उपाय नाहीं. खांदेरी केव्हां हातास येईल? त्यास सांगितलें आज येईल असें दिसत नाहीं. तेव्हां ते बोलले कीं, आमचा परिणाम नाहीं. त्या वेळेस त्यांस जमिनीवर उतरून, मानाजीबावा लोकसुद्धां खांदेरींत शिरोन, तेथील बंदोबस्तास आपले लोक ठेऊन, बाकी लोक घेऊन निघाले. तों दिडा दिवसांत बाजीरावसाहेब पालीस आले. इतक्यांत त्रिंबक महादेव यांनीं कुलाब्याचे दरवाजाचा बंदोबस्त करून, आंतील लोकांस ताकीद केली कीं, पाण्याचा तोटा आहे, तरी ज्यांस पाणी पाहिजे, त्यांनीं बाहेर जाऊन पाणी घेऊन यावें. दरवाजावर ताकीद केली कीं, बाहेर जाईल त्यास आंत घेऊं नये. जो प्राणी वगैरे आणावयास बाहेर गेला, त्यास आंत घेतला नाहीं. दोन प्रहर होतां, पेशव्यांकडील लोक बहुतेक काढिले. दीडदोनशें माणूस त्यांचे आंत राहिले. हजार माणसांचा आपला भरणा करून बंदोबस्त केला. बाजीराव साहेब दुसरे दिवशीं अलिबागेस येऊन दाखल झाले. मानाजीबावाही खांदेरीहून अलिबागेस आले. तेथें पेशव्यांकडील लोकांखेरीज मानाजीबावांचा आठ हजार माणसांचा भरणा झाला. हें बाजीरावसाहेब यांहीं पाहून स्तब्ध राहिले. रामाजीपंतास व दुबाजीपंतास शिवीगाळ केली कीं, 'इतके लोकांचा भरणा व असा किल्ल्यांतील बंदोबस्त असोन, आह्मांस कसें लिहिलेंत? येथें आणोन फिक्के पाडिलेंत. मी बाजीराव आणि नामोहरा होऊन चालिलों. इतकें माझे पदरीं तुह्मीं आणिलेंत!' मानाजीबावास बोलले कीं, 'आमचा खर्च व्यर्च जाहला, त्यापेक्षां आह्मांस कांहीं तरी असावें.' त्या वेळेस त्यांची आपली गोडी असावी हा विचार करून, बाजीरावसाहेबांस राजमाची व कोथळा हे दोन किल्ले व आघई, चोण व नसरापूर हे तीन महाल साठ हजारांचे देऊन रहस्य राखिलें. त्या वेळेस बाजीरावसाहेब यांहीं जानव्यांत हात घालोन मानाजीबावांजवळ निखालसपणाची शपथ केली, आणि सांगितलें कीं ज्या समयीं तुह्मांस काम पडेल, त्या वेळेस आह्मी तुमचें साहित्य करूं. अशा निखालसपणाच्या शपता होऊन बाजीरावसाहेब निघोन गेले.

नंतर साबाजी तुकाजी यांची रवानगी सातारियास महाराजांकडून बंदोबस्त करून घ्यावयास केली. ते जाऊन गोविंदराव चिटणीस महाराजांकडेस वकील करून बोलणें लाविलें. गोविंदराव चिटणीस यांहीं महाराजांस अर्ज केला कीं, 'कुलाब्याचें संस्थान मधीं. जवळ शत्रू. एकीकडेस इंग्रज व एकीकडेस हाबसी. संभाजी आंगरे यांचा कारभार अव्यवस्थित! सबब, मानाजी आंगरे यांहीं तें संस्थान काबीज केलें. किल्ले कोट महाराजांचे. हीं ठिकाणें मानाजी आंगरे याशिवाय यांचें रक्षण होणार नाहीं. याजकरितां कुलाब्याचें संस्थान मानाजी आंगरे यांजकडेसच कायम व्हावयाची आज्ञा असावी.' त्याजवर महाराजांची आज्ञा झाली कीं, 'मानाजी मर्द खरा; यासारिखा शिपाई नाहीं. हीं ठिकाणें तोच राखील. कुलाब्याचें संस्थान त्यास बक्षीस आहे. त्यांनीं येऊन वस्त्रें घेऊन जावें.' अशी आज्ञा जाली. त्याजवरून गोविंदराव चिटणीस यांहीं साबाजी तुकाजी यांची रवानगी कुलाब्यास केली. ते आल्यावर साताऱ्यास राजदर्शनास जावयाची तयारी करून, बराबर कारभारी साबाजी तुकाजी व त्रिंबक महादेव घेऊन, खासा स्वारी निघोन दरकूच साताऱ्यास आली. पूर्वीं संभाजी आंगरे वस्त्रें घ्यावयास साताऱ्यास गेले होते. वस्त्रें देतेसमयीं महाराजांची आज्ञा जाली कीं, सुवर्णदुर्गापासून पलीकडेस संभाजी आंगरे, व कुलाब्या अलीकडेस मानाजी आंगरे. याप्रमाणें महाराजांनीं वांटणी करून, सरखेलीचें पद संभाजी आंगरे यांस वस्त्रें देऊन सुवर्णदुर्गास रवाना केलें. संभाजी आंगरे जातेसमयीं पेशवे व चिटणीस व प्रतिनिधी खेरीज करून अष्टप्रधान, सरदार वगैरे शागीर्दपेशा महाराजांकडील अनुकूल करून घेतलें. कारण, मानाजी आंगरे यांस वस्त्रें होऊं नयेत अशा निमित्यें बहुत पैका खर्च करून निघोन गेले. इकडेस मानाजीबावा वस्त्रें घ्यावयास आले. त्यांस वस्त्रें होऊं नये म्हणोन महाराजांकडेस बहुतेकानें प्रयत्न केला. परंतु महाराजांजवळ गोविंदराव चिटणिसांची भीड बहुत. कोणाचेंही चालेना. वस्त्रें द्यावयाचे दिवशीं पूर्वीं मानाजीबावांस सूचना नव्हती. वस्त्रें तयार करून, शाहूमहाराज तख्तावर येऊन अष्टप्रधानसमेत वगैरे दरबार जाहला, आणि मानाजीबावांस वस्त्रें घ्यावयास बलावणें आलें. तों पूर्वींच मानाजीबावांनीं अमलाचा स्वीकार केला होता. त्याची चीड महाराजांस बहूत. हा मजकूर समजला असतां एकदां महाराजांची नाखूष मर्जी जाली असतां पुढें परिणाम काय? शत्रू बहुत आहेत. हें मोठेंच विघ्न आलें. हा विचार उभयतां कारभारी यांस बहुत पडला. इतक्यांत दुसरें बलावणें आलें. तों कारभारी यांनीं स्वारीचें तयारीचें औडंबर मांडलें. इतकियांत तिसरें बोलावणें आलें. त्यास सांगितलें कीं निघाले. तों पुढें चालता जाहला. त्रिंबक महादेव बोलले कीं, आतां

कसेंही होवो, आह्मी जातों. निघोन दरबारास गेले, आणि कुरनिशात करून उभे राहिले. अष्टप्रधान यांहीं विचारिलें कीं, महाराज बसोन वेळ बहुत जाहला. अद्याप तुमचे सरदार वस्त्रें घ्यावयास कां येत नाहींत? यांनीं महाराजांस अर्ज केला कीं, 'हुकुमाप्रमाणें मानाजीबावा निघोन घोड्यावर बसतांच एक शिंक जहाली. तेव्हां क्षणभर शिंकेस मान दिला. तों ज्या नक्षत्रीं वस्त्रें घ्यावीं, तें नक्षत्र सरलें. पुढें भरणी नक्षत्र, कुयोग प्राप्त जाहला. आतां हुकूम होईल तोच सुमुहूर्त.' तेव्हां गोविंदराव चिटणीस यांहीं उत्तर केलें कीं, 'मानाजी आंगरे बहुत सुज्ञ. महाराजां-कडील वस्त्रें कुयोगांत कशीं घ्यावीं? हुकूम होईल तर परवांची दिनशुद्धी चांगली आहे. त्या वेळेस वस्त्रें घ्यावयाची आज्ञा असावी.' 'बरें' ह्मणोन महाराज उठोन गेले. दरबार बरखास्त जाला. त्रिंबक महादेव आपले गोटांत आले. उभयतांनीं खाशांस अर्ज केला कीं, आज महाराजांची गैरमर्जीची मोठीच बाणी चुकली. तरी परवांचा दिवस अमलाचा आह्मांस बक्षीस असावा. खाशांनीं मान्य केलें. परंतु उभयतां कारभारी हे चौकीस खाशांजवळ नेहमीं बसले. एकानें बसावें व एकानें जावें, असे दोन दिवस लोटले. तिसरे दिवशीं वस्त्रें घ्यावयास जाण्याचे बेताप्रमाणें तयारी केली. महाराज दरबारास सारे मंडळीसुद्धां येऊन बसले आणि मानाजी-बावास बोलावणें आलें. तों तयारीच होती. तसेंच निघोन गेले. महाराजांहीं नवा मरातब 'वजारतमहा' असा देऊन, कुलाब्याचे संस्थानचीं वस्त्रें मानाजीबावास देऊन रवानगीचे विडे दिल्हे. गोटांत आल्यावर त्याच वेळेस, दोघां कारभाऱ्यांहीं मोठी चाकरी बजाविली, सबब दोघांस दोन गांव दिले. चांवरे गांव साबाजी तुकाजीस, व बोरघर गांव त्रिंबक महादेव यांस; व दोन गांव गोविंदराव चिटणीस यांस........मानाजीबावांनीं दरोबस्त इनाम दिले. महाराजांकडील कारभारी वगैरे शागीर्दपेशांची समजूत करावयास त्रिंबक महादेव यांस माघारा ठेऊन आपण दरकूच पुण्यास चालिले. पुण्यास येऊन आईसाहेबांचें दर्शन घेतलें. तेथून आईसाहेबांस बराबर बहुत सन्मानें (करून) घेऊन कुलाब्यास आले. इकडील सारे किल्लकोट हस्तगत होऊन दौलत करूं लागले.

पुढें............वर्षीं संभाजी आंगरे कुलाब्यावर चढाई करून, आरमार बमय. सरंजाम घेऊन आले. अलिबागेंत उतरून हिराकोट घेऊन कुलाब्याभोंवतीं जखडबंदी केली. कुलाब्यांत लोकांचा भरणा थोडका. किल्याकिल्याचे लोक कुमकेस आणावे तरी येऊन पोंहचत नाहींत, व किल्यांचा भरंवसा राहिला नाहीं. साबाजी तुकाजी उरणचे किल्याचे बंदोबस्तास गेले होते. ते तिकडूनच पुण्यास गेले. संभाजी आंगरे यांचा सरंजाम पोक्ता व लोकांचा जमाव भारी.

किल्ल्यांतील लोक हवालदील झाले. हिराकोटावरून मारगिरी तोफांची कुलाब्यावर होऊं लागली. आंत शिपाईलोकांचीं वगैरे कुटुंबें. आंत दाटीमुळें गलबल बहुत झाली. तीं कुटुंबें खांदेरीस काढावीं असा बेत झाला. परंतु कुलाब्याभोंवतीं संभाजी आंगरे यांचा बंदोबस्त बहुत. जाण्याची निभावणी कसी पडते? सिलेपोस तीन महागिऱ्या तयार करून त्रिंबक महादेव यांस सांगितलें कीं, मुलांमाणसांबरोबर तुह्मी जाऊन, खांदेरीचा बंदोबस्त पक्का करून, मुलेंमाणसें तेथें ठेवून या. दिवाणसाहेब सुद्धां झाडून खाशीं माणसें व कांहीं शिपाईलोकांचे कबिले तीन महागिऱ्या भरून पाऊणशें माणूस नामी नामी धारकरी चढवून महागिऱ्यांवर सुतार चढविले, आणि त्रिंबकजीबावास एकंदर ताकीद कीं, 'खबरदार, जर करितां संभाजी आंगरे यांचे आरमाराची गांठ पडली, तरी निभावणी न जाल्यास महागिऱ्यांस गाबडी करून बुडवून टाका व दारूगोळ्यास आग घाला. सारांश, त्यांचे हातीं मुलेंमाणसें न लागे असें करा.' विठ्ठल महादेव यांची रवानगी मुंबईस, इंग्रजांस कुमकेस आणावा ह्मणोन केली. महागिऱ्या रात्रीस हांकारल्या. त्या प्रहर रात्र राहतां खांदेरीचे बंदरांत दाखल जाहल्या. किल्ल्याचा हवालदार आंत घेईनासा झाला. त्यास सांगितलें कीं, तुह्मांस सरकारची खूण काय आहे? त्याणें सांगितलें कीं, त्रिंबकजीबावाचे हातची चिठी. तेव्हां त्रिंबकजीबावांनीं सांगितलें कीं, बाबासाहेबांस आह्मीच घेऊन आलों. तुह्मी आंत घेत असलां तरी बरें. नाहींतरी आह्मी महागिऱ्या हांकारून असेंच उरणास जाऊं, अथवा मुंबईस जातों. तेव्हां त्यांणीं विचार करून, तुह्मी एकटे आंत या, ह्मणोन सांगितलें. यांहीं उत्तर केलें कीं, आह्मी एकटे येणार नाहीं. पंचवीस असामींनिशीं येऊं. त्याणें या ह्मणोन सांगितलें. ते समयीं त्रिंबकजीबावांनीं चांगले पन्नास माणूस बराबर घेऊन उतरले. ते भरंवसें जाऊन दरवाजा काबीज केला. पंचवीस माणूस दरवाज्यांत ठेऊन, पंचवीस असामी बराबर घेऊन, श्रीवेताळाचे देवळांत गेले. तेथें चार सरदार व हवालदार व नाईक जमा करून, त्यांस विचारिलें कीं, तुमचे मनांत काय आहे तें वेताळाचे समक्ष बोला. त्यांणीं आपला साऱ्यांनीं विचार करून सांगितलें कीं, एक वर्ष तुमची चाकरी रोजमुऱ्याशिवाय फुकट करूं. नंतर मग किल्ला कोणाचे हवाला करणें तरी करूं. तेव्हां त्रिंबकजीबावांनीं सांगितलें कीं, हें निखालसपणें बोलतां? याप्रमाणें वेताळावर क्रिया करावी. त्यांणीं साऱ्यांनीं क्रिया केली. तेव्हां मुलेंमाणसें आंत उतरलीं. साबाजी तुकाजी पुण्यास गेले होते. त्यांहीं कुमकेस नानासाहेब व चिमाजीआप्पा पेशवे घेऊन आले. इकडे विठ्ठल महादेव मुंबईस गेले होते. ते जातांच इंग्रजांनीं दोन ग्याल्या रवाना केल्या. त्या घेऊन विठ्ठल

म्हादेव खांदेरीस आले. ते तेथें बाबासाहेबांजवळ राहिले. त्रिंबकजीबावा यांहीं आपले बराबरचे माणूस पन्नास खांदेरींत ठेवून, खांदेरचें पाऊणशें माणूस महागिऱ्यांवर कुलाबियास रवाना करून, आपण इंग्रजी ग्यालीवर चढोन आले. संभाजी आंगरे यांचे आरमारांनीं बाऱ्यावर इंग्रजी ग्याल्या पाहातांच, पावडें उठवून, गुराबा गलबतें निघोन, रेवदंड्यासमोर आलीं. इंग्रेजी ग्याल्या येऊन नांगरवाड्याजवळ बसल्या. तेव्हां संभाजी आंगरे यांची गलबल जाहली. बाहेर पडावयास वाट नाहीं. तेव्हां मानाजीबावांकडे सांगोन पाठविलें कीं, 'यामागें जाहलें तें तुह्मीं विसरून, या वेळेस आह्मांस जीवदान द्यावें.' यांहीं विचार केला कीं, पेशवे सध्यां जबरदस्त. हे सांपडले असतां दोहीं दौलतींस अपाय. दौलती बुडतात. ह्मणोन युक्तीनें काढोन दिल्हें. संभाजी आंगरे जातेसमयीं, मानाजीबावांची व संभाजी आंगरे यांची भेट कोळशाचे बुरजाखालीं होऊन, तेथें यांची त्यांची शपथ बेलभंडार जाहला कीं, संभाजी आंगरे यांहीं कुलाब्याचे दौलतीकडे पाहूं नये, व मानाजी आंगरे यांहीं सुवर्णदुर्गापलीकडे दौलतींत पाहूं नये. असे परस्परां लेखही होऊन संभाजी आंगरे यांस काढोन दिलें. आणि ग्याल्यांस इशारा होतांच, तोफांचे आवाज रिकामे मारीत मारीत, जाहलीचे बाऱ्यापावेतों पोहोंचून ग्याल्या माघाऱ्या फिरल्या. नानासाहेब व चिमाजीआप्पा हे कुमकेस आले. त्यांची समजूत काढली पाहिजे. संभाजी आंगरे वेळ्यास आले, त्या गल्बलींत उरणचा व पालीचा दोन्ही हवालदार नानासाहेबांस भेटोन ह्मणजे फितुर होऊन, दोनी किल्ले त्यांस दिले. तेच मानाजीबावांनीं नानासाहेबांस बक्षीस दिल्हे. असा करार करून दिल्हा. त्या वेळेस बाजीरावसाहेब वारले. ही बातमी अलिबागेचे मुक्कामीं आली. त्यांची क्रिया नानासाहेब यांही मुळ्याचे संगमावर करून पुण्यास गेले.

नंतर वर्षांनीं मानाजीबावा साताऱ्यास राजदर्शनास गेले. तेथें संभाजी आंगरे यांचे वकील नारो राम शेणवी यांहीं, महाराजांचे मेहुणे शिर्के यांजकडून महाराजांचे बायकांस भीड घालून, मानाजीबावांस मारवावें असा विचार केला. तेव्हां महाराजांचा हत्ती दलबादल बहुत मस्तीस आला होता. त्याणें वीस पंचवीस माणसें ठार मारलीं. त्याजवळ कोणाचाही जावयाचा उपाय नाहीं. साताऱ्याबाहेर अंदू खिळून ठेविला होता. महाराजांजवळ मानाजीबावांचे बळाची व शिपाईगिरीची आख्या बहुत होती. हा हत्ती आणावयास सांगितला ह्मणजे सहजच ते मेले जातील, असा अवघ्यांनीं घाट केला. परंतु महाराज पूर्णब्रह्म, ईश्वरी अंश. त्यांचे चरणारविंदीं मानाजीबावांची पूर्ण निष्ठा. हत्ती आणावयाचा घाट गोविंदराव चिटणीस यांस समजला. त्यांहीं कारभारी यांस सांगोन पाठविलें कीं, महाराजांकडील बोलावणें मानाजी-

बावांस आलें असतां, आमची भेट होऊन मग जावें. इतक्यांत महाराज दरबारांत येऊन बसले, आणि मानाजीबावांस बोलावणें पाठविलें. तें कारभाऱ्याचे समजुतींत न येतां, मानाजीबावा दरबारास निघोन गेले, आणि महाराजांस कुरनिशात केली. तों महाराजांची आज्ञा जाहली कीं, 'मानाजी, दलबादल हत्ती मस्तीस आला आहे, तो घेऊन येणें.' 'आज्ञा' ह्मणोन तसेंच निघोन त्या हत्तीजवळ आले, आणि श्रीवेताळजीचें स्मरण करून हत्तीजवळ उभे राहिले. आणि हत्तीस 'पाय दे' ह्मणोन बोलले. तेव्हांच हत्तीची मस्ती उतरून हत्तीनें पाय दिल्हा. पायावरून वरती चढोन किलाव्यांत बसले. गंडेकरी यांस सांगितलें कीं, पायांतील अंदू उखळ. त्यांणीं अंकुश देऊन अंदू उखळले. तेथून मानाजीबावांनीं हत्ती हांकोन नीट राजमहालाजवळ आणिला. खालीं उतरून महाराजांस कुरनिशात केली. महाराज हांसोन बोलले कीं, 'मानाजी, तूं निष्ठेनें पार पडिलास. शाबास.' ह्मणोन तोच हत्ती बक्षीस दिला. नंतर शिर्के खट्टू होऊन, कांहीं कळ करावी ह्मणोन, आपले घोड्याच्या सडका सोडून, घोडक्याबरावर यांचे गोठावरून घोडा पाठविला. तो मानाजीबावांनीं पाहिला. त्यास फिरावून आणविला. त्यास विचारिलें कीं घोडा कोणाचा? त्याणें सांगितलें कीं, शिर्क्यांचा. 'सडका आटोप' ह्मणोन त्या घोडक्यास सांगितलें असतां तो सडका आटोपिनासा जाला. ह्मणोन त्या घोडक्याचे दोन चार तोंडांत मारून सडका आटोपविल्या. त्या घोडक्यानें हा मजकूर शिर्के यांजवळ सांगितला. तेव्हां शिर्के यांस राग येऊन, मानाजीबावांचे गोठावर युद्धास जावें ह्मणोन लोकांची तयारी करविली. हें वर्तमान मानाजीबावांस समजतांच, आपण लोकांची तयारी करून, हत्यारें बांधोन, शिर्के यांजकडे सांगोन पाठविलें कीं, 'पुरता विचार करून जेवढे यावयाचे असतील तेव्हढे विलंब न करितां यावें. आह्मी तयार आहों.' हें वर्तमान महाराजांस समजलें. तेव्हां शिर्के यांस नेऊन फजीत केलें कीं, 'त्याजवर तुह्मी चालून जाऊन परिणाम काय? तो एकटाच निघाला असतां तुमचें इतक्यांचें पारिपत्य करील. त्यापुढें तुह्मीं हत्यार काय धरावयाचें आहे? त्यांणीं तुमचें पारिपत्य केलें असतां आमचा उपाय नाहीं. तुह्मीं कोणींही त्याचे वाटेस साफ जाऊं नये. तो आह्मीं एक पुंडच बाळगला आहे.' ते समयीं सारेच खट्टू झाले. नंतर महाराजांनीं रवानगीचीं वस्त्रें देऊन रवाना केलें. तोच दलबादल हत्ती बराबर घेऊन आले.

तिकडेस संभाजी आंगरे वारले. नंतर तुळाजी आंगरे साताऱ्यास जाऊन, महाराजांकडील सरखेलीचीं वस्त्रें घेऊन, सुवर्णदुर्गास येऊन दौलत करूं लागले. पैक्यांनीं व सरंजामांनीं बहुत जमले. पुढें शाहूमहाराज वारले. ते समयीं महाराजांकडील

सारीं स्तोमें (?) नानासाहेब पेशवे यांहीं बसवून, आपण सारे दौलतीचा बंदोबस्त केला. पेशवे बलवत्तर बहुत झाले. रत्नागिरी किल्ला बावडेकर यांचा आंगरे यांहीं घेतला होता, तो व सुवर्णदुर्ग असे दोन किल्ले, तुळाजी आंगरे यांजवळ पेशवे मागों लागले. यांणीं उत्तर सांगितलें कीं, 'सुईचे अग्राची मृत्तिका द्यावयाचा नाहीं' असें साफ उत्तर केलें. त्याजवरून नानासाहेब व भाऊसाहेब यांचे चित्तांत विषाद बहुत आला, व तुळाजी आंगरे यांणीं ब्राह्मणांस व रयतावेयास छडाछड बहुत मांडिली, व दुर्वृत्त भाषणें करूं लागले. तींही पेशव्यांचे कानावर गेलीं. ते समयीं रामाजी महादेव यांस सांगितलें, आणि तुळाजी आंगरे याजवर मसलतीचा योग मांडला. इंग्रज अनुकूल झाला पाहिजे, ह्मणोन रामाजी महादेव दोन हजार माणूस घेऊन उरणास आले. इंग्रजांकडील संधान जाहलें. सुवर्णदुर्गांत व विजयदुर्गांत वगैरे फितुराचीं संधानें रामाजी महादेव खेळूं लागले. इकडेस विकटगड किल्ला मानाजीबाबांकडील रामाजी महादेव यांणीं भेदानें घेतला. त्याखालील मुलूख बहुतेक गेला. तेव्हां कुलाब्याचे संस्थानचा खर्चवेंच कसा चालतो? सबब, साबाजी-बावा चिटणीस पुण्यास जाऊन संस्थानचें हरिद्र समजाविलें. ते समयीं नाना-साहेब यांहीं चाळीस हजार रुपये खर्चास दरसाल द्यावयाची मखलासी करून दिल्ही. परंतु रुपये हातास आले नव्हते. ते समयीं कुलाबा दग्ध झाला. तेव्हां किल्याचा सरंजाम भात वगैरे झाडून जळालें. लोकांचे खाण्याखर्चाचे हाल बहुत. दौलतींत पैका नाहीं. वोढीस बहुत पडले. त्या संधींत आनंदराव घाटगे हाबशाकडील सरदार हजार आठशें माणूस घेऊन कुळाब्यावर उतरला. ते समयीं मानाजीबावा यांहीं चार पांचशें माणूस घेऊन एक लढाई मातबर दिल्ही. तेव्हां मा-नाजीबावांचे मांडीस गोळी लागली. ती मांडींतच आडकली. बाहेर पडली नाहीं. त्या वेळेस यांजकडील लोक कचरले. आनंदराव घाटगे यांणीं थळास खुबलढ्यास दोन तीन मोर्चे दिल्हे. थळापासोन वरसोलीपावेतों दुतर्फा यांणीं बंद केलें. त्या वेळेस कुमकेस कोण आणावा, हा विचार पडला. ते समयीं सर्वांनीं ठराव केला कीं, या समयीं तुळाजी आंगरे कुमकेस आणावे. त्रिंबकजीबावांनीं सांगितलें कीं, त्यांचे मनांतील वांकडेपणा गेला नाहीं; समयोचित बिथर होऊं शकेल. तरी रामाजी महादेव उरणास जवळ आहेत, त्यांस आणावें. यास कोणाचाही रुकार न पडे. तेव्हां मानाजीबावांनीं तुळाजी आंगरे यांस पत्रें ल्याहावयास त्रिंबकजीबावांस सांगितलीं. यांहीं वाड्यांतील सर्वांचे नांवचीं पत्रें लिहिलीं. परंतु सुंदरा नायकिणीचे लेक मल्हारजी आंगरे यांजवर खाशांची ममता राघोजी-बावापेक्षां अधिक. तेव्हां खाशांस विचारिलें कीं, सर्वांचे नांवचीं पत्रें लिहिलीं;

परंतु मल्हारजी आंगरे यांचे नांवचें पत्र ल्याहावें किंवा नाहीं? खाशांनीं सांगितलें कीं, त्यांचेही नांवानें ल्याहावें. तेव्हां तीर्थरूप या मजकुराचें पत्र लिहिलें कीं, या समयीं आपण येऊन आमचा लेंकरांचा वडिलांनीं सांभाळ करावा, असें बहुत युक्तीचें लिहिलें. मल्हारजी आंगरे याची चीड तुळाजी आंगरे यांस बहुत होती. लखोटा भिडतेसमयीं मल्हारजी आंगरे याचें पत्र सारे पत्रांवर लाविलें. लखोटा देऊन पांडुरंग रघोजी सबनीस व जिजाजी खराडे यांची रवानगी केली. यांनीं जाऊन लाखोटा दिला. फोडून वाचूं लागले. तों प्रथम मल्हारजी आंगरे याचे नांवाचें पत्र पाहिलें. तेव्हां तुळाजी आंगरे यांस राग मनस्वी येऊन, मानाजीबावांस शिवीगाळ केली; आणि त्याच वेळेस पत्राचे जाब लेहून, या दोघांस शेलेपागोटीं बांधोन, आपले तर्फेचा दाहिजा भले माणूस यांचे बराबर देऊन, या दोघांस सांगितलें कीं, रघोजी आंगरे यांनीं येथें आह्मांजवळ यावें, व रघोजी आंगरे तुळाजी आंगरे यांचे लेक यांनीं हजार माणसांनिशीं कुलाबायांत रहावें. असें ठरत असेल तरी आह्मी कुमक करून हाबसी उठऊन लावितों. याप्रमाणें सांगून कुलाबियास रवाना केले. येथें येऊन खाशाजवळ तेथें शिवीगाळ झाली, तेव्हडा इत्थंभूत उच्चार केला. तेव्हां खाशास बहुत राग येऊन, तुळाजी आंगरे यांजकडील दहा असामी भले माणूस आले होते, त्यांचे समक्ष, भर कचेरींत तुळाजी आंगरे यांस शिवीगाळ करून, त्याच वेळेस त्यांजकडील दोन भले माणूस यांस दोन शेले पागोटीं बांधोन, त्यांजबराबर सांगोन पाठविलें कीं, 'तुमचे हजार माणूस कुलाब्यांत घ्यावयाचें प्रयोजन नाहीं. शेवटीं संस्थान पेशवे यांचे घरांत घालीन, परंतु तुह्मांस कुलाब्यांत घेणार नाहीं.' असें बोलून रवाना केलें. पुढें खाशासुद्धां सर्वांचा निश्चय ठरला कीं कसेंही होवो, परंतु रामाजी महादेव यांस आणावें. त्रिंबकजीबावा यांणीं रामाजी महादेव यांस आणावें. त्रिंबकजीबावा यांणीं रामाजी महादेव यांस पत्रें लिहून लखोटा करून.......यास रवाना केलें. रामाजीपंत यांनीं लखोटा फोडून पत्रें वाचून पाहिलीं, आणि त्याच बैठकीस शपथ केली कीं, यामागें झालें तें झालें; पुढें मी मानाजीबावांचे दौलतीकडे वांकडेपणांनीं पाहीन, तर माझे सप्त पुरुष नरकास जातील. अशी शपथ करून तीच लोकांची तयारी करून, कान्होजी गजे व संक्राजी बाजे दोन सरदार व दोन हजार दोघांचे माणूस घेऊन रामाजीपंत गलबतांत बसोन उतरले. ही बातमी येतांच खाशांनीं चार पांचशें माणूस तयार करून, गोळीची जखम झालेली असतां, तसेच वरसोलीजवळ उभे राहून, रामाजीपंतांस सामोरे त्रिंबकजीबावांस पाठविलें. रामाजीपंत श्रीनागोबाचे देवळाजवळ येऊन, लोक कंबरा सोडूं लागले. इतकियांत मानाजीबावांनीं दिल-

प्यार घोडी आणोन वर बसले, आणि घोडी हाकोन पांचशें माणसांसुद्धां खुबलढ्याजवळ मोर्च्यावर घातलें. ही बातमी रामाजीपंतांस समजली. त्यांनीं तशीच लोकांची कंबरबंदी करून निघाले. हे जाऊन पोंहचले नाहींत तों, मानाजीबावांनीं दोन्ही मोर्चे उधळोन, चार पांचशें माणूस कापून, आनंदराव घाटगाही मारिला. इतक्यांत रामाजीपंत जाऊन लोकांचीं हत्यारें वगैरे लुटतात, तों मानाजीबावा कुलाब्यांत आले. घोडीवरून चौघांनीं उतरले. तों जखमेंतून रक्ताचा मुसंडा चालला. त्यायोगें प्रकृति बहुत काईल जाली. त्रिंबकजीबावांनीं रामाजीपंतांची शिधापाण्याची वगैरे तरतूद थळास करून, खाशाकडेस आले. तेव्हां खासे सावध होऊन त्रिंबकजीबावांस सांगितलें कीं, तुह्मी जाऊन रामाजीपंतांची बरदास्त चांगली करून यावें. त्यांचे जेवणाची वगैरे तरतूद केली आहे, ह्मणोन सांगोन, फिरून रामाजीपंतांकडेस आले. दुसरे दिवशीं रामाजीपंतांनीं त्रिंबकजीबावांस विचारिलें कीं, मानाजीबावांचे भेटीचें कसें? त्यास सांगितलें कीं, खाशांची प्रकृति दोन दिवस काहील बहुत आहे. आपणास रेवदंडीयास जावयाचें, तेथें चलावें. नंतर भेटीचा समारंभ करावयाचा. बरें ह्मणून रामाजीपंत लोकसुद्धां रेवदंड्यास निघोन गेले. त्रिंबकजीबावा खाशांकडेस येऊन हा मजकूर समजाविला. दुसरे दिवशीं त्रिंबकजीबावांस व कृष्णाजी तुकाजी यांस रेवदंड्यास पाठविलें. हे रामाजीपंतांकडेस आले. तों देवपुजेस बसले आहेत. यांची भेट होतांच बोलले कीं, 'इतःपर मानाजीबावांविसीं माझे चित्तांत वांकडेपणा असेल, तरी याच देवाची शपथ.' ह्मणोन देवावर हात ठेविला. यांहीं उत्तर केलें कीं, मानाजीबावा निखालसपणें पेशवे यांचे पदरीं पडले, त्यापेक्षां आपल्यास कळेल तसें करावें. नंतर रामाजीपंतांनीं सांगितलें कीं, इतःपर कांहीं चित्तांत संशय आणूं नये. मी लेंक व तुह्मी बाप. असें मानाजीबावांस सांगून उदईक भेटी व्हाव्यां. बरें ह्मणून त्रिंबकजीबावांनीं निरोप घेतला. नंतर युक्ती करितां कन्होजी गजे व संक्राजी बजे यांची भेट घेऊन, त्यांस विचारिलें कीं, मानाजीबावा व तुह्मी जातभाई भेटीस येऊन कदाचित् मोहरा फसूं लागल्यास पुढें कसें? त्यांहीं सांगितलें कीं, 'आमचें दोघांचें दोन हजार माणूस आहे. जर करितां बलकुबल, तरी मानाजीबावांस कुलाब्याचे दरवाज्यांत पोंहचवून देऊं. मग ब्राह्मणाचे चित्तांत काय असेल तें करो.' अशा दोघांच्या शपथा निखालसपणें घेऊन त्रिंबकजीबावा कुलाब्यास आले. हा मजकूर खाशांस सांगून स्वारीची तयारी केली, आणि त्रिंबकजीबावांस पुढें रवाना केलें. खाशांची स्वारी मागाहून निघाली. त्रिंबकजीबावा रेवदंड्यास येऊन रामाजीपंतांस सांगितलें कीं, खासा स्वारी मळ्यावर आली; आंपली तयारी व्हावी.

त्याजवरून रामाजीपंतांनीं तयारी करून निघाले. यांच्या त्यांच्या भेटी श्रीरामेश्वराचे जवळ चेऊलास झाल्या. नंतर उभयतां येऊन देवळांत बसले. रामाजीपंतांनीं खाशांस व कारभारी मानकरी यांस वस्त्रें दिल्हीं, व खाशांनीं रामाजीपंतांस व त्यांजकडील मानकरी यांस वस्त्रें दिल्हीं. ते समयीं रामाजीपंत बोलले कीं, 'वजारत-माहां, इतःपर आपले दौलतीविषयीं तिळतुल्य वांकडेपणा होणार नाहीं. तुह्मी बाप व मी लेंक. यास साक्ष हा सांब.' ह्मणोन उठोन देवावरचा बेल बचकभर आणोन खाशांचे हातावर दिल्हा. आणि सांगितलें कीं, पुढें काय जीं बोलणीं असतील, त्यास उदईक त्रिंबकजीबावांस पाठवून द्यावें. ते व आह्मी बोलून आपल्यास येऊन समजावितील, त्याप्रमाणें करावें. असें बोलणें होऊन खासे निघोन कुलाब्यास आले. दुसरे दिवशीं त्रिंबकजीबावांस पाठविलें. प्रहर रात्रीस रामाजीपंतांचें बलावणें येऊन हे तेथें गेले. रामाजीपंत बोलले कीं, 'त्रिंबकजीबावा, तुह्मांविषयीं आमची खातरजमा जाली. हल्लीं आह्मीं काय जें प्रकरण केलें आहे, तें कोणास दाखवावें? तुह्मांसच दाखवावें.' असें बोलून रुमालांतील पुडकें कागदांचें सोडून यांचे पुढ्यांत टाकिलें. यांणीं संपूर्ण वाचून पाहिलें. तों सुवर्णदुर्गाचें व विजयदुर्गाचें भेदाचें प्रकर्ण. तुळाजी आंग्रे यांचे वाड्यांतील कुणबिणीपावेतों भेदाचा मजकूर, कोणास बक्षीस काय द्यावयाचें, व सरंजाम कोणास काय द्यावयाचे, त्याचे नांवनिशीवार नानासाहेबांचे व भाऊसाहेबांच्या हातच्या मखलाशा व इंग्रज अनुकूलतेचीं पत्रें; इंग्रज अनुकूल व्हावयाचें कारण तुळाजी आंग्रे यांचें आरमार मोठें, तीन पाल व सहा गुराबा वगैरे गलबतें मिळून सवाशें तरांडें, यांची जरब त्या वेळेस इंग्रजांस मोठीच होती, याजकरितां तोही रामाजीपंतांस अनुकूल जाहला; हें संपूर्ण प्रकर्ण दाखविलें. आणि सांगितलें कीं, या समयीं तुह्मीं कुमक केली असतां, नानासाहेब व भाऊसाहेब यांजजवळ सर्फराजी होईल. तरी या समयीं तुह्मीं कुमक करावयास अनमान करूं नये. आमची सर्व सिद्धता जाहली आहे. यांणीं उत्तर केलें कीं, खाशांस समजावून काय मजकूर ठरेल, तो येऊन बोलूं. असें सांगून निघोन कुलाब्यास आले. आणि हा मजकूर खाशांस समजावून त्या समयीं कुमक करावी असें संमत कोणाचेंही न पुरे. तेव्हां त्रिंबकजीबावांनीं खाशांस अर्ज़ केला कीं, येविसीं काय मजकूर आहे तो वेगळे वाटेनें समजावीन. तेव्हां खलबतास उठोन गेले. त्रिंबकजीबावांनीं सांगितलें कीं, 'रामाजीपंतांनीं, सारा मजकूर दाखविला. त्यास हे जातांच उरकतें. यांत तथा नाहीं. आपण तळीस मात्र हात लावला, इतकाच आहे. वरकड आपण कुमक न दिल्ही ह्मणोन ते ठेवितात असा अर्थ नाहीं. मग साहेबांची मर्जी.' तेव्हां दोन गुराब

व चार पांचशें माणूस द्यावें असें ठरलें. आणि त्रिंबकजीबावा रामाजीपंतांकडेस आले. आणि सांगितलें कीं, कुलाब्यास आग लागली, ते वेळेस झाडून सरंजाम जळाला. चाळीस हजार रुपये नानासाहेब यांहीं देविले. तेही हातास येत नाहींत. तेव्हां लोक जाण्याचा सरंजाम कसा होतो? त्याच वेळेस रामाजीपंतांहीं पलंगाखालचे दाहा तोडे दाहा हजारांचे ओढून दिल्हे, व दोनशें खंडी भात लोकांचे अडसेरीस दिल्हे. व त्याच बैठकीस नानासाहेबांस पत्र लिहिलें कीं, 'या समयीं मानाजी आंगरे यांचा उपयोग बहुत आहे. तरी चाळीस हजार रुपये आपण देविले, परंतु अद्यापि त्यांस पावले नाहींत. तरी, यांजकडील कारभारी तेथें साबाजी तुकाजी चिटणीस आहेत, त्यांचे पदरीं घालावे. सारांश, मानाजीबावा अनुकूल जाहल्याशिवाय कार्य व्हावयाचें नाहीं. हें पत्र पावतांच नानासाहेबीं चाळीस हजार रुपये चिटणीसबावा यांचे पदरीं घालविले. तेथून कांहीं कापड रुपये कुलाब्यास आल्यावर लोकांची व सरदारांची वगैरे सर्फराजी जाहली. नंतर दोन गुराबा व चार गलबतें तयार करून, चारशें माणसांची खर्चाची व अडसेरीची तरतूद करून, गुराबा बाहेर काढोन, वर लोक चढवून तयारी केली. इतक्यांत इंग्रजांचीं तरांडीं तयार होऊन आलीं. सारा जुमाव करून रामाजीपंत निघोन सुवर्णदुर्गावर गेले. तों भेदाचे संकेताप्रमाणें दरवाजे उघडे होते. तसेंच आंत, पुढें कान्होजी गजे शिरले. तेथें दहा वीस असामींनीं घायतळ केली. ते समयीं कान्होजी गजे यांस चार पांच जखमा जाहल्या; परंतु किल्ला काबीज केला. कान्होजी गजे यांस कुलाब्यांत रवाना केलें. तेथें खाशांनीं त्यांच्या जखमा बांधून बरदास्त चांगली केली. नंतर एक महिन्यांनीं विजयदुर्गावर मसलत केली. कांहीं लोक खुषकीनें व कांहीं जलमार्गानें, इंग्रजांचीं तरांडीं वगैरे आरमार, इंग्रजांनीं आरमाराकडून किल्ल्यास मार देऊन, तटबंदी फोडोन किल्ला जेर केला. तेव्हां तुळाजी आंगरे बाहेर पडले. त्यांस बाहेर धरून इंग्रज किल्ल्यांत शिरला, आणि किल्ल्याची लूट करून, मालमवेसी इंग्रजांनीं बहुतेक लुटून, तुळाजी आंगरे यांचें आरमार जाळून टाकिलें. मागाहून रत्नागिरी वगैरे किल्ले तुळाजी आंगरे यांचे रामाजीपंतांनीं काबीज केले. त्या वेळेस नानासाहेब यांहीं इंग्रजांस बाणकोट व दासगांव हे दिल्हे. तुळाजी आंगरे यांची दौलत सारी काबीज करून त्यांस नेऊन कैदेंत ठेविलें. नंतर चार पांच वर्षांनीं सुंदर जनार्दन व साबाजीबावा यांहीं फिरोन विकटगडाचा भेद केला. हें वर्तमान नानासाहेबांस समजलें. तेव्हां कुलाब्यावर मसलत करावी असें ठरोन, दोन हजार स्वार व दोन हजार गाडदी तयार केले. हें वर्तमान मानाजीबावांस समजलें. तेव्हां मोठाच विचार पडला. पुढें परिणाम कसा लागतो? तेव्हां साबाजीबावांनीं खाशांस सांगितलें कीं, 'हें निमित्त आम्हांवर आलें, त्यापेक्षां आम्हीच

पुण्यास जातों. आमचें काय करतील तें करोत.' असें बोलोन निरोप घेऊन प्रस्थान केलें. रात्रीस खाशांनीं त्रिंबकजीबावांस विचारिलें कीं, पुढें कसें करावें? यांणीं सांगितलें कीं ही वेळ कठीण दिसते. या वेळेस आपण खाशांनींच निघोन पुण्यास जावें, आणि नानासाहेबांस सांगावें कीं, हें संस्थान आपण आटोपावें. आह्मी आपले जवळ हुजूर राहून, काय आपण पोटास देतील त्यांतच गुजराण करूं. स्वार व गाडदी पाठवून मुलखाची खराबी करावी, इतका अट्टाहास कशास पाहिजे? कोण पाहिजे तो पाठवून संस्थानचा बंदोबस्त करावा. असें साफच बोलावें. कदाचित् येथेंच राहावें असें बोलतील. मग कसें तरी नानासाहेबांचे चित्तांतून हें संस्थान घ्यावें असें आहे. तरी त्यापुढें आपला परिणाम कसा लागतो? त्यापेक्षां कसेंही होवो, आपण जावें. ही साफी बरी. असें खाशांचे चित्तांत येऊन तयारी करवा ह्मणोन आज्ञा जाहली. त्यावरून दुसरे दिवशीं मुहूर्त पाहून चिटणीसबावा पाइनाडास गेले. तेच दिवशीं किल्ल्याची तोफ मारून मुहूर्तानीं खासे बाहेर अलिबागेस प्रस्थानीं आले. दुसरे दिवशीं चिटणीसबावा नागोठण्यास गेले. तों खाशांनीं मुक्काम पोइनाडचा केला. असें एक मजलेचे फेरानें खासा स्वारी चालली. चिटणीसबावा पुण्यास गेले. तेच दिवशीं खासा स्वारी चिंचवडाहून निघाली, आणि सांडणीस्वार पुढें नानासाहेबांकडे रवाना केला. त्याजबरोबर चिठी पाठविली कीं, आह्मीच आपले भेटीस आलों. नानासाहेब भोजन होऊन बसले होते. तों चिठी पावली. कोठें मानाजीबाबा आले ह्मणोन विचारिलें. त्याणें सांगितलें कीं औंधावर स्वारी आली. त्याजबरोबर सांगोन पाठविलें कीं, आपण औंधावर खोळंबावें; आह्मीच येतों. तसेंच नानासाहेबांनीं पागोटें घालून, भाऊसाहेबांस सांगोन पाठविलें कीं, मानाजीबावा औंधावर आले. त्यांस पुढें सामोरे जावयास आह्मी निघोन चाललों. तुह्मींही लवकर यावें. वाड्याचे दिंडीदरवाजानें नानासाहेब बाहेर पडले. इतक्यांत भाऊसाहेबही आले. पुलाजवळ येतात तों दोन तीनशें स्वार जमले. जिलीबीचे लोक पुलापुढें जमले. मानाजीबावांस सांडणीस्वार औंधावर भेटला. त्याणें सांगितलें कीं, नानासाहेबांचें सांगणें औंधावर खोळंबावें. त्रिंबकजीबावांनीं खाशांस सांगितलें कीं, त्यांचें सांगणें आहे, परंतु आपण वाट पाहूं नये. हळहळ चालतें व्हावें. जेथें गांठ पडेल तेथें पडो. पुढें चालले. तों नानासाहेबांची स्वारी गणेशखिंडीचे मैदानांत आली. यांचें त्यांचें हांकेचें अंतर राहिलें. इतक्यांत खासे घोड्यावरून उतरोन पायउतारा चालले. नानासाहेब यांहीं पायउतारा पाहून आपणही उभयतां घोड्यावरून उतरले. इकडील व तिकडील मानकरी यांच्या भेटी होऊन खाशांची भेट जाली.

# २५. गोपाळनाईक तांबवेकर.

सातारा जिल्ह्यांत वाळवे तालुक्यांत कासेगांवाजवळ कृष्णातीरीं तांबवे ह्मणून गांव आहे तेथील हा राहणारा. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत सराफीच्या धंद्यावर ह्यानें लाखों रुपये मिळविले. पुढें काशीपासून रामेश्वरापर्यंत ह्यानें आपल्या पेढ्या स्थापिल्या व कोट्यवधि रुपयांची संपत्ति मिळविली. थोरल्या बाजीरावास लक्षावधि रुपये कर्ज देणारा जसा परशुराम नाईक अनगळ, तसा महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबावा ह्यांस कर्ज देणारा हा गोपाळ नाईक तांबवेकर. ह्यानें बत्तीस-शिराळे येथील जहागीरदारीण पार्वतीबाई भोंसले हिजकडून, कृष्णातीरीं मालखेड ह्मणून गांव आहे तो खरेदी घेऊन, तो ५४ ब्राह्मणांस अग्रहार दिला. ह्या ५४ ब्राह्मणांत चारही वेदांचे, निरनिराळ्या पंथांचे, त्याप्रमाणें देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे आणि शेणवी असे निरनिराळ्या पोटभेदाचे ब्राह्मण, यांचा संग्रह दृष्टीस पडतो. त्या वेळीं शेणवी हे त्रिकर्मी. क्षत्रिय, वैश्यांप्रमाणें त्यांस तीन कर्मांचा अधिकार; ते षट्कर्माधिकारी नाहींत; अशी तक्रार उत्पन्न होऊन पुण्यास मोठा वाद झाला. तेव्हां शेणवी हे षट्कर्माधिकारी गौडांपैकीं आहेत असा निर्णय वादांतीं रामशास्त्री आदिकरून पंडितांनीं दिला, व त्याप्रमाणें गोपाळ नाईक तांबवेकरांचे दानपत्रांत एका वैदिक दशग्रंथी शेणव्याचें नांव घालण्यांत आलें. हा गांव सांप्रत कऱ्हाड तालुक्यांत असून दानपत्रीं लिहिलेल्या ५४ ब्राह्मणांच्या वंशाकडे चालत आहे. हा गांव देतांना प्रत्येक ब्राह्मणास एक पाचखणी तिघई घर, पुढें आंगण, मागें परसूं व शौचकूप असें, पांच माणसांच्या प्रपंचास लागणारीं भांडीं व एक वर्ष पुरेल इतकी अन्नसामुग्री, अशा प्रकारची तजवीज करून दिली. इनामगांवास सरकारकागदीं हल्लीं गोपाळ नाइकाच्याच वंशजांचें नांव आहे, व ते वंशज मालखेड येथेंच राहतात. मालखेडास कृष्णातीरीं एक घाट व विष्णुमंदिर गोपाळ नाइकांनीं बांधलेलें आहे.

गुजराथेंत डाकुरजीचें प्रसिद्ध देवालय आहे. त्या देवस्थानची लाखों रुपयांची जिनगी होती; तिची अव्यवस्था झाली. तेव्हां श्रीमंत गायकवाड सरकारांनीं देवस्थानची सुव्यवस्था करून गोपाळ नाईक ह्यास देवस्थानचे व्यवस्थापक व वंशपरंपरेचे वहिवाटदार नेमिलें. गोपाळ नाइकानें लाखों रुपयांची संपत्ति ह्या देवस्थानास अर्पण केली. हल्लींचे वहिवाटदार गोपाळ नाइकांचेच वंशज आहेत. हे जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण.



## २६. पेशवेसरकारचे अठरा कारखाने व त्यांवरील अधिकारी.

१ तोफखाना—१ सखारामपंत पानशे, २ गणपतराव विश्वनाथ पानशे, ३ माधवराव कृष्ण पानशे, ४ जयवंतराव पानशे. दारूगोळा, खलासी वगैरे कामगार, रखवालीचे गाडदी, गाड्यांचे बैलसुद्धां कारखाना तयार होता.

२ पीलखाना—ह्यांत हत्ती शंभर होते. सरदार—१ भगवंत परशजी व २ अलीमहात. कारकून रामचंद्रपंत गाडगीळ.

३ उष्टरखाना—गणपतराव मोरेश्वर. ह्यांत उंट अजमासें १००० एक हजार.

४ शिलेखाना—सदाशिवपंत वाकणकर.

५ फरासखाना—राघोपंत आंबीकर यांजकडे. खरड्याच्या स्वारींतील डेरे राहुट्या वगैरे दलबादल डेऱ्यांसुद्धां.

६ कोठी
७ लकडखाना
८ इमारत
९ बागा
१० कुरणें
११ वहीतकोठी
१२ रथखाना
१३ पुणें पेटा

—हे सर्व कारखाने नारो शिवराम खासगीवाले यांजकडे होते. खासगीवाले यांचे हाताखालीं कारभारी गणेशपंत सटंगे. पुणें पेटा ह्या कारखान्यांत धरलेला आहे. तो ह्या कारखान्याच्या खर्चाकडे होता किंवा कसें तें समजत नाहीं.

१४ थट्टी—नारायण रामचंद्र पुणें सुभा यांजकडे.

१५ पोतें व जामदारखाना—शामराव कृष्ण पोतनीस.

१६ जिन्नसखाना व वैद्यशाळा—शामराव बाबूराव करमरकर यांजकडे.

१७ पुस्तकशाळा—गोविंदपंत आपटे.

१८ खासगी—नारो शिवराम खासगीवाले.

## २७. पेशव्यांच्या पदरचे प्रसिद्ध महात.

हल्लीं अंबारी व हौदे घालून हत्ती शोभेखातर फिरविणारे महात आहेत, तसे हे महात नव्हत. ज्या वेळीं हातघाईची लढाई होऊं लागेल, त्या वेळीं हत्तींच्या सोंडांत पट्टे देऊन, ते हत्ती शत्रूच्या फौजेंत चालवावे लागत. हे हत्ती शिकवून तयार केलेले असत. ते आपल्या लांबलांब सोंडांत धरलेले पट्टे दोन्ही आंगांस सपाटून सपासप जोरानें चालवीत व शत्रूकडील फौजेची कत्तल उडवीत. हे हत्ती चालवि-

ज्याचें मोठें कसब होतें. खुद्द राजे लोक व मोठमोठे सरदार हे देखील हें कसब शिकत असत. खालील महातांच्या यादींत मराठे व ब्राह्मण हे देखील आहेत. हत्तींचे महात मुसलमानच असतात व होते, ही समजूत चुकीची आहे. सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींतील महातांचीं नांवें येणेंप्रमाणें:–

१ भिवराव मोहिते. २ दादू महात. ३ तुका यादव. ४ सय्यदजी माने. ५ अमृतराव गावडे. ६ राघोजी पठार. ७ हैबतराव पठार. ८ शिबराव लाड. ९ गोपाळराव बापुजी. १० लक्ष्मण त्र्यंबक खुटेकर. ११ यशवंतराव. १२ रंगराव पुरुषोत्तम पानशे. १३ रामचंद्र शिव्रजी. १४ खंडेराव रामपूरकर. १५ संतोजी पवार. १६ चिंतामणराव. १७ चिमाजी माधव. १८ यशवंतराव लाड. १९ आनंदराव सोमवंशी. २० व्यंकटराव रघुनाथ.

लढाईत हत्ती चालविणारे हे महात प्रख्यात वीरांत मोडत असत.



## २८. मराठ्यांचा जंजिरा घेण्याचा प्रयत्न.

शिवाजी महाराजांनीं जंजिरा घेण्याकरितां अविश्रांत परिश्रम केले. मंत्रतंत्र करूनही पाहिले. परंतु किल्ला त्यांचे हातीं आला नाहीं. संभाजी महाराजांसही तो काबीज करण्याविषयीं अत्यंत उत्कंठा लागली. इ. स. १६८२ त त्यांनीं दादजी प्रभूस, प्रधानकीच्या वस्त्रांची आशा दाखवून, मायनाईक, गोंदजी जाधव आदिकरून प्रतिष्ठित सरदारांसह जंजिऱ्यावर रवाना केलें. एवढें करूनही त्यांच्यानें स्वस्थ बसवेना. यास्तव सुलतान अकबर व वीस हजार फौज बरोबर घेऊन ते स्वतः कुमकेस निघाले. दोन्हीं सैन्यें एकत्र होतांच तुंबळ युद्ध होऊं लागलें. तथापि, किल्ला हस्तगत होण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां, खंडूजी अथवा कोंडाजी फर्जंद यास गुप्तरूपानें किल्ल्यांत पाठविण्याचा महाराजांनीं निश्चय केला. कोंडाजीनें कोणता उपाय योजावयाचें ठरविलें, याचा नीटसा खुलासा केलेला कोठें आढळत नाहीं. कुलाबा गॅझीटीयरमध्यें पुढील माहितीं आहे.

"In 1682 the Maratha General Dadaji Raghunath Deshpande was sent to besiege Janjira with the promise that if he took the fort he would be made one of the chief officers or Pradhans. Later on Sambhaji with Sultan Akbar and 20,000 men joined the besieging fort from Rayagad, battered the island for 30 days, levelled its fortifications and with the help of one Khandoji Farjand, organised a plot for its cession. The plot was dicovered, and Khandoji was put to death." (Page 441.)

उपलब्ध असलेल्या पुस्तकांपैकीं 'प्रभुरत्नमालें' तील हकीकतच कायती जरा विस्तारपूर्वक दिली आहे. तथापि, तीही अपुरी आहे. वर निर्दिष्ट केलेल्या कटाचा

कोंडाजी फर्जंद व कुमाजी जान प्रभु यांनीं पुढाकार घेतला होता. कोंडाजीस लवकरच स्वर्गीचा रस्ता धरावा लागला व कुमाजीस आपलें अर्धें वेतन रुद्राजीस विकावें लागलें. या रुद्राजीचे वंशजाचे दप्तरांत वरील कटाची जी माहिती मिळाली ती खालीं देतों:–

"जंजिरीयावर येलगार[1] होतो ह्मणून...आला. त्यावर दादप्रभूस नेऊन याचा वारस राखिला. त्यावर कुमाजीनें कोंडाजीसी राजकारण केलें कीं, जंजिरा घ्यावयाची एक तजवीज आहे. एक जीवास पन्नास माणूस. यांस नांवाजावें आणि पालख्या द्याव्या आणि लोकांच्या बटकी त्यांस कबीले द्यावे आणि जंजिरा पळोन गेलेसें करावें, आणि ते जाऊन चाकर राहातील आणि जंजिरा काबीज करितील. ऐसी तजवीज कोंडाजी, शेषोपंत व कुमाजी ऐसे रामेश्वराचे देऊळांत बैसोन केली. त्याजवर ते पन्नास माणूस जंजिरा आले. ते खबर हजरत भिस्तीरोजी खानसाहेब यांस कळली. मग त्यास शास्ती फरमाविल्या. शास्ती करून पलीकडे उतरिले. ते शास्ती नूर(?) तळीयास गेले. त्या शास्तीनुरांतून एक मुख्य केला कीं, हे खबर रुद्राजीनें पोंचविली आणि कलिंगडेंही पाठविलीं होतीं(?). ऐसा कोंडाजीचा निशा कुमाजीनें केला. त्याजवर रुद्राजीनें घरदार लुटून हत्तीखालीं घालावयासीं गांगोलीपावेतों नेलें. यांस हे खबर महादजी बाजीनें आईकिली. तों गांगवलीस आले. मग मुकुंद धोंडी देऊन सुभेदार व महादजी बाजी ऐसे मिळोन कोंडाजीची बहुत आजिजी[2] केली. मग गांगोलीहून फिरविले. जमान[3] घेऊन सोडिलें. एक तागा सडा तो दिल्हा नाहीं. ऐसा सत्यानास करविला. ऐसी खबर भिस्तीरोजीसाहेब यांसी मालूम जाली. तेव्हां पन्नास माणूस पालखींत घालून एक वरीस तलास करून आणिला. तों कुमाजीजवळ हातेर तरकस[4] होता, तैसाच धरून जंजिरा आणिला. मार चुना सिंपसिंपोन मार करीत जीवेंच मारावा! मग खंड रुपये ५००० पांच हजार केला. त्यावर सु॥ समान समानीनामध्यें[5] आपले बाप साहेबांचे बंदगीसें राजपुरीं आलों.[6] तों कुमाजीचा भाऊ पिलाजी, संक्राजीपंताकडे जाऊन कागद आणिला जे, रुद्राजी पळोन हबसीयाकडे गेला. तो हरामखोर. त्याचें वतन निमें, तेंही पिलाजीचे हवालीं केलें असें. त्यावर भिस्तीरोजी खानसाहेबीं तळीयाचा गड घेतला. तेव्हां राजबा हवालदार व बरचीखान यांहीं अर्ज केला कीं, साहेबीं कुमाजी देसाई यांसि सोडावें आणि गडीचे हेजबतीचें काम कुमाजीस सांगावें. त्यावर न सोडीत. मग बहुत रतबदली करून सोडिला.*"

**"यशवंत."**

⁂

१ हल्ला. २ आजिजी=आर्जव, विनवणी. ३ जमान=ज़ामीन. ४ तरकस=एक लहानसें हत्यार. ५ रामरामीस. ६ वरील हकीकत अत्यंत विश्वसनीय आहे हें सांगावयास नकोच.

*पुढील हकीकत कुमाजीचे वतनासंबंधाची असल्यामुळें ती येथें दिली नाहीं. वरील उतारा रुद्राजीच्या घराण्याच्या बखरींतून घेतला आहे. कुमाजी व रुद्राजी हे तळें येथें रहात असत. ह्या उताऱ्यामधील पुष्कळ शब्द लागत नाहींत!

व्यंकोजी राजाच्या ताब्यामध्यें तंजावरचा जो प्रांत होता, त्याचे पांच सुभे होते. ह्या सुभ्यांचीं नांवें १ सुभा त्रिवेदी; २ सुभा कुंभकोणम्; ३ सुभा मायावरम्; ४ सुभा मन्नारगुडी आणि ५ सुभा पट्टकोटा आणि वलमपट्ट. ह्या एकंदर सुभ्यांचीं मिळून ५७५३ गांवें होतीं; व वसूल ३२०५०००० प्याडी कलम (Paddy Cullums) होता*. 'प्याडी कलम' ह्मणजे तांदळाचें एक विशिष्ट वजन आहे. एक कलम ह्मणजे (जुन्या पद्धतीनें) अदमासें ¾ मण† वजनाचें माप आहे. तंजावरचें मुख्य उत्पन्न तांदूळ हें असल्यामुळें तांदुळाच्या मापांतच राज्याचें उत्पन्न दिलें आहे. ह्यावरून पाहतां, व्यंकोजीच्या कारकीर्दींत तंजावर प्रांताचें फक्त तांदुळाचें उत्पन्न २,४०,३७,५०० मण होतें, असें दिसतें. असो.

व्यंकोजी राजे ह्यांच्या मृत्यूच्या सनाबद्दलही बराच वाद आहे. तंजावर कमिशनच्या इ. स. १७९९ च्या एका रिपोर्टाचे शेवटीं जें परिशिष्ट जोडिलें आहे, त्यांत तंजावरचे सुप्रसिद्ध मिशनरी मि० स्वार्ट्झ ह्यांच्या माहितीवरून व्यंकोजीनें इ. स. १६७४ पासून सात वर्षें राज्य केलें, असें लिहिलें आहे. त्याप्रमाणें पाहिलें ह्मणजे इ. स. १६८१ मध्यें व्यंकोजी मृत्यु पावला असें ह्मणावें लागतें. पण ती चूक आहे. त्याचप्रमाणें, ह्मैसूरचा इतिहासकार मि० विल्क्स् ह्यानें व्यंकोजीनें बंगलोर प्रांत इ. स. १६८७ मध्यें तीन लक्ष रुपयांस विकला ह्मणून लिहिलें आहे. त्यावरून व्यंकोजी इ. स. १६८७ मध्यें जिवंत असला पाहिजे, असें मानावें लागतें. परंतु दोन्ही लेखकांची माहिती चुकीची आहे. तंजावरच्या शिलालेखामध्यें व्यंकोजी राजे शके १६०४ रुधिरोद्गारीनाम संवत्सर ह्या वर्षीं मृत्यु पावले ह्मणून लिहिलें आहे. तेव्हां तेंच वर्ष अधिक विश्वसनीय मानावें हें बरें. 'तंजावर ग्याझेटिअर'मध्यें व्यंकोजीच्या

improving and systemizing the natural resources of a fertile country; and thus he furnishes a third instance of a Hindoo chief studying with assiduity the internal economy of his state, with a success that enriched his subjects, and enabled his name."

*ही माहिती फुलर्टन ह्यांनीं तंजावरच्या राजवाड्यांतून 'A particular account of the Tanjore country and of its produce' ह्या नांवाचें जें टिपण मिळविलें होतें, त्याचे आधारें दिली आहे.

†तांदुळाचें एक तंजावरी कलम माप ह्मणजे सरासरी एक मण समजावयाचा, व प्याडीचें एक कलम माप ह्मणजे अदमासें ¾ मण समजावयाचा. वर तांदुळाचें कलम असें न सांगतां प्याडीचें कलम ह्मटलें आहे, सबब एक कलम ह्मणजे ¾ मण समजावयाचा. अगदीं बरोबर माप ह्मणजे एक कलम प्यॅडी ह्मणजे ६३ $\frac{१४४}{१७५}$ पौंड (वजनी) समजावयाचें.

मृत्यूचा सन १६८६ हा संदिग्ध दिलेला आहे. परंतु त्याबद्दल अद्यापि विश्वसनीय माहिती मिळत नाहीं.

व्यंकोजी राजे ह्यांस दोन बायका होत्या. इंगळ्यांची मुलगी दीपाबाई. ही फार शहाणी व चतुर होती. तिच्या पोटीं व्यंकोजी राजे ह्यांस अनुक्रमें शहाजी, सरफोजी आणि तुकोजी असे तीन मुलगे झाले. दुसरी बायको मोहित्यांची मुलगी अण्णुबाई नांवाची होती. तिला दोन मुली झाल्या. त्यांचीं नांवें समजत नाहींत. ह्याशिवाय त्यास परिगृहीत स्त्रिया नऊ होत्या. त्यांपैकीं कांहींच्या पोटीं चंद्रभान, सूर्यभान, मित्रभान, कलेभान, कीर्तिभान, विजयभान, उदयभान, असे सात पुत्र जन्मले. ह्यांपैकीं वडील व औरस पुत्र शहाजी राजे हे व्यंकोजी राजाच्या पश्चात् तंजावरच्या गादीचे अधिपति झाले. ह्यांची कारकीर्द फार महत्त्वाची आहे. ह्याच अवधींत मराठ्यांचीं जिंजी येथील राजकारणें घडून आलीं. तो वृत्तांत पुढील भागांत सादर करूं.



साहेबानें माफ करीत लाटसाहेब दरबार केले. जनरेल आबरप्रेंबी व जान बष्टुर व तामसगिराम व चापमान व जिमस निलर व बेनिचर व करनेल इष्टुर व करनेल फालबर वगैरे दीडशें इंग्रेज येऊन, मुबारकबादी व बडेसाहेबी शोरसाहेबास देऊन मुजरा केले; व रुखसत होऊन गेले, व तामस गिरामसाहेब खालसेवालेके लाटसाहेबानें त्यास कौसली चौथे दरजेचे मुकर केले होते. शोरसाहेबानें मशारनिल्हेस आज-बायेस येणें जनरेल कौसलचे कामाहून मोकुफ करून, पूर्वी या कामावर खालसेचे मुकर केलें. चंद्र १ माहे रबिलाखर बुधवारीं, शोरसाहेबानें दरबार केले व बमुजीब खबर देणें. मिस्तर चेरी, विश्वंभरपंत व सेवक व बापुभट व भगवंतराव व मीर आबिदुल लतीफ॰वकील नवाब निजाम अलीखान व नासर महमदखान व कमालुदि हुसेनखान व कल्याणसिंग व चिरंजीव सिताबराय मुतवफा नाजिम आजीमाबादचे व मनोहरदास साहुकार वगैरे बारा असामी दरबारचे जागा जाऊन हजर जाले. शोरसाहेबानें तजवीज केले होते कीं, एक एक वकिलास बोलावून भेट करावे, परंतु मिस्तर चेरीचे समजाविलेप्रमाणें त्याप्रकारें लाटसाहेब दरबार करीत होते. खिलवत-खान्यांतून बाहेर येऊन, हरएकाजवळ उभे राहून, खैर व आफियत विचारले व नजर माफ करून सर्वांस आत्तरपान दिलें. सेवकासही खैर आफीयत खुदावतं न्यामत श्रीमंतसाहेब दाम इकबलहूं ब आं माहाराज विचारून आत्तरपान दिल्हें. व आणखी वकिलास चेरीसाहेबानें माफक मर्जी शोरसाहेब जाब दिले होते कीं आज भेट होणार नाहीं, व शंकररावनें बजीद होऊन सांगितलें कीं आह्मांजवळ एक खलिता बाळाजी गोविंदचा आला आहे. त्याचे गुजरावयाविषयीं काय मर्जी आहे? त्यासही जाब दिले कीं आज मुलाखत होणार नाहीं; आणि शोरसाहेबानें बडेसाहेब होतांच दुसरे दिवशीं सत्तर असामी काळे, फिरंगी व बंगाली मुतसद्दीची कौसल घरांत होते. व खजानेचे मुत्सद्दी अवध्यांस बर्तर्फ केलें व खजानेमधें नवें कारकून आपलेकडून टेविले. हे गोष्टीमधें साहा लक्ष रुपयेची किफायत जाली आहे. पुढें पहावें कसें काय करतात. व बाजे लोक ऐसेंही बोलतात कीं, विलायतेहून करार करून आले आहेत कीं साठ लक्ष रुपयांची किफायत करूं. ह्मणजे रोजीने व इनामची जागा व जागिर केबमुज बसनद आसनाद कदीमपासोन जे लोकांस इनाम आहे, ते जप्त करावें. हें वर्तमान लाटसाहेबास कळलें होतें. यास्तव विलायतेहून हुकूम माफीचा कौसली लोकांवर आणविले होते. * * * * चंद्र ४ माहे सदर, मनेरफेंटर वलंदेज बडेसाहेब चिडचिडेचे पैरवी दिनामार बडेसाहेब श्रीरामपूरचे येऊन शोरसाहेबास भेटले, वे बाद मजकूर खैरआफियत व जेवने हाजिरीचे बख्त रुखसत आवाज जरबा तोफेचे बाबत सलामी॰॰ मनेरफयंटर व बारा आवाज बाबत सलामी दैरबिन व गढांतून जाले. चंद्र ७ माहे सदर, शोरसाहेब व इसपकसाहेब व मिस्तर चेरी व मिस्तर इडमनिष्टिन बिनाबर रुखसत करणें नवाब हसनरजाखान व टिकेतराय गेले. नवाब मोसुफ पुढें येऊन घेऊन गेले. व बाद घटिका एक शोरसाहेब व इसपकसाहेब वगैरे अत्तरपान घेऊन टिकेतरायेचे

घरीं गेले. मशारनिल्हेहीं पुढें जाऊन घेऊन आले. तेथेंही एक घटिका बैसोन व अत्तरपान घेऊन आपले घरास आले. चंद्र ८ माहे सदर नवाब हसनरजाखां कलकत्तेहून कूंच करून गेले व तफजुल हुसेनखान हजी करबलाई सौदागर मातबर व मनोहरदास व रामसिंग व काश्मिरीमल व शंकरराव हुगळीपावेतों पोहोंचतां करावयास गेले. चंद्र १५ मुर्शिबादेहून खबर पोहोंचली कीं, दाहु बेगम नवाब सिराजआदौला मुतबफाची स्त्री मृत्य पावली. चंद्र २० माहे सदर शोरसाहेबानें कीलक पाद्री यास कीं पूर्वी काम खजानेचे करित होते; व लाटसाहेबानेंही रनबहादूर साब नेपाळवाले जवळ पाठविले होते. बतरीक विकालत मिस्तर कीनवाईचे कामावर नवाब निजामअल्लीखान जवळ पाठविले. चंद्र २५ करनेल फालर्वर नवे गढाचे किल्लेदार यांस, कान्हापुरास करनेल मारकीनचे कामावर रुखसत केलें, व मशारनिल्हेस कलकत्त्यास बोलाविलें आहे कीं त्यास किल्लेदारी नवे गढाची देऊं. चंद्र २७ माहे सदर, तफजुल हुसेनखान मनोहरदास व काश्मिरीमल व रामसिंग व शंकरराव हुगळीहून नवाब हसनरजाखानपासून रुखसत होऊन आले. असें कळलें कीं खान मोसुफनें एक खिलवत साहा पारचेचा व सिरपेंच व जिगा व मोतियाची माला व एक हत्ती व एक घोडा व हाजिकर बसाई दिले व एक खिलवत सा पारचेचा व सिरपेच व जिगा व एक मोतियाची माला व एक घोडा व मनोहरदास व एक पागोटा व शिरपेंच व गोशवार व एक दुशाला रामसिंग व एक दुशालीं व गोशवारा शंकरराव वगैरे दोन चार असामींस देऊन रुखसत केले. व हाजिकरबलाई सौदागर कीं हुगलीमधेही त्याची जागा आहे. यांनीं दाहा हजार रुपयेचा सरंजाम आज किसम पारचे चीन व विलायेत व तसबीर व आयने थोर व पेस्तुलची जोडी व दुर्बिण व एक पालखी नवाब हसनरजाखान दिले, व याचप्रमाणें तोफ जात बराय नजर नवाब वजीरखान मोसुफचे स्वाधीन केले. फिलहाल इतका मजकुर समजण्यांत आला, ते हुजुरात अर्ज केले. पुढें जे होईल ते विनंति केली जाईल. बहुत काय अर्ज कीजे ? हे विज्ञापना. रवाना चंद्र १ माहे जमा दिलावल सन १२०८.

लाला गुलाबराय हा कलकत्ता येथें पेशव्यांच्या वतीनें रावबाजी गादीवर येईपर्यंत वकिलीच्या कामावर असावा असा अदमास आहे. त्याची पुढील माहिती मिळत नाहीं.



घेऊन नक्त दीड कोट रुपये इंग्रजांस दिले. बाकी ५० लाख रुपये देणें. त्याबद्दल त्या दोघी बायकांचे कारभारी धरून त्यांस विपत्य करितात. पांचजण सरदार दीड कोट रुपये घेऊन कलकत्त्यास गेले. दोघे सरदार राहिले आहेत. दिल्लीकडेही धामधूम आहे. अद्याप पातशाही फौजेस कोणी सरदार करार जाला नाहीं. अपसांत कजिये करितात. त्यामुळें जाठाचा उत्कर्ष आहे. राजश्री नारो शिवदेव व आबाजी नाईक व बाजी विठ्ठल ऐसे छ १६ रमजानीं त्रितीय प्रहरीं रेवा दक्षिणतीरास आले. ते दिवशींच उतरावें व उदईक कुजेपंचमी आहे, यास्तव नावा पाठवून पावसांतच संध्याकाळपर्यंत रेवा उतरून, अलीकडे जेथें माधवराव राहिले आहेत तेथेंच जाऊन उतरले. दो घटका रात्रीं मुहूर्तेंकडून बाईचें दर्शन घेऊन मुक्कामास गेले. दुसरे दिवशीं चार घटका दिवस राहतां, त्रिवर्गास बाईनीं बोलावूं पाठविलें. तेही आले. मीही त्यांस भेटायास गेलों होतों. सांगातेंच वाड्यांत आलों. बाई स्नान करून पूजा करीत होती. अर्धी घटकानंतर बाहेर येऊन एक घटका बसली. आगतस्वागत बोलून बाई भोजनास गेली. भोजन करून आलियावर, दोन घटका एकांतीं, बाई व नारो शिवदेव व आबाजी नाईक हे तिघे, एकांतीं बसून दोन घटका बोलली. बाजी विठ्ठल बाहेरच होते. खिलवत होऊन, दोन घटका रात्रीं निरोप घेऊन बिऱ्हाडास गेले. तदोत्तर तिसरे दिवशीं वद्य ८ स बाई श्रीदेवीदर्शनास गेली होती. जवळीच माधवराव व हे उभयतां राहिले होते. तेथें नारोपंत व आबाजी नाईक व माधवराव व बाजी विठ्ठल व बाई ऐशीं पांचजण एकांतीं बसून, दोन घटका बोलून, माधवरायांसही समक्ष निरोप देणें होता तो देऊन, बाई किल्ल्यावर गेली. नारो शिवदेव यांचे घरीं श्राद्ध वद्य दशमीचें होतें, तें काल जालें. एकादशीस रात्रीं, नारो शिवदेव व आबाजी नाईक बाईकडे रात्रौ जाऊन, कांहीं बोलणें एकांतीं होऊन, निरोप घेतला. वस्त्रें बाईनीं दिलीं. दीड प्रहर रात्रीं बिऱ्हाडास गेले. बाजी विठ्ठल यांची नेमणूक माधवरायाबरोबर पाटीलबावांकडेस जायाची होती. परंतु बाईची मर्जी नाहीं. ह्मणून घरास चार दिवस जावें, बोलावूं तेव्हां यावें, असा निरोप जाला. त्यावरून बाजी विठ्ठल देशास येतात. पुण्यासही येतील. वरकडांनीं द्वादशी सौम्यवारीं कूच करून कोसभर रामकुंडावर मुक्काम केला. त्रितीय प्रहरीं नारो शिवदेव व आबाजी नाईक बाईस रामराम करायास आले होते. चार घटका एकांत होऊन निरोप घेऊन गेले.

त्रयोदशीपासून दर मजल उज्जयनीस जातील. तेथेंही आठ चार दिवस सरंजामी करून पुढें पाटीलबावांकडेस जातील. याप्रमाणें बोलत होते. सांप्रत येथील बाईची मर्जी फारच एककली जाली आहे. कोणीं कांहीं मसलत सांगितली, ती ध्यानास येत नाहीं. माधवराव गंगाधर यांनींही पांच सात वेळां सांगितलें जे, श्रीमंतांचें लक्ष राखावें. इकडील महालसंबंधीं ऐवजांत येथील बेजमी होऊन कांहीं त्यांसही खर्चास पाठवावें. बाईनीं उत्तर केलें जे, त्यांजकडे देशचे महाल आहेत. प्रस्तुत त्यांस मसलतही काय आहे ? आह्मांसही येथें खर्च लागला आहे. पहातच आहां. यांनीं उत्तर केलें जे, तुकोजीबावाकडेस देशचे महाल आहेत. असो; आपली मर्जी ! परंतु सरकारचें दरबारखर्चसंबंधीं व कर्जवाम देणें आहे, तें तरी थोडें थोडें वारीत जावें. दरबारचें लक्ष राखल्यानें फार उपयोग आहे, असें सांगितलें. परंतु बाईच्या ध्यानांत येत नाहीं. कोणास कांहीं द्या ह्मटलें ह्मणजे बाईस तिरस्कार येतो. बाईच्या मर्जीगुरूपच जें घडणें तें घडेल. अशी येथील मर्जी आहे. राजश्री पाटील-बावांकडीलही, आठ चार दिवस जाले, बाईस पत्र आलें होतें. त्यांनीं लिहिलें होतें जे, आह्मी आज दोन वर्षें आपणांस लिहीत गेलों कीं, इकडील महालांपैकीं कांहीं त्यांसही खर्चास पाठवीत जावें; तें कांहीं घडलें नाहीं. यामुळें सरकारचा व त्यांचा शब्द आह्मांस लागला. अतःपर तरी त्यांस कांहीं खर्चास पाठवावें. तेही हुजूर चाकरीवर आहेत. सरकारचा शब्द लागे असें करूं नये. असें लिहिलें होतें. त्यावरून बाईनीं येथून यादी, हिशेब, व कलमबंद्या लिहून, पाटीलबावांकडेस दाखवायास माधवरायांजवळ लिहून दिल्या आहेत. येथें बाईची मर्जी एक प्रकारची जाली आहे. कोणाचें ऐकत नाहींत. आपण येथें आहों. सरकारचा काय शब्द लागेल ? यास्तव माधवराव पाटीलबावांकडे जातां, तिकडेच चार महिने गुजराण करावी. येथें असल्यास बाई ऐकत नाहींत. क्षुद्र मनुष्यांचें प्राधान्य फार जालें आहे. मातबर शब्द लागतां आपल्यास लागेल. एवढ्यास्तव जातात. येथील मसलत अशीही आहे कीं, इकडील महालांच्या बंदोबस्तास होळकरांची व सरकारची फौज आली, तर आपणही फौज जमा करून पराभव करावा. अशीही येथील मर्जी ऐकिण्यांत आली आहे. बाजीराव बर्वे यांचे ठायींही ममता दिनप्रति विशेषत्वाकारें आहे. येथें बाईस कळलें आहे कीं, तुकोजी-बावांच्या पट्ट्यावर राजश्री तात्या पुर्तेपणें आहेत. श्रीमंतांची मर्जीही तशीच आहे. तेव्हां परिछिन्न उपद्रव एखादा करायास चुकणार नाहींत. तेव्हां कोणाची-ही खुशामत केल्यानें काय होतें ? या अर्थीं सरकारच्या मनुष्याची ही अनास्था ! असा प्रकार येथील जाला आहे. राजश्री बाजी विठ्ठलही मागाहून येथून निरोप

घेऊन देशीं येतील. पुण्यासही येणार. नारोपंत व आबाजी नाईक व माधवराव असे सरंजामसुद्धां छ २६ मिनहूस रामकुंडींहून कूच करून पुढें गेले. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेशी श्रुत होय. येथील काशीदजोड्या पत्रें देऊन रवाना करितों. ती चौं महिन्यांत येतात. त्यांजवळ सरकारचें उत्तर कांहीं येत नाहीं. स्वामींची मर्जी ! हरकुबाईचा ऐवज मणिरामाकडे रोकड दहा लक्ष आहेत, ते तुकोजीबावाचा आश्रय करून राहिला आहे. हरकुबाई ह्मणाली जे, चौथाई तिजाई सरकारांत घेऊन, त्याजकडून ऐवज उगवून घ्यावा. लटकें असेल तर त्याचा पुतण्या इंद्रमण, आहे त्यास पुसावें. सरकारकिफायत आहे. ह्मणून सेवेसी विनंति. हरकुबाईचे गांवही त्यांस सांगून सोडवावे. फार वेळां विनंति लिहिली. धन्याची मर्जी. हे विज्ञप्ति. ( फाटलें आहे ) न होय. हें पत्रही कोणास दाखवूं नये. श्रीमंतांची मर्जी फार नाजूक. विक्षेप न होय, आणि उपहासयुक्त मीं लिहिलें आहे, तोही कोणाचा न होय. गरिबीस बट्टा न लागे. आपण कृपाळू ह्मणून मीं इतकें लिहिलें. इतकेंही शेष आपल्या ध्यानांत आलें ह्मणजे पुरे. आपण पह्यावर असल्यास काय एक न करतील? हें पत्र कोणास न दाखवावें. सरकारचें पत्र एकांतीं द्यावें. दोहीं पत्रांचीं उत्तरें यावीं हे विज्ञप्ति."

---

पे॥. छ ११ सवाल. **लेखांक ७२.** ता. ८ सप्टेंबर इ. स. १७८२.

**श्रीगजानन.** मि. श्रावण वद्य १४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रमजानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो. विशेषः-इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून, काशीदजोडी व डांकेबरोबर वरचेवर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमानः—येथें श्रावणमासीं येथें तीन चार हजार ब्राह्मण जमा जाले होते. त्यांस पंचमी, षष्ठी, सप्तमी, तीन दिवस धर्मदेकार जाला. उत्तम, मध्यम, कनिष्ठ, प्रती रांगडे ब्राह्मण ये देशी त्यांस पावला. तदोत्तर एकापासून तीन रुपये मध्यमप्रती, चार पांच उत्तमप्रत, ऐसे देशस्थ व तैलंग तीन साडेतीन हजार ब्राह्मणांस दक्षणा सात हजार नऊशें रुपये देकार दिला. रांगड्यांस व बायका व गरीब खळक यांस, सारे मिळून, हजार अकराशें रुपये वाटले. एकूण कमकसर नऊ हजार रुपये वांटले ह्मणून ऐकिलें. हजार नऊशें ब्राह्मण देकार घेऊन गेले. बाकी तीन हजार कांहीं कम ब्राह्मण छत्रांत नित्य संतर्पण होत आहे. पांचशें ब्राह्मणांस शिधे देत असतात. त्यांतील व कांहीं नवीन देशस्थ व रांगडे व तैलंग असे

अनुष्ठानास लाविले आहेत. अनुष्ठान श्रीलिंगें असें व कांहीं शिवकवच्याचें याप्रमाणें अनुष्ठान चालू प्रतिवर्षाप्रमाणें केलें आहे. राजकीय कारभारसंबंधें वर्तमान तरः--राजश्री तुकोजी होळकर यांजकडील दहा जासूदजोड्या, होळकरांचीं पत्रें ये देशीं मामलेदारास कीं, गुदस्ताचा हिशेब व सालमजकूरच्या रसदाचा ऐवज व हिशेब घेऊन इकडेस हुजूर येणें. तिकडे मातुश्रीकडेस ऐवज हिशेब विल्हे लावल्यास परिछिन्न कामास येणार नाहीं, असे जरबेचीं पत्रें आलीं आहेत. प्रथम खरगोणास पत्रें घेऊन जासूद आले. तेथें राजश्री कृष्णाजी तानदेव याचा कारकून आबाजी गंगाधर आहेत, त्यांस जासुदांनीं पत्रें दाखविलीं. त्यांनीं उत्तर केलें जे, कृष्णाजी तानदेव महत्पुरीं आहेत. याचा जाबसाल ते काय करणें तो करतील. तेथून इंदुरास जासूद गेले. तेथें खंडो बाबुरायाचे पुतणे आहेत. त्यांनीं उत्तर केलें जे, खंडो बाबूराव देशींच आहेत. तेथेंच ते काय जाबसाल करणें तो खाशांसींच करतील. आम्हांस त्यांची आज्ञा येईल तसें आम्ही करूं. तेथूनही जासूद पुढें गेले. हें वर्तमान येथें बाईस कळलें. उभयतां कमाविसदारांनीं लिहून पाठविलें. पाहून बाई बोलली जे, 'कारकुनांनीं चांगलीं उत्तरें केलीं. बरें, आणीख काय करितात तें करूं द्या. पुढें पाहतच आहों.' इतकें बोलली, म्हणून ऐकिलें. मल्हारगड व निंबहेडा या दोहीं मामलतीची चोकोती करून, नवे जुने मामलेदार त्यांचे हिशेबविल्हे लावून, रसदीची निशा करून घेऊन, मामलतीवर रवाना केले. या वर्तमानांचींही पत्रें राजश्री पाटीलबावांकडे गेलीं. व रा. माधवराव गंगाधर पाटीलबावांकडे जायास, श्रावण शुद्ध दशमी रविवारीं तेरा घटका दिवसां, बाईची आज्ञा घेऊन, बाहेर उत्तरेकडे श्रीदेवीसमीप महेश्वरीं नदीतीरीं राहुव्या देऊन राहिले आहेत. बुराणपुरीहून राजश्री आबाजी नाईक वानवळे व नारो शिवदेव, बाजी विठ्ठल हे एका दों दिवसां येथें येणार. ते आले म्हणजे बाईची भेट घेऊन, हे व माधवराव मिळून पाटीलबावांकडेस जातील. बाईची मर्जीही सदा दिक्क असती. कोणे वेळेस बोलतात कीं, आपलें काय होणें आहे? महायात्रेस जावें. फार उदासीनतेच्या गोष्टी कोणाजवळ बोलतात. कोणे वेळेस जोमाचीही गोष्ट बोलतात. कोणी मसलतगार हेही बोलतात जे, हिंमत धरून फौज ठेवावी. केवळ आपण उगीच बसल्यास आणीख काय उपद्रव करतील. ह्याही गोष्टी ऐकून मात्र घेतात. परंतु कोणतीही मसलत करणें ते पाटीलबावांच्या इतल्याशिवाय करूं नये. जसें त्यांचें पत्र, अगर हे जाणार जातात यांचें व पाटीलबावांचें बोलणें होऊन जसें पत्र येईल तसें करावें, हें अनुसंधान येथील आहे. श्रुत होय. बाजी विठ्ठल यांचा राहायाचा मनसबा जाला होता. परंतु पुन्हां नारोपंतांनीं रदबदली करून समागमें

जावें असा निश्चय जाला आहे. पुढें गेले आहेत. जातात कीं येतात हें मागाहून लिहीन. श्रुत होय हे विज्ञप्ति."

लेखांक ७३. ता. ६ सप्तबर इ. स. १७८२.

श्रीगजानन. मि. श्रावण व॥ १४ शके १७०४.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः—

सेवक विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रमजानपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बहुत दिवस जाले, आपलें पत्र येऊन वर्तमान कांहीं कळत नाहीं. यास्तव चित्त सापेक्षित असे. हरघडी येणार मनुष्याबरोबर पत्रद्वारें सांभाळ करीत असावें. विशेष इकडील वर्तमान श्रीमंतांस विनंतिपत्रीं लिहिलें आहे, त्यावरून विदित होईल. पेशजीं आपल्यास पत्र काशीदजोडीबरोबर लिहिलें आहे, व त्याच लाखोट्यांत सरकारचेंही पत्र लिहून घातलें आहे. तें स्वामींस पावलेंच असेल. परंतु उत्तर नाहीं आलें. कृपा करून पाठवितील. विनंति हेंच आहे कीं, येथून मी श्रीमंतांस पत्रें लिहितों. कच्चें पक्कें वर्तमान कळल्याप्रमाणें शोध करून लिहितों. तेथें श्रीमंतांची मर्जी पाहूनच आपण विनंति करितील. श्रीमंतांचे मर्जीस विक्षेप न होय, आह्मां गरिबांवर प्रसन्न, असे रीतीनेंच आपण विनंति करितील. सेवकाविषयीं कोणी विनंति करावास तेथें नाहीं. यास्तव सूचनार्थ विज्ञापना लिहिली असे. आज दोन वर्षें येथें एक कपर्दिकीची प्राप्ति नाहीं. कर्ज खात बसलों आहों. असा प्रकार येथील जाला आहे. पेशजीं आपणांस तपशील पत्रीं लिहिला आहे. तें पत्र आपणच वाचून पाहून ठेवावें. अन्यत्र कोणास नकळे. अखेर थोर थोर एकच आहेत. मी गरीब. उगाच कोणाच्या चित्तांत विक्षेप न यावा. आपण कृपा करितां, ह्मणून आमचें तापत्रय येथील आपणांस मात्र कळावें, ह्मणून लिहिलें असे. प्रसंगोपात कोणी कांहीं ह्मणतील. येथील अहल्याबाईचें नांव थोर आहे. दातृत्वाचा बोभाट येथील फार आहे. मी वारंवार श्रीमंतांस व आपणांस व सबनिसास खर्चाविषयीं रत्नाकर लिहितों. तेथेंही कोणी ह्मणतील जे, अहल्याबाई एवढी दाता, यांस देतच असेल. परंतु हे उगेच लिहितात. श्रीमंतांसही खरेंच वाटेल. यास्तव येथील तापत्रय असें आहे. भासविणारांनीं विक्षेप घातले आहेत. तें आपणांस मात्र कळावें ह्मणून आपल्यासच लिहिलें आहे. प्रसंगोपात श्रीमंतांचे मर्जींत विक्षेप कोणीं घातला तर

आपण परिहार करितील. ह्मणून सेवेसीं पेशजीं पत्रीं तपशील लिहिला. तो आणीक कोणास नकळे. आपले मात्र समजेंत यावा. सुज्ञाप्रति विशेष काय लिहिणें? येथें नित्य कर्जाशीं गांठ आहे. तेथें चिरंजीवाची कोठें सोय जाली नाहीं. घरीं मुलें मनुष्यें फार श्रमांत आहेत. असो. आमच्या दैवास आपण काय करितील? राजश्री गोविंदपंत दादांस दोन तीन वेळां आपल्या जाबसालाविषयीं स्मरण दिलें. ते ह्मणाले जे, पहिले बाईनीं जाबसाल केलाच आहे कीं, तेथें तुकोजीबावा आहेत, त्यांशीं बोलून घ्यावें. आतां काय बोलायाचें आहे? बाईचें सौभाग्य बाईकडे राहिलें, तर सहजांत होऊन येईल. नाहीं तर, जिकडे कारभार तिकडे जाबसाल, असें बोललें. तिकडेही उद्योग करून पहावा, हे विनंति आहे. बाणाविषयीं आपण लिहिलें, त्यास रेवेस पाणी फार आहे. कार्तिकमासीं बाण निघतात. चांगले बाण शोध करून पाठवून देऊं. कळावें. प्रस्तुत पाणी, करितां बाण निघत नाहींत. कळावें हें विनंति.

पत्र पाठवीत असावें हे विनंति. सरकारचे जाब देऊन जोडी पाठवीत जावी. लवकर पाठवीत जावी हे विनंति."

---

## लेखांक ७४. ता. २३ सप्तंबर इ. स. १७८२.

पै॥ चंद्र २८ सवाल. **श्रीगजानन.** मि. भाद्रपद व॥ २ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ सवालपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून काशीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रत येथील वर्तमान तर श्रावणमास ब्राह्मणसंतर्पणाचा जाला. आतां भाद्रपद शुद्ध ९ पासून श्रीभागवताचा सप्ता प्रारंभ केला आहे. पौर्णिमेस समाप्त होणार. नित्य प्रातःकाळपासून त्रितीय प्रहरपर्यंत पारायण होत असतें. राजकी वर्तमान तर, राजश्री माधवराव गंगाधर व नारो शिवदेव व आबाजी नाईक वानवळे हे त्रिवर्गांशीं.... बाईशीं पुढीक मसलतीचीं भाषणें होऊन....पाटीलबावांकडेस रवाना केले आहेत. ते अद्याप उज्जनीस आहेत. दो चौं दिवसां तेथून सरंजामी करून निघून दरमजल लष्करांत पाटीलबावांकडेस जातील. त्यांचे खासगीचे बोलण्याचे अन्वय ऐकिल्यांत आले, ते पेशजीं विनंतिपत्रीं सेवेसी लिहिलेच आहेत. राजश्री पाटीलबावा ते प्रांतींचं कोणी गढीस लागले आहेत. सुजाउद्दवल्याचा फरजंद मिरजा आमानी

यानें, आपले आजी व आईपासून दीड क्रोडो रुपये नक्त व पन्नास लाखांचें जवाहीर पेशजीं घेऊन, नक्ती ऐवज इंग्रजांस दिला; व जवाहीर आपल्याजवळ ठेविलें; व दोघी बायकांचे कारभारी होते त्यांस फार श्रमी करीत होता. त्याजमुळें त्या दोघींजवळ दोघे चेले जंगली व मंगली बहुत दिवसांचे होते. त्यांस त्यांणीं सांगोन, तमाम शागीर्दपेशा व फौज फोडून, मिरजा आमानीस कैद करावें अशी मसलत केली. तें वर्तमान त्यास कळलें. त्यामुळें दोन तीन हजार फौजेनिशीं मिरजा आमानी निघून अंतरवेदींत आला आहे. ह्मणून वर्तमान ऐकिलें. त्याचेही वकील पाटीलबावांकडे गेले आहेत. दिल्लीकडे तों धामधूम शिखांची आहे. तेथेंही फौजेचा बखेडाच आहे. येथून माधवरायांबरोबर राजश्री बाजी विठ्ठल जात होते, ते बाईनीं मना केले. ते देशास गेले. वर्तमान ऐकिल्यांत आलें जें, आबाजी नाईक वानवळे यांचीं पत्रें पुण्यास सरकारांत घेतलीं आहेत कीं, बाईच्या मनोदयानुरूप सरकारांतून कार्य घडून आल्यास, खर्चवेंच काय पडेल त्याची निशा आपण करूं. अशीं नाइकांचीं पत्रें घेऊन, बाजी विठ्ठल तिकडेस आले आहेत. हें वर्तमान बाजारी ऐकिलें. सत्य मिथ्या देव जाणे. बाजीपंत त्यांस बोलवायास गेले होते. ते तिकडून परभारां मर्दान्याच्या घांटें रेवा उतरून देशास गेले. तिकडे जातांना बाईची भेट जाली नाहीं. दिल्लीकडील वर्तमान येथें आलें कीं, शिखांची धामधूम तिकडे आहेच. पादशाही फौजेस सरदार पहिले नजीबखान होता. आतां नजीबखानाचे चेले आफराशा व आमदानी हे दोघे फौजेचे सरदार जाले आहेत. त्यास आफराशा फौजेसुद्धां शिखांच्यावर आहे, व पंधरा वीस हजार फौज घेऊन आमदानी चंमेल नदीवर....जाठांच्या पारिपत्यास आला आहे. जाठांची पंचवीस तीस हजार फौज होती. त्याशीं व आमदानीशीं लढाई जाली. जाठांचा पराभव जाला. आमदानी फौजेसुद्धां........आहे. राजश्री पाटीलबावांच्या लष्करापासून दहा पंधरा कोसांवर आहेत. गोहजवाले जाठानें सार्वभौमास लिहून पाठविलें होतें जें, ग्वालेर हा पादशाही किल्ला इंग्रजाचे स्वाधीन जाला होता, तो हरयुक्तीनें त्यांजपासून सोडविला. आपले स्वाधीन आहे. मी जमीदार, पादशाही किल्ला मजला कशास पाहिजे ?. त्या किल्ल्यामुळें पाटीलबावांनीं आमचा मुलूख व गढ्या घेतल्या आहेत. खराबी मुलखाची करितात. यास्तव किल्ला सरकारांत ठेवणें असेल तर ठेवावा. किंवा, मराठ्यांस देणें असला तर त्यांचे स्वाधीन करावा. असें गोहजवाल्यानें पादशाहांस लिहिलें होतें. पादशाहांनीं आमदानीस सांगितलें आहे कीं, पाटीलबावांस सांगा कीं, गोहजवाले जाठांच्या मुलुखाची खराबी करूं नका. किल्याचा जाबसाल आह्मांकडे आहे. आह्मी

देऊं. हे जाबसाल आमदानीनें पाटीलबावांकडेस कागदपत्र पाठविले आहेत. गढ्यांचे मोर्चे मना केले व पादशाहांनीं स्नेहभावें पाटीलबावांस दिल्लीस बोलाविलें आहे. याप्रमाणें बाईस वर्तमान सांगितलें, तें ऐकिलें, सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

हैदरखानाचा वकील रा० नरसिंगराव तमाजी राजश्री पाटीलबावांकडेस पुण्याहून रवाना जाले. ते रेवा उतरावयास परभारें मर्दान्याच्या घांटावर गेले. येथून सात कोस मशारनिल्हेनीं पत्र व सरकारचें पत्र बाईस जासुदाबरोबर येथें पाठवून दिलीं. तीं पत्रें बाईस देऊन, त्यांचे वाटेचा, उज्जनीपावतर पांच राऊत व दहा माणसें हत्यारबंद व वाटेचे दस्तक बाईनीं देऊन, बंदोबस्त करून दिला. ते गृहस्थ पौर्णिमेचें ग्रहण रेवातीरीं करून (फाटलें आहे.) जाणार. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ७५.** ता. २७ आक्टोबर इ. स. १७८२.

**श्रीगजानन.** मि. आश्विन वद्य ६ शके १७०४.

"विज्ञापना. हरकुबाईचे गांव राजश्री तुकोजी होळकराकडे आहेत. सरकारांतून सोडले, असें असतां या बाईस प्राप्त होत नाहींत. पाहातां इजकडे अपराधही कांहीं नाहीं. फार वेळां विनंति लिहिली. सोडविणार धनी कृपाळू समर्थ. स्वामी आज्ञापितील कीं, तुह्मांस इतकी अगत्य काय? त्यास, आपले उपयोगी आहे ह्मणूनच लिहितों. कितीक अर्थ यांत आहेत. बाह्य लिहितां येत नाहींत. आणि फार दिवस या बाईस वचन दिलें आहे कीं, श्रीमंतांस विनंति करून तुमचे गांव सोडवीन. तें चाकराचें वचन निभावणार धनी कृपाळू समर्थ. हरकुबाईचे बारा लक्ष रुपये मणिरामानें घेऊन तिकडे निघून गेला आहे. तो देत नाहीं. या बाईचें बोलणें आहे कीं, चौथाई श्रीमंतांनीं घ्यावी. बाकीचा ऐवज माझा मजला देवावा. त्यांतूनही लाख रुपये श्रीमंतांच्या लग्नोत्साहास देईन. दुसरें, मणिरामाकडे सरकारचे कर्जेही उदंड आहेत. सुमेरसिंगाची ठेवरेव जवाहीर वगैरे पुष्कळ आहे. आपल्यास ठाऊक आहे. असेंही बाई ह्मणती. पेशजींही विनंति लिहिली होती. आज मणिराम घरचा पुरा आहे. सरकारचे कर्जे त्याजकडे लागू असतां स्वामी उपेक्षा कां करितात, न कळे. येथें हरकुबाईवर लाखोंचें देणें व पोटासही नाहीं, अशा संकटांत आहे. वारंवार ह्मणती जे, तुह्मी श्रीमंतांस लिहितां कीं नाहीं? कांहीं सरकारउपयोगीही आहे, ह्मणून वारंवार विनंति लिहितों. येविषयींची काय मर्जी, ते आज्ञापिणार धनी समर्थ. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ७६.** ता० २३ डिसेंबर इ. स. १७८२.

**श्रीगजानन.** मि० मार्गशीर्ष वद्य ४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १७ मोहरमपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्र लिहून काशीदजोडीबरोबर व डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं. सेवेसीं पावलीं असतील. सांप्रत येथें बाईनीं महालोमहालचे हिशेब पाहून मामलती विल्हे लाविल्या. स्नान देवार्चन करून आहेत. भिल्लांच्या पारपत्यास तीन चार पागा पाठविल्या होत्या. कांहीं भिल्ल धरले; कांहीं चोपले. सेंदव्याचा घांट सुरळीत चालविला आहे. परंतु भिल्लांनीं जागा जागा डोंगरांत जमाव करून आहेत. पागा तेथून उठल्या म्हणजे फिरून भिल्ल गडबड करितील. इकडे टोंक रामपुऱ्याकडे चंद्रावतांनीं धामधूम केली आहे. त्यामुळें इकडील पागा बोलावून तिकडे पाठविणार आहेत. राजश्री केसो भिकाजी दातार यांणीं येथून पत्रें पाठविलीं आहेत. त्या पत्रांचे उत्तराची मार्गप्रतीक्षा फार करितात. बाईनींही एक दोन वेळ विचारिलें जे, केसोपंतांनीं सरकारांत पत्रें लिहिलीं; त्यांचीं उत्तरें कांहीं आलीं कीं नाहीं? अद्याप आलीं नाहींत म्हणून उत्तर केलें. राजश्री पाटीलबावांकडील पेशजी कागदपत्र आले होते. त्यावर अद्याप कांहीं पत्रें, वर्तमान कांहीं येत नाहीं. वदंता ऐकिल्यांत आली जे, गोहद व भिंडभदावरच्या मध्यें आहेत. चैत्रमासीं तिकडील बंदोबस्त करून इकडेस येणार. असें बाजारी वर्तमान आहे. आपल्या कडील वर्तमान, श्रीमंतांच्या लग्नाची सिद्धता निश्चय जाला आहे. माघफाल्गुनांत विवाह होणार. असें वर्तमान औरंगाबादेहून केसो भिकाजीचीं पत्रें आलीं, त्यांनीं बाईजवळ सांगितलें. हें लग्नाचें वर्तमान ऐकून बाई बहुत संतोषास पावली. अलीकडे पुण्याकडील वर्तमान कांहीं कळत नाहीं. बाई येथें पुसत असतात. सांप्रत चहूंकडील वर्तमानें स्तब्ध जालीं आहेत. देखलें ऐकलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्ति आहे. कर्ज येथें सहाशें रुपये जालें आहे. तो उपद्रव व नित्यकृत्य चालायाचें संकट जालें आहे. तेथें धन्यास या उत्साहाचे गडबडींत कोण स्मरण देतो? चौ वर्षांचें माझें आंखही राहिलें आहेत. आसागिराचें सामान राहिलें आहे. स्मरणार्थ विनंति खर्चाची, व देणेदारांनीं फार विपत्तींत घातलें आहे. स्वामी कृपाळू समर्थ. सेवकाविषयीं तेथें कोणी विनंति करायास नाहीं. धनीच कृपा करून स्मरण करून खर्चास पाठवितील तर होईल हे विज्ञप्ति. गबा भटजीजवळ कांहीं उसनवारी ऐवज मागितला कीं, आमची वरात कोणीकडे तरी श्रीमंत पाठवितील; तुमचा ऐवज तुम्हांस देऊं. त्यांनीं माफ

उत्तर केलें जे, आह्मांजवळ कांहीं ऐवज नाहीं, आणि प्रस्तुत सरकारचेंही आह्मी कांहीं लागत नाहीं. सारा ऐवज आह्मी पुण्यांत भरून चुकलों. याप्रमाणें उत्तर केलें. सेवेसी श्रुत होय. सरकारचे तालुकदार, एखादे समयास उसनें पासनें मागावें लागतें. या परदेशांत सरकारचे तालुकदार हरएक गोष्ट तोडून सांगूं लागले, मग या परदेशांत आमचें कोण आहे ? सरकारांतून चार दिवस अधिक उणें लागतच आहेत; नी येथें तालुकेदारास ह्मटलें तर असें ह्मणतात. हे अवस्था आहे ! धणी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ७७.** ता. २८ डिसेंबर इ. स. १७८२.

**श्रीगजानन.** मि. मार्गशीर्ष वद्य ९ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ मोहरमपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. राजश्री केसो भिकाजी यांचीं पत्रें औरंगाबादेहून साहुकारी आलीं. त्यांत लिहिलें होतें जे, श्रीमंतांचें लग्न माघ शुद्धांत अगर वद्यांत होणार. सरंजामी होत आहे. कारखाने चाळीस लागले आहेत, व वधू एक कृष्णाजी भैरव यांची नात पाहून ठेविलीच आहे. आणीखही ब्राह्मण व वाकनीस जागा जागा वधू विचारण्यास गेले आहेत. हें वर्तमान येथें बाईच्या कानावर त्यांनीं घातलें. ऐकून संतोष पावली. बाईनीं केसोपंतांस व मजलाही सांगितलें जे, श्रीमंतांचें लग्न कोणत्या महिन्यांत होणार? वधूचा निश्चय कोठील? कोणाची नेमस्त केली? असे सिद्धांत वर्तमान लवकर आणवा. दोन तीन वेळां सांगितलें. त्यावरून सेवेसी विनंति लिहिली आहे. जसें आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें येथें विनंति केली जाईल. लवकर वर्तमान यावें ह्मणून बाईनीं सांगितलें आहे. तेथून आज्ञापत्र येणें धन्याची मर्जी. राजकी वर्तमानें तर प्रस्तुत चोहोंकडील वर्तमानें स्तब्ध जालीं आहेत. परंतु काल छ २० मिनहूस राजश्री दादाजी गंगाधर यांचीं पत्रें पुण्याहून बाईकडे आलीं. पत्रें पाहून प्रहर रात्रीपर्यंत एक दोघे मुत्सद्दी व बाई बसून खलबत जालें. तदोत्तर दुसरे दिवशीं राजश्री पाटीलबावांकडेस बाईचीं पत्रें गेलीं, असें वर्तमान ऐकिलें. दुसरें, राजश्री नारो गणेश यांची बहीण येथें आली आहेत. त्यांजबरोबर कांहीं एकांतसूत्र बाईकडे नारोपंताचें आलें आहे ह्मणून ऐकिलें. परंतु ती बाई येथें आली आहे. ती मुकुंदरायाची आई. त्यास बरें वाटत नाहीं. अद्याप बाई

बाईचें बोलणें जालें नाहीं. होणार. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. छ २० रोजीं एक ब्राह्मण द्रविड होता. त्यास काय आवेश आला हा नकळे; मागील प्रहर दिवस राहतां त्याच्या भावाशीं आपसामध्यें कज्या जाला. धाकटा, वीस वर्षांची उमर होता. त्यानें तरवार मेण्यांतून काढून भावास एक वार केला, आणि बाहेर निघून हातीं नागवी तलवार घेऊन, उभ्या बाजारानें उन्मत्त होऊन चालला. वाटेंत चारपांच माणसें घायाळ केलीं. बाजारच्या दरवाज्याजवळ चौकीचीं दहावीस माणसें होतीं, त्यांजवर चालून आला. ते धरावयास धांवले. येथें बाईची कैद आहे कीं, ब्राह्मणास कोणीं मारूं नये. त्यास जो प्यादा पुढें धरायास गेला, तो प्यादा त्या ब्राह्मणानें दोन वार मारून ठार केला. त्यावर दहापंधरा माणसें धांवलीं. तशांतही एका माणसास वार केला. आटोपेना. मग दोघां चौघांनीं तो ब्राह्मण ठार मारला. वर्तमान बाईस कळलें. रागेंही भरली. कोणीं समजाविलें जे, हे तैलंग कोणे मतें येथें आहेत. कोण वेळेस काय करतील हें नकळे. यास्तव छत्र बंद केलें. तैलंग जितके व द्राविड जितके आहेत, ते सारे येथून काढून देणें ह्मणून बाईनीं सांगितलें आहे. शंभर दीडशें तैलंग कुटुंबांसुद्धां आहेत. तीन साडेतीनशे सडे आहेत. कुटुंबांसुद्धां आहेत त्यांस असूं द्यावें व बाकीच्यांस काढून द्यावें असें सांगितलें. वाड्यांतही पुराणाजवळ जे दीडशें ब्राह्मण येत होते.·तेही मना केले. आश्रित देशस्थ व काशीकर व कोकणस्थ तीस चाळीस इतके वाड्यांत घेतले. बाकीच्यांस मना केलें. असें दिनचर्येचें वर्तमान. श्रीमंतांचें लग्नाचें वर्तमान लवकर यावें. यास कारण कीं, तथ्य वर्तमान कळलें ह्मणजे वस्त्रें पाठवावयाची तरतूद करून, कोणी कारकून पाठवावा हा भाव. राजश्री विनायक बाजी काल छ २१ रोजी संध्याकाळीं येथें आले. रात्रींच बाईचे भेटीस गेले. बाई व गोविंद रघुनाथ व विनायक बाजी महा घटकांपर्यंत एकांतीं बसून वर्तमान तेथील सारें विचारलें. तदोत्तर हे आपल्या घरास आले. दिल्लीकडील वर्तमान येथें आलें कीं, नजीबखानाचे चेल्यांनीं दिल्लींत बंदा केला आहे. आपसांत भांडतात. संब इंग्रजाचा लेक पातशाहाकडून मध्यें बोलायास गेला होता. त्यास त्यांनीं पिस्तुलाचे गोळीनें मारून टाकिला. पातशाहासही मारून टाकावें अशा योजनेंत होते. तें वर्तमान पातशाहास कळून आपल्या महालांत बंदोबस्तानें आहेत. पाटीलबावा गोहदच्या व भिंडेच्या मध्यें आहेत. गोहदवाला ग्वाल्हेर देणार असें बाजारी वर्तमान. ऐकिलें देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. धनी कृपाळू समर्थ. वारंवार लिहितों ह्मणून रागें न भरावें हें विज्ञप्ति."

नवीन वर्तमानः–राजश्री पाटीलबावांचें पत्र बाईस आलें आहे. त्यांत मजकूर जे, पेशजी दोन तीन पत्रें गृहकृत्याच्या हर्शामर्शाचे अन्वयें लिहिलीं होतीं. त्या अर्थी कितीएक बारीक मोठें बोलणें आहे. यास्तव राजश्री माधवराव गंगाधर यांस पाटीलबावांनीं बोलाविलें आहे. बाईस लिहिलें आहे की त्यांस येथें पाठवून देणें. कितीक बोलणें आहे तें त्यांसीं बोलूं. यास्तव मशारनिल्हेची रवानगी तिकडे होणार. आसेरच्या किल्ल्यावर काल निशाण चढणार होतें. शिंद्याकडील कारकून किल्ल्यावर जाऊन सारी मोजदात केली. किल्लेदारांचे कबिले उतरले. तेही कालरात्रीं उतरणार होते ह्मणून येथें वर्तमान आलें. तें जाल्यावर राजश्री नारो शिवदेव येथें येतील. त्यांजबरोबर माधवरावजींची रवानगी बाई करणार, असें ऐकिण्यांत आलें आहे. सौभाग्यवती उदाबाई वाघमारी- सुभेदाराची कन्या त्यांस फार बरें वाटत नाहीं, ह्मणून येथें वर्तमान आलें. ती बाई वाफगांवीं राजश्री तुकोजी होळकर घेऊन गेले आहेत. त्यास त्यांच्या समाचारास बाईंनीं येथून आपला खासा खिजमतगार खंडू मंडलीक पाठविला आहे. येथील लक्ष पाहतां सरकारआज्ञेव्यतिरिक्त अधिक उणें पाऊल टाकायाचें नाहीं. वर्तणूक फार एकनिष्ठतेची आहे. ये प्रांतीं पर्जन्य अद्याप नाहीं. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

# इ. स. १७८३.

[ ह्या वर्षाचीं बरींच पत्रे उपलब्ध झालीं आहेत. ह्या पत्रांमध्यें सवाई माधवराव पेशव्यांच्या लग्नासंबंधाचीं पत्रें फार मनोरंजक आहेत. अहल्याबाईची स्वामिनिष्ठा त्यांत उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झाली आहे. ह्या वर्षाच्या इतर राजकारणाच्या बातम्याही त्यांत आल्या आहेत, त्याही महत्त्वाच्या आहेत. ]

**लेखांक ७८.** ता. २१ जानेवारी इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. पौष वद्य ३ शके १७०४.

"श्रियाविराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः—

सेवक विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत छ १७ सफरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– आपण कृपा करून श्रीमंतांचें व आपलें पत्रें पाठविलीं तीं पावलीं. बहुत संतोष पावलों. इकडोल वर्तमानें सांप्रत बंद आहेत. राजश्री पाटीलबावांचे कबिले लष्करांत त्यांनीं बोलाविले आहेत. संक्रांत जालियावर जाणार. येथें तों बाई स्नान देवपूजा करून स्वस्थ आहेत. खर्चावांचून फार हैराण आहे. तात्या येथें सातशें रुपये देणें जालें आहे. तीन वर्षें येथें एक कवडीची प्राप्ति नाहीं. घरीं

मुलें मनुष्यें श्रमांत ! चिरंजिवाची कोठें सोय नाहीं. असे चहूंकडून श्रम आहेत. सांप्रत श्रीमंतांच्या लग्नाची गडबड, तेथें आह्मांसारखे गरिबाचें स्मरण कोण करितो? येथें तो देणेंदाराचे व नित्यकृत्य चालण्याचे फार श्रम आहेत. बरें, आपण धर्ममूर्ति आहेत. कृपा करून श्रीमंतांस विनंति करून येथील कर्जापासून मुक्तता होय तें करावें. चिरंजीव पुण्यास येईल. त्याची कोठें सोय जाली तर करून द्यावी. हरघडी कृपापत्रीं संतोषवीत असावें. हे विज्ञप्ति.

श्रीमंतांस आलाहिदा एकांतीचें वर्तमानपत्र लिहून आपल्या लखोट्यांत घातलें आहे. हें एकांतीच श्रीमंतांस निवेदन करून, फिरून पत्र आपल्या जवळ घ्यावें. उत्तरही यावें. हें वर्तमान कोणास कळवूं नये. कळावें. खर्चाची व देणेंदाराची तसदी फार आहे. सेवेसी श्रुत होय. रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त सेवेसी पाठविले आहेत. स्वीकार करून उत्तर पाठवावें. हे विनंति. श्रीमंतांचें पत्र आपल्या पत्रांत घातलें आहे. त्यांत विशेष तों कांहीं नाहीं. परंतु तेथें येथील गृहस्थ कोणी आहेत. त्यांस इतकें कळल्यास अनेक प्रकारें येथें लिहितील. त्यांच्याच कृपेकरून येथें आह्मी बाईचे इतराजीत आहों. देखिलें ऐकिलें वर्तमान तों धन्यास लिहिलें पाहिजे. या अर्थी प्रसिद्धता न होय. मजविषयीं येथील प्रकार केवळ कनिष्ठ आहे. तेथें धण्यास काय कळे? परंतु आपल्या सांगितल्यानें श्रीमंतांस समजेल. मुख्य गोष्ट आपले कृपेनें आह्मांसारखे गरिबांचा उद्धार होईल. देण्याची व खायाची निकड येथें फार आहे. येथें एक कवडीची प्राप्ति नाहीं. खर्च तो केला पाहिजे. कृपा करावी हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ७९.** ता. (?) जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. (?) पौष शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री पाटीलबावांचे कबिले पेडगांवीं होते, ते पाटीलबावांकडेस जातात. काल येथून चौ कोसांवर रेवा उतरून राहिले. बाईनीं भेटायास बोलाविलीं आहेत. येतील कीं परभारी जातील, न कळे. बहुतकरून येतीलसें दिसतें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील वर्तमान बराणपुरचा साहुकार त्याचा आडतिया मुनसाराम येथें आहे. त्याचे येथें एक ब्राह्मण गुजराथी सोळा दिवसांचा आला. त्यानें वर्तमान येथें सांगितलें जे, दादासाहेब फुलपाड्यावरच आहेत. पाटीलबावांकडील कारकून तेथें गेला आहे. कांहीं बोलणेंचालणें होत आहे. सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईचें मानस फार आहे कीं, निघून पाटीलबावांकडेस यावें. दादासाहेबांचें बोलणें आहे

कीं, पहिलें पाटीलबावांकडे गेला, तें काय जालें? आतां जाऊन काय होणें? अशी कांहीं रदबदली लागली आहे. ह्मणून तो गुजराथी ब्राह्मण सांगत होता. तेथें कितीक प्रकारें बोलणार बोलतात जे, पाटीलबावांनीं आपले कबिले तिकडे नेले. दूर यमुनेपरियंत मुलूख सर करितात. तेव्हां इकडे त्यांचें येणें कळतच आहे. तत्रापि दादासाहेबही पाटीलबावांकडेस जाणार. त्यापैकीं दादासाहेबांस पाटीलबावांनीं अकृत्रिम पुण्यास पाठविलें ह्मणजे कांहीं कृत्रिम नाहीं. न पाठविलें तर, आनंदीबाई पाटील-बावा मिळालीं तर एखादें खूळ होईल. असेंही कितीक प्रकारचें बोलतात. ऐकिलें वर्तमान आहे. आपाजी गित्या छ ४ मिनहूस मेला. बाई फार श्रमी जाली. त्याच्या जांवयास पागा बाई देणार अशी बोलवा आहे. राजश्री केसो भिकाजींनीं पत्राचें उत्तर मागितलें. तें बाईनीं दिलें. तें सेवेसी पाठविलें आहे. मशारनिलेनींही सेवेसी विनंतिपत्रें लिहिलीं आहेत. त्यांवरूनही सविस्तर विदित होईल. सेवकासही जें दृष्टीस पडलें व ऐकिलें, व समक्ष जितकें अंतरबाह्य बोलणें जालें, तें सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना."

**लेखांक ८०.** ता. २१ जानेवारी इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. पौष वद्य ३ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ सफरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमानः— पेशजी ब्राह्मण येथें मेला ह्मणून अन्नछत्र बंद जालें होतें. दहा बारा दिवस ब्राह्मणांची आबळ फार होऊं लागली. तदोत्तर चौघे शिष्टांनीं बाईस सांगून मार्गशीर्ष कृष्ण अमावास्येस छत्र चालू केलें. वरकड नवल विशेष अधिकोत्तर वर्तमान कांहीं नाहीं. स्वस्थ देव देव करून बसलीं आहेत. राजश्री पाटीलबावां-कडील वर्तमान चवदा दिवसांचीं पत्रें आलीं. त्यांत वर्तमान जेः—गोहज व भिंडाच्या मध्यें पाटीलबावा आहेत. तमाम गोहजवाल्याचा मुलूख घेऊन चोहों-कडून रस्त बंद केली. त्यामुळें जेर होऊन, गोहजवाला राणा ग्वाल्हेरचा किला खालीं करून देतों ह्मणून पैगाम आला आहे. त्या राजाचें बोलणें आहे कीं आपला मुलूख तमाम सोडावा नी गोहज द्यावी. पाटीलबावा ह्मणतात जे, खर्च पडला तो द्यावा नी मुलूख घ्यावा. अशी रदबदली पडली आहे. दतिया-वाल्यांनीं गुदस्ता पाटीलबावांशीं बेइमानी केली आहे. त्यांसही विसर पाडून

अचानक जख्म थावी. यामुळें जैपुराकडेस जावयाची आवाई घातली आहे, व उज्जनीहून कबिलेही पाटीलबावांनीं आपले आणविले आहेत. उज्जनींतून मुहूर्तें-कडून डेरेबाहेर जाले आहेत. रविसंक्रमण जाल्यावर बाया स्वार होऊन पाटीलबावां-कडे जाणार. दिल्लीकडीलही येथें वर्तमान आलें जे, नजीबखानाचे चेले आफराशा व आमदानी वगैरे यांनीं फौज जमा करून, पातशाहावर चालून गेले. शाहांनींही किल्याचा बंदोबस्त करून, पातशाही फौज बोलावून तयारी लढाईची केली. बाहेरल्यांच्या चित्तांत कीं पातशाहास ठिकाणीं लावून, नवा पातशाहा आपल्या हुकुमांत राहे असा बसवावा. त्यास, ह्या चौघांनीं बसून विचार केला जे, पातशाहा हा ईश्वराचे अंश. यास मारल्यानें पुढें आपलें बरें नाहीं. गाजुदीखान वगैरे यांचे दाखले मांगणारांनीं सांगितले जे, त्यांनीं पातशाहास जख देऊन काय सरफराज जाले? आपण असें करू नये. पातशाहानें काय करणें आहे? आपली चौकी शाहाभोंवतीं किल्यांत बसवावी, नी बाहेरील बंदोबस्त जो करणें तो आपला आपण करावा. अशी मसलत करून पातशाहास सांगून पाठविलें. त्याचे कारभारी बोलाविले. चौघेजण मातबर त्यांत संबरू फिरंगी याचा लेक आला. वरकडांसीं जाबसाली बोलणें बोललें. त्या फिरंग्यास पसतोलानें मारून टाकिलें. वरकड बंदोबस्त किल्यांत केला. आफराशा पातशाहाजवळ ठेवून, वरकडांनीं बाहेर बंदोबस्त केला. पातशाहा व कित्येक राजेरजवाडे दक्षिणी फौजेची मार्गप्रतीक्षा फार करितात. या समयास सरकारची फौज आल्यानें मुलूख पेशजीप्रमाणें सुटेल. सांप्रत गिलच्यांचा दंगा दिलीभोंवतीं कांहीं नाहीं. याप्रमाणें वर्तमान आलें आहे. पाटीलबावांचे कबिले गेले. राजश्री केसो भिकाजी यांनीं पत्रें सेवेसीं लिहिलीं आहेत. त्यांवरून सविस्तर विदित होईल. पाटीलबावांनीं आसेरचा (?) किल्ला घेतला ह्मणून वर्तमान आहे. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. धनी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति.

रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त सेवेसी पाठविले आहेत हे विनंति.''

---

## लेखांक ८१.

ता. २३ जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.**

मि. पौष वद्य ५ शके १७०४.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ सफरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—स्वामींनीं श्रीमंतांच्या लग्नाची लग्नचिठी अहल्याबाईस कासीदजोडीबराबर पाठविली. ती चंद्र १६ सफरीं रात्रौ येथें दाखल जाली. दुसरे दिवशीं दों प्रहरां मीं नेऊन दिल्ही. बहुत संतोष पावली.

वस्त्रें आणवावयास ते समयींच सांडणीस्वार ब्ऱ्हाणपुरास रवाना केले. मी उठून आल्यावर, राजश्री विसाजी शामराज लांबहाते त्यांस बाईनीं बोलाविलें. त्यांसही सांगितलें जें, श्रीमंतांची लग्नचिठ्ठी आली आहे. त्यांस आहेर पाठवणें. तर आपण निराळा पाठवावा, किंवा तुकोजीजवळ पाठवावा? यांनीं उत्तर केलें जे, मुख्यत्वेंकरून राजश्री तुकोजीबावांकडेसच पाठवावा, हें अतिउत्तम आहे. सांप्रत दोन फळ्या जाल्या आहेत. त्या पक्षीं शहाणा कारकून आहेर देऊन पाठवावा. तुकोजीबावा तेथें मूळ वराडी आहेतच. या कारकुनानें जाऊन निराळी श्रीमंतांची भेट घेऊन राहावें. आहेर करतेसमयीं कारकुनानें आहेर नेऊन तुकोजीबावांपुढें ठेवावा. त्यांच्या हातें श्रीमंतांस आहेर करावा. हाही एक पक्ष आहे. बाई बोलली जे, माझेही चित्तांत असेंच आहे. नाहींतर सांडणी स्वारांबरोबर दादाजी गंगाधर यांजकडे पाठवावा. त्यांस लिहावें कीं, तुकोजीबावांच्या हातें आहेर करावा, असें मशारनिल्हे बोलले. बाईनीं ऐकून उगीच राहिली. तदोत्तर बाईनीं विचारलें जे, श्रीमंतांस आहेर काय काय पाठवावा? यांनीं उत्तर केलें जे, बादली वस्त्रें व कंठी, शिरपेंच, मोत्यांचा तुरा हे दागिने आपल्या स्वरूपानुरूप पाठवावे. घोडें एकादें चांगलें, श्रीमंतांस बसायायोग्य, पाठवावें. बाई ह्मणाली जे, घोडें चांगलें नामी नाहीं. हरकूबाई व विसाजीपंत बोलले जे, वस्त्रांस व जवाहिरास श्रीमंतांस काय कमी आहे? परंतु घोडें चांगलें पाठविल्यास, जेव्हां बसतील तेव्हां स्मरण श्रीमंतांस आपलें होईल. इतकें बोलणें जालें. तदोत्तर राजश्री केसो भिकाजी यांस व बाईस खासदस्तुर स्वामींनीं ममतापुरस्कर पत्रें लिहिलीं होतीं, तींही डांकेबरोबर चंद्र १७ मिनहूम संध्याकाळीं येथें आलीं. मी लखोटा पंतमशारनिल्हेकडे घेऊन गेलों. तो लखोटा फोडून वाचला. मशारनिल्हेचे नांवाचें एक पत्र व खासदस्तुर बाईच्या नांवाचें अशीं दोन्हीं पाहून, चौ घटका रात्रीं केसोपंत व मी उभयतां बाईकडे गेलों. बाईजवळ गोविंदपंत गानू व मुकुंदराव हरी व बाळाजी फडणीस ऐसे बसले होते. कांहीं हिशोब पाहत होते. केसोपंतांनीं दोन्ही पत्रें बाईपुढें ठेविलीं. फडणीसांनीं वाचून दाखविलीं. ऐकून बहुत समाधान पावली. सर्वत्रांनीं आपला स्तव फार केला. "श्रीमंतांच्या पायाशीं एकनिष्ठ कायममिजाज असा दुसरे कोणाचा पाहिल्यांत आला नाहीं. शाबास याच ब्राह्मणांची.. गेलें राज्य संभाळलें. त्यांच्या एकनिष्ठप्रमार्जनीं कैलासवासी श्रीमंत नानासाहेबांनीं दानधर्म, ईश्वरआराधना जी केली, ती ये समयीं कामास आली जे, जगताचा स्वामी कुलदीपक ईश्वरें लावला. नानांच्या एकनिष्ठतेस त्रैलोकीं उपमा नाहीं. उभयतांही कारभारी चांगले." श्रीमंत दादासाहेबांच्याही गोष्टी काढल्या

## ५७. इंग्रजांच्या वकिलास दीड लाखाची जहागीर.

महादजी शिंदे ह्यांचे मार्फत मराठ्यांचा व इंग्रजांचा सालबी येथें ता. १७ मार्च इ. स. १७८२ रोजीं जो तह झाला, व नंतर आणखी दोन पुरवणी तहनामे ठरले. त्यांचीं बोलणीं करण्यास इंग्रजांच्या वतीनें मि० डेव्हिड अंडरसन ह्या नांवाचा वकील आला होता. त्यास महादजी शिंदे ह्यांच्या विद्यमानें दीड लक्षाची जहागीर देण्याचें ठरलें होतें. तह करणाऱ्या वकिलास जहागीर देऊं केल्याची गोष्ट पुढील पत्रावरून कळून येते. मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ ह्यांच्या इतिहासांत किंवा एचिसनच्या तहनाम्याऱ्या पुस्तकांत ह्या गोष्टीचा उल्लेख नाहीं. ह्या दीड लक्षाच्या जहागिरीचें पुढें काय झालें, तें समजत नाहीं.

[ मेणवलीदप्तर. ] श्री. ता. ३ मार्च इ. स. १७८५.

पैवस्ती छ १९ जमादिलाखर
सन खमस समानीन चैत्र. " श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः-

विनंति सेवक बाळाजी गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ चंद्र २१ रा॥कर मुकाम कालपी स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं, इंग्रजांचा तह जाहला, ते समयीं राजश्री महादजी शिंदे यांचे विद्यमानें इंग्रजाचे वकिलास दीड लक्षाची जाहगीर द्यावयाचा करार जाहला. त्यास, इंद्रसेन इंग्रज यासीं एक लक्षाची जहागीर द्यावयाची. त्यास हमीरपूर पवारांकडील नवद हजार रुपयांचें कमान आकारास लावून दिल्हें. त्याची सनद पवारांस सादर जाहली. बाकी भरतीस दहा हजार रु॥ चे गांव कमान आकाराचे तालुके कालपीपैकी हमीरपुरास लगते नेमून देणें, व पन्नास हजारांचे गांवांच्या दोन सनदा तालुके कालपी पैकी हमीरपुरास लगते कमान आकाराचे लि॥ देणें. एकूण तीन सनदा रा. महादजी शिंदे यांजकडे पाठविल्या आहेत. ते तुह्मांकडे पाठवितील. याप्रमाणें साठ हजारांचे गांव हमीरपुरास लगते लावून देणें. हमीरपूर इंग्रजांस पवाराकडून देविलें, त्याचे मोबदला सरंजाम लावून दिला पाहिजे. तरी मोहल्याची गांवगंना कमाल जमा लिहून पाठविणें ह्मणोन आज्ञा. त्यास येविशींचें वर्तमान रा॥ केसो शंकर यांसीं लिहिलें आहे. विनंति करतील. सेवसी श्रुत होय विज्ञापना."



## ५८. 'सेनासाहेबसुभा' पदाची माहिती.

ही माहिती नागपुरकर भोंसल्यांच्या दरबारांतील एका मुत्सद्यानें नाना फडणविसांस पाठविली आहे. ह्यांत 'सेनासाहेबसुभा' पदाचा थोडक्यांत वृत्तांत दिला आहे. तो संग्राह्य आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

" कैलासवासी सेनासाहेबसुभा यांचे तुह्मी पूर्ण अभिमानी. स्वामी, सेनासाहेबांनीं कायावाचामनें एकनिष्ठता केली; त्यासी, त्यांचे पाठीमागें त्यांचा नक्ष राहावा; स्वामींचा अभिमान शेवटास जावा; अमित्रावर नक्ष राहावा; एतद्विषयींची आज्ञा करितील, कीं त्याचे पाठीमागें बाकीस कोण राहिला कीं त्याजवर उमेद ठेवून राजकारण करणें. त्यास स्वामींनीं अभिमान धरिलियास सर्व सिद्धीस जाईल. नवाब बंदगानअली यांणीं सकोजी भोंसले उमरावतीकर यांचा मूल नेमस्त केला आहे. सेनासाहेबपदाचा मूळ अधिकार परसोजी भोंसले. यांचा काल जाहलीयावर कान्होजी भोंसले. त्यांजमागें रघोजी भोंसले. ते राणोजी भोंसले यांचे बराबर. कान्होजी राणोजी भोंसले हे चुलतबंधु. यांचें मूळ कसें ह्मणावें तर, मुख्य मुधोजी भोंसले मूळपुरुष. परसोजी, बापुजी, साबाजी हे तिघेजण पुत्र त्यास जाले. बापुजी भोसले यांसी संताजी, राणोजी, बिंबाजी भोंसले हे तिघे पुत्र. हे सर्वत्र सामान्य सरदारी करून एकत्रच राहात असतां, राजा शाहूमहाराज हे पातशाहाचे हस्तगत संभाजी महाराजासांगातें जाले. तेथे कसकसी बहुत. त्याजवर बेगमसाहेबांनीं शाहूमहाराजांस पुत्रत्व कल्पोन कृपा केली. हे तिकडोन तिचे विद्यमानें निघोन आले. तों येथे राजकारण कुल बिघडून राहिलें असतां, परसोजी भोंसले फौजबंदी करून, शाहूमहाराजांस आडवे जाऊन भेटले. शाहूमहाराज राज्याधिकारी नाहींत ऐसें ताराउसाहेब यांणीं उत्तर केलें. परंतु परसोजी भोंसले यांणीं पुरतेपणीं अंगिकार करून राज्यासनीं बैसविलें. महाराज कृपावंत होऊन 'सेनासाहेबसुभा' हें पद परसोजी भोंसले यांसी दिल्हें. तेव्हां तमाम भाऊ बिरादर एकमयच होते. परसोजी भोंसले यांचे बंधु साबाजी भोंसले. यांसी संतान नाहीं. परसोजीबावांस कान्होजी भोंसले एकच पुत्र जाले. बापुजी भोंसले यांसी तिघे पुत्र जालेत. संताजी व राणोजी व बिंबाजी भोंसले ऐसे तिघे. त्यांपैकीं संताजी भोंसले माळवे, हिंदुस्थान या प्रांतीं महाराजांनीं बिदा केले. त्यांणीं माळवे सर करून तिकडेच श्रीमंत बाळाजीपंत पेशवे सांगातें दिल्लीकडे मारले गेले. त्यांचा वंश बुडाला. राणोजी भोंसले यांसी चौघे पुत्र जाले. संताजी व जिजाजी व सखोजी व कुशाजी ऐसे चौघे. बिंबाजी भोंसले यांसी एक रघोजी भोंसलेच मात्र जाले. परसोजी भोंसले लयास पावल्यावर मागें 'सेनासाहेबसुभा' हें पद कान्होजी भोंसले यांसी प्राप्त जालें. तेव्हां राणोजी भोंसले यांचा कलह होतच गेला. तेव्हां महाराजांनीं यांची त्यांची वांटणी नीट ठरावून दिली. रघोजी भोंसले, राणोजी भोंसले यांचे बिरादर त्या वांटणींत लागले. पुढें कान्होजी भोंसले सेनासाहेबसुभा करीत असतां, राणोजीबावांची वांटणी, त्यांणीं आपलें कुलकाम रघोजीबावांचें गळां घातलें. त्याजविषयींचे कागदपत्र व लिहिलीं पुसलीं कुल आहेत. त्यांच्या नकला सेवेसीं पाठविल्या आहेत, त्यांजवरून कळेल. शाहूमहाराजांची मर्जी कान्होजीबावांनीं बिघडवून चित्तींचे उतरले. त्या संबंधींत रघोजीबावा यांणीं पैस करून वाढत वाढत

वाढले. परंतु राणोजीबावांचे वांटणींत रघोजीबावा होते. त्यांणीं त्यांचेच वांटणीवर उर्जितास पावले. हें आद्यंत आपणास कळावें. राणोजीबावांचा नातू हें मूल आहे. पदास या प्रकारेंकरून अधिकारी आहेत. स्वामींस कळावें."



[कृ. वि. आचार्य.] **५९. वडगांवचा तहनामा.** ता. १६ जानेवारी इ. स. १७७९.

"करारनामा श्रीमंत राजश्री माधवराव नारायण पंडित प्रधान व कंपनी तमाम इंग्रेज-यांसीं स्नेह, कैलासवासी श्री० माधवराव बल्लाळ पंडित प्रधान यांचे कारकीर्दीपर्यंत चालत आला. त्याअलीकडे सरकारचे जागे, जंजिरे साष्टी व उरण वगैरे, जंबूसर महाल व परगणे व भडोच येथील सरकारचा अमल व गायकवाडाकडील अमल आह्मीं घेतला, व श्री० रा० रघुनाथराव दादासाहेब यांचा पक्ष धरिला; त्यामुळें परस्परें विरुद्ध वाढलें. त्यावर करनेल जान इपिटन कलकत्त्याहून मुकत्यार होऊन आले. त्यांनीं तहनामा ठरविला आहे. त्याप्रमाणें तहनामे सरकारचे व कंपनीचे परस्परें जाहले, परंतु आह्मांकडून अमलात न आले; व श्री० रघुनाथराव दादासाहेब यांचा पक्ष सोडिला नाहीं. त्यांस घेऊन करार करून बिघाड केला. सरकार तालुक्यांत घांट चढून देशांत येऊन, लढाई सुरू केली. तेव्हां सरकारांतून लढाई करणें प्राप्त जाली.

त्यावर मौजे वडगांव नजीक इंदोली तळेगांव येथील मुकामाहून मिस्तर जान करनेक व चारलिस करनेल इगरटीन नि॥ मुंबई सरकार यांजकडून मुखत्यार फारमर हुजूर आले. त्यास फार दिवस पूर्वीपासून सरकार व इंग्रेजांचा स्नेह चालत आला. मध्यें परस्पर विरुद्ध वाढलें. करनेल जान इपिटन यांणें तह केला, त्याप्रमाणें चाललें नाहीं. याजकरितां करनेल इपिटन याचा तह रद्द करून, पूर्वी श्रीमंत कैलासवासी माधवराव पंडित प्रधान यांचे कारकीर्दीपर्यंत तह चालत आला त्याप्रमाणें चालावें. रघुनाथरावदादांचा पक्ष आह्मीं सोडिला. त्यांस आश्रय देणार नाहीं. सरकारासहीं जे विरोधी त्यांच्या पक्षामध्यें व त्यांचे आश्रयानें राहणें ही गोष्ट घडणार नाहीं. जंजिरे साष्टी व उरण व बेलापूर वगैरे जागा, जंबूसर वगैरे महाल व भडोच सरकारचा अमल व गाईकवाडाचा अमल घेतलेले आह्मीं सोडून देतों. कैलासवासी माधवराव पंडित प्रधान यांचे कारकीर्दीपर्यंत चालत आलें, त्याप्रमाणें परस्परें चालावें.

त्यावरून सरकारांतून तह ठराविला कीं, श्रीमंत कैलासवासी माधवराव पंडित प्रधान यांचे कारकीर्दीपर्यंत चालत आलें. अलीकडे सरकारअमलाचे जागे, जंजिरे साष्टी व उरण वगैरे, जंबूसरचा अमल व गाईकवाडाकडील अमल आह्मीं इंग्रेजांनीं घेतले ते सरकारांत हवाली करावे. राजश्री रघुनाथरावदादासाहेब यांचा पक्ष धरू नये, व आश्रय देऊ नये व कुमक करू नये. व ...... ही गोष्ट करू नये. त्याप्रमाणें

आह्मी अकृत्रिमपणें वर्तूं व सरकारांतूनही अंतर होणार नाहीं, हेंही आह्मांस कबूल• आहे• त्यास श्रीमंत राजश्री रघुनाथरावदादासाहेब आह्मांजवळ होते, आपले रजावतीनें कबूल जाहले. त्याजवरून बरोबर सरंजामी राजश्री तुकोजी होळकर व राजश्री महादजी शिंदे यांचे स्वाधीन केले. त्यास इंग्रजी फौजा आह्मांकडून वडगांवचे मुकामीं आहेत. सरंजामी मुबईस पोचवून देण्याविसीं सरकारांतून उभयतां नारो गणेश व विसाजी शामराव, बाळाराव गोविंद, व राणेखान दरम्यान आणावयाचा करार केला. त्याप्रमाणें आमची खातरजमा चौघांनीं करून, आमचे समागमें फौज देऊन आह्मांस मुंबईस पाठवून द्यावें. आह्मांकडील इंग्रजी फौज मार्गे कोणास उपद्रव करणार नाहीं. अंतर देऊं नये• सरकारी अमलदारांसुद्धां प्रत्युक्त (?) चालत आला आहे. खलेल करणार नाहीं. इंग्रजी फौज कलकत्त्याहून नर्मदा उतरून हुसंगाबादेस आली आहे: त्यास येऊं देणार नाहीं. माघारे कलकत्त्यास लावूं. उपद्रव कोणास होणार नाहीं. सदरहू तहाचा करार राजश्री तुकोजी होळकर व राजश्री महादजी शिंदे यांचे विद्यमानें जाहला आहे, त्याप्रमाणें परस्परें चालावें. त्यांत अंतर करणार नाहीं. सदरहू कराराप्रमाणें आह्मी इंग्रेज वर्तणूक करूं, व सरकारांतूनही फरासीस ह्यांचा पक्ष धरूं नये व त्यास आश्रय देऊं नये. तारीख २७ माहे जिल्हेज ऊर्फ पौष मास सुरुसन तिसा सबैन मया व अलफ. मुकाम वडगांव नजीक इंदोली तळेगांव."



## ६०. आनंदीबाईचीं आणखी दोन पत्रें.

आनंदीबाई किती राजकारस्थानी होती हें दाखविणारीं चार पत्रें पूर्वी दिलीं आहेत. आणखी दोन पत्रें रा. रा. नारायण रघुनाथ देशपांडे यांनीं पाठविलेल्या जुन्या ऐतिहासिक पत्रसंग्रहांतून येथें सादर करितों. ह्यावरून आनंदीबाई राजकारणांत कशी तरबेज होती व आपल्या पक्षाच्या सरदारांस कशी सल्लामसलत देत असे हें चांगलें दिसून येईल.

### लेखांक १.

श्री. ता. १४ फेब्रुवारी इ. स. १७७५.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सदाशिव रामचंद्र व राजश्री आबाजी महादेव व राजश्री सखाराम हरी यांसीः—

सौभाग्यवती आनंदीबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन करीत जाणें. विशेषः—तुह्मांकडून वरचेवर पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सदोदित लिहित जाणें. यानंतर इंदुराहून लिहिलें आलें कीं, होळकराकडील

## लेखांक २.

**श्री.** ता० ९ जून इ. स. १७७५.

" राजश्री सखाराम हरी यांसीः—

सौभाग्यवती आनंदीबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल-लेखन करीत जाणें. तुह्मीं पत्र पाठविलें, तें पावलें. लिहिलें वर्तमान सर्व कळलें. तुमची निष्ठा उत्तम आहे, हे अनुभवास आली. त्यास ही गोष्ट उत्तम आहे. तुह्मांस हें योग्य आहे. ये निष्ठेनें तुमचें ईश्वर ऊर्जित करील. चिंता नाहीं. तुह्मांस जखम लागली होती, ती बरी जाली कीं नाहीं हें लिहिणें. पथ्य उत्तमप्रमाणें करीत जाणें. बहुत रक्षीत जाणें. चिरंजीव राजश्री बाजीराव सुखरूप आहेत. फितुरी यांचें पारपत्य होऊन हुजूरची व चिरंजिवाची भेट कधीं होईल हें लिहिणें. चंद्र १० रबिलाखर बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

पैवस्ती चंद्र २८ रोज मंगळवार माहे रबिलाखर.



## ६१. सवाई माधवराव पेशव्यांच्या बाललीला.

सवाई माधवराव पेशव्यांच्या दिनचर्येच्या पत्रिकांतून त्यांच्या संबंधाची नानाप्रकारची माहिती समजते. त्यांतील त्यांच्या बाललीलेंपैकीं पुढील एक दोन मनोरंजक उतारे येथें देतोंः—

"सु॥ सबा समानीन मया व अलफ आषाढमासः—

१ शुद्ध त्रितीया सौम्यवासर सायंकाळचे सहा घटिका दिवसापासून तीन घटिकांपर्यंत सातखणी बंगल्याचे तिसरे मजल्यावर, कबू जनावर वानरासारखें आहे, तें मोकळें करून बकुळीच्या झाडावर सोडिलें होतें, आणि सभोंवते गडी उभे करून त्याजला हुसकीत. एक दोन वेळां पळोन गेलें. तें धरून आणून पुन्हा तसेंच करूं लागले. कबू उडी टाकावयासी गेला. तों तिसरे मजल्यावरून खालीं सगुणाबाई राहत असत त्या जाग्यावर फरसावरी पडिला. वांचला आहे. फारच खेळ चालिला होता.

१ गणेशपंत पेठे यांचा पुतण्या नमस्कारास येत असतो. त्याचें शरीर वायुबद्ध आहे. स्थूल बहुत आहे. त्याजला आज दोन दिवस चौसोपींत एक प्रदक्षणा धांववितात, बैठका करवितात.

शुद्ध द्वितीया भौमवारः—

१ पायास कुरूप आहे. त्याजवर आज दोन चार दिवस कांहीं लाविलें नव्हतें. मोकळाच होता. आज पाद्री याजला बलाऊन आणून, किंचित् कुरुपावरील कातडी छिलून काढून मलमपट्टा लाविली आहे.

शुद्धपंचमी भृगुवासरः—

१ पांच घटिका दिवसास पाद्री इंग्रज पायांस औषध लावावयासी आला होता. पायाचें कुरूप कांहीं मोडलें आहे.

१ गुरुवारीं दोन प्रहरीं केशवभट तामसी यांजला इंग्रजाचें सोंग दिलें होतें. भटजीनी अनमान केलें, सबब रागे भरले. शिव्या दिल्या. मग बाळाजीपंतांनीं जामदारखान्यांतून टोपी व कुडतीं आणऊन सोंग दोन घटिकांपर्यंत देऊन बसविलें होतें.

शुद्ध सप्तमी रविवारः—

१ दोनप्रहरीं भोजनसमयीं केशवभट तामसी याजला श्रीमंत मनस्वी बोलो लागले. तेव्हां चौघे चहूंकडून ह्मणो लागले कीं, पहिलें याजला झुलपे राखीत असत व कल्ले व दाढी राखावी असें होत असे; त्यांतून आतां एकही होत नाही. श्रीमंत ह्मणाले राखा!

१ सायंकाळचे तीन घटिका दिवसास कृष्णाजी नाईक थत्ते यांचे पुत्र धाकटे वाड्यांत आले होते. त्यांणीं बदके दोन मागितली. तेव्हां श्रीमंतांनी दहा बदकें कृष्णाजी नाईक यांचे घरी पाठऊन दिली. मग नाइकानी पुन्हा पुत्रास पाठऊन विनंति करविली कीं बदकें आह्मांस नको. चुकलो. असें बोलोन बदकें येथून न्यावी याप्रमाणें बोलिले. तेव्हां मग बदकें श्रीमंतानी आणविली."



## ६२. गंगाबाईचें पत्र.

पेशव्यांच्या स्त्रिया राजकारणांत पडत होत्या किंवा नाही हें आनंदीबाईच्या पत्रांवरून चांगलें सिद्ध होत आहे. गोपिकाबाईचें पत्रही मागें दिलें आहेच, त्यावरून त्या बाईचे त्या वेळच्या राजकारणांचें ज्ञान स्पष्ट होतें. नारायणरावांची बायको गंगाबाई हिचेंही एक पत्र मासल्याकरितां येथें देतों. हें पत्र साताऱ्याच्या किल्ल्याचे सुभेदार नागोजी शिंदे व बाबूराव कृष्ण यांस इ. स. १७७४ सालीं लिहिलें आहेः—

[सातारादप्तर.]

श्री. ता. १६ मार्च इ. स. १७७४.

"राजेश्री नागोजी शिंदे व बाबूराव कृष्ण गोसावी छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य यांसीः— प्रति मातुश्री गंगाबाई आशीर्वाद सु॥ आर्बा सबैन मया व आलफ. तीर्थरूप राजश्री दादासाहेब मिरजेजवळून कूच करून पंढरपुराजवळ गेले. त्यांचे पाठलागास राजश्री त्रिंबकराव मामा व वामनराव वगैरे सडी फौज त्यांचे मुक्कामाजवळ गेली. त्यांनीं सलुखाचा मजकूर घालून अकस्मात् मामांवर फौज पाठवून लढाई जाहाली. ते लढाईत मामा पाडाव जाहाले. त्याजवर सडी फौज माघारी जाऊन, भोंसले व नवाब मागें होते ते सारे एकत्र होऊन, योजिला मनसुबा सेवटास न्यावा या अन्वयें मसलत

होऊन, मागोमाग चालले आहेत. लौकरच गांठ घालणार. तुह्मीं बहुत खबरदारीनें राहावें. परकी माणूस येईल त्याची बंदोबस्ती चांगली राखणें. तीर्थरूपांचे लष्करांतून दोन तीन पागा व एक दोन सरदार फुटोन आपलेकडील फौजेंत आले व कांहीं यावयाचे विचारांत आहेत. जाणीजे छ १० मोहरम आज्ञाप्रमाण. (लेखनसीमा)."



## ६३. १७७८।७९ सालचा प्रांतहिंदुस्थानच्या वसुलाचा अजमास.

सांप्रत ज्यास 'बजेट' किंवा अंदाजपत्रक ह्मणतात, त्यासारखा पेशव्यांचा सर्व प्रांतांच्या वसुलाचा प्रतिवर्षीं एक खर्डा तयार होत असे. त्यास अजमास असें ह्मणत. अजमास आणि अंदाज हे शब्द एकाच अर्थीं आहेत. इ. स. १७७८।७९ सालीं उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांच्या ताब्यांतील महालांचा वसूल किती होता त्याचा एक खर्डा आमच्या एका मित्रांनीं दिला आहे. त्यापैकीं पुढील उतारा येथें देतों:—

[ किरकोळ ]

श्री.

"अजमास महाल प्रांत हिंदुस्थान राजश्री पंत प्रधान मु॥ सन तिसा सबैन मया व अलफः—

| | बेरीज. |
|---|---|
| ३८३४००२॥।= | प्रांत माळवा. |
| ३२७९७७१ | तालुके झांशी. |
| ९२०५७६॥।-॥ | सरकार ग्वाल्हेर. |
| ९६२४१ | संस्थान नरवर. |
| ३६६७८२९ | प्रांत बुंदेलखंड. |
| १६७७३८ | प्रांत बुंदी. |
| ३९७८०८॥।- | प्रांत अहीरवाडा. |
| ३६१०८० | संस्थान उदेपूर. |
| ४००००० | प्रांत बघेलखंड. |
| १०५४५१ | प्रांत खेचीवाडा. |
| ६६७४६६०। | प्रांत अंतरवेद |
| ४५००००० | स्वारींचे जमेची वांटणी. |
| २४२०५१५८॥≈॥" | |

ह्यावरून पेशव्यांच्या हिंदुस्थानप्रांताच्या वसुलाचा अजमास इ. स. १७७८।७९ मध्यें किती होता. त्याचा अंदाज कळतो.